महाराष्ट्राचा इतिहास

# मराठा कालखंड

## (भाग २)

## १७०७ ते १८१८

लेखक
डॉ. वि. गो. खोबरेकर,
एम्. ए., पीएच्. डी.
निवृत्त संचालक, पुराभिलेख विभाग,
महाराष्ट्र शासन.




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# निवेदन

महाराष्ट्राचा इतिहास नव्याने उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक संदर्भांसह लिहून घेण्याची योजना मंडळाने मार्च, १९६३ मध्ये हाती घेतली. सुरुवातीस या इतिहासाचे दोन खंडात प्रकाशन करण्याचे ठरले होते. तसेच ही योजना नागपूर विद्यापीठाच्या देखरेखीखाली कै. म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांनी कार्यान्वित करावी व त्यासाठी आवश्यक तो खर्च मंडळाने करावा असे ठरले होते. परंतु जुलै, १९६३ मध्ये या योजनेत बदल करून महाराष्ट्राचा इतिहास पाच भागांमध्ये लिहून/संपादित करून घेण्याचे ठरले. या नवीन योजनेनुसार प्राचीन, मध्ययुगीन, मराठा (भाग १ व २) व अर्वाचीन अशा पाच खंडात विभागणी करण्यात येऊन त्याचे काम अनुक्रमे डॉ. शां. भा. देव, प्रा. ग. ह. खरे, प्रा. न. र. फाटक, डॉ. वि. गो. खोबरेकर व प्रा. गो. ध. पारीख यांच्याकडे सोपविण्यात आले होते. परंतु दरम्यानच्या काळात प्रा. खरे, प्रा. फाटक, प्रा. पारीख यांचे निधन झाले व त्यांनी लिहून/संपादित करून घेतलेला मजकूरही मंडळास उपलब्ध होऊ शकला नाही. डॉ. देव यांच्याकडील लिखाण पूर्ण होत आले आहे. प्रा. फाटक यांच्याकडे असलेल्या "मराठा कालखंड" भाग १ चे लेखनाचे काम मध्यंतरी डॉ. खोबरेकर यांच्याकडे सोपविण्यात आले आहे.

प्रस्तुत खंडाचे लेखन डॉ. खोबरेकर यांनी केले असून या कालखंडात इ. स. १७०७ ते १८१८ पर्यंतचा इतिहास देण्यात आला आहे. उपलब्ध नवीन संदर्भ व संशोधन यावरून हे लेखन डॉ. खोबरेकर यांनी केले असून वाचक या एकत्रित इतिहासाचे स्वागत करतील अशी अपेक्षा आहे. अन्य खंडांच्या मुद्रणप्रती उपलब्ध झाल्यानंतर त्या कालखंडांचेही प्रकाशन मंडळाच्या वतीने त्वरित करण्यात येईल.

सुरेंद्र बारलिंगे

अध्यक्ष,

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

४२, यशोधन,
मुंबई-४०० ०२०.
दिनांक ७ एप्रिल १९८८.

A-137–B.

## अनुक्रमणिका


| प्रकरण | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | शाहू महाराजांस राज्य प्राप्ती | ३ |
| २ | छत्रपती शाहू महाराजांची कारकीर्द—पेशवे बाळाजी विश्वनाथ | २१ |
| ३ | मुलुखगिरीद्वारा मराठी सत्तेची वाढ | ४९ |
| ४ | छत्रपती शाहू व पेशवे बाजीराव | ६३ |
| ५ | पेशवे बाजीराव—राज्य विस्तार | ८५ |
| ६ | पेशवे बाजीराव—मोगल सत्तेस तडाखे (इ. स. १७३२–१७३८) | १०९ |
| ७ | बाजीराव कारकीर्दीची शेवटची दोन वर्षे (१७३८–१७४०) | १२९ |
| ८ | शाहू व बाळाजी बाजीराव (१७४०–१७४९) | १४७ |
| ९ | शाहू महाराजांची अखेर व पुढील व्यवस्था | १७५ |
| १० | पेशवे-निजाम संबंध | १९३ |
| ११ | मराठ्यांचा कर्नाटकातील उद्योग (१७५१–१७६०) | २०५ |
| १२ | बाळाजी बाजीराव व उत्तर हिंदुस्थान (१७५२–१७६१) | २२३ |
| १३ | मराठेशाहीचे पुनरुत्थान—पेशवे माधवराव यांची छाप बसली | २८१ |
| १४ | माधवराव पेशवे (१७६६–१७७२) | ३०५ |
| १५ | नारायणराव पेशव्यांची ९ महिन्यांची कारकीर्द व बारभाईचे कारस्थान (१७७३–१७७६) | ३४५ |
| १६ | राज्यातील अन्य घडामोडी (१७७९ पर्यंत) | ३७१ |
| १७ | इंग्रज-मराठे युद्धाचा शेवट (१७७९–१७८२) | ४०९ |
| १८ | दिल्लीकडील राजकारणे (१७८३–१७८८) | ४२९ |
| १९ | महादजी शिंदे यांच्या उत्तरेतील कामगिरीचा शेवट (१७८९–१७९१) | ४५७ |
| २० | मराठेशाहीतील स्वास्थ्याचा, अंतर्गत शांतता व राज्य वृद्धीचा काळ (१७८४–१७९२) | ४६९ |
| २१ | पुण्यातील घटना, महादजी व सवाई माधवरावांचा मृत्यू (१७९२–१७९५) | ४८७ |
| २२ | पेशवाईचा प्रदोष काल (१७९५–१८०२) | ५०९ |
| २३ | पेशवा स्वातंत्र्य गमावतो (१८०२-१८०३) | ५२५ |

अनुक्रमणिका--चालू


| प्रकरण | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| २४ | इंग्रजांचे शिंदे-भोसल्यांशी युद्ध (इ. स. १८०३ ऑगस्ट ते १८०४ जुलै अखेर) | ५३७ |
| २५ | होळकरांशी इंग्रजांची झोंबाझोंबी | ५४९ |
| २६ | गेलेली सत्ता मिळविण्याची बाजीरावांची धडपड | ५६३ |
| २७ | इंग्रजांचा गायकवाडीत शिरकाव | ५७७ |
| २८ | पेशवे-गायकवाड तंटा मिटविण्यासाठी इंग्रजांची मध्यस्थी | ५८९ |
| २९ | गंगाधर शास्त्र्याचा खून व बाजीरावाची गळचेपी | ६०९ |
| ३० | पेशवाईचा अस्त (इ. स. १८१८) | ६२१ |
| ३१ | शेवटचा प्रवेश | ६४५ |
| ३२ | राज्ययंत्रणा, आर्थिक व सामाजिक जीवन-- | |
| | (१) मराठेशाहीतील राज्ययंत्रणा | ६५१ |
| | (२) राज्यव्यवस्था--मुलकी व सैनिकी | ६६१ |
| | (३) जमीन महसूल व्यवस्था | ६६५ |
| | (४) मराठमंडळ अंतर्भूत निरनिराळे मराठे सरदार, छत्रपती व पेशवे ह्यांचे एकमेकांशी असलेले संबंध. | ६६६ |
| | (५) मुलकी कारभार--राजकीय विभाग व त्यावरील अधिकारी | ६७१ |
| | (६) शिवकालीन गोत | ६७८ |
| | (७) आर्थिक स्थिती | ६८२ |
| | (८) समाज जीवन | ६८७ |
| | (९) मराठेकालीन संस्कृती | ६९० |
| | (१०) मूल्यमापन | ६९६ |

परिशिष्ट १ :--मराठेशाहीतील मद्यपानविषयक धोरण आणि शासन व्यवस्था. ७०५

परिशिष्ट २ :--युरोपियनास घडलेले १८ व्या शतकातील समाजदर्शन. ७०९

परिशिष्ट ३ :-- वंशावळी ७१७

संदर्भ ग्रंथसूची ७२३

व्यक्तिस्थळ सूची ७३९

लेखक परिचय ७७५

शुद्धीपत्र ७७७

## अनुक्रमणिका--चालू


| | चित्रे | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | पेशवा पहिला बाजीराव | ६२ |
| २ | किल्ले वसई | १३२ |
| ३ | पेशवा बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब | १४६ |
| ४ | थोरले माधवराव पेशवे | २८० |
| ५ | माधवराव पेशवे--शिकार करताना | ३२२ |
| ६ | महादजी शिंदे | ४५६ |
| ७ | दुसऱ्या माधवराव पेशव्यांचा दरबार | ४६८ |
| ८ | सवाई माधवराव व नाना फडणीस | ४८६ |
| ९ | घाशीराम कोतवालाचा वाडा | ४९८ |
| १० | सवाई माधवराव, नाना फडणीस व महादजी शिंदे | ५०२ |
| ११ | दुसरे बाजीराव पेशवे | ५०८ |
| १२ | सिंधुदुर्ग किल्ला, मालवण | ५७० |
| १३ | माऊंट स्टुअर्ट एल्फीन्स्टन | ६२० |
| १४ | पेशव्यांचे प्राणी संग्रहालय | ६९२ |
| १५ | पेशवेकालीन गणपती मिरवणूक | ६९४ |

| | नकाशे | |
|---|---|---|
| १ | मराठ्यांनी पायाखाली घातलेला प्रदेश | २२२ |
| २ | मराठा साम्राज्य इ. स. १७५८ | २४६ |
| ३ | पानिपतच्या छावणीचा व लढाईचा नकाशा | २६८ |
| ४ | मराठा साम्राज्य (१७९५) | ४८६ |
| ५ | भरतपूरच्या प्रसिद्ध वेढ्याचा नकाशा | ५५२ |

## लेखकाचे हृद्गत

मराठ्यांच्या इतिहासापैकी थोरले शाहू महाराजांपासून पेशवाई अखेरच्या कालखंडाचा इतिहास लिहिण्याचे काम महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने माझ्यावर सोपविले होते. ह्या कालखंडाचा इतिहास आपल्या पूर्वजांनी शौर्य, वीर्य, तेज आदी गुण दाखवून घडविला, त्याबद्दल आपणा सर्व महाराष्ट्रीयांस जास्त आपुलकी व जवळीक वाटते व तो इतिहास सर्वांना आवडतो.

ह्या कालखंडाच्या इतिहासाची साधने अफाट आहेत. ह्या कालखंडावरील रियासतकार सरदेसाई यांच्या एकूण ९ रियासती असून त्यांची एकूण पृष्ठे ३,३०० आहेत. तसेच मराठीशिवाय इंग्रजी, पोर्तुगीज साधनेही भरपूर आहेत. ह्या सर्वांचा उपयोग मी केलेला आहे.

पेशवा कालखंड लिहित असता या सर्व कालखंडांचा इतिहास ७०० पृष्ठात सामाविला जाईल असा प्रयत्न या ठिकाणी मी केला आहे. ह्या कालखंडातील पेशवे व शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले, पटवर्धन आदी मातब्बर सरदार या एकेकट्यांचा साद्यंत इतिहास लिहावयाचा तर त्यासही ७०० पृष्ठे खर्ची पडतील, अशा उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे हे वीर पुरुष आहेत. अशा परिस्थितीत हा इतिहास लिहिताना मला नाइलाजास्तव बरीच काटछाट करावी लागली आहे. थोरले बाजीराव, महादजी शिंदे, होळकर यांच्या पराक्रमांचे वर्णन करताना सर्व शरीर रोमांचित होते आणि दुसरा बाजीराव, दौलतराव शिंदे व उत्तर कालातील मराठे सरदारांना एकएकटे गाठून इंग्रजांनी त्यांचा केलेला पराभव हे लिहित असता मन उद्विग्न होते व रडू कोसळते. असा हा हर्षामहर्षाचा मराठी राज्याचा इतिहास माझ्या हातून लिहून पुरा करून घेतला, ह्याबद्दल त्या जगन्नियंत्याचे मी आभार मानतो. एवढे मोठे काम एकहाती करत असता काही उणिवा व चुका होणे अपरिहार्य आहे ह्याची जाणीव मला आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे पहिले अध्यक्ष ज्ञानतपस्वी तर्कतीर्थ डॉ. लक्ष्मणशास्त्री जोशी, डॉ. पी. एम. जोशी, कै. प्रा. न. र. फाटक, इतिहास पंडित श्री.सेतू-माधवराव पगडी आदी विद्वानांनी ह्या ग्रंथ लेखनाचे काम मजवर सोपविले होते, त्यांचा मी आभारी आहे. मंडळाचे एक वेळचे सचिव, माझे मित्र कै. द. य. राजाध्यक्ष यांनी ह्या बाबतीत मोलाची मदत केली त्यांचे स्मरण होते. मंडळाचे माजी सचिव श्री. सू. द्वा. देशमुख व हल्लीचे सचिव श्री. पंढरीनाथ पाटील यांनी मला ह्या कामी वेळोवेळी आठवण करून प्रोत्साहन दिले, याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे श्री. सु. गो. सावे व शासनाच्या पुराभिलेख विभागाच्या प्रसिद्धी अधिकारी सौ. सुशीला शास्त्री यांनी वेळोवेळी मदत केली हे मी कृतज्ञतापूर्वक नमूद करतो. तसेच या ग्रंथलेखनाच्या कामी मला ज्यांनी ज्यांनी सहाय्य केले त्यांचाही मी आभारी आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे सांप्रतचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी हा ग्रंथ जनतेसमोर येण्यासाठी विशेष लक्ष घातले याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

ह्या ग्रंथात घालण्यासाठी अस्सल चित्रांच्या प्रतिकृती पुण्याच्या डेक्कन कॉलेज पदव्युत्तर संशोधन संस्थेचे संचालक, डॉ. एस्. बी. देव व प्राध्यापक डॉ. जी. टी. कुलकर्णी यांचे सहाय्याने मिळविल्या. ह्या उभयतांचा मी आभारी आहे.

शेवटी ग्रंथाची छपाई सुबक रित्या केल्याबद्दल व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय आणि ग्रंथागार, नागपूर व त्यांचे सहाय्यक यांचे मी आभार मानतो.

वि. गो. खोबरेकर.

९, यशोधाम, रिलीफ रोड,
सांताक्रूझ (प.)
मुंबई-४०० ०५४.

दिनांक १ मे १९८८.

# शाहू महाराजास राज्य प्राप्ती

## कालसूची

| इ. स. | | |
| --- | --- | --- |
| १६८९, नोव्हेंबर | . | रायगड राजधानी मोगलांच्या ताब्यात. |
| १६९४ . | . | उदाजी पवारकडून मांडवगडची लूट. |
| १६९९ . | . | कृष्णाजी सावंताचे नर्मदा उतरून मोगलांवर छापे |
| १७००, मार्च २ | . | राजाराम महाराजांचा मृत्यू. |
| १७०३ . | . | मराठ्यांची उज्जैनपर्यंत घोडदौड. |
| १७०५ ते १७०७ | . | धनाजी जाधवरावांचा अहमदनगरवर हल्ला. |
| १७०७, फेब्रुवारी २० | . | औरंगजेबाचा दक्षिणेत मृत्यू. |
| १७०७, मे ८ . | . | शाहू महाराजांची मोगलांच्या कैदेतून सुटका. |
| १७०७, नोव्हेंबर १५ | . | धनाजी जाधवरावांची शाहू महाराजांवर चाल. |
| १७०८, जानेवारी १ | . | शाहू महाराजांचा साताऱ्यात प्रवेश. |
| १७०८ . | . | राणी ताराबाई मालवणहून परततात. |
| १७०८, जानेवारी १२ | . | शाहू महाराज स्वतःस राज्याभिषेक करवितात. |
| १७०८, जानेवारी १६ | . | राणी ताराबाईशी शाहू महाराजांच्या तहाच्या वाटाघाटी. |
| १७०८, फेब्रुवारी | . | राणी ताराबाईवर स्वारी करण्याचा शाहू महाराजांचा बेत. |
| १७०८, जून २४ | . | शाहू महाराज पन्हाळ्यास. |
| १७०८, जून २७ | . | धनाजी जाधवांचा मृत्यू. |
| १७०९, जानेवारी १३ | . | कामबक्ष यास हैदराबादजवळ बहादूरशहाकडून कैद. |
| १७०९, जानेवारी १४ | . | कामबक्ष निवर्तला. |
| १७०९, ऑगस्ट २३ | . | शाहू महाराजांचा सरदार रायभानजी भोसले यांचा मृत्यू. |
| १७१० . | . | शाहू महाराजांचे सहाय्यक परसोजी भोंसले यांचा मृत्यू. |

# १

# शाहू महाराजास राज्य प्राप्ती

पूर्व परिस्थितीचा आढावा — औरंगजेबाची दक्षिणेतील कामगिरी — राजाराम महाराजांची धडपड मराठ्यांच्या कसोटीचा काल — मोगलांवर मात — औरंगजेबाचा मृत्यू — शाहू राजांची मोगलांच्या कैदेतून सुटका — महाराष्ट्रात आगमन — ताराबाईचे धोरण — शाहू राजांना खोटे ठरविण्याचा प्रयत्न ताराबाईचे पक्ष — शाहू राजांची साताऱ्याच्या रोखानें चाल — सातारा राजधानीत प्रवेश — अष्ट प्रधान नेमणुका — मराठे सरदारांचा हेतू — ताराबाईचे चढाईचें धोरण — शाहू राजांची ताराबाईवर स्वारी, मोहिमेची फलश्रुती — कोकण, कर्नाटक ताब्यात आणण्याचा विचार — कोल्हापूर गादीची स्थापना — विजयी पक्षात सनदा देण्याचे बादशाही धोरण — आपसातील झगड्यामुळे देशाची स्थिती — बंडाळी मोडण्यासाठी पेशव्यांची नेमणूक

## पूर्व परिस्थिती :

शिव छत्रपतींच्या निर्वाणानंतर मोगल बादशहा औरंगजेब आपल्या प्रचंड सेनेनिशी दक्षिणेत आला. त्याचे उद्देश दोन होते. दक्षिणेतील मराठी सत्ता नाहीशी करणे आणि विजापूर, गोवळकोंडा या शिया सलतनतीचा नाश करणे. मराठ्यांशी लढताना त्याने विजापुरची आदिलशाही व गोवळकोंड्याची कुतुबशाही बुडविली. ही दोन्ही राज्ये खालसा करून त्यातील प्रदेश बादशाही सुभ्यात सामील केला. इ. स. १६८७ पर्यंत ही कामगिरी केल्यावर औरंगजेबाने मराठ्यांस जिंकण्यासाठी आपले सर्व बळ एकवटले. मराठ्यांच्या ताब्यातील किल्ले आपल्या ताब्यात घेण्याचा सपाटा त्याने चालविला. छत्रपति संभाजी महाराजांस पकडून, त्यांचे हाल हाल करून त्यास मारविले. मराठ्यांची राजधानी (रायगड) वेढा घालून ती मोगलांच्या ताब्यात आणिली. रायगडी वास्तव्य करीत असलेली छत्रपति संभाजी महाराजांची राणी येसुबाई व मुलगा बाल शिवाजी ह्यांना पकडले त्यामुळे त्यांना मोंगलांच्या कैदेत २५ वर्षे रहावे लागले.

## राजाराम महाराजांची धडपड :

राजाराम महाराज गादीवर आले. त्यांनी ओढवलेल्या संकटांशी मुकाबला करण्याचे ठरविले आणि सरंजामाची आमिषे मराठे सरदारांना दाखविण्यास सुरवात केली. कारण तशीच आमिषे औरंगजेबाने मराठे सरदारास दाखवून काहींना आपल्या बाजूस वळविण्याचा उद्योग आरंभिला होता. मोगलांचा मोठा लोंढा आणि मराठे सरदारांची फितुरी ह्यामुळे राजाराम महाराजांस

महाराष्ट्रात रहाणे धोक्याचे वाटू लागले. मराठे मुत्सद्यांनी ठरविले की, राजाराम महाराजांनी महाराष्ट्रात न रहाता कर्नाटकात जावे. त्याप्रमाणे राजाराम महाराजांनी वेष पालटून निवडक सहकाऱ्यांसह कर्नाटकात जिंजीस प्रयाण केले. वाटेत अनन्वित अडचणींना तोंड देत ते जिंजीस पोहचले. छत्रपति राजारामास पकडण्याकरिता मोगलांनी जिंजीस वेढा घातला. चहूकडून मराठ्यांवर हल्ले चढवून त्यांना नामशेष करण्याचा चंग मोगलांनी बांधला. मराठेही त्यास पुरून उरले. आपला राजा मोगल बादशहाने जिवे मारिला हें ऐकून सबंध महाराष्ट्र त्वेषाने जागा झाला. मोगलांचे पारिपत्य व मराठेशाहीचे संरक्षण करण्याकरिता जो तो समर्थ सरदार आपल्या मनगटाच्या बळावर उभा ठाकला. जिंजी येथे रहाणाऱ्या राजाराम महाराजांनी यावेळी मराठे सरदारांना पत्रे लिहून सैन्य सरंजाम जमवून मोगलांपासून महाराष्ट्र राज्य परत घेण्याची कामगिरी सांगितली[१]. त्यांस उत्साहित करून कामास लावण्याचे धोरण शिवाजी महाराजांचे तालमीत तयार झालेल्या प्रल्हाद निराजी या मुत्सद्याने अवलंबिले. राजा दूर दक्षिणेस, महाराष्ट्रात फक्त हुकमत पन्हा रामचंद्रपंत अमात्य यांच्यासारखा दूरदर्शी मुत्सद्दी. त्यांचा हुकूम मोगलांचे पारिपत्य करण्याचा. तोच उद्योग मराठ्यास १७०७ पर्यंत पुरला.

**मराठ्यांच्या कसोटीचा काल :**

राजाराम महाराज इ. स. १७०० मध्ये निवर्तल्यावर त्यांची पत्नी महाराणी ताराबाईसाहेब यांनी सर्व मराठा सरदारास साथ देऊन मोगलांचे पारिपत्य करण्यास उद्युक्त केले. मराठे सरदारांनी मोगल सेनेवर कडाडून हल्ले करण्यास व तिला सतावण्यास सुरवात केली. या त्यांच्या उद्योगात विजापूर व गोवळकोंडा ह्या राज्यांच्या सेवेत असलेल्या सैनिकांनी साथ दिली. मराठे मोगलांच्या तंबूवर हल्ले करीत. तंबूच्या कनाती कापीत व मोगल सरदारास सळो की पळो करून सोडीत. उलट मोगलांचा मोर्चा आपल्यावर येत आहे असे आढळले की, मराठे सरदार डोंगर कपारीत दडून रहात व मोगलांचा हल्ला चुकवीत. हे असे १७०३ पर्यंत चालले. ह्यानंतर मराठे-मोगल युद्धाला निराळे वळण लागले. मोगलांशी अनेकदा सामने देता आल्यामुळे मराठ्यांना आपल्या कर्तबगारीबद्दल एक प्रकारचा विश्वास वाटू लागला. आता हे मराठे सरदार राजरोसपणे आपल्या घोड्यावर मांड टाकून बरोबर स्वारांचा तांडा घेऊन दिमाखाने हिंडू लागले. आपल्या कर्तबगारीने मोगल सरदारांच्या मनात आपल्याविषयी त्यांनी भीति निर्माण केली. स्वतःजवळ तोफा, बंदुका, भाले, बरच्या, हत्ती, उंट आणि सैन्यास लागणारी सामुग्री, तंबू—राहुटचा बरोबर घेऊन एखाद्या अजिक्य अशा मातबर सरदारासारखे ते फिरू लागले[२] असे मनूची नमूद करतो. स्वतःच्या खर्चाने व हुषारीने

१. बावडा दप्तर, भा. १, ले. २३, २७.

२. मनुची स्टोरिया, भा. ३, पृ. ५०५; सरकार, औरंगजेब, भा. ५, पृ. २४२-४३.

सैन्य सरंजाम जमवून राज्यातील मुलुख परत मिळविण्याचे काम मराठे सरदार करू लागले.

राजाराम महाराजांनी त्यास न जिंकलेल्या प्रदेशात वतनं देण्याचा तडाखा सुरू केला. मामले परंडा येथील सरदेशमुखीचे वतन राजारामाने नागोजी माने यास दिले.[१] अवधूत तुबाजी यास भागानगरचा सरसुभेदार नेमून मल्हार दादाजीस मोघम सरसुभेदार प्रांत मोगलाई म्हणून नेमणूक दिली.[२] संपूर्णपणे न जिंकलेल्या मुलखात आपले कर वसूल करणारे अधिकारी नेमले. अशा अधिकारावरील सरदारांची महत्वाकांक्षा व स्वातंत्र्य लालसा वाढली. याच महत्वाकांक्षेने प्रेरीत होऊन १६९४ मध्ये उदाजी पवाराने मांडवगड लुटले.[३] इ. स. १६९९ मध्ये कृष्णाजी सावंत १५,००० घोडेस्वारांनिशी नर्मदा पार होऊन मोगलांच्या ठाण्यांवर छापे घालून लूट घेऊन परतला. इ. स. १७०३ मध्ये मराठे सरदारांची घोडदौड उज्जैनपर्यंत पोचली. त्याच वर्षी ऑक्टोबरात सरदार नेमाजी शिंदे याने वऱ्हाडात घुसून तेथील मोगलांचा नायब सुभेदार रुस्तुमखान यास पकडले. होशंगाबाद परगण्यावर धाड घातली आणि नर्मदा पार होऊन तो छत्रसालच्या मदतीच्या हाकेवरून माळव्यात गेला. अनेक खेडी व शहरे लुटून त्याने सिरोंजला वेढा दिला.[४] गुजरातवर यावेळी मराठे सरदारांनी अनेक स्वाऱ्या केल्या. इ. स. १७०५ ते १७०६ या दरम्यान धनाजी जाधवानी अहमदाबादवर हल्ला चढविला, तेथील नायब सुभ्यास कैद केले आणि जवळपासच्या मुलुखातून चौथाई वसूल केली.[५] असा अनिबंध संचार महाराष्ट्रभर मराठे सरदारांचा चालू होता. आपला शत्रू मोडून काढणे ही एकच मोठ्यात मोठी कामगिरी त्यावेळी मराठे सरदाराना वाटे. त्या कामगिरीसाठी मराठ्यांचा राजा त्यांना वतने देऊ लागला. ताराबाईंनी आपल्या नवऱ्याचाच कित्ता पुढे चालविला. दक्षिण सुभ्यातील निरनिराळे भाग मराठे सरदारांच्या पराक्रमाच क्षेत्र ठरवून त्यांना वाटून दिले. परसोजी भोसले यास नागपूर पर्यंतचा पूर्व वऱ्हाड, चिमणाजी दामोदर यास दक्षिण वऱ्हाड, काथसिंग कदमराव ह्यास खानदेश, खंडेराव दाभाडे यास गुजरात, कान्होजी आंग्रे यास कोंकण, दमाजी थोरात यास वरची पायनगांव, धनाजी जाधवास उत्तर पाईनघाट, हैबतराव निंबाळकर यास दक्षिण पाईन-घाट लावून दिले.[६] मराठे सरदारांनी आपल्या पराक्रमाने मोगल मोडला. मराठ्यांच्या पराक्रमामुळे हतबल होऊन औरंगजेब दक्षिणेत १७०७ मध्ये निवर्तला.

---

१. सरकार, औरंगजेब, खंड ५, पृ. १००-१०१.

२, कित्ता, १०२-१०३.

३. मालकम, सेंट्रल इंडिया, पृ. ५३.

४. सरकार, औरंगजेब, भा. ५, पृ. ३८२-३८३.

५. कित्ता पृ. ४३१-३२.

६. राजवाडे, खं. २, पृ. ५.

## औरंगजेबाचा मृत्यू व महाराष्ट्राची स्थिति (इ.स. १७०७-०८) :

इ. स. १७०७ मध्ये औरंगजेब निवर्तल्यावर बादशाहीकरिता नेहमीप्रमाणे औरंगजेबाच्या मुलात तंटे सुरू झाले. दक्षिणच्या सुभ्यापैकी गोवळकोंडा व विजापूर हे दोन भाग कामबक्ष याजकडे होते. आज्जमकडे बाकीचा भाग होता. पण दिल्लीचे तख्त ताब्यात घेऊन स्वतः बादशहा व्हावे असे आज्जमला वाटू लागले. त्याकरिता त्यास उत्तरेस प्रयाण करणे भाग होते. पण उत्तरेस प्रयाण केल्यावर दक्षिणेत मराठी अंमल निर्भयपणे सुरू होणार व पुढे मराठे उत्तरेतसुद्धा आपणास त्रास देण्यास कमी करणार नाहीत हे आज्जम जाणून होता. तेव्हा मराठ्यास निदान काही काळ तरी गुंतवून ठेवणे भाग होते. तो उद्योग म्हणजे, आपसात भांडत रहाणे हा होय. आज्जम हिंदुस्थानच्या वाटेवर असता त्याचा सरदार झुलफिकारखान याने मराठ्यांना आपसात झुंजत ठेवण्याची नामी युक्ती सांगितली. आज्जमशहाला ही युक्ती पसंत पडली. बादशाही कैदेतील शाहू राजाची सुटका केल्यास तो दक्षिणेत जाऊन ताराबाईशी भांडून आपला हिस्सा घेईल. याकरिता त्यास ताराबाईशी झगडा करावा लागेल, दोन पक्ष निर्माण होतील. दोन्ही बाजूस मराठे सरदार आपआपल्या मर्जीप्रमाणे विभागले जातील, मग त्यांच्यात खडाजंगी होईल. समोरासमोर दोन्ही पक्ष उभे राहून झगडतील. या झगड्यातच मराठ्यांची शक्ती खर्ची पडेल. आज्जमशहास झुलफिकारखानाचा हा सल्ला पटला आणि त्याने ८ मे १७०७ च्या सुमारास शाहूस सोडले. त्यावेळी बादशहाची छावणी नेमाड प्रांतात डोअरा येथे होती.

## शाहू महाराजांची कैदेतून सुटका :

सतत अठरा वर्षांच्या कैदेनंतर शाहूची सुटका झाली. नोव्हेंबर, १६८९ मध्ये महाराष्ट्राची राजधानी रायगड ताब्यात घेतल्यावर शाहू राजासह त्यांच्या मातोश्रीस औरंगजेबाने आपल्या कैदेत घेतले. औरंगजेबाने शाहू राजास चांगले वागविले. राजपुत्रास साजेल अशा डौलाने त्यास वाढविले. औरंगजेबाने आपल्या देखरेखीखाली शाहूची दोन लग्ने मोठ्या थाटात करविली. शाहू राजाना बादशहा नेहमी साव म्हणजे सच्चा अशा अर्थाने संबोधित असे. पूर्वी औरंगजेबानेसुद्धा शाहू राजास सोडून देण्याचा विचार दोनदा केला होता. पण त्याच्या संशयी मनाने हा विचार पूर्त होऊ दिला नाही. आज्जमशहाने शाहू राजास सोडताना जो करार केला तो असा—शाहू राजानी बादशाही ताबेदारीत राहून दक्षिणचे राज्य साध्य करावे, प्रसंग पडेल तेव्हा बादशहाची कुमक व सेवा करावी. मातुश्री वगैरे कबिले व मदनसिंग ओलीस दाखल बादशहाचे ताबीन ठेवावे. चौथाई-सरदेशमुखीचे हक्क दक्षिणच्या सहा सुभ्यातून वसूल करावे, त्याच्या सनदा मागाहून पाठविण्यात येतील. तूर्त दोनशे स्वार रांगडे बरोबर घेऊन जावे[1].

---

१. म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. २१-२२.

**महाराष्ट्रात आगमन :**

शाहू राजांची सुटका झाल्यावर ते दक्षिणेत येण्यास निघाले. ते खानदेशात पोचले तेव्हा त्यास विजागर येथे मोहनसिंग स्वारांसह मिळाला. अबू पांडे हा दुसरा सरदार आपल्या सैन्यानिशी शाहू राजास मिळाला. मे महिन्याच्या शेवटी (सासरा) रुस्तुमराव जाधव शाहू राजास मिळाला. त्याला हफ्त-हजारी नेमणूक दिली. जूनच्या सुरवातीस शाहू राजे लांबकानीस पोचले. तिथून त्यांनी महाराष्ट्रात प्रवेश केला. लांबकानीच्या मुक्कामांत शाहू राजास परसोजी भोसले येऊन भेटले. शाहू राजे हेच खरे मराठ्यांचे राजे ह्याची साक्ष इतरांना पटण्याकरिता परसोजी आणि शाहू एकाच थाळीत जेवले. शाहू हा कोणी तोतया असल्याची ओरड ताराबाईने केली होती, त्यास परसोजीने खणखणीत उत्तर असे दिले —शाहू राजे हेच मराठी गादीचे खरे वारस असल्याची खात्री इतर मोठमोठ्या सरदारांना पटून ते शाहू राजास येऊन मिळाले. त्यात हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, चिमणाजी दामोदर हे होते. लांबकानीहूनच शाहू राजानी महाराष्ट्रातील इतर मातबर सरदारास पत्रे लिहिली. महाराष्ट्राचा खरा राजा मीच असून माझ्या भेटीस येऊन आपली स्वामीनिष्ठा व्यक्त करा असे आज्ञापून ही पत्रे सरदारांकडे रवाना केली. त्याचा इष्ट परिणाम झाला. जुलै महिन्यात शाहू राजानी लांबकानी सोडल्यावर प्रवासात त्यांस अनेक सरदार येऊन मिळाले. रयतेच्या अनेक गाऱ्हाण्यांचा निकाल आपल्या मिठास वाणीने कोणासही न दुखवता शाहूराजांनी लावला. थोड्याच दिवसात शाहूराजे लोकांचे लाडके झाले. सर्व बाजूने त्यांच्यावर प्रजेकडून प्रेमाचा वर्षाव होऊ लागला. पावसाळ्याचे दिवस संपल्यावर शाहू राजे अहमदनगरास पोचले. ऑक्टोबरपर्यंत तिथेच राहून त्यांनी ताराबाईशी लढण्याची तयारी चालविली. प्रथम त्यांचा विचार अहमदनगर ही राजधानी करण्याचा होता. पण ते स्थळ मोगलांच्या ताब्यात आणि मोगलांना न दुखविण्याचा शाहूचा निश्चय. ह्यामुळे ते शहर आपल्या ताब्यात घेण्याचा विचार शाहू राजांनी सोडला. तेथूनच जवळ असलेल्या खुल्दाबाद शहरास त्यानी भेट देऊन औरंगजेबाच्या कबरस्थानास प्रणाम केला. अहमदनगरहून साताऱ्याच्या दिशेने शाहू निघाले असता वाटेतील पारद गांवच्या पाटलाने त्यास अडथळा केला. त्याशी लहानशी चकमक उडाली. चकमकीत पाटील गारद झाला. तेव्हा पाटलाच्या बायकोने आपल्या लहान मुलास शाहू राजाच्या पायावर नेऊन ठेविले. "दुष्मन होते ते गेले आता या लहान मुलास अभय द्यावे, सांभाळ करावा" असे पाटलीण बाईने शाहू राजास विनविले. शाहू राजानीही आपली पहिली फत्ते झाली असे समजून त्या मुलाचे नाव फत्तेसिंग असे ठेविले व त्यास राजपुत्रासारखे वाढविले. हेच फत्तेसिंग भोसले अक्कलकोट संस्थानचे संस्थापक होय. ह्याच वेळी शाहू राजाना आपल्या सैन्य बळाची चांगली कल्पना आली. पण ताराबाईचा विरोध लक्षात घेऊन आणि तिच्याकडून हल्ल्याची अपेक्षा करून त्यांनी भीमा न ओलांडण्याचे ठरविले.

**शाहू राजे यांना खोटे पाडण्याचा प्रयत्न :**

शाहू राजांचे महाराष्ट्रातील आगमन ताराबाई राणींना रुचले नाही. त्यांनी शाहू राजे यांस विरोध करण्याचे ठरविले. ताराबाईचे म्हणणे असे की, थोरले महाराजांनी मिळविलेले राज्य संभाजी महाराजांनी घालविले; आणि आपल्या नवऱ्याने व आपण हे नवीन राज्य कमविले. त्यावर दुसऱ्या कोणाचा हक्क कसा असू शकेल? शाहू राजांचा तर नाहीच नाही. त्यांना शिक्षा करण्याकरिता त्यांनी सेनापति जाधव, सरलष्कर मोहिते ह्यांना आज्ञा केली.[1] दुसरे तिचे असे म्हणणे की, थोरले महाराजांनी राजाराम महाराजास हे राज्य दिले होते. त्यावेळी या राज्यावर हक्क शाहू राजांचा नसून तो राजाराम महाराजांचा म्हणजे आपल्या मुलाचा—दुसऱ्या शिवाजीचा आहे. अशा प्रकारचे विचार नुसतेच प्रगट न करता राणी ताराबाईनी शाहू राजांशी दोन हात करण्याची तयारी केली. राज्यातील मातबर सरदार परशुरामपंत प्रतिनिधी, रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी सचिव, नीळकंठ मोरेश्वर, धनाजी जाधव, खंडो बल्लाळ चिटणीस ह्यांना एकत्र बोलावून दूधभातावर हात ठेवूनच शाहू राजांस आम्ही शेवटपर्यंत विरोध करू आणि आपल्याशी बेईमान होणार नाही अशा प्रकारच्या शपथा घेण्यास सांगितल्या. पण मराठा सरदारांचा ह्यावर एक विचार होईना. काहीनी शपथा घेतल्या. धनाजी जाधव व खंडो बल्लाळ ह्यांचे म्हणणे पडले की, शाहू राजे जर खोटे असले तर आम्ही त्यास खात्रीनें विरोध करू, पण खरे असले तर त्यांची बाजू उचलून धरू. शाहू राजे खरे की खोटे याचा तलास लावण्यासाठी राणी ताराबाईनी परसोजी भोसलेचा भाऊ बापूजी भोसले ह्यास शाहू राजांकडे पाठविले. बापूजी भोसले शाहू राजांकडे गेल्यावर शाहू राजाच्या पक्षास मिळाला. धनाजी जाधवानी आपला जमीन महसूल सचिव बाळाजी विश्वनाथ यास शाहू राजांकडे पाठविले. बाळाजी विश्वनाथ परत येऊन त्यांनी धनाजी जाधवाना शाहू राजा खरे आहेत असे सांगून शाहू राजांच्या पक्षास मिळण्यास त्यांचे मन वळविले.

**राणी ताराबाईचा पक्ष :**

ताराबाईच्या पक्षात परशुरामपंत प्रतिनिधी आणि रामचंद्रपंत अमात्य असे दोघे एकमेकांचे हाडवैरी होते. पंतप्रतिनिधीवर ताराबाईचा अतिशय विश्वास असल्यामुळें रामचंद्रपंत अमात्यांनी सुचविलेला कोणताही योग्य सल्ला हुसकून लावण्याचा क्रम परशुरामपंतांनी पाळला होता. त्यामुळे रामचंद्रपंत रागावून जाऊन ते शाहू राजाच्या पक्षास सामील होण्यासाठी हालचाली करू लागले. हे ताराबाईना समजताच त्यांनी त्यास विशाळगडच्या किल्ल्यात कैदेत ठेविले. या कृत्याचा त्यास राग येऊन त्याने धनाजी जाधव आदि प्रमुख सरदारास शाहू राजांच्या बाजूस वळण्यास विनविले.[2] ताराबाईच्या या

१. म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. ३५.
२. खरे, इचलकरंजी स्थानचा इतिहास, पृ. २२.

हेकेखोर कृत्यामुळे त्यांना चांगल्या माणसांचा पाठिंबा गमवावा लागला. उलट शाहू राजांनी आपल्या मायाळू आणि दिलदार स्वभावाने महाराष्ट्रातील कर्तबगार माणसांची मने जिंकली. लोक शाहूराजे व ताराबाईसाहेबांचा मुलगा वेडा शिवाजी यांची आपल्या मनात तुलना करू लागले आणि वेडया शिवाजीपेक्षा राजा म्हणून शाहूराजे किती तरी परीने चांगले असे लोकास वाटू लागले. अशा रीतीने या भाऊबंदकीच्या झगडयात शाहू राजांच्या व्यक्तिमत्वाचा प्रभाव जास्ती पडू लागला.

**शाहू राजांची साताऱ्यावर चाल :**

शाहूराजांच्या मनात घाईघाईने ताराबाईंशी दोन हात करून आपला राज्यावरील हक्क मान्य करून घ्यावयाचा नव्हता. पण ताराबाईंना शाहू राजांचे केव्हा एकदा पारिपत्य करते अशी घाई झाली होती. आपल्या परीने त्यांनी शाहूराजाशी लढाई देण्याकरिता दिवाळीपर्यंत जय्यत तयारी केली. परशुरामपंत प्रतिनिधी व धनाजी जाधव आपल्या सैन्यानिशी ताराबाईंच्या सांगण्यावरून नोव्हेंबर १५, इ. स. १७०७ च्या सुमारास शाहूराजांवर चाल करून जाण्याकरिता ४० हजार फौजेनिशी चाकणजवळ आले.[१] काही पल्ल्यावर या फौजेची शाहूराजांच्या फौजेशी खेडजवळ गाठ पडली. पूर्व ठरावानुसार धनाजी जाधव ऐन लढाईत स्वसैन्यासह शाहूराजांस येऊन मिळाले. परशुरामपंतास मार खाऊन लढाईतून जीव वाचविण्यासाठी पळ काढावा लागला. तो पळत पळत साताऱ्यास आला. खेडच्या लढाईने शाहूराजांचा मार्ग नि:शंक केला. धनाजी जाधवानंतर खंडो बल्लाळ चिटणीस, बहिरोपंत पिंगळे अशी मातबर माणसे शाहूराजांस येऊन मिळाली.[२] खेडच्या विजयानंतर शाहू राजे भीमा तीरास गेले.[३] पुण्याच्या होनप देशपांडे यांस त्यानी तेथे भेटीस बोलाविले. तिथून ते जेजुरीस गेले. तेथे त्यांनी जेजुरीच्या खंडोबाची यथोचित पूजा करून ब्राह्मण भोजन घालून आपल्या विजयाप्रित्यर्थ दक्षिणा वाटल्या. तेथून वीर वाल्हे या गावावरून ते झटपट शिरवळास आले. शिरवळच्या आसमंतातील रोहिडयाचा किल्ला शंकराजी नारायण सचिवाच्या ताब्यात होता. तो किल्ला आपल्या ताब्यात घेण राजांस क्रमप्राप्त होते. पण सचिव तो किल्ला राजांच्या ताब्यात स्वखुषीने देईना. राजे किल्ल्याच्या रोखाने चालून आल्यावर सचिवाने आपणास किल्ल्यात झाकून घेतले. राजांना विरोध केल्याचा पश्चात्ताप सचिवास झाला. त्याचे मन त्याला खावूं लागले. आपण ताराबाईंचा पक्ष घेऊन राजद्रोह केल्याचे शल्य त्याच्या मनास बोचू लागले. अशा मन:स्थितीत त्याने हिरकणी खाऊन आपला अंत करून घेतला.[४] शाहूराजांनी त्यांचा

१. सरदेसाई, म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. ४०.
२. राजवाडे, खं. १८, ले. ४६.
३. सं. प. या. ले. ४९५.
४. राजवाडे, खं. १५, ले. २८९, पृ. २९९.

अल्पवयी मुलगा नारो शंकर यास सचिवपद दिले.[१] शाहू महाराज कैदेतून सुटून आले ते समयी त्यास अनुकूल न व्हावे म्हणोन मातोश्रीसाहेबी व तीर्थरूप यांनी रामचंद्रपंतांजवळून शपथ घेतली. त्याजमुळे शाहू महाराज सातान्यास राहिले, आमचे तीर्थरूप व चुलते पन्हाळचास राहिले असे रामराजे लिहितात.[२] सचिवाचा अंत झाल्यामुळे शाहू राजांस विजय मिळाला. यामुळे सचिवाच्या ताब्यांतील राजगड, तोरणा (प्रचंडगड), रोहिडा ऊर्फ विचित्रगड पुरंदर, सिंहगड हे सर्व किल्ले शाहू राजांच्या ताब्यात आले. तसेच नीरेच्या उत्तरेकडील सर्व प्रदेश शाहू राजांच्या ताब्यात आला. तद्नंतर चंदन, वंदन किल्लेदारांनी शाहूचे प्रभुत्व स्वीकारले. त्यामुळे शाहू राजांच्या ताब्यात सबंध उत्तर महाराष्ट्र आला. शाहू राजांनी आपला शिरवळचा मुक्काम हलवून सातारा घेण्याच्या इराद्याने ते पुढे चालले.

### सातारा राजधानीत प्रवेश :

सातारा राजधानी ताराबाईंची. शाहू राजे सातान्यावर चाल करून येत आहेत असे पाहून ताराबाईंनी परशुरामपंतांस सातान्याचे रक्षण करण्यास ठेऊन स्वतः त्या पन्हाळचास गेल्या. परशुरामपंतांनी किल्ला लढविण्याचा निश्चय केला. शाहू राजानी लढाई टाळता यावी म्हणून परशुरामपंतांशी सूत लावून त्यास आपल्या ताब्यात किल्ला देण्याची खटपट केली. पण परशुरामपंत शाहूराजांच्या आमिषास भुलला नाही. तेव्हा शाहू राजानी तो किल्ला आठ दिवसात घेण्याचे ठरवून किल्लेदार शेख मिरा ह्याची वायका मुले वाईस होती त्यास पकडून सातान्यास आणिले आणि त्यास धमकाविले की, किल्ला आमच्या स्वाधीन न केल्यास तुझ्या बायकामुलांस तोफेच्या बाराने उडवून देऊ. हे ऐकून शेख मिरा घाबरला. त्यांनी शाहू राजास आपण किल्ला स्वाधीन करतो असे कळविले. पण परशुरामपंतामुळे त्याला पेच पडला. शेवटी परशुरामपंतास त्याने अवचित कैद केले व किल्ला शाहूराजांच्या ताब्यात दिला.[१] आपल्या संकल्पाच्या बरोबर आठव्या दिवशी म्हणजे १ जानेवारी १७०८ रोजी शाहू राजांनी सातान्यात प्रवेश केला. किल्ल्यासोबतच ताराबाईसाहेबांचा उजवा हात परशुरामपंत प्रतिनिधी शाहूराजाच्या हातीं कैदी म्हणून सापडला.

ताराबाईंनी आपली राजधानी व मुख्य सल्लागार गमाविले. शाहू राजे सातान्याचे छत्रपति झाले. महाराष्ट्रास शिव छत्रपतीनंतर खरे छत्रपति त्यांचे नातू शाहू छत्रपति मिळाले. फक्त त्यांचा राज्यारोहण समारंभ व्हावयाचा काय तो बाकी राहिला होता.

---

१. का. सं. प. या. ले. ४९५, म. सा. छो. ब. इ. सं. पृ. १८८-१८९.

२. इ. सं. पे. द. पृ. ३३-३४.

३. इ. सं. पे. द. पृ. १०, ले. ११ व पृ. १८८, ले. ६६; का. सं. प. या. ले. ४९५.

ताराबाईंनी कृष्णेच्या नदीपलीकडे जाऊन कृष्णेच्या अलीकडील भूप्रदेश शाहू राजांकडे राहू दिला. शाहू राजे थोर मनाचे होते. कृष्णेच्या पलीकडील ताराबाईंच्या ताब्यात राहिलेला भूभाग त्यांनी तिच्या ताब्यात तसाच राहू दिला. त्यांचा विचार की, जाऊ द्या, ताराबाईसाहेब आपली चुलती. केव्हा तरी पुढे त्यांची समजूत पटवून ते राज्य त्या आपल्या स्वाधीन करतील. शाहू राजांनी १२ जानेवारी १७०८ रोजी आपणास राज्याभिषेक करविला आणि आपण महाराष्ट्राचे छत्रपति झालो असे या समारंभाने जाहीर केले.[१]

**अष्टप्रधान नेमणुका :**

शाहू छत्रपतींनी या समारंभानंतर अष्ट प्रधानांच्या नेमणुका केल्या त्या अशा[२]—बहिरो मोरेश्वर पिंगळे—पेशवे, धनाजी जाधव—सेनापति, नारो शंकर—सचिव, रामचंद्रपंत पांडे—मंत्री, महादजी गदाधर—सुमंत, अंबुराव हणमंते—अमात्य, होनाजी अनंत—न्यायाधिश, मुदगलभट-पंडितराव. पुढे हैबतराव निंबाळकरास सरलष्कर नेमिले, खंडो बल्लाळास राजाने चिटणीस पद दिले. परशुरामपंत प्रतिनिधी ह्यावेळी तुरुंगातच होता; म्हणून त्या जागी प्रल्हाद निराजीचा मुलगा गदाधर प्रल्हाद यास नेमिले.[३] एवढ्याच नेमणुका करून शाहू छत्रपति थांबले नाहीत. त्यांनी आपणास ज्यांनी मदत केली होती त्यांची आठवण ठेविली. परसोजी भोसलेचे ऋण शाहू छत्रपती जाणून होते. त्याचा उतराई होण्यासाठी त्यांनी परसोजी भोसल्यास सेनासाहेब सुभा हा हुद्दा बहाल केला आणि त्याच्या ह्या हुद्याचा रुबाब त्यास राखता यावा म्हणून त्यास त्यांनी नागपुराकडील मुलूख जहागिर म्हणून दिला. अखेरपर्यंत छत्रपतींनी त्या घराण्याबद्दल लोभ ठेवला. आणखीन अशाच बारीक सारीक नेमणुका शाहू छत्रपतींनी केल्या. अशा रीतीने शाहू छत्रपतींची कारकीर्द महाराष्ट्रात सुरू झाली.

**मराठे सरदारांचा हेतू :**

शाहू राजांचा सिंहासनारोहण समारंभ झाल्यावर पहिला प्रश्न त्याला भेडसावीत होता तो ताराबाईंचा. राणी ताराबाईंचा अद्याप पूर्ण पराभव झाला नव्हता आणि त्यांनी शाहू छत्रपतींचा पाडाव करण्याचे आपले धोरण सोडले नव्हते. शाहू छत्रपतींनी तिचा पूर्ण पाडाव करण्याचे ठरविले असते तरीही ते जमले नसते, कारण शाहूराजांस मिळालेल्या सरदारांना ताराबाई व शाहू या दोघामधील भांडण तेवत ठेवून स्वतःचा भाव वाढवून घ्यावयाचा होता. एकदा राजांची सत्ता निष्कंटक झाली की, पुन्हा राजे आपल्या

---

१. म. द. रु. १, पृ. ११८; रा. खं. २१, ले. ३२८; कित्ता, खं. ३, ले. १३५, पे. द. भा. ३०, पृ. २२६.

२. अष्टप्रधानांच्या वेतनांची यादी, पे. द. ३०, पृ. २३०-३१.

३. रा. खं. २०, ले. ४४, खं. ४, पृ. ३२-३३; वतनपत्रे व निवाडे, ले. १७

सांगण्याप्रमाणे वागणार नाही. उलट आपल्यालाच त्यांचे हुकूम निमुटपणे शिरसावंद्य मानावे लागतील. तसे होऊ नये म्हणून त्या सरदारांनीच ताराबाईचा पाडाव करण्यात कुचराई व चालढकल केली. खंडेराव दाभाडे सारख्या जुन्या व जाणत्या सरदारांनी शाहू राजास उपदेश केला की, ताराबाई ही आपली चुलती असून ती वडील आहे. तिच्याबद्दल नरमाईचे व जुळते घेण्याचे धोरण ठेवावे. शाहू राजे त्याप्रमाणे विचार करू लागले आणि त्यांनी वारणेच्या पलीकडील मुलूख ताराबाईंना देऊ केला व त्याप्रमाणे तह करण्याचा घाट ता. १६ जानेवारी १७०८ ला घातला.[१] पण शाहू छत्रपतींनी मोठ्या औदार्याने पुढे केलेला सहकार्याचा हात ताराबाईने त्यावेळी झिडकारला आणि पुढे १७३१ मध्ये परिस्थितीने त्याचाच स्वीकार तिचा सावत्र मुलगा संभाजीराजांनी केल्यावर ताराबाईंना या आपल्या पुतण्याच्या आश्रयास जावे लागले तो भाग पुढे येईल.

### ताराबाईचे चढाईचे धोरण :

ताराबाईनी शाहूशी समझोता करण्याचे सोडून त्याविरुद्ध चढाई करण्याचे ठरविले. त्याकरिता त्यांनी नवीन योजना आखली. वसंतगडावर रामचंद्रपंत तुरुंगात होता त्यास सोडले आणि झाले गेले विसरून जाण्यास सांगून त्यास आपल्या बाजूस ओढले.[२] या आपल्या उद्योगात त्यांनी वाडीकर सावंताची मदत मिळविली.[३] कान्होजी आंग्रे व संताजी घोरपडेचा मोठा पुतण्या शिधोजी हिंदुराव यांनाही आपल्या मदतीस घेतले. नंतर त्यांनी किल्ल्यावर धान्यसामुग्री चढविली आणि तो लढविण्याच्या दृष्टीने खूप तयारी करून ठेविली.

### शाहू राजांची ताराबाईवर स्वारी :

ताराबाईंच्या या तयारीमुळे शाहू राजास ताराबाईवर स्वारी करणे भाग पडले. त्यांनी स्वारीची सर्व सिद्धता करून १७०८ च्या फेब्रुवारीत स्वारी करण्याचा बेत केला.[४] साताऱ्याहून शाहू छत्रपति निघाले ते मुक्काम दर मुक्काम करीत पन्हाळ्यास आले व तिथून ते पंचगंगेस गेले.[५] पंचगंगेस येताना वाटेत वसंतगड आणि पावनगड हे किल्ले त्यांच्या हाती आले. त्यावर आपली शिबंदी ठेवून कोल्हापुराच्या आसमंतात आपली ठाणी त्यांनी पक्की केली आणि ते रांगण्याच्या रोखाने चालले. वाटेतील विशाळगडाने शाहू छत्रपतिना मानवंदना दिली तेव्हा शाहू महाराज रांगण्याजवळ आले. पण शाहू रांगण्यावर चालून येत आहे हे पाहिल्यावर ताराबाईंनी किल्ल्याचे दरवाजे

---

१. करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधने, भा. १-२, पृ. ४

२. खरे, इचलकरंजी संस्थानचा इतिहास, पृ. २२.

३. राजवाडे, खंड ८, ले. ६२, पृ. ८३, ८४.

४. सरदेसाई, म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. ५४.

५. राजवाडे, खंड ३, ले. ६४, पृ. ६६.

लावून घेतले, आपण किल्ल्यात राहिल्या. त्यांनी शाहू छत्रपतींच्या पारिपत्या-करिता वाडीकर सावंत व कान्होजी आंग्रे या दोन मातबर सरदारास बोलाविले. त्यांच्या मदतीने रांगणा किल्ला त्या किती तरी दिवस लढवू शकल्या असत्या. त्यांची त्या दृष्टीने आखलेली योजना उत्तम होती. पण त्या ज्यांच्या विश्वासा-वर विसंबिल्या होत्या त्या सरदारांनी त्यास दगा दिला. कान्होजी आंग्रे जातीनिशी मदतीस आलाच नाही आणि सावंताने आपला पवित्रा फिरवून तो शाहू छत्रपतींना मिळाला.[१] रामचंद्रपंत अमात्याने त्यावेळची परिस्थिती हेरून ताराबाईंना व त्यांच्या मुलास किल्ल्याच्या बाहेर काढले आणि स्वत: किल्ला लढविण्यास राहिला. सतत तीन महिने टिकाव धरल्यावर शरणागति पत्करल्याशिवाय तरणोपाय नाही, हे हेरून रामचंद्रपंताने धनाजी जाधव-तर्फे वेढा उठविण्यासाठी शाहू राजांची मनधरणी केली.[२] ताराबाईकडून त्याने धनाजी जाधव, खंडो बल्लाळ आणि परशुरामपंत यांना ताराबाईंच्या पक्षास येऊन मिळण्यासंबंधीची पत्रे लिहिली. २३ मे १७०८ च्या पत्रात त्या या सरदारांना लिहितात, की माझ्या हेतुविषयी कोणत्याही प्रकारची तिळमात्र अंधुकशीसुद्धा शंका न घेता शाहू राजांना सोडून तुम्ही आमच्या बाजूस या कसे ?[३] ताराबाईंच्या या मनधरणीचा काहीच उपयोग झाला नाही असे नाही. त्यावेळच्या मराठे सरदारांना ताराबाई व शाहू राजे या दोघामधील भांडण तेवत ठेवावयाचेच होते. का की ताराबाईंचा पक्ष कमकुवत झाल्यास शाहू राजे शिरजोर होतील व आपणास विचारणार नाहीत आणि शाहू राजांचा पराभव झाल्यास ताराबाईही आपणास पुसणार नाही हे या सरदारांना ठावूक होते, म्हणून त्यांनीसुद्धा दोहोंपैकी एका पक्षाचे समूळ उच्चाटन होऊ दिले नाही. थोडे नरमाईने घेतले, गृहकलह तेवत ठेवला म्हणजे दुसऱ्यांचे फावतें म्हणतात ते हे असे. ताराबाई शाहू राजे यांच्या भांडणात या मातबर सरदारांना भाव चढला. दोन्ही पक्षांना हे सरदार आपल्या बाजूस असावे असे वाटे. त्यांना आपआपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न दोन्ही बाजूने होई. उलट स्वार्थावर नजर ठेवून भांडण तेवत ठेवून दोन्ही पक्षाकडून आपआपली वतने बळकट करून घेण्याची संधी सरदार गमावीत नसत.[४] धनाजी जाधवाने किल्ल्यास घातलेला वेढा आपण उठवितो असें सांगितले; नाही तरी पावसाळा आलाच होता.

हे सबळ कारण धनाजीने पुढे केले. परसोजी भोसल्याने ह्या कृत्यास आपला विरोध दर्शविला. शाहू राजांनी धनाजीच्या सूचनेस आपली संमती दिली. वेढा उठविण्यास आज्ञा दिली आणि वेढा उठविला. नवीन संपादिलेल्या मुलुखाच्या व्यवस्थेस खंडो बल्लाळ चिटणीसचा भाऊ निळो बल्लाळ यास ठेवून शाहू राजे २४ जून १७०८ ला पन्हाळयास परतले.

१. रा. खं. ८, ले. ६७, पृ. ८८.
२. सरदेसाई, म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. ५५.
३. रा. खं. ८, ले. ६४—६६, पृ. ८६-८७.
४. सरदेसाई, म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. ४१.

**मोहिमेची फलश्रुति :**

अशा रीतीने रांगण्याची मोहीम संपुष्टात आली. या मोहिमेने शाहू-राजास अधिक मुलुखाचे स्वामित्व मिळवून दिले. पण ताराबाईंचा बंदोबस्त करण्याचे उद्दिष्ट साध्य झाले नाही. याचे कारण शाहू राजांचा धरसोडपणा असे म्हणणे संयुक्तिक नाही. शाहू राजांच्या आज्ञा सर्व सरदार पाळीत होते असे नाही. वर सांगितलेल्या सरदारांच्या दुटप्पी धोरणामुळेच शाहू राजास हा निर्णय घेणे भाग पडले. शाहू महाराजांनी कर्तव्यकठोर होऊन ताराबाईंचा पूर्ण उच्छेद करण्याचे ठरविले असते तर ते खात्रीने करू शकले असते. रांगण्याच्या स्वारीमध्ये शाहू महाराजांचे सरदार निव्वळ स्वार्थी राजकारण खेळत होते. धनाजी जाधवांसारखे मातबर रणधुरंधर जगदाळे आणि पिसाळ या देशमुखांची भांडणे लावून देण्यात आपले मन रमवित होते. शाहू राजास नाना प्रकारे गळ घालून नडवीत होते.[1] तर परंपरागत वैरामुळे धनाजींच्या विरुद्ध हिंदुराव घोरपडे लढाईस ठाकले होते. बाळाजी विश्वनाथ, दत्ताजी शिवदेव आणि नारो राम शेणवी हे सरदार वरील दोघा सरदारांची आपसातील भांडणे मिटवून समेट घडवून आणण्याच्या उद्योगात गुंतले होते. परसोजी भोसले आपला हस्तक रामजी नारायण कोल्हटकर यास जहागीर मिळवून देण्याच्या कार्यात मग्न होते. अशा प्रकारे शाहू महाराजांच्या सरदारांपैकी ज्यावेळेपासून ताराबाईंनी रांगण्याहून पलायन केले तिथपासून शाहू राजांच्या कार्यात मन लावून काम करीत नव्हते.

**कर्नाटक व कोंकण ताब्यात आणण्याचे शाहू राजांचे विचार :**

शाहू छत्रपतींनी रांगण्याचा वेढा उठविला तेव्हा त्यांचा विचार पावसाळ्यानंतर पुन्हा रांगण्यास वेढा घालून किल्ला सर करण्याचा होता. पण हा विचार त्यांनी बदलला आणि विचार केला की, कोंकण आणि कर्नाटक आपल्या ताब्यात आणावे. पन्हाळ्याला असताना शाहू छत्रपतींनी कर्नाटकातील सर्व पाळेगारास पत्रे लिहून त्यास आपली सत्ता मानण्याचे आवाहन केले. ताराबाईंचा पाडाव करण्यासाठी शाहू छत्रपतींनी मुंबईचा गव्हर्नर सर निकोलास व्हाईट यास पत्र लिहिले आणि आपणास त्याकरिता दारूगोळा, सैन्य व पैसा इंग्रज सरकारकडून मिळावा अशी विनंती केली. पण इंग्रज गव्हर्नरने कोणतीच मदत करण्याचे नाकारले.[2] १७०८ च्या नोव्हेंबर ४ रोजी धनाजी जाधव वारले. तेव्हा सेनापतीच्या पदावर त्यांचा मुलगा चंद्रसेन जाधवाची नेमणूक शाहू छत्रपतींनी केली. पण त्याचे मन शाहूच्या पक्षास मिळावे की ताराबाईंच्या, या विचाराने दोलायमान होऊ लागले. अशा स्थितीत शाहू छत्रपतींना वाटू लागले की, वारणेच्या पश्चिमेकडील सर्व मुलूख ताराबाईंच्या

---

१. रा. खं. १५, ले. ५९; कित्ता, खं. ३, ले. ६४; सरदेसाई, म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. ५७.
२. ग्रँट डफ, म. इ; भा. १, पृ. ४२२ (१८२६ ची आवृत्ती).

स्वामित्वाखाली सोडावा. त्याप्रमाणे महाराजांनी वारणा नदीच्या पलीकडील प्रदेशात असलेल्या आपल्या सैन्यास परत बोलाविले. शाहू महाराजांच्या या बदललेल्या धोरणाचा ताराबाईंनी फायदा घेतला. महाराजांनी आपल्या निर्णयानुसार पन्हाळा सोडला हे पाहून ताराबाई १७०८ च्या अखेरीस मालवणहून परतल्या आणि त्यांनी विशाळगड किल्ला ताब्यात घेतला. ताराबाईचे सल्लागार रामचंद्रपंत अमात्य हे होते. त्यांचे मते ताराबाईंनी वारणेच्या पलीकडे न जाता कोल्हापुरास राजधानी करून शाहू महाराजांनी सोडलेल्या मुलुखाचा बंदोबस्त करावा. ताराबाईंना हे त्यांचे मत पटून त्यांनी कोल्हापूर ही आपली राजधानी केली.[1]

ताराबाईंनी कोल्हापुरास गादीची स्थापना केल्यावर त्यांनी आपली वक्रदृष्टी सावंतवाडीकरांवर फिरविली. शाहू महाराज व ताराबाई राणी यांच्या झटापटीत सावंतवाडीकरांनी शाहू महाराजांचा पक्ष स्वीकारला होता. त्यामुळे राणीनी सावंतवाडीकरांस आपल्या बाजूस वळविण्यासाठी पत्रे लिहिली[2] व त्यास वठणीवर आणण्यासाठी त्याजविरुद्ध रामचंद्रपंत अमात्य ह्यास रवाना केले. रामचंद्रपंतांनी सावंतवाडीकरांबरोबर लढाई देऊन आपणास हव्या तशा तहाच्या अटी त्यांजकडून कबूल करवून घेतल्या. शाहू महाराजांनी आपला सरदार परसोजी भोसले यास ताराबाईंच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठी कोल्हापूरच्या परिसरात पाठविले होते. त्यास सुद्धा शाहू महाराजांनी आपल्या निर्णयानुसार परत बोलाविले.

वरील बनावाने राणी ताराबाई व शाहू महाराज यांचा समेट होऊन दोन्हीही राज्ये सुखाने नांदण्याची सुचिन्हे दिसू लागली होती. पण दोन्ही घराणी सुखाने नांदून महाराष्ट्र भूमीस शांतता लाभू न देणे हे तर मोगल बादशहाचे उद्दिष्ट होते. समेटामुळे या उद्दिष्टाचा जणू नाशच होत होता; हे बहादूरशहास पाहवले नाही. त्याने या दोन्ही घराण्यात कलह लावून देण्यास सुरवात केली.

**विजयी पक्षास सनदा देण्याचें बादशाही धोरण :**

औरंगजेब बादशहाचा मुलगा शहाजादा मुअज्जम याने जाजावच्या आग्र्याजवळ लढाईत आपला भाऊ आझमशहा याचा १७०७ च्या अखेरीस पराभव करून त्यास ठार मारिले व स्वतः बहादूरशहा हे नाव धारण करून दिल्लीचा बादशहा झाल्याची द्वाही फिरविली.[3] त्यावेळी शाहू महाराजांनी आपला सरदार रायभानजी भोसले आणि कृष्णाजी दादाजी प्रभू या मावळातील प्रभूंना आपले वकील म्हणून ऱ्हाणपुरावर बहादूरशहाचे भेटीस पाठविले.[4] पुढे आपला

१. खरे, इचलकरंजी संस्थानचा इतिहास, पृ. २३.
२. बावडा दप्तर, खं. १, ले. ७०-७१.
३. आयर्विन, लॅटर मोगलस्, भा. १, पृ. २२—३२.
४. रा. खं. १५, ले. २८९.

प्रतिनिधी गदाधरपंत यासही शाहू महाराजांनी बादशहाकडे पाठविले. त्याने बादशहाचे दर्शन घेतले. यामुळे शाहूची एकनिष्ठता सिद्ध होऊन बादशहा शाहू महाराजांवर खूष झाला. शाहू महाराजांनी मिळविलेला प्रदेश बादशहाने त्यांजकडे कायम केला. महाराजास शिरपाव दिला आणि त्यांची दहा हजाराच्या मनसबीवर नेमणूक केली.[१] तद्नंतर बादशहा राजपुतान्यात स्वारीवर गेला, पण इतक्यात त्यास बातमी कळली की, कामबक्षाने दक्षिणेत बंडावा करून आपणास बादशहा म्हणून जाहीर केले आहे. तेव्हा तो कामबक्षावर चालून आला. ह्या झुंजीत त्याने शाहू महाराजास व मराठे सरदारांना आपल्या मदतीस बोलाविले. शाहू महाराजांनी नेमाजी शिंदे यास फौजेनिशी बहादूरशहाच्या मदतीस पाठविले. दोन तीन महिने पावेतो फौजेची व्यवस्था लावून तारीख १३ जानेवारी १७०९ या दिवशी हैद्राबादजवळ बहादूरशहाने कामबक्षाशी लढून त्यास कैद केले, पण तो दुसऱ्या दिवशी निवर्तला.[२] (१४ जानेवारी १७०९). हे प्रकरण संपल्यावर शाहू महाराजांनी पाठविलेला वकील बादशहास भेटला आणि "शाहू राजास चौथाई व सरदेशमुखी देण्याचे जे बादशहाने ठरविले आहे ते कायम करावे" अशी विनंती केली.[३] याच वेळी ताराबाईचे वकीलही सरदेशमुखीचा हक्क मागण्यासाठी बादशहाकडे गेले. वजीर मुनिमखान याने ताराबाईचा पक्ष उचलून धरला. झुल्फिकारखान शाहू महाराजांच्या पक्षाचा. दोन्ही पक्षांनी आपआपल्या कैफियती बादशहापुढे मांडण्याची शिकस्त केली. सरदेशमुखीची फर्माने लिहून तयार होती. फक्त त्यात नांव दाखल करून पुरी करणे बाकी होते. वजिराने ह्या भांडणात तोड काढिली की शाहू महाराज व राणी ताराबाई ह्यांनी आपसात लढून तंटा मिटवावा म्हणजे विजयी पक्षास सनदा देण्यात येतील. बादशहाने ही शक्कल पसंत केली. अशा रीतीने चौथाई सरदेशमुखीच्या सनदा कोणाच्या नांवे न होता तशाच राहिल्या.[४] मराठ्यांस कमकुवत करण्याचा औरंगजेबी डाव बादशहाने तसाच चालू ठेवून तो परत नर्मदा ओलांडून उत्तरेस गेला.[५]

## आपसातील झगड्यामुळे देशाची स्थिती :

बादशहाच्या वरील निकालाने शाहू महाराज व ताराबाईसाहेब यामधील झगडा पुन्हा सुरू झाला. बादशाही सनदांच्या पाठिंब्याने आपण ताराबाईंना धाब्यावर बसवू ही शाहू महाराजांची आशा फोल ठरली. दोघांनीही आपआपल्या परीने जोर केला. त्यामुळे उभयतांचा हा झगडा आणखीन चार वर्षे चालला. एकमेकांची ठाणी हस्तगत करणे, लालूच, धाकदपटशा दाखवून

१. रा. खं. ८, ले. ५५-५७ (या पत्रांच्या तारखा चुकलेल्या आहेत).
२. आर्यविन, लॅटर मोगलस्, भा. १, पृ. ६४.
३. इलियट, खं. ७, पृ. ४०८.
४. कित्ता, पृ. ४०९.
५. आर्यविन, लॅटर मोगलस्, खं. १, पृ. ६७.

एकमेकांचे सरदार आपल्या पक्षास वळविणे असले प्रकार जोरात चालले. सरदार आपल्या बाजूस वळविण्यासाठी त्यांना वतनाची आमिषे दाखविणे इष्ट होते. तेही प्रकार दोन्हीकडून सर्रास होऊ लागले. त्यामुळे डोईजड सरदार आणखीन पुंड बनून फारच पुंडावा करू लागले. त्यातील म्होरके दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर, उदाजी चव्हाण हे होत. ह्यांनी कोणत्याही पक्षास न मिळता पुंडाई करून जबरदस्तीने वसूल गोळा केला आणि प्रजेला आपल्या आसुरी कृत्यांनी धसका बसविला.[१] देश उजाड पाडला. औरंगजेबाच्या दक्षिणेतील वास्तव्यात मोगली फौजेने मराठी फौजेशी मुकाबला करताना प्रजेच्या हालांची पर्वा केली नव्हती. जिकडे तिकडे लुटालूट, जाळपोळ हाच उद्योग सुरू होता. पंचवीस वर्षे महाराष्ट्रातील प्रजेने मोगली फौजेच्या सतत भ्रमणामुळे हे हाल सोसले. मराठ्यांचा राजा महाराष्ट्रात आल्यावर त्यांना वाटले की, प्रजेला आता स्वास्थ्याचे दिवस येतील पण शाहू महाराज व ताराबाईसाहेब यांच्या बेबनावामुळे वरील उन्मत्त सरदारांचे आयतेच फावले आणि त्यांनी हवालदील प्रजेवर आणखीन अन्याय सुरू केले. ही स्थिती १७१३ पर्यंत चालूच राहिली. ती पालटून देशात शांतता व सुव्यवस्था स्थापिण्याचे काम शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथास आपला पेशवा नेमून त्याजवर सोपविले.

**बंडाळी मोडण्यासाठी पेशव्यांची नेमणूक :**

बाळाजी विश्वनाथास पेशवेपद मिळाले तेव्हा धनाजी जाधवांचा मृत्यू होऊन ५ वर्षे झाली होती (धनाजी जाधव, मृत्यू ९ जुलै १७०८) ; १७१० मध्ये शाहू महाराजांचा सहाय्यक परसोजी भोसले निवर्तला व त्याचा पुत्र कान्होजी कारभारावर दाखल झाला. शाहू महाराजांचा मुख्य सरदार रायभानजी भोसले हा २३ ऑगस्ट १७०९ रोजी मरण पावल्यावर शाहू महाराजांची मोठी हानी झाली. यावेळी चंद्रसेन जाधव, उदाजी चव्हाण, सिधोजी, हिंदुराव घोरपडे वगैरे सरदारांची मने द्विधा होऊन शाहू राजास आपला जम बसण्याची विवंचना निर्माण झाली. ह्या सरदारांची समजूत काढण्याचा शाहू राजांनी फार प्रयत्न केला. पण ते शाहूस सोडून गेलेच. चंद्ररावाचा व रावरंभा निंबाळकर यांचा पुंडावा मोडून आपली बाजू सावरण्यासाठी शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथाची पेशवेपदी नेमणूक केली.

त्याच धांदलीत शाहू महाराजांनी सकवारबाई व सगुणाबाई अशा दोन स्त्रियांशी लग्नें केली. पुढे बाळाजी विश्वनाथानेच शाहूच्या कुटुंबाची सुटका करून शाहूची भेट घडवून दिली. अशा या भट घराण्यातील पहिल्या पेशव्याची कर्तबगारी पुढील प्रकरणात पाहू.

१. पे. द. ७, पृ. १४-१५.

• • •

## छत्रपती शाहूंची कारकीर्द

# कालसूची

| इ. स. | |
|---|---|
| १५७५ . . . . . . | बाळाजीपंताचा पणजा महादजीपंत श्रीवर्धनच्या देशमुखीवर आढळतो. |
| १६६० . . . . . . | बाळाजी विश्वनाथ भट याचा जन्म. |
| १६८९ . . . . . . | बाळाजी विश्वनाथ भट (पेशवा) मराठी राज्यात प्रतिष्ठित नोकरीवर आढळतो. |
| १६९५, मे २१ ते . . . १६९९, ऑक्टोबर १९ | औरंगजेबाचा बारामतीस मुक्काम. |
| १६९९ ते १७०८ . . . | बाळाजी पेशव्याने पुणे व दौलताबादचा सुभेदार म्हणून काम केले. |
| १७०८, जून . . . . . | धनाजी जाधव मरण पावला. |
| १७०८, डिसेंबर . . . . | बाळाजीस सेनाकर्ते हा किताब मिळतो. |
| १७०८ ते १७१० . . . | या दोन वर्षात शाहू महाराज व ताराबाई या दोघात मारामारी सुरू झाली. |
| १७११ . . . . . . | शाहूच्या हुकुमावरून हैबतराव निंबाळकर सेनापती चंद्रसेन जाधव याचा पराभव करतो. |
| १७११, ऑगस्ट २१ . . | शाहूकडून बाळाजीने पंचवीस लाखाचा सरंजाम करून घेतला. |
| १७११, ऑक्टोबर १ . . | शाहू महाराजांनी चंद्रसेन जाधवाचे सेनापतीपद काढून घेतले. |
| १७११, नोव्हेंबर २० . . | परशुरामपंत प्रतिनिधी यास शाहू महाराजांकडून कैद. |
| १७१३ . . . . . . | निजाम उल्मुल्कची दक्षिणच्या सुभ्यावर चाल. |
| १७१४, नोव्हेंबर १७ . . | शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथास पेशवाईची वस्त्रे दिली. |
| १७१४, फेब्रुवारी २८ . . | आंग्र्यांचा शाहू महाराजांशी तह. |
| १७१४, ऑगस्ट . . . | ताराबाई व तिचा मुलगा शिवाजी यास राजसबाईकडून कैद. |

| | |
|---|---|
| १७१५, जानेवारी ३० . . | सिद्दीचा कान्होजी आंग्रेशी सलोख्याचा तह. |
| १७१५, नोव्हेंबर १९ . . | रामचंद्र अमात्याने संभाजीस उद्देशून आज्ञापत्र लिहिले. |
| १७१५, डिसेंबर २६ . . | चार्लस ब्रून हा मुंबईचा गव्हर्नर होतो. |
| १७१७ . . . . . | शाहू महाराजांची थोरातावर चाल. |
| १७१८ . . . . | बाळाजीने मोगलांचा तोफखाना घेऊन हिंगणगाव काबीज केले. |
| १७१८, जून १८ . . . | विजयदुर्गावर पाठविलेल्या इंग्लिश आरमाराचा आंग्र्यांनी पराभव केला. |
| १७२७ . . . . . | निजामाकडे गेलेल्या उदाजीस शाहू महाराजांनी पकडून सातार्‍यास आणले. |
| १७३१, एप्रिल . . . | शाहू व संभाजी यांचा सलोख्याचा तह. |
| १७३७ . . . . . | शाहू महाराजांनी उदाजीचे अथणीचे ठाणे जमीनदोस्त केले. |
| १७३७ . . . . . | उदाजीस नरम आणण्याकरिता शाहू महाराजांची मिरजेपर्यंत स्वारी. |
| १७६२, नोव्हेंबर १२ . . | उदाजी एका लढाईत मरण पावले. |

# २

# छत्रपती शाहूंची कारकीर्द

## पेशवा बाळाजी विश्वनाथ (१७१३–१७३०)

बाळाजीपंत विश्वनाथ यांचा उदय — बाळाजीपंतांची गुजरातेतील कामगिरी — धनाजी जाधवराव शाहू महाराजांचे पक्षात — बाळाजीपंत सेनाकर्ते — बादशाही सनदांसाठी मारामाऱ्या — दमाजी थोरातांकडून बाळाजीपंतास कैद व सुटका — चंद्रसेन जाधवांची बाळाजीपंतांशी झटापट — चंद्रसेन ताराबाईच्या पक्षास — बाळाजी विश्वनाथ हुजरात फौज उभारतात — कोल्हापूर गादीची उभारणी — रामचंद्रपंत अमात्यांचे आज्ञापत्र — वारणेचा तह — बाळाजीपंतास पेशवाईचीं वस्त्रे — कान्होजी आंग्रे महाराजांच्या सेवेत सामील — आंग्रे व शिद्दी यांचे तह — आंग्रे-इंग्रज तह — दमाजी थोरातांचा पाडाव — उदाजी चव्हाणांचा धरसोडपणा — शाहू महाराजांपुढील पेच — दक्षिणेंतील मोंगली सत्ता — सुभेदार दाऊदखान पन्नी — निजाम उल्मुल्क पूर्वपीठिका — दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक — निजामाच्या दक्षिणेतील कारवाया — सय्यदबंधूंची गल हुसेन अल्ली आणि शाहू महाराज यांच्यात तडजोड — तहाचा मसुदा — तहाचे महत्त्व — हुसेन अल्लीचे मराठ्यांसह दिल्लीस प्रयाण — मराठी फौजा दिल्लीत — मराठ्यांस बादशाही सनदा — दिल्लीवरील स्वारीची फलश्रुती — कऱ्हाड कोल्हापूरची मोहीम — बाळाजी विश्वनाथांचा मृत्यू — बाळाजी विश्वनाथांच्या कामगिरीचे मूल्यमापन.

### बाळाजी विश्वनाथ पंतांचा उदय :

बाळाजी विश्वनाथ भट यांचा जन्म कोकणातील कुलावा जिल्ह्यातील श्रीवर्धन येथे भट घराण्यात इ. स. १६६० च्या सुमारास झाला. इ. स. १५७५ च्या सुमारास बाळाजीपंतांचे पणजे महादजीपंत भट श्रीवर्धनच्या देशमुखीवर असलेले आढळतात. श्रीवर्धन हे गांव त्यावेळी हबशांच्या अंमलाखाली होते. सिद्दी हा मोगलांच्या आरमाराचा अधिपती होता. त्याच्या राज्यात ब्राह्मणांचा छळ होत असे. बाळाजीचे वडील बंधू जानोजी हे देशमुखीवर असता बाळाजी चिपळूणच्या मिठागरावर जकात वसुलीची नोकरी करीत होते. पुढे त्यांनी ही मिठागरे मक्त्याने केली. मक्त्याच्या पैशांचा भरणा संभाजीपंत मोकाशी यांच्यातर्फे व्हावयाचा. पण एके वर्षी मीठ पिकले नाही व त्यामुळे मक्त्याची रक्कम सिद्दीस पोचली नाही. यावरून राग येऊन सिद्दीने या संभाजी मोकाशीस समुद्रात बुडवून ठार मारले.[१] या प्रकारानंतर बाळाजी विश्वनाथ वेळासचे आपले दोस्त भानू याजकडे आले.[२] या ठिकाणी त्यांनी कोंकण सोडण्याचे ठरवून ते देशावर येण्यास निघाले. सिद्दीस ही हकिगत समजताच त्याने अंजनवेलच्या हबशी गव्हर्नरास बाळाजींना अटक करण्यास फर्माविले. गव्हर्नराने त्याप्रमाणे बाळाजीपतांस पंचवीस

१. पे. द. ७, ले. ४०.

२. पेशव्यांची शकावली (रा. खं. २), पृ. १.

दिवस अटकेत ठेविले. भानूनें शेवटी हबशास लांच देऊन त्यांची सुटका करविली.[1] ह्याच भानू घराण्यातील प्रसिद्ध पुरुष नाना फडणीस होय. देशावर आल्यावर सासवडजवळील गराडेगांवची पाटिलकी बाळाजीपंतांनी खरेदी घेतली. बाळाजीपंत इ. स. १६८९ च्या आतबाहेर मराठी राज्यांत प्रतिष्ठित नोकरीवर असलेले आढळतात.[2]

### बाळाजीपंत मराठी राज्यात धनाजी जाधवांकडे नोकरीस :

बाळाजी देशावर आल्यावर त्यांचा स्नेह पुरंदरे घराण्याशी जडला. पुरंदरे यावेळी बादशाही नोकरीत होते. त्यांनी बाळाजीपंतास सहाय्य केले. शाहू राजे बादशाही कैदेत असता त्यांचा बाळाजीपंताशी परिचय घडला.[3] परशुराम स्थळीचे ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर हे बाळाजींचे पुरस्कर्ते होते. पेशव्यांच्या घराण्यास पुढे आणण्याच्या कामी भास्कर जोशी, पुरंदरे, नारो गंगाधर मुजुमदार वगैरेंचा हातभार लागला असें कैफियती सांगतात.

औरंगजेबाने महाराष्ट्रावर आपल्या स्वारीने संक्रांत आणली त्या काळात बाळाजीपंतांनी जमीन महसूल खात्यात अनेक महत्त्वाच्या जागी कामे केली. त्यात हुशारी दाखविली. त्यावेळी शिबंदीच्या सहाय्याने महसूल वसूल केला जात असे. बाळाजीपंतांनी वसूली खात्यात आपली कर्तबगारी दाखविली तसेच लष्करातील डावपेच शिकून लष्करी कामगिरीमध्यें सुद्धा ते तरबेज झाले. अंबाजी पुरंदऱ्यांच्या सहाय्याने त्यांनी धनाजी जाधवांच्या जहागिरीतील वसूल करण्याच्या कामगिरीचा मक्ता स्वतःकडे घेतला. तसेच धनाजी जाधवरावांच्या मुलखातील मोंगली चवथाई वसूल करण्याचे काम आपल्याकडे मक्त्याने घेतले. त्याकरिता त्यांनी ५०० ते १००० स्वार ठेविले.[4] अशा प्रकारे वसूल करण्याचे काम त्यांनी कित्येक वर्षे केले. त्यापुढे त्यांनी पुणे व दौलताबादचे सुभेदार म्हणून इ. स. १६९९ ते १७०८ पर्यंत काम केले.[5] ही कामगिरी करत असताच शाहू राजे व त्यांची आई यांच्याशी त्यांचे संबंध आले. यावेळी शाहू राजे व त्यांची आई औरगजेबाजवळ ब्रह्मपुरीस कैदेत होत्या. औरंगजेबाचा मुक्काम बारामतीस साडेचार वर्षे होता. हे संबंध येण्यास कोणते कारण घडले हे इतिहासास ज्ञात नाही.[6] बाळाजीपंत पुणे व दौलताबाद येथे सुभेदारीवर असतानाच त्यांची ओळख पालीच्या जोशी कुटुंबाशी झाली. हे जोशी चासकर महादेव कृष्ण. या महादेव कृष्णानें आपली मुलगी थोरले बाजीरावास दिली आणि भट व जोशी घराण्याचे संबंध प्रस्थापित केले. महादेव कृष्णाजीच्या वशिल्यानें राणी ताराबाईसाहेब

---

१. पेशव्यांची शकावली (रा. खं. २), पृ. १.

२. भा. इ. सं मं त्रै. व. २२, अं. १, पृ. २५.

३. तृतीय संमेलन वृत्त, पृ. ८७.

४. शाहू चरित्र, पृ. ३६, शिवचरित्र साहित्य खं. १०, ले. २६.

५. सप्तम समेलन वृत्त, पृ. १२५–१२८, वार्षिक इतिवृत्त, श. १८३९,. पृ ३०२–३, पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, पृ. १२२–१२४.

६. तृतीय संमेलन वृत्त, पृ. ८९–९१.

यांनी रांगणा किल्ल्यावर बाळाजींची नेमणूक केली[१]. या सुमारास धनाजी जाधव ताराबाईचे सेनापती होते त्याजकडे नोकरी पत्करली[२] व गुजरातच्या स्वारींत सामील झाले.

### बाळाजीपंतांची गुजरातेतील कामगिरी :

याच सुमारास औरंगजेब निवर्तल्यामुळे मराठ्यांना चारी दिशा मोकळ्या झाल्या होत्या. बाळाजींच्या नेतृत्वाखाली मराठे गुजरातेत घुसले. झबुआ, गोध्रा या शहरावरून मुसंडी मारत अहमदाबादेवर चाल करून आले. अहमदाबादचा सुभेदार इब्राहिमखान त्यावेळी घाबरला, शहरातील श्रीमंत व गरीब व्यापारी वर्गाची तिरपीट उडाली. शहर रक्षण करणे कठीण होऊन बसले तेव्हा शहराचे रक्षण करण्याकरिता मागतील ते पैसे मराठ्यास देवून त्यांचा हल्ला परतविणे हेच श्रेयस्कर होते. तोच मार्ग इब्राहिमखानाने स्विकारला. मराठ्यास दोन लाख दहा हजार रुपये खंडणी मिळाल्यावर मराठे अहमदाबादेवरून परतले.[३] बाळाजींच्या लढाऊ शक्तीची कल्पना आपणास ह्या स्वारीपासून प्रथमत:च होते. या स्वारीवरून बाळाजी विश्वनाथांचे अनेक गुण दृष्टोत्पत्तीस येतात. ते आघाडीचे कुशल सेनापती होते. त्यास माणसांची पारख चांगली होती असे म्हणावे लागते.

### धनाजी जाधवास शाहू राजांचे पक्षात आणतात :

शाहू राजांनी महाराष्ट्रात प्रवेश केला तेव्हा बाळाजी विश्वनाथ दौलताबादचे सुभेदार होते. धनाजी जाधवाच्या सेवेत राहून वार्षिक खंडणी गोळा करण्याचे काम ते चोख रीतीने बजावीत होते. धनाजी जाधवांच्या अतिशय विश्वासातील एक सेनानी व कारभारी असा त्यांचा लौकीक यावेळी होता.[४] शाहू राजे खोटे आहेत, ते तोतया आहेत त्यावेळी या तोतयास परत न करता आपण आपली बाजू सावरून या तोतयाचा पाडाव करू अशी शपथ घेण्यास राणी ताराबाईनी धनाजी जाधवरावास सांगितल्यावर जाधवरावांनी लागलीच शपथ घेतली नाही. शाहू राजांचा खरेखोटपणा पडताळून पहाण्याकरिता त्यांनी आपला विश्वासू सरदार बाळाजी विश्वनाथ यांची रवानगी त्यासाठी शाहू राजांकडे केली. बाळाजी विश्वनाथ शाहू राजांना भेटून परत आले, त्यांनी संभाजीराजांचे खरे पुत्र ते हेच अशी ग्वाही आपल्या मालकापाशी दिली व धनाजी जाधवास शाहू राजाच्या पक्षास आणिले.

धनाजी जाधवांनी आपला हार्दिक पाठिंबा शाहू राजास कधीच दिला नाही. पण बाळाजी विश्वनाथांनी मात्र स्वत:स शाहू राजांच्या सेवेस वाहून घेतले. ह्या एका स्वामीची सेवा त्यांनी मनोभावे केली. त्यात कुचराई

१. पंचम संमेलन वृत्त, पृ. १–११.
२. सप्तम संमेलन वृत्त, पृ. १२५–१२८.
३. हिस्टरी ऑफ गुजरात, बॉम्बे गॅझेटियर, व्हॉ. १, पृ. २९६.
४. पे. द. ३०, ले. १.

होऊ दिली नाही. ह्या स्वामीभक्तीचे फळ म्हणजे बाळाजीची शाहू राजांनी अमात्य बाबूरावाचे मुतालिक म्हणून केलेली नेमणूक होय.[१] शाहू राजांचा राज्याभिषेक झाल्यावर छत्रपतींनीही बाळाजी विश्वनाथांची नेमणूक केली. धनाजीराव मरण पावल्यावर डिसेंबर १७०८ च्या पूर्वी त्यास सेनाकर्ते हा किताब मिळाला. खंडेराव दाभाडेकडील अर्धा मोकासा वसुली शाहू छत्रपतींनी त्याजकडे लावून दिली.[२] धनाजीराव जाधवराव जून १७०८ मध्ये निवर्तले आणि नोव्हेंबरमध्ये धनाजीचे चिरंजीव चंद्रसेन सेनापती झाले. बाळाजींना सेनाकर्ते पद बहाल झालेले चंद्रसेन जाधवांना बिलकुल आवडले नाही. इथूनच जाधव बाळाजींचा द्वेष करू लागले.[३]

### बादशाही सनदासाठी मारामाऱ्या :

बहादूरशहा दक्षिणेत आला. त्याजपाशी शाहू राजे व राणी ताराबाई यांनी आपापले प्रतिनिधी पाठविले. त्या प्रतिनिधींनी आपला पक्ष खरा हे बादशहास सांगून त्याजकडून आपल्याकरिता सनदांची मागणी केली. पण बहादूरशहाने युक्तीने हा विषय पुढे ढकलला. सनदा कोणास द्याव्या ह्याचा निर्णय दोघांनी आपसात ठरवून घ्यावा असे त्यांना कळविले. त्यामुळे ताराबाई व शाहू या दोघांना आपआपसात भांडल्याशिवाय गत्यंतर नव्हते. शाहू राजे व ताराबाईसाहेब यांच्या आपसातल्या मारामाऱ्या सुरू झाल्या. १७०८–१० या दोन वर्षांत ठिकठिकाणी दोन्ही सरदारांच्या बाजूच्या चकमकी झाल्या. त्यामुळे महाराष्ट्रातील मुलुखात लुटालूट, जाळपोळ सतत होऊ लागली. अराजक माजले, लोकांना स्वास्थ्य न लाभता लोकांचे संसार उधळले जाऊ लागले.

### दमाजी थोरात दंगा करून बाळाजीस पकडतात :

शाहू राजे या दोन वर्षांत साताऱ्याच्या परिसरातील पंचवीस मैलांतील टापूवरच काय तो आपला अंमल बसवू शकले. बाकीचा सर्व मुलुख राणी ताराबाई किंवा ताराबाईसाहेबांना सहाय्य करणाऱ्या सरदारांच्या ताब्यात होता. हे सरदार शाहू राजांची सत्ता मानीत नसत आणि ताराबाईसाहेबांचे ऐकत नसत. आपल्या ताब्यात असलेल्या मुलुखाचे आपणच जणू धनी अशा तऱ्हेची वहिवाट प्रत्येक सरदाराने त्यावेळी सुरू केली होती. अशा सरदारांपैकी दमाजी थोरात, सुभे प्रांती; शहाजी निंबाळकर, फलटण; उदाजी चव्हाण, मिरज; खेम सावंत दक्षिण कोकणात आणि कान्होजी आंग्रे उत्तर कोंकणात आणि कृष्णेच्या उत्तरेकडील मुलुखावर कृष्णराव खटावकर मोगलातर्फे आपली सत्ता चालवीत होते.[४] यापैकी दमाजी थोरात व कृष्णराव खटावकर या दोघांनी मुलुखात फारच पुंडाई आरंभिली. आपल्या पुंडाईने

१. तृतीय संमेलन वृत्त, पृ. ८६.
२. पे. द., खं. ३०, ले. २.
३. राजवाडे, खं. ३, प्रस्तावना, पृ. ७.
४. रा. खं. २, प्रस्तावना, पृ. ७, ३३.

लोकांच्या मनात असुरक्षितता व घबराट निर्माण केली. ताराबाईंचेच आपण सरदार असून त्यांचाच अंमल आपण बसवीत आहोत असा बाहेर देखावा करावयाचा आणि प्रत्यक्षात ताराबाईंचा अंमल झुगारून देऊन आपलाच अंमल चालू ठेवावयाचा असा शिरस्ता दमाजी थोरात यांनी पाडला. त्याचे पारिपत्य करण्यास शाहू राजांनी आपल्या नवीन सेनाकर्त्यास पाठविले. सेनाकर्ते बाळाजी विश्वनाथ ह्या मातबर सरदारांची शक्ति जाणून होते. त्यास पुरे पडण्याकरिता बाळाजीनी आपल्या मदतीस आपले दोस्त अंबाजी त्रिंबक यांना घेतले. दोघेही सरदार आपली फौज घेऊन थोरातांच्या वाड्याच्या रोखाने चालले. थोरात हिंगणगावच्या आपल्या गढीत लपून बसले होते. तिथून त्यांनी समेटाची बोलणी लावली. बोलणी करण्यासाठी बाळाजी विश्वनाथांना त्यांनी पाचारण केले. दगा करणार नाही असे आश्वासन बेलभंडार घेऊन दिले. त्यावर विश्वासून बाळाजी विश्वनाथपंत दमाजी थोरातना भेटण्यासाठी गढीत गेले. तिथे त्यास दमाजीरावांनी कपटाने पकडले. दमाजीरावांना ज्यावेळी बाळाजींनी बेलभांडारावर घेतलेल्या शपथेची आठवण करून दिली तेव्हा ते हसून म्हणाले, "त्यात तो विधिनिषेध कसचा? बेल म्हणजे बेल नावाच्या झाडाचा पाला आणि भंडार आम्ही नेहमीच खातो. याला कसचे आले आहे देवत्व?" दमाजीरावांनी विश्वासघात करून बाळाजीपंतास पकडले व त्याना सोडण्याकरिता ते जबर रक्कम मागू लागले. शाहू राजांचा नाईलाज होऊन त्यानी थोरातानी मागितलेली रक्कम भरली आणि बाळाजी विश्वनाथांची सुटका केली[1].

### चंद्रसेन जाधवांशी बाळाजींची झटापट :

बाळाजी विश्वनाथ यास थोरातांचे पारिपत्य करता आले नाही म्हणून शाहू राजांनी आपले सेनापती चंद्रसेन जाधव यास ही कामगिरी सांगितली. चंद्रसेन जाधव शाहू राजांशी एकनिष्ठ नव्हते हे राजास ठाऊक होते. त्याजवर कडक नजर रहावी म्हणून शाहू राजांनी सेनापतीबरोबर आपला जमाबंदी चिटणीस बाळाजी विश्वनाथ यांची रवानगी केली.

चंद्रसेन जाधव व बाळाजी विश्वनाथ या दोघांचे आपसात बरे नव्हते. आपले वडील धनाजी जाधव यांनी बाळाजी विश्वनाथावर विशेष मर्जी दाखविल्याचे चंद्रसेन जाधवांना खपत नसे. प्रस्तुत कामगिरीमध्ये बाळाजी विश्वनाथ यांना आपल्याबरोबर देऊन शाहू राजांनी त्यांना जणू काय आपल्यावर नजर ठेवण्यास पाठविले आहे असा त्यांचा ग्रह झाला व त्यामुळे ते बाळाजी विश्वनाथांचा जास्तच द्वेष करू लागले. अशा स्थितीत दोघांचेही भांडण पेट घेण्यास एका ठिणगीची आवश्यकता होती. अशी ठिणगी चंद्रसेन जाधव व बाळाजी विश्वनाथ स्वारीवर असता पडली. दोघांचेही तळ पडले असता

---

१ पे. द. ७, ले. १४; थोरले शाहू महाराजांचे चरित्र, पृ. ३६.

काळ्या कबुतरावरून भांडण जुंपले. चंद्रसेन जाधवांनी बाळाजी विश्वनाथाचा पाठलाग केला. तेव्हां बाळाजी विश्वनाथ आश्रयार्थी पांडवगडी पळून गेला. सेनापतींनी बाळाजीचा जीवच घेतला असता पण खंडो बल्लाळच्या सांगण्यावरून शाहू राजांनी सेनापतीस माघारी साताऱ्यास बोलाविले. ह्यामुळे चंद्रसेनाच्या तावडीतून बाळाजी विश्वनाथांची सुटका झाली[१].

## चंद्रसेन जाधव शाहू राजास सोडून ताराबाईंच्या पक्षास मिळतात :

शाहू राजांनी बाळाजी विश्वनाथांची बाजू घेतली हे चंद्रसेन जाधवास लागले. त्यांनी उद्धटपणे शाहू महाराजास लिहिले की, "स्वामींनी बाळाजीस माझ्या स्वाधीन करावे, त्यास आश्रय दिल्यास आम्हास महाराजांचे पाय सुटतील." शाहू महाराजांना हा घाव वर्मी लागला. सेनापतीचे उद्धट वर्तन चालू दिले तर आपल्या अधिकारास धोका पोहचून सेनापती शिरजोर होतो व छत्रपति सेनापतीच्या हातचे बाहुले बनतो. हा देखावा शाहू राजास नको होता. सेनापतीचे उघड बंड म्हणजे शाहू राजांच्या सत्तेस उघड आव्हानच. शाहू राजांनी ते स्विकारले आणि चंद्रसेन जाधवांस वठणीवर आणण्यास त्यांनी हैबतराव निंबाळकर यास सांगितले. हैबतराव निंबाळकर यावेळी अहमदनगरच्या आसमंतात छावणी करून होते. त्यांनी शाहू राजांच्या हुकुमानुसार सेनापतीवर चाल केली. जेऊर येथे दोन्ही सैन्याची गाठ पडून लढाई झाली. सेनापती पराभव पावून १७११ च्या भर उन्हाळ्यात पन्हाळ्यास पळून गेले आणि राणी ताराबाईंच्या पक्षास उघडपणे मिळाले.

## बाळाजी विश्वनाथ हुजरात फौज उभारतात :

चंद्रसेन जाधवरावांच्या ह्या उघड बंडाने महाराष्ट्रात सनसनाटी निर्माण केली. ताराबाईनी चंद्रसेन जाधवांचे सहर्ष स्वागत केले. शाहू राजांची बाजू यावेळी फारच कमकुवत होती. चंद्रसेन जाधवरावांच्या अगोदर सावंतवाडीचे सावंत, आंग्रे, खंडेराव दाभाडे अशी मातबर मंडळी ताराबाईना मिळाली होतीच. चंद्रसेन जाधवांनी हैबतराव निंबाळकरास चिथावून त्यास ताराबाईंच्या पक्षास आणण्याचा प्रयत्न सुरू केला. अशा वेळी परसोजी भोसले व चिमणाजी दामोदर हे दोन सरदार शाहू राजांच्या बाजूचे राहिले, पण ते खानदेशकडे होते. शाहू राजांचा पक्ष फारच कमकुवत झाला होता. मोठी दुरावस्था प्राप्त झाली होती. तरी शाहू राजे डगमगले नाहीत. त्यांनी चंद्रसेन जाधवांकडील सेनापतीपद काढून ते ता. १ ऑक्टोबर १७११ रोजी त्यांचे बंधू संताजी यास दिले[२]. बाळाजी विश्वनाथांनी यावेळी पुढे सरसावून शाहू राजांची बाजू सावरून धरली. बाळाजींनी पिलाजी

---

१. पे. द. ७, ले. १३, १४; शाहू-चरित्र, पृ. २८.

२. कित्ता, ले. १२, पृ. ११०.

जाधव, पुरंदरे यांच्या सहाय्याने सावकारांकडून कर्ज काढले. फौज उभी केली. हीच फौज पुढे "हुजूर फौज", "हुजूर पागा" ( ) म्हणून प्रसिद्ध पावली. सावकारांच्या कर्जास तारण पाहिजे म्हणून शाहू राजांकडून बाळाजींनी पंचवीस लाखाचा सरंजाम करून घेतला[1] (२१ ऑगस्ट १७११). याच सुमारास शाहू राजास बातमी समजली की, आपल्याकडील परशुरामपंत प्रतिनिधीसुद्धा ताराबाईच्या पक्षास मिळण्याच्या बेतात आहे, तेव्हा प्रतिनिधींना कैद करून (२० नोव्हेंबर १७११) त्यांचा सरंजाम, घर, जिंदगीसुद्धा जप्त केली.[2] चंद्रसेन जाधवांचा फितवा हेच शाहू राजांवर आलेले सर्वात अरिष्ट होय. या अरिष्टाची उठावणी दाऊदखान पन्नीच्या कारवाईने सिद्ध झाली. ताराबाईंनी त्यांत भर घातली आणि शाहू राजांवर नाराज झालेले खटावकर, थोरात, चव्हाण इत्यादी सरदारांना उठाव करण्यास राणीनी प्रोत्साहन दिले, मोठा पेच उत्पन्न झाला. त्यास शाहू राजांनी धिमेपणानें तोंड देऊन सर्वाच्या बंडाचा उपशम वर्ष सहा महिन्यात केला.

**कोल्हापूर गादीची उभारणी (ऑगस्ट १७१४) :**

शाहू राजांनी ताराबाईनी उठलिलेल्या सरदारांचा बंदोबस्त करण्याचे सत्र सुरू केले. त्यास सेनाकर्ते बाळाजी विश्वनाथ यांचे सहाय्य मिळाले. पण राणी ताराबाईसाहेबांचा बंदोबस्त आपण केला नाही तर आपल्याविरुद्ध त्या समर्थ सरदारांची सतत उठावणी करत राहतील तेव्हा त्यांचा बंदोबस्त करणे इष्ट असे ठरवून ताराबाईंच्या घरात कलह सुरू होण्यास प्रोत्साहन दिले असावे. राणी ताराबाईंची सवत राजसबाई व त्यांचा मुलगा संभाजी ह्यांना ताराबाईनी आपल्या हाती सत्ता ठेवून त्यात आपल्याला कोणताच हिस्सा देऊ नये याचे वैषम्य वाटले. त्यांनी ताराबाई व त्यांचे चिरंजीव शिवाजी राजे या दोघास कैदेत टाकून आपण सत्ता बळकावण्याचा कट उभारला. तो सिद्धीस गेला. गिरजोजी यादव, अंताजी त्रिमल व गडकरी व तुळाजी शितोळे यांनी त्यात भाग घेतला आणि किल्ले पन्हाळा येथे संभाजी राजे यास राज्यपदी बसविले. ताराबाई व त्यांचा मुलगा शिवाजी राजे यास कैदेत टाकिले[3] (ऑगस्ट १७१४). अशा रीतीने कोल्हापूरला राज्यक्रांति झाली. कोल्हापूरचे नवीन राज्य अस्तित्वात आले. ताराबाईसाहेब कैदेत पडल्यामुळे शाहू राजांना विरोध करणाऱ्या व्यक्तींचा जोर कमी झाला. ताराबाईंना पुढील ४७ वर्षे कैदेतच काढावी लागली.

कोल्हापूरच्या या राज्यक्रांतीस रामचंद्रपंत अमात्य यांनी हातभार लाविला असावा. कारण चंद्रसेन जाधव ताराबाईच्या पक्षास मिळाल्यापासून

---

१. शा. रो. पृ. १०१.
२. कित्ता पृ. १२०.
३. रा. खं. ८, ले. १६९.

रामचंद्रपंताचे वजन कमी झाले. तेव्हा रामचंद्रपंतांनी राजसबाई व संभाजी यांची बाजू उचलून धरली व पुढे संभाजी गादीवर आल्यावर चंद्रसेन निजामास जाऊन मिळाले.

**रामचंद्रपंत अमात्यांचे आज्ञापत्र :**

रामचंद्र अमात्यांनी संभाजी राजास गादीवर आणण्यात पुढाकार घेतला असावा. कारण त्यांनी लिहिलेले सुप्रसिद्ध आज्ञापत्र संभाजीना उद्देशून लिहिलेले आहे. आज्ञापत्राचा काल १९ नोव्हेंबर सन १७१५ आहे. यात शिवाजी महाराजांची राज्यकारभाराची धोरणे काय होती हे सांगून, प्रधान कसे नेमावे, फौजेची, किल्ल्यांची आरमारांची वगैरे व्यवस्था कशी ठेवावी इत्यादी गोष्टी सांगितलेल्या आहेत. टोपीकरास व परक्यास आपल्या राज्यात इमारत बांधू देऊ नये. शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारी घालाव्या. कोणासही इनाम अगर कायमची जागा देऊ नये असे त्यात प्रतिपादिले आहे.

हे आज्ञापत्र लिहून झाल्यावर थोड्याच दिवसात रामचंद्रपंत दिवंगत झाले असावे. त्यांच्या निर्वाण तिथीचा भक्कम पुरावा इतिहासास सापडत नाही. त्यांची समाधि पन्हाळगडावर श्रीरघुवीराचे देवालयासन्निध सांपडली असून तिजवर "श्रीरामचंद्र नीळकंठ" अशी अक्षरे दगडावर कोरलेली आहेत. संभाजी राजांनी क्रांती घडवून आणून आपली गादी कोल्हापुरास स्थापिली. पन्हाळ्यावर ताराबाई व त्यांचे चिरंजीव शिवाजी राजे यास कैदेत ठेविले. इथपासून छत्रपतींच्या दोन गाद्या झाल्या.

**वारणेचा तह :**

संभाजी राजांनी मनापासून शाहू राजांबरोबर कधीच सख्य केले नाही. पण कालांतराने त्यांच्या विरोधाची धार बोथट होत गेली. बाजीराव-साहेबांच्या घोडदौडीने तर संभाजी राजे स्तिमीतच होऊन गेले. शाहू राजांची कुरापत काढण्यासाठी संभाजी राजे अधूनमधून निजाम उल्मुल्क यास उठवीत असत. पण मराठी सत्ता वर्धिष्णु होत गेल्यामुळे निजाम उल्मुल्क काहीच करू शकला नाही. शाहू राजांनी संभाजी राजांना वठणीस आणण्यासाठी त्यांजवर स्वारी केली. १७३१ एप्रिल मध्ये दोघा भावांची भेट वारणेच्या तिरावर होऊन त्यांचा सलोख्याचा तह झाला. तहात वारणेच्या अलिकडील मुलूख शाहू राजांनी आपल्याकडे ठेवावा आणि पलिकडील संभाजी राजास द्यावा असे ठरले.[1] यामुळे दक्षिणेकडील शाहू राजांच्या हालचालीस पायबंद पडला. साहजिकच राजांचे पेशवे व सरदार यांनी उत्तराभिमुख होऊन राज्य उत्तरेत वाढविले. शाहू राजांचे कारकीर्दीपासून मराठे उत्तरेत का गेले ह्याचे उत्तर वारणेच्या तहात सापडते.

---

१. करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची, साधने भाग १–२, ले. ५३.

**बाळाजीस पेशवाईची वस्त्रे :**

बाळाजी विश्वनाथ यांना पेशवाईपद प्राप्त होण्यास कान्होजी आंग्रे कारणीभूत झाले असे म्हणावे लागेल. कान्होजी आंग्रे मराठ्यांच्या नाविक दलाचे प्रमुख होते. पश्चिम किनाऱ्यावर मराठ्यांचे नाविकदल सज्ज ठेवून किनाऱ्यावर चोरटा व्यापार करणाऱ्या इंग्रज, पोर्तुगीज वगैरे पाश्चात्य सत्तांना आंग्र्यांनी जरबेत ठेविले होते. चंद्रसेन जाधवराव जोपर्यंत शाहूकडे होते तोपर्यंत हा मराठा वीर शाहूच्या सेवेत तयार राहून पश्चिम किनाऱ्याचे संरक्षण करीत होता. पण चंद्रसेन जाधव ताराबाईंच्या पक्षास मिळताच त्यांच्या सांगण्यावरून आंग्रे ताराबाईंच्या पक्षास मिळाले आणि त्यांनी शाहूविरुद्ध उचल खाल्ली. शाहू राजांच्या ताब्यातील वरघाटी असलेले अनेक किल्ले आंग्र्यांनी आपल्या ताब्यात घेतले. तेव्हा आंग्र्यांचा बंदोबस्त करण्यास राजांनी आपला पेशवा बहिरोपंत यास पाठविले. पण बहिरोपंत कान्होजीच्या पुढे असा दिव्यापुढे काजवा तसे. बहिरोपंतास कान्होजींनी पकडून कुलाब्यास कैदेत टाकले आणि स्वतः साताऱ्यावर चालून जाण्याचे बोलून दाखवू लागला. ताराबाईंना यामुळे १७१३ च्या पावसाळ्यात उकळ्या फुटू लागल्या. याचवेळी निजाम उल्मुल्कसारखा मोठा कर्तबगार सुभेदार दक्षिणच्या सुभ्यावर आला. त्यानेही अंतस्थ कारस्थाने करून शाहू राजास त्रास देण्याची शिकस्त केली. त्यामुळ शाहू राजाच्या नुकसानीत आणखीच भर पडली.

आंग्र्यांना वठणीवर कसे आणावयाचे या विवंचनेत शाहू राजे होते. त्यांनी सेनाकर्ते बाळाजी विश्वनाथ यांना आंग्र्याचा पराभव करण्यास सांगून पराभव केल्यास आम्ही तुम्हास पेशवेपद देऊ असे बाळाजींना आश्वासन दिले. त्यावर बाळाजीपंतांनी पेशवेपद आम्हास अगोदर द्यावे म्हणून शाहू राजांशी विनंती केली. बाळाजीपंतांचे म्हणणे असे, "महाराजांची आज्ञा मला प्रमाण आहे, पण पदाचा जोर माझ्यामागे असल्याशिवाय कामगिरी कशी निभावेल ? प्रत्यक्ष पेशव्यासच जर आंग्र्यांनी अडकावून ठेविले आहे तेव्हा दुसरा पेशवा पदावर कायम आहे असे कान्होजींना दिसेल तरच ते नरम येतील. महाराजांनी मला पेशवेपदाचा अधिकार देऊन रवाना करावे, म्हणजे छत्रपतींचा पेशवा कायम असून त्यावर नेमणूक झालेला एक गेला तरी त्या जागी दुसरा नेमून राज्यशकट चालू राहू शकतो आणि नवीन नेमलेला पेशवा आपल्यावर चालून येत आहे असा देखावा आंग्र्यांना दिसेल." बाळाजीचे म्हणणे बिनतोड होते. शाहू महाराजांनी यावर विचार केला आणि पुण्याचे दक्षिणेस आठ मैलांवर मांजरी मुक्कामी तळ असता बाळाजी विश्वनाथास मार्गशीर्ष शुद्ध ११, शके १६३५, तारीख १७ नोव्हेंबर १७१३ रोजी पेशवाईची वस्त्रे दिली. बादली सणगे, सहा जवाहिर, शिरपेच, तुरा, कंठी, चौघडा, ढाल–तलवार, शिक्के, कटयार, साहेब नौबत, हत्ती, घोडे, जरीपटका अशी वस्त्रे दिली. पदास सरंजाम महाल रांजणगांव आदि सहा महालाचे दशमुखी वतन नेमून दिले. अंबाजीपंत

पुरंदरे यास मुतालिकी व रामचंद्रपंत भानू यास फडणिसी देऊन नेमिले. अशा रीतीनें मराठे सरदारांच्या दुटप्पी धोरणामुळे छत्रपतींना परंपरा मोडावी लागून तिथे ब्राह्मण पेशवा, त्याचा सहाय्यक पुरंदरे व फडणीस असे निर्माण झाले.

## कान्होजी आंग्रे महाराजांच्या सेवेत :

बाळाजी विश्वनाथ व कान्होजी आंग्रे यांची पूर्वी दोस्ती होतीच. दोघेही पश्चिम किनाऱ्यावरील कुलाब्याच्या आसमंतातील जागेत वाढलेले. एक-मेकांची जानपछान असलेले असे होते. कान्होजी आंग्र्यावर एकदम चाल करून गेल्यास कान्होजींसारखा बलाढ्य सरदार आपणास आवरणार नाही हे बाळाजींना ठावूक होते. म्हणून, त्यांनी कान्होजीरावांकडे आपल्या मित्रां-तर्फे गुप्तपणे बोलणे लाविले. "तुम्ही आणि आम्ही शाहूच्या पक्षास मिळून मराठी राज्याची सेवा कशी करू आणि कोल्हापूरकरांस मिळाल्यास तिथे आपणास चिपाडाप्रमाणें रहावे लागेल" याची जाणीव करून दिली. त्यानी हेही सांगितले की, "मराठी राज्य हा शिवाजी महाराजांनी ठेविलेला ठेवा आहे. त्याचे रक्षण आपण शाहू राजांची बाजू घेऊनच केले पाहिजे. याकरिता आपणा दोघांचे सहकार्य हवेच. आमच्या ताब्यातील आरमार व तुमच्या ताब्यातील नाविक दल याचा संगम व्हावयास हवा. हे फक्त आमच्या व तुमच्या सहकार्यानेच शक्य आहे. शाहू राजांसारखे सर्व अपराधास क्षमा करणारे मोठ्या हृदयाचे राजे मिळणार नाहीत." एवढे बोलूनच बाळाजी थांवले नाहीत; त्यांनी कान्होजीस त्याच्या नाशास टपलेले सिद्दी व इंग्रज यांची आठवण करून दिली. या शत्रूस जेरीस आणण्यासाठीसुद्धा मध्यवर्ती सत्तेची आवश्यकता कशी आहे ह्याचे बिनतोड प्रतिपादन केले आणि शेवटी कान्होजींना दिलेली आश्वासने पूर्ण करण्याची जबाबदारी आपल्यावर घेतली. कान्होजीनी पंतांनी पाठविलेल्या आशयाचा पूर्ण विचार केला. त्यात त्यास आपले हित दिसू लागले. तेव्हा कान्होजींनी बाळाजीपंतांस निरोप पाठविला की, तुमचे छत्रपतींचा पेशवा म्हणून स्वागत केले जाईल. बाळाजीपंत येण्याच्या अगोदर बाळाजी व आपल्यामधील संकल्पित बोलण्याचे मसुदे तयार केले. बाळाजी सरखेलास भेटण्यासाठी पुण्याहून निघाले. सरखेल यावेळी लोहगडला होते. तेही बाळाजीस सामोरे जाण्यासाठी निघाले. उभयतांच्या भेटी लोणावळ्या-जवळील वाळवण गांवी झाल्या. दोघांनीही दिलखुलास बोलणी केली. बोलणी करून कान्होजी कुलाब्यास गेले. मागाहून दरमजल पेशवेही कान्होजीचे भेटीस कुलाब्यास गेले. सरखेलांनी सामोरे येऊन भेटीचा समारंभ यथोचित झाला. उपरांत दोघेही खलवतास बसले असता आंग्रे बोलले, 'तुमचा-आमचा भाऊपणा. पेशवाई तुमच्या घरात. आमचे किल्ले देत असाल तर तसे सांगावे'. तेव्हा पेशव्यांनी त्यास आपल्याकडील शिक्के, कटयार व वस्त्रे दाखविली ; आणि सांगितले की, "आपणास सरखेलीची वस्त्रे देववितो. कृपा संपादून महाराजांची चाकरी करावी". त्यास सरखेलांनी कबुली दिल्यावर पेशवे साताऱ्यास गेले आणि महाराजांचे दर्शन

घेऊन त्यास झालेला वृत्तांत सांगितला. महाराज खूष होऊन त्यांनी कान्होजीस सरखेलीची वस्त्रे व शिक्के, कटयार पाठविली. यानंतर आंग्र्यांनी तह लिहून दिला[१] (तारीख २८ फेब्रुवारी १७१४). अशा रीतीने आंग्र्यांसारखा बलिष्ठ सरदार केवळ मुत्सद्देगिरीच्या जोरावर रक्तपात किंवा अन्य कलह बिलकूल न करता बाळाजीपंतांनी शाहू राजांचे पक्षात आणिला. पूर्वीच्या पेशव्यास आंग्र्यांच्या कैदेतून सोडवून आणिले ; आणि आपल्या मुत्सद्देगिरीचा प्रभाव महाराजांवर पाडला.

**आंग्रे-सिद्दी यांचा तह :**

सरखेल आंग्रे यांनी शाहू राजांशी तह केल्याने जंजिऱ्याचा सिद्दी व मुंबईकर टोपीवाले यावर इष्ट तो परिणाम झाला. मराठी सत्ता एकोप्याने नांदावयास लागली. तिच्याशी झुंज दिल्यास, आपला नाश होईल हे जाणून जंजिऱ्याच्या सिद्दीने कान्होजी आंग्रे याजबरोबर सलोख्याचा तह घडवून आणला (३० जानेवारी १७१५) आणि पुढील १७ वर्षे हा तह दोघांनीही पाळला.

**आंग्रे व इंग्रज :**

छत्रपति शाहूकडून आंग्र्यांना सरखेली मिळाल्यावर मराठी राज्याच्या पश्चिम किनाऱ्याच्या संरक्षणाची जबाबदारी आंग्र्यांकडे आली. सुरतेपासून कारवारपर्यंतचा किनारा व्यापारी दृष्टीने आंग्र्यांचे कक्षेत आला. आंग्रे याजवळ बलाढ्य आरमार की, ज्यात जवळजवळ तीस-चाळीस तोफा असलेली अनेक प्रचंड जहाजे व शूर व निष्णात दर्यावर्दी खलाशी अशा थाटात मराठी राज्याचा सरखेल म्हणून वावरताना ते त्यांच्या शत्रूंना कर्दनकाळासारखे वाटू लागले. पाश्चात्यांशी तंटा न करता सलोख्याने वागावयाचे असे धोरण कान्होजी आंग्रे यांनी ठेविले होते. त्या धोरणानुसार त्यांनी सिद्दीशी तह केल्यानंतर इंग्रजांशी समेट करण्याकरिता त्यांचे वकील कुलाब्यास बोलाविले व दोघांनाही पसंत अशा अटींवर समेट केला. पण तो समेट डळमळीत होता. सन १७१५ च्या डिसेंबर २६ रोजी चार्ल्स बून हा उपद्व्यापी व उद्धट गृहस्थ मुंबईचा गव्हर्नर झाला. त्याने आपणास समुद्र किनाऱ्यावर अनिर्बंध सत्ता गाजविता यावी म्हणून पश्चिम किनाऱ्यावर इंग्रजांच्या अनिर्बंध संचारास जो अडथळा करील त्याची आम्ही खोडच जिरविणार असा आपला निश्चय जाहीर केला आणि आंग्र्यांची कुरापत काढण्यास सुरुवात केली. त्यासरशी इंग्रजांची मालवाहू जहाजे आंग्र्यांनी पकडून नेली. तेव्हा त्यांनी अधिक जळफळाटास सुरुवात केली आणि आपले जंगी आरमार विजयदुर्गावर पाठविले. आंग्र्यांच्या बलाढ्य आरमाराशी मुकाबला होऊन ते इंग्रजी आरमार पराभव पावून परत आले (१८ जून १७१८).

---

१. तह व करारमदार, पृ. १९७, ढबूकृत आंग्रे, पृ. १६.

**दमाजी थोरातांचा पाडाव :**

शाहू राजांच्या विरोधकात दमाजी थोरात होते. त्यांनी बाळाजीपंतांस पकडून शाहू राजांकडून त्यांच्या सुटकेकरिता कशी जबर रक्कम हवकली हे मागे सांगितले आहे. थोरातांचा पुंडावा काही थांबेना. चंद्रसेन जाधव मोंगलास मिळाल्यावर त्यांनी थोरातास शाहू राजांच्या मुलखात बंडावा करण्यास उत्तेजन दिले. म्हणून ते अधिक बंडावा करू लागले. त्यांचा बंदोबस्त करण्यास कोणाची नेमणूक करावी अशा विवंचनेत शाहू राजे होते. यावेळी उत्पन्नदार सरदारात सचिव प्रमुख असत. पुरंदरे, सिंहगड वगैरे किल्ले पूर्वीपासून त्यांचे कबजात होते. सचिव नारो शंकर यावेळी ९ वर्षांचा होता. कारभाराची मुखत्यारी आईकडे असून कारभारी रांझेकर नांवाचा हुशार व शूर गृहस्थ होता. त्याच्या सहाय्याने सचिवाच्या आईने थोरातांचे पारिपत्य करण्याची कामगिरी आपल्याकडे घेतली. सचिवाची फौज आपल्यावर चालून येत आहे, हे थोरातास समजले. तेव्हा सचिवाची खोड मोडण्याची नामी युक्ति थोरातास सुचली. त्यांनी आपली माणसे पाठवून सचिवाच्या अल्पवयी मुलास पळवून हिंगणगावास आणविले आणि येसुबाईस धाक घातला की, तुम्ही आमच्या वाटेस जाल तर, मुलास ठार मारू (मार्च १७१७). यामुळे थोरातांवर हल्ला करण्याचे मार्ग खुंटले. नारो शंकराची सुटका कशी करावी ही नवीन विवंचना सुरू झाली. दमाजी थोरातास मागितलेला द्रव्यदंड[1] दिल्यानंतर त्यांनी चार-आठ महिन्यांनी नारो शंकराची सुटका केली.

थोरातांच्या विश्वासघातकी वर्तनाने शाहू राजांचा कोप वाढला. इ. स. १७१७ च्या दसऱ्यानंतर त्यांनी स्वतः फौज घेऊन थोरातांवर चाल केली व जेजुरीस मुक्काम करून थोरातास भेटीस बोलाविले. पण थोरात काही नमले नाहीत. इ. स. १७१८ नंतर बाळाजीपंतांनी मोगलांचा तोफखाना घेऊन हिंगणगावास मोर्चे लाविले व ते ठाणे काबीज केले.[2] थोरातास पकडून पुरंदरावर अटकेत ठेविले. हिंगणगावची गढी जमीनदोस्त केली. थोरातास शाहू राजांनी एक वर्षानंतर कैदेतून मुक्त केले.

**उदाजी चव्हाणाचा धरसोडपणा :**

दमाजी थोरातांप्रमाणेच उदाजी चव्हाण नावाचे नामांकित सरदार चंद्रसेन जाधवांच्या पाठिंब्याने शाहू राजास त्रास देत होते. उदाजी चव्हाणांचे वडील विठोजी चव्हाण यांनी संताजी घोरपडे याजबरोबर औरंगजेब बादशहाच्या तंबूचे सोनेरी कळस काबीज करून आणिले,[3] त्यावेळी

१. शा. रो. पृ. १४४.

२. ब्र. च. पृ. १८३, पं. प्र. श. पृ. ३, पे. द. ३०, पृ. २४५.

३. का. सं. प. या. पृ. ९, सरदेसाई, म. रि. स्थि. रा. पृ. १९.

राजाराम महाराजांनी खूष होऊन विठोजींना हिंमत बहाद्दर हा किताब बहाल केला. विठोजींच्या पश्चात हिंमत बहाद्दरची वस्त्रे त्यांचा मुलगा उदाजी चव्हाण यास मिळाली. उदाजीराव फार पराक्रमी होते. त्यांनी बत्तीस-शिराळे गांवी एक गढी बांधिली व ताराबाईंच्या पक्षास मिळून तिथून ते आपल्या जहागिरीचा बंदोबस्त करू लागले. सातान्यापर्यंत स्वाऱ्या करून चव्हाण मुलकातून चौथाई वसूल करू लागले. त्यांचे पारिपत्य करावे म्हणून शाहू राजांनी त्यावर अनेक स्वाऱ्या केल्या. शेवटी इ. स. १७२७ त संभाजी-बरोबर निजामाकडे गेलेल्या उदाजींना शाहू राजांनी पकडून सातान्यास आणिले.[1] चव्हाणांनी श्रीचा बेलभंडार पाठवून विरोध न करण्याचे वचन शाहू महाराजास दिले. वारणेच्या तहानंतर उदाजींनी संभाजी राजांकडे राहाण्याचे कबूल केले. पण संभाजी महाराजासही ते त्रास देऊ लागले.[2] १७३७ मध्ये शाहू राजांनी त्यांना नरम आणण्याकरिता मिरजेपर्यंत स्वारी केली. त्यांचा कल संभाजीकडे होता. उदाजीराव निजामास मिळाल्यावर शाहू राजांनी १७३७ मध्ये त्यांचे अथणीचे ठाणे जमीनदोस्त केले. नाना-साहेब पेशव्यांनी त्यांची समजूत काढून त्यास परत आणिले आणि डिग्रज येथे सरंजाम दिला. उदाजीराव ता. १२ नोव्हेंबर १७६२ रोजी एका लढाईत मरण पावले.[3] अशा रीतीने या चळवळ्या महाभागाने तीनही पेशव्यास अनेक उलाढाली करून अगदी पुरेपुर केले.

**शाहू महाराजापुढील पेच :**

शाहू राजांची सुटका मोगलांनी केली ती मुळी मराठ्यात फूट पाडून. ते आपआपसात भांडतील या कयासाने. हा यांचा अंदाज शाहू राजे महाराष्ट्रात आल्यावर खरा ठरला. शाहू राजे व राणी ताराबाईसाहेब यांच्यात राज्याच्या मालकीसाठी भांडणे सुरू झाली. त्याचे पर्यवसान छत्रपतींची दोन तक्ते प्रस्थापित होण्यात झाले. तरीही भांडणे मिटली नाहीत. कारण, शाहू राजे व राणी ताराबाई यांच्या भांडणात हात धुवून घेणारा बलाढ्य मराठे सरदारांचा एक पक्ष होता. ह्या सरदारांना स्वातंत्र्य युद्ध सुरू असताना अनियंत्रित सत्ता उपभोगण्याची सवय झाली होती. त्यामुळे युद्ध समाप्त झाल्यावरही त्यांना युद्ध हवेच होते. ती संधी छत्रपती घराण्यातील आपसातील कलहांनी त्यांना मिळाली. काही सरदार शाहू राजास मिळाले. काहीनी आपली निष्ठा ताराबाईंच्या चरणी आहे असे जाहीर केले. पण यापैकी काहीनी धरसोडपणा दाखवून, जाब विचारणाऱ्या पक्षास मी दुसऱ्या पक्षाचा असे भासवून मुलुखात पुंडाई सुरू केली. आपणच जणू मुलुखाचे मालक असे मानून ते गांव लुटणे, मारणे, रयतेस हैराण करणे असे प्रकार करू लागले. ह्या पुंडाईस आळा घालण्याचा प्रयत्न शाहू राजांनी त्याजवर सैन्ये पाठवून

१. क. छ. घ. इ. सा. भा. २, ले. ३१.

२. कित्ता, ले. ३४.

३. ऐ. ले. सं. पृ., १७९, का. सं. प. या. ले. ९.

केला. काही वठणीवर आले पण काहींनी आपली पुंडाई अव्याहत चालूच ठेविली. ह्याचे कारण झगडत रहाणे हाच जो मराठ्यांचा स्थायीभाव हे, होय. त्यामुळे बादशहाबरोबरचा झगडा संपल्यावर त्यांनी आपसात झगडण्यास सुरुवात केली. मोंगली संकट मोडून काढणारे कर्तृत्व आपसात लढू लागल्यामुळे शाहू राजास मोठी चिंता वाटू लागली. पण मराठे सरदारांच्या कर्तृत्वास नवे क्षेत्र खुले होण्याची संधी नियतीने दिल्लीच्या सत्तेत होणाऱ्या अपकर्षाने आणून दिली. दिल्लीकडील मोंगलांच्या भांडणात मराठ्यांची मदत एका पक्षाने मागितल्यामुळे मराठ्यांचा शिरकाव उत्तरे हिंदच्या राजकारणात झाला. त्यांच्या पराक्रमास नवे क्षेत्र मिळाले. त्याचा फायदा मराठ्यांनी करून घेऊन, स्वसत्तेचा फैलाव सबंध हिंदुस्थानभर केला आणि पुढील शंभर वर्षे हिंदुस्थानचे राजकारण राबविले.

**दक्षिणेतील मोंगली सत्ता :**

शाहू राजे दक्षिणेत आल्यापासून दक्षिणेतील मोंगली सत्तेची खरी स्थिती लक्षात घेण्यासाठी दिल्लीच्या बादशाही दरबारातील पक्ष व राजकारण यांचा आढावा घेणे जरूर आहे. औरंगजेब बादशहा १७०७ मध्ये वारल्यावर त्याच्या तिन्ही मुलात मुसलमानी शिरस्त्याप्रमाणे गादीसाठी झगडे झाले. थोरला मुलगा मुअज्जम याने आपल्या दोन भावांना लढायात मारून स्वतः बहादूरशहा हे पद धारण करून तो दिल्लीच्या तक्तावर बसला. यावेळी बादशाही दरबारात मोंगल, इराणी व तुराणी असे तीन पक्ष मुख्य होते. तुराणी बहुधा सुन्नी पंथाचे असून इराणी लोक शिया पंथाचे असत. शिवाय हिंदुस्थानातील मुसलमानास हिंदुस्थानी या नावाने संबोधिले जाई. पठाणाचा वर्ग हा निराळा होताच. शिया व सुन्नी या पंथभेदामुळे इराणी व तुराणी या दोन पक्षांमध्ये दरबारात मोठा विरोध असे.

बाहादूरशहा बादशहा झाल्यावर झुल्फिकारखान वजीर झाला. हा वजीर राजा सभाचंद नांवाच्या आपल्या हिंदु कारभाऱ्याच्या सल्ल्याने चाले. बहादूरशहा तारीख १७ फेब्रुवारी १७१२ रोजी लाहोर येथे मरण पावला. तेव्हा वडील मुलगा जहांदरशहा झुल्फिकारखानाचे सहाय्याने गादीवर बसला. एक वर्षाच्या आत बहादूरशहाचा नातू फर्रुकसियर याने सय्यदांच्या सहाय्याने जहांदरशहाचा खून करवून तारीख ११ जानेवारी १७१३ रोजी बादशाही तक्त मिळविले. तद्नंतर झुल्फीकारखान व त्याचा बाप व विश्वासू नोकर सभाचंद यांचा शिरच्छेद करण्यात आला. फर्रुखसियरची कारकीर्द तारीख १८ फेब्रुवारी १७१९ पर्यंत टिकली. बादशाहीतील या घडामोडींकडे शाहू राजांचे नेहमी लक्ष असे. दिल्लीतील या घडामोडी व कारस्थानांनीच मराठ्यांना दिल्लीच्या राजकारणात ओढले. त्याचा वृत्तांत पुढे दिला आहे.

**दक्षिणेतील सुभेदार दाऊदखान पन्नी :**

दिल्लीतील बादशाही घडामोडीत दक्षिणच्या सुभेदाराचे अंग जास्त असे. यावेळी दक्षिणेत बादशाही मुलुखाचे बऱ्हाणपूर (खानदेश) वऱ्हाड, हैदराबाद,

बेदर, विजापूर, औरंगाबाद, असे सहा सुभे असून त्या सर्वांवरील मुख्य सुभेदार बहुधा औरंगाबाद येथे रहात असे.[१] सुभेदारास दिवाण नावाचा एक दुय्यम अधिकारी दिलेला असे, तो मुलकी व हिशेबी काम पहात असे. इ. स. १७०८ मध्ये दक्षिणेतील सुभेदारीवर झुल्फीकारखान असून त्याचा दुय्यम दाऊदखान पन्नी होता. बहादूरशहा बादशहाने झुल्फीकारखानास आपल्या-बरोबर दिल्लीस नेल्यामुळे, दक्षिणच्या सुभेदारीचा कारभार दाऊदखान पन्नी हा झुल्फीकारखानाचा दुय्यम म्हणून पाहू लागला. त्याने दक्षिणचा कारभार फर्रुखसियर बादशहा गादीवर येईपर्यंत म्हणजे, १७१३ जानेवारी-पर्यंत केला. औरंगजेबाच्या मृत्यूमुळे दिल्लीत भांडणे चालू होती. दिल्लीचा कारभार कोणाचे हाती असावा याबद्दल चुरस उत्पन्न होऊन त्या चुरशीत सर्व सरदारांनी भाग घेतला होता. शाहू राजांच्या हक्कास विरोध करणारा वजीर मुनिमखान १७११ त मरण पावला. त्यानंतर दिल्ली तक्ताच्या अंकित्वासाठी चाललेल्या झगड्यात मोगल सरदार गुंतले आहेत हे पाहून मराठे सरदारांनी मोगली मुलखात शिरून चौथाई व सरदेशमुखी वसुलीचा सपाटा चालविला. प्रथमच मार्च १७११ त बारचे ठाणे शाहू राजांनी हस्तगत[२] केले. दाऊद पन्नीने विचार केला की, मराठ्यास उघड रीत्या प्रतिबंध करावा तर आपणांस लढाई द्यावी लागेल, त्या लढाईत दिल्लीकडून कुमक मिळणे अशक्य. म्हणजे, एकाकीच लढाई देऊन मराठ्यांकडून पराभव पावून फजीत होण्यापेक्षा त्यांच्या अटी मान्य केलेल्या बऱ्या. त्याप्रमाणे त्याने शाहू राजास दक्षिण सुभ्याची चौथाई व सरदेशमुखी देण्याचे मान्य केले. मात्र ही मान्यता देताना त्याने एक अट घातली ती अशी की, मराठ्यांना हा वसूल मोगल सुभेदारांकडून मिळेल. त्याकरिता मराठ्यांनी आपल्या फौजा मोगली मुलुखात पाठवू नयेत. वसुलाची रक्कम दाऊदखानाचा हस्तक हिरामन याने गोळा करावयाची आणि मराठ्यास द्यावयाची. त्याकरिता मराठ्यांनी आपल्या फौजा पाठवून वसूल करण्याचे कारण नाही.[३] याप्रमाणे शाहू राजास १७०७ मध्ये जे सरदेशमुखी-चौथाईचे हक्क मिळाले त्याच्या वसुलाची रक्कम त्यांना इ. स. १७१२ पर्यंत मिळाली नाही. झुल्फिकार-खानाचा वध झाल्यावर दक्षिणची व्यवस्था बदलली. चिनकिलीचखान नामक सरदाराचे सहाय्य बादशहास झाले म्हणून त्यास निजाम उल्मुल्क असा किताब देऊन दक्षिणच्या सुभेदारीवर त्याची बादशहाने नेमणूक केली. दाऊदखानाची बदली गुजरातवर केली. नवीन सुभेदाराचे व मराठ्यांचे कधीच पटले नाही. म्हणून पुढे निजाम मराठे यात संघर्ष निर्माण झाले.

### निजाम उल्मुल्क पूर्वपीठिका :

निजाम उल्मुल्काची नेमणूक दक्षिणच्या सुभेदारीवर झाल्यामुळे मराठ्यास सारी दक्षिण मोकळी करता आली नाही. मराठे सबंध हिंदुस्थानांत

---

१. भारतवर्ष पु. १ ले, पृ. ६६४; पगडी, मराठे-निजाम, पृ. १४३.
२. रा. खं. ३, ले. ४७.
३. इलियट, भा. ७, पृ. ४६६.

वायुवेगाने भराऱ्या मारू लागले पण दक्षिणेतील निजाम हा अस्तनितील निखारा राहून त्याच्याशीच मराठयांना वारंवार झुंजावे लागले. अशा या निजामाची पूर्वपीठिका जाणून घेणे आवश्यक आहे. मोगल आमदानीत तुर्की सरदारांचा लोंढा हिंदुस्थानात सारखा येत होता. निजाम उल्मुल्कचा आजा ख्वाजा अबिदि हा बुखाऱ्याहून मक्केस जाण्याकरिता हिंदुस्थानात आला.[१] तो मक्केहून परत येताच औरंगजेबाने त्यास आपल्या नोकरीत घेतले. यावेळी औरंगजेबाचा झगडा तक्त मिळविण्यासाठी आपल्या भावांबरोबर चालू होता. औरंगजेब बादशहा झाल्यावर या ख्वाजा अबीदने मोठ्या दर्जाची कामे केली. तेव्हा बादशहाने त्यास किलीचखान असा किताब दिला. तो तारीख ३० जानेवारी १६८७ रोजी गोवळकोंड्याचे वेढ्यात गोळी लागून ठार झाला. त्याचा सर्वात वडील मुलगा मीर शहाबुद्दीन ऊर्फ गाजीउद्दीन फिरूजजंग हा विशेष पराक्रमी निघाला. गाजीउद्दीन औरंगजेबाच्या विश्वासातील होता. याची बायको ही शहाजहानचा प्रसिद्ध वजीर सादुल्लाखान याची मुलगी. या दांपत्याने मीर कमरुद्दीन ऊर्फ निजाम उल्मुल्क यास तारीख ११ ऑगस्ट स. १६७१ रोजी जन्म दिला.[२]

## निजामाची दक्षिण सुभेदारीवर नेमणूक :

हा मुलगा वयाच्या १४ व्या वर्षापासून लष्करी मोहिमात भाग घेऊ लागला. १६८४ मध्ये त्याने पुणे व सुपे भागात यशस्वीरीत्या धाड घातली. म्हणून त्यास शंभर स्वारांची मनसब मिळाली. पुढील सात वर्षे त्याने दक्षिणेत तुंगभद्रा तीरापर्यंत सर्वत्र संचार केला. दक्षिणेत औरंगजेब मोंगली सत्ता प्रस्थापित करीत असता त्याने अदोनी आदि स्थळे घेऊन विशेष पराक्रम केला. म्हणून त्यास चिन्किलिचखान ही पदवी औरंगजेब बादशहाने बहाल केली. एकुलता एक मुलगा असूनही त्याचे बापाशी पटले नाही. पण त्याने करडचा अमली औरंगजेबाशी पटवून घेतले. त्यास १६९९ मध्ये तीन हजारी मनसब मिळाली. इथून त्याने प्रत्येक लढाईत बहादुरी गाजविल्यामुळे औरंगजेबाने त्यास १७०५ मध्ये पंचहजारी मनसब दिली. त्याच्या बापाची बदली झुल्फिकारखानाने अहमदाबादला करविली व तेथेच तो आंधळा सुभेदार १७१० साली वारला. त्याची संपत्ति मोगली पद्धतीप्रमाणे सरकारजमा झाली व त्यामुळे निजामास या काळापासून स्वतःचेच पायावर उभे रहावे लागले. बाहादूरशहाच्या कारकीर्दीत त्याने इ. स. १७०८ ते १७११ पर्यंत अयोध्येचा सुभेदार म्हणून काम केले. या काळात त्यास खान दौरा बहादूर असा किताब प्राप्त झाला. काही काळ घरी बसल्यानंतर इ. स. १७१२ साली जहांदरशहाच्या छोटचा कारकीर्दीत तो आग्र्याचा सुभेदार झाला. तिथून

१. इलियट, भा. ७, पृ. ४६६.

२. युसूफ हुसेन, धी फर्स्ट निजाम, पृ. ३४, ३५.

त्याने झुल्फिकारखानाविरुद्ध फरूखसियरच्या पक्षास सहाय्य केले. म्हणून त्यास नवीन राजवटीत दक्षिणचा सुभेदार नेमण्यात आले आणि त्यास खानखाना निजाम उलमुल्क बहाद्दर फत्तेजंग असा किताब देऊन दक्षिणेत पाठविले. यावेळी बादशहाने सहा सुभ्यांवर खालील अंमलदार नेमून त्या सर्वांवर औरंगाबाद येथे निजामाची नेमणूक केली.

बऱ्हाणपूर—शुक्रुल्लाखान, वऱ्हाड—ऐवजखान, विजापूर—मनसूरखान, कर्नाटक—सादुल्लाखान, बेदर—अमीनखान, हैदराबाद—युसूफखान.

निजामाच्या मदतीस मुलकी कामावर "दिवाण" म्हणून हैदरकुलीखान याची नेमणूक झाली. निजामाच्या नेमणुकीनंतर तो १७१३ च्या जूनमध्ये बऱ्हाणपुरास येऊन दाखल झाला आणि तेथपासून त्याचा पेशवे बाळाजी विश्वनाथ व छत्रपती शाहू महाराज यांच्याशी संबध आला[१].

**निजामाच्या दक्षिणेतील कारवाया (१७१३–१५) :**

निजाम सुभेदार होऊन दक्षिणेत आला आणि दाऊद पन्नीची गुजरातच्या सुभेदारीवर नेमणूक झाली. निजाम हा प्रथमपासून मराठ्यांचा द्वेष करीत असे. त्याचे मनात दक्षिणेत स्वतंत्र राज्य स्थापन करावयाचे होते. त्या बाबतीत त्यास दिल्ली सलतनतकडून अडथळा होणे शक्य नव्हते. त्याच्या या महत्त्वाकांक्षेस दक्षिणेतील मराठ्यांचा काय तो अडसर होता. त्यांना बाजूस सारण्याचा प्रयत्न निजामाने सतत केला. मराठ्यास चौथाईचा वसूल द्यावयाचा नाही असे ठरविले. त्याकरिता त्याने कोल्हापूरकर संभाजीस हाताशी धरिले. इकडे बाह्यत: शाहूशी सलोखा करून त्यास आपणाकडे वळविण्याचेही प्रयत्न त्याने करून पाहिले, पण ते जमले नाही. तसेच, चंद्रसेन जाधव यास आश्रय दिला. फौजेच्या खर्चाकरिता त्यास बेदरच्या पूर्वेस भालकी व बहामनाबाद येथे भली मोठी जहागीर नेमून दिली. दक्षिणच्या व्यवहारात निजाम सर्वथा चंद्रसेनाच्याच तंत्राने वागू लागला. रंभाजी निंबाळकर हे शिवछत्रपतींचे जावई, महादाजी याचा नातू असून तोही मधे मोगलास जाऊन मिळाला होता. एवंच १७१३ पासून दोन वर्षेपावेतो निजाम, चंद्रसेन, संभाजी निंबाळकर व संभाजी वगैरेंनी शाहू छत्रपतींचा उच्छेद करण्याची शिकस्त केली. 'या प्रांती करवीकरांनी निजाम उलमुल्क याचे सहाय्य करून घेऊन दंगा करण्याचा विचार केला' असे शाहू राजे आपल्या पत्रात लिहितात.[२] बाळाजी विश्वनाथाचा पुण्याकडील जम उधळून लावण्याचा प्रयत्न निजाम व त्याचे साथी यांनी केला. बाळाजी विश्वनाथाने आंग्र्याकडून लोहगड किल्ला ताब्यात घेतला व पुण्याचा बंदोबस्त मुद्दाम व त्वरेने केला. लोहगडची सबनिशी भानु रामाजी महादेवास व मावळची मुजमी हरि महादेवास

---

१. खान, निजाम उलमुल्क, भा. १, प्रकरण २ रे, आयर्विन, लॅटर मुगल्स, भा. १, पृ. २६८–२७२.

२. सरदेसाई, म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. १२३.

दिली. मोगलांच्या आक्रमक चढाईस आळा घालण्यासाठी इ. स. १७१५ चे आरंभी खंडेराव दाभाडे, रायाजी प्रभु, राजजी थोरात यांनी गंगथडीचे बाजूस मोगलांवर मोठी धामधूम उठविली.[१] पुढील वर्षी खंडेरावांनी मोगलातर्फेचा पुण्याचा ठाणेदार रंभाजी निंबाळकर याजवर हल्ला चढविला, लढाई झाली तीत रंभाजीचा पुत्र मारला गेला.[२] तेव्हापासून पुण्यावरचा मोगलांचा शह हलका होऊ लागला.

**सय्यद बंधूंची गाठ :**

शाहू-बाळाजीच्या सुदैवाने इ. स. १७१५ च्या एप्रिलात निजामाची बदली दक्षिण सुभ्यावरून उत्तरेत झाली व त्या जागी सय्यद हुसेन याची नेमणूक दक्षिण सुभ्यावर झाली. हा सय्यद हुसेन दिल्लीहून निघून इ. स. १७१६ चे प्रारंभी औरंगाबादेस दाखल झाला. सय्यद अबदुल्लाखान आणि हुसेन अल्लीखान ह्या दोघा बंधूंचे दिल्ली दरबारात वाढीला लागलेले वर्चस्व पाहून फर्रूकसिअर बादशहास धास्ती उत्पन्न झाली. त्याने त्या दोघास जिवंत पकडण्याचा किंवा ठार मारण्याचा कट केला पण तो फसला. या दोघांची ताटातूट केल्याने त्यांचा नाश ओढवेल अशी मनाची खात्री करून फर्रूकसिअरने सय्यद अबदुल्लाखान या मोठ्या भावास दिल्लीस ठेवून धाकटा हुसेन अल्लीखान यास दक्षिणच्या सुभेदारीवर रवाना केले.

सय्यद हुसेनच्या मार्गात बादशहाने बरेच काटे पेरून ठेविले होते. सय्यद हुसेनचा नाश केल्यास तुला त्याच्या जागी नेमले जाईल असे गुप्त आश्वासन बादशहाने दाऊद पन्नीस दिले होते; त्याप्रमाणे दाऊद पन्नी सय्यद हुसेन यास ब्ऱ्हाणपुरानजीक आडवा आला. त्यास सय्यद हुसेनने कापून काढिले[३] (२६ ऑगस्ट १७१५).

"सय्यद अल्लीचा नाश कोणत्याही रीतीने करा." असा आदेश बादशहाने शाहूसही दिला होता. सय्यद हुसेन दक्षिणेत आल्यावर मराठ्यास वठणीवर आणण्याचे ठरविले, कारण यावेळी खंडेराव दाभाडे आदि मराठे सरदारांनी सुरतपर्यंत स्वाऱ्या करून ब्ऱ्हाणपूर ते सुरत मार्गावर आपल्या चौक्या बसवून मोगल रयतेकडून चौथाई वसूल करण्यास सुरुवात केली होती. खंडेराव दाभाडे यांचा बंदोबस्त करण्यासाठी सय्यद हुसेनने आपला सरदार झुलफिकारबेग यास त्यावर पाठविले. खंडेराव दाभाडे मोठ्या त्वरेने त्याजवर चाल करून आले, त्यांनी झुलफिकारबेगला वेढले. त्या वेढ्यातून झुलफिकारबेगला आपली सुटका मात्र प्राण देऊनच करावी लागली.[४] दाभाडे आपला विजय

---

१. रा. खं. ८, ले. ७५.

२. म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. १२२.

३. इलियट, भा. ७, पृ. ४६२-६३; ताराबाई ॲण्ड हर टाईम्स, पृ. १४८.

४. रा. खं. २, पृ. २८.

शाहू महाराजास सांगण्यासाठी स्वत: सातान्यास गेले व महाराजास विजयाची हकिगत सांगितली तेव्हा महाराज खूष होऊन त्यांनी त्यास सेनापती नेमिले. आणखीन अशाच प्रकारचा प्रयत्न त्याने आपल्याकडील चंद्रसेन जाधव वगैरे सरदार मराठ्यांवर पाठवून केला. पण तेही फजीत पावून परतले (२४ एप्रिल १७१७). म्हणून, सय्यद हुसेनने मराठ्यांना शह देण्याकरिता भली मोठी फौज उभारण्याचे ठरविले. इतक्यात त्याचाच सरदार महमद अन्वरखान, बऱ्हाणपूरचा गव्हर्नर याने त्यास सांगितले की, मराठ्यांना जर बादशहाचीच आतून फूस आहे तर त्यांचा बंदोबस्त होणार कसा? शिवाय सय्यदाचा मोठा भाऊ अबदुल्लाखान याजविरुद्ध बादशहाने मराठ्यास लिहिले की, तुम्ही सय्यदास उखडून काढून जेणेकरून त्याचा नाश होईल असे करा.[1] दिल्लीत बादशहाच्या सहाय्याने कट चालले आहेत, त्याला सत्ताच्यूत करण्याचा प्रयत्न चालू आहे, तेव्हा मराठ्यांशी दोस्ती करावी. हे कट फोडण्यात त्यांचे सहाय्य घ्यावे. तेव्हा हा पोक्त उपदेश सय्यदास आवडून त्याने मराठ्यांशी सख्य करण्यास सुरुवात केली.

**हुसेन अल्ली आणि शाहू महाराज यांच्यात तडजोड :**

सय्यद हुसेन अल्ली दक्षिणेत येताना शंकराजी मल्हार नांवाच्या मराठा सरदारास दिल्लीहून आपल्याबरोबर घेऊन आला होता. हा मराठा सरदार राजारामाच्या वेळी सचिव पदावर होता. त्यास उपरती झाली आणि त्याने बनारसला जाऊन संन्यास घेतला. पण त्यात त्याचे मन रमेना म्हणून तो राजकारणात पडला. दिल्लीस मोगल बादशहाकडे मराठ्यांचे राजकारण जाणणारा मुरब्बी म्हणून त्याची वर्णी लागली. सय्यद हुसेन दक्षिणेत पाठविण्याचे ठरल्यावर त्याजबरोबर मराठ्यांचे राजकारण समजणारा हा मुरब्बी बादशहाने रवाना केला.[2] सय्यदाने या शंकराजीस शाहू राजांकडे मैत्रीची बोलणी करण्यास पाठविले. शंकराजी हा काही मराठ्यांचा शत्रू नव्हता. मोगलास न दुखवता मराठ्यांचा फायदा कसा होईल याचे विवरण शंकराजीने सातान्यास येऊन शाहूपाशी केले.[3] मोगलांची मदतीची हाक ऐकून त्यांच्या सहाय्यास तुम्ही जा असाच उपदेश त्याने शाहू राजास केला. शाहू छत्रपतींना त्यांचे म्हणणे पटून छत्रपतींच्या वतीने पेशवे बाळाजी विश्वनाथ यांनी एक मसुदा तयार केला. बरेच दिवस खल होऊन शेवटी हुसेन अल्लीच्या मार्फत शाहू व बादशहा यांचा तह मुक्रर झाला तो असा—

**तहाचा मसुदा :**

(१) शिवाजीच्या वेळचे स्वराज्य, तमाम गडकोट सुद्धा शाहूचे हवाली करावे; (२) अलीकडे मराठे सरदारांनी जिंकलेले प्रदेश म्हणजे, खानदेश,

---

१. इलियट, भा. ७, पृ. ४६३.
२. राजवाडे, खं. २, पृ. २९–३०.
३. पे. द. ७, ले. २८.

गोंडवण, वऱ्हाड, हैदराबाद, कर्नाटक या भागातले, यादीत नमूद केल्याप्रमाणे मोगलांनी सोडून देऊन ते मराठ्यांच्या स्वराज्यात दाखल करावे; (३) मोगलांच्या दक्षिणेतील मुलुखांवर चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मराठ्यांनी स्वतः वसूल करावे. या चौथाईचे बदल्यात आपली पंधरा हजार फौज मराठ्यांनी बादशहाचे मदतीस ठेवावी आणि सरदेशमुखीचे बदल्यात मोगलांचे मुलखात मराठ्यांनी चोऱ्या वगैरेचा बंदोबस्त करावा; (४) कोल्हापूरच्या संभाजीस शाहू छत्रपतींनी उपद्रव करू नये; (५) मराठ्यांनी दरसाल बादशहास दहा लाख रुपयांची खंडणी द्यावी आणि (६) शाहू राजांची मातोश्री, कुटुंब, छत्रपती संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग वगैरे दिल्लीस बादशहाचे कबजात आहेत, त्यास सोडून स्वदेशी पावते करावे असा या तहातील कलमांचा मुख्य मतलब होता.[1]

थोड्या बहुत फरकाने हुसेन अल्लीने हा तह मंजूर केला आणि बादशहाच्या मंजुरीकरिता दिल्लीस पाठविला.[2] हा तह पाहून बादशहाचे डोके उठले. अशा प्रकारचा तह करून मराठ्यांची मदत सय्यद बंधू घेतील हे बादशहाच्या ध्यानी मनीही नव्हते.

**या तहाचे महत्त्व :**

बादशहास या तहास मान्यता देणे क्रमप्राप्तच होते. कारण, मराठ्यांची मदत सय्यद बंधूस आपल्याविरुद्ध कारस्थाने करणारास मोडून काढण्याकरिता हवी होती. ती त्यांनी या तहाने मिळविली. सय्यद बंधूंच्या वाढत्या सत्तेस आळा घालण्यासाठी बादशहाने गुप्त रीतीने कोणतेही उपाय केलेले असोत पण सय्यद बंधूनी ते जिवंत असेपर्यंत ज्या गोष्टी घडवून आणल्या त्यास संमति न देण्यास बादशहा धजत नव्हता. मराठ्यांची मदत घेणे म्हणजे, शत्रूसच आपल्या गोटाचा तावा देणे हे सय्यद बंधूस ठावूक असूनही त्यांनी हा तह घडवून आणला. याला कारण त्यावेळची परिस्थिती सय्यदांचा नाश करण्याकरिता तुराणी पक्ष त्यांच्याविरुद्ध कारवाया करीत होता; आणि बादशहासुद्धा त्या जळत्या कारवायांवर फुंकर घालत होता. एवंच या कारवायांना तोंड देण्यास बळाचा वापर करावा लागेल आणि तो करताना आपणास प्रबळांचे सहाय्य मिळणे आवश्यक हें सय्यद बंधूस समजून चुकले म्हणून त्याने वरील तह करून मराठ्यांची मदत घेतली.

मराठ्यास तहामुळे फायदा झाला. शाहूचे वजन या तहामुळे महाराष्ट्रात वाढले. गेली बरीच वर्षे मोगल-मराठ्यांच्या वारंवार होणाऱ्या झुंजामुळे महाराष्ट्रातील प्रदेश बेचीराख होत होता. पिकांची नासधूस होत होती.

---

१. तह व करारमदार, पृ. १–९, ; रा. खं. ८, ले. ७८; कित्ता, पृ. ३१.

२. इलियट, भा. ७, पृ. ४६८–६९ (आवृ. १९६४).

याहीपेक्षा दुसऱ्या निराळ्याच प्रकारच्या जुलमास शेतकरी आणि जिल्ह्याचे महालकरी वैतागले होते. कारण हा तह होईपर्यंत वसूल करणारे तीन अधिकारी प्रत्येक प्रांतात असत. मूळ मुलुक बादशहाचा म्हणून एक वसुली अधिकारी बादशहातर्फेचा असे. दुसरा चौथाई वसूल करण्याकरिता असे व तिसरा सरदेशमुखी वसूल करीत असे. या तिघांकडून होणारा त्रास या तहामुळे कमी झाला. मराठ्यांच्या बहुतेक मागण्या या तहाने मंजूर झाल्या. आपल्या देशात त्यांना हवी ती अनिर्बंध सत्ता मिळाली. देशात शांतता व सुबत्ता राखण्याचे काम त्याजकडे आल्यामुळे तेच यापुढे देशाचे मालक झाले, सर्वाधिकार त्यांचेचकडे आले. पंधरा हजार स्वार बादशहाचे तैनातीस मराठ्यांनी ठेवावयाचे. पण त्याचा खर्च दक्षिणच्या सुभेदाराने करावयाचा, अशा प्रकारे तह असल्यामुळे तो मराठ्यांना फायदेशीर पडला. वेलस्लीने पुढें सबसिडीअरी पद्धत जी काढली त्याच्या कित्येक वर्षे अगोदर मराठ्यांनी त्या पद्धतीचा वापर वरील कलमाने केलेला आढळतो. एवंच या तहामुळे मराठ्यांचे लक्ष आपसातील घरगुती भांडणातून उडून त्यांना पराक्रम करण्यास हिंदुस्थानचे चारी कोपरे मोकळे झाले. या सर्व खटाटोपाचे व तह घडवून आणण्याचे श्रेय बाळाजी विश्वनाथ पेशव्यांस आहे. म्हणून खानाखान त्यास शाहू राजांचा अत्यंत बुद्धिमान सेनापती म्हणून गौरवितो.[1] या तहामुळे शाहू राजाचे महाराष्ट्रात मराठ मंडळात व मोंगली गोटात वजन वाढले तसेच वजन बाळाजी विश्वनाथ पेशव्यांचेही मराठ मंडळात व मोगल दरबारी वाढले.

**हुसेन अल्लीचे मराठ्यांसह दिल्लीस प्रयाण :**

बादशहाने अब्दुल्लाखानास मारण्याकरिता निरनिराळे कट रचिले. सर बुलंदखान, महाराजा अजितसिंग, निजाम उल्मुल्क यांना आपणास अबदुल्लाच्या जाचातून सोडविण्याकरिता हाताशी धरले. ते सर्व सरदार ज्यावेळी बादशहाकडे आले तेव्हा त्यांना कळून चुकले की, बादशहाने हलक्या व नालायक माणसांस हाताशी धरून त्यांच्यावर आपल्या मेहेर नजरेचा वर्षाव करीत आहे. हे पाहून त्यांस बादशहाचा वीट आला. महंमद मुराद नावाच्या एका नीच कुळातील सरदारास बादशहाने हाताशी धरले. त्यास अधिक अधिकार देऊन बादशहा त्या सरदाराच्या तंत्राने वागू लागला. यामुळे इतर सरदारास बादशहाच्या ह्या वागणुकीची किळस आली आणि ते अबदुल्लाचा नाश करण्याची कल्पना मनातून काढून टाकून त्याच्याच कृत्यांना उचलून धरू लागले. तारीख २७ ऑगस्ट १७१८ रोजी अबदुल्लास पकडण्याचा अयशस्वी प्रयत्न झाला. सप्टेंबरातसुद्धा अबदुल्लाविरुद्ध अघोरी कृत्यांना ऊत आला. अबदुल्लानें बादशहाच्या ह्या कारवायांना तोंड देण्यासाठी आपला भाऊ सय्यद हुसेन यास मराठ्यांसह दिल्लीस शक्यतो लवकर येण्यास सांगितले.[2] (२९ सप्टेंबर १७१८).

१. इलियट, भा. ७, पृ. ४६६.

२. कित्ता, पृ. ४६९–७१; आर्विन, भा. १, पृ. ३३९–५३.

सय्यद हुसेन दिल्लीस जाण्यास औरंगाबादेहून नोव्हेंबरात निघाला. बरोबर स्वतःचे ८,००० घोडेस्वार आणि मराठ्यांकडील खंडेराव दाभाडे, बाळाजी विश्वनाथ, राणोजी शिंदे, बाजीराव, संताजी भोसले वगैरे प्रमुख सरदार १६,००० सैनिकांसह हजर होते. हे सर्व सैन्य ब्ऱ्हाणपूर, उज्जैन, मंदसोर, चितोड, अजमेर यामार्गे दिल्लीस १६ फेब्रुवारी १७१९ ला पोचले.[१] या स्वारीत दररोज दर शिपायास एक रुपया रोजमुरा ठरला होता. या स्वारीचे तपशील अभ्यासनीय असून लष्कर खर्चासाठी सय्यदाकडून रकमा मिळालेल्या पहावयास सापडतात.[२]

**मराठी फौजा दिल्लीत :**

सय्यद मराठी सैन्यासह दिल्लीस येत आहे हे बादशहास कळताच बादशहाने सय्यदाने येऊ नये म्हणून नाना तऱ्हेच्या युक्त्या योजिल्या तर सय्यदानें त्या प्रत्येक युक्तिस प्रतियुक्ति काढिली. मराठ्यांना दिलेल्या सनदांना मंजुरी मिळावी म्हणून मी येत आहे असे हुसेनने सांगितल्यावरून बादशहाने इकलासखान नांवाच्या आपल्या विश्वासू सरदाराबरोबर मराठ्यांस कबूल केलेल्या सनदा पाठविल्या. त्या सय्यद यास माळव्यात मिळाल्या. त्यावर सय्यदाने बादशहास सांगून पाठविले की, मराठे सरदार शाहूची आई व इतर माणसे यांना कैदेतून सोडून आणण्याकरिता माझेबरोबर दिल्लीस येत आहेत व त्यांना जर मी मागे परतविले तर ते बिथरतील व माझा नाश करतील तेव्हा कैदेतील माणसांची सुटका करून देणे हे माझे कर्तव्य ठरते. त्याकरिता मी दिल्लीस येत आहे.[३] बादशहाने महमद अमीनखानचीन नांवाच्या सरदारास सुद्धा माळव्यात पाठवून सय्यदला विरोध करण्यास सांगितले होते. पण त्या सरदाराच्याने ते काम झेपले नाही.[४] सय्यद दिल्ली वेशीवर पोचताच सय्यद व त्याबरोबरील मराठी सेना यांनी १६ फेब्रुवारी १७१९ ला मोठा गाजावाजा करीत शंख फुंकीत, ढोल बडवीत दिल्लीत प्रवेश केला. फर्रुकसिअर बादशहाकडे त्यावेळी राजा जयसिंग, राव मुधोसिंग, निजाम उल्मुल्क असे मोठे पराक्रमी सरदार होते. त्यांचा उपयोग करून न घेता बादशहाने त्यापैकी दोघा राजपूत राजास त्यांच्या देशी जाण्यास सांगितले[५] आणि स्वतः हलक्या लोकांच्या नादी लागून सय्यदाच्या एकामागून एक येणाऱ्या बहुतेक सर्व मागण्यास तो बळी पडला. यापुढील प्रकार मोठा किळसवाणा झाला. राजधानीत खून मारामाऱ्या यांना ऊत आला. अराजक माजले. तारीख २८ फेब्रुवारी १७१९ रोजी सय्यदांच्या फौजा दिल्ली रस्त्यातून इतस्ततः फिरू लागल्या. सय्यदांचे पाठीराखे अमीनखान चीन बहादूर व झकेरियाखान हे आपल्या

---

१. इलियट, भा. ७, पृ. ४७२.
२. पे. द. खं. ३०, पृ. २४४–२६५.
३. आयर्वीन, भा. १, पृ. ३६१–६२.
४. किस्ता, पृ. ३७३.
५. इलियट, भाग. ७, पृ. ४७५.

सैन्यानिशी लाल किल्ल्याकडे येत असता वाटेत मराठी सैन्य व त्यांचे सैन्य यात झटापट झाली. त्यात मराठी सैन्याची पुष्कळ व हानी झाली. १,५०० ते २,००० मराठ्यांकडील सैनिक कामास आले. त्यात संताजी भोसले हा प्रमुख सरदारही मारला गेला.[१] तद्नंतर सय्यदांच्या हातात बादशहा सापडला. त्यास त्यांनी पकडून कैदेत ठेविले आणि रफी उदजीत नावाच्या राजपुत्राला बादशाही तक्तावर बसविले. सर्व सत्ता आपल्या हातात घेतली. दोन महिन्यानी तारीख २८ एप्रिल १७१९ रोजी फर्रुकसिअर बादशहाचा खून करविला[२] व दिल्लीचा कारभार मराठ्यांच्या सहाय्याने आपल्या ताब्यात घेतला.

**मराठ्यास बादशाही सनदा :**

रफी उदजीत यास बादशाही मिळाल्यानंतर बाळाजी विश्वनाथ पेशव्यास बादशहाकडून तारीख १३ मार्च रोजी दक्षिणेतील सहा सुभ्यांच्या चौथाई वसुलीबाबत तिन्ही फर्माने मिळाली.[३] त्यात तंजावर, त्रिचनापल्ली, म्हैसूर या मांडलिक राज्यांकडूनही चौथाई वसूल करण्याचा हक्क कबूल करण्यात आला. २४ मार्चच्या फर्मानाने सरदेशमुखी हक्क कबूल करण्यात आले आणि तिसऱ्या फर्मानाने शाहू राजांकडे शिवाजीच्या वेळचे स्वराज्य कायम केले आणि बादशहाच्या कैदेत असलेले शाहूचा भाऊ मदनसिंग व आई यांची रवानगी बाळाजी विश्वनाथांबरोबर दक्षिणेत केली. बरोबर फर्माने व शाहू मंडळीस घेऊन पेशवे बाळाजी विश्वनाथांनी मार्च १७१९ च्या शेवटच्या आठवड्यात दिल्ली सोडली. परतीचा प्रवास ह्या मंडळीनी राजपुतान्यातून जयपूरवरून सिरोंज, भेलसा आणि माळवा यातून करीत हंडिया येथे नर्मदा पार केली आणि ते निमाडमार्गे बऱ्हाणपुरला तारीख १० मे १७१९ रोजी पोचले.

**मराठे दिल्लीहून परत :**

छत्रपतींच्या मातुश्रीसह बाळाजी पेशवे तारीख ४ जुलै, इ. स. १७१९ रोजी साताऱ्यास शाहू महाराजांचे भेटीसाठी दाखल झाले. महाराजांशी मातुश्रींची भेट झाली. यावरून बहुत संतोषी होऊन कृतार्थ झाले. सय्यदांकडून ५० हजार रुपये दररोज पावत होते, त्याजपैकी निम्मे फौजेस खर्च करून, बाकी खजीना बाळगून पेशवे साताऱ्यास महाराजांचे दर्शनास गेले.[४] दिल्लीच्या स्वारीतून बाळाजींनी बराच पैसा आणला. फौजांच्या बाक्या चुकत्या केल्या.

१. आर्यविन, भा. १, पृ. ३७६.
२. इलियट, भा. ७, पृ. ४८०–८१.
३. डॉ. ए. जी. पवारनी या फर्मानाच्या हकिकतीसंबंधीची सविस्तर हकिगत इं. हि. रे. कमिशनच्या प्रोसिडींग स. १९४०, पृ. २०४–२१५ वर दिली आहे. आर्यविन भा. १, पृ. ४०७, पे. द. ३०, पृ. २६२–६३.
४. म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. १४८,

कोणाचा बोभाट होऊ दिला नाही व बाळाजीपंताचे कारभारापासून कोणास पैसा देणे पडू नये असा तह झाला.[१]

### दिल्लीवरील स्वारीची फलश्रुती :

चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्य या तीन बाबींच्या सनदा बाळाजी विश्वनाथांनी मराठ्यांकरिता दिल्लीहून बादशाही शिक्क्याने आणिल्या त्यामुळे शाहू राजांचे महत्व वाढले. मराठ्यास चौथाई वसुलीच्या निमित्ताने मोंगल प्रदेशांवर ताव मारण्यास मोका मिळाला. दिल्लीस गेल्याने मोगली सत्तेचे रीतीरिवाज मराठ्यास कळले. इतके दिवस मोगली अमीर आणि बादशहा यांच्याबद्दलच्या दिमाखाच्या गोष्टी ऐकून मराठे आपल्या पराक्रमाबद्दल साशंक असत. पण दिल्लीस जाऊन पराक्रम गाजविल्यावर त्यांना असे कळून आले की, दिल्लीची बादशाही अंतस्थ कलहाने आणि अराजकाने पोखरली असून मोगली सत्ता आपल्या ताब्यात येण्यास वेळ लागणार नाही. धिटाईने वारंवार जोराचे धक्के मारत राहिले पाहिजे. हे मराठ्यास ठाऊक झाले. म्हणूनच बाजीरावाने त्याकरिता राजपुतांची मैत्री संपादन केली.

### कऱ्हाड-कोल्हापूरची मोहीम (१७१८ सप्टेंबर--१७२० मार्च) :

शाहू छत्रपतीस जुन्या मराठे सरदारांचा त्रास शाहू संभाजींच्या आपसातील वादामुळे जास्त होत होता. शाहू राजे चालून आले म्हणजे संभाजी राजांच्या आश्रयास जाणे--छत्रपतींची स्वारी न झाल्यास--स्वतंत्र पुंडाई करणे हे उद्योग या सरदारांचे चालू होते. मोंगलांचा कराड येथील अंमलदार पडदुल्लाखान हा तह झाल्यावरही निघून जाईना तेव्हा शाहू राजांनी बाळाजीसह त्याजवर सन १७१८ च्या पावसाळ्यानंतर चालून जाऊन त्यास हाकलून दिले, कऱ्हाड व इस्लामपूरवर आपला अंमल बसविला. हा उद्योग करून शाहू राजे राजधानीस परत येतात तोच पाठीमागे थोरात बंधूंनी संभाजीची मदत घेऊन शाहू राजांच्या ताब्यातील अनेक ठाण्यांवर शह बसविला. शाहूजींनी बाळाजीच्या मदतीस फत्तेसिंग भोसले व श्रीनिवासराव प्रतिनिधी पाठविले. थोरातांच्या सैन्याशी शाहू राजांच्या सैन्याची गाठ वडगाव येथे पडून निकराचा सामना झाला. त्यात संभाजी राजाची दाणादाण उडाली. तो पराभव पावला. शाहू राजाकडील सैन्यास लूटही पुष्कळ मिळाली.[२]

बाळाजी विजयी होऊन दिल्लीहून परत आल्यावर विरोधकांची तोंडे व हालचाली बंद पडल्या. त्या गोष्टीचा फायदा बाळाजीनी घेऊन पुण्यावरील मोंगली अंमल उठवून लाविला आणि तेथे न्यायमनसुबीचे काम आपण सुरू केले.[३] १७१९ च्या ऑगस्टात छत्रपती शाहू महाराजांतर्फे रामचंद्र महादेव

---

१. भा. व. शा. म. ब. पृ. ५३.

२. रा. खं. ३ ले, ४५३, व ५६६.

३. पे. द. ३१, ले, १२१ व ऐ. सं. सा. भा. १, ले. ५.

चासकर यांनी कल्याण भिवंडीची ठाणी हस्तगत करून मराठी अंमल बसविला.[1] थोरातांचा धुमाकूळ कायमचा थांबविण्यासाठी त्यांचा पाठलाग पेशवे बाळाजींनी केला. थोरात पन्हाळ्याच्या बाजूला जात असता लढाई होऊन त्यात ते मारले गेले. लगेच पेशवे यांनी कोल्हापूरच्या संभाजीराजास वठणीवर आणण्याकरिता कोल्हापुरास वेढा घातला. पण तो शाहू राजांच्या उदार धोरणामुळे उठविला. तेथून ते १७१९ डिसेंबरात तारळे-डिग्रजकडे प्रदेश जिंकीत आले.[2] पेशव्यांनी संभाजी राजाशी तारीख २० मार्च १७२० रोजी उरूणवहे येथे लढाई देऊन त्यास फजीत केले. संभाजी राजांचा कायमचा बंदोबस्त करण्याचे पेशव्यांचे मनात होते, पण शाहू राजांच्या उदार व दिलदार धोरणामुळे ते सोडून द्यावे लागले. शिवाय सय्यदांशी केलेल्या करारात संभाजी राजांचे कोल्हापूर राज्य राखण्याची हमी शाहू राजांनी दिलेली होती.

**बाळाजी विश्वनाथांचा मृत्यू (२ एप्रिल १७२०):**

कोल्हापूरच्या स्वारीहून परत आल्यावर पेशवे बाळाजी विश्वनाथ सासवडास गेले. गेली ३-४ वर्षे सतत दगदग करून त्यांचे शरीर थकले होते. अशा स्थितीत त्यास २ एप्रिल १७२० रोजी इहलोकाची यात्रा संपवावी लागली. इतिहास मृत्यूचे कारण सांगत नाही. तरीपण वृद्धावस्था दुःसह होऊन त्यास एकाएकी मृत्यू आला असावा असे दिसते.

बाळाजीचे लग्न नेवऱ्याच्या बर्वे घराण्यातील राधाबाई नांवाच्या मुलीशी झाले. लग्नात मुलगी लहान असावी. कारण, तिचे १७०१ चे हस्ताक्षर उपलब्ध आहे असे रियासतकार म्हणतात.[3] या जोडप्यास दोन मुलगे व तीन मुली होत्या. वडील मुलगा बाजीराव तारीख १८ ऑगस्ट १७०० रोजी जन्मला. धाकटा चिमाजी त्याहून ४-५ वर्षांनी लहान होता.[4] बहिण अनुबाई सर्वांत लहान व आवडती होती असे दिसते. वडील मुलगी भिऊबाई हिचा विवाह बाबूजी नाईक बारामतीकर ह्याचा भाऊ आबा जोशी याचेशी लावून दिला. अनुबाईचे लग्न १७१९ मध्ये घोरपड्यांचे पदरचा नारायण जोशी इचलकरंजीकर याच्याशी करून दिले. बाजीरावाचे लग्न महादजी कृष्ण जोशी सावकार ह्याची कन्या काशीबाई हिच्याशी झाले. चिमाजी अप्पाचे लग्न सन १७१६ त त्रिंबकराव पेठ्याचे बहिणीशी झाले. एकूण सर्व मुलांची लग्नकार्ये आपल्या हयातीत पेशवे बाळाजींनी केली.

बाळाजींनी सय्यदांशी तह करून त्यावेळच्या मराठमंडळाला पराक्रमाचे क्षेत्र खुले केले. बाळाजीरावास पेशवेपदाची प्राप्ती शाहू राजांची अत्यंत बिकट परिस्थिती असताना झाली. बिकट परिस्थितीतून कौशल्याने बाहेर

---

१. पे. द. ३०, ले. ३३९.

२. पे. द. ७, ले. ३४–३७ व पे. द. ३१, ले. १२३; कित्ता, खं. ६, ले. ५७, कित्ता खं. ८, ले. ८१.

३. बाळाजी विश्वनाथ रि. पृ. १८५.

४. का. सं. प. या. ले. ४९५ व ४९६; पं. सं. वृ. पृ. १; ब्र. च. ले. १९ व ११४.

पडण्यास त्यावेळी पराक्रमाबरोबर मुत्सद्देगिरीची आवश्यकता होती. ह्या दोन्ही चिजा बाळाजीरावांकडे भरपूर होत्या. म्हणूनच त्यांना शाहू राजांची बाजू सावरून धरता आली. मराठे सरदार आपसात भांडून स्वत:चा नाश ओढवून घेतील हे स्वामीकार्यास उचीत नाही ही जाणीव बाळाजीरावास झाली. म्हणून त्यांनी सय्यदाशी तह घडवून आणला. आपल्या धन्याची कीर्ती वाढविली. त्याबरोबर आपलीही कीर्ती वाढविली. चौथाई वसुली-साठी मुलुखगिरी करावी लागणार आणि मुलुखगिरी केल्याशिवाय मराठी सत्ता फैलावणार नाही. आपसातील भांडणे मराठे विसरणार नाहीत याची खूणगाठ बाळाजीरावांनी आपल्या मनाशी बांधिली आणि मराठ्यास त्यांच्या संचारास व पराक्रमास वाव मिळवून दिला. नवीन कामगिरी मिळावी म्हणून बाळाजीरावांनी चौथाईच्या सनदा बादशहाकडून मिळविल्या. या सनदाद्वारेच मराठी राज्याचा फैलाव करण्याचे काम पुढील पेशव्यांच्या कारकीर्दीत मराठ्यांनी केले.

**बाळाजी विश्वनाथांच्या कामगिरीचे मूल्यमापन :**

इ. स. १६८१ मध्ये औरंगजेबाने सैन्यासह महाराष्ट्रात येऊन महाराष्ट्रावर युद्ध लादले. ते त्याच्या अंतापर्यंत पुरले. त्याचा अंत सन १७०७ त झाला. हे युद्ध २५ वर्षे चालले.

भालेराई स्वातंत्र्य युद्धात महाराष्ट्रातील एक मोठा वर्ग शेती सोडून लुटारू सैनिक होण्याच्या मार्गास लागला. या स्वातंत्र्य युद्धानंतर समाजातील शांतताप्रिय सज्जन व दुबळा असा बहुसंख्यवर्ग होता. तो साहजिकच अंदा-धुंदीस कंटाळला होता. त्याला जो कोणी कोणत्याही मार्गानें शांतता प्रस्थापित करील असा पुढारी हवासा वाटणे साहजिक होते. ते काम बाळाजींनी शाहू राजांचा जम बसवून केले. शाहूचा आधार जो शेतकरी सद्गृहस्थ त्याला तू खुशाल लावणी कर, तुझे शेत कोणी तुडविणार नाही असे सांगितले. रयते-पासुन घ्यावयाचा पैसा तो हिशेबाने आम्ही पाटील, कुलकर्णी, देशमुख, देशपांडे याजपासून घेऊ असे आश्वासन बाळाजी विश्वनाथाने रयतेस दिले. ते चिमाजी अप्पांनी बाजीरावसाहेब वारल्यावर हिंगण्यांना लिहिलेल्या पत्रात दृग्गोचर होते :

"तीर्थरूप कैलासवासी नाना (बाळाजी विश्वनाथ) यांची नजर रयेत पाळावी, अशेष जनांची दुवा घ्यावी हेच त्यांचे चित्तांत काया वाचामनसा होते. तदनुरुपच अरण्यवत मुलुक जाहला होता यास कौल देऊन कंटकांचा उच्छेद करून रयेत नांदविली. रयेतीचा आसीर्वाद घेतला. तन्मुळे नानांची कीर्ति लोकोत्तर प्रकाशमान जाहली".[1]

• • •

१. हिंगणे दप्तर ले. १५, (पृ. १४); शेजवलकर, निजाम-पेशवे संबंध, पृ. ३३–३४.

## मुलूखगिरीद्वारा मराठी सत्तेची वाढ

### कालसूची

| इ. स. | |
|---|---|
| १७११ . . . . . | माळव्याच्या सनदा पेशव्यास. |
| १७१७ . . . . . | गुजरात प्रांत मराठ्यांच्या ताब्यात. |
| १७१९ . . . . . | सय्यद बंधूंपैकी हुसेनअल्लीचे मराठ्यांस आपल्या सहाय्यास दिल्लीस येण्याचे पाचारण. |
| १७२४, मे १८ . . . | शाहू व मोगल बादशहा यांचेमधे करार. |
| १७२९ . . . . . | पेशवे बाजीराव व चिमाजीअप्पा माळवा व बुंदेलखंड पादाक्रांत करतात. |
| १७३० . . . . . | दिल्लीचे शिष्टमंडळ सातार्‍यास. |
| १७३८ . . . . . | शाहू महाराजांकडून रघुजी भोसले यास मुलुखगिरीची सनद. |
| १७४१, जुलै २३ . . | माळव्यावरील मराठ्यांचा अंमल बादशहास मान्य |
| १७४३ . . . . . | जयपूरच्या सवाई जयसिंगचा मृत्यू. |
| १७४६-४७ . . . | बुंदेलखंडात मराठ्यांची सत्ता मजबूत. |
| १७४८, एप्रिल . . . | पेशवे जयपूरचे माधोसिंग यांची भेट घेतात. |
| १७५१ . . . . . | अहमदशहा अबदालीची पंजाबात पुन्हा स्वारी. |
| १७५२ . . . . . | मराठ्यांची दक्षिणेत खंडणी वसुलाकरिता सतत मुलुखगिरी |
| १७५२, एप्रिल २३ . . | मराठे व बादशहाचा वजीर यांचा स्वदस्तुरच्या सह्यांनी करार. |
| १७५२, जून १ . . . | मराठ्यांना बादशहाकडून बावीस सुभ्यांची चौथाईची सनद. |
| १७५७ . . . . . | मराठ्यांच्या ताब्यात सबंध गुजरात. |

# ३

## मुलूखगिरीद्वारा मराठी सत्तेची वाढ

शाहू महाराजांस दिल्ली बादशहाकडून चौथाई सरदेशमुखीच्या सनदा — सनदा प्राप्तीने मराठ्यांचे पारडे जड — स्वराज्य सरदेशमुखी व चौथाई हक्कांचे विषदीकरण — मराठे अंमलातील उत्पन्नाची वाटणी — प्रत्येक सरदाराच्या कर्तृत्वास मुलूख आखून देण्यात येतो — त्यामुळे सरदार मुलूखगिरीवर निघतात — मुलूखगिरी आणि स्वाऱ्या यामधील फरक — परदेशस्थ पठाण, इराणी, तुराणी यांच्या हिंदुस्तानावरील स्वाऱ्या, मराठ्यांनी निजाम, टिपू, सिद्दी, राजपूत आदिवर मुलूखगिरी स्वाऱ्या केल्या त्याचे विवेचन.

शाहू महाराजांस छत्रपति पद मिळाल्यानंतर सय्यदांकडून आणलेल्या सनदांवर बादशाही शिक्कामोर्तब सन १७१९ मध्ये झाले. या सनदा तीन प्रकारच्या होत्या—

(१) स्वराज्य; (२) सरदेशमुखी व (३) चौथाई.

ह्या सनदा मराठ्यास मिळाल्याने मराठ्यांच्या राजकीय सत्तेत काय फेरफार झाले ते पहाणे जरूर आहे.

दिल्लीचा बादशहा बहादूरशहा दक्षिणेत आला असता त्याजकडे शाहू महाराजांनी तडजोडीकरिता वकील पाठविले. त्यांनी बादशहाकडे शाहू महाराजातर्फे चौथसरदेशमुखीची मागणी केली. चौथाईच्या मोबदल्यात शाहू महाराजांनी १५ हजार फौज औरंगाबादेस ठेवून सुभेदाराची सेवा करावयाची असे ठरले. शाहू महाराजांनी आपले वकील बहादूरशहाकडे पाठविले आहेत हे कळताच ताराबाईनी आपला वकील बादशहाकडे त्याच वेळी पाठवून आपल्यास फक्त सरदेशमुखीच्याच सनदा द्याव्या अशी विनंती केली.[1] त्यावरून कै. शेजवलकर असा निष्कर्ष काढतात की, ज्याअर्थी, ताराबाईनी शाहू महाराजांप्रमाणे चौथाईच्या मोबदल्यात १५ हजार स्वारांनिशी दक्षिणेतील मोंगल सुभेदाराचे रक्षण करण्याची गोष्ट काढलेली नाही त्याअर्थी, तिच्या मनात शाहूप्रमाणे मोगलांचे मांडलीकत्व पत्करावयाचे नव्हते. शाहू महाराजास मात्र बादशहाच्या अंकीत राहून मराठी राज्य सांभाळायचे होते. म्हणजेच मोगलांचे सरळ मांडलीकत्व पत्करून दिवस काढावयाचे हे शाहू महाराजांनी पसंत केले,[2] असे शेजवलकर आदि काही इतिहासकारांचे म्हणणे. पण हा निष्कर्ष तेवढासा बरोबर नाही हे सांगितले पाहिजे.

---

१. खाफीखान, भा. २, पृ. ६२५.

२. शेजवलकर, निजाम-पेशवे संबंध, पृ. १३.

शाहू महाराजांची सुटका झाली तेव्हा महाराजांस सनदा न मिळता त्या देण्याचे फक्त आश्वासन मिळाले. मात्र मोगलांचा आशिर्वाद त्यांना मिळाला. हे आश्वासन कृतीत आणावयाचे म्हणजे बादशहाच्या सही शिक्क्याच्या सनदा मिळवावयास हव्या. तो उद्योग बाळाजी विश्वनाथ पेशव्यांनी केला. दिल्लीस जाऊन सय्यदांना सहाय्य करून त्यांनी स्वराज्य, सरदेशमुखी व चौथाईच्या सनदा आणिल्या आणि बरोबर शाहू महाराजांची आप्त मंडळी सोडवून आणिली. सनदा मिळाल्या म्हणजे शाहू महाराजास काय मिळाले ते पाहू.

**स्वराज्य.**—शिवाजी महाराजांनी जे स्वराज्य स्थापिले ते औरंगजेबाने जिंकले. तो सबंध प्रदेश स्वराज्य प्रदेश म्हणून ओळखला जाऊ लागला. त्या प्रदेशाचे स्वामित्व स्वराज्य सनदेने शाहू महाराजांकडे आले. स्वराज्य सनदेत प्रांतांचा उल्लेख आहे.[1]

चौथ सरदेशमुखीची मागणी शिवाजी महाराजांनी आपल्या कर्तृत्वाच्या प्रारंभीच पुढे आणली होती. तिला नंतर पन्नास वर्षांनीं सन १७१९ मध्ये मोगल बादशाहीची मान्यता मिळाली.

**सरदेशमुखी.**—महाराष्ट्रात वसाहती झाल्यावर त्यात शेतीवाडी सुरू झाली. सरकारी सारा वसूल होऊ लागला व तो वसूल करण्याकरिता महालो-महाली देशमुख नेमण्यात आले. ह्या देशमुखांनी सरकारने ठरविलेला दस्त वसूल करावयाचा आणि आपली मेहनत म्हणून त्या एकंदर वसुलाचा दहावा हिस्सा स्वतःस राखून ठेवावयाचा व बाकीचा सरकारात जमा करावयाचा असा पायंडा सुरू झाला. शिवपूर्वकालात घाटगे, निंबाळकर, डफळे, सावंत-वाडीकर भोसले आदि मराठे सरदेशमुख महाराष्ट्रात होते. देशमुख या नात्याने देशाची स्वस्थता व शांतता राखण्याची व त्याच्याकडून अपेक्षिलेल्या सारा वसुलीची अशी दोन कामांची जबाबदारी त्यांच्यावर असे. त्या वसुलाचा एकदशांश भाग जो देशमुखास मिळावयाचा त्यापैकी शेकडा पाच टक्के धान्याच्या किंवा रोकडीच्या रूपाने आणि पाच टक्के पीक जमिनीच्या रूपाने अशी त्यांच्या प्राप्तीची विभागणी होती. शिवाजी महाराजास या देशमुखांवरील सरदेशमुखी वतन आपल्याला बादशहाकडून मिळावे असे वाटे. त्याप्रमाणे त्यांनी मोगल बादशहाकडे आपल्या हयातीत तीनदा मागणी केली होती. शिवाजी महाराजांची ही मागणी मोगल बादशहाने शाहू महाराजास सनदा देऊन एक प्रकारे पुरी केली.

**चौथाई.**—हा प्रकार अगदी भिन्न आहे. याचा उगम शिवकालपूर्व आहे. रामनगरचा चुथिया राजा संरक्षणाकरिता पोर्तुगिजांना खंडणी देत असे. त्या खंडणीस मान्यता चुथिया राजाने दिली तीस चौथाई असे नांव मिळाले,

---

१. म. रि. बाळाजी विश्वनाथ, पृ. १५५.

असें सुरेंद्रनाथ सेन सांगतात. पुढें रामनगरावर मराठ्यांचा अंमल सुरू झाला तेव्हा मराठ्यांनी हीच चौथाई पोर्तुगीजांकडून मिळविण्याचा प्रयत्न केला, त्यास बरोबर दहा वर्षांनी यश आले. मोंगली मुलखावर शिवाजी महाराजांनी ज्यावेळी हल्ले करण्यास सुरवात केली तेव्हा लोकांनी त्याजकडे विनवण्या केल्या की, आम्ही गरीब रय्यत आम्हास उपद्रव करू नये. महा-राजांनी चौथ सरदेशमुखीचा मोबदला म्हणून विजापूर व गोवळकोंडा यांना मोगलांच्या आक्रमणापासून वाचविण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. महाराजांनी कर्नाटकात स्वारी केली तेव्हा या दूरच्या प्रदेशावर चौथ आणि सरदेशमुखी बसविली. सन १६८० मध्ये मृत्यूपूर्वी महाराजांनी चौथ सरदेशमुखी खंडणी देणाऱ्या हिंदु-मुसलमान सत्ताधाऱ्यांशी मैत्रीचे तह केले. चौथच्या मोबदल्यात त्यांचे परचक्रापासून रक्षण केले. त्यामुळे चौथ वसूल करण्यास निरनिराळ्या राज्यांनी महाराजास संमती दिली. चौथची रक्कम ठरलेली व तिचा विनियोग संरक्षणार्थ ठेवल्या जाणाऱ्या फौजेसाठी व्हावयाचा, असे चौथच्या व्यवहाराचे निश्चित स्वरूप होते. स्वराज्याबाहेरील मुलखातून वसुलाचा चौथा हिस्सा दिल्यावर परचक्रापासून संरक्षण करण्याची हमी देऊन तो प्रदेश आपल्या स्वामित्वाखाली आणण्याची पद्धति शिवाजी महाराजांनी योजिली तिचे पुनरुज्जीवन शाहू महाराजांनी केले. चौथाईच्या सनदा मोगलाकडून मिळवून मोगल प्रदेशातून चौथाई वसूल करण्याच्या निमित्तानें मुलूखगिरी स्वाऱ्या सुरू झाल्या. अशा रीतीने मोगली सत्तेखालील प्रदेश मराठ्यांनी आपल्या सत्तेखाली आणिला. ज्यांनी ज्यांनी तो प्रदेश जिंकला त्यांना तो सरंजामास लावून दिला. असे सरंजामदार शिंदे, होळकर, पवार, गायकवाड हे आपापल्या प्रदेशाचे कालांतराने राजे बनले. त्यांनी स्वतःचे चलन आपआपल्या राज्यात सुरू केले. स्वतःचे नाणे सुरू केले, इनामे दिली. शाहू महाराजांनी पंधरा हजार फौज दक्षिण सुभ्यांच्या दिमतीस ठेवण्याचे कबूल केले. फौज दिमतीस ठेविल्याने मांडलिकत्व येते हे म्हणणे पटत नाही. उलट सार्वभौम सत्ताच लहान सत्तेच्या कुमकेस फौज ठेवित असते. शिवाय फौजेचा खर्च सुभेदाराने करावयाचा म्हणजे प्रत्यक्षात याचा अर्थ असा की, फौजेवर हुकमत मराठ्यांची व फौज मात्र सुभेदाराच्या चाकरीस. चौथाई वसुलीसंबंधीची सनदसुद्धा स्वतंत्रतेची व सार्वभौम सत्तेची द्योतक आहे. कारण श्रेष्ठ सत्तेस कमकुवत सत्तेच्या जोखडाखालील प्रजाजनाकडूनही चौथाई वसूल करता येते. म्हणूनच याचे वर्णन ओवेन असे करतो की, "परमुलखावर ताव मारून वाटेल तसे द्रव्य उकळण्याचा सोयीचा व हातातला उपाय म्हणजे ही चौथाई".[1] आता अशा प्रकारची अनिर्बंध सत्ता ज्या राष्ट्राला मिळते आणि जे राष्ट्र ती सत्ता वापरून वर्धिष्णु बनते त्या राष्ट्रास किडलेल्या सत्तेचे, मांडलीक कसे म्हणता येईल? बादशहाने चौथाई कबूल केली म्हणजेच मराठ्यांच्या संरक्षणाखाली बादशहा गेला असे झाले. पुढे पन्नास वर्षांनी मार्क्विस ऑफ वेलस्लीने संस्थानिकांचा पैसा घेऊन आपले सैन्य त्यांच्या

१. म. रियासत, बाळाजी विश्वनाथ—पृ. १५५ वरील ओव्हेनचे उद्गार.

सुरक्षिततेस ठेवून मराठ्यांचीच कल्पना अंमलात आणून फलद्रुप केली. मराठ्यांची चौथाई गोळा करण्याची पद्धत पुढीलप्रमाणे, असे खाफीखान सांगतो : कोणत्याही मोठ्या गावाला किंवा कसब्याला मराठे पोहचले की, तेथील अधिकारी किंवा जमीनदार यांजकडे निरोप पाठवून चौथाईची मागणी करीत. कधी असेही होई की, त्या भागातील जमीनदार किंवा अधिकारी आपण होऊन मराठ्यांच्याकडे येत आणि चौथाई देण्याची तयारी दाखवीत. तसेच आपल्याला आश्रयाचा कौल मिळावा अशी इच्छा करीत. गाव आणि त्या भोवतालच्या प्रदेशाचे रक्षण मराठे करीत. गावाचे अधिकारी गावाचा शेतसाऱ्याचा वसूल १,०००—२,००० रुपयांचा असला तर, ४-५ शे आहे असे दाखवीत. त्या प्रांताचा चौथा हिस्सा देण्याचे ते कबूल करीत आणि वसुलीची खात्री पटविण्याकरिता कोणास तरी ओलीस म्हणून देत. या अटीवर मराठे तेथील लुटमार थांबवीत. तर मोंगल सरदार, फौजदार अगर जमीनदार चौथाई देण्यास कबूल झाला नाही तर मराठे हल्ला करीत ; आणि महाल (किंवा परगणा) त्यांच्या ताब्यात आला की, तो लुटून फस्त करीत. एखाद्या गावाला किंवा शहराला ते वेढा घालीत. पण काही दिवस वेढा घालूनही ते गाव ताब्यात येत नाही असे वाटले तर वेढा उठवून ते दुसरीकडे निघून जात. मराठे सरदार चौथाईची रक्कम ठरावी आणि लूटमार होऊ नये या प्रयत्नात असत. उलट मराठ्यांच्या सैनिकांना चौथाईची भानगड नको असे. लुटालूट करण्यास ते नेहमी तयार असत. कारण चौथाईची रक्कम सरदारांच्या हाती पडे. सैनिकांना काही मिळत नसे. उलट लूटमार झाल्यास सैनिक जे लुटतील ते त्यांना मिळत असे. सरदारांना काही लाभ होत नसे.[1]

छत्रपति शाहू महाराजांच्या पदरी बाळाजी विश्वनाथ पेशवे व चिमणाजी दामोदर मोघे हे दोन सरदार होते. त्यांनी हुसेन अल्लीच्या दरबारात शंकराजी नावाचा जो दक्षिणी ब्राह्मण मुत्सद्दी होता त्याच्यामार्फत तह घडवून आणला. त्यातील अटी अशा : (दक्षिण सुभ्यांतील) बादशाही खालसा महालांतून आणि जहागिरदारांकडून बादशहाचे अधिकारी म्हणजे अमीन, करोडी व शिक्केदार हे शेतसारा वसूल करीत त्याचा चौथा हिस्सा राजा शाहूच्या अधिकाऱ्यांना देण्यात यावा. असेही ठरले की या चौथाई रकमेबरोबर सरदेशमुखी म्हणून शेकडा १० रुपये घेण्यात यावे. ही शेकडा १० रक्कम रयतेकडून घेण्यात यावी. फौजदारी, शिक्केदारी, इजाफत आणि इतर बाबी याबद्दलही रक्कम वसूल करण्यात यावी, म्हणजे सरकारी कागदपत्रात नोंदलेले कुल उत्पन्न (आम वसूल–ग्रॉस रिसीट) यावर शेकडा ३५ ची (चौथाई आणि सरदेशमुखी) रक्कम मराठ्यांना द्यावी असे ठरले. यामुळे जी रक्कम मराठ्यांना मिळू लागली ती सरकारी कागदपत्रात महसूल (जमाबंदी) म्हणून नोंदण्यात येणाऱ्या रकमेच्या निम्म्यापर्यंत होऊ लागली. राजा शाहूचे

१. सेतु माधवराव पगडी—मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध, (खाफीखानाचा साधनग्रंथ), पृ. ११४–१५.

अधिकारी हे महसूल-वसुलीच्या कामात मोगल अधिकाऱ्यांपेक्षाही प्रबळ असे भागीदार बनले (शरीके गालिब-डॉमिनंट पार्टनर्स). तमाम बाबीच्या रकमा मराठे वसूल करू लागले. या गोष्टीचे प्रजा, मोगलांचे अधिकारी आणि जहागिरदार या सर्वांना फार मोठे संकट वाटू लागले. प्रत्येक महालात (परगणा) मराठ्यांचे दोन अधिकारी असत. एकाला कमाविसदार म्हणत आणि दुसऱ्याला सरदेशमुखीचा गुमास्ता म्हणत. उत्पन्न नोंदल्या जाणाऱ्या प्रत्येक कागदपत्रावर (तुमारे वासीलात) सरदेशमुखीचा शिरस्तेदार प्रथम सही करी. या कामाबद्दलचे तो वेगळे कमिशन (लवाजमे दस्तियात रुसूम) आकारी. मोगल अधिकारी व जहागिरदार यांची परिस्थिति अतिशय अवघड होऊन गेली.

कमाविसदार आणि गुमास्ता हे दोन मराठे अधिकारी होते. त्यांच्या जोडीला मराठ्यांनी प्रत्येक महालात (परगणा) आणखी एक अधिकारी नेमला. त्याला राहदार म्हणत (रस्त्यावरील जकात वसूल करणारा). मोगल अधिकाऱ्याच्या अकार्यक्षमतेमुळे आणि मराठ्यांचा वरचष्मा झाला होता म्हणून मराठे राहदार ठिकठिकाणी कायम झाले होते. प्रत्येक बैलगाडीमागे आठ आणे आणि व्यापाऱ्याकडून एक रुपया वसूल करीत. याशिवाय इतर लोकांकडून ते मनाला येईल तसे दुप्पट किंवा तिप्पट अशाहि रकमा वसूल करीत. याशिवाय तह होण्यापूर्वीहि ते इतर प्रकारचे कर आणि पट्ट्या वसूल करीत. अशा रीतीने प्रत्येक परगण्यात शाहू राजाचे तीन कायम अधिकारी (अमीन) नेमले गेले. त्यांच्याबरोबर स्वार आणि पायदळाची पथके असत. ते सरकारी कचेऱ्या, चावड्या आणि इतर वसुलीच्या ठिकाणी आणि रस्त्यावर ठिकठिकाणी ठाण मांडून बसू लागले. त्याशिवाय मराठ्यांनी बेचिराख खेडी आबाद करण्याचे कौल दिले. ती खेडी म्हणजे खानदेशातील नंदुरबार, आणि इतर वऱ्हाड सुभ्यातील परगणे या ठिकाणी होती. वास्तविक पाहता ही गावे मराठ्यांनीच उध्वस्त केली होती. अमीर-उल्-उमराने वरील खेड्यांसंबंधी केलेले करार मराठ्यांनी कबूल केले नाहीत. मराठ्यांनी जे कौल करार केले ते पुढीलप्रमाणे होते. गांव आबाद केल्यास उत्पन्नाचा तिसरा हिस्सा (बटाई) जहागिरदाराला घेण्याचा अधिकार असे. म्हणजे एक हिस्सा मराठे, एक हिस्सा प्रजा आणि एक हिस्सा जहागिरदार अशी गावांच्या उत्पन्नाची वाटणी होई.

महाली आणि मुलकी कारभारात मराठ्यांना जो अधिकार प्राप्त झाला तो मोगल अधिकारी (फौजदार) आणि इतर जहागिरदार याना असलेल्या अधिकारांपेक्षाहि जास्त होता. अमीर-उल्-उमराने पुन्हा पुन्हा ताकिदीचे हुकूम काढले की, रस्त्यावरील वाहने आणि स्वाऱ्या यांची जकात ठरलेल्या रकमेपेक्षा तिप्पट किंवा चौपट जुलमी अधिकारी वसूल करीत ते बंद करण्यात यावे. पण त्याची अंमलबजावणी झाली नाही. तहामुळे एक गोष्ट मात्र घडली. बहुतेक परगण्यातून व्यापाऱ्यांना लुटण्यात येत असे त्या गोष्टी बंद पडल्या. व्यापारी आणि प्रवासी यांनी जकाती दाखल केल्या की, त्यांना

आपले कारभार निर्धोकपणे करता येऊ लागले. मराठ्यांच्या उच्छादामुळे आणि जुलमी अधिकाऱ्यांच्या जुलुमामुळे काही गावे ओस पडली होती ती पुन्हा आबाद झाली.

अमीर-उल्-उमरा हुसेन अलीखानानें ठरलेल्या अटीप्रमाणे सनद तयार केली आणि त्यावर स्वतःचा शिक्का लावून राजा शाहूच्या वकीलांना ती दिली.

**एकंदर उत्पन्नाची वाटणी**— बादशहाकडून वर उल्लेखिलेल्या ज्या तीन सनदा मराठ्यास मिळाल्या, त्या सनदांप्रमाणे राज्यकारभाराची व्यवस्था लावणे हे काम बाळाजी विश्वनाथ पेशव्यांना शाहू महाराजांच्या वतीने करावे लागले. पेशवे सनदा घेऊन साताऱ्यास आल्यावर वसुलाच्या बंदोवस्ताविषयी काही नवीन कायदे शाहू महाराजास करावे लागले.

दक्षिणेतील सहा सुभ्याची सरदेशमुखी सनदेने शाहू महाराजास मिळाली. ती सरदेशमुखी हे राजाचे वतन ठरविण्यात आले. सरदेशमुखीबावत जो ऐन वसूल होईल त्यापैकी शेकडा १० प्रमाणे वसूल राजाकडे व बाकीचा सरकार खजिन्याकडे जाई. परमुलूखातून चौथाई वसूल होण्यास अवघड पडे. ज्या मुलुखातून चौथाई मिळणे असेल त्या मुलुखावर मराठे सरदार चौथाई वसुलीसाठी स्वारी करीत. जितका ऐवज मिळवता येईल तेवढा घेऊन बाकी ऐवज आमचा सरकारकडे येणे राहिला असे सांगण्याचा प्रघात पडला व त्यामुळे मराठ्यांना त्या मुलुखावर स्वारी करण्यास निमित्त मिळू लागले. स्वाऱ्या करून जो मुलूख स्वराज्यात आला त्याच्या वसुलाची जी चौथ तिला राजाची बावती (राजबाबती) असे नवे नांव ठेवून तो राजाचा हक्क ठरविला. ही रक्कम राजाच्या खर्चास द्यावयाची असे ठरले. बाकी तीन हिस्से राहिले. त्यास मोकासा नाव ठेविले. या मोकाशातून साहोत्रा (शेकडा सहा रुपये) व नाडगौड (शेकडा तीन रुपये) या नामे दोन हक्क राजाने आपल्या मर्जीनुसार कोणाही सरदारास बहाल करावे असा नियम केला.

त्यामुळे राजबाबती (२५); साहोत्रा (६); व नाडगौड (३), एवढ्या हक्कांचा वसूल (३३); बाजूस काढल्यावर बाकी राहिलेला (१००–३३)-६६ हा निव्वळ मोकासा मराठी तिजोरीत जमा करावयाचा असे ठरले.

हा ६६ टक्के भाग निरनिराळ्या सरदारास जहागिरीदाखल वाटून द्यावा असे ठरले. अशा मुलूखगिरीसाठी निरनिराळे प्रदेश निरनिराळ्या सरदारास वाटून देण्यात आले. राजाची मुख्य फौज पेशवे व सेनापती यांच्या हातात ठेविली. त्यावेळी राजाची मुख्य फौज पेशवे व सेनापतीच्या हातात असून जेथे जरूर पडेल तेथे जाऊन देशाचा बंदोबस्त करावा अशी त्यांना शाहू महाराजांनी आज्ञा केली होती.

**प्रत्येक सरदारास प्रदेश आखून दिला होता तो असा—**

(१) पेशव्यांच्या वाटणीस खानदेश व बाळाघाटचा काही भाग दिला. त्यात पेशव्यांनी वापर करावा. सेनापतीनी गुजराथ व बागलाण या दोन प्रांतांचे वसूल घ्यावे;

(२) सेनासाहेब सुभा कान्होजी भोसले यानी वऱ्हाड पाईन-घाटचा प्रदेश व गोंडवणच्या पूर्वेकडील भाग यात वहिवाट करावी;

(३) सरलष्कर यानी गंगथडी व औरंगाबादच्या बाजूस उद्योग करावा;

(४) फत्तेसिंग भोसल्यांनी कर्नाटकचे बाजूस रहावे;

(५) प्रतिनिधीनी निरेपासून वारणेपर्यंतचा प्रदेश व हैदराबाद बेदरकडील मुलूख सांभाळावा;

(६) चिटणीस व आंग्रे यांनी कोकणात काम करावे;

(७) पंतसचिवांनी आपली पहिली जहागीर सांभाळून इतरत्र साहोत्राचा अंमल करावा.

एकाने दुसऱ्याच्या प्रांतात जाऊ नये.

वरीलप्रमाणे वाटणी झाल्यानंतर त्या त्या सरदारास चौथाई सरदेशमुखीचे हक्क वसूल करण्याकरिता मुलूखगिरी करावी लागली. बाजीरावानी मोगल बादशहाकडून माळवा व गुजरात या प्रांताची सरदेशमुखी व चौथाई वसूल करण्याचे हक्क मिळविले. माळव्यातील चौथाई वसूली करत असता ती देण्याचे माळव्याच्या गिरधर बहाद्दूरने नाकारले. साहजिकच संघर्ष निर्माण झाला आणि त्या संघर्षामध्ये गिरिधर बहाद्दूर आणि दया बहाद्दूर हे दोन्ही बंधु कामास आले आणि माळवा मराठ्यांच्या ताब्यात आला. मुलूखगिरी करून वसूल करण्याची पद्धत मराठ्यांनी पाडली असे म्हणता येणार नाही. मुलूखगिरीची पद्धत मोगलकालीनही होती. मराठ्यांनी गुजरातेत आपला जम बसविण्यापूर्वी जुनागडचा नवाब मुलूखगिरी करून म्हणजे फौजेच्या सहाय्याने काठेवाडच्या राजेरजवाड्यांकडून वसूल गोळा करीत असे. तद्वत पेशवेकाळी मराठेही आपल्या अंकीत असणाऱ्या राजेरजवाड्यांकडून फौजेच्या सहाय्याने वसूल करीत होते. यावरून फौजेच्या सहाय्याने वसूली करणे म्हणजे स्वारी करणे नव्हे. त्या काळच्या पद्धतिनुसार मुलूखगिरी म्हणजे सैन्य बळाच्या सहाय्याने ठरलेली खंडणी गोळा करणे, काही लोक मुलूखगिरी म्हणजे स्वारी समजतात. पण ते योग्य नव्हते. मराठे मुलूखगिरीवर जात म्हणजे स्वारीवर जात असे म्हणणे तेवढेसे बरोबर नाही. स्वाऱ्या परमुलुखात, शत्रूच्या मुलूखावर करावयाच्या असा संकेत आहे. महमूद घोरीने हिंदुस्थानावर सतरा स्वाऱ्या केल्या. महमूद घोरीला हिंदुस्तान परका होता. तेथे त्यास आपला अंमल बसवावयाचा होता. अंमल बसवून हिंदुस्तानातील प्रदेश आपल्या स्वामित्वाखाली आणावयाचा होता. म्हणून त्याने हिंदुस्तानावर अनेक स्वाऱ्या केल्या. त्या खऱ्या अर्थाने स्वाऱ्या होत. त्यांना कोणी मुलूखगिऱ्या म्हणणार नाही. मराठ्यांना गुजरातचा ताबा इ. स. १७५७ ला मिळाला. त्यात खालसा मुलूख व जहागिरी मुलूख असे दोन प्रकारचे मुलूख त्यांच्या ताब्यात आले. जहागिरी मुलूख सबंध काठेवाडातील राजेरजवाड्यांचा. ह्या राजेरजवाड्यांनी खंडणी देण्याचे

कबूल करून मराठ्यांचे स्वामित्व पत्करले. पण ही खंडणी स्वखुषीने कोणीही जहागिरदार देत नसे. ती वसूल करण्याकरिता बळाचा उपयोग करावा लागे. त्याशिवाय वसूल गोळाच होत नसे. दरवर्षी ही प्रथा चालू होती. दसरा संपल्यावर मराठी सैन्य मुलूखगिरी करण्यास म्हणजे खंडणी वसूल करण्यास जात असे. जो कोणी जमीनदार खंडणी देत नसे त्यास ह्या सैन्याच्या सहाय्याने शासन केले म्हणजे तो खंडणी देई. अशा रीतीने दरवर्षी खंडणी वसूल करण्याकरिता ही मुलूखगिरी करावी लागे. ज्या वर्षी सैन्य जात नसे त्या वर्षी हे जमीनदार लोक खंडणी देत नसत. मात्र दुसऱ्या वर्षी फौज गेली की, दोन्ही वर्षाची खंडणी मिळत असे. ही स्वारी नेवून खंडणी वसूल करण्याची प्रथा बंद पाडावी म्हणून इंग्रजांनी प्रयत्न केले व त्यांच्या प्रयत्नास यशही आले. गायकवाड, होळकर, शिंदे हे इंग्रजांचे मांडलीक झाल्यावर त्यांच्या अंकित्वाखाली जे जहागिरदार व भूमिये होते त्यांनी त्या त्या सत्ताधिशांना देण्यात येणाऱ्या खंडण्या इंग्रज सरकारला द्याव्यात व इंग्रज बहाद्दूराने त्या खंडण्या त्या त्या सत्ताधिशास पोचत्या कराव्या अशा प्रकारचे करार घडविले. इंग्रज सरकारचा दराराच एवढा मोठा की, लेखणीच्या फटकाऱ्यानिशी हे सर्व लहानथोर जमीनदार निमुटपणे आपापली खंडणी इंग्रजी तिजोरीत भरत होते. व इंग्रज सरकार ह्या खंडणीचा पैसा वर उल्लेखिलेल्या मराठी सत्ताधिशास देत असे.

मराठ्यांनी टिपूवर, निजामावर स्वाऱ्या केल्या त्यासुद्धा बहुतेक खंडणी वसूल करण्याकरिता. कर्नाटकात बाळाजी बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दीत ज्या स्वाऱ्या झाल्या त्यासुद्धा कर्नाटकातील पाळेगारांपासून खंडणी वसूल करण्याकरिताच. १७१९ मध्ये सय्यद बंधूपैकी हुसेन अल्ली याने मराठ्यास आपल्या सहाय्यास दिल्लीस बोलाविले व त्याच्या चौथाई व सरदेशमुखीच्या मागण्या मान्य केल्या. चौथाई सरदेशमुखीच्या मागण्या मान्य झाल्यानंतर ही चौथाई व सरदेशमुखीची रक्कम वसूल करण्याचे काम अर्थातच मराठ्यास करावे लागले. बादशहाने मोगली मुलखात म्हणजे दक्षिणेतील सहा सुभ्यात चौथाई सरदेशमुखी वसूल करण्याचे हक्क दिले. या हक्काची अंमलबजावणी मराठे करू लागल्यावर मोगलांचा दक्षिणेतील सुभेदार जो निजाम तोच मराठ्यांस विरोध करू लागला. तेव्हा मराठ्यास मोगली मुलुखात आपले हक्क शाबीत ठेवण्याकरिता विरोध करणाऱ्या निजामाशी लढाया कराव्या लागल्या. वस्तुतः मराठे निजाम संघर्ष या तत्वातून निर्माण झाला. मराठ्यांनी काही कारण नसता निजामाची कुरापत काढली व त्याशी लढाई केली असे झाले नाही: उलट निजामच मराठ्यांच्या कायदेशीर हक्काच्या आड येऊ लागला तेव्हा मराठ्यांनी वेळोवेळी निजामाशी लढाया देऊन त्याचा पराभव करून आपले हक्क त्याजकडून कबूल करून घेतले. निजामावर मराठ्यांच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यासुद्धा मुलूखगिरी स्वाऱ्या होत.

जंजिऱ्याचा सिद्दी हा मोगलांचा अंकीत होता. तो मोगल बादशहाचा दर्यासारंग होता. तेव्हा त्याने जिंकलेले किल्ले आणि मुलूख बादशहाने

त्याजकडून मराठ्यास मिळवून द्यावेत अशी अट बादशहा व शाहू महाराज यामध्ये जो १८ मे १७२४ मध्ये करार ठरला त्यामध्ये होती.[1] या अटीनुसार जंजिऱ्याच्या सिद्दीकडे मराठ्यांनी सिद्दींच्या ताब्यात असलेल्या आपल्या किल्ल्यांची व मुलखाची मागणी केली. सिद्दीने ती मागणी झिडकारून लावली. ही मागणी पुरी करून घेण्याकरिता बाजीरावास जंजिऱ्याच्या सिद्दीवर स्वारी करावी लागली. ही सुद्धा मुलूखगिरीची स्वारी होय. या स्वारीत जंजिऱ्याच्या सिद्दीचा पराभव होऊन त्यास मराठ्यांचा मुलूख व किल्ले परत करावे लागले.

पेशवे बाजीराव व त्यांचे बंधू चिमाजी यांनी १७२९ च्या अखेरीस माळवा-बुंदेलखंड पादाक्रांत केले. गुजरातेत अनेक स्वाऱ्या करून दाभाडे, गायकवाड, कदमबांडे यांनी मराठी सत्तेचा प्रसार त्या प्रांती केला. मराठ्यांच्या या पराक्रमाने दिल्ली दरबारात एक प्रकारचा घबराट निर्माण झाला. मराठ्यांना गुजरात, माळवा, बुंदेलखंड या प्रांतातून घालवून देण्यास दिल्ली बादशहाजवळ पुरेसे बळ नव्हते. त्या बाबतीत बादशहा एवढाच त्याचा वजीरही दुबळा होता. बाजीरावाचा मित्र जयसिंग याने आपण मराठ्यांशी समझोता घडवून आणतो, तशा प्रकारचे अधिकार आपणास बादशहाने द्यावे असे विचार प्रकट केले. या उलट सादतखान, महमदखान बंगश व अभयसिंग यांचे म्हणणे की, सर्वांनी एकजूट करून मराठ्यांना या मोगली प्रांतातून सैन्य बळाने हुसकावून लावावे.

वरीलपैकी कोणताही निर्णय पक्का करण्याच्या अगोदर मराठ्यांच्या दरबारी शाहू राजांच्या सातारा राजधानीस दिल्लीहून एक शिष्टमंडळ पाठवावे असे ठरले. त्या शिष्टमंडळाने शाहू राजास व त्याच्या सरदारास भेटावे व त्यांच्या मनात काय आहे हे अजमवावे. तसेच हैद्राबादेस जाऊन निजाम उल्मुल्क याची भेट घेऊन त्याचे शाहू व पेशवा याजसंबंधीचे विचार काय आहेत हेही जाणून घ्यावे. त्याप्रमाणे दिल्लीहून पांच जणांचे[2] शिष्ट-मंडळ साताऱ्यास १७३० च्या पावसाळ्यात आले. शाहू राजाने व मराठा दरबाराने त्यांचे हार्दीक स्वागत केले. हे शिष्टमंडळ निरनिराळ्या सरदारांच्या मुलाखती घेत सप्टेंबर अखेरपर्यंत साताऱ्यास राहिले. त्यांच्या मते मराठ्यांच्या मनात मोगलाविषयी द्वेष भावना नाही. बादशहाविषयी आदर आणि समभावनाच दिसते. दुष्ट हेतूचा त्यांच्या मनात लवलेशही नाही. हे शिष्टमंडळ म्हणते की, मराठ्यांनी आपणास एवढेच ठासून सांगितले की, बादशहाने आम्हास मंजूर केलेली चौथाईची रक्कम द्यावी म्हणजे बादशहाच्या सेवेस आम्ही जरूर लागेल तेव्हा हाकेला ओ देऊन येऊ.

---

१. बादशहातर्फे दक्षिणेतील सुभेदार मुंबीझखान व बाजीराव यांमध्ये तहाच्या वाटाघाटी झाल्या त्याची कलमे पे. द. १० मधील पत्र क्र. १ मध्ये आहेत; त्यातील पृ. ३ वरील कलम सिद्दीसंबंधी आहे. पहा— सरदेसाई, न्यु हिस्टरी ऑफ द मराठाज, व्हॉ. २, पृ. ७९.

२. शिष्ट मंडळाची नावे—न्यू हिस्टरी ऑफ द मराठाज, भा. २, प. १२४.

बादशहाचे व बादशाहीचे संरक्षण करू. आपल्याला ११ लाख रुपये गुजरातच्या चौथाईबद्दल व १५ लाख माळव्याच्या चौथाईबद्दल मिळावे असे मराठ्यांनी शिष्टमंडळास सांगितले. या वेळी माळव्याचा मोगल सुभेदार महमदखान बंगश होता व गुजरातचा अभयसिंग. बादशहाने या सुभेदारांकडून जर चौथाईच्या रकमा घेऊन त्या मराठ्यास दिल्या असत्या तर मराठ्यांना माळवा, बुंदेलखंड, गुजरात या प्रांती मुलूखगिरी स्वाऱ्या करण्याचा प्रसंग आलाच नसता. बादशहाने बहाल केलेले चौथाईचे हक्क मराठ्यास प्रस्थापित करणे भाग पडले. साध्या मागणीने त्याची अंमलबजावणी होईना. त्या त्या प्रांतातील सुभेदार मराठ्यांची ही मागणी धुडकावून देऊ लागले, म्हणून मराठ्यांना ह्या प्रांतावर मुलूखगिरी करून आपले हक्क प्रस्थापित करावे लागले. मुलूखगिरी करत असता संघर्ष निर्माण होणे अपरिहार्य होते. असे संघर्ष निर्माण होऊन लढाया होत व या लढायात शत्रू सैन्याचा धुव्वा उडे. मराठ्यांची सत्ता वाढीस लागे. अशा रीतीने मुलूखगिऱ्या करून माळवा मराठ्यांच्या ताब्यात आला. बादशहानें त्यास मराठ्यांचा मुलूख म्हणून मान्यता दिली (२३ जुलै १७४१). गुजरातवर मुलूखगिरी स्वाऱ्या होतच होत्या, पण तो प्रदेश मराठ्यांच्या अंकित्वाखाली इ. स. १७४७ मध्यें पूर्णपणे आला. मराठी सत्ता तिथे प्रस्थापित झाली ती मुलूखगिरीद्वाराच.

शाहूने १७३८त रघुजी भोसले यास मुलूखगिरीची सनद दिली, तीत सुभा लखनौ, बेदर, मकसुदाबाद, बुंदेलखंड, अलाहाबाद, पाटणा व डाका अशी त्याच्या क्षेत्राची फोड केली.[१] या सनदेनुसार रघुजीनें बंगालावर स्वाऱ्या केल्या त्याही मुलूखगिरीच्या. पुढे ओरिसा नागपूरकर भोसल्यांच्या ताब्यात आला. तो त्याने मीर हबीबला मदत केल्यामुळे. मुलूख खालसा करून मराठी स्वराज्यास जोडण्याच्या दिशेने मराठ्यांनी स्वाऱ्या क्वचित केल्या. पहिल्यांदा बादशहाकडून चौथाई वसूल करण्याची सनद मिळविण्याचा प्रयत्न करावयाचा व सनद मिळाल्यावर आपली घोडी घेऊन वसूलीस जावयाचे असा मराठ्यांचा क्रम होता. हाच क्रम लक्षात घेऊन मराठ्यांनी म्हणजे पेशव्याने बादशहास सांगितले की, बादशहाने आम्हास समस्त हिंदुस्तानची चौथाई द्यावी, आम्ही सर्व देशाच्या संरक्षणाची जबाबदारी घेऊ.[२] बादशहाने यावेळी वरील मागणी मान्य केली नाही. मात्र माळव्याच्या सनदा पेशव्यांस सन १७४१ त मिळाल्या. या वेळेपासून माळव्याच्या दिवाणी फौजदारीसुद्धा संपूर्ण कारभार पेशव्यांचे हवाली झाला. पण सनदा देताना बादशहानें माळव्याचा सुभा आपला मुलगा शहाजादा अहंमद याचे नावे दाखल करून त्याचे दुय्यम म्हणून पेशव्याची नेमणूक केली. याप्रमाणे पेशव्यास माळव्याची नायब सुभेदारी मिळाली. माळव्याची सुभेदारी मराठ्यांच्या पदरात पडल्याबरोबर माळवा-बुंदेलखंड यातील लहान मोठ्या सत्ताधिशांचे पूर्वीचे दिल्लीचे संबंध तुटून त्यांची पुनर्घटना पुण्यास होऊ लागली. त्यांच्या

१. ना. भो. ब. पृ. ५० (बं. आ.) रि. पृ. ६०.

२. मराठी रियासत, बाळाजीराव १, पृ. १८.

शेंड्या पेशव्यांचे हाती पडल्या. खुद्द जयपूरच्या राजपूत राजास मराठ्यांच्या छायेखाली यावे लागले व इतर कमकुवत राजपूत राजांस मराठ्यांच्या कच्छपी जाणे भाग पाडले. मराठेशाहीचा फैलाव करणे हा पेशव्यांचा व मराठे सरदारांचा मुख्य उद्देश होता. शाहू राजानें हा उद्देश मनात ठेवून निरनिराळ्या सरदारांस त्यांच्या पराक्रमास भरपूर वाव सापडावा म्हणून क्षेत्रे वाटून दिली होती. मराठी सत्ता स्थापन करण्याचा उद्देश सफल होण्याकरिता चौथाई लागू करण्याचा उद्योग पेशव्यांनी आरंभिला. लष्करी जोराशिवाय सुखा-सुखीच्या बोलाचालीने मोगल अंमलदार मराठ्यांच्या मागण्या देईनात म्हणून शस्त्र बळाचा उपयोग मराठ्यांस करावा लागला. माळव्याची सुभेदारी मराठ्यांस मिळाल्यावर भेलशाचे मध्यवर्ती ठाणे मोगलांच्या कबजातून काढून आपल्या ताब्यात घेणे ओघानेच आले. सवाई जयसिंग जिवंत असेपर्यंत मराठ्यांच्या आकांक्षांना थोडासा लगाम होता. तो सन १७४३ त मरण पावल्यावर जयपुरच्या गादीसंबंधी जयसिंगाच्या पुत्रात यादवी उत्पन्न होऊन तिचा निरास करण्याचे अवघड काम मराठ्यांना करावे लागले. इ. स. १७४६-४७ त बुंदेलखंडात मराठ्यांची सत्ता मजबूत बनली. माळवा तर त्यांचा होताच, राहता राहिला राजपुताना, तोही कबजात आणण्याची संधी चालून आली. इ. स. १७४७ च्या डिसेंबरात शाहूने पेशव्यास दिल्लीस बादशहाच्या भेटीस जाण्याची आज्ञा केली. पेशवा त्याप्रमाणे उत्तरेत गेला. पेशव्यांच्या या स्वारीस नेवाईची स्वारी असे म्हणतात. एप्रिल १७४८ मध्ये पेशव्याने सवाई जयसिंगाचा एक मुलगा माधोसिंग याची भेट घेतली. हे पाहून त्याचा भाऊ ईश्वरसिंग पेशव्यांशी तडजोड करण्यास कबूल झाला आणि नेवाई वगैरे आपले चार महाल पेशव्यांस देऊन त्याने पेशव्यांची मर्जी राखली. यामुळे राजपुतान्यात मराठ्यांचा शिरकाव झाला. याच वर्षी अहमदशहा अब्दाली हिंदुस्थानात स्वारी करून आला. त्यास परतवून लावण्याकरिता बादशहाने पेशव्यास निमंत्रण पाठविले. पेशवा उत्तरेस निघाला खरा पण तो दिल्लीस उतरून पोहचण्याच्या अगोदर अहमदशहा अब्दाली पराभव पाहून परत अफगाणिस्तानास गेला. पुन्हा १७५१ मध्ये अहमदशहा पंजाबात चालून आल्याचे वर्तमान बादशहाच्या कानी आले. लोकात घबराट झाला. बादशहाने स्वदस्तुरीची राजाची पत्रे वजिरास लिहून कसेही करून मराठ्यांची दांडगी फौज बरोबर घेऊन तुम्ही या असा हुकूम पाठविला. शिंदे, होळकर नुकतेच दक्षिणेत निघाले होते. त्यांना वजीराने कनोज येथे थांबविले व त्यांजबरोबर मराठ्यांनी बादशाहीचे परचक्रापासून बचाव करण्याचे वचन मिळविले व आणा शपथा झाल्या व हा विशिष्ट करार स्वदस्तुरच्या सह्यांनी कनोज येथे २३ एप्रिल १७५२ रोजी पुरा झाला. यालाच अहदनामा असे म्हणतात. या कराराने परचक्रा-पासून वा अंतर्गत शत्रूपासून बादशाहीचे रक्षण करण्याची कामगिरी मराठ्यांवर पडली. अजमीर व आग्रा या प्रांताची सुभेदारी पेशव्यास मिळाली. बादशहाने मराठ्यांस पंजाब, सिंध व अंतर्वेद या प्रांतांचा वसूल देण्याचे कबूल केले. याच वर्षी पंजाबात अब्दाली आला. त्याचे पारिपत्य करण्याकरिता

शिंदे-होळकरांच्या फौजा कराराप्रमाणे वजीराच्या फौजेसुद्धा दिल्लीस आल्या. तोपर्यंत अब्दाली पंजाबातून माघारा गेला होता. तरीपण मराठे दिल्लीत आलेले पाहून बादशहा उभयता सरदारांवर खूष झाला. त्याने बावीस सुभ्यांची चौथाईची सनद मराठ्यास दिली (१ जून १७५२).[१] या सनदेमुळे मराठ्यांच्या ताब्यात सबंध हिंदुस्थान आला. मराठ्यांची जबाबदारी वाढली. बावीस सुभ्यातून हक्काने चौथाई वसुलीकरिता मराठ्यास फिरावे लागले. वर सांगितल्याप्रमाणे नुसते फिरून व मागून चौथाई वसूल मिळण्याचा त्यावेळचा काळ नव्हता. त्याकरिता बळाचा उपयोग करावा लागत असे व त्यामुळे ससैन्य मुलूखगिरी करावी लागे. आता, ही मुलूखगिरी म्हणजे, चौथाई वसूली ह्या २२ सुभ्यात करीत असता त्या ठिकाणचे राजेरजवाडे किंवा जमीनदार जर मराठ्यांना सरळ बोलाने वसूल न देता नाकारू लागले, तर त्याजकडून जबरदस्तीने म्हणजेच लढाई करून चौथाई रक्कम वसूल करावी लागे. मात्र लढाई झालीच तर, पूर्वीची ठरलेली चौथाई खंडणी व लढाईचा खर्च एवढी रक्कम मराठे त्या राजाकडे मागत. हे मोगली शिरस्त्याप्रमाणे चाले. त्यात मराठ्यांनी आपले नवीन असे काहीच सांगितले नाही. एवंच मराठ्यांच्या मुलूखगिरी स्वाऱ्या ह्या प्रायः खंडणी वसूल करण्याकरिता होत्या, पण त्यातूनही एखाद्या राजाबरोबर लढाई झाली व ह्या लढाईचा शेवट ते राज्य मराठ्यांच्या अंकित्वाखाली येऊन झाला तर ते राज्य मराठे खालसा करीत नसत.

इ. स. १७५२ च्या नंतर मराठ्यांनी दक्षिणेत सतत मुलूखगिरी स्वाऱ्या खंडणी वसूल करण्याकरिता केल्या. निजामाशी जी उदगीरची लढाई झाली ती मागील बाकी वसूल करण्यासाठी; उत्तरेत जाटांशी टकरा द्याव्या लागल्या त्याही वसूलीकरीता. "तुमचे वर्चस्व आम्ही मानणार नाही. तर खंडणी कसची ?" अशा प्रकारचे उद्धट उत्तर राजपुतांकडून, जाटांकडून किंवा इतर मुसलमान सुभेदारांकडून आले म्हणजे लढाईस तोंड लागे. या लढाईस स्वारीचे स्वरूप प्राप्त होई. मराठ्यांचा जय होई. मराठ्यांनी सांगितलेली खंडणी त्या पराभूत राजास किंवा सुलतानास द्यावी लागे. त्यातून त्याची सुटका फक्त मागितलेली खंडणी देऊनच होत असे. खंडणी वसूल करण्याच्या निमित्ताने मराठ्यांनी मुलूखगिरी स्वाऱ्या केल्या. मुलूख जिंकण्याच्या हेतूने स्वाऱ्या केल्या नाहीत. पेशवाईचा शेवट होईपर्यंत किंवा मराठेशाहीस उतरती कळा लागेपर्यंत मराठ्यांनी हिंदुस्थानातील राजेरजवाड्यांशी लढाया दिल्या,त्या ते राजेरजवाडे खंडण्या वेळेवर देईनात म्हणून त्यांच्या वसूलीकरिता. त्यांना महसुद तघलखाच्या स्वारीसारख्या स्वाऱ्या असे म्हणता येणार नाही.

मुलूखगिरीशिवाय मराठ्यांनी ज्या स्वाऱ्या केल्या त्या फारच थोड्या आहेत. चिमाजी अप्पाने पोर्तुगिजांवर स्वारी केली. बाजीरावाने महमद बंगशावर स्वारी केली. किंवा रघोजी भोसल्याने कर्नाटकात स्वारी करून डूमास यास नमविले. चंदासाहेबास कैद करून वठणीवर आणले. या स्वाऱ्या होत.

---

१. फाळके—शि. इ. सा. भा. ३, पृ. २०४.

छत्रपति शाहू–पेशवे बाजीराव

## कालसूची

| इ. स. | |
|---|---|
| १७०६ ते १७२२ . . | या कालात गुजरातवरील दहा सुभेदार नेमले गेले. |
| १७०८ . . . . | दाऊदखान आपला हस्तक सादुल्लाखान याजवर कर्नाटकचा कारभार सोपवतो. |
| १७१८-१९ . . . | बादशहास तहावर शिक्कामोर्तब करण्यास बाजीरावाकडून विनंती. |
| १७१८ . . . . | हुसेनअल्लीची बायका-मुले औरंगाबादेस. |
| १७१९ . . . . | बादशाही सनदांनी मराठ्यांस मोगल प्रांतावर चौथाईचे हक्क प्राप्त. |
| १७१९ . . . . | निजाम उल्मुल्क मुबारीझखानाविरुद्ध लढ्यासाठी शाहू महाराजांची मदत मागतो. |
| १७१९, मार्च १५ . . | सय्यदांनी अट मान्य केल्यावर निजाम उल्मुल्क उज्जैनच्या वाटेवर. |
| १७१९ ते २१ . . . | जोधपूरचा राजा महाराज अजितसिंग हा गुजरातचा सुभेदार. |
| १७२०, मे ८ , . . | निजाम नर्मदा नदी ओलांडतो. |
| १७२०, मे २० . . . | अशीरगड किल्ला निजामाच्या ताब्यात. |
| १७२०, मे २३ . . . | बऱ्हाणपूर निजामाच्या ताब्यात. |
| १७२०, जून १९ . . | निजाम व दिलावर अलिखान यांच्या सैन्याची लढाई, दिलावर अलिखान ठार. |
| १७२०, ऑगस्ट . . | बाळापूर येथे निजाम व आलमअल्ली यांची लढाई, त्यात आलमअल्लीचा नाश. |
| १७२०, सप्टेंबर ३ . . | सय्यद हुसेनची निजामावर चाल. |
| १७२०, ऑक्टोबर . | बारामतीवरील मुसलमानी अंमल संपुष्टात. |
| १७२०, ऑक्टोबर ९. . | सय्यद हुसेनच्या खुनानंतर त्याच्या भावाचे दिल्लीस आगमन दुसऱ्या राजपुत्रास गादी. |
| १७२०, नोव्हेंबर १२. . | शाहू महाराजांचा वकील महिपतराव आपल्या दरबारी रहाण्यास निजामाची मान्यता. |
| १७२०, नोव्हेंबर १३. . | सय्यद व अब्दुल्लाखान महमदशहा यांच्या सैन्याची हस्तिनापूर येथे गाठ. |
| १७२१ . . . . . | मराठ्यांची कर्नाटकावर स्वारी. |

| | |
|---|---|
| १७२१, जानेवारी ४ . | निजाम उल्मुल्क व बाजीराव यांची पहिली भेट. |
| १७२१, जानेवारी १४ . | दक्षिणेचा सुभेदार म्हणून निजामाकडून दोन फर्माने. |
| १७२१, फेब्रुवारी . . | निजामाचा चुलत भाऊ अजीनखान याचा मृत्यू. |
| १७२१ . . . . | च्या अखेरीस निजाम उल्मुल्क दिल्लीस. |
| १७२२, जानेवारी १६ . | बादशहाचे निमंत्रणावरून निजाम आग्न्यास. |
| १७२२ . . . . | बाजीराव पेशवे माळवा प्रांत जिंकण्याचे उद्योगास. |
| १७२२, फेब्रुवारी २० . | बादशहाकडून शाही दरबारात निजामास मोठ्या समारंभाने वजिरीची वस्त्रे. |
| १७२२, ऑक्टोबर २ . | दिल्लीतून निसटून निजामाची दक्षिणेकडे चाल. |
| १७२२, ऑक्टोबर ११ . | अब्दुल्लाचा कैदेत विष प्रयोगाने मृत्यू. |
| १७२२, ऑक्टोबर २२ . | बादशहाकडून गुजरात सुभा निजाम उल्मुल्कच्या हवाली. |
| १७२३, फेब्रुवारी . . | वझीर अहमदाबादेस. |
| १७२३, फेब्रुवारी १३ . | बाजीराव व निजाम यांची झाबुवा येथें मुलाखत. |
| १७२३, जुलै ३ . . | निजाम गुजरातच्या स्वारीनंतर दिल्लीत दाखल. |
| १७२३, जुलै . . . | चुलता हमीदखान यास गुजरातचा नायब नेमल्यावर निजामाचे दिल्लीस आगमन. |
| १७२३, डिसेंबर . . | आजारीपणाचे निमित्त करून निजाम दिल्लीहून दक्षिणेतील जहागिरीवर रवाना. |
| १७२४, जून २१ . . | निजाम औरंगाबादेस. |
| १७२४, जून २३ . . | शाहू महाराजांस यापूर्वी न दिलेल्या सनदा बादशहाचा प्रतिनिधी म्हणून निजामाकडून मिळतात. |
| १७२४, सप्टेंबर . . | मराठी सैन्य मुबारीझखानाशी मुकाबला करण्यास निघते |
| १७२४, सप्टेंबर ३ . . | मुबारीझखानावर निजामाची मराठी फौजांच्या मदतीने चाल. |
| १७२४, सप्टेंबर ३० . . | साखरखेडा येथे निजाम व मुबारीझखान यांच्यामधे तुंबळ युद्ध. |
| १७२५, जानेवारी . . | हैद्राबादचा ताबा विजयी निजाम उल्मुककडे. |
| १७२५, जून २० . . | निजाम उल्मुल्कला त्याच्या अपराधाबद्दल बादशहाकडून माफी. |
| १७२५, ऑगस्ट ११ . . | उदाजी व आनंदराव यास त्यांच्या सत्कृत्याबद्दल पोषाख देऊन शाहू महाराजांकडून सत्कार. |
| १७२५, नोव्हेंबर २० . | चित्रदुर्गला जाण्यासाठी बाजीराव पुण्याहून निघतात. |
| १७२५, नोव्हेंबर ते १७२६, मे . . . | मराठ्यांची चित्रदुर्गावरील कर्नाटकातील पहिली स्वारी. |
| १७२५, मार्च १६ . . | बाजीरावाची स्वारी चित्रदुर्गाला. |
| १७२६, नोव्हेंबर ते १७२७, एप्रिल . . | श्रीरंगपट्टणची (कर्नाटकातील) दुसरी स्वारी. |
| १७२७, एप्रिल २३ . . | श्रीरंगपट्टणच्या स्वारीस सुरवात. |
| १७२८ . . . . | धार दादाजी पवारांच्या ताब्यात |



पेशवा पहिला बाजीराव

# ४

# छत्रपति शाहू — पेशवे बाजीराव

बाजीरावांची पेशवेपदी नेमणूक — बाजीरावांचे धोरण — मोगल दरबारी झालेला बदल — निजाम उल्मुल्क व सय्यद बंधू यांचा झगडा — खांडव्याची लढाई — बाळापूरची लढाई — सय्यदांचा नाश — निजामाचे दक्षिणेतील उद्योग — निजाम अल्पकाल दिल्लीचा वजीर — दिल्लींतील राजकारण — रजपुतांचा दृष्टीकोन — बादशहाचे घातकी धोरण आणि त्याचे फळ — बाजीराव व श्रीपतराव प्रतिनिधी यामधील चुरस — शाहू महाराज बाजीरावांस भेटीस बोलावितात — छत्रपतींच्या दरबारात बाजीराव — बाजीरावांच्या हालचाली — निजामाचे दक्षिणेत पुनरागमन — साखरखेड्याची लढाई — वझिरी व गुजरात माळव्याच्या सुभेदारीतून निजामाची मुक्तता — निजामाचे धोरण — कर्नाटक व मराठे — चित्रदुर्गाची स्वारी — श्रीरंगपट्टणची स्वारी.

## बाजीरावांची पेशवेपदी नेमणूक :

पेशवे बाळाजी विश्वनाथ यांच्या मृत्यूनंतर पेशवेपद त्यांच्या मुलास न देता ते अन्य कोणास द्यावे असा विचार शाहू महाराजांच्या मनात आला नसावा. कारण बाळाजीपंतास पेशवेपद प्राप्त झाल्यानंतर त्यांनी अवघ्या सात वर्षात जिवापाड मेहनत करून शाहू महाराजांच्या सत्तेस स्थैर्य प्राप्त करून दिले. दिल्लीहून बादशाही सनदा आणून मराठी सरदारांच्या पराक्रमास सबंध हिंदुस्थानचे क्षेत्र मोकळे केले. अशा ह्या सेवकाची यथार्थ आठवण ठेवणे शाहू महाराजांसारख्या सर्व संग्राही छत्रपतींना शक्य न झाले तरच नवल. शाहू महाराजांनी बाळाजींची सेवा लक्षात घेऊन त्यांचे चिरंजीव बाजीराव यास पेशवाई पद दिले. तरुण बाजीराव वयाच्या २० व्या वर्षी मुख्य प्रधान झाले. बाजीराव वडिलांबरोबर दिल्लीस गेल्यामुळे त्यास मध्यवर्ती मोगल राजकारणाची प्रत्यक्ष माहिती झालेली होती. बाजीराव इतर मंत्र्यांपेक्षा वयाने लहान होते म्हणून त्यांना आपली धोरणे इतर सरदारास न दुखविता शाहू महाराजांच्या मर्जीनुसार पहिल्या काही वर्षात आखावी लागली. बाजीराव हे हाडाचे सैनिक होते. घोड्यावरून लांब लांब भराऱ्या मारणे हा त्यांचा आवडीचा खेळ होता. लढाया करणे हे त्यांचे लक्ष्य होते. ते आपल्या पित्याएवढे शिकलेले नव्हते, हे खरे. पण शेतसारा वसुलीच्या कामातील खाचाखोचांचा नीट अभ्यास त्याजकडून त्यांच्या वडिलांनी करून घेतला होता.[१] त्यावेळच्या कालानुरूप बाजीरावांची पेशवेपद धारण करण्याची तयारी होती हे नाकारता येत नाही. परंतु त्यास शाहू महाराजांच्या दरबारातच विरोध करणारे शत्रू होते. त्यापैकी श्रीपतराव प्रतिनिधी हे बाजीराव साहेबांचे शाहू छत्रपतींच्या दरबारातील प्रतिस्पर्धी आणि शाहू महाराजांचे मित्र होते.[२]

---

१. पेशवे दप्तर, खं. ७, ले. ३६.

२. राजवाडे, खंड २, पृ. ३९.

### बाजीरावांचे धोरण :

बाजीरावांचे धोरण चढाईचे होते असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. मोगल साम्राज्याचा वृक्ष आतून पोखरलेला असल्याने त्यावर जोराचे प्रहार केल्यास तो कोलमडून पडेल आणि त्या ठिकाणी शिव छत्रपतींचे हिंदवी साम्राज्य स्थापण्याचे स्वप्न साकार करावयास मिळेल ही आपली मनिषा पूर्ण करण्याकरिता बाजीरावांनी आपल्या जिवाचे रान केले. जुने सरदार आपल्या धोरणाप्रमाणे वागत नाहीत त्याबद्दल खंत करीत न रहाता बाजीरावांनी आपल्या ध्येयास आणि धोरणास उचलून धरणारे जिवाभावाचे सरदार पुढे आणिले. त्यांच्यामध्ये नवीन प्रेरणा निर्माण केल्या. त्यांच्या सहाय्याने नवीन प्रदेश जिंकले. इतके दिवस महाराष्ट्राचे राजकारण महाराष्ट्रातील सरदार आपापसात लढाया देऊन महाराष्ट्राच्या दऱ्याखोऱ्यात खेळत होते. महाराष्ट्राची ही वाया जात असलेली शक्ति मराठी साम्राज्य वाढविण्याकडे बाजीरावांनी वळविली. आपापसात लढत असलेले सरदार नर्मदा उतरून माळव्याच्या पठारावर मोगलाशी मुकाबला करू लागले. ज्यांच्यावर हल्ला करावा ते मोगल सुभेदार मराठ्यांच्या या शक्तीपुढे चीत पावले. हे पाहून राजपुतान्यातील राजेरजवाड्यांनी बाजीरावाशी मैत्री संपादिली. एवंच बाजीरावाच्या धोरणाचे सूत्र हे होते की, मोगलांच्या खिळखिळ्या सत्तेवर प्रहार करून तिथे हिंदवी सत्ता प्रस्थापित करणे आणि त्याकरिता राजपुतांची मैत्री संपादणे.

### मोगल दरबारी झालेला बदल :

मराठ्यांनी ज्यांना दिल्लीच्या कारभारात मदत केली व ज्यांच्या सहाय्याने दिल्ली बादशहाकडून स्वराज्य सनदा मिळविल्या त्या सय्यद बंधूंचा कारभार मोगल सरदार व बादशहा यास जाचक होऊ लागला. सय्यद बंधू फार घमेंडखोर झाले. हुसेन अली उघडपणे बोलू लागला की, मी ज्यावर जोडा मारीन तो सुद्धा बादशहा होईल. बादशहास सय्यद बंधू डोईजड झाले. सय्यदांच्या हातात सत्ता व बळ होते. परंतु धूर्तता व धोरण यांचा अभाव होता. हुसेन अलीच्या उद्दाम वृत्तीमुळे मोगल दरबारातील अमीर उमराव त्याचा द्वेष करू लागले. विरुद्ध जाण्याचे धैर्य बादशहात नव्हते. ती कामगिरी बादशहाच्या धूर्त आईने केली.[१] तिने निजामास लिहिले की, 'कसेही करून आम्हास या सय्यदांच्या जाचातून सोडवावे' आणि गुप्त रीतीने निजामाने मदत करण्याचे आश्वासन दिले.

### निजाम उल्मुल्क व सय्यद बंधू यांचा झगडा :

निजाम उल्मुल्काची नेमणूक दक्षिणेच्या सुभेदारीवरून मुरादाबादच्या सुभेदारीवर सय्यद बंधूंनी केली. तेव्हापासून तो सय्यद बंधूंचा द्वेष करू लागला

१. इलियट, व्हॉ. ७ (खाफीखान), पृ. ४८८.

होता. पुढ फर्रुकसिअर वादशहाने त्यास सय्यद बंधूंच्या विरुद्ध आपल्यास सहाय्य करण्यास बोलाविले असता तो दिल्लीस गेला. पण धरसोडच्या वृत्तीच्या व कमकुवत मनाच्या वादशहाशी त्याचे न जमून तो सय्यदांच्या बाजूसच राहिला. सय्यद बंधूंनी त्यास पाटण्याच्या सुभेदारीवर नेमले. हेतू हा की, दिल्लीपासून निजामाचे वास्तव्य दूर रहावे. निजाम पाटण्यास जाण्यास निघण्यापूर्वीच फर्रुकसिअर बादशहाचा खून होऊन सय्यदांनी आपल्या पसंतीच्या राजपुत्रास बादशहा केले. यानंतर सय्यदांनी त्यास माळवा प्रांताची सुभेदारी देऊ केली. ती अशा धोरणाने की, माळव्याच्या दोन्ही बाजूस असलेल्या दक्षिण सुभा आणि अकबराबाद यावर आपल्या पक्षाचे सुभेदार असल्यामुळे त्यास सय्यदांविरुद्ध काहीच कारस्थान करता येऊ नये. माळ-व्याची सुभेदारी त्याने एका अटीवर कबूल केली. त्याने सांगितले की, माझी तुम्ही वारंवार बदली करणार नसाल तर ती माळव्याची सुभेदारी पत्करीन. सय्यदांनी त्याची अट मान्य केल्यावर निजाम उल्मुल्क उज्जैनला जाण्यासाठी दिनांक १५ मार्च १७१९ ला निघाला. इतक्यात सय्यदांचा विचार बदलला आणि निजामास परत फिरण्याचा हुकूम झाला. निजामास सांगण्यात आले की, माळव्याची सुभेदारी हुसेन अलीखान यास पाहिजे तेव्हा तुला अकबराबाद, अलाहाबाद, मुलतान किंवा बऱ्हाणपूर या चार प्रांतापैकी कोणत्याही प्रांताची सुभेदारी माग. निजामास सय्यद बंधूंच्या आपल्या विषयीच्या कपटीपणाचा संशय आला आणि तो वेळीच सावध झाला. पण ज्यावेळी त्यास कळले की, अकबराबादच्या सुभेदारीचे बादशाही फर्मान आपलेकडे रवाना झाले आहे तेव्हा त्याने आपल्या सैन्यास "आगे कूच" करण्याचा हुकूम सोडला. आपण सिरोंजकडे जात आहोत अशी आवई उठवून त्याने आपल्या सैन्यासह तारीख ८ मे १७२० रोजी अकबरपुरच्या उतारावर नर्मदा नदी ओलांडिली. नर्मदा उतरल्यावर त्यान दक्षिणेच्या प्रवेशाचे दार जो अशिरगड किल्ला तोच त्याच्या किल्लेदारास वश करून आपल्या ताब्यात घेतला (२० मे १७२०). त्यानंतर बरोबर तीन दिवसांनी बऱ्हाणपूर त्याच्या ताब्यात आले[१] (२३ मे १७२०).

**खांडव्याची लढाई :**

यावेळी दक्षिणेत आलम अलीखान हा सय्यद हुसेनचा पुतण्या सुभेदारी हुद्यावर होता व त्याचा नायब दिलावर अली होता. या दोघास निजामाचा पाडाव करण्यासाठी सय्यद बंधूंकडून आज्ञा रवाना झाल्या. दिलावरखानाने मराठी सैन्य गोळा करून बऱ्हाणपूरमार्गे निजामावर चाल केली. आलम अल्लीखानाने औरंगाबादेहून कूच केले व निजामावर येण्यास तो निघाला. या दोघांशी एकाच वेळी गाठ पडली तर ते आपणास जड जाईल हे जाणून निजामाने या दोघासही निरनिराळे गाठून झोडपण्याचा विचार केला. निजामाला या त्याच्या उद्योगात बऱ्हाणपूरचा सुभेदार अन्वरखान, रंभाजी

१. Scotts' Deccan, Pt. IV, p. 173; Sinha, Rise of the Peshwas, p. 86.

निंबाळकर आणि असेच जवळपासच्या अनेक जमीनदार लोकांचे सहाय्य मिळाले.[१] जूनच्या सुरवातीस आपला तळ सोडून निजाम खांडवा व हुसेनपूर यामधील पांढरा गावी दिलावर अलीखानाचा तळ होता त्यावर चालून आला. येथे दोन्ही सैन्याची लढाई होऊन तारीख १९ जूनला दिलावर अलीखान लढाईत मारला गेला. बऱ्हाणपुरावर चालून येत असलेल्या आलम अलीस ही बातमी कळताच तो जागच्या जागी थबकला. पुढे गेला नाही. निजामाच्या या विजयाने सय्यद बंधू गोंधळात पडले. हुसेन अलीनें आपली बायका-मुले सन १७१८ मध्ये औरंगाबादेस ठेविली होती. त्यांच्या सुरक्षिततेबद्दलची काळजी तो करू लागला. आपल्या बायका-मुलांचे प्राण वाचविण्यासाठी त्याने निजामास चुचकारण्यास सुरवात केली. या त्याच्या विजयाबद्दल आनंद व्यक्त करण्यासाठी त्यास लिहिले. दिलावर अलीखानाने स्वतःच्या हुशारीने बादशहाच्या हुकुमाविरुद्ध आपल्यावर चढाई केली त्याचे फळ त्याला मिळाले. तुम्ही विजयी झालात याबद्दल आनंद आहे. या तुमच्या कृत्याबद्दल तुमची दक्षिणचे सुभेदार म्हणून नेमणूक केली आहे. तुम्ही आमच्या बायका-मुलांचे व आलम अलीचे संरक्षण करावे.[२]

## बाळापूरची लढाई (तारीख १० ऑगस्ट १७२०) :

आलम अलीनें लढाईची तयारी मोठ्या जोरात केली. स्वतः-जवळील सैन्यास शस्त्रास्त्रे दिली. शिवाय मराठी सैन्यही मदतीस मागविले. वाटेल तसा पैसा खर्च करून सैन्य जमविले. शाहू महाराजांच्या आज्ञेवरून मराठे सरदार संताजी शिंदे, खंडेराव दाभाडे, शंकराजी मल्हार, कान्होजी भोसले ही मंडळी आलम अलीस जाऊन मिळाली. खानदेशात त्यावेळी बाजीरावसाहेब सैन्यासह होते तेही शाहू महाराजांच्या आज्ञेवरून आलम अलीच्या सहाय्यास गेले.[३] आलम अलीकडे यावेळी ७,००० सैन्य होते. पण विस्ताराएवढाच गबाळेपणाही त्या सैन्यात होता.[४] निजामाने आपल्या नेहमीच्या धूर्त स्वभावास अनुसरून आलम अलीच्या सैन्यात फूट पाडण्याचे योजिले. इतक्यात त्याची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक झाल्याचे बादशाही फर्मान त्याचे हाती मिळाले. त्याची एक प्रत त्याने आलम अलीकडे पाठवून त्यास सांगितले की, "मी कायदेशीर सुभेदार झालो. तू आता कारभार सोडून तो आमचे हवाली कर, म्हणजे तुम्हास व सय्यदांचे बायका-मुलास सुखरूपपणे दिल्लीस जाऊ देतो". ही बातमी आलम सरदारास कळताच फौजेत गोंधळ उडाला. आपली चामडी व वतने राखण्याकरिता बहुतेक सरदार आलम अलीस सोडून दक्षिणेचा नवा सुभेदार जो निजाम त्याजकडे गेले. निजामाने बादशहास व सय्यदास स्नेहभावाची

१. इलियट, व्हॉ. ७ (खाफीखान), पृ. ४९२.
२. Irvine, Later Mughals, Vol. II, p. 36.
३. राजवाडे, खं. २, पृ. ४४.
४. Irvine, Vol. II, p. 45.

लांबलचक पत्रे लिहिली. बादशहास लिहिले की, आपल्या हुकुमाप्रमाणे दक्षिणची सुभेदारी करतो. मराठ्यांचा बंदोबस्त करतो, एवढे काम झाले म्हणजे मक्केसच निघून जातो आणि हुसेन अलीस लिहिलेल्या पत्रात "तुमच्या बायका-मुलांची मला अत्यंत काळजी आहे. मी औरंगाबादेस पोचताच त्यास लवकरच बंदोबस्ताने तुमच्याकडे रवाना करतो" असे गोडी गुलाबीने व नरमाईचे धोरण ठेवून लिहिले. ह्या मुत्सद्दी धोरणाचा उपयोग निजामास झाला.

निजामास दक्षिणची सुभेदारी मिळाल्याचे कळताच आलम अलीकडील नामांकित सरदार त्यास सोडून गेले व निजामास मिळाले हे वर सांगितले आहे.[१] त्यामुळे हा तरुण उमदा शूर वीर डगमगला नाही. त्याने आपल्यापाशी असलेल्या सैन्यानिशी निजामावर बाळापूर येथे हल्ला चढविला. १० ऑगस्ट सन १७२० रोजी मोठी लढाई होऊन त्यात आलम अलीचे बरेच सरदार पडले. खुद्द आलम अली मारला गेला.[२] तेव्हा त्याजकडील पुष्कळसे सरदार सैन्यासह निजामास जाऊन मिळाले. आलम अलीचे सर्व सामान निजामास सापडले. निजाम विजयी झाला.

**सय्यदांचा नाश :**

यावेळी सय्यद बंधू आग्र्यास होते. सय्यद हुसेनला आपला दत्तक मुलगा आलम अली लढाईत पडल्याचे ऐकून फारच दुःख झाले. त्याने आपला भाऊ अब्दुल्लाखान याजबरोबर वाटाघाटी करून स्वतः बादशहास बरोबर घेऊन निजामावर चालून जाण्याचे ठरविले व त्या मुदतीत भाऊ अब्दुल्लाखान याने दिल्लीत राहून कारभार करावा असे ठरले. सय्यद हुसेनने आग्र्याहून अजमीरच्या मार्गाने दक्षिणेत जाण्यासाठी बादशहासह ३ सप्टेंबरला कूच केले. सैन्याचा पहिला मुक्काम ११ सप्टेंबरला झाला.[३]

याच प्रवासात बादशहाबरोबर जे प्रमुख तीन सरदार होते त्यांनी हुसेन अलीखानाचा नाश करण्याचा कट रचिला. कटाचा सूत्रधार निजाम उल्मुल्कचा चुलत चुलता महमद अमीनखान होता. त्याने अशा रीतीने कट रचिला की, हुसेन अलीला त्याबद्दल बिलकूल सुगावा लागू दिला नाही. इतकेच नव्हे तर कटाची अंमलबजावणी होत असताही हुसेन अलीस संशय आला नाही. सय्यदांपैकीच एक मीर हैदरबेग नावाचा इसम मारेकरी म्हणून तयार केला. ८ ऑक्टोबर १७२० रोजी जेव्हा बादशहाचे तंबू 'तोडाभीम' मार्गावर डेरे दाखल झाले तेव्हाच ह्या कटाची पूर्ती करण्याचे ठरले. एके दिवशी सकाळी हुसेन अली बादशहासोबत त्याच्या डेऱ्यापर्यंत जाऊन त्यास

१. Irvine, Vol. II, pp. 57-58,

२. *Ibid.*

३. सुरत फॅक्टरीची हकीगत २८ जुलैच्या बातमीपत्रात नमूद केलेली आहे. अर्थात ही लढाई ता. २८ जुलैच्या अगोदर व्हावयास हवी.

पोचवून परत येत होता. वाटेत त्यास सय्यद हैदरबेगने आपल्याकडील एक विनंती अर्ज सादर केला. हुसेन अलीने तो अर्ज घेऊन वाचण्यास सुरवात केली. हुसेन अली वाचनात दंग आहे असे पाहून हैदरबेगने आपली कटयार त्याच्या कुशीत खुपसली आणि त्यासरशी तो कळवळला, बादशहास ठार करा असे ओरडला. पण कटयारीच्या त्या घावाने त्याचा शेवट केला.[१] त्याचे डोके धडापासून वेगळे करून ते सबंध छावणीत फिरविण्यात आले आणि त्याकडील संपत्तीही बुणग्यांकडून लुटविली. याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. सय्यदाकडील अति बलवान सय्यदाचा खून झाल्यावर सय्यद अब्दुल्ला फिका पडला. शक्तीहीन झाला. त्याने आपल्या भावाचा घात झालेला ऐकून ९ ऑक्टोबरला दिल्लीस येऊन दुसऱ्या राजपुत्रास बादशहा केले आणि वाटेल तसा पैसा खर्च करून नवीन सैन्य उभारले. सैन्यात अननुभवी लोकांचा भरणा फार झाला. सैन्य बरोबर घेऊन अब्दुल्लाखान महमदशहास मारण्याकरिता चाल करून निघाला. तारीख १३ नोव्हेंबर १७२० रोजी दोन्ही सैन्याची गाठ हसनपूरला पडून लढाई झाली त्यात अब्दुल्लाचा पराभव होऊन तो व त्याजबरोबरचा बादशहा यांना कैद व्हावे लागले. अब्दुल्ला दोन वर्षे कैदेत होता. शेवटी १ ऑक्टोबर १७२२ रोजी त्याचा खून झाला.

सय्यदांचा दहा वर्षांचा कारभार मराठ्यास सर्वथा अनुकूल होता. ते शिया पंथी होते. हिंदूंशी त्यांचा प्रेमभाव पुष्कळ होता. राजपूत व मराठे त्यांना सर्वथा अनुकूल होते. सुनी पंथाचा कडवा धर्म द्वेष त्यांचे ठिकाणी नव्हता. निजामाच्या कावेबाज स्वभावापुढे ते हार गेले.

### निजामाचे दक्षिणेतील उद्योग :

खांडवा व बाळापूरच्या लढायांच्या अनुकूल निकालामुळे निजामास दक्षिण मोकळी झाली. दक्षिणच्या सुभ्यावरील सुभेदारीचे फर्मान त्यास मिळाले, तरी पण सय्यद हुसेन आपल्यावर चालून येत आहे ह्या बातमीनें त्यास चिंतेत टाकले. सय्यदाशी लढाई करावी लागणार तेव्हा आपणास मदत हवीच. त्याकरिता त्याने कोल्हापूरचा संभाजी, चंद्रसेन जाधव व इतर मराठे सरदार यांच्याशी दोस्ती करण्यास सुरुवात केली. याच वेळी आनंदराव सुमन्त यांचा मुलगा महिपतराव ह्यानी निजामापाशी तगादा लावला की, निजामाने आपणास औरंगाबादनजिकच्या प्रांतातून चौथाई वसूल करण्यास अनुमति द्यावी. निजामाला धड होय म्हणता येईना आणि मनात असूनही नाही म्हणता येईना. तो वेळ मारून नेऊ लागला. पण शेवटी जेव्हा सय्यद बंधूंचा नाश ऑक्टोबर-नोव्हेंबरमध्ये झाल्याचे त्यास कळले तेव्हा त्याने मराठ्यांविषयीचे आपले धोरण बदलले. त्याने महिपतरावांना चौथाई वसुलीकरिता मुलुखात कमाविसदार नेमण्यास नकार दिला. पण बाजीरावांनी

१. Scott's Deccan, Pt-IV, p. 176.

निजामाचे हे धोरण अगोदरच हेरले असावे, कारण आलम अली मेल्यावर बाजीरावानी बादशहास पत्र पाठवून त्याचे अभिनदन केले आणि आपल्या वकिलास सांगून बादशहाकडून १७१८-१९ च्या तहावर शिक्कामोर्तब करण्यास विनविले. बाजीरावांच्या विनंतीचा बादशहाने ताबडतोब स्वीकार केला आणि तहावर शिक्कामोर्तब केले. तहाचे फर्मान मराठ्यास मिळाल्यावर बाजीरावांनी सरलष्कर यास गंगथडीस जाऊन सैन्याची जमवाजमव करण्यास सांगितले आणि तलवारीच्या बळावर चौथाई वसूल करण्यास फर्माविले. निजामास हे कळताच त्याने वस्तुस्थितीची जाणीव ठेवून शाहू महाराजांचे वकील महिपतराव यास परवानगी देऊन त्यासंबंधीचे फर्मान तारीख २२ नोव्हेंबर १७२० ला काढिले.[१] जरी मराठ्यांची कुरापत काढण्यास निजाम घाबरत होता तरी तो मनातून शाहू महाराजांचा व सर्व मराठ्यांचा द्वेषच करीत असे. आतासुद्धा त्याने पहिल्यासारखीच मराठ्यांमध्ये दुफळी माजविण्याचा प्रयत्न केला. १७१८-१९ च्या तहाप्रमाणे पुणे व बारामती मराठ्यांच्या ताब्यांत यायला हवी होती. त्यापैकी पुणे ताब्यात आले होतेच पण बारामतीवर मोगली अंमल होता. बाजीरावांनी तो ऑक्टोबर १७२० मध्ये उडवून दिला. त्यांत यशवंतराव दाभाडे कामास आले.[२] पण बारामती मराठ्यांनी जिंकली.[३] त्यावरून राग येऊन निजामाने मुहकमसिंग व चंद्रसेन जाधव यांना मराठ्यांचा मुलूख काबीज करण्यास पाठविले. बाजीरावांनी वेळीच सावधगिरी राखून सरलष्कर यास निजामाच्या सरदारांचा समाचार घेण्यास गंगथडीस पाठविले होते. त्याने या सरदारास पिटाळून लाविले. त्या वा योग्य तो परिणाम निजाम उल्मुल्कावर होऊन त्याची व बाजीरावसाहेबांची पहिली भेट तारीख ४ जानेवारी १७२१ रोजी चिखलठाण येथे झाली.[४] भेटीचा विषय अर्थात शाहू महाराजास चौथाई व सरदेशमुखीची सहा सुभ्यांची जी सनद बादशहाकडून मिळाली त्याचा अंमल कसा करावयाचा हा असावा. ही भेट झाल्यानंतर कालांतराने निजामाने तारीख १४ जानेवारी १७२१ रोजी दक्षिणचा सुभेदार या हुद्द्यावरून दोन फर्माने काढिली. एकाने बिदर प्रांतातून चौथाई वसूल करण्यास शाहू महाराजास मुभा देऊन दुसऱ्या फर्मानाने शाहू महाराजांचा सरदेशमुखीचा सहा सुभ्यातील वसुली करण्याचा हक्क मान्य करण्यात आला.[५] निजामाला लवकरच बादशाही फर्मानानुसार उत्तरेस जावे लागले.[६] अशा रीतीने निजामाचा मराठ्यांचा पराभव करण्याचा हेतू सिद्धीस गेला नाही. त्याचे उत्तरेस प्रयाण झाल्यापासून तो दक्षिणेत परत येण्याच्या कालावधीत मराठ्यांना आपल्या उद्योगास निराळी कलाटणी देता आली. बाजीरावसाहेब यांनी

१. Proceeding of I. H. R. C. Vol. XVII, p. 211.
२. पे. द. ३०, ले. २६.
३. राजवाडे, खं. २, पृ. ४४.
४. पे. द. ३०, पृ. २६६.
५. इं. हि. रे. क. व्हॉ. १७, पृ. २१२–१३.
६. पे. द. ३०, ले. २९, राजवाडे खं. २, प्रस्तावना पृ. १४.

याचवेळी मराठी सत्ता वाढविण्याचा विचार केला. या विचारास चालना देणे निजामाच्या दक्षिणेतील अनुपस्थितीमुळे सुलभ झाले.

**अल्पकाल निजाम दिल्लीचा वजीर :**

सय्यदाचे पश्चात वजिरीवर असलेला निजामाचा चुलत भाऊ अमीनखान हा १७२१ च्या फेब्रुवारीत मरण पावला. त्यानंतर वजीर कोणास नेमावे याचा विचार बादशहाने अनेक सरदारांच्या मसलतीने केला. सर्वांचे मत निजामास दक्षिणेतून बोलावून आणून वजिरी द्यावी असे पडले. म्हणून बादशहाने निजामास उत्तरेत ताबडतोब निघून येण्यास फर्मान पाठविले. ते भिळताच निजामाने मुबारीजखानास आपला दुय्यम नेमून त्याने तारीख २१ ऑक्टोबर १७२१ रोजी औरंगाबादेहून उत्तरेकडे प्रयाण केले. त्याजबरोबर शाहू महाराजातर्फे आनंदराव सुमंत हे दिल्लीस गेले[१]. हाच मुबारीजखान मराठ्यांचा दीर्घ द्वेष्टा होता. त्यास बाजीरावांनी कसे वठणीस आणले हा भाग पुढे येईल. निजाम दिल्लीस तारीख १८ जानेवारी १७२२ ला पोचला. तारीख १३ फेब्रुवारीला बादशहाने शाही दरबार भरवून त्यास मोठ्या समारंभाने वजिरीची वस्त्रे दिली.[१] यानंतर सुमारे दहा महिने निजामाचा मुक्काम राजधानीत झाला. पण त्या अवधीत अनेक कारणांनी धनी व सेवक यांचा जम बसला नाही. वीस वर्षांचा बहादूरशहा नेहमी लाळघोटयांचे ऐके आणि वजिराचा दर वेळी त्यामुळे अपमान होई.[१] निजामाच्या स्वभावावर व वर्तनावर भर दरबारात टीका होऊ लागली. पुढे पुढे बादशहा व वजीर एकमेकास पाण्यात पाहू लागले. तेव्हा सय्यद बंधूंचा शेवट ज्या रीतीने झाला तशी आपली स्थिती होऊ नये असा पोक्त विचार निजामाने करून तारीख २ ऑक्टोबर १७२२ रोजी दिल्लीतून पाय काढून माळव्याची वाट धरली. गुजरात प्रांताचा सुभा हैदर कुलीखान यास काढवून तो सुभा आपल्या नावाने करून घेऊन त्यावर आपला अंमल बसविण्याचा त्याचा मुख्य हेतू होता. त्याने बादशहास कळविले की, मराठे प्रबळ झाले. त्यांनी माळव्यात टाकलेल्या पायास जर आताच प्रतिबंध केला नाही तर ते बादशाही खावून बसतील. त्यासाठी सर्व दक्षिणची मुखत्यारी बादशहाने आपल्याकडे द्यावी. त्याशिवाय माळवा व गुजरात हे प्रांतही मजकडे द्याच म्हणजे मी मराठ्यांचा बंदोबस्त करतो. बादशहास निजाम वजीर म्हणून नको होता म्हणून त्याने त्यास दक्षिण माळवा व गुजरात प्रांताची मुखत्यारी दिली. निजाम दक्षिणेत येण्यास निघाला तो माळव्यात जानेवारी १७२३ मध्ये सारंगपूर येथे आला. निजाम आपल्यावर चालून येत आहे असे पाहून हैदर कुलीखान वेडाचे सोंग घेऊन गुजरातमधून पळून दिल्लीस गेला. म्हणून गुजरात निजामाचे ताब्यात आला. तेथील कारभारावर त्याने आपल्यातर्फे आपला मामा हमीदखान यास नेमिले. गुजरातेत झालोद-पर्यंत जाऊन तो पुन्हा माळव्यात आला आणि दोन महिने तिथे मुक्काम

---

१. इलियट, व्हॉ. ७ (खाफीखान), पृ. ५१८.

करून माळव्याच्या सुभेदारीवर त्याने आपल्यातर्फे अझीमुल्लाखान यास नेमिले. तेथील सर्व व्यवस्था लावून निजाम १७२३ च्या जुलै महात दिल्लीस जाऊन पोहोचला.

## दिल्लीतील राजकारण (१७१९—२४) :

इ. स. १७१९ ते २४ हा काल दिल्ली दरबारच्या राजकारणात अत्यंत महत्त्वाचा होय. या कालात दिल्ली दरबारात अनेक उलाढाल्या झाल्या. एका वर्षाच्या अवधीत चार बादशहा गादीवर बसवले गेले. दोन सय्यद बंधू वैभवाच्या शिखरावर विराजमान होऊन शेवटी समूळ नाश पावले. निजाम उल्मुल्कने पुढील धोरण ठेवून चंबळ व कावेरीमधील प्रदेश आपल्याकरिता मिळविला. राजपूत राजे यावेळी डोके वर करू लागले व प्रबळ होण्याच्या मार्गास लागले. जाट व रोहिले यांनी आपणाकरिता स्वतंत्र राज्ये निर्मिली आणि ह्या अव्यवस्थेचा फायदा घेऊन मोगल मुलखाचे लचके तोडण्याचे काम मराठे मोठ्या सुसंगत रीतीने करू लागले. आपल्या नेमणुकीनंतर निजाम उल्मुल्क बादशहास निर्माल्यवत बनवण्याच्या मार्गास लागला असता ते बादशहास खपले नाही व म्हणून निजामाचे व बादशहाचे वाकडे आले. बादशाहीची काळजी घेण्यास कोणीच जबरदस्त पुढे येईना म्हणून बादशाहीची अवस्था फारच वाईट झाली.

## राजपुतांचा दृष्टीकोन :

दिल्लीतील गोंधळलेल्या परिस्थितीचा फायदा पहिल्या प्रथम राजपुतांनी घेतला. जोधपूर व जयपूरचे राजे दिल्लीच्या राजकारणात सक्रीय भाग घेत असत. त्यांचा कल संधीचा फायदा घेऊन स्वतःच्या राज्याच्या सीमा वाढविण्याकडे असे. हा वेळपर्यंत या दोन्ही राजांनी दिल्ली दरबारातील उलाढालीचा फायदा घेऊन आपआपल्या राज्याच्या सीमा वाढविल्या होत्या. जोधपूरचे राजे अजितसिंग यांनी गुजरात व अजमीर हे दोन सुभेही आपल्या वर्चस्वाखाली आणले. जयपूरचे राजे जयसिंग हे फर्रुखसेयर बादशहास काढून लावण्याच्या अगदी विरुद्ध होते. महमदशहास हे ठाऊक असल्यामुळे त्याने आपण बादशहा झाल्यावर जयसिंगासारख्या मातबर उमरावास आपल्या बाजूचा करून घेण्याकरिता भली मोठी रक्कम व सुरत सरकार ही बक्षिसी दिली. सय्यदांचा नाश झाल्यानंतर त्यास आग्र्याचा सुभेदार नेमिले. एवंच ह्यावेळी दिल्लीपासून ६० मैलांच्या अंतरावर असलेल्या आग्र्यापासून तो पश्चिम किनाऱ्यावरील सुरत बंदरापर्यंतचा मुलुख ह्या दोन रजपूत राजांच्या ताब्यात होता; आणि हे दोन्ही राजे मराठ्यांनी मोगली सुभ्यावर केलेल्या आक्रमणास आपली मूक संमती दर्शवीत होते. जोधपूरचे राजे महाराजा अजितसिंग हे सन १७१९ ते १७२१ या काळात गुजरातचे सुभेदार होते. पेशवे बाळाजी विश्वनाथ यांनी चौथाई सरदेशमुखीच्या सनदा दिल्लीहून आणिल्यावर खंडेराव दाभाडे यांना गुजरातच्या चौथाई वसुलाचे काम देण्यात आले

खंडेरावांचे हस्तक पिलाजी गायकवाड यांनी अजितसिंगाच्या पहिल्या वर्षीच्या कारकीर्दीत गुजरातवर एवढ्या स्वाऱ्या करून खंडण्या वसूल केल्या की, त्यामुळे गुजरातेतील मुसलमानी सत्ताच खिळखिळी झाली, मृत्यूपंथास लागली. राजे अजितसिंग हे मुसलमानी सत्तेचे पूर्ण द्वेष्टे होते. त्यांनी मराठ्यांच्या चढाईच्या धोरणास अंतस्थ सहानुभूति दाखवून मराठे गुजरातचे लचके तोडीत असता मारवाडला लागून असलेला गुजरातचा प्रदेश आपल्या सत्तेखाली आणिला.[1] गुजरातमध्ये या वेळी अंदाधुंदी चालू होती. शिया-सुनी व हिंदु-मुसलमान यांचे दंगे चालू होते.[2] मराठ्यांचे सतत हल्ले आणि राजपुतांची त्यांस आतून फूस यासंबंधीचा फायदा घेऊन गुजरातची झालोरी व बाबी घराणी स्वतंत्र झाली. गुजरातची अशी अनुकंपनीय स्थिती असता अजितसिंगास गुजरातवरून काढून त्या जागी दिल्लीच्या बादशहाने हैदरकुली म्हणून सुभेदार पाठविला.

**बादशहाचे घातकी धोरण आणि त्याचे फळ :**

राजपुतांचे पाठीराखे सय्यद बंधू यांचा नाश झाल्यावर वरील बदल घडून आला. नवीन धोरण बादशहाच्या घाताचे ठरले. अजितसिंगास त्याच्या मनाविरुद्ध गुजरातहून बदलल्यामुळे हा मोलाचा हिरा बादशहावर रुष्ट झाला. हैदरकुलीखान तरी बादशहाचा निस्सीम सेवक होता असेही नाही. तो वजीर निजाम उल्मुल्क याचा पक्का द्वेष्टा होता. गुजरातच्या सुभेदार पदी आपली नेमणूक झाल्यावर त्याने गुजरातेतील अंदाधुंदीचा फायदा घेऊन गुजरातेतच स्वतंत्र व्हावयाचे ठरविले आणि बादशाही हुकूम धाब्यावर बसविण्याचा उपक्रम सुरू केला.[3] निजाम उल्मुल्काने बादशहास वेळीच सावध करून हैदरकुलीखानाविरुद्ध योग्य तो उपाय करण्यास सुचविले. हैदरकुलीखान हा बादशहाच्या मर्जीतील असल्यामुळे बादशहाने त्याजविरुद्ध कारवाई करण्यास प्रथमत: ढिलाई दाखविली. पण वजिराच्या एकसारख्या टुमण्यामुळे हैदरकुलीखान यास त्याने परत बोलाविले; आणि गुजरात सुभा निजाम उल्मुल्कच्या हवाली केला (२२ ऑक्टोबर १७२२). बंडखोर हैदरकुलीखानास ताळ्यावर आणण्यासाठी वजीर स्वत: त्याजवर चालून गेला. हैदरकुलीखानानेसुद्धा वजिराबरोबर सामना देण्याचे ठरविले. पण या त्याच्या विचारास त्याचे बहुतेक सरदार अनुकूल नव्हते. शिवाय बादशाही फर्मानाने त्याजकडील गुजरात काढून घेतलेला. तेव्हा हैदरकुलीखानाने आपण होऊन नमते घेण्याचे ठरविले. वजीर अहमदाबादला फेब्रुवारी १७२३ च्या अखेरीस आला तेव्हा हैदरकुलीखानाने दिल्लीस पळ काढला. निजामाने गुजरात सरकारकरिता शासकीय व्यवस्था करून आपल्या जागी आपला चुलता हमीदखान यास गुजरातचा नायब सुभा नेमून तो जुलै १७२३ च्या

१. Bombay Gaztteer, History of Gujarat, Vol, I, p. 301.

२. *Ibid*, pp. 295-300.

३. *Ibid.*

सुरवातीस दिल्लीस परत आला. या नवीन उपद्व्यापाचा परिणाम एवढाच झाला की, निजाम उल्मुल्क यास दक्षिण माळवा या दोन्ही सुभ्यांबरोबर गुजरातची सुभेदारी मिळाली. ह्यामुळे चंबळ व कावेरी या दोन्ही नद्यामधील मुलुख निजामाच्या हुकमतीखाली आला. पण गंमत अशी की, या तिन्ही सुभ्यांवर प्रत्यक्ष सुभ्याचा अंमल नसून सुभा दिल्लीस आणि त्याचे हस्तक प्रत्येक सुभ्यावर अंमल करणारे. ह्या परिस्थितीचा फायदा मराठ्यांनी घेतला. याच वेळी मराठे गुजरात व माळव्यावर चढाईचे हल्ले करू लागले. सन १७०६ ते १७२२ च्या कालात गुजरातवर दहा सुभेदार नेमले गेले. प्रत्येक सुभेदारास स्वतःची शाश्वती नसल्यामुळे हवालदील होऊन राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करी. लोकांकडून नजराणे बळेच वसूल गोळा करी. त्यामुळे लोकही मोगलांच्या सत्तेस विटले. त्यांनी मराठ्यांना आपल्यावर राज्य करण्यास वाव दिला. याचा परिणाम असा झाला की, माळवा व बुंदेलखंड येथील प्रमुखांनी मराठ्यांची मदत मागितली आणि मराठी अंमल अशा रीतीने माळवा बुंदेलखंडात सुरू झाला. हे नंतर पाहू.

**बाजीराव व श्रीपतराव प्रतिनिधी यामधील चुरस :**

बाजीरावसाहेबांसारख्या अल्पवयी मुलाची नेमणूक राज्याच्या प्रधानपदी झालेली पुष्कळ नामवंत मराठे सरदारास खपली नाही. त्यापैकी मुख्य श्रीपतराव प्रतिनिधी हे एक होते. बाजीरावसाहेबांचे धोरण चढाईचे होते. तर श्रीपतरावजींचे धोरण नेहमीच सबुरीचे असे. श्रीपतरावजी शाहू महाराजांचे मित्र असल्यामुळे शाहू महाराज त्यांचे ऐकत असत. बाजीराव-साहेबांनी सद्यःपरिस्थितीचा एक अर्थ लावला तर त्याच्या उलट श्रीपतरावजी लावीत असत. दोघांची चुरस शाहू महाराजांच्या दरबारी कशी लागली याला कारणही तसेच झाले. सन १७२१ च्या अखेरीस निजाम उल्मुल्क दिल्लीस गेल्यावर त्याचा हस्तक मुबारीझखान याने जाहीर केले की, सय्यदांनी जो मराठ्यांशी तह केला, त्याच्या अटी मानावयास आपण तयार नाही. बाजीरावसाहेबांच्या कानी ज्यावेळी आनंदराव सुमंतांनी ही हकिगत घातली तेव्हा ते त्वेषाने लाल होऊन मोगलांचा पिच्छा पुरवून आपण या तहाच्या अटी मोगलांकडून शस्त्र बळाने पूर्ण करून घेऊ असे त्यांनी जाहीर केले. बाजीराव साहेबास यावेळची मोगल बादशाहीची स्थिती पूर्णपणे माहीत होती. बादशाहीत काही दम नसून ती बुडू लागली आहे. बादशाहीतील उमराव एक दिलाने न वागता एकमेकांचा द्वेष करून एकमेकास खाली ओढण्यातच त्यांची शक्ति खर्च होत आहे. प्रत्येक मोगली सुभ्यातील शासकीय व्यवस्थेत अंदाधुंदी माजली असून मोगली लष्कर सुव्यवस्था ठेवण्याच्या लायकीचे राहिलेले नाही. उलट मराठ्यांची सत्ता दिवसेंदिवस वाढत असून जर चढाईचे धोरण आतापासून अवलंबिले तर मोगली सत्ता गडगडून त्या जागी मराठ्यांची सत्ता प्रस्थापित होईल. त्याकरिता चढाई व चढाईबरोबर लढाई देणे आवश्यक. नुसते चौथाई सरदेशमुखी हक्क पत्रे पाठवून मागून घेण्यात काहीच अर्थ नाही. बाजीरावसाहेबांसारख्या मानी वीरास बादशहाच्या

प्रतिनिधीकडे सनदांच्या मागण्या मागणेच मानहानीकारक वाटू लागले. कर्नाटक, माळवा, गुजरात या प्रांतात मराठ्यांना हालचाली करण्यास मोगलांनी अडथळा करावा ह्याचाच राग बाजीरावसाहेबांस येत होता. ह्या वरील प्रांतात मराठ्यांनी संचार करणे हा त्यांचा जन्मसिद्ध हक्क होय. तो जे नाकारतील त्यांना तोडणेच क्रमप्राप्त अशी विचारसरणी ह्या उमद्या शूर वीराची होती. आपली ही विचारसरणी प्रत्यक्षात उतरविण्यासाठी त्यांनी मराठे सरदारास माळवा, गुजरात या भागात संचार करून वसूल करण्याचा आदेश दिला. दक्षिणच्या सुभ्याच्या तैनातीस मराठे सरदारांनी जावे, या करारानुसार शाहू महाराजांच्या आज्ञेनुसार निजामाच्या हैदरकुलीखानावरील चढाईस बाजीरावसाहेब गेले होते. याच सुमारास निजामाबरोबर त्यांची मुलाखत तारीख १९ फेब्रुवारी ते ५ मार्च १७२३ पर्यंत गुजरातेत झाबुवा येथे झाली. यावेळी निजाम गुजरातेतील हैदरकुलीखानास दूर करण्यासाठी आला होता.[१] या मुलाखतीत बाजीराव व निजाम उल्मुल्क या दोघांनीही आपल्या मनातील हेतूंची वाच्यता होऊ न दिल्यामुळे मुलाखतीतून निष्पन्न असे काहीच झाले नाही. या मुलाखतीनंतर बाजीराव मलकापूर, सिंदखेड, पैठण, अहमदनगर या मार्गे पुण्यास जुलैच्या तिसऱ्या आठवड्यात सन १७२३ मध्ये पोहचले.[२] बाजीराव साहेबांचे चढाईचे धोरण आणि त्यानुसार त्यांच्या हालचाली श्रीपतराव प्रतिनिधी व त्यांचा पक्ष यास आवडले नाही. त्यांचे म्हणणे असे की, आताच चढाईचे धोरण स्वीकारल्यास नुकत्याच झालेल्या यादवी युद्धातून महाराष्ट्र मोकळा होईल व एकदा हल्ला झाला की लोकांची दैनावस्था होऊन आपण त्यात खाक होऊ. त्यामुळे हे चढाईचे व मोगलांची कुरापत काढण्याचे धोरण त्यांना पसंत नव्हते. शाहू महाराजास या पक्षाची विचारसरणी मान्य होती. शिवाय मोगलांनी आपल्यावर उपकार केले, त्याजवर चढाई करणे त्यांना बिलकूल पसंत नव्हते. प्रतिनिधींचे म्हणणे की, आपले राज्य सुस्थिर झाले, तिजोरीत पैसा साठला म्हणजे चढाईच्या धोरणाचा विचार करणे योग्य. आज आपले राज्य बाल्यावस्थेत असून त्याला चढाईचे धोरण स्वीकारून आत्मनाश ओढून घेणे योग्य नाही. या विचारांशी शाहू महाराजही संमत होते. त्यांना या अननुभवी तरुणाच्या साहसी धोरणानं राज्याचे तारू भलतीकडे जाऊन फुटेल अशी धास्ती वाटू लागली.

### शाहू महाराज बाजीरावांस भेटीस बोलावितात :

शाहू महाराजांनी बाजीरावांस आपल्या भेटीस येण्याकरिता अनेक पत्रे लिहिली. शेवटी पेशवे बाजीराव चटकन् येत नाहीत असे दिसल्यामुळे महाराजांनी त्यास एक खरमरीत पत्र लिहिले. "तुमच्याशी प्रत्यक्ष अनेक गोष्टींबद्दल बोलावयाचे ठरवून तुम्ही आमच्या भेटीस यावे म्हणून अनेक पत्रे लिहिली. तरीपण अद्याप तुमच्याकडून उत्तर नाही, भेटीस येण्याची आज्ञा केली असता

१. राजवाडे, खं. २, पृ. ४८.
२. कित्ता; पे. द. ३०, पृ. २६८.

आळस होऊन दिवस घालविता यास काय म्हणावे? आमचा व तुमचा विचार समजणारा माणूस तुमच्यातर्फेचा आमच्याजवळ ठेवावा म्हणून सांगितले तेव्हा तुम्ही केले नाही. यामुळे कित्येक राज्यकारभारासंबंधीची कार्ये अडून राहिली आहेत. तुम्ही कळकळ धरून राज्यभार-संरक्षणार्थ सावधता करावयाची हे सदैव पत्री किती लिहिणे? यास्तव तुम्ही प्रत्यक्ष येऊन भेटावे. तुमची भेट होऊन प्रत्यक्ष बोलणी झाल्याशिवाय दुसरी कामगिरी देण्याचे स्वामीस होत नाही. तुम्हापासोन सोपविलेला उद्योग घडतच नाही. असे दिसून आले, तर स्वामीस दुसऱ्या कोणास या प्रधान पदी नेमण्याचा विचार करावा लागेल. असा दिवस उगवला तर ते आपणास अवघड वाटेल. मग हे अरिष्ट दूर होण्याकरिता तुम्ही धावाधाव करू लागाल म्हणून मी तुम्हास वारंवार सुचवित आहे की, वडिलांप्रमाणे निष्ठा धरून उद्योग करावा."[1]

**छत्रपतींच्या दरबारात बाजीराव :**

अशा तंबीचे पत्र बाजीरावास मिळताच ते साताऱ्यास आले. तेव्हा महाराजांनी दरबार भरविला. दरबारात श्रीपतराव प्रतिनिधींचे म्हणणे पडले ते असे "आम्ही आपल्या शेजारील सत्ताधिशांशी शांततेचे व सलोख्याचे संबंध राखावे. कारण, महाराष्ट्र अजूनही गेल्या पचवीस तीस वर्षात जी सतत युद्धे आणि धुमाकूळ झाला त्यामुळे अगदी मेटाकुटीस आला आहे. त्याची आर्थिक घडी विस्कटलेली आहे. तेव्हा निजामाशी सख्य राखून शिवाजी महाराजांनी मिळविलेल्या स्वराज्याचा मुलुख जो आपणास मिळाला आहे त्याची व्यवस्था लावून आपण आपल्या सत्तेस स्थैर्य आणू, बळकट होऊ आणि आपली घडी व्यवस्थित बसली म्हणजे मग स्वराज्यानजीकचे प्रदेश आपल्या सत्तेखाली आणावे, जिंजी जिंकावी आणि कर्नाटकात आपला अंमल बसवावा. पुन्हा जिंकलेल्या प्रदेशात आपली सत्ता स्थिरावावी आणि असे केल्यानंतर मग हिंदुस्थान जिंकण्याचा विचार करावा". बाजीरावास ही विचारसरणी पसंत पडली नाही. त्यांनी आपले चढाईचे धोरण जाहीर केले. युद्ध करून मुलुख संपादन करणे हे आपले सूत्र त्यांनी दरबारात सांगितले. "तिजोरीत पैसा नाही. आपली तिजोरी जर भरावयाची असेल तर, सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे, उत्तरेतील सुपीक प्रदेश आपल्या अंमलाखाली आणणे हे होय. थोरल्या शिवाजी महाराजांनी आपल्या जवळच्या तुटपुंज्या साधनसामुग्रीवर हिमालयापर्यंत मराठ्यांचा भगवा झेंडा नाचत नेऊन फडकविण्याचा निश्चय केला. त्याच निश्चयाची पूर्ती करण्यास महाराजांनी मला आज्ञा द्यावी". बाजीरावांचे हे ओजस्वी भाषण ऐकून शाहू महाराज प्रफुल्लित झाले. त्यांनी बाजीरावसाहेबांच्या योजनेस आशीर्वाद दिला.

श्रीपतराव प्रतिनिधींच्या म्हणण्यात अर्थ होता. पण त्यांचे म्हणणे प्रत्यक्षात उतरावयाचे म्हणजे शेजारी जो निजाम त्याजबरोबर युद्ध करावे लागणार, त्याचा नाश करण्यास तो बादशहाचा प्रतिनिधी असल्यामुळे शाहू महाराज

१. पे. द. १७, ले. २.

तयार नव्हते. कर्नाटक मुसलमानी अंमलातून मुक्त करून स्वराज्यात आणावयाचे म्हणजे पुन्हा निजामाबरोबर लढाईचा प्रसंग आलाच. कारण, निजामाचा हेतू कोणत्याही स्थितीत मराठ्यांची सत्ता फोफावू न देता तीस खीळ घालावयाचा हा होता. निजामाबरोबर जर लढाई नको असेल तर तूर्त तरी उत्तर हिंदुस्थानामध्येच मुलुखगिरी करणे हे उत्तम हे शाहू महाराजास पटले.

शिवाय गेली २५ वर्षे ज्यांनी शेती सोडून शिपाईगिरी पेशा पत्करला, मोगलांच्या मुलुखावर ताव मारून जे सरदार झाले त्यांना नवीन कामगिरी देणे शाहू महाराजास भागच होते. या सर्व सरदारास एकत्र आणून "चला आपण राज्यातील अंतर्गत व्यवस्थेत सुसूत्रता आणू, घडी चांगली बसवू" असे सांगितले नसते तर ह्या सर्व सरदारांनी आपआपसात मानाकरिता भांडणे केली असती. जे सरदार स्वातंत्र्य युद्धात एकत्र काम करू शकले नाहीत ते शांततेच्या काळात थोडेच एकजुटीने रहाणार? त्यांना कामात गुंतवून ठेवले तरच राज्याचा निभाव लागेल आणि असलेले राज्य टिकेल याची जाणीव शाहू महाराजांस होऊन महाराजांनी बाजीरावांच्या चढाईच्या धोरणास मान्यता दिली. कारण, बाजीरावांच्या धोरणामुळेच मराठ्यांची तिजोरी भरणार होती, स्वराज्याचे साम्राज्य होणार होते. हिंदवी स्वराज्याचा झेंडा उत्तरेत फडकणार होता. सर्व सरदारांस काम मिळून त्यांच्या कर्तबगारीस वाव मिळणार होता. सर्व हिंदुस्थान एका छत्राखाली येणार होता; आणि हे सर्व बाजीरावांच्या चढाईच्या धोरणामुळे होणार होते. त्यापैकी किती घडले ते पाहू.

**बाजीरावांच्या हालचाली :**

सन १७२२ त बाजीरावांनी माळवा प्रांत जिंकण्याचा उद्योग मल्हारराव होळकरांच्या तर्फे केला होता, हे होळकरांच्या नंदलाल मंडलोईशी झालेल्या पत्रव्यवहारावरून दिसते.[१] बाजीरावांनी ही अपुरी कामगिरी पूर्ण करण्याकरिता उदाजी पवार, मल्हारराव होळकर आणि राणोजी शिंदे या सरदारास सोबत घेतले आणि ते माळव्यात शिरले. माळव्याच्या मोंगल गव्हर्नरचा पराभव केल्यावर माळव्याची राजधानी उज्जैन ह्यावर मराठ्यांनी हल्ला चढविला. मल्हारराव होळकरांनी इंदुरास ठाणे दिले. उदाजी पवारांनी सन १७२४ मध्ये धार येथे आपले ठाणे बसविले. या त्यांच्या कृत्याबद्दल तारीख ११ ऑगस्ट १७२५ रोजी शाहू महाराजांनी उदाजी व आनंदराव पवार यांस पोषाख देऊन त्यांचा सत्कार केला.[२] मराठ्यांनी बुंदेलखंडापर्यंत

१. राजवाडे, खं. ६, ले. ५८४–६२३.

३ डिसेंबर १७२२ रोजी उदाजी पवार यांना बाजीरावांनी गुजरात व माळवा प्रांताच्या एकंदर मोकाशापैकी चौथा हिस्सा सरंजाम करून दिला आणि कळविले की, आमची सर्व इमारत तुम्हावर आहे. येविसी समाधान असो देणे. धा. सं. इ. भा. २, पृ. ११.

२. पे. द. ३, ले. ३५९.

स्वारी करून खंडण्या वसूल केल्या. परत येताना जिंकलेल्या प्रदेशातून वसूल गोळा करण्याकरिता उदाजी पवार यास धार, मल्हारराव यास इंदूर व राणोजी शिंदे यास उज्जैन या जागी आपले हस्तक म्हणून बाजीरावांनी नेमले आणि त्यांजवर जिंकलेल्या प्रदेशांतून खंडणी वसुलीचे काम सोपविले.[१] माळव्यात मराठ्यांचा जम बसविणारे मुख्य सरदार उदाजी पवार होत.[२]

**निजामाचे दक्षिणेतून पुनरागमन :**

मराठ्यांनी बाजीरावांच्या धोरणास अनुसरून जे पराक्रम करण्यास सुरुवात केली त्याची हकीकत न सांगता निजाम उल्मुल्क दिल्लीहून परत कसा आला हे पाहू. निजाम आपल्या गुजरातच्या स्वारीवरून तारीख ३ जुलै १७२३ रोजी दिल्लीत दाखल झाला आणि तत्परतेने दिल्लीच्या राज्यकारभारातील व्यवहार हाताळू लागला. राज्यकारभाराचा उरक दाखवून दिल्ली दरबारात व सामान्य जनात आपला वचक बसविण्याचा त्याचा मानस होता. त्याप्रमाणे त्यास थोडेबहुत यशही आले. त्याने इजारा पद्धति बंद करण्याचा प्रयत्न केला, लाचलुचपत आणि जाहागिर पद्धति यांनाही निर्बंध घातला आणि आर्थिक व्यवस्था नीट लावून दिल्लीच्या तिजोरीत पैसा साठविला.[३] पण त्यास असे आढळून आले की, आपल्या प्रत्येक चांगल्या कृत्यास खीळ घालण्याचे प्रयत्न चालू आहेत. त्यावद्दल त्याने बादशहाशी बोलणी केली. आपण करीत असलेल्या सुधारणा बादशाहीच्या कशा हिताच्या आहेत हे आपल्या परीने बादशहास समजावून देण्याचा प्रयत्न केला. पण जे जे म्हणून चांगले करावयास जावे ते ते बादशहास उलट अर्थाने सांगितले जाते आणि बादशहा वेश्या, फकीर व खुषमस्करे ह्यांचे ऐकून आपल्या योजनांना खो घालतो[४] हे निजामास कळून चुकले. त्यावेळपासून त्याने कारभारातील लक्ष काढून घेतले आणि आजारीपणाचे निमित्त करून तो आपल्या दक्षिणेच्या सुभ्यावर येण्यासाठी दिल्लीहून डिसेंबर १७२३ मध्ये निघाला. निघताना त्याने आपला मुलगा गाजीउद्दीन यास नायब वजीर म्हणून दिल्लीस ठेविले होते. दिल्लीच्या दरबारातील वातावरण आपणास अनुकूल नाही, हे ओळखल्यावर त्याने बादशहास सांगितले की, मराठे प्रबळ होऊन त्यांनी माळवा आणि गुजरात या प्रांती स्वाऱ्या करून धुमाकूळ घातला आहे. त्यांना वेळीच प्रतिबंध केला नाही तर मोगल रियासतीतून दोन्ही सुपीक प्रदेश जातील, तेव्हा त्यांच्या ह्या उद्योगास आळा घालण्याकरितां मला माझ्या सुभ्यात जाण्याची परवानगी द्यावी.[५] बादशहाकडून परवानगी घेऊन निजाम दिल्लीहून निघाला तो भोपाळवरून औरंगाबादेस तारीख २१ जून १७२४ रोजी येऊन पोहचला.

---

१. रा. खं. २, पृ. ४८–४९.
२. इ. सं. पे. द. पृ. १२७.
३. इलियट, व्हॉ. ७, (खाफीखान.), पृ. ५३०–३१.
४. आयर्वीन, लॅटर मुघलस्, भा. २, पृ. १३३.
५. इलियट, व्हॉ. ७, (खाफीखान.), पृ. ५२५.

पण त्याचे पाय औरंगाबादेस लागतात तोच त्यास कळले की, आपला नाश करण्याकरिता बादशहाने आपला जो नायब मुबारिझखान यास दक्षिणची सुभेदारी दिलेली आहे, लागेल तो पैसा व शस्त्रास्त्रे पुरविली आहेत. निजाम भोपाळला आला तेव्हा त्यास कळले की, दिल्लीच्या उमरावांच्या सांगण्यावरून आणि दक्षिणी पठाणांच्या पाठिंब्यावरून मुबारिझखान आपल्यावर चढाई करून येत आहे. निजाम उल्मुल्क यामुळे सावधतेने आणि जलदीने औरंगाबादेस येऊन त्याने त्या शहराचा ताबा कोणाच्याही हरकतीशिवाय मिळविला. आता मुबारिझखानाशी आपली गाठ पडणार तेव्हा त्याच्याशी मुकाबला करण्यासाठी त्याने शाहू महाराजांची मदत मागितली. मुबारिझखान बादशहाचा प्रतिनिधी या नात्याने मराठ्यांना सन १७१९ मध्ये बादशहाने ज्या स्वराज्याच्या सनदा दिल्या होत्या त्या मानीत नव्हता. त्यामुळे तो मराठ्यांचा वैरी बनला. ह्या सनदा निजामाने तारीख २३ जून १७२४ रोजीच्या फर्मानाने मराठ्यांस दिल्या.[१] शाहू महाराजांनी निजामाच्या विनंतीनुसार बाजीरावास त्याच्या मदतीस पाठविले. मोगल मराठ्यांचे सैन्य सप्टेंबर १७२४ च्या पहिल्या आठवड्यात मुबारिझखानाशी मुकाबला करण्यास निघाले.

### साखरखेड्याची लढाई (११ ऑक्टोबर १७२४) :

निजामाने मुबारिझखानास लिहिले की, आपण दोघेही बादशहाचे सेवक, आपसात लढणे चांगले नाही. माझी नेमणूक दुसरीकडे कोठे झाल्यावर मी दक्षिण सोडून जाईन.[२] खानाने हे बोलणे जुमानले नाही. लढाईनेच सोक्ष-मोक्ष करून घ्यावयाचे त्याने ठरविले. कदाचित दिल्लीची कुमक खानास मिळेल म्हणून त्यास अगोदर गाठण्यासाठी निजामाने आपल्याकडील बाजीराव व मराठी फौज घेऊन तारीख ३ सप्टेंबर रोजी औरंगाबादेहून दौड केली. बाजीरावांनी आपली माणसे मुबारिझखानाच्या हालचाली कळविण्यास पाठविली होती.[३] दोन्ही सैन्याची गाठ साखरखेड या गावी पडली. तारीख १ ऑक्टोबर रोजी तुंबळ युद्ध झाले. मुबारिझखानाने लढण्याची पराकाष्ठा केली पण तो व त्याचे दोन मुलगे मारले गेले. त्याच्या फौजेचा मोठा संहार झाला. विजयी निजामाने जानेवारी १७२५ च्या सुरुवातीस हैद्राबादेचा ताबा मिळविला.[४] निजामाच्या या विजयामुळे भागानगर ऊर्फ हैद्राबादचा सुभा फत्तेसिंगास मिळावा ही शाहू महाराजांची मागणी[५] पार वितळून गेली. निजामाने औरंगाबाद व हैद्राबाद या बाजू आपल्या सरदारांकडून व्यापल्यामुळे शाहू महाराजांच्या सरदारांना कर्नाटकाकडे आपली मुलुख-गिरीची कामगिरी करावी लागली.

---

१. इं. हि. रे. क. व्हॉ. १७, पृ. २१३–१५; राज. खं. २, पृ., ४९; सिन्हा, राइज ऑफ द पेशवाझ, पृ. १००.

२. सरदेसाई—बाजीराव रियासत, पृ. ६३.

३. पे. द. ३०, ले. ३४.

४. राजवाडे, खंड २, पृ. ४६––५०.

५. पे. द. १०, पृ. ३.

## वजिरी व गुजरात माळव्याच्या सुभेदारीतून निजामाची मुक्तता :

योजिल्याप्रमाणे निजामाचा नाश झाला नाही हे पाहून बादशहा व दिल्लीच्या[१] निजामाविरुद्ध असलेल्या सरदार मंडळीस वाईट वाटले. त्यांनी बादशहास सांगून निजामास वझीर पदावरून व गुजरात-माळव्याच्या सुभेदारीतून दूर करविले. निजाम उल्मुल्कला त्याच्या अपराधांची माफी तारीख २० जून १७२५ ला दिली आणि एक फर्मान काढून त्यास वजिरीवरून आणि माळवा व गुजरातच्या सुभेदारीवरून काढल्याचे व फक्त दक्षिणच्या सुभेदारीवर नेमल्याचे जाहीर केले. निजाम बादशाहाच्या या नव्या हुकुमामुळे गडबडून गेला नाही. दक्षिणच्याच सुभेदारीवर नेमणूक झाल्यामुळे इतःपर त्याने आपली सत्ता कशी स्थिरावली जाते व आपण स्वतंत्र कसे होतो याकडे जास्त लक्ष दिले. या वेळेपासून निजाम दक्षिणेत स्वतंत्र सुलतानासारखा वावरायला लागला असे म्हणण्यास हरकत नाही. यापुढे हैद्राबाद आणि निजाम यांच्याशी मराठ्यांची झुंज खर्ड्याच्या लढाईपर्यंत म्हणजे ७०-७५ वर्षे चालली.

## निजामाचे धोरण :

साखरखेडच्या लढाईनंतर निजामाने औरंगाबादेस बाजीरावांची भेट घेऊन सत्कार केला. बादशहाने त्याची नेमणूक दक्षिण सुभ्यावर कायम केल्यामुळे मराठ्यांना आळा घालण्याचे विचार त्याच्या मनात घोळू लागले.

मराठ्यांनी चौथाई सरदेशमुखी वसुलाच्या सनदा मिळविल्या होत्या. त्यांनी सन १७२१ मध्ये कर्नाटकवर स्वारी केली होती आणि निजामाच्या दिल्ली यात्रेच्या वेळी त्यांनी माळवा व गुजरात या दोन प्रांतावर हल्ले चढविले होते. मराठ्यांच्या हल्ल्यांचा जोर दिवसेंदिवस वाढत होता. मराठ्यांमध्ये दुफळी पाडण्याचे काम यापूर्वी निजामाने दोनदा अयशस्वीपणे केले. आता गुजरात आणि माळवा हे प्रदेश आपल्या हातातून गेल्यावर स्वतः मराठ्यांशी लढाई न करता त्यांच्यात आपसात यादवी युद्ध कसे पेटेल हे पहाण्याचे त्याने ठरविले. आपण उघडपणे मराठ्यांच्याविरुद्ध जाऊ नये असे ठरवून मराठ्यात आपसात भांडणे कशी लागतील याकडे तो जास्त लक्ष पुरवू लागला. आपण त्यास साखरखेडच्या लढाईत मदत केल्यामुळे तो आपल्याशी चांगला वागेल असे शाहू महाराजांस वाटत होते. पण महाराजांचा हा भ्रमनिरास लवकरच झाला. महाराजांनी कर्नाटकाची मोहीम काढिली. त्याचे आराखडे निजामास दाखविल्यावर तो बराच कष्टी दिसला. कर्नाटक स्वारीवर जाण्याकरिता निजामाने बाजीरावास शाहू महाराजांकडून मागून घ्यावे व यासंबंधी कोणत्या गोष्टी बाजीरावांनी निजामाच्या भेटीत बोलाव्यात या संबंधीची एक याद उपलब्ध आहे.[२] शाहू महाराजांनी आपल्या सरदारास

१. पे. द. १०, पृ. ३.

२. पुरंदरे दप्तर भा. १, ले. ७७.

त्यांच्या पराक्रमाकरिता निरनिराळी क्षेत्रें वाटून दिली होती. त्यात बाजीरावांस उत्तरेकडील क्षेत्र दिले होते. पण पेशव्यांची सत्ता सर्व राज्यात सारखी चालावी, त्यांचे कार्यक्षेत्र विभागलेले नसावे अशी व्यवस्था घडवून आणण्याची बाजीरावांची खटपट होती. याच धोरणानुसार बाजीराव पुढे सन १७२५-२६ या दोन सालात कर्नाटकात स्वारीवर गेले.

### कर्नाटक व मराठे :

कर्नाटकाचे मुख्य भाग दोन. बालाघाट व पाईनघाट. पूर्वी हा सर्वच प्रदेश विजयनगर राजाच्या ताब्यात होता. पुढे विजयनगरची सत्ता संपुष्टात आल्यावर ह्या प्रदेशावर विजापूर व गोवळकोंडा या सुलतानांची सत्ता प्रस्थापित झाली. तेव्हा शिवाजी महाराज आणि व्यंकोजी महाराजांनी यातील काही भागावर आपली सत्ता स्थापिली. औरंगजेबाने या दोन्ही सुलतानास बुडवून मोगली सत्तेखाली हा भाग आणिला आणि तेव्हापासून तो दक्षिण सुभ्याचा एक भाग मानला जाऊ लागला. मराठ्यांनी बादशहास दाद न देता बराचसा कर्नाटकचा प्रदेश मराठी सत्तेखाली आणिला. मराठ्यास दाबून टाकण्याचा प्रयत्न झुल्फीकारखान, दाऊदखान पन्नी, मुबारिझखान वगैरे सुभेदारांनी केला. सन १७०८ मध्ये दाऊदखानाने आपला हस्तक सादुल्लाखान याजवर कर्नाटकचा कारभार सोपविला. तो शूर व हुशार अंमलदार होता. कर्नाटकात ठिकठिकाणी लहानमोठे सत्ताधिश होते. त्यांना पाळेगार म्हणतात. त्यांपैकी मराठे सरदार गजेंद्रगड, कोपळ, सोंदूर येथे होते. अर्काट येथे नायब सुभेदार म्हणून सादुल्लाखान होता. कडाप्पा, कर्नूल, शिर, सावनूर वगैरें ठिकाणी दुय्यम नवाब कामावर होते ते मोगल फौजदार असून बाकी तीन ठिकाणी पठाण सरदार होते. ते पाळेगारांसारखे आपआपल्या ठिकाणी पिढीजाद बनले. शाहू महाराजांस आपल्या ताब्यात कर्नाटक प्रांत यावा असे वाटत होते. सन १७१९ च्या बादशाही सनदांनी मोगल प्रदेशावर चौथाईचे हक्क मराठ्यांस प्राप्त झाले. त्याची अंमलबजावणी करीत असता कर्नाटक प्रांत आपल्या ताब्यात यावा अशी शाहू महाराजांची मनिषा. म्हणून, कर्नाटकाच्या हद्दीवरील अक्कलकोटचा प्रदेश त्यांनी आपले मानसपुत्र फत्तेसिंग भोसले यास जहागिर म्हणून दिला. हेतू हा की, कर्नाटक प्रदेशावर फत्तेसिंगाची नजर राहील. कर्नाटकात जोपर्यंत मुसलमान सत्ता दृढ झालेली नाही तोपर्यंतच तो प्रदेश आपल्या सत्तेखाली येईल असे शाहू महाराजांस वाटत होते. कर्नाटकातील पठाण सरदारांचा बंदोबस्त किंवा संस्थानिकांकडून खंडण्या घेण्याचे काम निजामाने दर वर्षी केले. शाहू महाराजास निजामाचे कर्नाटकातील पठाणावरील वजन नामशेष करून निजामाऐवजी मराठे त्यांचे धनी असे दाखवावयाचे होते. याकरिता त्यांनी मराठे सरदार दोनदा कर्नाटकात रवाना केले.[1] पहिल्या स्वारीत एकंदर सैन्य पन्नास हजार होते. त्यास चित्रदुर्गची स्वारी असे म्हणतात.

---

१. शाहू महाराज चरित्र, पृ. ६३–६४, राजवाडे खं. ३, पृ. ५३.

### चित्रदुर्गची स्वारी :

कर्नाटकात यावेळी मराठ्यांच्या दोन स्वाऱ्या झाल्या. पहिली स्वारी नोव्हेंबर १७२५ पासून मे १७२६ पर्यंतची. दुसरी नोव्हेंबर १७२६ पासून एप्रिल १७२७ पर्यंतची. ही श्रीरंगपट्टणची स्वारी म्हणून ओळखली जाते. या स्वारीत निजामाचे सहकार्य मिळावे हा हेतू शाहू महाराजांचा होता. पण निजामाने आपल्या मनाचा थांगपत्ता शाहू महाराजांस शेवटपर्यंत लागू दिला नाही. निजामास शाहू महाराज कर्नाटकच्या स्वारीची तयारी करीत आहे हे कळताच त्याने भगवंत रामचंद्र अमात्यास शाहू महाराजांविरुद्ध उठविले. त्यांचा पराभव शाहू महाराजांनी करविला.[१] पुढे निजामाचा प्रतिकार उत्तरोत्तर वाढतच गेला. त्याने शाहू महाराजांचे सरदार नीळकंठराव जाधव यांजवर हल्ला करून त्यांना पकडून कैदेत ठेविले.[२] अशा रीतीने निजामाने आपल्या कृतीने विरोध दर्शविण्यास सुरुवात केली. तीस न जुमानता शाहू महाराजांनी प्रतिनिधी, खंडेराव दाभाडे, सुलतानजी निंबाळकर सरलष्कर या सरदारास सन १७२५ च्या दसऱ्यास कर्नाटकच्या स्वारीसाठी राजश्री पंत प्रतिनिधी यांस सामील होण्यास हुकूम सोडले.[३] खंडेराव दाभाड्यांनी आपला पुत्र त्रिंबकराव यास पाठविले.[४] शाहू महाराजांनी सोंडूरकर घोरपड्यास सेवेस येण्यास फर्माविले. त्यावरून तेही या स्वारीत येऊन मिळाले. महाराजांनी फत्तेसिंगाना तंजावरकर राजे तुळजोजी यांचे भेटीस तंजावरी जाण्याचा हुकूम केला.[५] अशी ही स्वारी बाजीरावांनी पुणे तारीख २० नोव्हेंबर १७२५ ला सोडल्यावर इंदापूर, करंबेळ, पंढरपूर मार्गे निजामाच्या सरहद्दीवरून, विजापूर, विदरगी, गलगले, कोप्पळ मार्गाने चित्रदुर्गला तारीख १६ मार्च १७२६ ला पोचली. दोन महिने झाले तरी शाहू महाराजांना या स्वारीतून कोणी पत्र लिहिले नाही, म्हणून त्यांनी आपल्या सरदारास एक खरमरीत पत्र लिहिले.[६] या स्वारीत फौजांनी जाऊन तुंबलेल्या खंडण्या वसूल केल्या. चित्रदुर्गाहून परत येताना बाजीराव पेशवे हरपनहली व गदग, गोकाक मार्गे येऊन पश्चिमेकडील मार्गाने ते साताऱ्यास तारीख २२ मार्च १७२६ ला पोचले. सबंध पावसाळा साताऱ्यास घालविला.

### श्रीरंगपट्टणची स्वारी :

या स्वारीची सुरुवात २३ ऑक्टोबर १७२६ रोजी झाली. सर्व मराठी फौजा श्रीरंगपट्टणास गेल्या. वाटेत बेळगाव, बिदनूर वगैरे प्रांताच्या खंडण्या घेतल्या आणि श्रीरंगपट्टणास एक महिना राहून शिरोळे, कापशी या मार्गे

१. पे. द. ३०, ले. ३५७.
२. शा. रो. २७.
३. शा. रो. १४, १५७.
४. रा. खं. ६, २२.
५. पे. द. ३०, पृ. २७६.
६. रा. खं. २, पृ. ५३.

मराठी फौजा सातान्यास आल्या.[१] याच स्वारीत सोंधेकर शरण आले. त्यास शाहू महाराजांच्या सांगण्यावरून अभय दिले.[२] दोन्ही स्वाऱ्यात शाहू महाराजांच्या मर्जीनुसार मुरारराव घोरपडे होते. मराठ्यांना त्यांचा उपयोग विशेष झाला. यापुढे त्यांचे वकील शाहू महाराजांच्या दरबारी येऊ जाऊ लागले.[३] तमाम पाळेगारांकडन खंडण्या वसूल केल्या. श्रीरंगपट्टणकरांकडून एकवीस लाख रुपये खंडणी घेतली.[४]

• • •

१. Grant Duff, Vol. I, p. 494.

२. शा. रो. १९६ व २००.

३. पे. द. १७, ले. १४६, शा. रो. १७१.

४. पे. द. भा. २१, ले. ५८.

A-137—6—B.

# पेशवे बाजीराव--राज्यविस्तार

## कालसूची

इ. स.—

| | |
|---|---|
| १७०६ ते १७२२ . . | या कालात गुजरातवर दहा गव्हर्नर नेमले गेले. |
| १७०८ . . . . | दाऊदखान आपला हस्तक सादुल्लाखान याजवर कर्नाटकचा कारभार सोपवतो. |
| १७१८-१९ . . . | बाजीराव बादशहास तहावर शिक्कामोर्तब करण्यास विनवितो. |
| १७१८ . . . . | हुसेनअल्ली आपली बायकामुले औरंगाबादेस ठेवतो. |
| १७१९ . . . . | च्या बादशाही सनदांनी मराठयास मोगल प्रांतावर चौथाईचे हक्क प्राप्त होतात. |
| १७१९ . . . . | निजाम उल्मुल्क मुबारीझखानाविरूद्ध लढण्यासाठी शाहूची मदत मागतो. |
| १७१९, मार्च १५ . . | सय्यदांनी अट मान्य केल्यावर निजाम उल्मुल्क उज्जैनला जाण्यास निघतो. |
| १७१९ ते २१ . | जोधपूरचा राजा महाराज अजितसिंग हा गुजरातचा गव्हर्नर होतो. |
| १७२०, मे ८ . . . | निजाम नर्मदा नदी ओलांडतो. |
| १७२०, मे २० . . . | अशिरगड हा किल्ला निजाम त्याच्या किल्लेदारास वश करून घेतो. |
| १७२०, मे २३ . . . | ब्ऱ्हाणपूर निजामाच्या ताब्यात येने. |
| १७२०, जून १९ . . | निजाम व दिलावर अलिखान यांच्या सैन्याची लढाई होऊन दिलावर अलिखान त्यांत मारला जातो. |
| १७२०, ऑगस्ट . . | बाळापूर येथे निजाम व आलमअल्ली यांची लढाई होऊन त्यात आलमअल्ली मारला जातो. |
| १७२०, सप्टेंबर ३ . . | सय्यद हुसेन निजामावर चालून जाण्यासाठी निघतो. |
| १७२०, ऑक्टोबर . . | बारामतीचा मुसलमानांचा अंमल बाजीराव उलथून लावतो. |
| १७२०, ऑक्टोबर ९ . . | सय्यद हुसेनचा खून झाल्यावर त्याचा भाऊ दिल्लीस येतो व दुसऱ्या राजपुत्रास राजा करतो. |
| १७२०, नोव्हेंबर १२. . | निजाम शाहूचा वकील महिपतराव यास परवानगी देऊन त्यासंबंधीचे फर्मान काढतो. |
| १७२०, नोव्हेंबर १३. . | सय्यद व अब्दुल्लाखान महमदशहा यांच्या सैन्याची हस्तिनापूर येथे गाठ पडने. |
| १७२१ . . . . | मराठयांची कर्नाटकावर स्वारी. |
| १७२१, जानेवारी ४ . . | निजाम उल्मुल्क व बाजीराव यांची पहिली भेट. |
| १७२१, जानेवारी १४ . | दक्षिणेचा सुभेदार या नात्याने निजाम दोन फर्माने काढतो. |

## कालसूची—चालू

| इ. स.— | |
|---|---|
| १७२१, फेब्रुवारी . . | निजामाचा चुलतभाऊ अजीनखान हा मरण पावतो. |
| १७२१ . . | च्या अखेरीस निजाम उल्मुल्क दिल्लीस जातो. |
| १७२२, जानेवारी १६ . | निजाम बादशहाचे निमंत्रणावरून आग्र्यास पोहोचतो. |
| १७२२ . . . . | बाजीराव माळवा प्रांत जिंकण्याचे उद्योगास लागतो. |
| १७२२, फेब्रुवारी २० . | बादशहा शाही दरबार भरवून निजामास मोठ्या समारंभाने वजिराची वस्त्रे देतात. |
| १७२२, ऑक्टोबर २ . . | दिल्लीतून पाय काढून निजाम दक्षिणची वाट धरतो. |
| १७२२, ऑक्टोबर ११ . | अब्दुल्ला यास कैदेतच विष देऊन मारले जाते. |
| १७२२, ऑक्टोबर २२ . | बादशहा गुजरात सुभा निजाम उल्मुल्कच्या हवाली करतो |
| १७२३, फेब्रुवारी . . | वझीर अहमदाबादेस येतो. |
| १७२३, फेब्रुवारी १९ ते . मार्च ५ . . . . . | बाजीराव व निजाम यांची झाबुवा येथे मुलाखत होते. |
| १७२३, जुलै ३ . . . | निजाम गुजरातच्या स्वारीनंतर दिल्लीत दाखल होतो |
| १७२३, जुलै . . . . | आपला चुलता हमीदखान यास गुजरातचा नायब नेमून दिल्लीस परत येतो. |
| १७२३, डिसेंबर . . | आजारीपणाचे निमित्त करून निजाम दिल्लीहून दक्षिणेतील जहागिरीवर निघतो. |
| १७२४, जून २१ . . | निजाम औरंगाबादेस येऊन पोहोचतो. |
| १७२४, जून २३ . . | निजाम शाहूस यापूर्वी न दिलेल्या सनदा बादशहाचा प्रतिनिधी म्हणून देतो. |
| १७२४, सप्टेंबर. . . | मराठ्यांचे सैन्य मुबारीझखानाशी मुकाबला करण्यास निघते. |
| १७२४, सप्टेंबर ३ . . | मुबारीझखानास सामना देण्यासाठी निजाम मराठी फौज घेऊन निघतो. |
| १७२४, सप्टेंबर ३० . . | साखरखेडला निजाम व मुबारीझखान यांच्या सैन्याची गाठ पडून तुंबळ युद्ध होते. |
| १७२५, जानेवारी . . | विजयी निजाम उल्मुल्क हैद्राबादचा ताबा मिळवितो. |
| १७२५, जून २० . | निजाम उल्मुल्कला त्याच्या अपराधाबद्दल बादशहाकडून माफी केली जाते. |
| १७२५, ऑगस्ट ११ . . | शाहू महाराज उदाजी व आनंदराव यांस त्यांच्या सत्कृत्याबद्दल पोशाख देऊन सत्कार करतात. |
| १७२५, नोव्हेंबर २० . . | बाजीराव चित्रदुर्गला जाण्यासाठी पुणे सोडतात. |
| १७२५, नोव्हेंबर ते . . १७२६, मे | मराठ्यांची चित्रदुर्गाची कर्नाटकातील पहिली स्वारी. |
| १७२६, मार्च १६ . . | बाजीरावाची स्वारी चित्रदुर्गाला येऊन पोहोचते. |
| १७२६, नोव्हेंबर ते . . १७२७, एप्रिल | मराठ्यांची श्रीरंगपट्टणची कर्नाटकातील दुसरी स्वारी |
| १७२७, ऑक्टोबर २३ . | श्रीरंगपट्टणच्या स्वारीची सुरवात होते. |
| १७२८ . . . . | उदाजी पवार धार येथे आपले ठाणें बसवितो. |

# ५

# पेशवे बाजीराव--राज्यविस्तार

कोल्हापूरकर संभाजी राजांस निजामाची चिथावणी—निजामाची पालखेड येथे कोंडी—निजामाच्या अंतस्थ कलागतीच्या कारवाया—कोल्हापूरकर संभाजी राजांची शाहू महाराजांशी समेट—वारणेचा तह—मराठ्यांचा माळवा व गुजरातमध्ये प्रवेश—माळव्याची वाटणी—बुंदेलखंड मराठ्यांच्या ताब्यात—बंगशला प्रायश्चित्त व निजामाची निराशा—गुजरातवर मराठ्यांचे वर्चस्व.

## कोल्हापूरकर संभाजी राजांस निजामाची चिथावणी :

कोल्हापूरच्या संभाजी महाराजांस वाटे की, राज्याचे मालक आपण, शाहू महाराजांचा त्यावर हक्क नाही. म्हणून ते शाहू महाराजांशी नमून वागत नसत, त्यांना योग्य तो मान देत नसत. शाहू महाराजांच्या वाढत्या सामर्थ्याचे त्यांस वैषम्य वाटू लागले. म्हणून ते शाहू छत्रपतींचा शत्रू जो निजाम याच्या सल्ल्याने व सहाय्याने वागू लागले. निजामालासुद्धा संभाजी महाराजांचा शाहू महाराजांविरुद्धचा उठाव हवाच होता. बाजीराव व प्रतिनिधी कर्नाटकात असता संभाजी महाराजांनी शाहू महाराजांवर चढाई करण्याचा घाट घातला. ह्या विचारास निजामाने पुष्टी दिली. शाहू महाराजांविरुद्ध संभाजी महाराजास उचलून धरले व आपल्या पक्षात ओढले. ही सर्व कारवाई निजामाने चंद्रसेन जाधवांमार्फत केली. "सातारवासीयांकडील तह मोडून स्वार्थ साधावा" असा निरोप निजामाने संभाजी राजास सांगून पाठविला.[१] हे ऐकून संभाजी राजांचा प्रधान नीलकंठ त्रिंबक प्रभू महाडकर खासनीस यांनी शाहू महाराजांविरुद्ध उठण्यास भर दिली.[२] शाहू महाराजांनी आपला राजाज्ञा चिमणाजी दामोदर मोघे यास निजामाच्या भेटीस पाठविले होते.[३] निजामाने त्यास फितवून शाहू महाराजांपासून फोडिले आणि संभाजी राजांकडील पेशवेपद त्यास दिले.

राजाज्ञा संभाजी राजास जाऊन मिळाल्यावरही शाहू महाराजास निजामाने आपल्या विरुद्ध उभारलेल्या कटाचा संशय आला नाही. शाहू महाराजांचा पाडाव करण्याकरिता २४ सप्टेंबर १७२६ च्या नंतर संभाजी राजे स्वतः

---

१. ३० डिसेंबर १७२५ रोजी शाहू महाराजांनी संभाजीस पत्र पाठवून ७ कलमी तह करून पुरेपूर निम्मी वाटणी दिली. का. सं. प. या. मोडक, को. इ.

२. का. सं. प. या. १८; चिटणीस बखर, पृ. ५४, केशव त्रिंबक व नीळकंठ त्रिंबक हे बंधू.

३. शा. रो. २८.

निजामास जाऊन मिळाले. ते निजामाबरोबर तीन वर्षे होते.[1] मातोश्री राजसबाई त्यांच्या गैरहजेरीत कारभार पहात होत्या.[2] निजामाच्या व संभाजी राजांच्या सरदारांनी शाहू महाराजांच्या मुलुखात धुमाकूळ घालण्यास सुरवात केली. निजामाचा बळकट सरदार तुर्कताजखान याने सन १७२६-२७ च्या उन्हाळ्यात शाहू महाराजांच्या मुलुखात सगमनेरजवळ जाळपोळ व लुटालूट केली. निजामाने श्रीपतराव प्रतिनिधींच्या मार्फत शाहू महाराजास असे कळविले की, आपण तुमच्या विरुद्ध नाही. तुमचा पेशवाच भानगडी करतो, त्याचा बंदोबस्त करणे आवश्यक होय. तुर्कताझखानाबरोबर रंभाजी निंबाळकर, धीराजी पवार, उदाजी चव्हाण वगैरे सरदार साताऱ्याच्या आसपासच्या मुलुखात धुमाकूळ घालू लागले. त्यांनी रहिमतपूरवर हल्ला करून शाहू महाराजांचा सरदार रायाजी जाधव यास ठार मारले. याच वेळी शाहू महाराजांच्या खटपटीने चद्रसेन जाधवाचा भाऊ शंभूसिंग व कोल्हापूरचा सेनापति पिराजी घोरपडे हे शाहू महाराजास येऊन मिळाले. धनाजी जाधवांचा हस्तक व्यासोराव हा शाहू महाराजांचा भक्त होता. त्याने कोल्हापूरच्या सैन्यात फूट पाडण्याची कामगिरी केली. तीही शाहू महाराजांच्या पथ्यावर पडली. निजामाने संभाजी राजे हेच मराठी राज्याचे छत्रपति अशी द्वाही फिरविली. चौथाईच्या वसुलासाठी शाहू छत्रपतींचे व बाजीराव यांचे मोकासदार होते त्यास काढून त्यांचे जागी निजामाने संभाजी राजांचे मोकासदार नेमिले.[3] याच सुमारास संभाजी राजे पुणे प्रांतात फिरले तेव्हा ठिकठिकाणी त्यांचा गौरव जनतेने केला. लोक त्याजकडून सनदा घेऊ लागले.[4] सन १७२७ च्या पावसाळ्यापूर्वी हा प्रकार सिद्ध होऊन शाहू महाराजांची सत्ता जणू चहूकडून संपुष्टात येत आहे असे पाहून शाहू महाराजांची तारांबळ उडाली. बाजीरावास कर्नाटकच्या स्वारीतून त्यांनी बोलाविलेच पण उत्तरेत गेलेल्या उदाजी पवार, कंठाजी कदम, पिलाजी जाधव व गायकवाड या सरदारांना फौजेनिशी स्वार होऊन परत येण्याबद्दल आज्ञापत्र पाठविले.[5]

### निजामाची पालखेड येथे कोंडी :

वर उल्लेखिलेली परिस्थिती निर्माण झाल्यावर त्यास तोंड कसे द्यावे याचा विचार करण्यासाठी शाहू महाराजांनी मंत्री मंडळाची बैठक बोलाविली. यावेळी शाहू महाराजांच्या मंत्री मंडळात एक विचार होईना. श्रीपतराव प्रतिनिधीचा पक्ष होता त्याचे म्हणणे निजामाशी समझोता करावा. शाहू महाराजांनी विचार केला की, बाजीराव पेशवा कर्नाटकात गेलेला, तसेच आपली फौजही उत्तर हिंदुस्थानात व कर्नाटकात गेलेली; अशा स्थितीत समझोता करणेच योग्य आणि समझोता करण्याकरिता त्यांनी आपल्यातर्फे

१. रा. खं. ८, ले. ६४.
२. कित्ता, ले. ९६.
३. बाजीराव रियासत, पृ. १०१.
४. इ. सं. पे. द. पृ. १३०—१३१.
५. शा. रो. २५, २६.

प्रतिनिधी व सुमंत या दोघांना निजामाकडे पाठविले. निजामाने बोलणे लाविले की, चौथाई वसुलीकरिता मराठ्यांनी आपले मोकासदार नेमू नयेत. त्यांना नक्त रक्कम मी देतो. त्याप्रमाणे त्यांनी हैद्राबाद प्रांताची चौथाईची रक्कम तीन लाख निजामाकडून घेण्याचे कबूल केले. अशा या विमनस्क स्थितीत शाहू महाराजांनी मराठ्यांचे हैद्राबादवरील वर्चस्व घालविले. सर्व दक्षिणच्या सहा सुभ्यांच्या चौथाई वसुलाबद्दल शाहू छत्रपति रोख रकमेचा स्वीकार करण्याच्या मनस्थितीत असताच बाजीराव सातार्‍यास शाहू महाराजां-पाशी आले आणि त्यांनी चौथाई वसुलीचे हक्क सोडल्यास आपल्या सत्तेस कसा उणेपणा येतो हे महाराजास समजाऊन सांगितले. इतक्यात ठरलेल्या रकमेबद्दल निजामाकडून असा निरोप आला की, शाहू महाराज व संभाजी राजे यापैकी छत्रपति कोण हे दोघांनी आपसात ठरविल्याशिवाय रक्कम देता येत नाही. यावरून शाहू महाराजांनी निजामाचा डाव[1] पूर्णपणे ओळखला आणि बाजीरावास निजामावर चाल करून जाण्यास सांगितले. बाजीरावांनी निजामावर चालून जाण्याकरिता २७ ऑगस्ट १७२७ ला सातारा सोडले. शाहू महाराजांनी निजाम उल्मुल्काबरोबर लढाई सुरू झाल्याचे तारीख १३ ऑक्टोबरला जाहीर केले. निजामसुद्धा लढाईस ठाकला. त्याने आपल्या हालचाली अगदी गुप्त ठेविल्या. आपण औरंगाबादेस जात आहोत असे जाहीर करून तो जुन्नर पुण्याच्या रोखाने चालला. सप्टेंबरमध्ये त्याने सुलतानजी निंबाळकर याजसह म्हसवडवरून सातार्‍याकडे चाल केली. निजामाचे तुर्कताजखान व ऐवजखान असे निष्णात अधिकारी तोफखान्याच्या बळावर प्रलय उडवून देत होते. बाजीरावांच्या बाजूने मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, तुकोजी पवार हे सरदार जिवास जीव देऊन लढण्यास सिद्ध होते. ऐवजखान औरंगाबादेहून चालून आला. त्यास सिन्नरजवळ तुकोजी पवारांनी चोपले.[2] मोगलांचे बाजूचा सिन्नरचा देशमुख कुवर बहादूर होता. तो चालून आला. तेव्हा त्याचाही फन्ना तुकोजी पवार यांनी उडविला. हे पुढे पेशव्यांचे पक्षात सामील झाले. फत्तेसिंग आणि रघूजी भोसले यांनी चंद्रसेन जाधव याजपाशी झुंज देऊन त्यांचा पराभव केला. निजामाची दृष्टी पुणे प्रांतात धमाल उडवून देण्याची असल्यामुळे त्याने आपल्या सरदारासह पुणे प्रांतात धुमाकूळ घातला. लोहगडचे पेठेपर्यंत चालून गेले. तेथे लोहगडकर्‍यांनी त्यांना निकराचा प्रतिकार करून प्रतिहल्ले चढविले व जेरीस आणिले. माघारे येऊन चिंचवड पुण्यामध्ये राहिले. तो निजाम संभाजीराजांसह पुणे प्रांतात अंजनापुरास येऊन राहिला[3] असे वृत्त आले. निजामाने उदापूरचे ठाणे घेऊन तो लोहगावावरून पुण्यास आला. तेथे त्याने संभाजीराजांचे लग्न रामनगरचा राणा सिसोदिया रजपूत होता त्याच्या कन्येशी केले (११ फेब्रुवारी १७२७). पुण्याच्या बंदोबस्तास फाजलबेग

१. निजामाने शाहू महाराजांस बुडवून मराठ्यांची सत्ता गुजरात आणि माळवा या प्रांतातून नाहीशी करण्याकरिता संभाजी राजास हाताशी धरले. शाहू महाराजांच्या सैन्यात फितुरी आणित राज्यात धुमाकूळ कसा माजवला या संबंधीचे पत्र सवाई जयसिंगास निजामाने लिहिले होते.

२. पे द. १०, ले. ५०.

३. रा. खं. ३, ले. १५.

नावाच्या सरदारास ठेवून स्वतः निजाम लोणी पारगावावर गेला. तेथून सुपे, पाटस ही ठाणी त्याने काबीज केली. बारामतीचे ठाणेही घेतले. हे सर्व विजय त्याने तोफखान्याचे सामर्थ्यावर मिळविले. इतक्यात त्यास पेशवा पुण्यावर चालून येतो आहे अशी वार्ता समजली. तेव्हा तो लगबगीने पेडगावावरून नगरास गेला.

बाजीरावांजवळ तोफखाना नव्हता. त्यांनी सैन्यासह सप्टेंबरात पुण्याहून निघून पुणतांब्याजवळ गोदावरी उतरून जालना, शिंदखेड लुटली. तेव्हा प्रतिकारार्थ निजामाचा सरदार ऐवजखान बाजीरावांस सामोरा आला. त्याचा पराभव ५ नोव्हेंबरला बाजीरावांनी केला. तिथून पुढे बाजीराव वऱ्हाडातून वायूवेगाने निघाले. वाटेत माहूर, मंगलूर, वासिम हे तालुके त्यांनी जिंकून घेतले. असेच त्वरेनें वायव्येकडे वळून खानदेशात घुसून तापी उतरून तारीख १८ डिसेंबरला कुकडमंड्यावर बाजीरावांनी मुक्काम केला. तेथून गुजराथेत घुसून सन १७२८, जानेवारी २८ ला ते छोटा उदेपूरला आले. तेथें गुजराथचा गव्हर्नर सर बुलंदखान याने बाजीरावांशी निजामाविरुद्ध मैत्री जोडली. बाजीरावांच्या वर उल्लेखिलेल्या भराऱ्यांचा उद्देश निजामाला सोयीच्या जागी चिमट्यात कोंडण्याचा होता. निजाम पुन्हा पुण्याच्या बाजूस चाल करून जात आहे. असे समजताच बाजीरावांनी आपण बऱ्हाणपूर जाळणार अशी आवई उठविली आणि ते त्या दिशेने निघून खानदेशातील बोरवाड गावी १४ फब्रुवारीला पोहचले आणि त्यांनी औरंगाबादवर चढाई केली. हे कळताच निजाम पुण्याहून लगबगीने परतला. गोदावरी मार्गे जाऊन बाजीरावांना मैदानात गाठून आपल्या तोफखान्याच्या बळावर त्यांच्याशी उघड मैदानात झुंज देऊन त्यांचा धुव्वा उडवू अशी निजामाची योजना होती. पण बाजीरावांनी गनिमी काव्याचे युद्ध खेळून निजामाचा प्रदेश उध्वस्त केला. त्याच्या फौजेस दाणावैरण मिळू नये, अशी युक्ती केली. रस्त्यात नद्या नाले होते, त्यांचे उतार अडविले आणि निजामाला औरंगाबादेपासून २० मैल अंतरावर असलेल्या पालखेड गावी कोंडले. पालखेडला निजामाच्या सैन्याभोवती मराठी सैन्याने गराडा घातला. निजामाचे बाहेरच्या जगाशी संबंध व दळणवळण साफ तुटले. त्याची उपासमार होऊ लागल्यामुळे त्याने आपला सरदार ऐवजखान याचे मार्फत तहाचे बोलणे करून करारनामा स्वहस्ते केला.[१] तह कायम करण्याकरिता निजामाच्या दोन मातब्बर सरदारासह मराठे मंडळी मुंगीशेवगावजवळ गेली. तिथे तारीख ६ मार्च १७२८ रोजी तह बाजीरावांच्या मागणीप्रमाणे निजामाने पुरा केला. त्या तहाची कलमे :

(१) दक्षिणेतील ६ सुभ्यातील राज्य कारभाराची व्यवस्था मराठ्यांच्या अनुमतीने व्हावी, तसे करताना मराठे बादशहाचे हीतच पहातील;

(२) आनंदराव सुमन्त हा पेशव्यांचे नोकरीत असल्यामुळे त्यास वकील म्हणून ठेवून घेऊ नये, आम्ही कोणी दुसरा पाठवू;

१. पे. द. १५, ले. २९.

(३) संभाजी राजास निरोप देऊन निजामाने पन्हाळयास रवाना करावे;

(४) परगणे अक्कलकोट, खेड, तळेगांव, बारामती, इंदापूर, पुणे वगैरे जप्त केलेली ठाणी मोकळी करून पेशव्यांचे हवाली करावी;

(५) निजामाने दक्षिणच्या ६ सुभ्यांच्या चौथाई व सरदेशमुखीच्या सनदास मान्यता द्यावी;

(६) बळवंतसिंग व इतर यांच्या जप्त केलेल्या जहागिरी त्यास परत कराव्या;

(७) संभाजी राजे यास कृष्णा व पंचगंगा यामधील मुलुख आम्ही दिला आहे, त्या व्यतिरिक्त जादा आपण न द्यावा;

(८) सुलतानजी निंबाळकरने निजामास सोडले आहे, ते आपल्या भावांशी जहागिरीपायी खटका करतील तरी त्यास करू न देणे;

(९) संभाजी राजे यांजकडील कमाविसदारांनी आमचे माहालींचा वसूल घेतला असेल तो शाहू महाराजांस परत करावा;

(१०) पिलाजी जाधव व रंगोजी जाधव यांजकडे शहागडचे वतन व पाटीलकी आहे ती त्याजकडे चालू द्यावी;

(११) तुर्कताजखानाने "स्वराज्य" अमलातील कैदी सोडून द्यावेत;

(१२) पेटा करडं निंबाणे येथील पांच गांव कृष्णाजी, उदाजी आणि केरोजी या पवार बंधूस इनाम द्यावेत;

(१३) संभाजी राजे यास त्याने कृष्णेच्या अलीकडील मुलुखातून चौथ सरदेशमुखी वसूल करण्यास देऊ नये.

याप्रमाणे १७ कलमांचा[१] तह निजाम व बाजीराव यामध्ये ठरला. दोघात वस्त्रांच्या भेटी जाऊन ते एकमेकांस भेटले.

**फलादेश :**

निजामाने हा तह करून स्वतः मराठ्यांपेक्षा सत्तावान नाही हे कबूल केले. दक्षिणेत आपणच कर्तुमकर्तुम् शक्ति आहोत, शाहू महाराजांची तिरपीट केव्हाच उडवू अशी जी निजामास घमेंड होती ती पार नाहीशी झाली. दक्षिणच्या ६ सुभ्यावरील मराठ्यांच्या चौथ सरदेशमुखीच्या हक्कास निजामाकडून मान्यता मिळाली. ह्या हक्कांना तो आतापर्यंत मान्यता देत नव्हता, ती मान्यता देण त्यास भाग पडले. त्यामुळे आपले स्वातंत्र्य गमावून दक्षिणेत मराठ्यांच्या स्वैर संचारास मोकळीक करून दिल्यासारखे झाले. यामुळे मराठ्यांच्या आक्रमणास कायदेशीरपणा आला. यापुढे मराठे व निजाम यांचे लढे झाले पण चौथ सरदेशमुखीच्या हक्काविरुद्ध निजामाने ब्र काढला

१. ४ कलमे किरकोळ म्हणून त्यांचा उल्लेख केला नाही. जिज्ञासूंनी मराठी रियासत, बाजीराव, पृ. १०४-१०५ पहावी.

नाही. अशा रीतीने मराठ्यांचे दक्षिणेतील राजकीय वर्चस्व निजामाने कबूल केले.

या विजयाचा एक अप्रत्यक्ष परिणाम असा झाला की, प्रतिनिधी, कान्होजी भोसले, दाभाडे, सरलष्कर निंबाळकर या जुन्या सरदारांवर नाकतपणाचा शिक्का बसून स्वराज्यात त्यांची कर्तबगारी मागे पडली.. फायदा असेल त्या बाजूस जाऊन स्वतःची तुंबडी भरणे बंद झाले. बाजीराव व चिमाजी आप्पा यांनी आपली ताकद या विजयाने प्रगट केली. बाजीरावानी निजामास सोडले. त्याचा नाश केला नाही असे म्हणणाऱ्यांनी शाहू महाराजांचे खालील उद्‌गार ध्यानी घ्यावे—

"तुम्ही नबाबाचे नजीक राहू नये. तुम्ही त्याच्या गोष्टीत मन घालावेसे नाही. त्यांच्या स्नेहास अंतर करू नये . . . . नबाबाची मर्जी राखावी . . . नबाबाशी कलह न केला पाहिजे." यावरून निजामाचे अस्तित्व कायम राखण्याचे कारण खुद्द शाहू महाराज होय हे स्पष्ट आहे.[1]

**निजामाच्या अंतस्थ कलागतीच्या कारवाया :**

बाजीराव व चिमाजी आप्पाने माळवा व बुंदेलखंड हे प्रदेश काबीज केले. निजामाला पालखेडी नरम आणून एक तह करावयास भाग पाडले. मराठ्यांनी बुंदेलखंडात आपली ठाणी बसविल्यामुळे बुंदेलखंडात आपल्या सैन्याचे कायम तळ ठेवून आग्रा, दिल्ली या प्रांतावर सहज हल्ले करता येतील अशी धास्ती बादशहास वाटून मराठ्यांचा काहीतरी बंदोबस्त व्हावा अशा प्रकारची चर्चा दिल्लीतील राजवर्तुळात सुरू झाली. बादशहा विवंचनेत पडला. त्याने आपल्या सरदारास सल्ला मसलतीस बोलाविले. दिल्लीच्या अमीर उमरावात दोन पक्ष होते. एक पक्ष खानदौरा व राजा जयसिंग यांच्या नेतृत्वाखालील व दुसरा पक्ष सादतखान, महमदखान बंगश आणि अभयसिंग यांच्या नेतृत्वाखालील. पहिल्या पक्षाचे म्हणण की, मराठ्यांशी सामोपचाराने वागून त्यांच्याशी वाटाघाटी करून त्यांच्या आक्रमणास पायबंद घालता येईल. दुसऱ्या पक्षाचे म्हणणे की, वाटाघाटी न करता सर्व शक्तीनिशी मराठ्यांवर तुटून पडावे व त्यांना शिक्षा करावी. बादशहा स्वतः ऐषारामी व कमकुवत दिलाचा होता. त्याला एक ठाम निर्णय घेता येईना. जयसिंग याची फूस बाजीरावास असून हे दोघे हिंदु एक विचाराने वागतात व मोगलाई बुडवावयास पहातात अशी दिल्ली दरबारातील एका पक्षाची हाकाटी होती. तेव्हा जयसिंग पुढे होऊन त्याने बादशहास असे सांगितले की, मी स्वतः शाहू महाराजांबरोबर वाटाघाटी करतो आणि मराठ्यांचे चढाईचे धोरण कशा-करिता आहे, शाहू महाराजास मोगलांविरुद्ध चढाई करावयाची आहे का? वगैरे संबंधीची हकिगत आपण आपल्या विश्वासातील वकील पाठवून मिळवू.

१. पे. द. १०, ले. ७५.

निजामाचे या बाबतीत काय म्हणणे आहे तेही या वकिलांनी निजामास भेटून विचारावे आणि यासंबंधीचा अहवाल त्या वकिलांनी सादर करावा. जयसिंगाने आपले मराठ्यांवर किती वजन आहे याचे प्रत्यंतर मांडवगड टाणे शाहूकडून घेऊन बादशहाच्या नजरेस आणिले. मराठ्यांविरुद्ध कोणताही इलाज करण्या-पूर्वी त्यांच्या दरबारी शिष्ट मंडळ पाठविण्याची जयसिंहाची कल्पना बादशहास पसंत पडली. जयसिंगाने शिष्ट मंडळात कोणी असावे हे ठरवून शिष्ट मंडळ आपला अहवाल निजामास सादर करून त्याचे म्हणणे नंतर ऐकावे व निजामाच्या म्हणण्यासह शेवटी बादशहास आपल्या भेटीची हकिगत सादर करावी, असा एकंदर मनसबा ठरला.

जयसिंगाने उदेपूरचा राजा संग्रामसिंग याच्या विचाराने शिष्ट मंडळाचे आपल्या तर्फेचे प्रतिनिधी दीपसिंग व मनसाराम पुरोहित असे दोन वकील निवडले. संग्रामसिंगाने आपल्या तर्फेचा बागजी वकील दिला. मिळून हे तीन हुशार वकील ऑक्टोबर १७३० मध्ये शाहू महाराजांच्या दरबारी साताऱ्यास दाखल झाले.[१] त्यांना शाहू महाराज, बाजीराव पेशवे आणि मराठा दरबारातील इतर मानकऱ्यांनी मोठ्या सन्मानाने वागवून त्यांचा यथोचित आदर सत्कार केला. सप्टेंबरपर्यंत या तिन्ही वकीलांनी शाहू महाराजांपासून तो दरबारातील सामान्य सरदारांपर्यंत सर्वांच्या मुलाखती घेतल्या. मराठा सरदारांचे मनोदय समजून घेण्याचा प्रयत्न केला. साताऱ्याहून हे वकील पुढे औरंगाबादेस निजामाच्या भेटीस गेले. निजामानेही त्यांचा पाहुणचार यथायोग्य करून त्यांशी बोलणी केली. त्यांनी नोव्हेंबरात औरंगाबाद सोडून दिल्लीस आल्यावर बादशहा व जयसिंग यांस आपल्या भेटीचा अहवाल सादर केला. बागजी हा वाटेत अजिंठ्याजवळ मरण पावला.

बादशहास जो अहवाल सादर केला त्यात दीपसिंगजीनी शाहू महाराजांची व बाजीराव पेशव्यांची फारच स्तुति केली. "राजे मोठे शहाणे, विवेकी आहेत. जाबसाल उत्तम करितात. बाजीराव कलेचे अनुभवी, एकवचनी, राज्यातील श्रेष्ठ कारभारी आहेत. सर्व फौजांना यांच्या वचनाचा इतबार वाटतो", असा निर्वाळा त्यांनी आपल्या अहवालात दिला. त्यापैकी मनसाराम पुरोहित हा वकील शाहू महाराजांच्या दरबारी वागणुकीस इतका भाळला की, त्याने उत्तर देश सोडून साताऱ्यास येऊन वास्तव्य केले. शाहू महाराजांनी त्यास चांगली वागणूक दिली.[२]

वकिलांनी बादशहास सांगितले की, शाहू महाराजांची किंवा त्यांच्या सरदारांची बादशाहीविषयी वाईट मनिषा नाही. ते बादशाहीचे भलेच इच्छितात. त्यांचे म्हणणे असे की, "बादशहाने ज्या मुलखात चौथाई सरदेशमुखीच्या सनदा दिल्या त्यांचा वसूल आपणास करता यावा आणि बादशहाचे संकटकाळी त्यांचे संरक्षणार्थ धावण्यासाठी बादशहाने आम्हास

१. New History of the Marathas, II, pp. 123-24.
२. *Ibid*, 125-127.

हाक मारावी. मराठ्यांनी ११ ते १५ लाख रुपये गुजरात व माळव्याचा चौथाई वसूल म्हणून बादशहाकडे मागितला. त्यांना "वरील वसूल मिळण्याची सोय जर बादशहाने केली तर मराठे बिलकूल त्रास देणार नाहीत". पण निजामाचे मत मात्र निराळे पडले. मराठ्यांबद्दलचा त्याचा ग्रह पूर्वदूषित होता. "पेशव्याच्या वचनावर काडीचाही विश्वास कोणी देणार नाही," असे निजामाचे म्हणणे पण त्याबरोबरच त्यांना दूर सारण्यासाठी समर प्रसंग करण्याचा आपला मानस निजामाने बोलून दाखविला नाही. याचे कारण उघड होते. त्याने पेशव्यांकडून मागील तिन्ही वेळा मार खाल्ला होता. मार खाणाऱ्याच्या तोंडून जयश्री मिळविण्याच्या वल्गना कोण ऐकून घेणार? निजामाला सवाई जयसिंगाचा राग आला असावा. त्याने दीपसिंगास विचारिले "आम्ही जाणतो की, सवाई जयसिंगजी सर्वाहून थोर असे असता त्यांनी तुम्हास शाहू महाराजांकडे पाठविले हे योग्य नव्हे. तुम्हासारख्या थोर माणसांनी तरी शाहू महाराजांपाशी शिष्टाईला जाता कामा नये होते". दीपसिंग म्हणाला की, "महाराज जयसिंगाने आम्हास आपल्या विचाराने पाठविले नसून बादशहाच्या अनुमतीने आम्ही गेलो". त्यावर निजामाने विचारिले "तुम्ही काय कामगिरी केली?" "माळव्याचे अकरा लाख व गुजरातचे पंधरा लाख मराठ्यास द्यावे". त्यावर निजाम म्हणाला की, "माळव्याचा तीस चाळीस लाख वसूल त्यातून बंगष स्वतःकरिता काय ठेवणार व खर्च काय करणार?" आणि गुजरातच्या बाबतीत तर बांडे-गायकवाड धामधूम करतील त्याचे काय, दीपसिंग उत्तरला की, त्याचा बंदोबस्त चिमाजीअप्पा व जयसिंग मिळून करतील. तेव्हा निजाम म्हणाला की, "बाजीरावाचा विश्वास तुम्हास असेल, आम्हास काडीचा नाही". तेव्हा दीपसिंगाने उत्तर दिले, "आम्हास बाजीरावाचा विश्वास पूर्ण असून त्याचा व जयपूरचा घरोबा वडिलार्जित आहे". त्यावर निजामाने हा विषय सोडून दुसरा काढिला. त्याने विचारले, "सातारा महाराज त्यास अतिशय मान देतात असा मातबर सरदार तुमच्या नजरेस कोणता आला."

दीपसिंग : जयसिंग महाराजांनी याजबद्दल तपास करण्यास मला पाठविले. बाजीराव प्रधान याचे नाव मर्दुमकीत पहिले आहे.

निजाम : तुम्ही मातबर, पोख्तकार, साहेब तर्दूद (वाटेल तेव्हा फौज उभी करणारा), राजा मेहरबान गिरंबार (सामर्थ्यवान) कोणास ओळखले?

दीपसिंग : बाजीराव.

निजाम : राजा खुद्द कसा आहे?

दीपसिंग : राजाही बहुतच खुबिया राखतो.

निजाम : आम्ही ऐकले की (तो) कित्येक गोष्टी हलकेपणाच्या ऐकतो.

दीपसिंग : ते जर चांगल्याच्या सल्ल्याने चालत नसतील तर राज्य कसे चालेल? राजे मोठे शहाणे व विवेकी आहे.

निजाम : बाजीरावास गर्व फार झाला आहे त्याचे एकवेळ पारिपत्य करणे जरूर आहे.

दीपसिंग : आपल्यावर बादशाही इतराजी असता बाजीरावासारख्या मोहऱ्याशी आपण बिघाड करणे उचीत नाही. आम्ही तुम्हास खात्रीने सांगतो की, बाजीरावाचे मनांत एक लाख फौज उभी करावयाची असली तरी तो तावडतोब करील.

निजाम : नारबा राज्यापासी कोण आहे? त्याचे वजन राजापाशी किती आहे?

दीपसिंग : नारबा आपण पाहिला नाही. मातबर असता तर तो आमच्या-बरोबर वाटाघाटी करण्यास आला असता, हा कोणी खाजगी असामी दिसतो. आम्ही त्यास पाहिले नाही किंवा त्याजबद्दल ऐकिले नाही.

निजाम : शाहूच्या दरबारात नारबा मातबर आहे. गयासखानास त्याची प्रचिती आली (त्याशी संधान बांधून) राजास तंबी कशी पोचवितो ते पहा. सिधोजी निंबाळकर, कंठाजी बांडे, उदाजी पवार व कानोजी भोसले शिवाय गायकवाड ऐसे आम्ही पन्नास हजार स्वार जमवून शिकस्त चालविली आहे की, एक बाजीरावास धरून तरी आणतो नाहीतर साफ धुडावून देतो. सर्व फौज त्यांची लुटून घेतो[1].

दीपसिंगाने शेवटी निजामास सांगितले की, आम्हास जे दिसले ते आपणास सांगितले. तुम्हास जे काय करणे असेल त्याचे मुखत्यार तुम्ही आहात.

दीपसिंगाच्या वकिलीचा हा वृत्तांत वाचून बाजीराव-निजामाचे कितपत वाकडे होते याची प्रचिती येते. जयसिंगाचा हेतू असा दिसतो की, मराठ्यांची दोस्ती संपादन करून आपणासाठी माळवा आणि आग्रा हे दोन्ही प्रांत मिळवावे. दीपसिंगाच्या वकिलीचे दृष्य फळ काही नाही. एवढे खरे की त्यावरून त्यावेळची राजकीय स्थिती काय होती याचा बोध होतो.

बाजीराव पेशव्यास दीपसिंग-निजाम संभाषणाचा वृत्तांत त्याच्या वकिलाकडून कळला. त्या वृत्तांतानेच तो निजामाविषयी सावध झाला. निजामाने दाभाडे-गायकवाडास बाजीरावांविरुद्ध उठविण्याची खटपट चालविली असता दुसऱ्या बाजूस कान्होजी भोसले, कंठाजी कदम, उदोजी चव्हाण वगैरे सरदार संभाजीस उठवू लागले व त्यात निजामाची मदत मागू लागले. बाजीरावांचा पाडाव करून शाहू महाराजास छत्रपती पदावरून काढावयाचे व संभाजी राजांची स्थापना करावयाची, असे झाले म्हणजे दाभाडेना सेनापतीपद देऊ आणि कंठाजी कदम बांडेस सरलष्करपद देऊ असे त्यांनी ठरविले. निजामही त्यास म्हणाला, "संभाजीचा लकडा आमचे पाठीवर आहे. त्यास एक वेळ राज्यी बैसोन शाहूस मोडावे, फुकटा फुकट मनसुबा आला आहे. परभारे

---

१. हा संवाद गणेश बल्लाळ नावाच्या पेशव्यांच्या निजामाकडील वकिलाने पेशव्यास औरंगाबादेहून कळविला. पहा—पे. द. १०, ले. ६६ व ६६ अ.

घरात कलह लागतो. कोणही मोडला तरी एक विरोधक कमी जाला. आपले काय जाते[१]?" हे कळविल्यावरच दुसरा वकील श्रीपतराव प्रतिनिधीचे मनोदय कळवितो, "यंदाही पहिल्या सारखाच उपक्रम इकडून आहे. थोडकासा फितवा घरचाही आहे. श्रीपतरावाची अर्जी वरचेवर येत असते. स्वामींनी सहस्त्र प्रकारे सावध राहून राजश्रीसही लिहिले पाहिजे. राजास धका द्यावा यात तिळतुल्य मिथ्या नाही. राजाचा आमचा स्नेह बाजीरावाचा स्नेह ऐशा लौकिकी (निजाम) गोष्टी सांगतो. एक प्रधान पंतास मात्र वचकतात. नाही तर राजास काही वचक धरीत नाही".

अशा प्रकारची निजामाने चालविलेल्या अंतस्थ कलागतीची बातमीपत्रे पेशव्यास आली म्हणून ते व शाहू महाराज येऊ घातलेल्या संकटाबद्दल सावध राहिले आणि पुढील उपाययोजना त्यांनी केली.

**कोल्हापूरकर संभाजी राजांची शाहू महाराजांशी समेट :**

इ. स. १७२८ मध्ये संभाजी राजास शाहू महाराजांविरुद्ध उठवून निजामाने एकच धमाल उडवून दिली. त्याचे परिमार्जन निजामाचा पराभव पालखेड येथे होऊन झाले. यासंबंधीचा वृत्तांत अगोदर आलेलाच आहे. तदनंतर भगवंतराव अमात्य आणि उदाजी चव्हाण या दोन सरदारांनी वरवर संभाजी राजाशी सख्य दाखवून त्यांची बाजू उचलून धरिली. चंद्रसेन जाधव शाहू महाराज व पेशवे बाजीरावांच्या विरुद्ध उघडपणे जाण्यास धजले नाहीत. संभाजी राजास समजाविण्याचा प्रयत्न शाहू महाराजांनी आपल्या परीने केला. १७२७ मध्ये जेव्हा संभाजी राजे निजामास मिळाले तेव्हा शाहू महाराजांनी त्यास खालील पत्र लिहिले. त्यांत त्यांनी संभाजीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला आहे. "हे राज्य श्रीचे कृपेने, यवनांचे आश्रयास जाऊन जय कसा येईल? तुम्हास राज्यलोभ होता तर आम्हास सांगोन पाठवायचे होते. तुम्हास एकादे राज्य साधून दिले असते, तुम्ही आम्हाप्रमाणे यवनाकडून राज्य सोडवून घ्यावे. आम्ही सोडविल्यापैकी विभाग मागावा ही नीति नव्हे. तुम्हास दौलत पाहिजे ती आम्ही नवीन सिद्ध करून देऊ. अगर खर्चास नेमणूक अधिक मागितल्यास देऊ. पण राज्य वाटा मागणे पुरागांतरी जाहले नाही. ही बुद्धी सोडावी, यवनांचा आश्रय करणे फार वाईट." पण याचा परिणाम संभाजी राजांवर काहीच झाला नाही. लवकरच संभाजी राजांचे सेनापती राणोजी घोरपडे आणि अमात्य भगवंतराव व इतर अनेक सरदार मंडळी त्यांच्या कारभारास कंटाळून शाहू महाराजांच्या पक्षास मिळाले. अथणीकर उदाजी चव्हाण मात्र संभाजी राजांचे मुख्य सहाय्यकर्ते बनले. जेव्हा बाजीराव व चिमाजीआप्पा सन १७२९ मध्ये माळवा-बुंदेलखंडाच्या उद्योगात गुंतलेले होते तेव्हा उदाजी चव्हाणानी शाहू महाराजांच्या मुलुखात जाळपोळ करून मोठा धुमाकूळ मांडला होता. त्यावेळी शाहू महाराजानी स्वत: उदाजी

१. पे. द. १०, ले. ६६—७६.

चव्हाणाविरुद्ध सन १७३० च्या सुरवातीस चाल केली होती. एके दिवशी शाहू महाराज शिकारीस रानात गेले असता उदाजी चव्हाणांनी पाठविलेले चार मारेकरी जंगलात भेटले. लगेच कटाचा सुगावा लागला आणि मारेकऱ्यास शिक्षा केली. शाहू महाराजास संभाजी व उदाजी आपल्या नाशास टपलेले आहेत याची खात्री होऊन त्यांनी संभाजीराजांच्या मुलखावर स्वारी करण्यास त्रिंबकराव दाभाडे यांना बरोबर मोठी फौज देऊन पाठविले. शाहू छत्रपति स्वत: वारणेवर तळ देऊन राहिले. मार्च १७३० मध्ये प्रतिनिधीनी वारणेच्या पलिकडील तिरावर असलेल्या संभाजीच्या राजांच्या तळावर हल्ला चढविला. संभाजी व उदाजी चव्हाणांचा या हल्ल्यापुढे टिकाव न लागून ते वाट मिळेल तसे पन्हाळ्याकडे पळून गेले. प्रतिनिधीनी सर्व लष्कर लुटून फस्त केले आणि हजारो लोक पाडाव केले व प्रमुखास पकडले. पकडलेल्यात ताराबाई, राजसबाई, संभाजी राजांच्या बायका, भगवंतराव अमात्य व व्यंकटराव घोरपडे हे प्रमुख होते. यापैकी राजसबाई व संभाजीच्या बायका यांस पन्हाळ्यावर पोचवून बाकीच्या तिघास घेऊन महाराजांसमोर आले. ताराबाईस परत पाठविण्याचा विचार झाला तेव्हा त्या म्हणाल्या, "मला कोठे झाले तरी कैदेतच रहावयाचे त्या अर्थी तुम्हाजवळच राहू". तेव्हा त्यास शाहू महाराज बरोबर घेऊन पावसाळा काढण्याकरिता साताऱ्यास आले. संभाजी राजांच्या मागे न लागता शाहू महाराज तसेच साताऱ्यास आले. इतके झाल्यावर संभाजी राजांनी युद्धाचा इरादा सोडला आणि शाहू महाराजास शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेण्याचा निश्चय केला. त्यांची स्त्री जिजाबाई यांनी त्यांना मुख्यत्त्वेकरून सल्ला दिला असावा. शाहू महाराजांनी विशाळगड आणि संभाजी राजांच्या ताब्यातील इतर स्थळे घेण्याकरिता फौज रवाना केली आणि उदाजी चव्हाण आदि प्रमुख सरदारांनी संभाजी राजांची बाजू सोडून शाहू महाराजास मिळणे याचा परिणाम संभाजीराजांवर झाला असावा. ताराबाईचे शाहू महाराजांपाशी साताऱ्यास वास्तव्य झाल्यापासून त्यांनीही शाहू महाराज व संभाजी राजे यांची दिलजमाई घडवून आणली असावी. कारण संभाजीराजांबद्दल शाहू राजास कमालीचा आपलेपणा वाटत होता. इतका की, संभाजी राजाबद्दल कोणी वाकडे बोललेले शाहू महाराजास खपत नसे. ह्या आपलेपणामुळेच दिलजमाई होऊ शकली. शाहू महाराज मनाचे मोठे दिलदार, शत्रूसुद्धा आपलेसे करून घेण्याची त्यांची हातोटी, लोकास संतुष्ट ठेवण्याची त्यांची वृत्ती यामुळे शाहू महाराज संभाजी राजांचे अपराध विसरू शकले. १७२९ च्या उन्हाळ्यात संभाजीराजांकडून शाहू महाराजास आपण भेटू इच्छितो अशा प्रकारचे पत्र गेले. शाहू महाराजांनी त्यास आपला रुकार दिला. दोघांमध्ये कसातरी तह होऊन हे भाऊबंदकीचे प्रकरण निकालात निघावे, अशी शाहू महाराजांची पहिल्यापासून इच्छा. असा तह ठरावा म्हणून प्रयत्न सन १७०० पासून[२] झालेला दिसतो. पण त्याचे दृष्य फळ सन १७३१ मध्ये मिळाले.

---

१. का. सं. प. या. ९, भा. व. श. पृ. ८.

२. करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधनें, भा. १-२, पृ. ४.

संभाजी राजे भेटीस आल्यास त्यांना आपण मोठ्या प्रेमाने भेटून त्यांच्या आदरसत्कारात कोणतीही उणीव येऊ देणार नाही, अशा आशयाचे पत्र शाहू छत्रपतींनी संभाजी राजास लिहिले. त्यावर संभाजी राजांनी ऑक्टोबर १७३० मध्ये खालील उत्तर पाठविले. "तीर्थस्वरूप मातुश्री साहेबी वडिलांचे ममतेचा व उभयपक्षी स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणून वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलास उचितच आहे. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभयपक्षी निर्दोष कीर्ति व्हावी हेच आम्हास अगत्य आहे."[१] हे पत्र घेऊन संभाजी राजांनी नीळकंठ प्रभू पारसनीस यास शाहू महाराजांकडे पाठविले. या पारसनिसांनी शाहू महाराज व संभाजी राजे यांचा समेट घडवून आणण्यात फारच मेहनत घेतली. शाहू महाराजांनी बाबाजी प्रभू यांचेबरोबर संभाजी राजास आपल्या प्रेमाचे प्रतीक म्हणून पत्र व वस्त्रे पाठवून संभाजी राजांचा गौरव केला. संभाजी राजे शाहू महाराजांच्या या निर्व्याज प्रेमाने भारावले आणि त्यांनी त्यास लिहिले, "वडिली लिहिल्या गोष्टी यथार्थच आहेत. वडिलांचे निर्व्याज वात्सल्य तसेच आहे. आम्हासही वडिलांपेक्षा दुसरे दैवत नाही. वडिल आम्हास पितृस्थानी. आमचा सर्व प्रकारे सांभाळ करावा हेच वडिलास विहित आणि कीर्तीरूप आहे."

**वारणेचा तह :**

अशा रीतीने शाहू महाराज व संभाजी राजे निर्हेतुक प्रेमाने एकमेकांस भेटण्यास सिद्ध झाले. नोव्हेंबर १७३० मध्ये शाहू महाराजांनी आपल्याकडील वजनदार माणसे व रक्षणार्थी पन्हाळ्यास पाठवून संभाजी राजास सातार्‍यास घेऊन येण्यास फर्माविले. फत्तेसिंग भोसले, प्रतिनिधी, अंबाजी पुरंदरे, कृष्णाजी दाभाडे, वगैरे सरदार संभाजी राजास सातार्‍यास आणण्याकरिता आपल्या सैन्यासह कोल्हापुरास गेले. तेथे संभाजी राजांनी त्यांचे यथोचित स्वागत केले. संभाजी राजास घेऊन हे सर्व सरदार सातार्‍यास येण्यासाठी डिसेंबर १६ रोजी पन्हाळ्याहून निघाले.[२] शाहू महाराज सातार्‍याहून निघालेच होते. त्यांनी कृष्णा तीरी मुक्काम केला. संभाजी राजांच्यासाठी प्रशस्त शामियाना पठारावर उघडला होता. त्यांत संभाजी राजे आले.[३] जख्तिवाडीच्या मैदानात भेटीची जागा मुक्रर झाली. उभयताकडील सरदार मिळून दोन लक्ष पावेतो लोक या भेटीच्या सोहळ्यास हजर होते. भेटी ठरल्यावर उभयता राजे आपआपल्या शामियान्यातून हत्तीवरून निघाले. लोकांचे मुजरे घेत घेत भेटीच्या जागेपर्यंत आले. थोडे अंतर राहिल्यावर उभयता महाराज हत्तीवरून उतरून घोड्यावर स्वार झाले. नजीक आल्यावर उभयता घोड्यावरून उतरले. संभाजी राजांनी शाहू महाराजांच्या पायावर मस्तक ठेविले. शाहू महाराजांनी त्यास उठवून आलिंगन दिले.

---

१. ऐ.प.ले. १४, १५.

२. पे.द. ११, ले. १०.

३. राजवाडे, खं. ८, ले. १११-११२, ११६, १२१, १२३.

उभयतांच्या भेटी झाल्या. वाद्ये वाजली. तोफांची सरवत्ती झाली. मेजवान्या, भोजनें झाली व दोन्ही बंधू साताऱ्यास गेले. संभाजी राजांचा साताऱ्यास दोन महिने मुक्काम होऊन तारीख १३ एप्रिल १७३१ रोजी तह ठरला. त्यासच 'वारणेचा तह' असे म्हणतात. ह्या तहाची कलमें[1] अशी (हा तह शाहू महाराजांनी संभाजी राजास लिहून दिलेला आहे) : (१) इलाखा वारुणमहाल तप्त संगम दक्षिण तीर कुळ दुतर्फा मुलुख दरोबस्त देखील ठाणी व किल्ले तुम्हास दिले असत ; (२) तुंगभद्रेपासून तहत रामेश्वर संस्थाने निम्मे आम्हाकडे ठेवून निम्मे तुम्हांकडे करार करून दिली असत ; (३) किल्ले कोपल तुम्हाकडे दिला; त्याचा मोबदला तुम्ही रत्नागिरी आम्हाकडे दिला ; (४) वडगांवचे ठाणे पाडून टाकावे ; (५) तुम्हाशी जे वैर करतील त्याचे पारिपत्य आम्ही करावे, तुम्ही आम्ही एक विचारे राज्यवृद्धि करावी ; (६) वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून तहत निवृत्तीसंगम तुंगभद्रेपावेतो दरोबस्त देखील गड ठाणी तुम्हाकडे दिली असत ; (७) कोंकण प्रांत सालशी पलीकडे तहत पंचमहाल अकोले पावेतो दरोबस्त तुम्हाकडे दिले असत ; (८) इकडील चाकर तुम्ही ठेवू नये ; (९) तुम्हाकडील चाकर आम्ही ठेवू नये ; (१०) मिरज प्रांत विजापूर प्रांतीची ठाणी देखील आथणी, तासगांव वगैरे तुम्ही आमचे स्वाधीन करावी. एकूण कलमे ९ करार करून तहनामा दिला असे, सदरहू प्रमाणे आम्ही चालू. यास अंतर होणार नाही.[2] याप्रमाणे वारणेच्या तहानें कोल्हापूरचे राज्य निर्माण झाले त्यात बदल असा फारच थोडा झाला. ते शिंदे होळकरांच्या राज्यासारखे एक मांडलिक संस्थान राहिले. कारण, संभाजी राजांनी स्वतःच्या अकर्तृत्वाने राज्याची सीमा कधी वाढविली नाही. आपण मालक आहोत ही संभाजीची भावना अखेरपर्यंत कायम होती. म्हणून शत्रूच्या पश्चात पेशवे जेव्हां मुखत्यारीने राज्याचा व्यवहार पाहू लागले तेव्हा कोल्हापूरकर स्वतंत्र बाण्याने वागू लागल्यामुळे त्यास कबजात ठेवणे पेशव्यास अवघड झाले. या तहाने शाहू महाराजांचा पक्ष व राणी ताराबाईचा पक्ष यामधील वाद मिटला. पुढे संभाजी राजे शाहू महाराजांकडे साताऱ्यावर वारंवार येऊन राहू लागले. एकंदर त्यांच्या सहा भेटी झाल्या. या सर्व भेटीत शाहू महाराजांनी संभाजी राजांस धाकट्या भावाप्रमाणे मोठ्या प्रेमाने वागविले. या भेटीचे कागद पुष्कळ ठिकाणी पहावयास मिळतात.

### मराठ्यांचा माळवा व गुजरातमध्ये प्रवेश :

बाळाजी विश्वनाथानी स्वराज्याच्या सनदा व दक्षिणच्या सहा सुभ्यांच्या चौथाई सरदेशमुखीची फर्मानें मिळविली. पण १७२० च्या सुरवातीस बाळाजी विश्वनाथ पेशवे दिवंगत झाल्यामुळे या सनदांची अंमलबजावणी

१. ह्या तहाची विस्तृत कलमे "करवीर छत्रपति घराण्याच्या इतिहासाची साधने" या भा. १-२, पृ. ३४-३५.

२. का. सं. प. या. २०, २१ ता. १६-४-१७३१ व शा. रो. १७६, ता. १३-५-१७३१, बाजीराव रियासत पृ. १६५-१६६. पे. द. ११. १५ व ३०, पे. द. २२-१०३; पे. द. ३. १०६, पे. द. ११-१९, वगैरे.

बाजीरावांवर पडली. खुद्द पेशव्यांकडे खानदेश, बंगाल, वऱ्हाडकडील मुलुखाची वसुली सोपविण्यात आली होती. पहिल्या दोन वर्षांत या मुलुखातून बाजीरावांनी चौथ वसूल केला. खानदेश, नेमाड, माळवा हे प्रांत एकमेकास जोडून आहेत. नेमाडातून पेशव्यांचे सैन्य फिरताना कित्येक फौजांनी माळव्यात शिरावे व लुटालूट करावी हा क्रम उदाजी पवार, शिंदे, होळकर यांनी कसा सुरू केला हे मागे सांगितले आहे.

निजाम-पेशवे भेट नालिछा येथे १८ मे १७२४ ला झाली. या भेटीत निजामाने १७१९ च्या बादशाही सनदेप्रमाणे दक्षिणच्या चौथ सरदेशमुखीचे हक्क कबूल करून शिवाय मराठे आपल्या मदतीस आले तर माळव्याची चौथाई व त्याच्या सैन्याचा खर्च देण्याचे मान्य केले असावे. १७२४ च्या डिसेंबरात बाजीरावाचे सैन्य अंबाजीपंत पुरंदरेच्या नेतृत्वाखाली उत्तर दिग्विजयास निघाले.[१] बरोबर भिवराव रेठरेकर व राणोजी शिंदे होते. ही सैन्ये यावेळी खानदेश-बऱ्हाणपुरच्या मार्गे माळव्यात न शिरता गुजरातेतून शिरली. यापुढील माळव्यातील स्वाऱ्या गुजरात मार्गे झाल्या आहेत. याचे कारण असे खानदेश बऱ्हाणपूर हा मार्ग निजामाच्या मुलुखाजवळून किंबहुना त्याच्या मुलखातून गेलेला, नुकतेच निजाम व पेशवे स्नेही झालेले आणि बादशहाच्या अधिकाऱ्याला दुखवू नये अशी शाहू महाराजांची इच्छा, यामुळे हा मार्ग सोडून मराठी सैन्य गुजरातेत शिरले. गुजरातेत नवीन सुभेदार सर बुलंदखान याचा प्रतिनिधी व हमीदखान यांची आपसात तेढ होती. दोन्ही पक्षांनी मराठ्यांना आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला. हमीदखानाच्या पक्षास मराठे मिळाल्यामुळे त्याने आपल्या प्रतिपक्षास चोपून काढले. इतक्यात इ. स. १७२५ डिसेंबरात स्वतः सर बुलंदखान मोठ्या तोफखान्यानिशी अहमदाबादेस दाखल झाल्यामुळे मराठ्यास काढते पाऊल घ्यावे लागले. अंबाजीपंत माळव्याकडे वळले आणि त्यांनी चौथाई-सरदेशमुखी वसूल केली. चौथाई-सरदेशमुखी प्रतिवर्षी मराठ्यास देण्याचे सुभेदाराने अभिवचन दिल्यामुळे माळव्यात ठिकठिकाणी मराठे अधिकारी नेमण्यात आले.[१]

पालखेडच्या विजयामुळे बाजीरावांचे वजन मराठमंडळात वाढले. पण त्यांच्याविरुद्ध दरबारी मंडळींची कारस्थाने कमी झाली नाहीत. शिवाय शाहू महाराजास यावेळी कर्ज झाले होते. देणेकरी तगादा लावीत होते. त्यांचे कर्ज फिटविण्यासाठी शाहू महाराज आपल्या पेशव्यास तगादा लावीत होते. १७२८ चा पावसाळा चिमाजी व बाजीराव या दोघांनी विचार करण्यात घालविला. शाहू महाराजास कर्जातून मुक्त करण्यासाठी आणि दरबारी लोकांच्या भांडणापासून थोडे दूर रहाण्यासाठी माळवा-बुंदेलखंडाच्या स्वारीवर जाण्याचे बाजीरावांनी ठरविले. यात त्यांना त्यांचे हस्तक मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे हे बऱ्हाणपुराजवळ छावणी करून होते. त्यांनी माळवा जिंकण्यास पाचारण केले.

---

१. म. रि. बाजीराव, पृ. १२२.

वरील दोन्ही सरदारांनी माळव्याचा जमीनदार नंदलाल मंडलोई याजशी संधान बांधिले. सवाई जयसिंगाची दोस्ती नंदलाल मंडलोईशी होती. आपल्या मर्जीतला सुभा माळव्यावर नेमून घ्यावा ह्या हेतूने सवाई जयसिंगाने राजा गिरधरलाल यास १७२५ मध्ये माळव्याच्या सुभेदारीवर नेमिले, पण गिरधरलाल उद्दाम बनला. तो सवाई जयसिंगाचे न ऐकता नंदलाल मंडलोईचा छळ करू लागला. इतक्यात होळकर व शिंदे यांनी नंदलाल मंडलोईशी संधान बांधिले. दक्षिणेतून माळव्यात येण्याच्या सर्व वाटा व उतार मंडलोईस ठाऊक होते. त्याने मराठ्यांच्या माळवा आक्रमणास संमती दिली.[1] यास सवाई जयसिंगाचाही आशिर्वाद मिळविला.

माळव्याचा सुभेदार गिरिधर बहादूर हुशार व कणखर वृत्तीचा होता. बादशाही हिताचे रक्षण करण्यास त्याने व त्याचा चुलत भाऊ दयाबहाद्दर यांनी कोणतीही संधी वाया जाऊ दिली नाही. त्यांनी माळव्यातून मराठ्यास हाकलून लावण्याचा आपला निश्चय बादशहास कळविला. बादशहानेही त्यांना ह्या कामात सर्व मदत देण्याचे कबूल केले होते. माळव्यातील कामगिरी हाती घेतलीत तर बादशहास त्या प्रांताची चौथ-सरदेशमुखी मराठ्यांस देण्याचे आम्ही सांगू असे सवाई जयसिंगाने बाजीराव पेशव्यांस कळविले होते.[2] बाजीराव व त्यांचे बंधू चिमाजी आप्पा यांनी माळवा जिंकण्याची आपली योजना आखली आणि दोघेही पुण्याहून माळव्यात जाण्याकरिता दोन दिशेने निघाले. चिमाजी आप्पानी पश्चिमेकडून बागलाण-खानदेशावरून माळव्यात प्रवेश केला. बाजीराव पूर्वेच्या बाजूने कूच करून अहमदनगर, वऱ्हाड, चांदा व देवगड पाठीशी घालून बुंदेलखंडात शिरले. दोघेही बंधू आणिबाणीच्या वेळी एकमेकास उपयोगी पडावे म्हणून एकमेकाशी संपर्क साधीत होते. चिमाजी आप्पांबरोबर मल्हारराव होळकर, राणोजी व उदाजी पवार हे नेहमीचे सरदार होते. शिवाय बाजी भिवराव रेठरेकर, गणपतराव मेहेंदळे, नारो शंकर, अंताजी माणकेश्वर आणि गोविंदपंत बुंदेले असे नव्या उमेदीचे तरणेबांड शिलेदार आपल्या पथकासह चिमाजी अप्पा-बरोबर होते. शिंदे, होळकर व पवार माळव्याच्या स्वारीची तयारी करण्या-करिता स्वारीच्या कित्येक दिवस अगोदर माळव्यात होते. चिमाजी आप्पा २५ नोव्हेंबरला नर्मदा तीरी गेले. गिरीधर बहादुरास मराठ्यांचा बेत समजल्यावर त्याने युद्धाच्या तयारीने सर्व घाट बंद केले व तो आमझरे येथे स्वतःचा चुलत भाऊ दयाबहाद्दर याजसह राहिला. आमझऱ्याच्या घाटात मराठी फौजेस कोंडून तिचा फन्ना पाडावा या हेतूने आपल्या प्रचंड तोफखान्याची त्याने रचना केली. पण मराठ्यांना तोफखान्याशी झुंजावयाचे नव्हते. त्यांच्याजवळ तोफखाना नव्हता. आमझऱ्याचा घाट बंद असे पाहून मराठ्यांनी मांडवगडाच्या घाटाचा मार्ग धरला. मांडवगडच्या वाटे मराठे वर चढले तेव्हा दयाबहादूरने त्यांना तोंड देण्याकरिता तोफेचे तोंड फिरविले. पण तोफखाना

१. सप्तम संमेलन वृत, पृ. १३-१४.

२. पे. द. १३, ले. १०.

इतक्या जलदीने कामास आला नाही. मराठ्यांनी चपळाई करून हल्ला चढविला. दोन प्रहर झुंज कडाक्याचे झाले. उदाजी पवार मारामारी करीत दयाबहादूरच्या हत्तीपर्यंत पोहोचले व वर चढून त्यांनी खाशाचे डोके कापले.[१] खासा सरदार मारला गेल्यावर त्याच्या सैन्याने पळ काढला, मराठ्यांस अगणित लूट सांपडली. पाडाव झालेले अठरा हत्ती[२] चिमाजी आप्पांनी परत आल्यावर शाहू महाराजांस नजर केले.

**माळव्याची वाटणी :**

माळवा मराठ्यांच्या ताब्यात आला. त्या प्रांताची वसुलाची व्यवस्था बादशाही धारे कायम ठेवून केली. पूर्वीच्या मोगली अंमलदारास काढून टाकून आपले दक्षिणी अंमलदार नेमिले. रयतेस कोणापासून इजा पोचू नये अशी तजवीज करून रयतेस सतुष्ट ठेवण्याची खबरदारी मराठ्यांनी घेतली.[३]

माळवा ताब्यात आल्यावर मराठी राज्याची हद्द सन १७२९ त यमुना नदीस जाऊन भिडली. ताब्यात आलेल्या प्रदेशाच्या व्यवस्थेची व वाटणीची तजवीज चिमाजी आप्पांनी व शिंदे, होळकर व पवार या सरदारांनी केली.

स्वराज्याचा अंमल पेशव्यांचे मार्फत हुजूर सरकारात यावा, निम्नेत फौजेचा खर्च करून नजराणा येईल ते हुजूर यावी असा तह करून दिला.

शिंदे, होळकर व यशवंतराव पवार या सर्वांशी तह केला की, जो मुलूख सरकारात यईल त्याचे हिस्से करून फौज जमा करून एक विचारे चालावे. हिस्से खालीलप्रकारे केले—सरकार शेकडा ३१, शिंदे शेकडा ३०, होळकर शेकडा ३० व पवार शेकडा ९ याप्रमाणे करार करून फौजा ठेवून चाकरीत उणं पडू देऊ नये येणेप्रमाणे ठराव केला.[४] पुढे या उत्पन्नाचे हिस्से थोडे निराळे झाले. ते असे: मुख्य सरकार ४५, शिंदे, होळकर प्रत्येकी २२½ व पवार १० असे हिस्से ठरवून महालांचे वसूल सर्वांनी मिळून करावे असे ठरले.[५]

**बुंदेलखंड मराठ्यांच्या ताब्यात :**

राजपुतांच्या अनुमतीने मराठ्यांना माळव्यात विजय मिळाला हे ऐकून बादशहा चिंतातूर झाला. माळव्याला लागूनच बुंदेलखंड आहे. त्याचा राजा छत्रसाल पन्ना मोगलांशी झगडून आपले स्वातंत्र्य अबाधित राखीत होता. राजा छत्रसालाचा पराभव करून त्यास मोगली सत्तेचा पाईक बनविले तरच मराठ्यांच्या आक्रमणास आळा बसेल असा विचार बादशहाने

---

१. म. रि. बाजीराव, पृ. ११९.

२. पे. द. २२, ले. ४४.

३. सरदेसाई, न्यू हिस्टरी ऑफ द मराठाझ, भा. २, पृ. २१५.

४. का. सं. प. या. पृ. ५३५, तह व करार मदार, पृ. १५२.

५. इ. सं. पे. द. पृ. १२७, २०३, २०८ व म. रि. बाजीराव, पृ. १३.

करून मराठे व छत्रसाल यांचा समाचार घेण्यासाठी अलाहाबादचा सुभेदार महंमद बंगश[1] यास हुकूम दिला. सन १७२८ च्या डिसेंबरात जैतपूर-नजीक बंगशाने छत्रसालावर हल्ला करून त्यास शरण आणिले. बंगशाचा पराभव करण्याकरिता छत्रसालाने अंतस्थ रीतीने पेशवे बाजीराव यांची मदत मागितली.[2] त्यानुसार बाजीराव पंचवीस हजार सैन्यानिशी छत्रसालाचे मुलुखात मार्च १७२९ त पोहचले.[3] मराठे-बंगश युद्धास तोंड लागले. बंगशजवळ वीस हजार फौज व तोफखाना होता. मराठ्यांनी त्यास जेर करून कोंडले, गोट लुटून फन्ना केला. सहा हजार फौज बुडविली. सरदार मृत्यू पावला. एकोणीस हत्ती पाडाव झाले.[4] मेपर्यंत जैतपुरावर बंगशाने बाजीरावास करार लिहून दिला की, "आम्ही बुंदेलखंड सोडून जातो, पुन्हा छत्रसालावर चढाई करणार नाही." मराठ्यांना विजय मिळाला. छत्रसालाची सुटका बाजीरावांनी केली म्हणून छत्रसाल खूष होऊन त्याने बाजीरावास आपला पुत्र मानून त्यास आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा तोडून दिला.[5] याच स्वारीत बाजीरावास मस्तानीची प्राप्ती झाली. बाजीराव व चिमाजी आप्पा हे विजय संपादून १६ जुलै १७२९ ला पुण्यास आले[6] आणि तिथून छत्रपतींच्या बोलावण्यावरून[7] पावसाळ्यात दोघे बंधू महाराजांच्या दर्शनास सातार्‍यास गेले.

बुंदेलखंड हाती आल्यामुळे मराठ्यास या स्वतःच्या मालकीच्या मुलुखात मुख्य ठाणे ठेवून आग्रा, दिल्ली, दुआबकडे स्वार्‍या करणे सोपे झाले.

### बंगशला प्रायश्चित्त व निजामाची निराशा :

जतपुरावर मराठ्यांच्या हातून पराभव पावून महमदखान बंगश दिल्लीस परतला. तिथे त्यास पराभवाचे प्रायश्चित्त म्हणून आपली बदली अलाहाबाद सुभ्यावरून झाल्याचे समजले. तरी पण माळव्यामध्ये आपण पाय रोवून मराठ्यास हुसकून लावण्याची स्वप्ने तो रंगवित होता. त्यासाठी त्याने बादशहाकडे माळव्याची मागणी केली. बादशहाने त्याची नेमणूक या प्रांतावर केली. मात्र त्याने निजामाच्या हालचालीवर नजर ठेवावी अशी त्याला

---

१. महंमदखान बंगश गझन फर्जंग (ज. १६६५, मृ. १७४३) हा शूर पण अफगाणिस्तानातील कोहत प्रांतापैकी बंगश खोऱ्यातला मूळ. याने बादशाही फौजेत येऊन आपल्या पराक्रमाने सय्यदास मदत केल्यामुळे मोठमोठ्या जहागिरी संपादिल्या. त्याने फर्रुखसेअर बादशहाच्या नावे फर्रुखाबाद शहर स्थापून तेथे वास्तव्य केले. फर्रुखाबादच्या नबाबास बंगश नबाब असे म्हणतात. इ. स. १७२१ मध्ये बादशहाने त्यास अलाहाबादची सुभेदारी दिली. ती छत्रसालवर चालून गेला तेव्हा बाजीरावानी छत्रसालास मदत करून महंमद बंगशाचा पराभव केला. बंगशाने पुढे बादशहाच्या हुकुमावरून मराठ्यास वेळोवेळी त्रास दिला. तो १७४३ मध्ये मरण पावला.

२. म. रि. बाजीराव, पृ. १४१.

३. पे. द. ३२, ले. ३६.

४. रा. खं. ३, ले. १४; पे. द. १३, ले ४५ व १० ले ५४.

५. तह व करारनामे, पृ. ९.

६. खोबरेकर, म. स्वा. मुक्काम, पृ १४३.

७. पे. द. १७, ले. १८, शा. रो. १०७.

अंतस्थ रीतीने सूचना देण्यात आली होती. बंगशाने १७३० नोव्हेंबरपासून माळव्यात शिरून २५ फेब्रुवारी १७३१ पर्यंत त्यांना धारेपर्यंत मागे हटविले व १७३१ च्या उन्हाळ्यात मराठ्यांची माळव्यांत पिछेहाटच होत गेली. कारण मराठा फौज पेशव्यांबरोबर गुजरात प्रकरणात दाभाडेशी झगडण्यात गुंतली होती. हा भाग पुढे निराळा सांगितला आहे. याच वेळी बंगशला वाटले की, मराठ्यांचा नाश आपल्या एकट्याच्याच हातून होणे मुष्कील, दुसऱ्या प्रबळ सरदारांची मदत झाली तर मराठ्यांना नर्मदेपलीकडे हाकलून लावता येईल. याकरिता त्याने निजामाशी मैत्री जोडण्यासाठी निजामाची भेट घेण्याची इच्छा दर्शविली. निजामही अशा भेटीस उत्सुक होता. दोघांची भेट अकबरपुरावर झाली. दोघांनी एकमताने चालून पेशव्यांविरुद्ध सेनापति त्रिंबकराव दाभाडेस मदत करावी ही निजामाची सूचना बंगशने तावडतोब मान्य केली. त्याप्रमाणे बंगश व निजामाची सैन्ये गुजरातच्या वाटेकडे दाभाड्यांच्या मदतीकरिता चालू लागली. बाजीरावास हे समजताच त्याने ही मदत जाण्यापूर्वीच दाभाड्याचा पराभव केल्यामुळे दोघांचे बेत जागच्या जागी जिरले. दिल्ली दरबारास बंगशने निजामाशी केलेले सख्य आवडले नाही. दोघांचे मेतकूट जमले तर हे न जाणो दिल्लीवर चाल करून बादशहास आपल्या ताब्यात घेतील अशी धास्ती दरबारातील उमरावास उत्पन्न झाली. इतक्यात मराठे १७३१ च्या हिवाळ्यात परत आले. माळव्यातील जमीनदार मराठ्यास अनुकूल होतेच. त्यांनी बंगशच्या हुकुमाविरुद्ध मराठ्यास वसूल दिला. त्यामुळे जमीनदारास अभय मिळाले. मराठी सैन्य चौफेर वावरत राहिल्यामुळे बंगशला वसूल मिळू शकला नाही. त्यामुळे मोगल खजीना रिकामा पडत चालला. सुभ्यातील छोटे छोटे संस्थानिक राजेरजवाडे, जमीनदार उघड उघड रीतीने मराठ्यास सामील झाले. बंगशने मराठ्यांचा पराभव करण्यास कुमकेची याचना दिल्लीकडे केली. दिल्लीच्या बादशहास कुमकेचा अर्ज मिळताच त्याने बंगशला परत बोलाविले व जयसिंगाची माळव्याच्या सुभेदारीवर नेमणूक केली.

**गुजरातवर मराठ्यांचे वर्चस्व :**

अकबराने गुजरात प्रांत जिंकून तिथे तोडरमल्लाची सुभेदार म्हणून नेमणूक केली. तिथपासून गुजरात सुभा मोगलांच्या ताब्यात होता. १७११ ला गुजरातचा ४४ वा सुभेदार निजामाचा बाप गाजीउद्दीन मरण पावला व त्याचे जागी अमानतखान याची नेमणूक झाली. त्याचे कारकीर्दीत खंडेराव दाभाडे व दमाजी गायकवाड, कदमबांडे या सरदारांनी गुजरातेत अनेक स्वाऱ्या केल्या आणि वसूल आणिला. शाहू महाराजांनी तारीख ११ जानेवारी १७१७ रोजी खंडेराव दाभाडे यास सेनापतीपद देऊन गुजरातेत मोहिम करून तो प्रांत सर करण्याचा हुकूम दिला. खंडेरावांचे पुत्र त्रिंबकराव आणि त्यांचे हस्तक पिलाजी गायकवाड यांनी गुजरातेत अनेक स्वाऱ्या करून मराठी सत्ता वाढविली. १७२७ मध्ये दाभाडे व गायकवाड यांनी गुजरात प्रांतावर चौथाईची खंडणी लागू केली. तेव्हा मराठ्यांचा बंदोबस्त करण्यासाठी

सर बुलंदखान ह्यास गुजरातचा ५३ वा सुभेदार नेमून पाठविले आणि निजामाचा पुतण्या हमीदखान याची नेमणूक रद्द करून त्यास परत बोलाविले. निजामास यामुळे राग आला आणि त्याने हमीदखानास अहमदाबाद न सोडण्या-विषयी लिहिले. ही बातमी दिल्लीस कळताच सुरतेचा सुभेदार रुस्तुम-अलीखान यास असा संदेश आला की, त्याने तात्काळ अहमदाबादचा सुभा हमीदखान यास हाकून द्यावे. यावरून रुस्तुम अलीने पिलाजी गायकवाडास अनुकूल करून घेऊन अहमदाबादेवर चाल केली. ही वार्ता हमीदखानास कळताच त्याने कंठाजी कदमबांडे या मराठे सरदारास आपल्या पक्षाकड वळवून घेतले आणि बडोद्याकडे चाल केली. दोन्ही सैन्यांनी आडास गावी तीन कोसाच्या अंतराने तळ दिला. दोन मराठे सरदार विरुद्ध बाजूने मिळून युद्धास सिद्ध झाले असा वरकरणी देखावा दिसला. पण लढाईस तोंड लागताच रुस्तुम अल्ली मारला गेला. त्याजकडील मराठे हमीदखानास मिळाले. हमीदखानाने रुस्तुम अल्लीचा पाडाव केला. हमीदखानाने कंठाजी व पिलाजी यास समजावून महीच्या पूर्वेकडील प्रांताची चौथाई कंठाजीस देण्याचा करार घडवून आणला. १७२६ मध्ये गायकवाड, कदमबांडे हे सरदार गुजरातेत बलिष्ठ झाले.

गुजरातचा निम्मे मोकासा पूर्वी शाहू महाराजांनी बाजीराव पेशव्यांचे बंधू चिमाजी आप्पा यास दिला होता. पण तो त्यांनी १७२७ मध्ये परत काढून घेतला व दाभाड्यास दिला. पेशवे व दाभाडे यांच्यात वाकडेपणा यावयास हा गुजरातचा मोकासाच कारणीभूत झाला. यानंतर शाहू महा-राजांनी पेशव्यांची हुजूरची मुतालिकी चिमाजी आप्पास दिली. या आधारावर पेशव्याने व चिमाजी आप्पांनी गुजरात व माळवा येथील चौथाई वसूल करण्याचा उद्योग झपाट्याने सुरू केला. मराठ्यांच्या या उपक्रमास दिल्लीच्या बादशहाने आळा घालण्याचे प्रयत्न चालविले. सर बुलंदखानानेही आपली शिकस्त केली. मराठे आपसात झगडत होते त्याचा फायदा घेण्याचा प्रयत्न केला. पण इ. स. १७३८ मध्ये त्यांची गाठ बाजीराव पेशव्यांशी पडल्यावर सर बुलंदखानाने पेशव्यांबरोबर काही करार करून घेऊन त्यास गुजरातच्या चौथाई-सरदेशमुखीच्या सनदा करून दिल्या. हा प्रकार बादशहा व त्याचा वजीर खानदौरान यास आवडला नाही. निजामाप्रमाणे सर बुलंदखानही गुजरातेत स्वतंत्र होण्यासाठी बंडखोरी करितो अशी समजुत करून याचे पारिपत्य करण्यासाठी बादशहाने मारवाडचा राजा अभयसिंग यास गुजरातच्या सुभ्यावर नेमून पाठविले. त्याने सन १७३० मध्ये अहमदाबाद काबीज करून सर बुलंदखानास पकडून दिल्लीस पाठवून दिले. गुजरातच्या क्षेत्रात पेशव्यांनी हस्तक्षेप केला त्यामुळे दाभाडे संतप्त झाले आणि निजामाकडे संधान बांधून पेशव्यांचे वर्चस्व नाहीसे करण्याच्या उद्योगास लागले. निजाम व बंगष यांनी दाभाड्यास मदत करण्याची तयारी केली. निजामाने आपला तोफखाना व लष्कर दाभाडेच्या मदतीस पेशव्यांविरुद्ध पाठविले. पण ही कुमक दाभाड्यास मिळण्यापूर्वीच पेशव्यांनी सावळीहून सेनापती दाभाडेंवर चाल

केली. दोन्ही फौजांची झुंज भिलपुरजवळ धुवानी येथे १७३१ मध्ये झाली. त्यात सेनापती दाभाडे मारले गेले व पेशव्यास विजय मिळाला. सेनापती त्रिंबकराव दाभाडे पडल्यावर शाहू महाराजास फारच वाईट वाटले. दाभाडे ब्रह्मेंद्र स्वामींचे शिष्य होते. स्वामीस दाभाडे गेल्यामुळे दुःख झाले. हा प्रकार ऐकून स्वामी उद्गारले, "मारत्याचे जग आहे". तथापि हा प्रकार वाढू नये म्हणून त्रिंबकराव दाभाडे ह्यांचे पुत्र यशवंतराव यास छत्रपतींनी सेनापति नेमिले व त्यांच्याशी असा करार केला की, गुजरातची चौथाई त्यांनी घ्यावी व उत्पन्नाचा निम्मा भाग पेशव्यांमार्फत आपणास द्यावा. त्रिंबकराव दाभाडयांच्या मृत्यूनंतर दाभाडयांतर्फे पिलाजी गायकवाड गुजरातचा कारभार पाहू लागले. कारण यशवंतराव दाभाडे यावेळी लहान होते. सन १७३१ पासून गायकवाडास "सेनाखासखेल" हे पद मिळाले.

मराठयांच्या भांडणाच्या वेळी गुजरातवरील मोगल सुभेदार अभयसिंग हा अहमदाबादेस होता. त्यांनी दाभाडयांच्या भांडणामुळे मराठमंडळात उडालेला गोंधळ व गुजरातेत माजलेली अव्यवस्था याचा फायदा घेण्याचे ठरविले. दाभाडयांच्यातर्फे गायकवाड गुजरातची व्यवस्था पहात होते तेव्हा त्यांच्याच मुलुखात डभई व बडोदे भागात त्याने मोठी धमाल उडवून दिली. पिलाजी गायकवाडाच्या ताब्यातून बडोदे हिसकावून घेतले व डभईस वेढा घातला. अशा प्रकारे एका बाजूने गुजरात सर करण्याचा प्रयत्न चालविला आणि दुसऱ्या बाजूने शाहू महाराजांकडून अभयसिंगाने गायकवाडापासून आपणास त्रास होऊं नये म्हणून अभयपत्र मिळविले. अभयसिंग हा इतका नीच होता की, त्याने आपल्या बापाला मारून राज्य मिळविले होते.

शाहू महाराजांचे अभयपत्र अभयसिंगाने मिळविल्यावर त्याने पिलाजीस तहाच्या वाटाघाटीस बोलाविले. वरकरणी सख्य दाखविले. एकमेकांचे वकील एकमेकांकडे जाऊ येऊ लागले. पिलाजीसुद्धा भेटीस निघाले असता डाकोरजवळ मारेकरी घालून पिलाजीचा खून करण्याचा प्रयत्न केला. मारेकरी तात्काळ पळून गेले. पिलाजीना उपचारासाठी बडोद्यास आणण्याचा प्रयत्न झाला. परंतु रस्त्यातच सावळी येथे त्यांचे देहावसान झाले[१] (२३ मार्च १७३२). यामुळे पिलाजींचे पुत्रास चेव चढला. त्यांनी व दाभाडयांनी मातोश्री उमाबाईसह अहमदाबादेवर चाल केली. अहमदाबादेस वेढा दिला. तेव्हा अभयसिंगाने दमाजी गायकवाडास गुजरातची चौथाई व सरदेशमुखी देण्याचा करार लिहून दिला व अहमदाबादच्या खजिन्यातून ८० हजार रोख मराठ्यास देण्याचे ठरविले. रक्कम पदरात पडेपर्यंत जवानमर्दबाबी यास अभयसिंगाने दमाजीच्या ओलीस ठेविले. दुसऱ्या वर्षी दमाजीने अभयसिंगाच्या राज्यातील जोधपुरावर हल्ला चढविला. तेव्हा जोधपूरचे रक्षण करण्यासाठी अभयसिंगास अहमदाबादेहून मारवाडात स्वप्रांती जावे लागले. त्याच्या गैरहजेरीत हस्तक रतनसिंग भंडारी गुजरात

१. शा. रो. १६१, राजवाडे खं. २, पृ. ६४; पे. द. १२, ले. ३८ व ३०, ले. ३१७.

सुभ्याची व्यवस्था पहात होता. त्याजवर दमाजीनी पुन्हा हल्ला केला व रतनसिंगास पळता भुई थोडी करून सोडले. इ. स. १७३४ मध्ये दमाजीनी बडोद्यावर हल्ला करून तेथील किल्लेदार शेरखान बावीस हुसकून लाविले व बडोदा ताब्यात घेऊन तिथे राजधानी केली. इथूनच काठेवाडचात मराठचांच्या मुलूखगिऱ्या स्वाऱ्या सुरू झाल्या.

• • •

पेशवे बाजीराव--मोगल सत्तेस तडाखे

## कालसूची

| इ. स. | |
|---|---|
| १७२६ . . . . | सिद्दी याने निजाम उल्मुल्क याच्या चिथावणीवरून पालगडाखाली येऊन दंगा केला. |
| १७२६, सप्टेंबर. . . | ब्रह्मेंद्र नावाचे स्वामी कर्नाटकात भिक्षार्थ स्वारीस जातात. |
| १७२७ . . . . | च्या सुरूवातीस ब्रह्मेंद्रस्वामी कर्नाटकातून कोकणात माखजन मुक्कामी येतात. |
| १७२७, मार्च . . . | बाजीरावाचे सांगण्यावरून स्वामी देशावर धावडशी मुक्कामी रहातात. |
| १७२९, जुलै ४ . . . | कान्होजी आंग्रे मृत्यू. |
| १७३० . . . . | बादशहा माळव्याहून जयसिंगाची बदली करून त्या जागी महंमदखान बंगश याला आणतो. |
| १७३०, ऑगस्ट . . | स्वतः दीलपसिंग सातान्यास येतात. |
| १७३० . . . . | शाहू महाराज पिलाजी जाधव यास कोळवणात फिरंग्यांवर पाठवतात. |
| १७३०-३१ . . . | बाजीराव, कोल्हापूरचे संभाजी महाराज व दाभाडे यांची प्रकरणे मिटवितात |
| १७३१, मार्च . . . | बंगश उज्जैनला येऊन निजाम उल्मुल्क याची भेट घेतो. |
| १७३१, डिसेंबर १४ . | बुंदेलखंडाचा छत्रसाल मरण पावतो. |
| १७३१ . . . . | शाहू महाराज, फत्तेसिंग व बाजीराव यांची कोकणात रवानगी करतात. |
| १७३२, मे २० . . . | शाहू महाराज जंजिऱ्याची लढाई संपुष्टात आणण्यासाठी श्रीनिवास प्रतिनिधी, आनंदराव सोमवंशी व कृष्णाजी दाभाडे यांस कोकणात पाठवतात. |
| १७३२, जुलै २९ . . | पेशवे–शिंदे, होळकर व पवार यास बोलावून वाटाघाटी करतात. |
| १७३२, बुधवार, . . | रोहे–रामेश्वर येथे निजाम व बाजीराव यांची भेट होते. |
| १७३३ . . | बादशहा, सवाई जयसिंग यास माळव्याची सुभेदारी देतो. |
| १७३३, एप्रिल . . . | चिमाजी आप्पा आपला मुक्काम बुंदेलखंडात करतात. |
| १७३३ . . . . | हबशांचा पाडाव करण्यासाठी ब्रह्मेंद्रस्वामींच्या सांगण्यावरून बाजीरावाची जंजिऱ्यावर स्वारी. |

| | |
|---|---|
| १७३३, जून ८ . . . | प्रतिनिधी कारस्थान रचून इतिहास प्रसिद्ध रायगड किल्ला सर करतात. |
| १७३३, ऑगस्ट १८ . . | सखोजी आंग्रे मृत्यू. |
| १७३३, डिसेंबर . . | सिद्दीच्या मोहिमेंत प्रतिनिधीशी न पटल्यामुळे बाजीराव पुण्यास परततात. |
| १७३४ . . . . | च्या दिवाळीत मराठी फौजा उत्तरेत फिरकू लागल्या. |
| १७३४ . . . . | च्या पावसाळ्यात आपली जरब मोगलास दाखविण्यास शिंदे, होळकर खंडण्या वसूल करतात. |
| १७३५, फेब्रुवारी १४ . | पेशव्यांच्या मातोश्री राधाबाई काशियात्रेस निघतात. |
| १७३५, एप्रिल १८ . . | राधाबाई आपल्या परिवारासह नर्मदा पार मुक्काम करतात. |
| १७३५, जून . . . | मराठे मोगल युद्धात मराठ्यांना काहीच लाभ होत नाही व तें दक्षिणेत परततात. |
| १७३५, जुलै ६ . | मराठे सरदार मोगलास खडे चारतात व विजयश्री खेंचून आणतात. |
| १७३५, ऑक्टोबर ३. . | पेशवे खंडणीचा कायम विचार ठरविण्यासाठी शिंदे, होळकर बाजीराव याजसह उत्तरेस निघतात. |
| १७३५, ऑक्टोबर १७ . | पेशव्यांच्या मातोश्री राधाबाई काशीस दाखल होतात. |
| १७३५, डिसेंबर २३ . . | पेशव्यांच्या मातोश्री काशिहून गयेस प्रयाण करतात. |
| १७३६, फेब्रुवारी ३ ते फेब्रुवारी ७ . . | राणाजी, पेशव्यांच्या खंडणीच्या मागण्या कबूल करतो व त्यास ठेवून घेतो. |
| १७३६, मार्च ४. . . | सवाई जयसिंह व बाजीराव यांच्या भेटी होतात. |
| १७३६, मार्च २० . . | चिमाजी आप्पा कोकणात जातात. |
| १७३६, मार्च २० . . | रेवास नजीक श्रीगांव येथे सिद्दी व मराठे या चकमकींत सिद्दी मारला जातो |
| १७३६, एप्रिल १९ . . | उंदेरीचा किल्लेदार सिद्दी याकूबही, सिद्दी व मराठ्यांचे युद्धात मारला जातो. |
| १७३६, मे . . . | बाजीरावसाहेब दक्षिणेत येतात. |
| १७३६, मे . . . | पेशव्यांच्या मातोश्री राधाबाई पुण्यास दाखल होतात. |
| १७३७, जानेवारी १२ . | बाजीराव पेशवे नर्मदा पार होऊन शिंदे पवारांसहित भेलशास वेढा घालतात. |
| १७३७, मार्च २३ . . | खानडौरान, बंगश व सादतखान यांची भेट आग्र्यास होते. |
| १७३७, मार्च २८ . . | पेशवे दिल्लीस कुशबंदी शहर येथे मुक्काम करतात. |
| १७३७, जुलै १७ . . | दिग्विजय मिळवून पेशवे पुण्यास परत येतात. |
| १७३९ . . . . | बादशहा जयसिंग यास बंगशाचे जागी माळव्याचा गव्हर्नर म्हणून नेमतो. |
| १७४५, जानेवारी २३ . | तुळाजी आंग्रे गोवळकोट घेतात. |

# ६

## पेशवे बाजीराव--मोगल सत्तेस तडाखे (१७३२--१७३८)

जंजिरेकर सिद्दी—सिद्दीकडून ब्रह्मेंद्र स्वामीचा उच्छेद — जंजिरा स्वारीवर प्रतिनिधींची रवानगी — पेशवे बाजीराव व फत्तेसिंग यांची हबशी मुलुखात चढाई — पेशवे प्रतिनिधी वैर यशाच्या आड — सिद्दीबरोबर बाजीरावांचा तह— सिद्दी सातचा पाडाव — माळव्यातील राजकारण — रोहे रामेश्वर येथे बाजीराव निजाम भेट — शिंदे-होळकरांचे उत्तरेतील पराक्रम — खान डोरानवर विजय — तड-जोडीचे प्रयत्न — पेशव्यांची मातोश्री राधाबाईची काशीयात्रा — पेशव्यांची दिल्लीवरील चढाई — बाजीरावांचा दिल्लीत मुक्काम.

### जंजिरेकर सिद्दी :

बाजीरावाची दृष्टी उत्तरेकडील विजयावर जशी होती तशीच कोकणातील तद्देशीय वसाहतवाद्यांच्या हालचालीवरही होती. कोकणात शाहू महाराजाच्या राजवटीच्या सुरुवातीस सहा सत्ताधीश होते : (१) वसई, ठाणे, चौल व गोवे या प्रांतात पोर्तुगीज ; (२) मुंबईस इंग्रज ; (३) जंजिऱ्यास हबशी; (४) अलीबागेस आंग्रे; (५) सावंतवाडीस सावंत व (६) मालवणपासून पन्हाळ्यापर्यंतच्या प्रदेशात कोल्हापूरकर.

### सिद्दी-आंग्र्यांचा झगडा :

आंग्र्यांचा तह पेशव्यांशी होऊन आंग्रे पेशव्यांच्या अंकित झाले. तिथपासून त्यांच्या मुलुखावर शाहू महाराजांचा अंमल सुरू झाला. आंग्र्यांशिवाय इतर पाच सत्ताधिश कोंकणात होते त्यापैकी पोर्तुगीज, इंग्रज व सिद्दी ह्यांच्याशी आंग्र्यांचा संबंध येई व झगडे सुरू होत.

जंजिऱ्याचा सिद्दी हा मलीकंबरपासून जंजिऱ्यास राहून दर्यावर्दीपणा करू लागला. औरंगजेब बादशहाने या आपल्या जातभाईस मोगलांचे आरमाराधिपति नेमून त्याजकडे सुरत ते मक्का प्रवास करणाऱ्या मुसलमान यात्रेकरुंचे संरक्षण करण्याचे काम सोपविले. त्याने उंदेरीचे बेट काबीज केले आणि मराठी मुलुखात दंगेधोपे करण्यास सुरवात केली. सिद्दीच्या मुलुखास लागूनच आंग्र्यांचा मुलूख होता. सिद्दीचा त्रास आंग्र्यास होऊ लागला. सिद्दी आंग्र्यांच्या विरुद्ध मुंबईचे इंग्रज व गोव्याचे पोर्तुगीज यांचीही मदत घेत असे. अशा स्थितीत सिद्दींना नस्तनाबूद करणे मराठ्यांच्या कामगिरीपैकी एक भागच होता.

सिद्दी मराठ्यास वारंवार त्रास देत असे. त्याने इ. स. १७२६ मध्ये निजाम-उल्मुल्क याच्या चिथावणीवरून पालगडाखाली येऊन दंगा केला.[१] १७१९ च्या

---

१. शा. म. रो. पृ. ७.

पातशाही सनदेप्रमाणे सिद्दीचा हा गैरशिस्त दंगा मोडून काढणे मराठ्यास प्राप्त झाले. आपआपल्या मुलुखातील दंगेधोपे मिटविण्याचे काम त्या त्या सरंजामी सरदारांनी करावयाचे असा नियम असल्यामुळे शाहू महाराजांनी ती कामगिरी कान्होजी आंग्रे यास सांगितली. एकट्या कान्होजीरावास सिद्दीचा पराभव करणे कठीण म्हणून त्यानी हुजुरून सैन्य पाठवून द्यावे असा मसुदा शाहू महाराजांकडे लिहून पाठविला.[१] बाजीरावसाहेब यावेळी निजामाशीं लढण्यात गुंतलेले होते म्हणून शाहू महाराजांनी कान्होजींना कळकळीनं निरोप पाठविला की, तुम्ही कोंकण प्रांताचे रक्षण करण. त्यावरून कान्होजीरावांनी हबशांशी लढण्याचा उपक्रम जारीने हाती घेतला. हबशांच्या व आंग्र्यांच्या जागोजाग चौक्या बसल्या व एकमेकांची गावे लुटण्याचा दोघांनी धुमधडाका चालविला. ही लढाई ऐन रंगात येत असताच खाली सांगितलेली एक अशी घटना घडली की, त्यामुळे पेशव्यास आंग्रे यांच्या मदतीस हबश्यांविरुद्ध कोकणात धावून जावे लागले.

### सिद्दीकडून ब्रह्मेंद्रस्वामींचा उच्छेद :

यावेळी कोकणात परशुराम क्षेत्री ब्रह्मेंद्र स्वामी नावाचे एक साधू रहात होते. ह्या साधू महाराजास तत्कालिन मराठे सरदार फार मान देत असत. साधूचा उपदेश व हुकूम शिरोधार्य मानणे हे आपले एक कर्तव्य बहुतेक सरदार मानीत होते. यावरून ब्रह्मेंद्र स्वामींच्या मोठेपणाची कल्पना होते. हबशी, पोर्तुगीज व इंग्रज यांचीही कामे स्वामी करीत असे. इ. स. १७२६ च्या सप्टेंबरात हे स्वामी कर्नाटकात भिक्षार्थ स्वारीस गेले. जाताना हबशाने सावनूरच्या नबाबाकडून आपला एक हत्ती प्रांतोप्रांती सत्ताधीशांच्या तडाख्यातून संभाळून घेऊन येण्यास स्वामीस विनंती केली व हत्ती सुरक्षित आणण्याकरिता प्रांतोप्रांतीच्या सत्ताधिशांची दस्तके घ्यावी असे हबशांनी स्वामीस सुचविले. "परंतु तुमचे काय हत्ती असतील ते समागमे येतील कोणाचे दस्तकाचे प्रयोजन नाही." असे उत्तर स्वामींनीं हबशास दिले.[२] १७२६ च्या हिवाळ्यांत कर्नाटकात भिक्षा मागून १७२७ च्या आरंभी स्वामी हत्तीसमागमे कोकणात माखजनच्या चौकीवर आले. तिथे आंग्र्यांची चौकी होती. हत्ती हबशाचा आहे व त्याला दस्तक नाही असे कळल्याबरोबर आंग्र्यांच्या चौकीदारांनी हत्ती पकडून ठेविला आणि त्याची रवानगी जयगडला केली. ही बातमी सिद्दी सात हबशीस गोवळकोटास कळली. आपला हत्ती आंग्र्यांच्या हाती काहीतरी निमित्त काढून स्वामींनी जाऊ दिला असा समज सिद्दी सातचा झाला. त्याने तो हत्ती आंग्र्यांकडून परत मिळविण्याचे सनदशीर मार्ग सोडून ब्रह्मेंद्र स्वामींचा उच्छेद करण्याचे योजिले. योजनेप्रमाणे परशुराम क्षेत्रावर एकदम हल्ला करून गाव व देवालय लुटले. गांवातील व देवळातील बायकामुलांची अब्रू घेतली.[३] आंग्र्यांनी हत्ती नेला व परशुराम क्षेत्र म्लेंच्छांनी उध्वस्त केले.

---

१. शा. रो. पृ. ६१.
२. ब्र. स्वा. च. पृ. १४.
३. राजवाडे, खं. ३, ले. १.

ह्या दोन्ही बातम्या स्वामीस एकदम समजल्या व त्या बातम्यांनी स्वामीच्या हृदयाचा ठाव घेतला. "हत्ती सोडून दे नाहीतर तुझें कल्याण होणार नाही." असा शापीत मसुदा स्वामींनी आंग्र्यांकडे पाठविल्यावर आंग्र्यांनी हत्ती सोडून दिला. तो हवशांकडे पोचला. जंजिरेकर हवशानेही सिद्दी सातला एक खरमरीत पत्र पाठवून स्वामींची जप्त केलेली चीजवस्तू त्यास परत करण्यास फर्माविले, स्वामीसही त्याप्रमाणे कळविले. सिद्दी सातने स्वामी स्वतः भेटीस आल्यास आपण दोन गावे इनाम देण्याचे कबूल केले. पण यावर स्वामीचा विश्वास बसेना. इतःपर कोकणात रहाणे मुष्कील. वरघाटी जाणे सुरक्षिततेच्या दृष्टीने इष्ट असे मनाशी ठरवून स्वामीनें कोंकण त्याग करण्याचे ठरविले. हा विचार कान्होजीस कळताच त्यानी स्वामीस वरघाटी न जाण्याची शपथ घातली.[१] त्यावरून स्वामी आणखी एक वर्ष कोंकणात राहिले व पुढे बाजीराव पेशव्यांच्या सांगण्यावरून १७२७ च्या मार्चात सातारा जिल्ह्यातील धावडशी गावी येऊन राहिले ते कायमचेच. कान्होजी आंग्रे १७२९ त निवर्तले. पुढील वर्षी १७३०-३१ त बाजीरावांनी कोल्हापूर संभाजी महाराज व दाभाडे यांची प्रकरणे उरकली. या मुदतीत आपला बहुत सन्मान करणाऱ्या सातारा छत्रपतींना व आपला शब्द झेलणाऱ्या बाजीराव पेशव्यास हवशांचा पाडाव करण्याची टोचणी सतत लावावयाची कामगिरी ब्रह्मेंद्र स्वामींनी केली. त्याचे दृष्यफल म्हणजे, बाजीरावांची जंजिऱ्यावरील १७३३ तील स्वारी होय.

### जंजिरा स्वारीवर प्रतिनिधींची रवानगी :

जंजिरा जिंकून घेण्याच्या निर्धाराने बाजीराव पेशव्यांनी तयारी करण्यास सुरवात केली. मराठ्यांना जंजिरा जिंकता आला असता तर पश्चिम किनारा पूर्णपणे मराठ्यांच्या ताब्यात आला असता. पण मराठे सरदारांची आपसातील दुही ह्या कृत्याच्या आड आली. स्वतः शाहू महाराजसुद्धा जंजिऱ्यावर स्वारी करण्याच्या तयारीस लागले. त्यानी १७३० मध्ये पिलाजी जाधवरावास कोळवणात फिरंग्यावर पाठविले.[२] व श्रीनिवासराव प्रतिनिधीची रवानगी कोकणात केली. प्रतिनिधीनी अंजनवेलीस मोर्चे लाविले.[३] प्रतिनिधींना सहाय्य सेखोजी नाईकांनी शाहू महाराजांच्या सांगण्यावरून दिले. पण सेखोजीचे व प्रतिनिधींचे जमेना. तेव्हा प्रतिनिधींना सेखोजीच्या मदतीशिवाय काहीच निर्णायक हालचाल करता येईना. सेखोजी आपणास मदत करण्यास चालढकल करतात, स्वामींचे ऐकत नाही असे शाहू महाराजास व बाजीराव पेशव्यास प्रतिनिधीनी सांगितले. त्यामुळे बाजीरावांच्या व शाहू महाराजांच्या मर्जीतून सेखोजी उतरले. अशा रीतीने ब्रह्मेंद्र स्वामींच्या लुडबुडेपणामुळे जंजिऱ्याच्या स्वारीचा वेग कमी होत चालला.

---

१. राजवाडे, खं. ३, ले. १०८.

२. रा. खं. शकावली, पृ. ५९.

३. रा. खं. ३, ले. ३०५.

### बाजीराव पेशवे व फत्तेसिंग यांची हबशी मुलुखात चढाई :

जंजिऱ्याचा प्रश्न निकालात काढण्यासाठी शाहू महाराजांनी फत्तेसिंग व बाजीराव या दोघांची १७३२ च्या पावसाळ्यानंतर कोंकणात रवानगी केली. दोघेही एप्रिल १७३३ त कोंकणात उतरले. विजयगड, गोवळकोट, अंजनवेल, उंदेरी व खंदेरी अशी मोठी स्थळे जी हबशांच्या ताब्यात होती[१] त्याजवर एकदम हल्ला करण्याचा बाजीराव पेशव्यांनी बेत केला. उंदेरी व इंग्रजांवर सेखोजी आंग्र्यांस पाठविले.[२] बाणकोट व मंडणगड ह्यांच्यावर बकाजी नाईकास धाडिले.[३] प्रतिनिधी व आनंदराव सोमवंशी ह्यांच्याकडे अंजनवेलीची कामगिरी सोपविली.[४] व स्वत: बाजीराव व फत्तेसिंग शामलांच्या जंजिऱ्याला शह देऊन बसले.[५] ब्रह्मेंद्र स्वामींच्या लकड्यामुळे जंजिऱ्याच्या स्वारीची आपणास वेळोवेळी हकिगत मिळावी म्हणून छत्रपतींनी सचिवाचे मुलुखात डाक बसविली होती. आंग्र्यांनी मदत करण्यात मागेपुढे पाहू नये म्हणून महाराजांनी जिवाजी खंडेराव चिटणीस यांना कुलाब्यास रवाना केले. ब्रह्मेंद्र स्वामींनीही सेखोजी व संभाजी आंग्रे या उभयतास उत्तेजनपर पत्रे लिहिली.[६] बाजीराव पेशवे राजापुरीवर जाऊन बसल्यावर मराठ्यांच्या ताब्यात राजापुरी, खोकरी, त्याचप्रमाणे तळे, घोसाळे, बिरवाडी इत्यादि ठाणी मराठ्यांच्या हातात भराभर आली. राजापुरी येथे सिद्दीचा पराभव झाल्यावर सिद्दी सरदार जंजिरा किल्ल्यात जाऊन बंदोबस्ताने राहिले आणि त्यांनी पाण्यातून लढाईची सिद्धता केली. सरदारांस मदत करून ही लढाई लवकरात संपुष्टात येण्याकरिता शाहू छत्रपतींनी तारीख २० मे च्या सुमारास श्रीनिवास प्रतिनिधी आनंदराव सोमवंशी सरलष्कर, कृष्णाजी दाभाडे वगैरे सरदारास फौज देऊन कोंकणात रवाना केले. उदाजी चव्हाण, शंभुसिंग जाधव व सचिव यासह कोंकणात फौजा पाठविण्यास शाहू छत्रपतींनी आज्ञा केली.[७]

### पेशवे प्रतिनिधी वैर यशाच्या आड :

प्रतिनिधींनी कारस्थान रचून "मराठ्यांच्या तक्ताची जागा" इतिहास प्रसिद्ध रायगड तारीख ८ जून १७३३ त सर केला. रायगड किल्ला सर झाल्यानंतर प्रतिनिधींनी बाजीरावास भेटावयास हवे होते. पण पराक्रमाच्या घमेंडीत प्रतिनिधी होते. त्यांनी राजापुरीस जाऊन बाजीरावांची भेट घेण्याचे नाकारले. बाजीराव व प्रतिनिधी यांचे भांडण सर्वत्रास ठाऊक होते. गोवळकोटच्या सिद्दी सातने त्याचा फायदा घेण्याचे ठरविले. आंग्र्यांचे पराक्रमी

---

१. का. इ. सं. प. या. १६६.
२. शा. रोजनिशी ६१.
३. ब्र. च. ले. २०३.
४. शा. रो. ५९, ६०.
५. कित्ता.
६. शा. रो. ३६४, ५६, ५६, ५८, ५९, ६१.
७. ब्र. ले. २३ ब ३३० का. सं. प. या. ले. २४ व शा. रो. ६३ पे. द. भा. ३ मधील नकाशा.

सरदार बकाजी नाईक यांनी सुवर्णदुर्गाहून निघून अंजनवेल व गोवलकोट या दोन्ही किल्ल्यास वेढा घातला. हे दोन्ही किल्ले सिद्दी सात याच्या ताब्यात असून त्याने ते लढविण्याची जय्यत तयारी केली होती. प्रतिनिधींनी सुद्धा रायगड सारखेच आपण हे किल्ले कारस्थानानें आपल्या ताब्यात घेऊ अशी उमेद बाळगून त्यांनी बकाजी नाईक यास वेढा उठविण्यास सांगितले. सिद्दी सात यानें ह्याचा फायदा घेतला. त्याने प्रतिनिधीशी होत असलेली बोलणी लांबवून त्यास झुलवत ठेविले. इतक्यात पावसाळा सुरू झाला; आणि लढाई स्थगित करावी लागली. प्रतिनिधींनी निराळा उपक्रम आरंभिल्यावरोबर सेखोजी आंग्र्यांनी बाजीराव पेशव्यांच्या सांगण्यावरून बकाजी नाईकांना परत बोलाविले, प्रतिनिधीस कालांतराने कळून आले की, आपणास सिद्दी सातनें बनविले.

**सिद्दीबरोबर बाजीरावांचा तह :**

पाण्यातील दुर्गावर पावसाळी जमिनीवरून व पाण्यातून हल्ले करणे कसे अशक्य आहे याचा विचार बाजीराव पेशवे व सेखोजी आंग्रे ह्यांनी राजपुरीला एकत्र येऊन केला. सेखोजींचे म्हणणे की, आपण पावसाळा संपण्याची वाट पहावी. एकदा पावसाळा संपला, समुद्र शांत झाला म्हणजे समुद्रातून आरमाराच्या सहाय्याने किल्ल्यावर हल्ला करता येईल व त्याच्या जोडीस जमिनीच्या बाजूनें मोर्चे लाविता येतील. कोंकणची परिस्थिती व दर्यावरील संग्राम बाजीराव पेशव्यास पूर्ण परिचित नव्हता. त्यामुळे सेखोजीच्या सांगण्याप्रमाणे पावसाळा संपेपर्यंतचे दिवस किल्ल्यासमोर वेढा घालून काही हालचाल न करता गप्प बसून काढावे लागले. ही उसंतच सिद्दीच्या फायद्यावर पडली. त्याने इंग्रज, पोर्तुगीज व निजामउल्मुल्क याजकडे मदत मागितली. इंग्रजांनीं हबशास फौज, दारुगोळा व अन्न सामुग्रीचा पुरवठा केला. सिद्दीच्या मदतीकरिता एक थोरले लढाऊ जहाज पाठविले. सप्टेंबरात सुरतेहून मदत जंजिऱ्यास आली तेणेकरून सिद्दी बळावत चालला. आपसातील कलह व सिद्दीला चहूकडून येत असलेली ही मदत यामुळे मोहिम फसण्याची भिती उत्पन्न झाली. इतक्यात सेखोजी आंग्रे २८ ऑगस्ट १७३३ रोजी मृत्यू पावले. तेणेकरून चाललेल्या स्वारीला मोठीच आपत्ति उत्पन्न झाली. जंजिरा मोहीम मुख्यत: सेखोजीचे बळावर अवलंबून होती. नाविक सिद्धता आंग्र्यांना शक्य होती. पण सेखोजी वारल्यावर त्याच्या भावात वैमनस्य उद्‌भवले. ह्या आंग्रे घरातील दुहीचा फायदा इंग्रजांनी घेतला व आंग्र्यांचा नाश करण्याचे तह सावंतवाडीकर व जंजिरेकर यांच्याशी केले. इंग्रजांनी मानाजीस मदत करण्याच्या निमित्ताने आपले आरमार कॅ. इंचबर्डचे हाताखाली कुलाब्यावर पाठविले. या भानगडी वाढत चाललेल्या पाहून बाजीराव पेशव्यांनी मोहिमतून आपले अंग काढून घेतले. डिसेंबर १७३३ च्या आरंभी तह करून जंजिऱ्याचा वेढा उठवून बाजीराव पेशवे साताऱ्यास आले.

या तहाप्रमाणे सिद्दीकडून रायगड व महाड सरकारात घेतले व त्यांचा बंदोबस्त बाजीराव पेशवे यांनी केला. शिवाय साडेपाच महाल हबशाकडे

ठेवून बाकीचे सरकारात घेतले. हा तह अलीबागजवळ नवदरे येथे झाला.[1]

**सिद्दी सातचा पाडाव :**

बाजीराव पेशव्यास अलीबागनजीक नवदरे येथे तह करून परत यावे लागले. सेखोजी निवर्तल्यामुळे आंग्रे घराण्यात भाऊबंदकी सुरू झाली. मराठे सरदारांमध्ये एकोपा नसल्यामुळे जंजिऱ्याच्या सिद्दीचा पाडाव लांबणीवर पडला. त्यामुळे ब्रह्मेंद्रस्वामींचे हबशास जिंकण्याचे टुमणे शाहू महाराजास सतत जाचू लागले. गोवळकोट आणि अंजनवेल काबीज केल्याशिवाय सिद्दी सात शरण येणार नाही व चिपळूणच्या परशुराम क्षेत्राची झालेली हानी भरून येणार नाही हे शाहू महाराजास ठाऊक होते. पण शाहू छत्रपतींच्या हुकूमाने संभाजी आंग्रे यांनी जंजिऱ्याची मोहिम तशीच चालू ठेविली. दरम्यान सिद्दी सातास फितविण्याचाही उपक्रम शाहू छत्रपती व स्वामी यांनी आप-आपल्यापरी चालविला. पण संभाजी व मानाजी आंग्रे या आंग्रे बंधूंच्या तंट्या-मुळे जंजिऱ्यावरील मोहिमेचा परिणाम निष्फल होत होता. शाहू छत्रपतीनी उदाजी पवार व पिलाजी जाधव यास कोंकणात पाठविले. पिलाजीनी बाणकोट फत्ते करून पुढे गोवलकोट व अंजनवेलवर चाल केली.[2] या आक्रमणास आळा घालण्याचा सिद्दी सातने चंग बांधला. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी चिमाजी आप्पास मुद्दाम शाहू छत्रपतींनी कोंकणात पाठविले. मानाजी आंग्र्यांनी चिमाजीस साथ दिली. चिमाजी २० मार्च १७३६ रोजी कोंकणात गेले. रेवास नजीक कामारले तर्फ श्रीगांव येथे सिद्दीची व मराठ्यांची लढाई झाली. तीत सिद्दीचे १,३०० व मराठ्यांकडील ८०० लोक पडले. सिद्दी सात स्वत: कामास आला. "राज्य घेईन, नाहीतर मरून जाईन" अशा निकराने सिद्दीसात लढला. त्यास पळून जाण्याची संधी दिली असता त्याने तसे न करता तो लढला व समरांगणी पडला (१९ एप्रिल १७३६). उंदेरीचा किल्लेदार सिद्दी याकूबही वरील लढाईत मारला गेला. या विजयाने मराठ मंडळास मोठा आनंद झाला. हबशांचे दोन प्रबळ सरदार पडल्यामुळे दुसऱ्या पक्षाचा प्रमुख सीद्दी रहमान याने पेशव्यांशी पूर्वीचा तह कायम करून युद्ध थांबविले. अंजनवेल व गोवलकोट ही स्थळें तूर्त हबशांकडे राहिली.[3] पैकी अंजनवेल तुळाजी आंग्र्यांनी २३ जानेवारी १७४५ रोजी काबीज केली व लगेच गोवळकोटही घेतले. परशुराम क्षेत्राजवळचा हा किल्ला कबजात आलेला पहाण्याचे भाग्य ब्रह्मेंद्रस्वामीस लाभले.

**माळव्यातील राजकारण :**

मराठ्यांच्या माळवा बुंदेलखंडावरील आक्रमणामुळे बादशाही हादरली. बादशाही दरबारात यावर एक विचार उपाय सुचविला जाईना. दरबारात

१. शा. रो. १४०-१४१ रा. खं. ६, ८७, ८८ ; ब्र. च. पृ. ५४, ५६, ५८.

२. भा. व. रा. पृ. १०, ब्र. ले. २७८; इ. सं. ऐ. चरि. १, ७.

३. म. रि. बाजीराव पृ. २३०.

दोन पक्ष होते. पहिला पक्ष सवाई जयसिंग व बक्षीखान दौरान याचा. ह्यांचे म्हणणे की, मराठ्यांबरोबर सलगी करून दोस्ती करावी आणि त्यांच्या चढाईस आळा घालून घेण्याचे त्यांच्याकडून कबूल करून घ्यावे. दुसरा पक्ष सादतखान व महमदखान बंगश व इतर यांचा. त्यांचे म्हणणे असे की, सर्व उमरावांची एकजूट करून आपण मराठ्यांशी लढू आणि सर्व मराठ्यास शक्यतो बळाने माळवा बुंदेलखंडातून हाकलून देऊ ह्या दोन्ही सूचनांपैकी एकाचाही स्वीकार करण्याचा बादशहाचा कल नव्हता. बादशहाच्या ह्या विचाराशीं वजीर कमरुद्दीनखान व निजाम सहमत होते. ह्या सर्वांचे म्हणणे असे की, कोणताही मार्ग न पत्करता ह्यावेळी गप्प बसावे. काही काळ जाऊ द्यावा आणि असा काळ गेल्यावर जी संधी येईल तिचा फायदा घेऊन मराठ्यांशी कसे वागावयाचे ते ठरवावे.

**माळव्यातील राजकारण :**

दिल्लीकरांचा वकील दीपसिंग स्वत: ऑगस्ट १७३० च्या प्रथमार्धात सातार्‍यास आले आणि दिल्लीला परत गेल्यानंतर त्यांनी आपला वृत्तांत जयसिंगास सादर केला. हा वृत्तांत लक्षात घेऊन जयसिंगानी शाहू महाराजांशी खालीलप्रमाणे समझोता करण्याचे ठरविलें : —

(१) माळवा व बुंदेलखंड याच्या चौथाई सरदेशमुखीचा ऐवज म्हणून मराठ्यास दरवर्षी दहा लाख रुपये द्यावे; (२) आणि याबद्दल शाहू छत्रपतींचा मातवर-सरदार बादशहाच्या दरबारी असावा. दादो भिमसेन नांवाचा जयसिंगाकडे असलेला शाहू छत्रपतींचा वकील ह्याने हा खलीता बादशहास सादर केला. पण बादशहाने त्याचा स्वीकार केला नाही. त्यामुळे जयसिंगास राग आला आणि याने बादशहास आपले म्हणणे कळविले, "गेली वीस वर्षे मराठ्यांना माळव्यातून घालवून देण्याचे तुमचे प्रयत्न चाललेले आहेत. त्याकरिता किती पैसा खर्च झाला, किती माणसे खपली आणि त्यातून निष्पन्न काय झाले ह्याचा विचार जर खाविंदांनी निर्विकार मनाने केला तर माझी विनंती बादशहास पटेल".

बादशहाने दुसरीच गोष्ट केली. त्याने माळव्यातून जयसिंगाची बदली केली आणि त्या जागी महमद बंगशला १७३० च्या सुमारास नेमिले. बंगश उज्जैनला आला आणि त्याची व निजाम उल्मुल्काची भेट मार्च १७३१ मध्ये झाली. दाभाडे बाजीराव लढत चाललेली पाहून बंगश खूष झाला कारण त्यास बाजीराव पेशव्याचे वास्तव्य आणि लक्ष माळव्यापासून दूर असावयास हवे होते. माळव्यांत यावेळेला होळकर व अंताजी माणकेश्वर हे दोघे होते. बंगशने अंताजी माणकेश्वराचा पराभव उज्जैन येथे केला. ही बातमी कळताच होळकरास राणोजी शिंदे येऊन मिळाले. मराठ्यास नवीन कुमकेमुळे जोर चढला. बंगशने हेरले की, आपण शिंदे होळकरास एकटे तोंड देऊ शकणार नाही. म्हणून त्यानें बादशहास खलीता पाठवून मदतीची मागणी केली. बादशहाच्या हाती ही मागणी पडताच त्याचा उत्साह भंग

झाला. ज्या माळव्यातून तो आपल्या खजिन्यात भर इच्छित होता त्या प्रांतांकडून फौजेची मागणी येते. ह्या विचाराने त्यास उद्वीग्न केले. याच वेळी बादशहाकडे माळव्यातील जमीनदारांच्या गव्हर्नरांविरुद्ध तक्रारी जाऊन पडल्या. आपणास गव्हर्नर वाईट वागवितो इतकेच नव्हे तर पैशाकरिता हैराण करतो, रयतेस छळतो अशा प्रकारच्या तक्रारी बादशहाकडे आल्यामुळे बंगशाच्या माळव्याच्या नेमणुकीस विरोध करणारे खानदौरान व कमरुद्दीनखान ह्यांनी बंगशाने चालविलेली गैरव्यवस्था बादशहाच्या ध्यानी आणून दिली. बादशहाने यावर तोडगा म्हणून बंगशला माळव्यातून परत बोलाविले व जयसिंगास माळव्याचा गव्हर्नर म्हणून नेमिले (१७३२) यापुढे ४ वर्षे जयसिंग माळव्याच्या सुभेदारीवर होता.

१७३२ सालात पेशव्यांच्या हालचाली विशेष झाल्या नाहीत. पावसाळ्यात शिंदे होळकरांना त्यांनी साताऱ्यास बोलावून माळव्याची वाटणी शिंदे, होळकर व पवार यात करून दिली आणि त्याप्रमाणे २९ जुलै १७३२ चा कागद केला.[१]

**रोहे रामेश्वर येथे बाजीराव-निजाम भेट :**

डभईचा दाभाड्याचा पराभव म्हणजेच पर्यायानें निजाम उल्मुल्काचा पराभव हे निजाम जाणून होता. म्हणून त्याने पेशव्यांशी समझोता करण्याचे ठरविले. निजामाने यावेळी पेशव्यांशी समक्ष भेटून आपण पत्रभेदाचे मुद्दे मांडावे व सलोखा घडवून आणावा असे ठरविले. म्हणजे आपणास चांगले शेजारी म्हणून गुण्यागोविंदाने रहाता येईल असे निजामाचे मत पडले. बाजीराव पेशव्यांना मात्र ठावूक होते की, अशा भेटीतून काहीच निष्पन्न होणार नाही. पण बाजीराव पेशव्यास भेटण्याची आपली इच्छा निजामानें सुमन्ताकडून शाहू महाराजास कळविली. शाहू महाराजांनी बाजीराव पेशवे यास कळविले की, त्वरेने जाऊन निजामास भेटावे. इतक्यातच अफवा पसरल्या की, बाजीराव पेशव्यास निजामाने भेटीस बोलावून काहीतरी दगा करणार. बाजीरावांनी निजामाची भेट घेऊ नये म्हणून त्यांच्या हितचिंतकांकडून बाजीरावास सूचनेची व विनंतीची पत्रे आली. खुद्द मातोश्री राधाबाई यांनी बाजीरावास निजामाच्या भेटीस जाऊ नये असे सांगितले पण बाजीराव स्वामीनिष्ठ होते. त्यांनी महाराजाची आज्ञा शिरसावंद्य मानून आपल्या निवडक लोकांसह ते निजामाच्या भेटीस गेले. बरोबर विश्वासू जासूद, गुप्त हेर वगैरे संकटप्रसंगी लागणारे निवडक लोक होतेच. दोघांची भेट २७ डिसेंबर १७३२ (बुधवार) रोजी रोहेरामेश्वर येथे लातूरपासून ८ मैलावर झाली. भेट अगदी साधी पण समारंभपूर्वक झाली. निजामाने बाजीरावास ७ वस्त्रे, २ सुंदर मोत्यांचे जोड, दोन घोडे व एक हत्ती नजर दिले. भेट चांगल्या रीतीने पार पाडल्याबद्दल महाराष्ट्रात सगळीकडे आनंद झाला. त्या प्रित्यर्थ किल्ल्यांवरून तोफांचे बार उडाले, गुलाब उडाले, शाहू महाराजांनी साखऱ्या वाटल्या.

१. इ. सं. पे. द. पृ. २०८.

ह्या भेटीचा निष्कर्ष एल्फिन्स्टनने काढलेला आहे. तो असा : "बाजीराव पेशव्यांच्या बरोबर ही जी निजामाची भेट झाली त्यात गुप्तपणे मराठ्यांनी निजामास असे आश्वासन दिले असावे की, आम्ही दक्षिणेत धामधूम करणार नाही. फक्त सरदेशमुखी व चौथ वसूल करू आणि निजामाने कबूल केले असावे की उत्तर हिंदुस्थानात मराठे ज्यावेळी चढाई करतील त्यावेळी आपण गप्प बसू मात्र मराठ्यांनी खानदेशला उपसर्ग पोचविता कामा नये".

**शिंदे होळकरांचे उत्तरेतील पराक्रम :**

मराठ्यांच्या उत्तरेकडील चढाईस निजामाची मूक संमती मिळून मराठ्यांनी माळवा आपल्या ताब्यात आणिला, बुंदेलखंडातही आपले पाय रोविले. १४ डिसेंबर १७३१ ला बुंदेलखंडाचा छत्रसाल मरण पावल्यावर त्याच्या राज्याचा तिसरा हिस्सा त्याने ठरल्याप्रमाणे बाजीराव पेशव्यास मिळाला. पेशवे प्रदेशाचा कबजा घेण्याकरिता उत्तरेत असता सैन्यासह मराठ्यांना मदत करण्याचे बुंदेल्यांना मान्य केले, "पुढे स्वामी (पेशवे) ज्या मुलुखावर चालतील त्या मुलुखावर समागमे चालावे ; दिल्लीवर चाल कराल तेव्हाहि समागमे चालावे, प्रयागास स्वामी चालतील तेव्हाहि समागमे चलावे ; जो मुलुख जप्त करावा त्यात अर्धो-अर्ध प्रमाणे घ्यावे.[१]" असे छत्रसालचे ब्रीद होते.

१७३३ च्या एप्रिल पर्यंत चिमाजी आप्पांचा मुक्काम बुंदेलखंडात होता. त्यांनी छत्रसालच्या राज्यालगत असलेल्या दतिया, ओडसा, नरवर या संस्थानिकांकडून खंडण्या वसूल केल्या व आपले सैन्य ग्वाल्हेर पर्यंत नेऊन पावसाळा समीप आला म्हणून दक्षिणेकडे कूच केले.

बुंदेलखंडात चिमाजी आप्पा कार्य उरकित असता मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांच्या हाताखालील फौजेने कानसुलावरून कूच करुन नर्मदा गाठली. त्यातील एका तुकडीने पावागडास जाऊन चांपानेर सर केले. दुसरी तुकडी माळव्यात शिरली. इतक्यात सवाई जयसिंग चिमाजी आप्पांशी माळव्यात झुंज देणार अशी वार्ता गुजरात कडील फौजेस मिळाली.[२] त्यांनी-सुद्धा माळव्यात शिरून सवाई जयसिगास दाणा पाणी मिळू नये असा बंदोबस्त केला. आणि सवाईशी युद्ध प्रसंग आल्यावर[३] सवाईने राजकारण केले आणि पवारास आपल्या बाजूस ओढून शिंदे होळकरांवर हल्ला करण्याचा बेत केला. हल्ला केला पण भले लोक मध्यस्त पडल्यामुळे सवाईने सत्यावर घातले. इतक्यात चिमाजी आप्पा पूर्वेकडून माळव्यात येऊन त्याने सवाईशी तह केला.[४] चिमाजी आप्पा दक्षिणेत आले तेव्हा सिद्दीशी मराठ्यांचे युद्ध जोरात सुरू होते. सिद्दीला इंग्रजांची मदत होती. पेशवे व प्रतिनिधी

---

१. पे. द. १४, ले. ९.

२. कित्ता.

३. पे. द. १४, ले. २.

४. पे. द. १५, ले. ६.

ह्या मोहिमेत होते. पण त्यांचे आपआपसात न पटल्यामुळे मोहीम अर्धवट टाकून बाजीराव डिसेंबर १७३३ त पुण्यास परतले. या नंतर बाजीराव पेशव्यांनी आपले लक्ष उत्तरेकडील उद्योगात केंद्रीत केले. उत्तरेत फौजा गेल्याशिवाय खंडणी वसूल होणे नाही हे ठावूक असल्यामुळे त्यांनी पिलाजी जाधवांची नेमणूक करून त्यास डिसेंबरात उत्तरेकडे रवाना केले.[१] शिंदे होळकरही खानदेश ओलांडून माळव्यात गेले.[२] ह्या सर्व फौजेने आग्र्याच्या पूर्वेस असलेल्या भदावरापर्यंत जाऊन गावेच्या गावे उध्वस्त करून खंडण्या वसूल केल्या.[३] त्यांना प्रतिकार असा कोणी केलाच नाही. ग्वाल्हेर पासून अजमीर पर्यंतचा १५०-२०० मैल टापू मराठ्यांनी पादाक्रांत केला. मराठ्यांच्या ह्या अनिर्बंध हालचालीस पायबंद घालण्याचे बादशहाने ठरवून मराठ्यांशी सलुख्याने राहू इच्छिणारा सवाई जयसिंग यास माळव्याची सुभेदारी सन १७३३ त दिली. जयसिंगाबद्दल मराठ्यांच्या मनात आदर वसत होता. त्याचा फायदा जयसिंगाने घेण्याचे ठरविले. मराठ्यांच्या फौजा माळव्याच्या सरहद्दीवर फिरकू लागल्या. म्हणजे निम्मे वसूल त्यांना देऊन मोकळे व्हावयाचे हा डाव सवाई जयसिंगानी योजिला होता.[४] मराठ्यांच्या वाढत्या भूकेस ह्या युक्तीने लगाम बसला नाही.

## बादशाही सैन्याची मराठ्यांवर चढाई :

सन १७३४ च्या दिवाळीत मराठी फौजा उत्तरेत फिरकू लागल्या. त्यांनी बुंदेले राजे रजवाड्यांकडे मोर्चे फिरविले.[४] त्यास प्रतिकार करण्यासाठी बादशहाने आपला वजीर कमरुद्दीनखान व मीरबक्षीखान डौरान ह्यांना सैन्यासह मराठ्यांवर चालून जाण्यास आज्ञा केली. हे दोन उमराव भली मोठी फौज व तोफखाना बरोबर घेऊन मराठ्यांवर घसरले. मराठ्यांच्या वायुगती घोडदौडीपुढे मोंगलांचा तोफखाना निरुपयोगी ठरला. कमरुद्दीनच्या फौजेशी मराठ्यांच्या फौजेने दोन तिनदा झुंज दिली. कमरुद्दीनला अपयश आले पण मराठ्यांना मात्र लाभ काहीच झाला नाही. जून १७३५ च्या सुमारास मराठी फौज दक्षिणेत आली.

## खान डौरानवर विजय :

शिंदे होळकरांनी आपली जरब मोगलास दाखविण्याकरितां १७३४ चा पावसाळा संपताच माळवा बुंदी कोटा, अहीरवाडा या मुलुखात सपाट्याने खंडण्या घेण्याची सुरुवात केली. त्यास दाबण्याकरिता मीर बक्षीखानडौरान

१. पे. द. १४, ले. ६, १७. १८.

२. कित्ता.

३. कित्ता. ले. १३.

४. कित्ता. ले. २, ६ लक्ष रोख व २८ परगण्याचा चौथ सवाई जयसिंग कबूल करीत होता.

दिल्लीतून बाहेर पडला. त्याने मारवाडातील सर्व राजे रजवाड्यास सामील करून घेतले. दोन लाख स्वार व तोफखाना व आरब यांस तो संख्या नाही अशी प्रचंड मोगलसेना जमा झाली. मुकुंदरा उतरून रामपुरा प्रांते मराठ्यांच्या रोखाने मोंगलांचे कूच झाले. युद्धास सुरुवात झाली. मराठ्यांनी दाणा घास बंद केला. मोगलांची उंटं घोडी आणिली.[१] पण ह्या समोरासमोरील लढाईत आपला निभाव लागणार नाही हे ओळखून शिंदे होळकर फौजेसह निसटून मुकुंदरा नदी पार झाले आणि आपल्या पिछाडीकडील त्यांनी नाश चालविला. ही बातमी येताच मीर बक्षीस मिळालेले सर्व संस्थानिक आपआपल्या मुलुखाच्या संरक्षणाकरिता त्यास सोडून जाऊ लागले. तेव्हा मोहिम चालू ठेवण्याचा मीर बक्षीखान डौरानने विचार रद्द केला आणि जयसिंगाच्या मध्यस्थीने शिंदे होळकरांशी तह केला.[२] माळव्याच्या चौथाईबद्दल दरसाल २३ लाख देण्याचे खान डौरानकडून कबूल करून घेऊन शिंदे होळकर जुलैच्या पहिल्या आठवड्यात पुण्यास परतले (६ जुलै १७३५). आपल्या सरदारांनी मोंगलास खडे चारले व विजयश्री खेचून आणली तेव्हा आपल्या विजयी सरदारांचा गौरव करण्यासाठी पेशवे बाजीराव होळकरास संगमापावेतो व शिंद्यास घोरपडीपावेतो सामोरे गेले.[३]

**तडजोडीचे प्रयत्न (१७३५-३६) :**

मराठ्यांशी केलेल्या मानहानीच्या तहामुळे खानडौरानवर बादशहाची इतराजी झाली. खानडौरान बादशहाच्या मर्जीतून उतरावा हा एकच हेतू मनाशी बाळगून दरबारातील इतर मुत्सद्दी कमरुद्दीनखान, सादतखान वगैरेंनी बादशहाकडे असे विचार प्रगट केले की, खान डौरानने यात फंदफितुरी केली असावी. जयसिंगाचीही त्यांनी बादशहापाशी नालस्ती केली. मराठ्यांचा बंदोबस्त कसा करावा याचा विचार करण्यासाठी बादशहाने दरबार भरविला असता जयसिंगाने भर दरबारात स्पष्टपणे सांगितले की, "औरंगजेबासारख्या बलाढ्य बादशहाकडून मराठ्यास आळा बसू शकला नाही. औरंगजेबानंतर मराठ्यांचे बळ अतोनात वाढून पश्चिम हिंदुस्थानातील बहुतेक प्रदेश मराठ्यांच्या ताब्यात गेले आहेत. त्यांची शक्ति दिवसेंदिवस वाढत आहे. त्यांना आळा घालण्याची ताकद एकाही उमरावाची नाही. शाहू छत्रपति, पेशवे व सरदार यांची पूर्ण जानपछान असून त्याचे हेतू बादशाहीची सेवा करण्याचे आहेत. बादशाहीस दगा करावा किंवा त्यास नेस्तनाबूद करावे अशी एकाचीही इच्छा नाही. त्यांचे म्हणणे असे की, आमच्या पोटापाण्याची सोय करा आम्ही फौजा बाळगून शत्रूंचे निवारण करू. अकबर बादशहाचे धोरण स्विकारून पेशव्यास भेटीस बोलवावे व त्याजवर आपल्या संरक्षणाचा भार टाकावा. ही जबाबदारी अंगावर पडली की त्यांची बंडखोरी

१. पे. द. १४. ले २३.
२. कित्ता. ले २४, २६. २७.
३. पे. द. २२, पृ. १६३.

थांबेल. हे सर्व घडवून आणण्याची जबाबदारी आम्ही स्वत:वर घेतो. प्रस्तुत प्रसंगी आत्मसंरक्षणाचा अन्य उपाय आम्हास दिसत नाही." अशा प्रकारचा बिनतोड युक्तिवाद जयसिंगाने सुचविला तेव्हा "जयसिंग समानधर्मी मराठ्यास सामील होऊन विश्वासघात करतात. सबब त्याजकडील सुभेदारी काढून घ्यावी" असे मत कमरुद्दीनखानने दिले त्यास निजामाने आपला पाठिंबा कळविला. सादतखानानेसुद्धा बादशहास सांगितले की, ह्या जयसिंगाने माळव्याचे संरक्षण न करता तुमचा विश्वासघात केला आहे. मला माळवा व आग्रा सुभे द्या. मी मराठ्यांचा बंदोबस्त माझे दोस्त निजाम आहेत त्यांच्या सहाय्याने करतो.[1] सरबुलंदखानानेही सादतखानाच्या बोलण्यास पुष्टी दिली. त्यावेळी मराठ्यांकडून नुकताच मार खाऊन आलेला खान डौरान बोलला की, मराठ्यांना युद्धात जिंकणे अशक्य. त्यांना बादशाही अंमलदार बनविले म्हणजे ते आपल्या प्रदेशास उपद्रव देणार नाहीत. बादशहास खान डौरान व जयसिंग यांचा सल्ला रूचला नाही. अजयसिंग, कमरुद्दीनखान व सादतखान ह्यांचे सख्य करून जयसिंगास यामुळे आपल्या हातचा माळवा जाण्याचे भय वाटू लागले. म्हणून त्याने बाजीरावांशी गुप्त संधान बांधून त्यास सूचित केले की, तुम्ही आमच्या मदतीस आलात तर तुमची व बादशहाची गाठ खान डौरान घालून देईल व या भेटीत बादशहा पेशव्यास नवी जहागिर बहाल करील.[2] या पत्रव्यवहारावरून बाजीराव पेशव्यास कळून चुकले की बादशहास जरब दाखविल्याशिवाय दिल्ली दरबार तडजोडीस तयार होणार नाही. तेव्हा जयसिंगाचे बोलावणे आल्यावरून माळव्याच्या व राजपुतान्याच्या खंडणीचा कायम निकाल लावण्याचे पेशव्यांनी ठरवून ३ ऑक्टोबर १७३५ ला ते शिंदे होळकर व बाजी भिमराव याजसह उत्तरेकडे निघाले. ज्यांच्या सरदारांनी मोगली सैन्याची वाताहात केली ते पेशवेच स्वत: स्वारीवर निघाले हे ऐकून उत्तरेतील संस्थानिकांचा थरकाप उडाला. निजामाच्या दरबारातही खळबळ उडाली. बादशाही फौजेच्या मदतीस जाण्याकरिता आपल्या फौजेची व तोफखान्याची निजामाने जलदी चालविली.[3] पण ह्या धावपळीचा परिणाम पेशव्यांच्या छत्राखाली चालू लागलेल्या मराठी सैन्यावर बिलकूल झाला नाही.

### बाजीराव-उदेपूर राणा भेट :

पेशवे अनेक खंडण्या घेत कुकसी फत्ते करून लुनावडा, बासवाडा, डोंगरपूर आदि राजपुतान्यातील अनेक राजेरजवाड्यांकडून सत्कार स्वीकारित[4] उदेपूर राण्याच्या भेटीस गेले. चंपाबागेत राण्याने बाजीरावांच्या भेटीसाठी खास शामियाना उभारला. पेशव्यांनी जाऊन राणाजींची भेट घेतली तेव्हा

---

१. पे. द. १४ ले. २७.

२. कित्ता, ले. ४७; ३१, ४७.

३. कित्ता, ले. ४१. ४२.

४. पे. द. ३०. ३२१.

बरोबरीच्या नात्याने बाजीराव पेशव्यास जवळील सुवर्णमंडित सिंहासनावर बसण्यास राणाजीने विनंती केली. ह्या विनंतीचा अव्हेर पेशव्यांनी मोठ्या नम्रतेने केला. पेशवे राणाजीस म्हणाले, "राणाजी आपण चक्रवर्ती आहात, आपल्या बरोबरीने मी बसणे अयोग्य होईल." असे बोलून पेशवे राणाजीच्या जवळील पण थोडेसे सखल असलेल्या आसनावर अधिष्ठीत झाले. मग उभयताचे संभाषण सुरू झाले. त्यात राण्याने पेशव्यांच्या खंडणीच्या मागण्या मान्य केल्या आणि पेशव्यास दिनांक ३ फेब्रुवारी ते ७ फेब्रुवारी १७३६ पर्यंत ठेवून घेतले.[१] ह्या मुक्कामात पेशव्यास ठिकठिकाणच्या राजे-रजवाड्यांकडून मेजवानीदाखल अनेक मौल्यवान चिजा मिळाल्या.[२] दरम्यान बादशहाने ज्या सादतखानास मराठ्यांवर चालून जाण्यास सांगितले होते त्याचा धुव्वा आडासचा जमीनदार बुंदेला ह्याने खानाशी मोठे झुंज देऊन उडविला.[३]

### खान डौरानकडून बाजीरावांचा सत्कार :

बादशहाची सारी भिस्त खानावर होती. पण खानाचे यश बुंदेल्यांनी हिरावून नेले. तेव्हा बादशहाने आपल्या सान्निध्यातील खान डौरानच्या पेशव्यांशी समेट घडवून आणण्याचे धोरणास मान्यता दिली. खान डौरानने ही हकिगत जयसिंगास कळविली व तेव्हा जयसिंगाने पेशव्यांकडे नजराणा पाठवून त्यास आपल्या भेटीस बोलाविले. खान डौरानने सतत दोन महिने वेळोवेळी नजराण्यादाखल निरनिराळ्या रकमा बाजीरावास पाठवून दिल्या. खान डौरान हा बादशहाचा प्रतिनिधी होता. अर्थात बादशहाच बाजीरावाचा सत्कार करीत होता.

### बाजीराव-जयसिंग भेट :

उदेपूरचा पाहुणचार घेऊन बाजीराव जयसिंगाचे भेटीस किशनगडानजिक बंभोरा येथे[४] गेले. तेथेच सवाई जयसिंग व बाजीराव ह्या दोघांच्या भेटी झाल्या[५] (तारीख ४ मार्च १७३६). उभयताच्या भेटीत जयसिंगाने बाजीरावास रु. ५०,००१, नामांकित हत्ती, ३५ उंट, शृंगारलेल्या दोन पालख्या एवढ्या वस्तू नजर केल्या. शिवाय त्या वर्षाच्या खंडणी दाखल २० लाख रुपये रोख व माळवा गुजरातच्या सुभेदारीचे फर्मान बादशहाकडून मिळवून देण्याचे कबूल करून घेतले. त्याप्रमाणे हालचाली सुरू झाल्या आणि बादशहा-कडून यादगारखान काश्मिरी व कृपाराम हे दोन गृहस्थ बादशाही दस्तकाच्या याद्या घेऊन बाजीराव-जयसिंगाचे भेटीस आले. पण त्यात उभयपक्षी अनेक

---

१. गुजर, मं. प, घ. इ. पृ. ७३.
२. म. रि. बाजीराव, पृ. २८९.
३. पे. द. १४ ले. ४२.
४. पे. द. ३० ले. १५६ व १६०.
५. म. रि. बाजीराव, पृ. २९०.

बाबतीत संदिग्ध व अपुऱ्या आढळल्या तेव्हा पेशव्यांनी मराठे वकील धोंडो महादेव व बाबूराव मल्हार ह्या दोघास पुनः दिल्लीस रवाना केले. सवाई जयसिगाच्या विनंतीवरून पेशव्यांनी लिहिलेल्या मसुद्यातील प्रत्येक मागणीवर बादशहाने "दिले" हा शब्द लिहिला.[1] लवकरच बाजीराव-बादशहा भेट होणार अशी वार्ता सर्वत्र पसरली. दक्षिणेतून निजामाने बादशहास कळविले की, तुम्ही बाजीरावाची भेट घ्याल तर घात होईल. बाजीरावाच्या मागण्या मंजूर करून घेण्याकरिता दिल्लीत मराठी सरदार जमू लागले. तेव्हा मागण्या नामंजूर करणे बादशहास जड वाटू लागले. त्याने पळवाट काढीली. माळव्याचा सुभा जयसिगाकडे ठेवून त्याचा नायब म्हणून बाजीरावांची नेमणूक करण्यास बादशहा कबूल झाला व इतर मागण्या नाकारल्या (मे १७३६). पेशव्यांनी शिंदे, होळकर व पवार या त्रिवर्गास माळव्यात छावणीस ठेवून स्वतः ते मे अखेर दक्षिणेस येण्यास निघाले.[2]

**बादशहाकडे केळीच्या मागण्या :**

पेशव्यांनी बादशहाकडे नवीन दिलेल्या यादींतील मागण्यांचा तपशील पे. द, भाग १५, पृ. ९१-९८ त विस्तृतपणे सांपडतो. यादीतील कलमांचा सारांश पुढीलप्रमाणे :—

(१) माळव्याची सुभेदारी, दरोवस्त बादशाही सुभा, किल्ले, जागीर व कदीम, राजे व इनामदार खेरीज, आमचे नावे देणे ;

(२) दक्षिणच्या सहा सुभ्यांची देशपांडेगिरी आम्हास द्यावी ;

(३) किल्ले मांडवगड, धार व रायसीन व प्रांत माळवा कुटुंब ठेवावयासी पंतप्रधानास द्यावे ;

(४) चंबळ पावेतोचा (बुंदेलखंडचा) प्रदेश जहागीर, राव पंतप्रधान यास ;

(५) बंगाल प्रांतातून पन्नास लक्ष रुपये तूर्त राव पंतप्रधान यास कर्जफेडीकरिता द्यावे ;

(६) मथुरा, प्रयाग, काशी व गया ही तीर्थस्थळे पेशव्यास जहागिरीदाखल मिळावी.

याचे मोबदल्यात पेशव्यांनी कबूल केलेली कामे आहेत. या दुसऱ्या यादींतील मागण्या बादशहाने मान्य केल्या नाहीत. तेव्हा सवाई जयसिगाने पेशव्यास उत्तरेस येण्यास गुप्तपणे कळविले.

**पेशव्यांची मातोश्री राधाबाईची काशीयात्रा :**

मराठ्यांचा जम उत्तरेत बसू लागला. राजपुतान्यातील राजेरजवाडे बाजीराव पेशव्यास आपल्या बरोबरीने मान देऊ लागले हे ऐकून पेशव्यांची

---

१. पे. द. १५, पृ. ९३.

२. पे. द. ३० ले, १६७; पे. द. २२ ले. ३३१.

मातोश्री राधाबाई यांनी आपली काशी यात्रेस जाण्याची मनिषा बाजीरावांकडे व्यक्त केली. पेशव्यांनी आपल्या मातोश्रीच्या उत्तरेकडील प्रवासाची तयारी केली. उत्तरेतील समस्त राजेरजवाडयास मातोश्रीच्या प्रवासाविषयीचा कार्यक्रम जासुदामार्फत कळविला. उत्तरेत शिंदे, होळकर, बुंदेले असे जे मातबर मराठे सरदार होते त्याजला लिहून मातोश्रीचा प्रवास बिनधोक होण्यासाठीं योग्य ती खबरदारी घेण्यास सांगितले. पुण्यातून मातोश्री राधाबाई तारीख १४ फेब्रुवारी १७३५ रोजी प्रवासास निघाल्या. त्या मार्च महिन्यात बऱ्हाणपुरास गेल्या. बरोबर फारसा लवाजमा नव्हता. पण उदेपूर, जयपूर जवळ शिंदे-होळकरांनी धुमाकूळ उडवून दिल्यामुळे सूड म्हणून कोणीही कबिला लुटू नये याजकरिता बऱ्हाणपूरच्या मुसलमान सरदाराने मातोश्रींच्या संरक्षणाकरिता नर्मदा पार होईपर्यंत शे-दोनशे राऊत दिले.[1] राधाबाईंनी आपल्या परिवारासह तारीख १८ एप्रिल रोजी नर्मदापार होऊन बढवाईवर मुक्काम केला. मे महात राधाबाई उदेपुरास गेल्या. राणाजी बाईच्या दर्शनास गेले व त्यांनी बहुमानपूर्वक मोत्यांची माळ व सोन्याचे चुडे आदि सौभाग्यालंकार नजर दिले.[2] उदेपुराहून मंडळी जयपुरास गेली. तोच प्रवास सुखरूप होण्यासाठी बादशहाची दस्तके आली.[3] राजपुत राजे मातोश्रीस आपल्या हद्दीतून पोहचवून देऊ लागले. खर्चादाखल द्रव्यही देऊ लागले. जयपुरच्या सवाईजींनी मातोश्रीसाठी दिवाणाबरोबर हजार रुपये व वस्त्रे पाठविली आणि रावांची मातोश्री व आमची दोन नाहीत असे उद्‌गार काढून मातोश्रींना यमुनापार उतरून दिले.[4] सप्टेंबर पासून मथुरा, वृंदावन कुरुक्षेत्र, असे प्रयाण करून तारीख १७ ऑक्टोबर रोजी मातोश्री काशीस दाखल झाल्या. २३ डिसेंबर काशीहून प्रयाग गयेस, गयेहून जानेवारीत निघून बुंदेलखंडच्या मार्गे सागरवरून बढवाहाजवळ नर्मदा नदी उतरून त्या मे १७३६ त पुण्यास दाखल झाल्या.

### पेशव्यांची दिल्लीवरील चढाई :

बाजीरावसाहेब मे १७३६ च्या नंतर दक्षिणेत आले व शिंदे होळकर माळव्यात पावसाळ्यात छावणीस राहिले. बाजीरावास तसेच शिंदे होळकर सरदारास पैशाची ओढगस लागली. स्वाऱ्या करूनही पैसा मिळत नाही, ह्याबद्दल बाजीराव पेशवे यांना विषाद वाटला. शिवाय आपण घातलेल्या मागण्या बादशहाने नाकारल्या ह्याचाही त्यास राग आला. पावसाळ्यात सर्व जबाबदार मराठा सेनानीबरोबर वाटाघाटी करून पेशव्यांनी दिल्लीवर चालून जाण्याचा विचार पक्का केला. पेशव्यांच्या मागण्या अमान्य केल्यामुळे ते उत्तरेत चालून येणार तेव्हा त्यांचा बंदोबस्त व्हावयास हवा हा विचार

१. पे. द. १४, ले. २१.
२. पे. द. ९, ले. १२.
३. पे. द. १४, ले. ३९.
४. पे. द. ३०, ले. १३४.

बादशहाने आपल्या सरदारास कळविला. सर्व सरदार एक होऊन पेशव्यास पायबंद घालावा असे आवाहन बादशहाने आपल्या सरदारास केले. बाजीराव पेशवे व मराठे सरदार दक्षिणेहून स्वारीस निघतात तेव्हा निजामाने त्यांना नर्मदा नदी उतरून द्यावे. तिथेच अडवावे. अशा प्रकारचे बादशाही हुकम निजामास गेले. ही बातमी बाजीरावास समजली तेव्हा त्यांनी नोव्हेंबरमध्ये पुणे सोडले व निजामास चुकवून ते नर्मदा पार झाले. व शिंदे पवार त्यास मिळाले. त्यांनी १२ जानेवारी १७३७ रोजी भेलशास वेढा घातला.[१] इथून पुढे मोगल सरदारास व दिल्लीपतिच्या मांडलीकास जेरीस आणून त्यांजकडून पैसा वसूल करणे व दिल्लीस जाऊन बादशहाकडून मागण्या कबूल करून घेणे असे दोन हेतू पेशवे व त्यांचे सहाय्यक ह्यांनी ठरविले. राजधानीवर चालून जाऊन बादशहास दहशत बसविण्याचे स्वतः पेशव्यांनी अंगिकारिले. इतर सरदारांनीही कामगिऱ्या वाटून घेतल्या. मोगलांच्या तोफांच्या टप्प्यात येऊ न देता गनिमि काव्याने शत्रूस हैराण करावयाचे व एकमेकाच्या हालचाली एकमेकास विदीत करावयाच्या असा हुकूम मराठे सरदारास पेशव्यांनी दिला. भेलशाचा बंदोबस्त करून बाजीरावसाहेब बुंदेलखंडात शिरले. त्यांनी मुलूख काबीज केला व तिथे आपले कमाविसदार नेमिले. बाजी भिवराव या सरदाराकडे वसुलाचे काम सोपविले. नाना फडणीसचे वडील बाबा फडणीस यास हिशेबाच्या कामावर नेमिले. बुंदेलखंडाची व्यवस्था लावून झाल्यावर मराठ्यांनी उत्तरेकडील नाक्याचे ठाणे अटेर पर्यंत मुलुख मारला. अटेरचे ठाणे भदावरचा राजा गोपाळसिंग याच्या ताब्यात होते. शिवाय त्याच राजाचे ताब्यात यमुनेचे, चंबळचे व कुवारीचे उतार होते. हे सर्व उतार आपल्या ताब्यात ठेविल्याने मोगल सेनेच्या उत्तर-दक्षिण हालचालीस पायबंद पडेल आणि आपल्या सरदारांना खंडणी वसूल करणे सोपे जाईल हा विचार करून पेशव्यांनी अटेर व भदाव मोर्चे लावून घेतली. राजा गोपाळसिंगाने शरण येऊन मराठ्यास त्यांच्या मागणीप्रमाणे खंडणी दिली. राजा बादशहाचा मांडलीक होता. बादशाही उमराव सादतखान यास राजाच्या ह्या कृत्याचा राग आला. मराठ्यांच्या हाती मोक्याची ठाणी पडल्यामुळे त्याचा तडफडाट सुरू झाला. त्याने मराठ्यांवर चाल केली. यमुना तिरी मराठ्यांच्या फौजेची व त्याची गाठ पडली. नदीचे उतार मराठ्यांचे ताब्यात होते. यामुळे सादतखानास उतार मिळेना म्हणून त्याने समोर असलेल्या मराठ्यांच्या तुकड्यांवर हल्ला चढविला. काहींना पकडले. त्यामुळे सादतखानास वाटले की, आपण मराठ्यांवर विजय मिळविला. मराठ्यांची फौज बुडविली हे वृत्त त्याने बादशहास लिहून पाठविले.[२] बाजीरावास हा सादतखानाचा चावटपणा समजल्यावर त्यानी दिल्लीवर चढाई करून बादशहास सादतखानाने मारलेल्या थापा मिथ्या होत हे दाखविणे कर्तव्य ठरले. सादतखान बुडवावा व दिल्लीस

१. पे. द. १५, ले. ५, पे. द. ३०, ले. १९२.
२. ब. ले. २७, पे. द. २५, ले. २७, १७.

जाऊन दिल्लीचे पुरे जाळावे व मराठे जिवंत बादशहाच्या निदर्शनास आणावे असा बेत करून पेशव्यांनी अचानक दिल्लीवर चाल केली. त्याचा वृत्तांत पेशव्यांच्या शब्दात असा :

पुरे जाळावे व मराठे आहेत असे बादशहास दाखवावे असा विचार करून पातशाही रस्ता सोडून लांब लांब मजला मारून दमनसिंग चुडामणजाट यांचे मुलखातून नेवातियाचे सरहद्दीने डोंगर जिंकीत चाललो. खानडौरान बंगश आगरियास गेले. यांची व सादतखानाची भेट २ जिल्हेजी २३-३-१७३७ रोजी झाली. धोंडोपंत (मराठ्यांचा वकील) खानडौरानपाशी होते. त्यास सादतखानाने खानडौरानास सांगून पाठविले की, बाजीरावाची फौज मोडली. ते खासा चमेळ उतरून गेले, आता त्यांची खुशामत करण्याची जरूरी नाही. वकीलास निरोप द्यावा. त्यावरून धोंडो गोविंद यासी निरोप दिला. आम्हाजवळ आले. जवळून कमरूदखान याची फौज गेली. पण आम्ही त्यासी गाठ न घातली. वीस वीस कोसाच्या मजला मारून तारीख २८ मार्च १७३७ त दिल्लीस बारापुरला व कालीकेचे देऊळ उजवे टाकून कुशबंदी नजीक शहर येथे मुक्काम केला. पुरे जाळून खाक करावे तर दिल्ली महास्थळ पादशहा झाल्यास फायदा नाही. दुसरे पादशहाचे व खानडौरानचे चितात सलूख राखावयाचा आहे. मोगल त्यास सलूख करू देत नाही व अमर्यादा केल्यास राजकारणाचा दोरा तुटतो. याकरिता आगी लावावयाचे तहकूब करून पातशहास व राजे बकतमल यास पत्रे पाठविली. शहरातून दोन हत्ती, उंटे व घोडी आली होती ती सांपडली. लष्करचे लोकांनी शहरचे लोक भवानीचे यात्रेस बाहेर आले होते, त्यास झांबडा केले. दुसरे दिवशी बुधवारी पातशहाचे आज्ञेने राजे बख्तमल यांनी उत्तर पाठविले की, धोंडोपंतास पाठविणे त्यावरून मशारनिल्हेस पाठवावे तरी आम्ही शहराजवळ आला. दिल्लीत गलबला झाला यास्तव (धोंडोपंतास दगा होईल) या भीतीने पाठविले नाही. उत्तर पाठविले भला मजुरा व स्वार पाठवून देणे, मशारनि-ल्हेस पाठवून देतो आम्ही शहरानजीक राहिल्याने, शहरास उपसर्ग लागेल, याकरिता कूच करून झीलच्या तलावावर जातो म्हणून उत्तर पाठवून कूच केले.[1]

## बाजीरावांचा दिल्लीत मुक्काम :

दिल्लीचा दक्षिणेस तीन मैल झालेच्या तलावावर मुक्काम केला. व बादशहास पत्र लिहून आपला पुढील बेत कळविला. बादशहाने त्यास आपले बारा हजार स्वार, वीस हजार पायदळ व तोफखाना आपला सरदार अमीरखान याजबरोबर देऊन बाजीरावावर हल्ला करण्यास पाठविले. शहरात सर्वांनी सावध असावे अशा ताकीदी देण्यात आल्या. मोगल फौजेने मराठ्यांवर चाल दिली. बाजीराव पेशव्यांनी भ्याल्यासारखे मागे सरून मोगलास पूर्णपणे अंगावर घेतले. मोगल पकडीत आलेले दिसताच सखोजी जाधव, मल्हारराव

१. ब्र. च. ले. २७.

व राणोजी यांनी चवताळून जाऊन मोगलास हातोहात तलवारीने कापून काढीले. काही जखमी झाले. काही जीव घेऊन परत गेले. जखमी झालेल्याच्या झुंडी शहरात शिरल्यावर शहरवासियांची बोबडीच वळली. बाजीराव साहेबांनी मनात आणिले असते तर दिल्ली लुटून फस्त केली असती. पण तसे त्यांनी न करता दिल्लीवासियांच्या मनातील घबराट नाहीसा करण्यासाठी झील तलावावरील मुकाम हलवून सात कोसावरील सराई आला बिदीखान येथे ते जाऊन राहिले. तेथे जाताच वजीर व गाजीउद्दीन आपल्यावर चालून येत आहेत हे ऐकून बाजीराव त्वरेने दक्षिणेस कोट पुतळीस ९३ मैल येऊन पोचले. खानडौरान सादतखान वगैरे मातबर सरदार बादशहाच्या बोलावण्यावरून दिल्लीजवळ वजीरास येऊन मिळाले. पण बाजीराव लांब गेलेले त्यांचा पाठलाग करण्यात हंशील नाही असा पोक्त विचार करून सर्व सैन्य स्वस्थ बसले. मराठ्यांची धाड निघून गेलेली ऐकून दिल्लीत आनंद झाला. बादशहाच्या अवाढव्य फौजा अंगावर आल्या असता त्यास चीत करून बादशहास न दुखविता दिल्लीवर अचानक धाड घालण्याचा धूर्त प्रयोग बाजीरावांनी केला. त्यामुळे ते शाहूच्या प्रशंसेस पात्र झाले. स्वारी दिग्विजय मिळवून मोहिम सिद्धीस नेऊन तारीख १७ जुलै १७३७ रोजी पुण्यास आले.[१]

• • •

१. पे. द. १५, ले. ३०.

# बाजीराव कारकीर्दीची शेवटची दोन वर्षे (१७३८—४०)

## कालसूची

| इ. स. . . . . . | |
|---|---|
| १७१६, जानेवारी ३० . | कान्होजी व सिद्दी यांनी मैत्रीचा तह केला. |
| १७२०, मे १४ . . . | कान्होजी व्यापारी जहाजे सुरतेच्या आखातात पकडतात. |
| १७२९, जुलै ४ . . . | कान्होजी आंग्रे मृत्यू. |
| १७३०, जानेवारी १० . | शनिवारवाड्याच्या बांधकामास सुरवात. |
| १७३० . . . . . | नानासाहेब पेशव्याचे लग्न होते. |
| १७३० . . . . . | पिलाजी जाधव पोर्तुगीजांवर हल्ला करून कांबा ठाणे हस्तगत करतात. |
| १७३१, फेब्रुवारी २ . . | पेशवे कुटुंबिय समारंभपूर्वक शनिवारवाड्यात राहावयास जातात. |
| १७३४ . . . . . | सेखोजी आंग्रे मृत्यू. |
| १७३४ . . . . . | मस्तानीस बाजीरावापासून पुत्र होतो. |
| १७३४ . . . . . | ठाणे येथे कोट बांधण्याचे काम पोर्तुगीजांनी सुरू केले. |
| १७३५, फेब्रुवारी ४ ते एप्रिल ३ . . . . . | बाजीराव कुलाब्यास राहून आंग्रे बंधू यांचा कलह मिटवितात. |
| १७३७, मार्च . . . . | मराठ्यांची ठाण्यावर चढाई. |
| १७३७, मार्च २६ . . | मराठे ठाणे पोर्तुगीजांकडून जिंकून घेतात. |
| १७३७, एप्रिल ३ . . | मराठे पारसिक घेतात. |
| १७३७, एप्रिल २८ . . | बेलापूर मराठ्यांच्या ताब्यात येते |
| १७३८, डिसेंबर २९ . . | वसई संग्राम सुरू होतो. |
| १७३८, डिसेंबर . . | चिमाजी अप्पा कोकणात उतरतात. |
| १७३८ . . . . . | नादिरशहा काबूलवर चालून येतो. |
| १७३९, जानेवारी ९ . . | मराठे माहिम काबीज करतात. |
| १७३९, जानेवारी १२ . | तारापूर आणि अशिरी मराठ्यांच्या ताब्यात. |
| १७३९, जानेवारी १८ . | मोंगल बादशहा नादिरशहास विरोध करण्यास जातो. |
| १७३९, जानेवारी २४ . | बाजी भिवराव रेठरेकर तारापूरच्या हल्यात गोळी लागून ठार. |
| १७३९, फेब्रुवारी ५ . . | नादिरशहा सरहिंदला येतो. |
| १७३९, १४ फेब्रुवारी . | नादिरशहा—निजाम भेट. |
| १७३९, मार्च ७. . . . | नादिरशहा दिल्ली ताब्यात घेतो. |

| | |
|---|---|
| १७३९, मे १ . . . . | पर्यंत नादिरशहाचा मुक्काम दिल्लीत. |
| १७३९, मे ५ . . . . | वसईच्या लढाईत पोर्तुगीजांनी शरणागति पत्करली. |
| १७३९, मे १२ . . . | पोर्तुगीज वसईचा किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन करतात व मराठे ताबा घेतात. |
| १७३९, जून ८ ते ३० पर्यंत . . . | इंग्रज वकिल गॉर्डन सातार्‍यास महाराजांच्या भेटीस. |
| १७३९, डिसेंबर . . | बाजीराव नासिरजंगावरील स्वारीस जातो. |
| १७३९ . . . . | वसई मराठ्यांच्या ताब्यात येते |
| १७४०, जानेवारी १४ . | इंचवर्डची बाजीरावाशी गाठ. |
| १७४०, मार्च . . . | बाजीरावाची नासिरजंगवरील स्वारी समाप्त. |
| १७४०, एप्रिल २८ . . | बाजीरावाचा अंत. |

# ७

## बाजीराव कारकीर्दीची शेवटची दोन वर्षे (१७३८—४०)

बाजीराव दिल्लीहून परततानाची स्थिती — नादिरशहाची स्वारी (१७३८-३९) — पोर्तुगिजांवर स्वारी — त्यांचा बंदोबस्त — मराठे वसई घेतात—मुंबईत पडसाद — आंग्रे घराण्यातील अंतस्थ कलह — मस्तानी प्रकरण — नासिरजंगचा उच्छेद — बाजीरावांचे आकस्मिक निधन — बाजीरावांचा स्वभाव व योग्यता.

### नादिरशहाची स्वारी (१७३८-३९) :

बाजीरावांच्या दिल्लीवरील द्रुतगती स्वारीमुळे दिल्ली दरबार हादरला. खान दौरान व सवाई जयसिंग यांचें बाजीरावांशीं सलोखा राखण्याचें धोरण होते तेंच योग्य असे मोगल मुत्सद्यांना वाटू लागले. दिल्ली स्वारीनंतर बाजीरावांनी भोपाळ येथें निजामाचा दणदणीत पराभव केला. ह्या पराभवानंतर निजाम उल्मुल्क दिल्लीला परतला आणि त्याने बाजीरावांशी जो आपला दोराहा सराईचा तह झाला होता त्यास बादशहाची संमती मिळविली. सन १७३८ च्या डिसेंबरात मोगल बादशहाने दिल्ली मुक्कामी मराठ्यांचे वकील बाबूराव मल्हार यास भेट दिली. तो लिहितो "बादशहा व निजाम यांचा स्नेह शपथपूर्वक जाला, तरी बादशहाविरुद्ध अंतस्थ कारस्थाने चालू होती. इतक्यात इराणच्या नादिरशहाचा व दिल्लीच्या बादशहाचा अफगाण हद्दीसंबंधी तंटा लागून नादीरशहा हिंदुस्तानवर स्वारी करणार अशी वदंता आली. कदाचित निजाम, सादतखान वगैरेनी त्यास येण्याची भर दिली असावी. आपल्या हातून मराठ्यांचा बंदोबस्त होत नाही, तर शेजारचा मुसलमान राजा आपणहून येत आहे त्याचा फायदा घेऊन मराठ्यास व इतर शत्रूस ठिकाणी बसवावे अशी या उमरावांची भावना असेल".[१]

नादिरशहाच्या स्वारीचे हेतू दिल्लीस स्वारीच्या अगोदर एक वर्ष माहीत होते. नादिरशहाने इराण सोडल्यावर तो सन १७३८ मध्ये काबूलवर चालून आला आणि ते शहर ताब्यात घेतले. काबूलहून त्याने लागलीच दिल्लीच्या बादशहाकडे आपला खास दूत पाठविला आणि कळविले की सरहद्दीवरील रानटी टोळ्यांच्या धाडीपासून आपल्या देशातील प्रजाजनास त्रास होतो. ह्या रानटी टोळ्यांचा बंदोबस्त करून धाडी थांबवाव्यात. ह्या तक्रारींची दखल मोगल बादशहाने घेतली नाही हे नादिरशहास समजताच तो नोव्हेंबरमध्ये काबूलहून दिल्लीकडे येण्यास निघाला. पेशावर आणि अटक काबीज करून तो लाहोरला सैन्यासह जानेवारी १७३९ च्या सुरुवातीस आला. हा वेळपर्यंत निजाम उल्मुल्क हात चोळीत बादशहाची मजा बघत बसला होता. लाहोरचा

---

१. पे. द. १५, ले. ५०.

मोगल गव्हर्नर झकारियाखान ह्याने नादिरशहाच्या सैन्याची लाट थोपवून धरण्याचा प्रयत्न केला. पण त्यात त्यास अपयश येऊन तारीख १२ जानेवारीस नादिरशहाने लाहोर काबीज केले. दिल्लीमध्ये ह्यावेळी कसल्याच हालचाली नव्हत्या. तारीख १८ जानेवारीस मोगल बादशहा महमदशहा आपले सरदार व सैन्य यासह नादिरशहास विरोध करण्यासाठीं मोठ्या तयारीने निघाला.[1] कर्नाल येथें त्याच्या सैन्याचा मोठा तळ पडला. त्याजवळील लढाई उपयोगी तोफा, सामान भरपूर होते. त्याच्या बळावर त्याने आक्रमकाचा सहज पराभव केला असता. पण आक्रमकासमोर ठासून उभे राहण्याची जिद्द, सैन्यातील एकी आणि मुत्सद्देगिरी यांच्या अभावामुळे मोगल सैन्याची फळी पत्त्यांच्या बंगल्यासारखी कोसळली. नादिरशहाने ५ फेब्रुवारीस सरहिंद गाठले. दिनांक १३ फेब्रुवारीस मोगल सैन्याने कर्नालवरून इराणी सैन्यावर चाल केली. पण हा त्यांचा हल्ला इराणी सैन्याने परतून लावला. त्यात मोगल सैन्य बरेच कापले गेले. खानदुरान मीर बक्षीस जबर जखम होऊन तो त्यातच दोन दिवसात मरण पावला. सादतखान जखमी झाला, त्यास इराणी सैन्याने पकडले.[2] निजाम उल्मुल्क ह्यावेळी धरसोड करीत बसला होता. त्याने या लढाईत यत्किंचितही भाग घेतला नाही. यावेळी बादशहाकडे अत्यंत हुषार गृहस्थ असा फक्त निजामच होता. परंतु खान डौरान व सादतखान यांच्याशी मत्सर असल्याने तो अंगचोरपणा करून स्वस्थ राहिला.

लढाई आटोपल्यावर नादिरशहाने आपणास हवी असलेली माहिती काढून घेण्याचे ठरवून कैदी म्हणून पकडलेल्या सादतखानास भेटीस आणून विचारले की दिल्लीची संपत्ती कशी मिळविता येईल? ती मिळविणे हाच नादिरशहाचा स्वारी करण्यामागे मुख्य उद्देश होता. सादतखान म्हणाला "सर्व किल्ली निजामाच्या हातांत आहे, त्याला बोलवा". दुसऱ्या दिवशी तारीख १४ फेब्रुवारी १७३९ रोजी नादिरशहाने निजामास बोलावून विचारले "तुमच्यासारखे उमराव बादशहाजवळ असताना भुरट्या मराठ्यांनी दिल्लीवर येऊन खंडण्या घ्याव्या याचा अर्थ काय?" निजामाने उत्तर दिले की, "बादशहाने नव्या नव्या मंडळींना जवळ करून माझ्यासारख्यांचा सल्ला तुच्छ मानला. तेव्हा नाइलाज होऊन मी दक्षिणेस गेलो". पुढे निजाम व नादिरशहा यांची बोलणी होऊन असे ठरले की नादिरशहाने पन्नास लाख रुपये खर्च घेऊन तिथूनच परत जावे. दुसऱ्या दिवशी नादिरशहाने बादशहास आपल्या छावणीत मेजवानी दिली.[1] मेजवानीहून परत आल्यावर बादशहास खान डौरान निवर्तल्याचे कळले. तेव्हा बादशहाने मीर बक्षीपदी निजाम उल्मुल्कची नेमणूक केली. या पदावर सादतखानचा डोळा होता. त्यामुळे तो अतिशय नाराज झाला व त्याने नादिरशहास कळविले की, "पन्नास लाख रुपये घेऊन परत जाण्याचे प्रयोजन काय? दिल्लीस गेलात तर वीस कोटी रुपयास मरण नाही. निजाम हा एकटाच पराक्रमी आहे, परंतु तो पक्का कार्यसाधू व लुच्चा आहे".

---

१. रा. खं ६, ले. १३१.

२. सरदेसाई, म. रि. पेशवा बाजीराव, पृ. ३२७.

नादिरशहाने सादतखानाच्या या सूचनेचा गंभीरपणे विचार केला आणि दिल्लीची संपत्ती गिळंकृत करण्याचे ठरविले. बादशहाच्या छावणीस आपल्या सैन्याचा गराडा घालून बादशहाच्या सैन्याची उपासमार सुरू केली. बादशहा, कमरुद्दीन खान व निजाम उल्मुल्क यांना कैद केले;[१] आणि स्वतः दिल्लीवर चाल करून जाऊन तारीख ७ मार्च १७३९ रोजी दिल्ली ताब्यात घेतली. सादतखान यास बोलावून आणून सांगितल्याप्रमाणे वीस कोटी रुपये टाक अशी त्यास आज्ञा केली. या परिस्थितीस आपल्यास तोंड देता येणार नाही हे लक्षात येताच सादतखानाने विष प्राशन करून प्राणत्याग केला. दुसऱ्या दिवशी तारीख १० मार्च रोजी दिल्लीस बादशाही पद धारण करून आपल्या नांवाने द्वाही फिरविली.[२] तेथपासून तो १ मे १७३९ पर्यंत त्याचा मुक्काम दिल्लीस होता. तेवढ्या अवधीत त्याने पैसे उकळण्यासाठी जे जे अनन्वीत प्रकार व अत्याचार केले त्याचे वर्णन प्रसिद्धच आहे. तारीख १ मे रोजी बादशहाने मोठा दरबार भरवून महमदशहास दिल्लीच्या तख्तावर बसविले आणि सुमारे एक अब्ज रुपये एवढी संपत्ती आणि सिंधू नदीच्या पश्चिमेकडील प्रदेश आपल्या ताब्यात घेऊन जाताना सुप्रसिद्ध मयूर सिंहासन व कोहीनूर हिरा घेऊन तो इराणला परत गेला. नादिरशहाच्या स्वारीमुळे दिल्लीत हाहाकार उडाला. त्यावेळी मराठ्याचा वकील बाबूराव मल्हार हा जयपुरास पळून गेला. तिथून त्याने पेशव्यास पत्र लिहिले ते असे "चकतियांची पातशाही बुडाली, इराणी जाली, यास्तव सवाईजीनी आपले व लोकांचे कबिले उदेपुरास पाठवून सडे जाले आहेत. इकडील दक्षिणच्या मातबर फौजा जातील तेव्हा नादिरशहाशी प्रसंग पडेल". यावरून बादशहास मदत करून नादिरशहास घालवून द्यावा अशी मराठ मंडळाची इच्छा होती. छत्रपती शाहू व बाजीराव यांचाही हाच बेत ठरला. मुसलमानांची फौज जमा करून नादिरशहा दक्षिणेत येणार अशी बातमी आली. तेव्हा वसईची मोहीम आटोपताच बाजीराव आपल्या सरदारासह त्याजवर निघाले. हिंदू-मुसलमानांनी एक होऊन नादिरशहावर चालून जावे असा बाजीरावानी बेत ठरविला, नासिरजंगास आपल्या मदतीस बोलाविले व उत्तरेकडे सैन्यासह प्रयाण केले. सैन्याचा तळ बऱ्हाणपुरावर असता त्यास नादिरशहा इराणला परत गेल्याची बातमी समजली. नादिरशहाने परत जाण्यापूर्वी छत्रपती शाहू महाराज, बाजीराव या सर्वांस पत्रे पाठविली व महमदशहास आम्ही दिल्लीच्या तख्तावर बसविले त्यास आम्ही भाऊ समजतो. सर्वांनी त्याची आज्ञा पाळावी असे कळविले. पूर्वीचे सर्व करार पाळण्याचे फर्मान बादशहाने बाजीरावास पाठविले, ते घेऊन बाजीराव पेशवे जुलै १७३९ मधे छत्रपती शाहू राजांच्या भेटीस साताऱ्यास गेले.

**वसईची मोहीम (१७३७—३९) :**

मराठ्यांनी स. १७३९ मधे पोर्तुगिजांशी झालेल्या युद्धात मुख्य स्थळ वसई काबीज करून हिंदू लोकांवर पोर्तुगिजांनी केलेल्या जुलुमास व धर्मच्छळास

---

१. रा. खं. ६, ले. १३१.

२. कित्ता. ६, ले. १३३.

पायबंद घातला. म्हणून या वसईच्या युद्धास इतिहासात अनुपम महत्त्व प्राप्त झाले.

पोर्तुगिजांनी पश्चिम किनाऱ्यावरील गोव्यापासून दमणपर्यंतच्या ४०० मैलाच्या किनारपट्टीच्या टापूतील काही स्थळे आपल्या ताब्यात ठेवली होती आणि त्यावर आपला अंमल बसवून मोर्चेबंदी केली होती.

कोंकण प्रांत स्वराज्यात मोडत होता. इ. स. १७१९ त स्वराज्याच्या सनदा बादशहाने शाहू महाराजांच्या नांवे करून दिल्या तेव्हापासून पेशव्यांनी कोंकण प्रांत आपल्या ताब्यात आणण्याची तजवीज केली. कोंकण प्रांतात पोर्तुगीज, आंग्रे, इंग्रज, जंजिरेकर, सिद्दी अशा अनेक सत्तांचे हितसंबंध होते. त्या सर्वांना कबजात ठेवून त्याजवर आपली सत्ता बसविणे हे पेशव्यांचे व शाहू महाराजांचें कर्तव्य बनले. त्यातूनच पुढील संग्राम उपस्थित झाले.

हिंदू धर्माचे उच्चाटन करण्यासाठी पोर्तुगिजांनी सागरी बेटांत हिंदूंवर जुलुम जबरदस्ती करून, बाटवून, ख्रिश्चन करण्याचा सपाटा सुरू केला. यासंबंधीच्या तक्रारी पेशव्यांच्या कानी गेल्या आणि उत्तर कोंकणचे हिंदू रहिवाशी धर्म संरक्षणासाठी पेशव्यांनी पोर्तुगिजांचे पारिपत्य करावे अशी मागणी करू लागले. पोर्तुगिजांनी हिंदू रयतेस सक्तीने बाटविण्याचे चालविले. जे बाटून ख्रिश्चन धर्म स्वीकारण्यास तयार होत नसत त्यांना राखे तोबरे देऊ लागले. समुद्र किनारपट्टीवर मालाची ने-आण करणाऱ्या जहाजांना पोर्तुगीज कार्तीज घेण्यास भाग पाडू लागले व त्याजकडून खंडणी मागू लागले. अशा रीतीने स्थानिक सत्ताधीशांच्या जहाजांची ने-आण करण्याच्या रीतसर हक्कांची पायमल्ली करू लागले. तलवारीचा धाक दाखवून गांवेच्या गांवे बाटवू लागले. कोणी घरातील कर्ता पुरुष निवर्तला म्हणजे त्या कुटुंबातील लहान मुलास चर्चमधे घेऊन जाऊन त्यास क्रूस चाटावयास लावीत. हिंदूंना आपली धर्मकृत्ये करण्यास ते मज्जाव करू लागले. देवळे पाडून तिथे चर्च बांधली. मोठमोठ्या हुद्यांवरील हिंदूंची टवाळी करून त्याजवर खोटेनाटे आरोप लावून त्यांनी नाइलाजाने ख्रिश्चन धर्म स्वीकार करावा अशी परिस्थिती ते निर्माण करू लागले. ह्या छळाच्या कांगाळ्या पेशव्यांच्या कानी गेल्या व त्यांनी पोर्तगिजांचा बंदोबस्त करण्याचे ठरविले.[1]

इ. स. १७१९ मधे बाजीरावांचे वडील पेशवे बाळाजी विश्वनाथ ह्यांनी कल्याण प्रांत जिंकून त्याची सुभेदारी रामचंद्र महादेव ह्यास करण्यास दिली.[2] बाजीराव पेशव्यांनी जव्हार व रामनगर काबीज करून आपला अंमल वाढविला होता. इ. स. १७३० त पिलाजी जाधव यांनी पोर्तुगिजांवर हल्ला करून भिवंडी लगतचे कांबा ठाणे हस्तगत केले.[1] पोर्तुगालहून कौंटडी संडोपिल हा करारी स्वभावाचा महत्वाकांक्षी माणूस गव्हर्नर म्हणून इ. स. १७३२ मधे आला. तो नऊ वर्षे राहिला. त्याने आल्याबरोबर आतताईपणाने

१. च. ले. ३७. १२०.

२. पे. द. ३०, ले. ३३९.

मराठ्यांना त्रास देण्यास सुरुवात केली. इ. स. १७३४ त ठाणे येथे मजबूत कोट बांधण्याचे काम पोर्तुगिजांनी हाती घेतले. काम जलद चालावे म्हणून हिंदू प्रजेवर वेठीची सक्ती करण्यात आली व त्यांच्यावर जादा कर बसविण्यात आले. या छळाने त्रासून जाऊन साष्टींतील लोक भराभर मराठ्यास सामील होऊ लागले. दोन महत्त्वाच्या जागा पोर्तुगिजांच्या ताब्यात होत्या. वसई किल्ला व ठाणे येथील किल्ला. वसई किल्ला फारच बुलद होता. कल्याण येथे मराठ्यांचे ठाणे होते, तेथून ते ठाण्यावर हल्ला करून त्याचा तावा मिळवितील असे पोर्तुगिजांस वाटून त्यांनी ठाणे येथे मजबूत किल्ला बांधण्यास सुरुवात केली.[१] ठाण्याचे काम पूर्ण होण्याचे आंत मराठ्यांनी १७३७ च्या उन्हाळ्यात ठाण्यावर चढाई केली. चिमाजी अप्पाने आपली निवडक माणसे ठाणे सर करावयास पाठविली. त्यांनी २६ मार्च १७३७ रोजी ठाणे पोर्तुगिजांपासून जिंकून घेतले.[२] आणि तिथून वसईवर हल्ला करण्यासाठी चांगला बंदोबस्त ठेविला. ३ एप्रिलला पारसिक घेतले, बेलापूर २८ एप्रिलला पडले. तसेंच वसईजवळील धारावी व कल्याणजवळील सांताक्रूझ ही ठाणी मे महिन्यात मराठ्यांनी घेतली. पाऊस काल जवळ आला तेव्हा चिमाजी अप्पाने निरनिराळ्या किल्ल्यांवर बंदोबस्तास खाशीची मंडळी ठेवून ते १ जुलै १७३७ रोजी पुण्यास परत आले.[३]

**वसईवर हल्ला :**

वसईचा किल्ला हा वसई रेल्वे स्टेशनपासून ४ मैल आत समुद्र किनारी आडवा आहे. त्रिकोणाकृती अशा अगडबंब किल्ल्याचा परीघ सव्वा मैल असून त्याच्या भिंती दगडी आहेत. जमिनीपासून उंची तीस ते चाळीस फूट असून तटाची रुंदी पांच फुटाची आहे. मराठ्यास जमिनीवरून हल्ला करून हा किल्ला शत्रूकडून जिंकून घेणे जवळ जवळ अशक्य झाले. तरीही ठाणे किल्ला ताब्यात आल्यावर १७३७ च्या पावसाळ्यात वसई काबीज करण्याचा उद्योग शंकराजी पंत व गंगाजी नाईक यांनी केला पण तो सिद्धीस गेला नाही. तसेंच चिमाजी अप्पा निजामाचा पराभव करण्यात बाजीरावास मदत करण्याच्या कामात गुंतले होते. त्यांना १७३८ च्या प्रथमार्धापर्यंत त्यातून मुक्त होता आले नाही. या मुदतीत ठाण्याचा किल्ला मराठ्यांकडून हिसकावून घेण्याचा प्रयत्न वसईचा जनरल पीड्रो डमेल याने केला. तो मचव्यातून कोटाची पहाणी करीत असता मराठ्यांनी टाकलेल्या गोळ्यास बळी पडून तो मृत्यू पावला, तेव्हा फिरंग्यांचा धीर खचून ते माघारी वसईस गेले.

नादिरशहा दक्षिणेत येणार अशी बातमी उठल्यावर बाजीराव खानदेशकडे गेले आणि चिमाजी अप्पा १७३८ च्या डिसेंबरात कोंकणात उतरले. बरोबर शिंदे, होळकर, बाजी भिवराव रेठरेकर, तुकोजी व जिवाजी पवार, पिलाजी

१. पे. द. ४०, ले. ५.

२. पे. द. १६, ले. १४, ३१.

३. कित्ता, ले. ३४.

जाधव इत्यादी सर्व मोठे सरदार होते. मराठ्यांनी वसईवर हल्ला करण्याची जय्यत तयारी केली खरी पण पोर्तुगीज काही गप्प बसले नव्हते. सन १७३७ च्या अखेरीस पोर्तुगिजास गोव्याहून व युरोपांतून मदत आल्यामुळे त्यांनीही मराठ्यांविरुद्ध १७३८ मध्ये चढाई सुरु केली. जानेवारी १७३९ त पोर्तुगिजांच्या ताब्यातील वसईजवळील माहीम ठाण्यावर मराठ्यांनी जोराचा हल्ला चढविला. त्यात महादजी पंत फडके हा मर्दुमकी गाजविणारा शूर लढवय्या कामास आला.[१] त्यामुळे मराठ्यांमधे काही काळ नैराश्य पसरले, पण रणांगणावर चिमाजी अप्पा येताच सर्व सैनिकांच्या अंगात चैतन्य संचारले. चिमाजी अप्पांनी कोंकणची मोहीम आपल्या ढासळणाऱ्या शरीर प्रकृतीची तमा नि बाळगता अविरत श्रम करण्याची हिंमत धरून "करेंगे या मरेंगे" ह्या निश्चयाने हाती घेतली. त्या सर्व मातब्बर मराठे सरदारांनी त्यास साथ दिली नोव्हेंबर १७३८ पासून जून १७३९ पर्यंत चिमाजी अप्पा सारखे ठिकठिकाणी हिंडत होते. गोव्याकडून पोर्तुगिजास कुमक येऊ नये म्हणून पावसाळ्यानंतर चिमाजी अप्पांनी व्यंकटराव घोरपडे यास गोवा स्वारीवर रवाना केले. त्यामुळे गोवेकर पोर्तुगीज वसईस मदत पाठवू शकले नाहीत. तारीख २९ डिसेंबर १७३८ नंतर संग्राम सर्वत्र सुरू झाले. ९ जानेवारीस मराठ्यांनी माहीम काबीज केले. तारापूर आणि अशेरी १२ जानेवारीस मराठ्यांच्या हाती आली आणि वसईजवळील धारावी ६ मार्च रोजी मराठ्यांच्या ताब्यात आली. त्या जागेवरूनच मराठ्यांना वसई काबीज करणे सोपे झाले. बुलंद बाका तारापूरगड एलगाराचा इशारा देत असताच सर करण्यात मर्दुमकी गाजविणाऱ्या बाजी भिवराव रेठरेकर यास गोळी लागून २४ जानेवारी १७३९ रोजी त्याची आहुती पडली.[२] सर्वास फार दुःख झाले. तरी पण सन १७३९ च्या जानेवारीत मराठ्यांनी माहीम, तारापूर, डहाणू व शिरगांव ही स्थळे ताब्यात घेतली. मार्च मध्यापर्यंत वसईवर हल्ला करण्याची सर्व तयारी पूर्ण झाली.[३]

वसई किल्ल्यात घुसण्यासाठी किल्ल्याच्या तटबंदीस भोक पाडून जागा करणे हे मुख्य काम होते पण बुलंद तटाचे संरक्षण पोर्तुगिजांनी ठायी ठायी बसविलेल्या अजस्त्र तोफा करीत होत्या. जमिनीकडून उत्तरेकडे जाऊन किल्ल्यास भिडणाऱ्या तटाच्या वरील तोफा निकामी करण्याचे काम मराठ्यांनी सुरुंग उडवून केले. लोकांनी तातडीने हल्ला चढविला, तोच फिरंगी यांनी हुक्के, गरनाळा, दारुची मडकी, बरखंदाजी रंजगिरी याचा अतिशय मार दिला. सुरुंग लावल्यामुळे निम्मे बुरुज उडाले, हे पाहून मराठ्यांनी जीविताकडे लक्ष न देता एकदम चालून गेले. आतून फिरंग्यांनीही हिंमतीची आणि मर्दुमकीची शिकस्त केली. तथापि मराठ्यांचा बाहेरून मारा फार भयंकर होता. त्यामुळे मातबर फिरंगी लोक मेले. शेवटची हातघाईची लढाई दोन दिवस चालली. किल्ल्याच्या खिंडारातून मराठे वारुळातून मुंग्या बाहेर

१. म. रि. बाजीराव, पृ. ३५२.
२. पे. द. १६, ले. १३६.
३. रा. खं. ३, ले. २७ व. ब्र. च. ले. ५२.

पडतात त्या गतीने भराभर आत शिरले आणि सपासप कापत चालले. फिरंग्याची दाणादाण उडाली. पोर्तुगिजांकडील अधिकारी व माणसे मिळून सुमारे ८०० लोक मारले गेले. बाहेरील मारामुळे पोर्तुगीज हतबल झाले आणि त्यांनी शरणागती स्वीकारण्यास मराठ्यांकडे माणसे पाठविली. त्यांच्याशी करार करून तहनामा देऊन आत पाठविले. हत्यारे व कबिले सामानसुद्धा सोडावे असा करार तारीख ५ मे रोजी केला व किल्ला खाली करण्यास ६ दिवसांची मुदत दिली. तहावर सह्या झाल्यावर शनिवार तारीख १२ मे रोजी पोर्तुगिजांनी किल्ला खाली केला. त्यांच्या बायका मुलास कोणत्याही प्रकारची वाईट वागणूक न देता मराठ्यांनी सुरक्षितपणे त्यांना जहाजातून जाऊ दिले. काहीना स्वस्थळी जाण्यासाठी गलबते पुरविली, तसेच किल्ला मराठ्यांच्या अंमलाखाली आल्यावर ख्रिश्चन धर्मियास चर्चमधून प्रार्थना करण्याची मुभा देण्यात आली. अशा रीतीने युद्ध धर्माचे पालन करून मराठ्यांनी वसई जिंकून पोर्तुगिजांचा नक्षा उतरविला व कोंकणात मराठी सत्तेची वाढ केली.

**वसई मोहिमेचे मुंबईत उठलेले पडसाद :**

दोन वर्षे चाललेली वसईची मोहीम मराठ्यांना दणकेबाज विजय मिळवून देऊन संपली. मराठ्यांनी वसईचा ताबा १२ मे १७३९ रोजी घेतला आणि वसई किल्ल्याच्या तटावरून भगवा झेंडा मोठ्या समारंभपूर्वक सुमुहूर्त पाहून तारीख २३ मे रोजी फडकाविला. पोर्तुगीज सत्ता लयास जाऊन मराठ्यांची राजसत्ता आसमंतात आल्याची जाणीव ह्या फडफडणाऱ्या झेंड्याने परिसरांतील जनमानसात रूजविली. पश्चिम किनारा व्यापार उद्योगासाठी पोर्तुगिजांच्या ताब्यात दोन शतके होता. या तहाने पोर्तुगिजांचा समुद्र काठचा अंमल नाहीसा झाला. फक्त गोवा, दीव व दमण एवढीच ठिकाणे पोर्तुगिजांच्या ताब्यात राहिली. तहाचे काम उरकून चिमाजी अप्पा वसईहून आणि व्यंकटराव घोरपडे गोव्याहून निघून दोन्ही विजयी वीर साताऱ्यास शाहू महाराजांच्या दर्शनास जूनच्या अखेरीस गेले. ह्या दोन्ही विजयी वीरांचे स्वागत मोठ्या खुषीने व वीरोचित असे महाराजानी केले.

मराठ्यांच्या या विजयाने मुंबईकर इंग्रजांच्या छातीत धडकी भरली. मराठ्यांशीं दोस्ती न राखल्यास मुंबईची वसई व्हावयाची अशी शंका त्यास जाचू लागली. म्हणून त्यांनी कॅ. इंचबर्ड यास जून १७३९ त चिमाजी अप्पांच्या भेटीस पाठविले. दोघांनी इंग्रज मराठे याजमधील शांततेचा तह होण्यासंबंधी बोलणी केली. ह्या बोलण्यातून विशेष फलनिष्पत्ती न दिसल्यामुळे इंग्रजांनी कॅ. गॉर्डन यास शाहू महाराजांकडे तहाची बोलणी करण्यासाठी पाठविले. तो साताऱ्यास शाहू महाराजांपाशीं ८ जून ते ३० जूनपर्यंत होता. त्याने शाहू महाराजांस हिरे, मोती, माणके आदि मौल्यवान वस्तू भेटीदाखल दिल्या. आपल्या साताऱ्च्या मुक्कामात त्याने अनेक सरदारांच्या मुलाखती घेतल्या. तेव्हा त्यास बाजीराव ही एकच अद्वितीय पराक्रमी व्यक्ती मराठी

राज्यात आहे असे आपले मत इंग्रजांस कळविले. तेव्हा बाजीरावांची मर्जी संपादून मराठ्यांशी शांततेचा तह करून मुंबईस धोका देणार नाही असे कबूल करून घ्यावे हा हेतू धरून इंग्रजांनी बाजीरावांच्या भेटीस कॅ. इंचबर्डची रवानगी केली. इंचबर्ड बाजीरावांस १४ जानेवारी १७४० रोजी गोदावरी काठी भेटला. बाजीरावांनी तहाच्या कलमास मान्यता दिली. दरम्यान नासिरजंगावर स्वारी होऊन बाजीराव रावेर गांवी १७४० त निवर्तले. इंग्रजांनी नानासाहेब पेशव्यांशी हा तह ७ सप्टेंबर १७४० रोजी पूर्ण केला. मराठ्यांची मर्जी संपादन करण्यासाठी इंग्रजांनी चेऊल व रेवदंडा ही दोन स्थळे मराठ्यांस दिली.

**आंग्रे प्रकरण :**

कोंकणपट्टीचे संरक्षण करण्याचे काम राजाराम काली घोरपडे निसबतीन कान्होजी आंग्रे यांनी सुरू केले हे आपण पाहिले. त्यांनी इंग्रज कुलाबेकर सिद्दी व पोर्तुगीज यांना आपल्या आरमाराच्या बळावर दहशत बसविली. कान्होजी आंग्रे यांची गलबते मुंबईवर त्याचप्रमाणे वरळी, वांद्रे वगैरे ठिकाणांवर केव्हा हल्ले करतील याचा नेम नव्हता, म्हणून इंग्रजांनी कान्होजीच्या हल्ल्यापासून मुंबई बेटाच्या संरक्षणाची नेहमीच जय्यत तयारी ठेवली होती. कान्होजींची हालचाल इंग्रज डोळ्यात तेल घालून पहात असत. सिद्दीने कुलाबा व खांदेरी ही बेटे वेढली असता आंग्र्यांच्या जहाजांनी त्यांना बगल दिली. मुंबईच्या बचावाच्या दृष्टीने सिद्दीशी इंग्रजांनी सख्य जोडले होते. पोर्तुगिजांनी आंग्र्यांविरुद्ध इंग्रजांच्या मदतीस न जाता परस्पर मदतीचा तह केला (फेब्रुवारी १७०१). तेव्हापासून कान्होजी आंग्र्यांचे पारिपत्य करण्याची व त्यांची जहाजे बुडविण्याची खटपट मुंबईकर इंग्रज, जंजिऱ्याचा सिद्दी, सुरतेचा नवाब व मोगल बादशहा याच्याकडून केली जात असावी असे दिसते.

शाहू महाराज इ. स. १७०८ मध्ये मोंगलांच्या कैदेतून सुटून दक्षिणेत आले तेव्हा कोंकण किनाऱ्याचे अधिपती आंग्रे हे ताराबाईच्या पक्षात होते. कान्होजीसारखा कर्तबगार पुरुष शाहू छत्रपतींच्या सेवेत अवश्य हवा हे जाणून बाळाजी विश्वनाथ ह्यांनी इ. स. १७१६ च्या नोव्हेंबरात शाहू महाराज व कान्होजी आंग्रे यांच्यात तह घडवून आणिला. या तहात कोंकणात समुद्रपट्टींत जिकलेला प्रदेश कान्होजी आंग्रे यांजकडे सरंजाम म्हणून राहू देण्याचें कबूल केले. तसेच सरखेल हा किताब छत्रपतींनी आंग्र्यांना दिला. ह्यात कान्होजींकडे जो प्रदेश सरंजामास लावून दिला होता त्यात जंजिरेकर सिद्दीचा काही प्रदेश मोडत होता. जंजिरेकर सिद्दीस कान्होजीकडून परस्पर खडे चारले जावेत ह्या हेतूनें पेशवे बाळाजी विश्वनाथ यांनी ही पाचर मारली होती. कान्होजींना जंजिरेकर सिद्दीस वठणीवर आणण्यास इ. स. १७१३ ते १७१५ अशी दोन वर्षे खपावे लागले. शेवटी कान्होजी व सिद्दी ह्यांच्यामधे तारीख ३० जानेवारी १७१५ रोजी तह झाला. ह्या तहाने आपली सत्ता कमी झाली हे जंजिरेकरास बोचत राहिले. त्यांनी आंग्र्याचा पाडाव

करण्यासाठी मुंबईकर इंग्रजांचे साहाय्य घेतले. इंग्रजांनी सिद्दीस मदत केली पण कान्होजीपुढे ह्या दोघांचे काही चालले नाही.

कान्होजींनी सुरतेच्या इंग्रजांच्या खात्रीचा एक व्यापारी मुल्ला महमदअली याची काही मालाची गलबते तारीख १४ मे १७२० च्या सुमारास सुरतेच्या आखातात पकडली. ह्या व्यापाऱ्यांने इंग्रजास लिहून प्रबळ व अति बलिष्ठ अशा आंग्र्यास शासन करा अशी विनंती केली. आंग्र्यानी अहमदाबाद, सुरत आणि कित्येक बंदरातील व्यापारी गलबते पकडून दिली. आंग्रे हे दर्यावर लूटमार बिनविरोध करीत असल्यामुळे हे असेच चालू राहिल्यास आम्ही पाच लढाऊ जहाजे, पुष्कळ लोक व मोहिम उत्तम तऱ्हेने करता यावी म्हणून युद्धोपयोगी सामुग्री पाठविण्याची आमची तयारी आहे असे सुरतेच्या इंग्रजास मोगल सुभेदारास कळविण्यास लिहिले.

असे हे अतिबलिष्ठ कान्होजी आंग्रे ४ जुलै १७२९ रोजी वारले. निवर्तल्या-वर त्यांच्या मुलात भांडणे सुरू झाली. ती पेटविण्याचे काम ब्रह्मेंद्र स्वामी धावडशीकर व इंग्रज यांनी केले. धावडशीकर स्वामी नेहमी पैश्याकरीता हपापलेला होता. तो कुलाबकरास नेहमी पैशासंबंधी लिहित असे. कान्होजींना तीन बायका व सहा पुत्र होते. थोरली बायको मथुराबाई तिच्यापासून सखोजी व संभाजी, दुसरी लक्ष्मीबाई तिला मानाजी व संभाजी व तिसरी गहनाबाई हिचे पोटी येसाजी व धोंडजी. कान्होजीचे पश्चात सेखोजीस सरखेली प्राप्त झाली. सेखोजीने कान्होजीच्या धोरणानुसार राज्यकारभार केला. सर्व भांवडांना एकमेकापासून अलग करून अशा रीतीने राज्य कारभाराच्या व्यवसायात गुंतवून ठेवले कि त्यामुळे भांडणे न होता त्रयस्थांचा शिरकाव स्वराज्यात होऊ शकला नाही. सेखोजी १७३४ त मरण पावला. ह्यावेळी संभाजी आंग्रे अंजनवेलीच्या स्वारीत गुंतला होता. त्याचे सहाय्यास तुळाजी होता. कुलाब्यात धोंडजी व येसाजी आंग्रे मुलकी कारभार पाहात होते.

सेखोजीच्या मृत्यूनंतर वडीलकीच्या मानाप्रमाणे सरखेलीचा हक्क सभाजी-कडे आला असता मानाजीने सरखेली आपणास मिळावी म्हणून खटपट चालविली. संभाजी स्वभावाने तापट होता. त्याच्या वागण्याचा शांत स्वभावी मानाजीस राग येऊन त्याने आपणास सरखेली मिळण्यासाठी जोरात प्रयत्न सुरू केले. आणि त्याकरीता पोर्तुगीज व इंग्रजांची मदत घेतली. इंग्रजांनीही चालून आलेली संधी सुवर्ण संधी मानून त्यांनी मानाजीच्या सहाय्यास इंचबर्ड यास चेऊलास डिसेंबर १७३४ मध्ये पाठविले. इतकेच नव्हे तर इंचबर्डला इंग्रजांनी सूचना दिल्या की, मानाजीला द्रव्यसहाय्य, मनुष्यबळ व इतर लढाऊ साहित्य हवे असल्यास देणे व त्यास संभाजीविरुद्ध फितविणे.

मानाजीने आपला हस्तक बाजीरावाच्या भेटीस पाठवून त्यास तावडतोब आपल्या मदतीस बोलविले. बाजीरावांनी कुलाब्यास तारीख ४ फेब्रुवारी १७३५ ते ३ एप्रिल १७३५ पर्यंत आपला मुक्काम ठेऊन आंग्रे बंधुचा तंटा

मिटविण्याची तोड काढली. मानाजीने कुलाब्यास राहावे व संभाजीने सुवर्णदुर्गास राहून त्यांना दोन भाग करून दिलेल्या प्रदेशाची त्यांनी वहिवाट करावी. संभाजीस उत्तर भागातून अशा तऱ्हेने हुसकून लावल्यामुळे तो फारच नाखुष झाला. संभाजीला सरखेलपद दिले व मानाजीस वजारतमाब पद दिले. मानाजीची स्थापना कुलाब्यास झालेली इंग्रजांच्या पथ्यावर पडली. कारण मानाजी हा समंजस व पेशव्यांचे तंत्राने चालणारा होता.

**पोर्तुगीज विरुद्ध पेशवे व मानाजी आंग्रे—**

"सन १७३९ मध्ये पेशव्याचा पोर्तुगीजांच्या वसईवर हल्ला झाला त्यावेळी मानाजीनी समुद्रातून त्याची नाकेबंदी केली परिणामी पोर्तुगीजांना बाहेरून मदत मिळेनाशी झाली. सन १७४० मध्ये आंग्र्याने पोर्तुगीजांचे आरमाराचा नाश केला. परंतु पुढे तारीख १४ ऑक्टोबर सन १७४० मध्ये पोर्तुगीज व्हाईसरॉय व पेशवे यांच्यात तह होऊन पोर्तुगीजांनी चौल प्रथम इंग्रजांचे हवाली केले. या तहात इंग्रज मध्यस्ती करीत होते. पुढे नोव्हेंबर मध्ये तहाच्या कलमापैकी पेशव्यांनी वागण्याचा भाग पुरा झाल्यावर इंग्रजांनी चौल पेशव्यांच्या स्वाधीन केले."

कॅ. इंचवर्ड हा वसईत चिमाजी अप्पांकडे वकील म्हणून आला. त्याने चिमाजी अप्पांशी मैत्री संपादन करून त्यांच्याशी इंग्रज मराठ्यांचा व्यापार-विषयक तह तारीख १२ जुलै १७३९ मध्ये घडवून आणला. ह्या तहाने मुंबई व मराठी मुलकातील व्यापार सुरळीत चालू झाला. माहिमची खाडी व्यापारास खुली झाली. आणि इंग्रजांना मराठी मुलखात व्यापार करण्यास परवानगी मिळाली.

तहाची बोलणी करीत असता चिमाजी अप्पांनी इंग्रज वकीलास सांगितले की, जर इंग्रज लोक आंग्रे विरुद्ध स्वारी करण्यास तयार असतील तर आपण स्वतः त्या स्वारीत सामील होऊन आंग्रेचे सर्व किल्ले व जागा परत घेतो. पोर्तुगीजांशी जो चिमाजी अप्पाने तह केला त्यातील शेवटच्या कलमात दोघांनी एकत्र होऊन आंग्रेवर स्वारी करून त्याचे आरमार बुडवावे असे कलम आहे.

इ. स. १७४० च्या मार्चमध्य संभाजी आंग्रे अकस्मात कुलाब्याच्या समुद्र-काठी येऊन त्याने आपले सैन्य उतरविले. आणि मानाजीच्या अधिकाऱ्यांना फितुरीने आपल्याकडे वळवून मानाजीच्या ताब्यातील लहानसहान बंदरे व गडकोट याचा तावा त्याने आपल्याकडे घेतला. मानाजीच्या ताब्यात फक्त एक कुलाबा आणि लहानसा किल्ला तेवढा शिल्लक राहिला. संभाजीने आपल्या भावाकडे जासूद पाठवून कळविले की, आम्हास वडिलांच्या समाधीचे दर्शन घ्यावयाचे आहे. संभाजीचे कुलाब्यास ठाणे बसल्यास त्यापासून आपणास धोका निर्माण होईल व त्याबद्दलची सावधगिरी म्हणून आपणाला नाविक दल वाढविण्यासाठी खर्च करावा लागेल हे मानाजीने मुंबई कौन्सिलला कळविले तेव्हां त्यांनी संभाजीविरुद्ध मानाजीस मदत करण्याचे ठरविले. त्या-प्रमाणे मानाजीच्या मदतीस कॅ. इंचवर्डला आपल्या आरमारी नौकेसह रवाना

केले. मानाजीने पेशव्यास संभाजीची कृत्ये कळविल्यामुळे चिमाजी अप्पासुद्धा मराठी फौज घेऊन मानाजीच्या मदतीस धावला. दोन्ही बाजूने सैन्य आल्यामुळे संभाजी कैचीत सापडला. त्याला सुटून जाणे अशक्य होऊन बसले. तेव्हा त्यास पळून जाण्यास मानाजीनेच मदत केली. मानाजीच्या ताब्यातील करंजा, घारापुरी, पाली आदि किल्ले जे घेतले होते ते त्यास परत करून पेशव्यांविरुद्ध तक्रार करण्यासाठी संभाजीची स्वारी शाहू दरबारी हजर झाली. शाहूस संभाजीची खोडी व तो करीत असलेला चावटपणा पुरेपुर ठाऊक असल्यामुळे त्या भेटीचा फारसा उपयोग न होता त्यास हात हलवीत परत जावे लागले.

**मस्तानी प्रकरण :**

बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल बुंदेला याने बाजीरावांनी त्यास मोगलाच्या तडाख्यातून वाचविले म्हणून खुष होऊन ज्या बिदागी बाजीरावांना दिल्या त्यात स्वरूप सुंदर मस्तानी नावाची एक नृत्यांगना होती. बाजीरावांनी तीस पत्नी मानून शनिवारवाड्यात तिच्यासाठी मस्तानी महाल बांधला. त्या महालात ती राहू लागली. बाजीराव स्वारीवर असता ती घोड्यावर स्वार होऊन बाजीरावाबरोबर तेवढ्याच वेगाने दौडत चाले. ती बाजीरावांची सर्व प्रकारे काळजी घेत असे. बाजीरावांचाही तिच्यावर जीव होता. नानासाहेब पेशव्याचे लग्न सन १७३० त झाले. त्यावेळच्या खर्चाच्या हिशोबात तिच्या नावाचा उल्लेख सर्व प्रथम आढळतो.[१] इ. स. १७३४ मध्ये बाजीरावापासून तिला पुत्ररत्न झाले.[२] त्याचे नाव समशेरबहादर ठेविले. हा पुढे पेशव्यांच्या फौजेत खासा सरदार म्हणून वावरला. पेशव्यांच्या मुलाबरोबर त्याचे शिक्षण झाले. पेशव्यांच्या अनेक मोहिमात राहून त्याने मराठी राज्याची सेवा उत्कृष्ट बजाविली. तो पानिपती कामास आला. मस्तानी नृत्यनिपुण होती. शनिवारवाड्यात गणेशचतुर्थीस तिचा नृत्यगायनाचा कार्यक्रम होत असे. ती बाजीरावांबरोबर पत्नी म्हणून वावरू लागल्यामुळे पेशव्यांच्या घरात तिच्याविरुद्ध कलह सुरू झाला. पेशव्यांची आई राधाबाई, भाऊ चिमाजी अप्पा आणि चिरंजीव नानासाहेब या तिघांचा मस्तानीने बाजीरावांबरोबर राहण्यास विरोध होता. बाजीरावाने तिचा नाद सोडून द्यावा म्हणून चिमाजी अप्पा व मातोश्रीने फार प्रयत्न केले. तेव्हा बाजीरावाने त्या गोष्टीस सरळ नकार दिला. व आपल्या बरोबर ही मंडळी मस्तानीस स्वारीस पाठवित नाहीत याचा राग येऊन वैतागत बाजीराव नासिरजंगावरील स्वारीवर गेले. डिसेंबर १७३९ बाजीराव स्वारीवर असता पेशव्यांच्या घरी पुण्यास मुलांच्या मुंजी झाल्या. डिसेंबर १७३९ ते १७४० मार्च पर्यंत या स्वारीची कामगिरी त्यांनी व्यथित अंतःकरणाने सिद्धिस नेली. त्यावेळी मस्तानी पुण्यास कैदेत होती. बाजीरावापासून मस्तानीस दूर करण्याची परवानगी शाहू महाराजांकडून मिळविण्याचा प्रयत्न पेशवे

१. पे. द. ३०, ले. ३६३.

२ म. रि. बाजीराव, पृ. ४०३.

कुटुंबियांनी केला. शाहू महाराजांनीही मस्तानीस कैदेत ठेवून बाजीरावास दुखवू नये असे आपले मत सांगितले. ते असे,—"राऊ यास खट्टे न करावे. त्यांचे समाधान राखावे. तिला अटकाव करून सल्ला तोडू नये." आपल्या राज्याची किर्ती वाढविणाऱ्या महापराक्रमी अद्वितीय सेनानीस दुखवू नये असा महाराजांचा सुयोग्य विचार होता. पण कर्मठ मंडळीस तो रूचला नाही.

**नासिरजंगचा गोदावरीतिरी पराभव (डिसेंबर—फेब्रुवारी १७४०) :**

नासिरजंग हा निजाम उल्मुल्काच्या सहा पुत्रांपैकी एक पुत्र. तो सर्व मुलात हुशार व पराक्रमी होता. भोपाळवर निजामाचा कोंडमारा होत असता त्याने लढाईसाठी ज्या फौजा जमविल्या होत्या त्या जवळ औरंगाबादेस होत्या. भोपाळ येथे निजाम पेशवे तह झाल्यावर नासिरजंगाची स्वारी दिल्लीस आली. त्यावेळी निजाम दिल्लीस होता. तेवढ्यात मराठ्यांनी पोर्तुगीजांकडून वसई काबीज केली. भोपाळच्या पराभवाचा वचका बाजीरावाविरुद्ध शाहू महाराजांचे कान फुकून त्याने त्यांच्यात तेढ निर्माण करून काढावयाचा असे निजामाने ठरवून त्यासाठी आपला हस्तक समंत यास साताऱ्यास महाराजांकडे पाठविले. पण बाजीरावाविरुद्ध महाराजांचे मन कलुषित झाले नाही. एवढ्यात निजामाच्या वऱ्हाड प्रांतावर रघुजी भोसल्याने हल्ला करून तो प्रांत बळकाविला. ह्याचा सूड घेण्याचे मनात आणून नासिरजंगाने जमविलेल्या फौजेनिशी सन १७३९ च्या अखेरीस गोदावरी नदी ओलांडून मराठ्यांच्या मुलुखावर चढाई केली. थोड्या दिसांनी चिमाजी अप्पा व बाजीराव पेशवे नासिरजंगावर चालून गेले. पुढे काही काळ उभयतांची रेटारेट होऊन बाजीरावांनी नासिरजंगास औरंगाबादेपर्यंत पिटत नेले. तेव्हा तो तहास तयार झाला. निरुपाय होऊन त्याने हंड्या व खर्गोण हे दोन जिल्हे बाजीरावास देऊन त्यांच्याशी तारीख २७ फेब्रुवारी १७४० रोजी मुंगी पैठण येथे तह केला. त्यानंतर पिंपळगाव जवळ वरखोडे येथे बाजीराव व नासिरजंग यांची तारीख ३ मार्च रोजी भेट झाली व ही मोहिम संपली.

**बाजीरावाचा अंत (२८ एप्रिल १७४०) :**

बाजीरावास नर्मदेच्या काठी मिळालेले परगणे ताब्यात घेण्यासाठी ते तिकडे गेले. तारीख १३ मार्च रोजी बाजीराव ब्राह्मणपुरास होते. तद्नंतर ते खर्गोण परगण्यात गेले. त्यावेळी पुण्यातील कुटुंबियांनी बाजीरावाच्या मनाविरुद्ध त्याची आवडती मस्तानी कैदेत ठेवली होती. हे त्यास न आवडून त्या मनःस्तापातच ते नासिरजंगावरील स्वारीस गेले होते. नासिरजंगावरील स्वारी आटोपल्यावर विमनस्क स्थितीत ते खर्गोण परगण्यात नवीन मिळालेल्या जहागिरीची व्यवस्था पाहाण्यास गेले. तेथे त्यांस ज्वर होऊन रावरेखेडी येथे तारीख २८ एप्रिल १७४० रोजी मृत्यू पावले. त्यावेळी बाजीरावांची धर्मपत्नी काशीबाई व मुलगा जनार्दन ही नुकतीच पुण्याहून येऊन पोचली होती. मस्तानी मात्र पुण्यात कैद होती. मृत्यूची हकिगत

तिला कळविताच तिनेही मृत्यूला कवटाळिले. तिचा मृत्यू विष प्राशन करून झाला की, मुद्दाम प्राणघात करून घेतला हे समजण्यास मार्ग नाही. शनिवारवाड्यात मृत्यू झाल्यावर तिला तिच्या इनामाचे गाव पावळ येथे नेऊन पुरले. आजही पावळ गावी मस्तानीची कबर पाहावयास मिळते. मस्तानीनें आपल्या अलौकिक लावण्याने त्यावेळच्या जनसमाजात कौतुकाचे स्थान मिळविले होते.

बाजीरावांनी पुण्यास शाहू महाराजांच्या संमतीने शनिवारवाडा बांधला. त्याच्या बांधकामास १० जानेवारी १७३० त सुरू होवून २ फेब्रुवारी १७३१ त पेशवे मंडळी समारंभपूर्वक त्यात राहावयास गेली. ह्या किल्लेवजा वास्तूस त्यावेळी १६,११० रुपये खर्च आला. बाजीरावाचे वडील बाळाजी विश्वनाथ पेशवे सासवडात राहात होते. पुण्यास वास्तव्य करण्यासाठी त्यांनी ही जागा आपल्या कुटुंबियाचे राहायचे ठिकाण असावे म्हणून निवडली. आज त्या जागेवर शनिवारवाड्याच्या भिंती व दरवाजा आहे.

**योग्यता :**

स्वकर्तृत्वावर जगाच्या इतिहासात अलौकिक पराक्रमी असे सेनानी झाले त्यात बाजीरावांची गणना करावी लागेल. हिंदुस्थानाच्या इतिहासात बाजीरावांना शिवाजी महाराजांच्या खालोखाल स्थान आहे. महाराजांनी आपल्या पराक्रमाने नवसृष्टी निर्माण केली. बाजीरावांनी त्या सृष्टीची क्षितीजे विस्तारीली. हिमालयापर्यंत घोडे नाचवून महाराजांची इच्छा पूर्ण केली. शिपाईगिरी आणि राजकारण या दोनही बाबतीत बाजीराव पूर्ण तरबेज होते. आपल्या पराक्रमास शाहू महाराजांकडून वाव मिळाल्यावर सोबतीसाठी शिंदे, होळकर, पवार असे जीवास जीव देणारे सरदार निर्माण केले. शाहू महाराजांच्या जुन्या सरदारास त्यामुळे जणू हात चोळीत दक्षिणेत बसावे लागले. राज्यविस्ताराचे उदात्त धोरण ठेवून आपल्या सैन्यास व सरदारास उदार वागणूक दिली त्यामुळे उत्तरेस मुलुख मिळवून सरदार गब्बर झाले आणि बाजीराव पेशवे सावकारांच्या कर्जात राहिले. अधिकार स्वीकारल्याच्या चार-पाच महिन्याच्या अल्पावधीत गिरीधर बहादर, दया बहादर, महमदखान वंगश, सर बुलंदखान अशा बादशाही वीरांना बाजीरावांनी नामोहरम करून मराठी राज्याची वृद्धि केली. खान डौरान व जयसिंग याजशी मैत्री संधादून त्यास राजकारणी डावात गुंतवून ठेवले. बादशहाची दुर्दशा नादिरशहाने केल्यावर दिल्ली तख्त मराठ्यांच्या ताब्यात आणणे बाजीरावांना शक्य होते आणि हिंदुस्थानात त्यासाठी सर्वत्र बोलले जात होते. पण त्यांनी "जुने मोडू नये व नवे करू नये" ह्या शाहू महाराजांच्या सूत्राचा अवलंब करून आपला हात आवरता घेतला. शूरातला शूर व सुंदरातला सुंदर बाजीराव प्रेमवीर सर्वांची मने खेचून घेतो असे इतिहासकार किंकेड म्हणतो :

## शाहू व बाळाजी बाजीराव (१७४०—४९)

## कालसूची

| इ. स. | |
|---|---|
| १७४०, एप्रिल १० . . | बंगालचा सुभेदार सर्फराजखान यास लढाईत मृत्यू. |
| १७४०, एप्रिल . . . | बाजीराव पेशव्यांचा मृत्यू. |
| १७४०, जून २५ . . | बाळाजी बाजीरावास छत्रपती शाहू महाराजांकडून पेशवाईची वस्त्रे. |
| १७४०, ऑक्टोबर २१ . | नानासाहेब पेशव्यांचे उत्तर हिंदुस्थानच्या स्वारीकरिता पुण्याहून प्रयाण. |
| १७४०, नोव्हेंबर २३. . | गोपिकाबाईसह पेशव्यांचे पुण्याहून उत्तरेकडे प्रयाण. |
| १७४०, डिसेंबर १७ . . | चिमाजी अप्पांचा मृत्यू. |
| १७४१, जानेवारी ७ . . | एदलाबाद येथे पेशवा-निजाम भेट. |
| १७४१, मे १२ . . . | पेशवे व सवाई जयसिंह यांची धोलपूर येथे भेट. |
| १७४१, जुलै ७. . . | बाळाजी बाजीराव पेशवे पुण्यास परत. |
| १७४१, जुलै २३ . . | नासिरजंगाची बादशाही फौजेबरोबर लढाई. |
| १७४१, सप्टेंबर ७ . . | माळव्याचा संपूर्ण कारभार मराठ्यांच्या हवाली केल्याचे बादशाही फर्मान. |
| १७४१, डिसेंबर . . | बाळाजी बाजीराव पेशव्यांचे पुण्याहून उत्तरेवरील मोहिमेस कूच. |
| १७४२, जानेवारी २७ . | पेशव्यांची अलाहाबाद येथे छावणी. |
| १७४२, फेब्रुवारी २० . | पेशव्यांचा चांदा येथे मुक्काम. |
| १७४२, मार्च . . . | पेशवे बाळाजी बाजीराव गढामंडळा सर करतात. |
| १७४२, मे ६ . . . | मुर्शिदाबाद शहराची मराठ्यांकडून लूट. |
| १७४२, जून २९ . . | पेशव्यांची ओर्छा येथे छावणी. |
| १७४२, जुलै . . . | हुगळी शहर मराठ्यांच्या ताब्यात. |
| १७४२, सप्टेंबर २७ . . | अलीवर्दीखानाचा मराठ्यांवर हल्ला. |
| १७४२, सप्टेंबर ३० . . | भास्करपंताच्या मदतीकरिता बंगालात जात असल्याचे रघुजी भोसलेचे पेशव्यांस पत्र. |
| १७४२, नोव्हेंबर . . | रघुजी भोसलेविरुद्ध मदत करण्यासंबंधी बादशहा व बाळाजी बाजीराव पेशवे यांचे बोलणे. |
| १७४२, डिसेंबर . . | मराठ्यांना नवाब बंगालमधून दक्षिणेत हाकलून देतो. |
| १७४३ . . . . | रघुजी भोसलेची बंगालवर स्वारी. |

| | |
|---|---|
| १७४३ . . . . | भास्कर राम कोल्हटकर यास बंगालात फौजेसह जाण्या-संबंधी रघुजी भोसलेची आज्ञा. |
| १७४३, फेब्रुवारी . . | बाळाजी बाजीराव पेशवे फौजेसह बिहार प्रांतात दाखल |
| १७४३, फेब्रुवारी ९ . . | नबाबाची स्वारी मुर्शिदाबादेस परतते. |
| १७४३, मार्च २९ . . | कलकत्त्याच्या मराठी खंदकाच्या कामास प्रारंभ. |
| १७४३, मार्च ३१ . . | तुकोजी पवार, शिंदे, होळकर, जाधव इत्यादी सरदारांसह पेशवे व अलीवर्दीखान यांची भेट. |
| १७४३, मार्च १० . . | रघुजी भोसलेचा पेशव्यांकडून पराभव. |
| १७४३, एप्रिल २१ . . | बादशहा राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव यांजकडून कबुलायत लिहून घेतो. |
| १७४३, ऑगस्ट ३१ . . | रघुजी भोसले व बाळाजी बाजीराव पेशवे यांचा छत्रपती शाहू महाराजांकडून समझोता. |
| १७४३, सप्टेंबर २१ . . | सवाई जयसिंहचा मृत्यू. |
| १७४४, जानेवारी . . | भास्कर राम कोल्हटकरचे बंगालच्या स्वारीकरिता प्रयाण. |
| १७४४, फेब्रुवारी १ . . | महादेवभट हिंगणे यांचा दिल्ली येथे मृत्यू. |
| १७४४, मार्च ३० . . | भास्कर राम आणि नबाब यांच्या भेटीत नबाब भास्कर राम यास दग्याने ठार करतो. |
| १७४५ . . . . | रघुजी भोसलेची बंगालच्या स्वारीवर जाण्याची तयारी. |
| १७४५ . . . . | ईश्वरसिंगकडून माधोसिंगचा पराभव. |
| १७४५, मार्च ११ . . | शिंदे भेलसा काबीज करतात. |
| १७४५, मे ६ . . . | कटकचा किल्ला रघुजी भोसले सर करतो. |
| १७४५, जून . . . | रघुजी भोसलेशी लढताना मुस्तफा मारला जातो. |
| १७४५, डिसेंबर २१ . . | मुर्शिदाबादजवळ रघुजी भोसलेचा अलीवर्दीखानाकडून पराभव. |
| १७४६ . . . . | जानोजी भोसलेचे नबाबावर चालून जाण्याकरिता नागपूर-हून प्रयाण. |
| १७४६ . . . . | जैतपूरचे ठाणे मराठ्यांच्या ताब्यात येते. |
| १७४६, जुलै ३ . . . | राणोजी शिंदे याचे निधन. |
| १७४७, जानेवारी . . | मीर हबीब व जानोजी भोसले यांची कटक येथे भेट. |
| १७४७, एप्रिल . . . | ईश्वरसिंगचा मराठ्यांशी झालेल्या लढाईत विजय. |
| १७४७, डिसेंबर १० . . | पेशव्यांचे उत्तरेकडे प्रयाण. |
| १७४७, डिसेंबर १७ . . | छत्रपती शाहू महाराजांच्या आज्ञेनुसार बाळाजी बाजीराव पेशवे यांचे अब्दालीबरोबर लढण्याकरिता प्रयाण. |
| १७४८, मार्च ३. . . | बादशाही फौजेचा अब्दालीच्या फौजेकडून पराभव. |
| १७४८, एप्रिल . . . | पेशवे व माधोसिंग यांची नेवाई येथे भेट. |
| १७४८, मे २१ . . . | निजामाचा अंत. |
| १७४८, जुलै ९ . . . | नेवाईच्या स्वारीहून बाळाजी बाजीराव पेशवे पुण्यास परततात. |

| | |
|---|---|
| १७४८, सप्टेंबर ३ . . | अर्काटच्या नबाबाकडून कोन्हेरपंतास जहागीर करार. |
| १७४९, डिसेंबर १५. . | शाहू महाराजांचे निधन. |
| १७५० . . . . | जयाप्पा शिंदे व मल्हारराव होळकर यांची ईश्वरसिंगावर चालून जाण्यासाठी रवानगी. |
| १७५०, ऑगस्ट . . | केशोराव दिवाण याजवर ईश्वरसिंगाकडून विषप्रयोग. |
| १७५०, नोव्हेंबर १८. . | मराठे नेणवे सर करतात. |
| १७५०, नोव्हेंबर २९. . | मराठे माधोसिंग यास तख्तावर बसवितात. |
| १७५१, जानेवारी ६ . . | जयाप्पा शिंदे जयपूर येथे होळकरास मिळतात. |
| १७५१, जानेवारी १० . | माधोसिंग मराठे सरदारांची जेवणास बोलावून जयपूर येथे कत्तल करतो. |
| १७५१, जानेवारी १२ . | माधोसिंगबरोबर लढण्याकरिता मराठ्यांचा जयपूरजवळ तळ. |
| १७५१, जानेवारी १९ . | माधोसिंग मराठ्यांकडे तहाची बोलणी करण्याकरिता वकील पाठवतो. |
| १७५१, फेब्रुवारी ७ . . | मराठ्यांचे सफदरजंगाच्या मदतीकरिता आग्र्याकडे कूच. |
| १७५१, मार्च . . . | अलीवर्दीखान व मराठे यांचा तह. |
| १७५२, ऑगस्ट २४ . . | मीर हबीब मराठे चौकीदारांकडून मारला जातो. |
| १७५६, एप्रिल १० . . | नबाब अलीवर्दीखान याचा मृत्यू. |

---

## ८

# शाहू व बाळाजी बाजीराव (१७४०—४९)

**बाळाजीरावास पेशवेपद प्राप्ती :**

बाजीराव २८ एप्रिल १७४० रोजी मरण पावल्यावर मराठी राज्याचे पेशवेपद आपणास मिळावे ह्याकरिता खटपट करणाऱ्यात बाबूजी नाईक बारामतीकर हे प्रमुख होते. बाबूजी नाईक बारामतीकर ह्यांचा पेशा सावकारीचा ह्यांच्या पेढीचा धंदा कित्येक वर्षे तेजीत चाललेला होता. त्यानी शाहू महाराज, रघुजी भोसले, पेशवे वगैरे मातब्बर राजेरजवाड्यांना कर्जाऊ रकमा दिल्या होत्या. त्यामुळे रघोजी भोसले, प्रतिनिधी आदि मंडळी बाबूजी नाईक यांच्या पक्षास होती. पण बाबूजी नाईक यांची लढवय्या म्हणून कर्तबगारी शून्य होती. राज्याची धुरा वहाण्यास जे शौर्य व चातुर्य हवे होते ते बाबूजींच्या अंगी नव्हते. हे शाहू महाराजांनी जाणून बाजीराव-साहेबांचे सुपुत्र बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांस पेशवाई-ची वस्त्रे देण्याचे ठरविले. नानासाहेबांस पेशवाई मिळावी म्हणून साताऱ्यास शाहू महाराजांकडे चिमाजी अप्पा आणि महादजी पुरंदरे हे दोघेही खटपट करीत होते. त्या खटपटीस यश येऊन शाहू महाराजांनी बाळाजी बाजीराव यांस पेशवाईची वस्त्रे तारीख २५ जून १७४० रोजी समारंभपूर्वक दिली. ह्यामुळे रघुजी भोसले यांच्या बाबूजी नाईक यांना पेशवेपद मिळण्याच्या खटपटीस यश आले नाही. नानासाहेबांस विरोधक खूप होते. त्यांना लगाम घालण्यासाठी शाहू महाराजांनी त्याजपुढे दरबारात भाषण केले ते असे : "बाळाजीपंत लहान आहे. मसलत उभी करील, जाईल, हूडपणा करील, तर पत घेतली असे न होता, याजला संभाळून, मसलतीस एकदील होऊन याचा लौकीक होईल, असे तुम्ही करून दाखवा." शाहू महाराजांचे हे मागणे दरबारी मंडळीनी मान्य केले.

शाहू महाराजांनी बाळाजी बाजीरावांना तीस गांव मोकासे दिले आणि आज्ञा केली जे, "बाजीरावांनी स्वपराक्रमाने राज्यविस्तार केला, दिल्ली तख्त हालविले, नादिरशहास पळून जाण्यास भाग पाडले. त्या कीर्तीमान वडिलांचा तू सुपुत्र आहेस, तुझ्या कर्तबगारीने ह्या कीर्तीत भर घालून तू मराठ्यांचा किर्तीध्वज अटकेपार होईल ते करावे."

बाळाजी बाजीरावांस सुरुवातीस स्वजनांचा विरोध होता. बाबूजी नाईक यानी रघुजी भोसले यांच्या सहाय्याने पेशवाई मिळविण्याचा प्रयत्न

करून पाहिला. बाळाजी बाजीरावानी आपल्या चातुर्याने हा प्रयत्न हाणून पाडला. तेव्हा ते दोघेही त्रिचनापल्लीस स्वारीवर पुन्हा हजर झाले. १९ व्या वर्षी पेशवे झालेले हे नानासाहेब बाजीरावांप्रमाणें घोडदौडी करून लढाया जिंकणारे नव्हते. ते कधीही बाजीरावांबरोबर एकाही मोहिमेत गेले नाहीत. ते आपले चुलते चिमाजी अप्पा ह्यांच्या सहवासात राहिले. त्यामुळे चिमाजी अप्पांच्या स्वभावाची छाप त्यांच्यावर पडली. गनिमी काव्याने लढून शत्रूस हैराण करणे आणि पाठीमागून राजकारण करून शत्रूस नामोहरम करणे हे गुण त्यांच्यामध्ये असल्यामुळे एकहि लढाई न मारता त्यानी मराठ्यांची सर्व सत्ता आपल्या हाती घेतली व शाहू महाराजांच्या निधनानंतर स्वचातुर्याने मराठी राज्याची सर्व सूत्रे आपल्या हाती घेऊन पेशवे घराणे सर्वसत्ताधीश बनविले. लढाईचा अनुभव त्यास नव्हता असे नाही. सन १७३५ मध्यें पिलाजी जाधवांबरोबर ते उत्तरेच्या मोहिमेत होते. सन १७३७ मधील शाहू महाराजांच्या दक्षिणेतील स्वारीमध्ये महाराजांनी ह्यास बरोबर घेतले होते. सन १७४० च्या सुरुवातीस आपले वडील बाजीराव ह्यांच्या पश्चात ह्यानी रघुनाथरावांची मुंज व सदाशिवराव भाऊंचे लग्न ही कार्ये केली होती. नानासाहेबास पेशवाई पद मिळाल्यावर त्यांच्या मनःचक्षुपुढे मराठी राज्यविस्ताराच्या आड येणारे आतील व बाहेरील शत्रू उभे राहिले. नादिरशहाच्या दिल्लीवरील धाडीमुळे मराठ्यांची दिल्ली दरबारातील कमी झालेली पत त्यास वाढवावयाची होती. अस्तनीतील निखारा निजाम ह्याचा बीमोड करून मराठी राज्यविस्तार करावयाचा होता. जंजिऱ्याचा सिद्दी, पोर्तुगीज व इंग्रज ह्यांच्या पश्चिम किनाऱ्यावरील उपद्व्यापास आळा घालून तेथे मराठी सत्तेचा जम बसवावयाचा होता. आंग्रे, दाभाडे, गायकवाड, बाबूजी नाईक बारामतीकर आदी पेशव्यास न जुमानणाऱ्या वरचढ सरदारांचा नक्षा उतरावयाचा होता. हे सगळे त्यानी एकवीस वर्षाच्या कारकीर्दीत बहुशः पूर्ण केले.

### चौथाई सरदेशमुखीची वाटणी :

मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष होण्यास पेशवे बाळाजी विश्वनाथ यांनी शाहू महाराजांसाठी ज्या स्वराज्याच्या व चौथाई-सरदेशमुखीच्या सनदा आणल्या त्या कारणीभूत झाल्या. ह्या सनदा आणल्यानंतर सनदेनुसार चौथाई व सरदेशमुखीची वाटणी शाहू महाराजांनी मराठे सरदारात खालीलप्रमाणे केली :

(१) पेशवे–खानदेश, बालाघाट.
(२) सेनापती दाभाडे–बागलाण, गुजराथ.
(३) कान्होजी भोसले–गोंडवण, वऱ्हाड.
(४) सरलष्कर निंबाळकर–गंगथडी, औरंगाबाद.
(५) प्रतिनिधी–हैद्राबाद, बिदर, निरा व वारणा या नद्यांमधील प्रदेश.
(६) फत्तेसिंग भोसले–कर्नाटक.

शाहू महाराजांनी ह्या सरदारांना त्यांच्याकडे असलेल्या सैन्याचा खर्च भागविण्याकरता कायम स्वरूपाच्या जहागिरी व सरंजाम देण्याची व्यवस्था केली. एकाने दुसऱ्याच्या कार्यक्षेत्रात हस्तक्षेप न करता परस्पर प्रेमाने व सहकार्याने चालावे ही शाहू महाराजांची इच्छा होती. ज्या ज्या वेळी ह्या सरदारांनी स्वार्थापायी एकमेकांच्या कार्यक्षेत्रात हस्तक्षेप केला त्या त्या वेळी शाहू माहाराजांनी त्यांना आपल्या भेटीस बोलावून त्यांची कानउघाडणी केल्याची अनेक उदाहरणे आहेत.

राज्याचा खर्च चालविण्याकरिता शाहू महाराजांनी नवीन पद्धत अमलात आणली. चौथाई व सरदेशमुखी हे कर मराठे सरदार परप्रांतातून वसूल करीत. त्यापैकी सरदेशमुखीचा पैसा राजाने भोगावयाचा असे ठरले. शिवाय चौथाईच्या रूपाने वसूल केलेल्या रकमेपैकी पंचवीस टक्के भाग (बाबती) सरंजामदाराने राजाला द्यावयाचा. ह्या चौथाईपैकी नऊ टक्के भाग (नाडगौडकी) राजा आपल्या इच्छेनुसार कोणाही सरदारास देऊ शके. बाकी राहिलेला सहासष्ट टक्के वसूल सरंजामदारांच्या मालकीचा असे. डॉ. सिन्हा यांच्या म्हणण्याप्रमाणे बाळाजीनी ही व्यवस्था निर्माण केली, तिचा परिणाम राजा हा आपल्या सरदारांचा आश्रित झाला. पण हे एवढेसे खरे नाही. मुळात ही व्यवस्था बाळाजीनी केलेली नसून शाहू महाराजांनी केली आणि शाहू महाराज आपल्या मताप्रमाणे ह्या सरदारांचे सरंजाम काढून घेऊन ते त्यांना योग्य वाटेल त्या सरदारास देत असत हे पेशवे दफ्तरातील कागदपत्रांवरून दिसते.

पेशवाई मिळाल्यावर नानासाहेबांनी उत्तरेस स्वारीवर जाण्याचे ठरवून ते त्यासाठी चुलत्यांसह निघाले. स्वारीचा हेतू उत्तरेतील मराठ्यांचा जम कितपत बसला आहे हे अजमावणे व माळव्याची सुभेदारी निजामातर्फे आश्वासिल्याप्रमाणे मिळविणे हा होता. चिमाजीअप्पा आजारी पडून पुन्हा पुण्यास आले आणि तारीख १७ डिसेंबर सन १७४० रोजी निवर्तले. चिमाजी अप्पांचा मृत्यू बाजीरावांच्या निर्वाणानंतर आठ महिन्याच्या आत झाला. तरुण पेशव्यांवर हा वज्राघातच होता. मराठी राज्याचेही चिमाजीअप्पांच्या ह्या आकस्मित निधनाने अपरिमित नुकसान झाले. पेशवे एकाकी पडले. पण नानासाहेबानी हा दुःखाघात पचवून आपल्यावर सोपविलेली राज्य धुरा वहाण्यास सुरुवात केली.

### सातारा व कोल्हापूर गादीचे एकीकरण करण्याचे प्रयत्न :

सातारा व कोल्हापूरकर छत्रपति या एका झाडाच्या दोन फांद्या. ह्या दोन गाद्या एक कराव्या असा विचार बाळाजी बाजीरावांचा होता. त्यास चिमाजीअप्पांची संमति होती. कोल्हापूरकर संभाजी राजे शाहू महाराजांच्या भेटीस साताऱ्यास आले आणि तारीख २ जून १७४० ते ३० मार्च १७४१ पर्यंत साताऱ्यास राहिले. ह्या मुदतीत बाळाजी बाजीरावांनी कोल्हापूरच्या संभाजी राजांशी वाटाघाटी करून शाहू महाराजांच्या पश्चात राज्यव्यवस्था कशी करावी ह्या बद्दल एक गुप्त करार संभाजी राजांशी केला. हा करार

शाहू महाराजांच्या कारकीर्दीत बाहेर न फुटण्याची खबरदारी दोन्ही पक्षांनी घेतली. करार नानासाहेब व चिमाजी अप्पा ह्या उभयतांनी संभाजी राजे यास लिहून दिला. त्यातील मुख्य बाब अशी "सातारचे राज्य स्वामींचे आणि एकछत्री शिक्का महाराजांचा (संभाजी राजांचा) चालावा. शाहू महाराजांचा जीवात्मा आहे तो बाह्यात्कारी आम्ही त्यांचे सेवक परंतु अंतर्यामी स्वामींचे, शाहू महाराज ह्यांनी कैलासवास केल्यावर दोन्ही राज्ये स्वामींची व आम्ही सेवक स्वामींचे, स्वामींच्या आज्ञेप्रमाणे वर्तणूक करू". शाहू महाराज निवर्तल्यावर अशी परिस्थिती निर्माण झाली की हा करार मागे पडला आणि दोन्ही राज्यांचा समेट घडवून आणण्याचे काम तसेच राहून दोघांच्या भांडणामुळे राष्ट्राची हानी व्हावयाचे टळले नाही.[1] कारण शाहू महाराजांनी आपल्या मृत्यूपत्रात रामराजे यांस गादीवर बसवावे, संभाजी राजांना वारस करू नये असे स्पष्ट लिहिले होते.

### आर्थिक घडी बसविली :

बाळाजी बाजीरावांची पहिली अडचण म्हणजे पैशाची. बाजीरावांच्या सतत स्वाऱ्यामुळे राज्यास कर्ज झालेले होते. एकंदर देणे चौदा लाख असून त्यापैकी बाबूजी नाईक यास पेशवाई न मिळाल्यामुळे त्यानी आपल्या कर्जाबद्दल निकडीचा तगादा लावला होता. ह्या सावकारांच्या तगाद्यातून सुटण्याकरिता नानासाहेबानी प्रथमपासून राज्याच्या हिशेबी व्यवस्थेकडे विशेष लक्ष पुरविले. राज्याच्या आयव्ययांचा हिशेब चोख राखण्यासाठी फडणिशी फड निर्माण केला. त्याची व्यवस्था सदाशिवराव भाऊ यांजकडे सोपविली. ह्या फडातच पुढील पिढ्यात नाना फडणीस आदि कोकणस्थ मंडळी तरबेज होऊन पानिपतोत्तर मराठी राज्याची धुरा त्यांनी सांभाळली. सरदाराकडून वेळी पैसा येत नसे, तेव्हा जिंकलेल्या मुलखाची खंडणी छत्रपतिकडून आपल्या नावे करून घेतली. त्यात खंडणी वसुलाची व्यवस्था केली. हिंदुस्थानातील द्रव्याचे ओघ सदैव महाराष्ट्राकडे वळतील असे धोरण ठेविले.

राज्याची घडी नीट बसावी, सरदारांनी आपले बेत तडीस न्यावे, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना वेळोवेळी मार्गदर्शन करावे ह्यासाठी बाळाजीराव सारखे फिरत असलेले दिसतात.[2] फिरतीवर असतांनाही ते अनेक पत्रे लिहित असत. म्हणून सर्व पेशव्यात बाळाजी बाजीरावांचा पत्रव्यवहार जास्त सापडतो. राज्याचे परराष्ट्रांशी जे व्यवहार करावयाचे ते पेचप्रसंग ओळखून चतुर बुद्धीने, बळाचा वापर शक्य तो कमी करून, करावयाचे हे सूत्र बाळाजी बाजीरावांचे असावे. त्या काळी लढायांशिवाय राजकारण होतच नसे. म्हणूनच निजाम, हैदर व उत्तरेकडील मोगल सुभेदार ह्यांजबरोबर तलवार धरावी लागली. पण ह्यातही सर्व सरदारास नानासाहेबांचा धूर्तपणाच जास्त उपयोगी पडला व ह्या पेशव्यांच्या कारकीर्दीतच मराठी राज्यविस्तार झपाट्याने झाला.

---

१. पत्रे यादी, ले. २४६, नानासाहेब चरित्र १०-११.

२. ना. रो. रोजनिशींतील मुक्काम पहा.

**नानासाहेबांच्या कारभाराचे स्वरूप :**

इ. स. १७४९ पर्यंत नानासाहेबास शाहू महाराजांच्या तंत्राने वागावे लागले. शाहू महाराजांच्या मृत्यूनंतर त्यानी आपले स्वतंत्र धोरण अमलात आणिले. नानासाहेब पेशव्यास पेशवाईपद मिळाल्यावर त्यास स्वतःचे पद राखणे हा प्रधान हेतू मनात ठेवून वागावे लागे. मराठे मंडळातील इतर सरदारांपेक्षा पेशवे पद हे श्रेष्ठ आहे हे पटवून देण्यासाठी त्यांस शाहू महाराज हयात असे-पर्यंत झगडावे लागले.

नानासाहेबांच्या कारभाराचे रहस्य समजण्यास हिंदुस्थानची तत्कालीन परिस्थिती डोळ्यासमोर आणली पाहिजे. मुलुखगिरीद्वारा राज्य संपादन करणे हा मराठी राज्याचा त्यावेळी प्रधान हेतू होता. ह्या मुलुखगिऱ्या मराठे सरदारास शाहू महाराजांनी वाटून दिल्या होत्या. ह्यामुळे हिंदुस्थानच्या सर्व सत्ताधिशांशी मराठ्यांचा साहजिकच संबंध आला. त्यापैकी उत्तरेतील सत्ताधीश जो मोगल बादशहा त्याची सत्ता फारच थोड्या प्रदेशावर होती. नादिरशहाने स्वारी करूनही बादशाही सत्ता खिळखिळी केली होती. त्यामुळे बादशहास न जुमानणारे सुभेदार स्वतंत्र होण्याच्या मार्गास लागले. त्यांच्या-पासून खंडण्या घेऊन बादशहास ताब्यात घेणे हा मराठ्यांचा प्रधान हेतू होता. बादशहास ताब्यात घेण्याचे जे काम महादजीनी सन १७८४ त केले तेच काम नानासाहेब पेशव्यास आपल्या हयातीत करावयाचे होते. पण पानिपत उद्भवामुळे ते लांबणीवर पडले. बादशहाला ताब्यात घेणे हे शाहू महाराजांनी घालून दिलेल्या "पादशाही रक्षून हिंदुस्तान आपले करावे" ह्या सूत्राप्रमाणे होते. हिंदुस्तानातील मोगल बादशाहीचा अभिमान धरणाऱ्या मुसलमानांशी जरा नरमाईने घेऊन राजकारण सुलभ करणे हा ह्याचा प्रधान हेतू असावा. खरेशास्त्री म्हणतात त्याप्रमाणे पेशव्यांच्या अधिकारासारखा अधिकार दुनियेत कधी कोणी चालविला नसेल. दिल्लीचा बादशहा आपणास अखिल भरत-खंडाचे सार्वभौम समजत होता व लोकमत तसेच होते. छत्रपतींची गादी ह्या सार्वभौमास चीत करून उभारलेली होती. अर्थात ती स्वतंत्र व सार्वभौम ठरली. पेशवे हे ह्या छत्रपतींचे प्रधान. मोगल हे पेशव्यांसह मराठ्यांचे शत्रू. परंतु शाहू छत्रपतींची इच्छा मोगल बादशाही राखण्याची आणि ही बादशाही तर शाहू महाराजास आपला अंकीत समजे. एकीकडे पेशवे छत्रपतींचे प्रधान म्हणून मोगल सुभ्यावर स्वाऱ्या करीत, तर लगेच ते दिल्लीश्वराकडून सुभेदारीची वस्त्रे मिळविण्यात भूषण मानीत. दिल्लीपतीचे सुभेदार या नात्याने इतर सुभेदार त्यास आपल्याशी समान दर्जाचा मानीत व छत्रपतींनी निर्मिलेले सरदारही त्यास बरोबरीचे समजत. अशा विलक्षण घोटाळ्यांचा अधिकार संभाळून पेशव्यास कारभार हाकावा लागे.

**नवीन पेशवे कामास सुरवात करतात :**

नानासाहेबास पेशवाई मिळाल्यावर त्यास बाजीरावानी करून ठेविलेल्या कर्जाची फेड करून नवीन मुलूख संपादन करावयाचा होता. मुलुखगिरीशिवाय

पैसा प्राप्त होत नाही. तेव्हा मुलूख ताब्यात घेऊन तो मराठ्यांच्या स्वतंत्र अंमलाखाली आणण्यापेक्षा मुलुखगिऱ्या करून एतद्देशीय संस्थानिकांकडून खंडण्या घेण्याचा क्रम त्यानी सुरू केला. हिशेबाच्या कामात बाळाजीरावांना त्यांचे चुलत बंधू सदाशिवराव भाऊ हे मदत करीत असत. बाळाजीराव स्वारीत असताना त्यानी अनेक सरदारास पैशाच्या व्यवहारासंबंधी पत्रे लिहिली व तिजोरीवर ताबा ठेविला. पैशाचे व्यवहार चोख ठेवण्यात व सरदारांना पत्रे लिहून स्वारीतील खंडणीचे हिशेब मागण्यात नानासाहेब तरबेज होते. ह्या त्यांच्या हिशेबी व्यवहारात त्यांचा भाऊ सदाशिवराव ह्यांची त्यास फारच मदत होत असे. बाळाजी बाजीराव स्वारीत असता राजकारणी व्यवहाराची अनेक पत्रे निरनिराळ्या सरदारास लिहित असत. रोजनिशीतील मुक्कामावरून असे दिसते की नानासाहेब पेशवे सारखे हिंडत होते. चार दोन दिवसांपेक्षा त्यांचा मुक्काम एके जागी सहसा होत नसे. लग्न कार्य, जन्म, मृत्यु इत्यादि प्रसंगाची आडकाठी मनात न आणता ते सारखे अहोरात्र राज्याच्या कामात निमग्न असलेले दिसतात. कोणतेही संकट असो, हे पेशवे मनाची शांतता ढळू न देता अविरत काम करताना दिसतात. स्वतः उद्योगी राहून दुसऱ्यानाही उद्योग निर्माण करून देण्याचे कार्य ह्या पेशव्यांनी केले. पुढील पिढी अर्थकारणात तरबेज व्हावी, राज्याच्या आर्थिक व्यवहाराचे हिशेब व्यवस्थित राखले जावे ह्याकरिता त्यानी फडणिशी खात्याची पुनर्रचना केली. ह्यांच्या कारकीर्दीपासून पुण्याचे फडणिशी खाते मराठी राज्याचें केंद्र बनले. व फडातील साधा कारकूनही सरदार जहागिरदारांवर वचक ठेवू लागला.

नानासाहेबांच्या कर्तबगारीस त्यांच्या आजी राधाबाई यांचें वळणही कारणीभूत झाले असावे. कारण ह्या बाईनी मुलांना चांगले वळण लावण्याकरिता कष्ट तर उपसलेच पण त्यांच्या बालपणीच्या शिक्षणाकडे लक्ष पुरविले. त्यांचे देखरेखीखाली नानासाहेबांची भावंडे रघुनाथराव व जनार्दन ही वाढली. ह्या बाईनी ब्राह्मण व मराठा सरदारांचे संबंध चांगले राखले.

बाजीरावसाहेबांच्या वेळेपासून पेशवे पुण्यास राहू लागले. पण शाहू महाराज हयात असेपर्यंत राज्याचा केंद्रबिंदु सातारा येथे होता. राजधानीत छत्रपतीपाशी अनेक प्रतिष्ठित माणसे जमा होऊन पेशवे दूर स्वारीत असता त्याजविषयी छत्रपतींचे मन कलुषित होण्याचा धोका असे. ह्यासाठी छत्रपतींच्या जवळ साताऱ्यास पेशव्यांनी आपली माणसे रघुनाथराव, जनार्दन, सदाशिवराव भाऊ यांचे साताऱ्यास जाणे येणे ठेविले. त्यांच्याकडून दरबारची माहिती पेशव्यास स्वारीत असताना कळे व शाहू महाराजांकडे त्यांचा वग राही. धोका टाळून परिस्थिती कबजात ठेवण्यासाठी पेशवे कोणीतरी स्वतःच्या घरच्या माणसाने छत्रपतींजवळ रहावे ही व्यवस्था करीत असे. पेशवे स्वारीत असता सदाशिवराव भाऊ, रघुनाथराव, जनार्दन हे जाऊन येऊन साताऱ्यास राहून शाहू महाराजांपाशी एकंदर बस्तान संभाळीत. त्यामुळे राजवाड्यातील व जनानखान्यातील लहान मोठ्या सर्व गोष्टींची माहिती पेशव्यास मिळे. सदाशिवराव भाऊ तर सर्व व्यवहार दक्षतेने पाहू लागले. त्यानी सन १७४६ त

म्हणजे वयाच्या सोळाव्या वर्षी दक्षिणेत स्वारी केली. उत्तरेत रघुनाथराव स्वाऱ्यांवर जाऊ लागले.

नानासाहेबांच्या बरोबरीची माणसे रामचंद्र मल्हार, सखाराम बापू, गंगाधरपंत चंद्रचूड पुढे येऊन कामे करू लागली. राष्ट्राची धुरा वहाण्यास नवीन माणसे पुढे येऊ लागली.

नानासाहेबास प्रधानकीची वस्त्रे प्राप्त झाल्यावर त्यानी परमुलुखात असलेले आपले सर्व सरदार पुण्यास बोलावून घेतले. मराठ्यांचे दिल्लीस असलेले वकील महादेव भट हिंगणे, राणोजी शिंदे, रामचंद्रबाबा, होळकर, बुंदेलखंडात वावरत असलेले पिलाजी जाधव, आवजी कवडे हे सर्व पेशव्यांच्या बोलावण्यावरून पुण्यास आले. पेशव्यांनी ह्या सर्वांशी सल्लामसलत करून विचार ठरविला की, उत्तरेचे राजकारण हाती घ्यावे. त्याजकरिता सवाई जयसिंगाशी प्रथम बोलणी करून पुढील बेत आखावे. ह्या योजनेस त्यानें शाहू महाराजांची संमती मिळविली. इ. स. १७४० मध्ये दसरा संपल्यावर उत्तरेस स्वारीस जाण्याचा पेशव्यांचा बेत निश्चित झाला.

**चिमाजी अप्पांचा मृत्यू :**

दसरा संपल्यावर नानासाहेब उत्तरेस स्वारीस निघाले. बरोबर चुलते चिमाजी अप्पा व गोपिकाबाई या होत्या. तारीख ३१ ऑक्टोबर १७४० रोजी चिमाजी अप्पांची प्रकृति एकदम ढासळली. म्हणून ते माघारी आले व नानासाहेब पुढे गेले. पुण्यास चिमाजी आप्पांवर अनेक औषधोपचार केले गेले. पण ढासळलेल्या प्रकृतीत सुधारणा न होता ती अधिकच ढासळत गेली. तारीख १७ डिसेंबर रोजी चिमाजीअप्पांचे देहावसान झाले.[1] बाजीरावांच्या मृत्यूनंतर आठ महिन्यानी चिमाजीअप्पांचा मृत्यू झाला. पण त्यामुळे तरुण पेशवे खचून गेले नाहीत, त्यांनी राज्याची धुरा पुढे हाकिली.

चिमाजीअप्पांच्या मृत्यूनंतर नानासाहेब पेशव्यानी उत्तरेत चार स्वाऱ्या केल्या. त्यांचा तपशील असा :—

१. **धवलपूरची स्वारी :** तारीख २३ नोव्हेंबर १७४० त पेशवे गोपिकाबाईसह पुण्याहून निघून त्यानी उत्तरेस प्रयाण केले. धवलपूर येथे तारीख १२ ते १९ मे १७४१ ह्या मुदतीत सवाई जयसिंगास भेटून ते ७ जुलैस पुण्यास परत आले.

२. **बंगाल स्वारी :** ही स्वारी जास्त महत्वाची मानली जाते. ह्या स्वारीचा काल १८ डिसेंबर १७४१ ते ३० जुलै १७४३.

३. **भेलसा स्वारी :** २० नोव्हेंबर १७४४ ते ऑगस्ट १७४५.

४. **नेवाईची स्वारी :** १० डिसेंबर १७४७ ते ९ जुलै १७४८. उत्तरेतील नमूद केलेली पेशव्यांची ही शेवटची स्वारी होय. ह्यानंतर पेशवे उत्तरेस गेलेले दिसत नाहीत.

१. बाळाजी बाजीरावांचे ब्रह्मेंद्रस्वामींना अप्पासाहेबांच्या मृत्यूबद्दलचे पत्र,ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र, ले. ६०, पृ. ९२.

भोपाळच्या लढाईनंतर निजामाशी जो तह बाजीरावानी केला त्या तहातील सर्व कलमांची अंमलबजावणी होण्याच्या आतच बाजीराव पेशवे मृत्यू पावले. मुख्य म्हणजे भोपाळच्या तहात बादशहाकडून माळव्याची सुभेदारी मराठ्यास मिळवून देण्याचे निजामाने कबूल केले होते. बाजीराव निधन पावल्याचे समजताच "निजामानी बहुतसा उपद्व्याप मांडून आपला चुलतभाऊ अजीमुल्लाखान यास माळव्याची सुभेदारी देवविली, वस्त्रे देऊन रवाना केले."[१] त्याचा नक्षा उतरविण्यास शिंदे-होळकर हे मातब्बर सरदार सिद्ध होते. दरम्यान निजामाचा पुत्र नासिरजंग ह्याने आपल्या हाती निजामीचा कारभार घेण्यासाठी दक्षिणेत बंडावा सुरू केला. त्याचा पाडाव करण्यासाठी निजाम दिल्लीहून दक्षिणेत त्वरेने आला. तेव्हा पेशव्यानी त्याची भेट घेतली.

**नासिरजंगाचा बंडावा :**

निजाम उल्मुल्कास आपल्या विवाहित बायकोपासून गाजीउद्दीन व नासिरजंग हे दोन पुत्र व दोन मुली झाल्या. बायकोशिवाय चार रक्षा होत्या. त्याजला सलाबतजंग, बसालतजंग, निजामअल्ली व मीर मोगल हे मुलगे जन्मले. सर्व पुत्र कर्तृत्ववान निघाले. गाजीउद्दीन बहुतेक दिल्लीस असे. नासिरजंग निजामाबरोबर दक्षिणेत होता. तो बापापेक्षा जास्त तडफदार होता. त्याने सन १७४० मध्ये पन्नास हजाराच्या फौजेनिशी बाजीरावांशी संग्राम केला. बापाच्या गैरहजेरीत तीन वर्षे निजामीचा कारभार चालविला, तेव्हा त्यास वाटू लागले की बापाने निवृत्त होऊन आपणास मुखत्यारी द्यावी. त्यानुसार त्याने बापाच्या वेळच्या नेमणुका बदलून स्वतंत्र कारभार सुरू केला. निजामास ह्या हकिकती दिल्लीस कळल्या. हा मुलगा आपणास गुंडाळून ठेवणार हे निजामास कळून चुकले. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी निजाम १७४० च्या ऑगस्टात दिल्लीहून निघाला. हे नासिरजंगास कळताच "तुम्ही दिल्लीसच राहा, इकडे याल तर फजीत पावाल. मला इकडे संपूर्ण मुखत्यारी द्या." असे त्याने बापास कळविले. तेव्हा निजाम सर्व तयारी-निशी मुलावर स्वारी करण्यासाठी सिद्ध झाला. दक्षिणेत दोन्ही बाजूनी जय्यत तयारी झाली. पेशव्यांची मदत नासिरजंग व निजाम ह्या दोघांनी मागितली. निजाम दक्षिणेत येण्यास निघाला ही बातमी पेशव्यांस खान-देशात असताना कळली. निजाम उल्मुल्क व त्याचा मुलगा नासिरजंग ह्या दोघासही पेशवे आपल्या बाजूस हवे होते. ह्यापैकी ज्याच्या बाजूस पेशवे त्याचा विजय ठरलेला. निजाम उल्मुल्काने पेशव्यांची मदत मागताच पेशव्यांनी निजामाकडून आपणास माळवा प्रांताची सनदा मिळणे सोपे जाईल हा हेतू मनात धरून बाबूराव बर्वे यास निजामाकडे पाठविले. पेशव्यांनी निजामास मदत करण्याचे ठरविल्यावर पेशवे व निजाम ह्यांच्या भेटी घडवून आणण्याचे काम पिलाजी जाधवानी केले. खानदेशात पूर्णा नदीचे काठी एदलाबाद येथे तारीख ७ जानेवारी १७४१ रोजी पेशवे निजामाच्या गांठीभेटी

१. मल्हारराव होळकरांचे पत्र, रा. खं. ६, १४४, १४५.

झाल्या. ह्या भेटीत निजामाने पेशव्यास आपल्या मुलास मदत न करण्याचे आवर्जून सांगितले.[१] ह्या गाठीभेटीत एक आठवडा गेला. दोन्ही बाजूचे मुत्सद्दी बाहेरून स्वच्छ दिलाचा आव आणीत होते. पण आतून एकमेकाबद्दल साशंक होते. पेशव्यांनी निजामाकडे भोपाळच्या तहात ठरल्याप्रमाणे माळवा प्रांताच्या सनदा निजामाने बादशहाकडून आपणास देववाव्या अशी मागणी केली. निजाम त्यावर म्हणाला की, "मागणी रास्त आहे. पण बादशहा-वर दबाव आणून त्यास ही मागणी पुरी करावयास लावणे आपल्या शक्तिबाहेरील आहे." ह्या उत्तराने पेशव्यांची निराशा झाली. म्हणून पेशव्यानी ह्या पिता-पुत्राच्या लढाईत कोणत्याच पक्षास मदत केली नाही. नासिरजंग औरंगाबादेस निजामावर चालून आला. दोन्ही सैन्यांची गाठ तारीख २३ जुलै १७४१ रोजी पडली. खुलदाबाद आणि दौलताबाद ह्या मधील मैदानात दोन्हीकडील सैन्यांनी आपल्या पराक्रमाची शर्थ केली. त्यात निजामाकडील तोफा परिणामी ठरल्या. त्यांनी विजयश्री निजामाकडे खेचून आणिली. नासिरजंगाचे बहुतेक सरदार मारले गेले वा पकडले गेले. नासिरजंगाला निजामाचा सरदार सैद लष्करखान याने कैद केले आणि त्यास निजामाकडे सुपूर्द केले. नासिरजंगाचा पराभव झाला. आपल्या मुलाच्या बंडाचा बीमोड निजामाने केला. नासिरजंगाचा मुख्य पाठीराखा सरदार शाह नवाजखान हा परागंदा झाला. त्याने पुढील पांच वर्षे अज्ञातवासात घालविली. ह्या मुदतीत त्याने "मासिर-उल-उमराह" हा सुप्रसिद्ध चरित्रात्मक ग्रंथ लिहिला. पुढे पांच वर्षांनी निजामाने त्यास दया दाखवून त्याची सरदारकी चालू केली.

ह्या विजयाबद्दल निजामाने सर्वसत्ताधीश खुदाचे आभार मानिले. सहा महिन्यानंतर पिता-पुत्रांची पुन्हा भेट होऊन निजामाने नासिरसंगास कैदेतून मुक्त केले. पूर्वीप्रमाणेच त्याजबरोबर गोडीगुलाबीने तो वागू लागला.

**ढवलपूर (धोलपूर) ची स्वारी—पेशव्यास माळव्याच्या सनदांची प्राप्त :**

नानासाहेब पेशवे उत्तर हिंदुस्तानच्या स्वारीवर जाण्यास तारीख २१ ऑक्टोबर १७४० रोजी पुण्याहून निघाले. निजामाच्या मनात हातात असलेला माळव्याचा सुभा सोडावा असे नव्हते. तेव्हा त्याने टाळाटाळीचे राजकारण सुरू केले. फौजेच्या बळाशिवाय कोणतेही कार्य पुरे होणार नाही हे ओळखून पेशव्यानी फौजेनिशी माळवा प्रांतावर चढाई केली आणि बादशहाचा अंतरवेदीतील मुलूख लुटून त्याच्यावर दडपण आणिले. आदल्याच वर्षी मराठे फौजांनी अंतरवेदीत जाऊन मुलूख खराब केला होता, त्याप्रमाणे यंदाहि मराठी फौजा येऊन मुलूख लुटतील. याकरिता बादशहाने लहान मोठ्या अमीर उमरावास सवाई जयसिंगांशी सामील होण्यास हुकूम पाठविले आणि सवाई जयसिंगास मराठ्यांवर चाल करून जाण्यास सांगितले. सवाई जयसिंग मातब्बर फौजेनिशी आग्र्यास आले. प्रयागचा सुभेदार अमीरखान

१. म. रि. पेशवा बाळाजीराव, भा. १, पृ. ४४.

व अयोध्येचा सुभेदार मनसुरअलीखान यांना बादशहाने हुकूम केला की, "सवाई जयसिंग यास सामील होऊन मराठे अंतरवेदीत न ये ते करणे." त्यावरून ते फौजा जमा करून सवाई जयसिंगास सामील होण्याकरिता गंगा नदीस नावांचा पूल बांधून येणार हे वर्तमान पेशव्यास कळताच त्यानी मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे, तुकोजी पवार आदि मराठे सरदारास आपल्याकडे त्वरित येण्यास फर्माविले. त्याप्रमाणे सर्व मराठे सरदार पेशव्यास येऊन मिळाले. अयोध्येचा सुभेदार व प्रयागचा सुभेदार सवाई जयसिंगास सामील होण्यास येतात, सबब त्यास पायबंद घालावा हा विचार करून, पेशव्यानी काही फौज यमुनेच्या दक्षिण तीरी प्रयागपर्यंत रवाना केली. ही मराठ्यांची फौज तिकडे गेली असे जाणून अयोध्येचा सुभेदार गंगानदीपलीकडे राहिला. आणि प्रयागचा सुभेदार गंगातीरी नांवाचा पूल बांधून तिथेच थांबला. यावर सवाई जयसिंगाने विचार केला की, प्रयागचा सुभेदार व अयोध्येचा सुभेदार हे काही आपल्याला सामील होत नाहीत. आपणच कलह करावा तर मराठ्यांबरोबर आपला टिकाव लागणार नाही. यास्तव जयसिंगाने समेट व्हावा अशी विनंती करून, आपला वकील आयामल यास पेशव्यांचे भेटीस पाठविले आणि भेटीसाठी बोलणी सुरू केली. त्यावरून पेशवे पिलाजी जाधवराव ह्यास बुणग्यांसह मागे ठेवून तुकोजी पवार व इतर सरदार ह्यांना बरोबर घेऊन चंबळ नदीच्या उत्तर तीरी ढवलपूर (धोलपूर) मुक्कामी आले. सवाई जयसिंगही आऱ्याहून कूच करून तेथे आले. परस्परांच्या भेटी १२ मे १७४१ रोजी होऊन एकमेकाच्या डेऱ्यास गेले.[१] ह्या प्रसंगी सवाई जयसिंगानीं मराठ्यांना माळवा प्रांताच्या सुभेदारीच्या सनदा बादशहाकडून सहा महिन्यात मिळवून द्याव्या असे ठरले. ही स्वारी ११ जून १७४१ रोजी संपली.

सवाई जयसिंगानी आपले वचन बिनचूक पाळले. त्यांच्या सांगण्यावरून बादशहाने माळव्याच्या सुभेदारीच्या सनदा मराठ्यास देण्याचे ठरवून तारीख ७ सप्टेंबर १७४१ रोजी माळव्याचा संपूर्ण कारभार दिवाणी व फौजदारीसुद्धा पेशव्यांचे हवाली केल्याचे फर्मान बादशहाने काढिले. त्या फर्मानात बादशहाने माळव्याची सुभेदारी शहाजादा अहमद ह्याचे नांवे करून पेशव्यास त्याची नायब सुभेदारी देण्यात आली. ह्यासंबंधी बादशहा व पेशव्यांमध्ये जो करार झाला त्या करारास जामीन म्हणून राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव याजकडून बादशहाने तारीख २१ एप्रिल १७४३ रोजी कबुलायत लिहून घेतली. मराठ्यांना हे फर्मान मिळाल्यावर माळवा, बुंदेलखंड यातील लहान मोठ्या सत्ताधिशांचे पूर्वीचे बादशहाशी असलेले संबंध तुटून त्याची पुनर्घटना पुण्यास होऊ लागली. खुद्द जयपूरवाले मराठ्यांच्या छायेत आले. उत्तर हिंदुस्तानात मराठ्यांची सत्ता स्थिरावण्यास माळव्याचा ताबा मराठ्यास मिळणे आवश्यक होते. ते मराठ्यांनी साधल्यामुळे इथून मराठ्यांना उत्तरेत हातपाय पसरणे सोपे गेले.

---

१. प. च. इ. सा. ले. ८७; पु. द. भा. १, ले. १४९;

**मराठी सत्ता पूर्वेस विस्तारते :**

हिंदुस्तानच्या पूर्व बाजूस बंगाल, बिहार व ओरिसा असे तीन प्रांत आहेत. ह्या तीन प्रांतात मराठ्यांनी आपल्या सत्तेचा फैलाव कसा केला हे सांगितले पाहिजे.

बंगाल प्रांत मोगल अमदानीत संपन्न म्हणून मशहूर होता. औरंगजेबाच्या महाराष्ट्रावरील २५ वर्षे चालविलेल्या युद्धास द्रव्याचा पुरवठा बंगालने केला. बंगालचा कारभार बरीच वर्षे सुव्यवस्थित चालल्याने बादशहाच्या खर्चास त्याचा वसूल मिळत असे. बंगालचा सुभेदार सर्फराजखान यास पाटण्याचा नायब सुभेदार अलीवर्दीखानाने तारीख १० एप्रिल १७४० रोजी घेरिया येथील लढाईत ठार मारले आणि तोच स्वत: बंगाल, बिहार व ओरिसा ह्या तिन्ही प्रांतांचा नवाब झाला. ओरिसा प्रांताचा नायब सुभेदार रुस्तुमजंग याने नवाब अलिवर्दीखानाचें वर्चस्व अमान्य केले. त्याने स्वत: स्वतंत्र झाल्याचे जाहीर करून बंगाल प्रांत काबीज करण्याचे ठरविले. यामुळे नवाब अलिवर्दीखान आणि रुस्तुमजंग ह्यांचे वैमनस्य वाढले. शेवटी स्वसंरक्षणसाठी आणि ओरिसा प्रांतावरील तावा कायम ठेवण्यासाठी रुस्तुमजंगाचा जावई बाकरअल्ली याने मराठ्यांची मदत मिळविण्याची खटपट चालविली. तसेच अलिवर्दीखानाने सर्फराजखानास मारून मुर्शिद कुलीखानाच्या कुटुंबाचा संहार केला. हा प्रकार मीर हबीब नांवाच्या अंमलदारास दुःसह वाटून त्याने अलिवर्दीखानाचे पारिपत्य करण्यासाठी नागपुरास रघूजी भोसले यांजकडे येऊन मदतीची याचना केली. ह्यावेळी रघूजी भोसल्यांची कर्नाटकातील पराक्रमाची कीर्ती चोहोकडे पसरली होती. मीर हबीब ज्यावेळी नागपुरास आला तेव्हा रघूजी भोसले हे साताऱ्यास शाहू महाराजांपाशी होते. मीर हबीब आल्याचे कळताच ते नागपुरास लागोलाग परतले. रघूजीनी आलेल्या संधीचा फायदा घेऊन बंगालवर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. रघूजीनी नागपुराहून आपला दिवाण भास्करराव कोल्हटकर यांजबरोबर मोठी फौज देऊन त्यांस बंगालच्या स्वारीवर पाठविले. स्वारीचा हेतू त्या मुलुखात चौथाई वसूल करणे हा होता.

इ. स. १७४२ च्या उन्हाळ्यात भास्कर राम कोल्हटकरांच्या अधिपत्याखाली नागपूरहून निघालेली फौज वरद्वान येथे जमा झाली. मराठ्यांच्या घोडदळाने नवाबाचे फौजेस वेढा दिला. मराठ्यांनी शत्रूवर हल्ला करून नवाबाची छावणी लुटली. नवाबाचे डेरे अग्नीच्या भक्षस्थानी पडले. तेव्हा नवाब अलिवर्दीखानाने मराठ्यांबरोबर समेटाचे बोलणे सुरू केले. भास्कर राम यांनी नवाबाकडे एक कोट रुपये व सर्व हत्ती मागितले. शेवटी समेट घडून आला नाही.

बंगालची राजधानी मुर्शिदाबाद येथे अलिवर्दीखानाचा मुक्काम नाही ही संधी साधून इ. स. १७४१ च्या मे महिन्यात मीर हबीबने भास्कर राम यास मुर्शिदाबादेवर हल्ला करण्याचा सल्ला दिला. मराठा फौजेने तारीख ६ मे

१७४२ रोजी मुर्शिदाबादेत शिरून ते शहर लुटले. पुढे कलवा हे शहर जून महिन्यापासून मराठ्यांच्या छावणीचे मुख्य ठिकाण झाले. गंगा नदीच्या पश्चिमेकडील मुलूख मराठ्यांचे ताब्यात आला आणि राजमहाल, मेदिनीपूर आणि जलेश्वर या परगण्यात मराठ्यांनी आपली ठाणी बसविली. गंगा नदीच्या पश्चिम काठावरील प्रदेशात हुगळी हे एक मोगल राजवटीत महत्वाचे राजकीय ठिकाण होते. इंग्रज, फ्रेंच व डच या पाश्चिमात्य व्यापारी लोकांचा हुगळी शहराशी संबंध येत असे. मराठ्यांनी हे शहर सन १७४२ च्या जुलै महिन्याचे प्रारंभी जिंकले. पुढे नबाब अलिवर्दीखानाने सैन्याची जय्यत तयारी करून भास्कर राम यांचे हाताखालील मराठा फौजेवर तारीख २७ सप्टेंबर १७४२ रोजी अचानक हल्ला केला. तेव्हा मराठा फौजेचा मोड होऊन मराठ्यांना बरद्वान, हुगळी वगैरे ठिकाणे सोडावी लागली. शेवटी मराठ्यांना डिसेंबर १७४२ मध्ये दक्षिणेत हाकलून दिले आणि नबाब ९ फेब्रुवारी १७४३ रोजी स्वारीहून मुर्शिदाबादेस परत आला.[१]

भास्कर राम ज्यावेळी प्रथम सन १७४२ मध्ये बंगालवर चालून आले त्याच सुमारास वार्षिक वसुलासाठी बादशहाचे अंमलदार बंगाल्यात आले. त्या अंमलदारास खानाने सांगितले, "प्रांतावर मराठे चालून आले आहेत, त्यांच्या बंदोबस्तासाठीं लौकर मोठी फौज मदतीस पाठवा, नाहीतर सुभा हातातून गेला असे समजा". तेव्हा बादशहाने अयोध्येचा सुभेदार सफदरजंग याला बिहार प्रांताचे संरक्षण करण्यासाठी रवाना केले आणि जरूर पडल्यास बंगाल प्रांतावर चाल करून जावे असा हुकूम दिला. याचवेळी नानासाहेबास माळव्याच्या सनदा द्याव्या असे बोलणे सवाई जयसिंगानी बादशहापाशी काढले होते. त्यास बादशहाने कळविले की, आधी पेशव्यानी बंगाल्यावरील संकट मोडून आपली बादशाही तक्ताबद्दलची राजनिष्ठा पटवून द्यावी म्हणजे मग त्यास सनदा देऊ.

पेशवे बाळाजी बाजीराव स. १७४१ च्या डिसेंबरात उत्तरेस स्वारीवर निघाले होते. त्यांनी तारीख २० फेब्रुवारी १७४२ रोजी चांद्यावर मुक्काम केला. मार्च १७४२ मध्ये गढामंडळा काबीज केले. तारीख २९ जून १७४२ रोजी पेशव्यांनी ओर्च्छावर छावणी केली. जुलैमध्ये यशवंतराव पवार यांची धार येथे स्थापना केली. ह्याच वेळी पेशव्यांस आपल्या वकिलाकडून बादशहाचा अलीवर्दीखानास मदत करण्याचा निरोप कळून आला.[२] पेशव्यांनी बादशहास उलट निरोप पाठविला की, बादशहा जर आपणास माळवा, बुंदेलखंड व अलाहाबादचे चौथाई वसुलाचे हक्क देत असेल तर आपण अलीवर्दीखानास मदत करण्यास तयार आहोत. ह्या पत्रव्यवहाराची चाहूल रघूजी भोसले यास लागताच त्यांनी तारीख ३० सप्टेंबर १७४२ रोजी पेशव्यांना पत्र पाठवून त्यांच्या मनात कोणता मनसवा आहे ह्याजसंबंधी विचारले.

---

१. म. रि. पेशवा बाळाजीराव, भा. १ ला, पृ. ६५.

२. पु. द. भा. १, ले. १५०.

शिवाय स्वतः भास्करपंतास मदत करण्यासाठी आपण देवगड बारिया मार्गे बंगालास जात आहोत असेही सांगितले.

वर सांगितल्याप्रमाणे बादशहाने अलीवर्दीखानाचे संरक्षण करण्याचे काम पेशव्यांकडे सोपविले आणि स्वारी खर्चाकरिता बंगालच्या उत्पन्नातून त्यास रक्कम देण्याबद्दल अलिवर्दीखानास हुकूम दिला. बंगालात जाऊन रघुजीस हुसकून देण्याचा बादशहाचा हुकूम पेशव्यास नोव्हेंबरात बुंदेलखंडात मिळाला.

पेशवे व रघूजी भोसले ह्या दोघामध्ये तेढ होती. रघूजी भोसले हे आरंभापासून पेशव्याशी फटकून वागत. शाहू महाराजांची धाकटी राणी सगुणाबाई व रघूजी भोसल्यांची पत्नी या चुलत बहिणी होत्या. राणी सगुणाबाईचा ओढा आपल्याच चुलत बहिणीचा मुलगा रघूजींचा पुत्र मुधोजी, याजकडे होता. शाहू महाराजांनी मुधोजीस दत्तक घ्यावे अशी राणी सगुणाबाईची इच्छा होती. अशा संबंधामुळे रघूजीस शाहू महाराजांचा पूर्ण पाठिंबा मिळत होता. रघूजींनी अशी महत्त्वाकांक्षा बाळगली की, पेशव्यास निर्माल्यवत् करून उत्तरेत शक्यतितका आपला अंमल प्रस्थापित करावा आणि छत्रपतींच्या राज्यकारभाराची सर्व सूत्रे स्वतःच्या हातात ठेवावी. परंतु धूर्त पेशव्यानीं रघूजी भोसल्यांचा हा डाव हाणून पाडिला. तेव्हा रघूजी भोसल्यांनी नागपूर प्रांताच्या पूर्वेस व ईशान्येस लागून असलेल्या बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतावर स्वाऱ्या करून मोगलांच्या ताब्यात असलेले प्रांत काबीज करण्याचे धोरण स्विकारले.

मराठमंडळाचा मुख्य चालक पेशवे हे तत्व मान्य करून त्यांच्या इच्छेप्रमाणे आपले धोरण आखण्यास रघूजी भोसले तयार नव्हते. त्यास वठणीवर आणण्यासाठी पेशव्यांनी रघूजीच्या ताब्यातील खानदेश, वऱ्हाड, गढा, मंडळा या भागावर हल्ले केले. रघूजी भोसले यांचा राग अनावर झाला. त्यानी शाहू महाराजांपाशी ह्याची दाद मागितली.[1]

बादशहाच्या हुकूमाने बंगाल्यात उतरून रघूजी भोसल्यांची खोड मोडण्याचे पेशव्यानी योजिले. पेशव्यांबरोबरच्या प्रचंड फौजेची छावणी तारीख २७ जानेवारी १७४३ रोजी अलाहाबादेस होती. ही मराठी फौज ग्वाल्हेर प्रांती आल्यावर त्यांनी तेथील बंदोबस्त केला. आणि पुढे पटणे (बिहार) प्रांताकडे जावे ह्या उद्देशाने बुंदेलखंडात आली. त्यानंतर प्रयाग, काशी ही क्षेत्रे जवळ करून पटणे प्रांतात न जाता मजल दर मजल मराठे फौज प्रयाग मुक्कामी आली.[2]

आपसात वैर माजविणे अनुचित ही भावना उभय पक्षात असून सामोपचाराने प्रकरण मिटविण्याचा प्रयत्न रघूजी भोसल्यांनी केला. गयेपलीकडे चाळीस कोसांवर पेशव्यांचे लष्कर असता रघूजी खडे स्वारीने गयेस येऊन पेशव्यास

१. वैद्य दप्तरातून निवडलेले कागद, भा. ४ लें. १३.
२. पु. द. भा. १, ले. १५०.

भेटले, चार दिवस राहून प्रश्न निकालात निघत नाही असे पाहून ते परत आपल्या सैन्यात गेले.[१]

मोगल बादशहाने शाहू महाराजांस बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतावरील चौथाई देण्याचे कबूल केले होते. शाहू महाराजांनी चौथाई वसूल करण्याचे काम रघूजी भोसले याजवर सोपविले. तेव्हा रघूजीनी शाहू महाराजांचे आज्ञेनुसार त्या प्रांतातून चौथाई वसूल करण्याचा निश्चय केला व त्यानी स. १७४३ मध्ये बंगालवर स्वारी केली. महाराजांना या प्रांतावर चौथाई वसूल करण्याच्या दिलेल्या हक्कांची अंमलबजावणी होऊ नये म्हणून बादशहाने रघूजीशी वैमनस्य असलेल्या पेशव्यास आपल्या लगामी लावून रघूजी भोसले यांचे पारिपत्य करण्यासाठी स. १७४२ च्या नोव्हेंबर महिन्याचे आरंभी नवाब अलीवर्दीखानाचे मदतीस जाण्यास सांगितले. रघूजी भोसले व पेशवे यांचे अंतर्यामी ठीक नसल्यामुळे पेशव्यांनी अलिवर्दीखानास मदत करण्याचे कबूल केले.

सन १७४३ च्या फेब्रुवारी महिन्याचे प्रारंभीं पेशवे पन्नास हजार फौजेनिशी बिहार प्रांतात दाखल झाले. पुढे पेशवे कूच करून मुर्शिदाबादेस निघाले. रघूजीनीं बरद्वान परगणा ताब्यांत घेऊन कटवा येथे सैन्याची छावणी केली. पेशव्यांनी तारीख ३१ मार्च १७४३ रोजी तुकोजी पवार, शिंदे, होळकर, जाधव इत्यादि सरदारांसह अलिवर्दीखानाची भेट घेतली. पेशवे व नवाब यांच्या भेटीत असे ठरले की, नवाबाने शाहू महाराजास चौथाई द्यावी आणि पेशव्यास सैन्याचे खर्चाबद्दल बावीस लाख रुपये द्यावेत. रघूजी भोसल्यांनी बंगाल प्रांतावर स्वारी करू नये. याविषयी पेशव्यांनी रघूजी भोसल्यांशी करार करून बंदोबस्त करावा. पुढे नवाब व पेशवे आपल्या सर्व सैन्यानिशी रघूजी भोसल्यांवर चाल करून गेले. मराठे घोडदळापुढे नवाबाचे घोडेस्वारांचा टिकाव लागेना. तेव्हा पेशव्यानी तारीख १० एप्रिल १७४३ रोजी मोठ्या मजली करून रघूजी भोसल्यांच्या सैन्याशी गाठ घातली. त्यात रघूजी भोसले यांचा पराभव झाला[२] तेव्हा रघूजी भोसले दक्षिणेत परतले. पुढे पेशवे या प्रचंड फौजेसह गया मार्गाने पुण्यास परत आले. या स्वारीचे वेळेस मराठे लुटतील या भीतीने इंग्रज व्यापाऱ्यांनी कलकत्ता, कासीम बझार व पाटणा येथे व्यापार बंद ठेविला होता. मार्च-एप्रिलमधे इंग्रजांनी कलकत्त्याचे संरक्षणासाठी जय्यत तयारी करण्यास सुरवात केली. व्यापारी लोकांनी स्वखर्चाने शहराभोवतीं खंदक खणण्याची योजना मुक्रर केली. व इंग्रज कौन्सिलने या योजनेस मान्यता देऊन तारीख २९ मार्च १७४३ रोजी व्यापारी लोकास खंदकाचे काम करण्यासाठी २५,००० रु. कर्ज दिले. अशा प्रकारे कलकत्त्याच्या सुप्रसिद्ध मराठी खंदकाच्या कार्यास यावेळी सुरुवात झाली.

---

१. पु. द. १. १५२.

**पेशवे-रघूजी समेट :**

पेशवे-रघूजी झुंज झाल्याचे ऐकून शाहू महाराजास दुःख झाले. त्यांनी ह्या दोन्ही मातबर सरदारांस आपल्यापाशी बोलावून घेतले. रघूजींना समजून चुकले की, मराठे सरदारांमध्ये पेशवे प्रमुख असून त्यास विरोध केल्यास आपण एकाकी पडतो त्यामुळे शत्रूचे फावते. बंगालमध्ये आपला चढाईचा कार्यक्रम यशस्वी करावयाचा असेल तर शत्रूस बाहेरून येणारी कुमक बंद केली पाहिजे हे त्यास पक्के कळून चुकले. त्याकरिता मनातील तेढ सोडून रघूजींनी पेशव्यांचे वर्चस्व कबूल केले. तेव्हा वादाचा मुख्य मुद्दाच निकालात निघाला. महाराजांनी दोघास जवळ बोलावून त्यांची कार्यक्षेत्रे आखून दिली. वऱ्हाडपासून कटक प्रांतापर्यंतचा सर्व मुलुख, बंगाल, बिहार व लखनौ एवढ्या भागात पेशव्यानी ढवळाढवळ करू नये व अजमीर, आग्रा, प्रयाग व माळवा हे प्रांत पेशव्यांचे म्हणून तारीख ३१ ऑगस्ट १७४३ ला ठरवून दिले. याप्रमाणे रघूजींनी बंगाल्यातील आपल्या उद्योगास पेशव्यांची संमति मिळविली आणि पुढील आठ वर्षात अलिवर्दीखानाशी निकराने युद्ध चालवून बंगालवर आपले हक्क लागू केले.

छत्रपति शाहू महाराजांनी हा समेट घडवून आणला. दोघा मातबर सरदा-रांचा समेट झाल्याप्रीत्यर्थ शाहू महाराजांनी त्यांना खाना दिला. खान्याचे समारंभ दोन्ही बाजूंनी यथापूर्वक पार पडले. शाहू छत्रपतीसही ह्या दोघा उमरावांनी मेजवानी दिली. त्यावेळी शाहू महाराजांनी त्या दोघाकडून एकोप्याच्या आणि एकदिलाने वागण्याच्या शपथा आपल्या पायावर हात लावून घेवविल्या. गढा आणि मांडला ह्या परगण्यांबद्दलचा वादही दोघांमध्ये एक-वाक्यता घडवून आणून तोडला. अशा रीतीने दोघेही सरदार आपआपल्या कार्यास उद्युक्त झाले.

**मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या :**

रघुजी भोसले यास बंगाल, बिहार व ओरिसा ह्या भागात मुलुखगिरी करण्याच्या सनदा मिळाल्यावर त्यानी बंगाल जिंकण्यासाठी आपले सरदार भास्कर राम कोल्हटकर ह्यास स. १७४३ चा दसरा संपल्यावर बंगालात फौजेसह जाण्यास सांगितले. भास्कर रामानी फौजफाट्याची तयारी करून ते जानेवारी १७४४ मध्ये बंगालच्या स्वारीवर निघाले. मराठे बंगालवर येत आहेत ही चाहूल अलिवर्दीखानास लागताच त्याचे धाबे दणाणले. मराठ्यांना शरण येऊन ते मागतील ती रक्कम दिल्याशिवाय आपली सुटका होणे नाही हे त्यास पक्के समजले. मराठ्यांच्या ह्या संकटाचे निवारण कसे करावयाचे ह्या विवंचनेत अलिवर्दीखान असता त्यास मराठ्यांचा विश्वासघात करून त्यांचा काटा काढायच्या युक्तिने त्याच्या सुपीक डोक्यात मूळ धरले. अंतर्यामी मराठ्यांच्या नाशाची योजना पक्की करून बाह्यात्कारी अलिवर्दी-खानाने ह्या योजनेचा भाग म्हणून भास्कर राम यांच्या भव्य स्वागताची भाषा सुरू केली. अलिवर्दीखानाने ठरविले की, चौथाईसंबंधी खाजगीरीत्या

बोलणी करण्यास भास्कर राम यास त्यांच्या साथीदारासह बोलावून त्या सर्व सरदारांवर दडून बसलेल्या मारेकऱ्यांनी हल्ला करून त्यास कापून काढावयाचे. ह्या आपल्या योजनेच्या पूर्ततेसाठी त्याने आपला सेनानायक मुस्ताफाखान ह्याचेही साहाय्य घेतले. त्यात मराठ्यांचा द्वेष्टा व मुस्ताफाखानाचा सेक्रेटरी जानकीराम हाही सामील झाला. ह्या कृत्याकरिता अलिवर्दीखानाने आपला पठाण सेनापति मुस्ताफाखान ह्यास आपल्या विश्वासात घेतले. जो व्यूह रचावयाचा त्याचा तपशील या सर्वांच्या विचाराने ठरविला. भास्करपंताची छावणी खटवा येथे होती. तिथपासून उत्तरेस २० मैलांवर अमानीगंज येथे नवाबाने आपली ठाणी घातली. मुस्ताफाखानाने आपला वकील भास्कर राम याजकडे पाठवून कळविले की, आपल्याशी लढण्याची आमची ताकद नाही. नवाबांची व आपली भेट सन्मानपूर्वक व्हावी आणि दोघांनी समक्ष बोलणी करून चौथाईच्या रकमा ठरवाव्या. भास्कर राम यास युद्धाशिवाय आपले इप्सित साध्य होत आहे असे वाटून त्याने मुस्ताफाच्या ह्या भेटीच्या योजनेस आनंदाने कबुली दिली. भास्कर राम यांच्या वकिलाशी मुस्ताफाच्या वकिलाचे बोलणे होऊन त्या दोघांनी भेटीचे तपशील मुक्रर केले. भेटीच्या जागा, नजराणे, पोषाख ह्यांचेही तपशील ठरले. कुराण व गंगाजळ ह्यावर हात ठेवून दोघांनी एकमेकाच्या संरक्षणाच्या आणि सद्भावनेच्या शपथा घेतल्या. समक्ष भेटीत बोलणी करण्याचा हा अलिवर्दीखानाचा डाव निश्चित घातकी स्वरूपाचा आहे हे मीर हबीबने ओळखून त्याने भास्करपंतास वेळोवेळी ह्याबद्दल सांगितले होते. पण अलिवर्दीखान आपणास दगा देईल हें भास्करपंतास पटेना. भेटीकरिता भव्य तंबूची उभारणी खटवा व अमानीगंज यांचे दरम्यान गंगेच्या कांठी मनकारा मैदानावर केली. तेथे एक सुंदर शामियाना बांधला. जागा शृंगारली, तंबूला सभोवार खांब व दरवाजे होते. त्यास लागून पन्नास सशस्त्र पहारेकरी म्हणून उभे करण्यात आले. त्यानी इशारा मिळताच मराठ्याना कापून काढावे असे ठरले. पन्नास पाऊणशें माणसास कळलेला हा प्रकार शेवटपर्यंत गुप्त राहिला.

तारीख ३० मार्च १७४४ हा दिवस नवाब आणि भास्कर राम यांच्या भेटीचा ठरला. भास्कर राम ह्या दिवशी पालखीतून नवाबाच्या भेटीस गेले. भास्कर राम यांचे स्वागत मुस्ताफाखान व जानकीराम या दोघांनी पुढे होऊन केले आणि बोलणी करण्यास आत नवाबाचे भेटीस नेले. उभे राहून भास्करपंतांचे स्वागत केले. पंत कोणते ह्याची खात्री पटताच नवाब एकदम मोठ्याने ओरडला, "ह्या सर्व मराठ्यांना (लुटारूंना) कापून काढा". नवाबाची ही आज्ञा त्याच्या लपून बसलेल्या सैनिकांनी तावडतोब अमलात आणिली. भास्कर राम आणि त्यांचे २१ सरदार यांना त्यांनी जागच्या जागी कापून काढिले.

मुसलमानांनी कनातीच्या दोऱ्या कापून बाहेरचा प्रवेश बंद केला. त्यामुळे सरदारांबरोबर त्यांचे रक्षक म्हणून आलेले व बाहेर टाकलेले मराठा दल आत येऊ शकले नाही. रघूजी गायकवाड म्हणून भोसल्यांचे सरदार तळावर होते. ते मात्र वाचले. त्यानी मोठे प्रसंगावधान राखून छावणीतील लोक

बाहेर काढून दिले आणि स्वतः नागपुरास येऊन दाखल झाले. नागपुरास ही बातमी कळताच मोठा हाहाःकार उडाला. अलिवर्दीखान आणि त्याचे साथी ह्यांनी मुर्शिदाबादेस आनंदोत्सव साजरा केला.

**सेवेची कदर :**

भास्कर राम यास अलीवर्दीखानाने दगा देऊन ठार मारिले तेव्हा त्याची गरोदर पत्नी स्वारीत होती त्या कशाबशा काशीस गेल्या. भास्करपंताचे मृत्यूच्या बातमीने त्यांचा भाऊ कोन्हेर राम यांनी शोकाक्रांत केला. त्यास दरसाल पंचवीस हजार रुपयांची वंशपरंपरेची सनद शिवाय स्वारी शिकारी लग्नकार्य वगैरेचे खर्चास सरकारातून मदत देणेचे आश्वासन शपथपूर्वक करून दिले.

शिवाय कर्नाटकातील भोसल्यांच्या सुभ्याबद्दल कोन्हेरपंतास दहा लक्षाचे उत्पन्न अर्काटचे नबाबाने सप्टेंबर, तारीख ३, स. १७४८ चे करार करून दिले. भास्करपंताची स्त्री ताईबाई, त्यांचे नांवे वऱ्हाडातील दरोबस्त सुभा बाईच्या नांवाने बाबासाहेबानी करून वहिवाटीस कोन्हेर रामाचे विद्यमाने कृष्णाजी गोविंद मुक्रर करून ठेविले. यावरून भोसल्यांनी भास्कर राम यांच्या सेवेची कदर करून मराठी दौलत उभारण्यात ज्यांचे श्रम खर्ची पडले, त्यांच्या कुटुंबियास त्याची फळे जहागिर रूपाने चाखावयास दिली.

**बंगाल मराठ्यांच्या ताब्यात :**

भास्करराम यांच्या खुनाचा बदला घेण्यासाठीं बंगालवर पुन्हा चालून जाण्याची जय्यत तयारी रघूजीनी वर्षभर करून ते स. १७४५ च्या आरंभी वऱ्हाड प्रांती फौजेचा गाहा करून मजल दरमजल बंगालास निघाले. मीर हबीबचे सहाय्य त्यास होतेच. शिवाय अलिवर्दीखानाचा लष्करी सरदार मीरजाफर हा आपल्या धन्याविरुद्ध उठून रघूजी भोसले यांस बंगालास येण्याचे आमंत्रण देत होता. ह्या अस्वस्थेचा फायदा रघूजीनी घेतला. नागपुरहून निघाल्यावर त्यानी कटक किल्ल्यावर हल्ला केला व तो ताब्यात घेतला (६ मे १७४५). त्याच स्वारीत जानकीरामाचा पुत्र दुर्लभराम हा सापडला. त्यास रघुजीनी आणून बंदीत ठेविले. त्याजकडून तीन लाख रुपये घेऊन त्यास स. १७४७ च्या जानेवारीत सोडून दिला.

ह्याच स्वारीत रघूजीना अलीवर्दीखानाचे व मुस्ताफाचे युद्ध निकरावर आले आहे असे समजताच अलिवर्दीखानाविरुद्ध मुस्ताफास कुमक पाठविली. पण ह्या युद्धात मुस्ताफा मारला गेला (जून १७४५). अलिवर्दीखानाकडे मुंडकटाईबद्दल रघूजीनी तीन कोटी रुपयांची मागणी केली आणि त्यासाठी त्यानी पावसाळी छावणी बीरभूम येथे केली. पावसाळा संपल्यावर रघूजी व अलिवर्दीखान ह्यांच्यात चकमकी झडू लागल्या. त्यात रघूजींचा मुर्शिदाबादेजवळ तारीख २१ डिसेंबर १७४५ रोजीं अलिवर्दीखानाकडून पराभव झाला. तेव्हा रघूजीनी मीर हबीबच्या मदतीस ३,००० सैन्य ठेवून ते नागपुरास परतले.

एवढ्यात बादशहाशी झालेल्या आपल्या कराराप्रमाणे पेशव्यानी पटण्याची चौथाई मागण्यास आपला माणूस अलिवर्दीखानाकडे पाठविला. एका बाजूस मुंडके कटाईबद्दल नागपूरकर भोसल्यांकडून मागणी व दुसऱ्या बाजूस पेशव्यांची मागणी अशा दुहेरी मागण्यांच्या कैंचीत अलिवर्दीखान सापडला. दुर्दैवाने रघूजी भोसले ह्यावेळी कर्जाच्या ओढगस्तीत सापडल्यामुळे कर्ज निवारून पैसा उभा करून हवे तसे सैन्य उभारण्यास त्यास एक वर्ष घालवावे लागले. स. १७४६ च्या अखेरीस जानोजी भोसले नबाबावर चालून जाण्यासाठी नागपूरहून निघाले. स. १७४७ च्या जानेवारीत ते कटकला येऊन मीर हबीब ह्यास मिळाले. ह्या दोघांनी अलिवर्दीखानावर चढाई करून बरद्वान येथे त्याचा पराभव केला. पण लागलीच अलिवर्दीखानाने जानोजी भोसले यांचा पराभव केल्यामुळे जानोजी भोसले नागपुरास गेले. ह्याच वर्षी शाहू महाराजानी रघूजींना साताऱ्यास बोलावून घेतले. शाहू महाराजांचा वृद्धापकाळ, त्यांच्या पाठीमागे मराठी गादीस वारस शोधणे, निजामाचा स. १७४८ मधे मृत्यू, ह्यामुळे रघूजींनाही स्वस्थता मिळाली नाही. त्यांनी आपले तिसरे पुत्र साबाजी ह्यांस बंगालवर स्वारीवर पाठविले. साबाजी व मीर हबीब ह्यांनी एक विचाराने वागून नबाबाचा दोन वर्षे पिच्छा पुरविला. त्यावेळी अलिवर्दीखानाच्या बेगमेने मराठ्यांशी तह करण्यासाठी नबाबास गळ घातली. त्याचा इष्ट परिणाम होऊन अलिवर्दीखानाने मराठ्यांशी तहाची बोलणी सुरू केली. जानोजी भोसल्यांच्या विद्यमाने वाटाघाटी होऊन खालील तह १७५१ च्या मार्चमधे ठरला, त्याची कलमे :—

(१) मीर हबीबने नबाबाचा नायब म्हणून ओरिसाचा कारभार करावा आणि उत्पन्न येईल ते भोसल्यास द्यावे;

(२) बंगाल व बिहार ह्या दोन प्रांताच्या चौथाईबद्दल दरसाल बारा लाख रुपये नबाबाने अविच्छिन्न भोसल्यास पोचवावे;

(३) मराठ्यांनी बंगाल प्रांतावर पुन्हा स्वाऱ्या करू नयेत;

(४) कटक प्रांत म्हणजे सुवर्णरेखा नदीपर्यंतचा प्रदेश मराठ्यांचा समजावा.

ह्यावेळीं अलिवर्दीखानाने मागील बाकीचे म्हणून रु. बत्तीस लाख मराठ्यास ताबडतोब दिले आणि करारावर सह्या होऊन जानोजी नागपुरास परतले. परतताना त्यानी शिवरामभट साठे ह्या आपल्या सरदारास ओरिसा प्रांताचा कारभारी नेमिले. साठ्यांनी आपले काम चोख बजावले.[1]

बंगाल, बिहारवर मराठ्यांचे चौथाई हक्क प्रस्थापित झाले. ओरिसा ताब्यात येऊन तिथे मराठी सत्ता नांदू लागली.

हबीबच्या अनेक वर्षाच्या परिश्रमास फळ आले पण तो त्याचा उपभोग घेण्यास फार दिवस जगला नाही. तारीख २४ ऑगस्ट १७५२ मधे त्याचा

---

१. रा. खं. ३, ले. ४३३-४५०

मराठे चौकीदारांशी देण्याघेण्यावरून तंटा होऊन त्यात तो मारला गेला. नबाब अलिवर्दीखानही वार्धक्याने तारीख १० एप्रिल १७५६ रोजी निवर्तला.

## उत्तरेतील राजकारण :

शिंदे, होळकर आणि पवार ह्या तीन प्रमुख सरदारांना बाजीरावानी उत्तर हिंदुस्तानातील मुलुखगिरी वाटून दिली. हे त्रिवर्ग सरदार माळवा, बुंदेलखंडात मराठ्यांची टाणी बसविण्याचे काम करीत असता त्यांचा संबंध राजपुत राजेरजवाड्याशी कसा आला ते पाहू.

बाजीराव पेशव्यानी छत्रपती शाहू महाराजांच्या धोरणानुसार माळवा प्रांताचे सुभेदारीची व काशी, प्रयाग, गया आणि मथुरा या हिंदूंच्या पवित्र क्षेत्रांची मागणी मोगल बादशहाकडे केली होती. निजामाने या मागणीस बादशहाची मान्यता मिळवून देण्याचे कबूल केले होते. पण ही मागणी पूर्ण होण्यापूर्वीच बाजीराव पेशवे तारीख २८ एप्रिल १७४० रोजी मरण पावले. तेव्हा ही अपुरी कामगिरी पार पाडण्याची कामगिरी बाजीरावांचे पुत्र बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यास करावी लागली. पेशवे बाळाजी बाजीरावानी तारीख २१ ऑक्टोबर १७४० रोजी पुण्याहून उत्तरेस जाण्याकरिता निघून माळवा प्रांतावर चढाई केली. बादशहाने प्रयागचा सुभेदार व अयोध्येचा सुभेदार ह्यांना सवाई जयसिंगास मराठ्यांच्या विरुद्ध जाण्यासाठी हुकूम सोडिले. वरील दोन्ही सुभेदारांनी सवाई जयसिंगाच्या मदतीस जाण्यास कुचराई केली. सबब मराठ्यांचा पराभव आपल्या एकट्याच्याने होणे नाही हे सवाई जयसिंगास कळून चुकल्यामुळे त्यानी मराठ्यांशी धोलपूर मुक्कामी तह केला. पेशवे व सवाई जयसिंग ह्यांच्या भेटी तारीख १२ मे १७४१ रोजी झाल्या. त्या समयी सवाई जयसिंगानी मराठ्यांना माळवा प्रांताच्या सुभेदारीची सनद बादशहाकडून सहा महिन्यात मिळवून द्यावी असे ठरले. ही स्वारी तारीख ११ जून १७४१ रोजी संपली. ह्या उत्तर हिंदुस्तानच्या स्वारीचे वर्णन मागे आलेच आहे.

## पेशव्यांचे उत्तरेस प्रयाण :

इ. स. १७४१ च्या विजयादशमीस पेशवे छत्रपतींचा निरोप घेऊन उत्तरेस निघाले. ते ह्या बाजूस एक वर्ष राहिले. स. १७४२ च्या सुरवातीला पेशव्यानी आपला तळ बुंदेलखंडात ठेविला. हिंदुस्तानचा मध्यबिंदू बुंदेलखंड तो ताब्यात ठेवणे इष्ट व बुंदेलखंडाचा मध्यबिंदू ओर्च्छा व झांशी ही स्थळे ताब्यात येत नाहीत ही खूणगाठ बांधून ही दोन्ही स्थळे मराठ्यांनी जिंकून घेतली. त्याची हकिगत अशी : ओर्च्छा स्थळ झांशीच्या पूर्वेस दहा मैलावर बांदा स्टेशनवर आहे. ओर्छा येथें त्यावेळी वीरसिंहदेव नावाचा बुंदेला राजा राज्य करीत होता. ह्या राजाकडून खंडणी वसुलीकरिता पेशव्यानी ओर्च्छाजवळ स. १७४२ च्या पावसाळ्यात मुक्काम केला आणि वसुलीची रक्कम आणण्यासाठीं पेशव्यानी राणोजी शिंद्यांचा पुत्र ज्योतिबा व त्याचा हिशेबनीस मल्हार कृष्ण क्षीरसागर यास रवाना केले. त्यांनी ओर्च्छापासून

सहा मैलावर असलेल्या झांशीस रात्री मुक्काम केला. त्यास दगा करून ओच्छांच्या राजाने जीवे मारिलें. सबब "नारोशंकर राजे यांची रवानगी फौजेसुद्धा झाली. ते ओर्छावर चालून गेले. त्यांनी राजास कैद करून ओच्छांत गाढवाचा हल फिरवून खोदून टाकिले.[१] ओर्छात नारोशंकर यांचा कारभार सुरू झाला. तो इ. स. १७५६ पर्यंत चालला. ओच्छांवर मराठ्यांचा अंमल सुरू झाल्यावर नारो शंकरनी झांशीचा किल्ला ताब्यात घेऊन खाली शहर वसविले. तेच हल्लीचे झांशी शहर होय.[२] गंगा यमुनेच्या दुआबात जाण्याचा हमरस्ता झांशीवरून जात असल्यामुळे त्या शहराचा व्यापार वाढून त्यास महत्त्व आले. ह्याच वर्षी पेशव्यानी सवाई जयसिंगांची भेट घेतली. आणि त्यांच्या सहाय्याने बादशहाकडून माळव्याच्या सनदा इ. स. १७४३ मध्ये मिळविल्या. नंतर पेशव्यांची स्वारी बिहार, बंगालकडे गेली आणि ह्या स्वारीचा शेवट रघूजी भोसल्यांशी समेट करण्यात झाला हे पूर्वी सांगितले आहे.

बुंदेलखंडात मराठ्यांचा अंमल कायमचा बसविण्यासाठी पेशव्यांची धडपड चालली होती. त्याप्रमाणे त्यांची पावले पडत होती. इतक्यात सातार्‍याहून शाहू महाराजांचे बोलाविणे आले. त्याप्रमाणे बाळाजी बाजीराव पिलाजी जाधव यांच्यासह सातार्‍यास गेले. शाहू महाराजांनी रघूजी भोसल्यासही सत्वर येण्याविषयी कळविले होतेच. रघूजीही मजल दर मजल स्वामीचें सेवेशी येऊन पोचले. शाहू महाराजांनी उभयतांची क्षेत्रे ठरवून समेट घडवून आणला हे वर सांगितलेच आहे.

माळव्यातून परत येताना स्वामीनी फौजास निरोप देऊ नये. शिंदे, होळकरास अश्विन मास पावेतो माळव्यात ठेवणे[३] असा विचार रामचंद्र बाबानी पेशव्यास कळविला, त्यावरून शिंदे-होळकरांची पहिली छावणी स. १७४३ त माळवा व बुंदेलखंडात झाली. रघूजीबरोबर समेट होऊन दिलजमाई झाल्यावरही पेशव्यास त्वरित उत्तरेस जाता येईना. इ. स. १७४३-४४ हे सबंध साल दक्षिणेत दरबारचा व निजामाचा पेच सोडविण्यांत गेले.[४]

पेशवे स. १७४४ च्या अखेरीस उत्तर हिंदकडे निघाले. ह्या स्वारीस सिरोज भेलशाची स्वारी म्हणतात. उत्तरेत शिंदे, होळकर ह्यांनी मराठ्यांचा जम माळव्यात बसविला. पण बुंदेलखंडातील निरनिराळ्या राजेरजवाड्यांनी मराठ्यांना खंडणी देताना मोठे घोळ घातले. त्यामुळे मराठ्यास खंडणी

---

१. पे. द. २७, ले. ७.

२. नारो शंकर यांच्यानंतर झाशीचा कारभार महादजी गोविंद ह्याजकडे सन १७५६ पासून १७६० पर्यंत होता. पुढे बाबूराव कोन्हेर सन १७६१-१७६५ पर्यंत होते. नारो शंकर यांचे पुतणे विश्वासराव लक्ष्मण दाणी हे १७६६—१७६९ पर्यंत सुभेदार होते. नंतर रघुनाथ हरि नेवाळकर हे पराक्रमी तलवार बहादूर सुभेदार झाले. त्यांच्या वंशजाकडेच अखेरपर्यंत झाशीचा कारभार चालला. ह्याच वंशातल्या राणी लक्ष्मीबाई यांनी आपल्या पराक्रमाने झाशीचे नांव अजरामर करून ठेविले आहे.

३. पे. द. २१, ले. ९.

४. पे. द. २५, ले. ६.

वसुलीकरिता कित्येक लढाया कराव्या लागल्या. पेशवे माळव्यात दाखल होण्यापूर्वीच भेलशास शिंद्यांनीं सुरुंग लावून तारीख ११ मार्च १७४५ रोजी भेलसा काबीज केले.[१] हे ठाणे भोपाळच्या नबाबाच्या ताब्यात होते. ते हाती आल्यावर पेशव्यांनी तिथे मुक्काम करून पेशव्यांनी माळवा व बुंदेलखंडातील राजेरजवाड्यांचे व्यवहार उलगडले. तसेच शिंदे, होळकर व पवार हे त्या प्रदेशात वास्तव्य करून पराक्रम गाजवून मुलूख जिंकीत असत. त्यांनी जिंकलेल्या प्रदेश वाटणीचे तंटे निकालात काढण्याचे कामही पेशव्यास करावे लागले. पेशव्यांच्या उत्तर हिंद कारभारात अनेक कर्तबगार माणसे चमकत होती व पेशव्यास सहाय्य करीत होती. शिंदे, होळकरांचे कारभारी अनुक्रमे रामचंद्र बाबा सुखटणकर व गंगाधर यशवंत चंद्रचूड हे पेशव्यास उत्तरेतील राजकारणात वारंवार मदत करीत असत. रामचंद्र बाबा उत्तरेत सर्व ठिकाणची तंत्रे सांभाळून धोरणाने वागत असत. ते समंजस, गमखाऊ व हिशेबी होते. दूरदृष्टी ठेवून नफानुकसान कशात आहे हे ओळखून सर्वांकडून अचूक कामे करून घेण्यात त्यांचा हातखंडा होता. ह्यांच्याच तोडीचे गंगाधर यशवंत चंद्रचूड, पेशव्यानी नेमून दिलेले होळकरांचे दिवाण. हे तलवार बहाद्दर होते. पण रामचंद्र बाबाएवढे चलाख नव्हते. पेशव्यांनी नेमणूक केलेले हे दोन्ही विश्वासू नोकर दोन्ही सरदारांना पेशव्यांचे हुकूम समजावून सांगत आणि पेशव्यांस वेळोवेळी हिताचा सल्ला देत.

रामचंद्र बाबा व राणोजी शिंदे ह्या दोघात एक विचार व सख्य होते. पण राणोजी शिंदे अकस्मात तारीख ३ जुलै १७४६ रोजी भोपाळच्या उत्तरेस ३० मैलावर असलेल्या सुजलपूर गांवी मरण पावले. राणोजी शिंदे व मल्हारराव होळकर ह्यांनी बाजीरावास सहाय्य केले व स्वतःच्या पराक्रमाने उत्तर हिंदुस्तानात मराठ्यांची सत्ता वाढविली. राणोजीस पांच पुत्र होते. पैकी सर्वात धाकटे चिरंजीव जोतिबा हे ओर्च्छा येथे मारले गेले. बाकी जयाप्पा, दत्ताजी, तुकोजी आणि महादजी हे वडिलांच्या पश्चात राज्यवृद्धी करणारे व मराठ्यांची सत्ता उत्तर हिंदुस्तानात दृढ करणारे निघाले. राणोजीच्या पश्चात जयाप्पांकडे शिंदे घराण्याची मुखत्यारी आली. जयाप्पा व कारभारी रामचंद्र बाबा ह्यांचे पटले नाही.

ह्या अगोदर घडलेल्या दुसऱ्या एका दुर्घटनेचा उल्लेख करावयास हवा. मराठ्यांचे दिल्ली येथील पहिले वकील महादेव भट हिंगणे ह्यांचाही शेवट अकस्मात दिल्लीस तारीख १ फेब्रुवारी १७४४ रोजी झाला. हे पेशव्यांचे दिल्ली बादशहाच्या दरबारी असलेले वकील. एकदा मीर बक्षी मनसुरअली ह्यांच्याशी बोलत असता काही कारणाने ह्यांचा तोल जाऊन त्यांच्या तोंडातून अपशब्द बाहेर पडले. तेव्हा त्यास तलवारीच्या घावास तिथल्या तिथे बळी पडावे लागले. हे बाळाजी विश्वनाथ यांच्या बरोबर इ. स. १७१८ मध्ये दिल्लीस गेले होते. तेथील कायमचा वकील म्हणून पेशव्यानी त्यांचीच नेमणूक केली. त्यांचे मुलगे बापूजी दामोदर, पुरुषोत्तम आणि देवराव ह्यांनी मराठ्यांचे वकील म्हणून पेशवाईत उत्तम कामगिरी बजाविली.

१. सरदेसाई, म. रि. बाळाजीराव, भाग १, पृ. ९७.

मराठ्यांना बुंदेलखंडात व माळव्यात आपला अंमल बसविताना तेथील राजे रजवाड्यांशी अनेक लढाया कराव्या लागल्या. रजपूत राजेरजवाड्यांनी मराठ्यांना तंबी पोहोचवून भदावर, कछवा व धार ह्या परगण्यात अंमल करावा आणि सर्व किल्ल्यांचा बंदोबस्त करून बुंदेल्यास सामील व्हावे असे ठरविले. पुढे रजपुतास बुंदेले मिळाले. ह्या दोघानी मिळून माळवा प्रांत देखील तमाम बुंदेलखंड, दतिया, ओर्च्छा, भदावर, कछवा व धार या मुलखातून मराठ्यांना घालवून देण्याचा बेत केला.[1] ह्यानुसार त्यांनी अनेक बंडे केली. मुलूख मारिला, मराठ्यांनी बसविलेल्या ठाण्यास मोर्चे लाविले. त्यांचे पारिपत्य, करण्यासाठी आणि आपला अंमल बसविण्यासाठी शिंदे, होळकर, पवार ह्यांनी पुन्हा प्रयत्न केला.[2] त्यांनी बुंदेल्यांचा पराभव करून इ. स. १७४६ च्या मे महात जैतपूरचे मजबूत ठाणे मोठ्या शौर्याने लढून हस्तगत केले. दतियेकरांचाही पराभव केला. जैतपूरवाले बुंदेल्यांशी मोठी झुंज दिली. "जैतापूर जागा बांका होता लेकीन तुम्ही सर्वानी मेहनत तरतूद करून जागा फत्ते केली. शाबास तुमची व शाबास लोकांची, मोठी गोष्ट जहाली.[3] अशा प्रकारचे गौरवोद्गार पेशव्यांनी काढिले. शिंदे, होळकर व पवार ह्या त्रिवर्ग सरदारांनी माळवा, बुंदेलखंडात मराठ्यांची ठाणी बसवीत असता त्यांचा संबंध राजपूत राजेरजवाड्यांशी आला व त्यांच्या राजकारणात त्यांनी लक्ष कसे घातले हे पाहू.

**राजपुतान्यातील राजकारण :**

शाहू महाराज व जयपूरचे राजे सवाई जयसिंग ह्यांचे फारच सख्य होते. त्यांच्या मैत्रीचा फायदा बाजीरावानी उचलून मराठे राजपुतांचे संबंध अगदी घरोब्याचे घडविले. बाजीरावांच्या पश्चात नानासाहेब पेशवे झाले. राणा सवाई जयसिंग हे तारीख २१ सप्टेंबर १७४३ रोजी मरण पावले. त्यांचे दोन पुत्र ईश्वरसिंग व माधोसिंग हे दोघेही गादीकरिता भांडू लागले. ह्या भांडणाचे मूळ राजपुतांच्या पुष्कर येथील ठरावात आहे. इ. स. १७१० मध्ये राजपुतान्यातील सर्व राजे पुष्कर येथ जमले आणि त्यांनी असा ठराव केला की, ह्या उपर राजपुतांच्या मुली मुसलमानास द्यावयाच्या नाहीत. मेवाडच्या राण्याने आपल्या मुली इतर राजेरजवाड्यास द्याव्या. मेवाडच्या मुलीपासून झालेल्या मुलास गादीच्या हक्कात प्राधान्य द्यावे. माधोसिंग धाकटे असले तरी ते मेवाडच्या राजकन्येचे पुत्र होते. ईश्वरसिंगानी जयपूरची गादी बळकावल्यानंतर मेवाडचे राणा जगतसिंग ह्यानी माधोसिंगास ईश्वरसिंगाच्या विरुद्ध मदत करण्याचे ठरविले. पण ईश्वरसिंगानी लढाई होऊ नये म्हणून राणा झाल्यावर मेवाडचे राणा जगत्सिंग ह्यांजबरोबर तह करून माधोसिंगास चोवीस लाख रुपयाची जहागीर देण्याचे कबूल केले. परंतु माधोसिंगास जयपूरचे राज्य पाहिजे होते, तेव्हा त्यानी जगत्सिंगाचे मदतीने ईश्वरसिंगाबरोबर

१. पे. द. २१, ले. ८.
२. पे. द. २१, ले. १०.
३. पे द. २१, ले. १४.

लढाई करून राज्य प्राप्त करून घेण्याचा बेत केला. जगतसिंग माधोसिंगास बरोबर घेऊन जयपुरावर चालून आले. ईश्वरसिंगानी शिंदे, होळकरांची मदत मिळवून इ. स. १७४५ मध्ये माधोसिंगाचा पराभव केला. जगतसिंगाच्या सैन्यावर मध्यरात्री अचानक छापा घालून मेवाडचे सैन्य पळवून लाविले. तेव्हा महाराण्यानी बावीस लाख रुपये देण्याचे आश्वासन देऊन आपली सुटका करून घेतली. ह्या युद्धात माधोसिंगाचा मोड झाल्यामुळे ईश्वरसिंगानी माधोसिंगास प्रारंभी जहागिरी देण्याचे जे आश्वासन दिले होते ते पाळण्याचे नाकारले. तेव्हा माधोसिंगानी आपले वकील पेशव्यांकडून मदत मिळविण्यासाठी पुण्यास पाठविले. पेशव्यांनी रामचंद्र बाबा यास लिहिले की, माधोसिंगाचा पक्ष होळकरांनी धरिला म्हणून तुम्ही ईश्वरसिंगाचा पक्ष धरू नये. "तुमची त्यांची (मल्हारबांची) ऐक्यता चालणार नाही. द्वैत दाखवितील. हिंदुस्तानात दुर्लौकिक होऊन कार्यनाश होऊ शकतो. दुसरे पंधरा लाख रामाजी देणार. असे असता दुराग्रह केलिया उत्तम दिसत नाही. सबब सरदारांनी पेशव्यांचे आज्ञेप्रमाणे माधोसिंगास टोंक, तोडा, मालपुरा व नेवाई हे चार परगणे नेमून द्यावे असा तह केला.'[1] हा ठराव पेशव्यांचे मर्जीप्रमाणे केला.[2] ही बातमी ईश्वरसिंगास कळताच त्यानी नवी फौज उभारली व मराठे सरदारांच्या ठरावाप्रमाणे माधोसिंगास जहागिर न देता लढाई द्यावी असे ठरविले. ईश्वरसिंगानी मराठ्यांचा जो वकील होता त्यास उत्तर दिले की, "आम्ही राजेलोक जे वंशपरंपरेने चालत आले असेल तेच केले पाहिजे. हा भूमीचा कजिया आहे. अधिक द्या म्हटल्यास विनायुद्ध कसे अनुकूल पडते? सर्व राज्यात कनिष्ठास (धाकटा बंधु माधोसिंग यास) विभाग देऊन आपली अंगी नामर्दी कशी घेववते? राज्य ईश्वराचे देणे आहे. ज्यास ईश्वर देईल तोच घेईल. परंतु (मराठ्यांनी) पगडी बदलली." पुढे ईश्वरसिंगानी माधोसिंग व मराठे यांच्या फौजेबरोबर राजमहाल येथे लढाई केली. त्यात ईश्वरसिंग विजयी होऊन ते सन १७४७ च्या एप्रिलमध्ये राजधानीस परतले. माधोसिंगाची बाजी मल्हारजी होळकर यांनी उचलून धरली. ईश्वरसिंगास शिंद्याचा पाठिंबा राहिला. अशा रीतीने शिंदे-होळकरांमध्ये तेढ निर्माण झाली. आपसात काडीमात्र तेढ नसावी म्हणून नानासाहेब पेशवे स्वतः तारीख १० डिसेंबर १७४७ रोजी उत्तरेत जाण्यासाठी पुण्याहून निघाले. सन १७४८ च्या एप्रिल महात पेशवे जयपूर मुलुखात आले. त्यास माधोसिंग सामोरे जाऊन भेटले ही भेट नेवाईस झाली. म्हणून पेशव्यांच्या ह्या स्वारीस नेवाईची स्वारी असे म्हणतात.

सन १७४७ हे वर्ष इतिहासात अनेक घटनांनी स्मरणीय झाले आहे. ह्या वर्षी परशियाचा बादशहा नादिरशहास त्याचा सेनानी अहमदशहा अबदाली ह्याने ठार मारिले व राज्य बळकाविले. अबदालीने नादिरशहाने जी खंडणी हिंदुस्तानच्या बादशहाकडून वसूल केली होती तिची मागणी केली आणि ती

१. पे द. २, ले. ३.
२. पे द. २, ले. १.

न मिळाल्यास स्वारीचा धाक घातला. अबदालीच्या ह्या धमकीने मोगल बादशहा गडबडून गेला. त्याने शाहू महाराजास पेशव्यांची मदत पाठविण्यास सांगितले. शाहू महाराजांच्या आज्ञेवरून पेशवे बाळाजी बाजीराव अबदाली बरोबर सामना देण्यासाठी दिल्लीस तारीख १० डिसेंबर १७४७ रोजी जाण्यास निघाले. पण दिल्लीस पोचण्यापूर्वीच बादशहाच्या फौजेशी अबदालीच्या फौजेची मानपूर येथें गाठ पडून बादशाही फौजेचा पराभव तारीख ३ मार्च १७४८ रोजी झाला. परंतु तदनंतर पेशवे दिल्लीस फौजेसह पोहचले आणि बादशहास भेटावयास गेले. तेव्हा बादशहाने त्यास मोठ्या गौरवाने आणि इतमामाने वागविले.

माधोसिंगाचे आणि ईश्वरसिंगाचे वैमनस्य वाढतच होते. ईश्वरसिंग बादशहाच्या सांगण्यावरून मोगलांच्या फौजेबरोबर अबदालीशी लढाई देण्यास गेले आणि लढाईच्या मध्यभागी जीव घेऊन जयपुरास पळाले. त्यामुळे त्यांची नाचक्की झाली. पेशवे दिल्लीहून मोठी फौज बरोबर घेऊन जयपूरच्या रोखे निघाले आणि वर सांगितल्याप्रमाणे त्यांची व माधोसिंगाची भेट झाली. पेशव्यानी ईश्वरसिंगाकडून पन्नास लाख रु. खंडणी मागितली. शिवाय ईश्वरसिंगानी मुलखाच्या दोन सारख्या वाटण्या कराव्यात अशी मागणी केली. परंतु तह झाला नाही. तेव्हा लढाईस सुरवात झाली. माधोसिंगासाठी टोंक तोडा, मालपुरा व बारवाडा हे परगणे मिळवावे असे मराठ्यांनी ठरविले. मल्हाररावानी ईश्वरसिंगास वरील परगणे माधोसिंगास देण्यास भाग पाडले.[१] पेशव्यांस तीन लाख रुपये नजर देण्यात आले आणि पेशवे ह्या नेवाईच्या स्वारीहून पुण्यास तारीख ९ जुलै रोजी परत आले.

उत्तरेत मोगल बादशहा अहमदशहा शेवटचे क्षण मोजित होता. ह्याच फायदा घेऊन पठाण सरदार मोगल साम्राज्याचे लचके तोडण्यास सिद्ध झाले होते. वझीर सफदरजंगाचे अंगात मोगल साम्राज्याचे तारू सावरून धरण्याची शक्तिही नव्हती व युक्तीही नव्हती. दक्षिणेत शाहू महाराज आसन्नमरण स्थितीत होते.

शेवटी स. १७४९ मध्ये ह्या दोन्ही राजपुरुषांचे मृत्यू झाले. शाहू महाराज डिसेंबर १७४९ मध्ये मृत्यू पावल्यामुळे मराठ्यांचे शिंदे, होळकर, पवार वगैरे उत्तरेतील सरदार फौजेसह दक्षिणेत आले. या कारणामुळे मराठे फौज एक वर्ष उत्तर प्रांतात गेली नाही. त्याचा परिणाम असा झाला की, कित्येक रजपूत राजे, मोगल व जमीनदार मराठ्यांवर उलटले. तेव्हा त्यांचा बंदोबस्त करणे मराठ्यास जरूर होते. उत्तरेत नवीन बादशहा अहमदशाह ह्याजबरोबर वझीर सफदरजंग आपला जम बसविण्यास पहात होता. ईश्वरसिंगाकडे मराठ्यांचा वकील होता. त्याने ईश्वरसिंगाकडे मागे कबूल केल्याप्रमाणे राहिलेले पैसे मागितले. ते तो देण्यास तयार होईना. हे कळल्यावरून

---

१. मल्हारराव होळकराने ईश्वरसिंगावर चालून जाऊन त्यास १०-८-१७४८ रोजी तह करण्यास भाग पाडले. रा. खं. ६, ले. १९०, १९१, ५८१.

पेशव्यानी ह्या कामगिरीवर जयाप्पा शिंदे व मल्हारबा होळकर ह्यांची स. १७५० च्या पावसाळ्यात रवानगी केली. ईश्वरसिंगाने चित्तात कपट आणून आपला दिवाण केशोराय यास विषप्रयोग करून सन १७५० च्या ऑगस्ट महिन्यात ठार मारिले होते.

मराठ्यांनी तारीख १८ नोव्हेंबर १७५० रोजी नेणवे घेऊन जयपुराकडे कूच केल. हे वर्तमान ईश्वरसिंगास समजताच त्यानी आपल्या दोघा कारभाऱ्यास सांगितले की, मल्हाररावापाशी जाऊन, गोष्टी करणे आणि चार पांच लाख रुपये मागतील तर देऊन वाटेस लावणे. मल्हाररावानी लिहून पाठविले होते की, "दिवाण केशवदासास मारिले. त्याचा सूड आपणास घेणे आहे". तेंव्हा ईश्वरसिंग यांचे कारभारी म्हणाले की, "आम्ही एकंदर जाणार नाही. आम्हास मल्हारराव मारील." त्यावर ईश्वरसिंग गप्प राहिले. पुढे मल्हारराव मजलीने जयपुरापासून दहा कोसावर येऊन थडकले, तेव्हा ईश्वरसिंगानी खिजमतगारास सांगितले की, "काला नाग जिवंत आणणे. व सोमलखार घेऊन येणे. औषध करणे आहे". खिजमतगाराने ते आणून दिले. दोन प्रहर रात्रीस ईश्वरसिंग राजे यानी जहर घेतले. नाग अंगास डसविले. पहाटे ईश्वरसिंगराजे यांचा प्राण गेला. जयपुरात ही बातमी कळल्यावर सर्वत्र हाहाःकार झाला. मराठ्यास हे वृत्त समजल्यावर त्यांनी ईश्वरसिंगास अग्नी देण्याची व्यवस्था केली आणि त्याचा धाकटा भाऊ माधोसिंग ह्यास जयपुरात आणून तक्तावर तारीख २९ नोव्हेंबर १७५० रोजी बसविले. जयाप्पा शिंदे तारीख ६ जानेवारी १७५१ रोजी जयपुरास येऊन होळकरास मिळाले. माधोसिंगानीं मराठ्यांस जयपुरच्या राज्याचा तिसरा हिस्सा निदान चौथा हिस्सा तरी द्यावा हे अगोदर ठरले होते. त्याप्रमाणे मराठ्यांनी माधोसिंगापाशी मागणी केली. मराठ्यांच्या ह्या मागणीस राजा माधोसिंगानी विरोध करावा म्हणून रजपूत मांडलिक व शेखावत रजपूत वीर माधोसिंगाभोवती जमा झाले.[१] माधोसिंगास ह्यामुळे मराठ्यांचा नक्षा उतरविण्यास नवीनच जोम चढला. त्यास कपट आठवले. मराठ्यास सोमलखार मिश्रीत पक्वान्ने करून पिण्याच्या पाण्यात विष घालून जेवणास बोलावून मारावे असा बेत केला. परंतु जयाप्पानी जेवणास जाण्याचे नाकारिले. त्यामुळे मराठे सरदार वाचले. पुढे तारीख १० जानेवारी १७५१ रोजी सुमारे पांच हजार मराठे जयपूर शहर पहाण्यास बोलाविल्यावरून गेले. त्यात शिंद्यांकडील मातबर सरदार बरेच होते. शहरांत मराठे आल्यावर माधोसिंगाच्या हुकूमाने शहरचे दरवाजे बंद करण्यात आले. आणि मराठ्यांच्या कत्तलीस सुरवात झाली. दोन प्रहरपासून प्रहर रात्रीपर्यंत तीन हजार मराठे लोक कापून काढिले. एक हजार मराठे जखमी झाले. जयाप्पा शिंदे यांजकडील मातबर सरदार वगैरे फार मारले गेले. जे मराठे गांव कुसावरून उड्या घालून आले त्यांचे पाय व कमर मोडली असे वर्तमान झाले.[२]

१. पे. द. २७, ले. ६४, ६५.
२. पे. द. २, ले. २९, ३१.

पुढे दोन दिवसांनी तारीख १२ जानेवारी १७५१ रोजी मराठ्यांनी जयपूरजवळ आठ मैल अंतरावर तळ दिला. माधोसिंगानी लढाई टाळण्यासाठी आपले वकील तारीख १९ जानेवारीला मराठ्यांकडे पाठवून झालेल्या प्रकरात आपले अंग नसून हे सर्व आकस्मिक घडून आले असे सांगितले व तह करण्याची तयारी दर्शविली.[१] त्याप्रमाणे माधोसिंगाशी मराठ्यांचा तह झाला. त्याच्या अटी येणेप्रमाणें :—

(१) शहरात पकडलेले सर्व घोडे मराठ्यांना परत करणे;

(२) मराठ्यांच्या लुटलेल्या मालमत्तेची परतफेड करून भरपाई करणे;

(३) पूर्वी ठरलेल्या खंडणीबद्दल मराठ्यांना सावकारी हुंड्या देणे.

मराठ्यांनी जयपूर शहरावर हल्ला करून ते धुळीस मिळविले असतें पण इतक्यात अयोध्येच्या नबाबाचा वकील राजा रामनारायण हा बंगश रोहिल्या-विरुद्ध आपल्या मालकास मदत करावी म्हणून बोलणे करण्यास मराठ्यांपाशी आला.[२] बंगशांचा पराभव झाल्यावर सफदरजंगाने मराठ्यांना ह्या कामगिरीबद्दल पन्नास लाख रुपये द्यावे असा करार केला होता. परंतु माधोसिंगाने गोड बोलून मराठ्यांना खंडणीचा पैका आज देतो, उद्या देतो अशी थाप देऊन रक्कम देणे काही दिवस लांबणीवर टाकिले. ह्यामुळे मराठ्यांना सुमारे तीन आठवडे जयपूरचा मुलूख सोडता आला नाही. पुढे तारीख ७ फेब्रुवारीस (१७५१) मराठ्यांनी सफदरजंगाचे मदतीस जाण्याकरिता आग्र्याकडे कूच केले.[३]

**पवाराची समजूत काढिली :**

पेशवे नेवाईहून दक्षिणेत परत येताना धार येथे थांबले आणि धारचे ठाण यशवंतराव पवारांकडे सांगितले. त्याचबरोबर मांडवगड आणि त्याला लागून असलेले सोनगड ह्या जागाही पवारांच्या स्वाधीन केल्या.[४] तेव्हापासून यशवंतराव पवार पेशव्यांशीं एकनिष्ठ राहून पानिपतावर इ. स. १७६१ त निधन पावले.

पेशवे बादशहाचे भेटीस गेले असता निजाम बेचैन झाला होता. धास्तीत होता.[५] वृद्धापकाळ जवळ आलेला होताच. पेशवे उत्तरेत असताच निजाम तारीख २१ मे १७४८ रोजी मरण पावला.

• • •

१. राज खं. ३, ले. १६३; पे. द. २, ले. ४०.

२. पे. द. २१, ले. ३८-४०.

३. पे. द. २७, ले. ६४, ६५.

४. पे. द. १, ७२, ७५; रा. खं. ६, ले. १४१.

५. पे. द. २५, ले. ७५, २८, ४३, ५१.

## शाहू महाराजांची अखेर व पुढील व्यवस्था

### कालसूची

| | |
|---|---|
| १६८९, नोव्हेंबर ३ . . | रायगड मोगल बादशहाच्या ताब्यात. |
| १७०७, फेब्रुवारी २० . | औरंगजेब बादशहा पैगंबरवासी. |
| १७०८ . . . . . | शाहू महाराजांचे राज्यारोहण. |
| १७४० . . . . . | शाहू महाराजांच्या विरुबाई नावाच्या दासीचा मृत्यू. |
| १७४० . . . . . | नानासाहेब पेशवे व चिमाजी अप्पा कोल्हापूरकर संभाजीची भेट घेतात. |
| १७४५, फेब्रुवारी १७ . | रामराजांची पानगाबी बहिणीकडे रवानगी. |
| १७४५ . . . . . | रामराजांचे वास्तव्य बावडा येथे. |
| १७४६, नोव्हेंबर २५ . | श्रीपत प्रतिनिधीचा मृत्यू. |
| १७४८ . . . . . | शाहू महाराजांची प्रिय पत्नी सगुणाबाई हिचा मृत्यू. |
| १७४९, डिसेंबर १५ . . | शाहू महाराजांचा रंगमहालात मृत्यू. |
| १७५०, जानेवारी ४ . . | रामराजाचे राज्यारोहण. |
| १७५०, डिसेंबर २५ . . | सांगोल्याचा तह. |
| १७५१, एप्रिल २४ . . | पेशवे निजामाचे प्रकरण संपवून साताऱ्यास येतात. |
| १७५१, एप्रिल ३० . . | दमाजी गायकवाड यास पेशवे कैद करतात. |
| १७५१, मे १२ . . . | दमाजी गायकवाड व दाभाडे मंडळीस कैदी म्हणून पुण्यास आणले. |
| १७५१ . . . . . | दमाजी गायकवाड ताराबाईच्या पक्षाला मिळतात. |
| १७५२, मार्च ३० . . | पेशवे दमाजी गायकवाड यांचा करार. |
| १७५२, जानेवारी ३. . | पेशवे प्रतिनिधीच्या ताब्यातील विशाळगडास वेढा घालतात. |

# ९

## शाहू महाराजांची अखेर व पुढील व्यवस्था

शाहू महाराज निपुत्रिक होते. त्यांचा एक तीन वर्षाचा मुलगा वारला. शाहू महाराजांच्या राण्यामध्ये कजागपणा सुरू होऊन भांडणे व्हायला लागली. उतार वयात त्यामुळे त्यांना उदासीनता येऊ लागली. त्यामुळे राज्यास धनी कोण व्हावा यासंबंधी कारस्थाने सुरू झाली. पण ह्या कारस्थानात स्वत: महाराज भाग घेईनात. महाराज काय ठरवितात ह्याकडे सर्वांचे डोळे लागले होते. महाराज दिवसेंदिवस उदासीन होऊन शेवटी विरक्त झाले. त्यांनी वानप्रस्थाश्रम स्वीकारला आणि मरण समयी सबंध राज्याची धुरा पेशव्यांवर टाकिली हे कसे घडले ते पहावयाचे असल्यास आपणास शाहू महाराजांच्या जीवनाचा धावता आढावा घेणे इष्ट होय.

रायगड किल्ला बादशहाचे हवाली तारीख ३ नोव्हेंबर १६८९ रोजी झाला. त्यावेळी शाहू महाराज सात वर्षाचे होते. ते व त्यांच्या मातुश्री औरंगजेब बादशहाच्या कैदेत गेले. त्यांचे कैदेतील जीवन सुखकारक होण्याची व्यवस्था औरंगजेब कन्या बेगम झेबुन्निसा हिने केली असे म्हणतात. इ. स. १७०७ च्या फेब्रुवारीत औरंगजेब बादशहा पैगंबरवासी झाल्यावर त्याचा दुसरा मुलगा अजमशहा ह्याने स्वत:स बादशहा म्हणून जाहिर करून दिल्लीस प्रयाण केले. बरोबर शाहू राजे व त्यांची आई येसूबाई ही कैदी म्हणून होती. नर्मदा पार झाल्यावर अजमशहाने विचार केला की, मराठ्यांना आपसात भांडत ठेविले तर आपणास हा गादीचा वारसा तंटा सोडविण्यास स्वास्थ्य मिळेल. ह्या त्याच्या विचारास झुलफिकारखान आदि सेनानींनी पुष्टी दिली म्हणून बादशहाने शाहू राजास स्वराज्याच्या सनदा देण्याचे कबूल करून त्यास कैदेतून सोडून दिले. दक्षिणेत आल्यावर शाहू राजास काही वर्षे राणी ताराबाईशी गादीच्या प्राप्तीकरता झगडावे लागले. आपला जम बसण्यास ७-८ वर्षे खपावे लागले. पण तदनंतरच्या काळात त्यास एकाहून एक पराक्रमी असे पेशवे मिळाल्यामुळे शाहू महाराजांचें बहुतेक जीवन ऐषारामांत गेले. इ. स. १७४० पर्यंतचा शाहू महाराजांचा काळ मोठ्या सुखात गेला. पण पुढे जसे जसे त्यांचे उतारवय होऊं लागले तशी दु:खमालिकाही त्यांच्या मागे लागली. इ. स. १७४० त विरूबाई नांवाची त्यांची दासी मरण पावली. ह्या गोष्टीचे त्यांना फार दु:ख झाले. त्याचा थोडासा विसर पडतो आहे तो त्यांचा नवससायासानें झालेला पुत्र सुमारें तीन वर्षाचा होऊन मरण पावला, त्यामुळे पुन्हा त्यांचे मन उदास झाले. शाहू महाराजास दोन बायका होत्या. थोरल्या सकवारबाई

व धाकट्या सगुणाबाई. सकवारबाई मोठ्या तापट असून महत्वाकांक्षी होत्या. ह्या राणीपासून त्यांना फार त्रास होत असे. सगुणाबाई मात्र त्यांच्या मर्जीप्रमाणे वागत असे. त्यामुळे त्यांची तिच्यावर विशेष प्रीती होती. मदारी नांवाचा श्री शाहू महाराजांचा एक आवडता हत्ती होता. तो सर्वकाळ मस्तीत असूनही कोणास इजा करीत नसे. ते दौलतीत रत्नच होते. तो हत्ती रात्रीस सुटून बाहेर जाऊन शनवारात विहीर होती तीत पडून मयत झाला. ह्याच सुमारास महाराजांच्या लोभातला श्रीपतराव प्रतिनिधि तारीख २५ नोव्हेंबर १७४६ रोजी मरण पावला. त्यावर शाहू महाराज म्हणाले, "श्रीपतराव प्रतिनिधि व मदारी हत्ती आपले राज्यातील रत्ने गेली. आपलीही आता इहलोकची यात्रा संपली."[१] सन १७४८ त त्यांची प्रिय पत्नी सगुणाबाई निवर्तल्या. तेव्हा तर शाहू महाराजास दु:ख होऊन त्यांना थोडा भ्रमही झाला. त्यामुळे त्यांना साताऱ्यास राहाण्याचा कंटाळा येऊ लागला. म्हणून ते वनवासवाडी येथे वास्तव्य करण्यास गेले. हे स्थळ सातारा व संगम ह्यांच्या दरम्यान आहे. पुढे त्यांची शक्ति क्षीण होत गेली तस तसा त्यांचा भ्रम नाहीसा होत चालला. परंतु अशक्तपणा फार आला. तेव्हा पुन्हा त्यांना रंगमहालचे वाडचात त्यांची थोरली राणी सकवारबाई यांनी आणून ठेविले. तेथे आल्यावर दत्तकासंबंधीचा विचार जोराने चालू झाला.

**दत्तकासंबंधीचा विचार :**

शाहू महाराजांनी शेवटच्या चार वर्षांत दत्तकासंबंधीची चर्चा सर्व संबंधीत सरदारांबरोबर व नातेवाईकांबरोबर केली. त्यावेळी राज्यव्यवस्थेसंबंधी मुख्यत: खालील सूचना पुढे आलेल्या होत्या :—

(१) छत्रपति संभाजी महाराजास कोल्हापुराहून साताऱ्यास आणून राज्यपदावर बसविणे.

(२) विठोजी किंवा शरीफजी यांचे वंशातील भोसले किंवा तत्संबंधी दुसरा लायक इसम दत्तक घेणे.

(३) सकवारबाईनी आपल्या मर्जीप्रमाणे मुलगा दत्तक घेऊन राज्य चालविणे.

(४) रामराजा गुप्त होते त्यांना राज्यावर आणवून कारभार चालविणें.

पहिली योजना पेशवे बाळाजी बाजीराव यांची होती. इ. स. १७४० मध्ये नानासाहेब पेशव्यानी व चिमाजी अप्पानी कोल्हापूरच्या संभाजी राजांची भेट घेतली व शाहू महाराजांच्या पश्चात संभाजी राजांनी गादीवर बसावे असा बारा कलमांचा गुप्त करार त्यांचेशी केला.[२] पण संभाजी राजानी

१. टिपणीस थो. शाहू महाराजांचे चरित्र, पृ. ९६.

२. का. सं. प. या., ले २४६, २४९; ना. रो. १, १९३; शा. रो. १७८.

आपल्या पश्चात साताराच्या गादीवर बसणे शाहू महाराजास पसंत नव्हते म्हणून त्यानी "कोल्हापुरचे करू नये" अशी स्पष्ट लेखी आज्ञा केली. तेव्हा पेशवा व त्याचे पक्षकार ह्यांनी संभाजी राजास साताराच्या गादीवर आणण्याचा विचार सोडून दिला.

शाहू महाराजांची प्रकृती बिघडत चालली तेव्हा दत्तक कोण घ्यावयाचा, राज्याची व्यवस्था काय करावयाची, याचा निर्णय महाराजांचे तोंडून ऐकून घ्यावा या उद्देशाने पेशव्यानी गोविंदराव चिटणिसांकडून प्रश्न काढला, त्यावेळी महाराज म्हणाले, "पुत्र व्हावयाचा असता तर तसाच पुण्यवान झाला असता, किंवा जो झाला तो तरी कां न वाचावा? तेव्हा पुत्रसुख पहाण्याचे आमचे नशीबी नाही असेच म्हटले पाहिजे. दत्तक पुत्र घेतलाच पाहिजे तेव्हा खानवटे, मुंगी, शिंगणापूर, हिंगणी या सर्व ठिकाणी बाबाजी महाराजांचा वंशविस्तार आहे. तेव्हा त्यापैकी जो राजचिन्हांनी योग्य असेल त्याला दत्तक घ्यावे असे आम्हास वाटते."

दत्तक घेतला तरी राज्याची जोखीम कोणाचे तरी शिरावर ठेविल्याशिवाय राज्याचा बंदोबस्त योग्य प्रकारे व्हावयाचा नाही हे जाणून शाहू महाराजांनी गोविंदराव चिटणिसांकडून सर्व अष्टप्रधान मुत्सद्यांचे घरोघरी जाऊन राज्याची जोखीम अंगावर घेण्यास कोण तयार आहेत याचा शोध करण्यास सांगितले. तेव्हा प्रतिनिधि, सेनापति, सरलष्कर, अक्कलकोटकर, बिंबाजी भोसले, रघुजी व मुधोजी भोसले इत्यादींचे घरोघरी गोविंदराव जातीने एकटे जाऊन प्रहर प्रहर बसून महाराजांची आज्ञा कळविली, की, राज्य चालविण्याचा हिय्या कोणाचा आहे? परंतु त्यावर कोणीही राज्याची जबाबदारी संभाळण्यास कबूल झाले नाहीत.

दत्तकासंबंधाने पुष्कळ वाटाघाटी होत आहेत, हे राणी ताराबाई यावेळी साताराच्या किल्ल्यावर होत्या त्यांना कळताच त्यांनी शाहू महाराजांना येऊन सांगितले की, "जे तुम्ही दत्तक मुलगा घेण्याचा निश्चय केला, त्यास आपला वंश प्रत्यक्ष असता परकी कां घ्यावा ? शिवाजी माझा पुत्र त्याचे पोटी पुत्र जाहला. ते मूल वारले असा बहाणा करून किल्ले खाली घालवून दिला. तो मूल थोर जहाला आहे, तो तुमचा आणावा, दुसरा घेऊ नये. सांप्रत मूल कृष्णाबाई जवळ पानगांवी आहे. आणि त्यावेळचे बाजीराव अमात्य आहेत. त्यास विचारावे." त्यावर बाजीराव अमात्यास साताऱ्यास बोलावून घेतले. यशवंतराव पोतनीस व गोविंदराव चिटणीस ह्यांना खातरजमा करण्यास सांगितले. मूल खरा अशी खातरजमा झाली. "आमचे मागे या मुलास धनी करून त्यांचे आज्ञेत चालून राज्य रक्षावे," अशी शाहू महाराजांची आज्ञा झाली.

हे वर्तमान सकवारबाईंना समजल्यावर तिला फार राग आला व ती निराळी राजकारणे करू लागली. कोल्हापुरच्या संभाजी राजास बोलावणे पाठविले. रघुजी भोसलेस फौजेसह यावे म्हणून पत्र पाठविले. सेनापति व गायकवाड

ह्यांना पत्रे पाठविली. गोविंदराव चिटणिसास मारण्याचा घाट घातला, त्यात खिजमतगाराची आहुति पडली. त्यांचे मनात आपले इच्छेप्रमाणे पाहिजे तो मुलगा दत्तक घेऊन राज्यकारभार आपण करावा असे होते. ह्या कलहात सकवारबाईचा पक्ष कोणीही सरदाराने धरला नाही. "पेशवे व चिटणीस यांना हाताशी धरून तू वाग. त्यात तुझे कल्याण आहे," असे शाहू महाराजांनी सकवारबाईंना परोपरीने सांगितले. पण सकवारबाईंनी ऐकिले नाही. त्या राजकारण करतच राहिल्या. तेव्हा शाहू महाराजास असे वाटू लागले की, रामराजास आपल्या देखत आणल्यास राजधानीत युद्धप्रसंग माजेल म्हणून चिटणीस व पेशवे यांचे सल्ल्याने रामराजास आणण्याचे तहकूब केले.[1]

काही दिवसानी चिटणीस-पेशव्यांनी शाहू महाराजाजवळ सकवारबाई नाहीत अशी संधी साधून सकवारबाईंची सर्व कारस्थानें महाराजांचे कानावर घातली, व त्यांचा विचार घेतला. तेव्हा महाराजांनी या विश्वासातील मंडळींच्या सहाय्याने रामराजास तूर्त न आणता आपले पश्चात् आणावा असे ठरविले, आणि या आज्ञेस लेखी आधार असावा, म्हणून खाली दिलेल्या दोन स्वहस्ताच्या याद्या मृत्यूपूर्वी काही दिवस लिहून पेशव्यास दिल्या. पेशव्यांनी त्या शाहू महाराजांच्या अखेरपर्यंत गुप्तच ठेविल्या होत्या.

त्या महत्त्वाच्या याद्या अशा :—

**यादी क्रमांक १**

ओळ
१ श्री
२ राजमान रा बाळाजी प्रधान
३ पंडित यास आज्ञा तुम्ही फौ—
४ .ज धरनें सर्वास आज्ञा केली
५ त्याच्या दैव नाही महारा—
६ जांस दुखने जाले नाही बरे होत
७ नाही राजभार चालला पाहिजे
८ तर पुढें वंश बसवने कोलापुर—
९ चे न करने चिटणीसास सर—
१० व सांगितले तसे करनें वस
११ होईल त्याच्या आज्ञे—
१२ त चालून राजमडल चालव—

१. राजवाडे खं. ८, ले. १८३.

२. सरदेसाई, म. रि. बाळाजीराव, भा. १, पृ. १७३.

१३ ने चिटनीस स्वामीचे इस—
१४ वासू त्याच्या तुमच्या
१५ विचारे राज राखने वस होई—
१६ ल तो तुमची घालमल करनार नाई
१७ सुदन आसा—

**यादी क्रमांक २**

ओळ
१ श्री
२ राजमान राा बालाजी पंडित प्रधान
३ आज्ञा जे राजभार तुमी चालवा—
४ ल हा भरवसा स्वामीस आहे पहि—
५ ले सांगितले खातरजमा ती चिटनी—
६ सानी आढल केली तुमचे मसतकी
७ हत टविला आहे वंस होईल तो
८ तुमच प्रधान पद चालवील करी
९ ल आतर तास (स) फत आसे त्याचे
१० आज्ञेत चालून सेवा करने राज
११ राखने बहुत काय लिहिने सुदन
१२ आसा—

या दोन याद्यांनुसार पेशवे बाळाजी बाजीराव यास आपल्या मागून मराठी राज्य चालविण्याचा अधिकार शाहू महाराजांनी दिला. वरील यादींचा सारांश असा की, पेशव्यास शाहू महाराजांनी जवळ बोलाविले, त्यांच्या डोकीवर हात ठेविला आणि सांगितले, "आमच्या मागे दत्तक घेऊन वंश पुढे चालवा. सातारच्या गादीचा योग्य मान ठेवून सर्व राज्यकारभार तू पहा." आपला अंतकाळ जवळ आला हे जाणून महाराज शेवटची निरवानिरव करीत होते. त्यांनी पेशवे याजवर प्रसन्न होऊन आपल्या पैजारा व निशाणे व आपली शिक्का कटचार पेशवे ह्यांचे स्वाधीन करून सर्व सरदार मानकरी याशी हुकूम झाला की, "पेशवे यांचे हुकूमात सर्वांनी चालावे, कोणी फितवा केल्यास त्यांचे पारिपत्य पेशवे करतील." याच वेळी "पूर्वीपासून ज्यांचे जे हक्क चालत आले आहेत ते जसेच्या तसे त्यांच्याकडे मी चालवीन," असे बाळाजी बाजीरावाकडून महाराजांनी लिहून घेतले आणि त्या संबंधाने त्याच्याकडून शपथही घेतली. याप्रमाणे झाल्यावर सातारा शहरात रंगमहालचे वाड्यात त्यांनी तारीख १५ डिसेंबर १७४९ रोजी प्राण सोडला. सर्व जनास दुःख जहाले 'शाहू राजांसारखा दयावंत प्रभु दुसरा जाला नाही. सर्वत्रास पुत्र-मित्र-अरी

एकरूप व्यवस्थेने वागवावयाचे, आजानुबाहु, अजातशत्रु–कोणास गैर भाषण केल नाही.' असा पुण्य श्लोक राजा निधन पावला तेव्हा सर्वत्र एकच हाहाःकार झाला. ह्यावेळी पेशव्याने आपल्या फौजेच्या सहाय्याने सर्व शहराची नाकेबंदी केली. वाड्याभोवती चौक्या बसवून अठरा कारखान्यांचा बंदोबस्त केला. शाहू महाराजांची राणी सकवारबाई यांचे बंधु शिर्के चांगले थोर माणूस, शहाणे होते. यांना बोलावून आणून सांगितले की, "तुम्ही बाईस समजून सांगून समागमे जाण्याचा विचार ठरवा." त्यावरून शिर्क्यांनी वहिणीची समजूत घातली. राणी सकवारबाई सहगमनास सिद्ध झाल्या. अंत्यविधीसाठी माहुलीस दोन लाख माणसे जमा झाली. अंत्यविधि यथाशास्त्र करणे तो केला. राणी सकवारबाई व दोन नाटकशाळा सती गेल्या. महाराजास पुत्रसंतान नव्हते. म्हणून उत्तरकार्य मालोजी भोसले मुंगीकर याजपासून चालते केले.[1] तेरा दिवस पावेतो उत्तरक्रिया नानासाहेबाने स्वतः रात्रंदिवस खपून पूर्ण भक्तिभावानें यथासांग सिद्धीस नेली.[2]

**योग्यता :**

शाहू महाराज राज्यावर इ. स. १७०८ मध्ये आले त्यावेळी स्वराज्याचा सर्व भाग त्यांचे ताब्यात नव्हता. मोगल व पुंड मराठे सरदार ह्यांनी तो बळकाविलेला होता. तेव्हा राज्यवृद्धीचे धोरण शाहू महाराजांनी आखले. त्यात मोगल तक्त सांभाळून मराठी प्रपंच वाढावा ही इच्छा. ह्या इच्छेच्या पूर्तीसाठी म्हणजेच राज्यविस्तारासाठी गुजरात, गोंडवण, मेवाड, माळवा बुंदेलखंड, कर्नाटक इत्यादि प्रांत काबीज करण्यासाठीं शाहू महाराजांनी पेशवे, भोसले, दाभाडे यास सनदा दिल्या. सर्वांस ममतेने वागवून आपल्या लगामी लाविले. सरदाराने एखादा प्रांत जिंकला म्हणजे तोच त्याच्या फौजेच्या खर्चास सरंजाम म्हणून नेमून द्यावा, आणि हुजूर खर्चाकरिता काही नियमीत रक्कम त्याजपासून घेत जावी, असा शाहू महाराजांनी प्रथमपासून प्रघात ठेविला होता. ह्यामुळे सरदारास उत्तेजन मिळून त्यांनी लांब लांबच्या मुलूखगिऱ्या करून राज्य मिळविल. ह्या राज्यातील रयतेच्या अबादानीकडे लक्ष ठेविले, ओसाड प्रदेशात वस्ती करविल्या, धामधुमीच्या प्रसंगी रयतेस सवलती दिल्या, नवीन धारेबंदी करून दिली, शाहू महाराजास माणसाची पारख फारच चांगली होती. त्यानी गुणी माणसे हाताशी धरून त्यांना आज्ञेत वागतून त्यांजकडून राज्यवृद्धी करविली. दानधर्म बहुत केले. चांगले काम करून दाखविणारास महाराज इनामे व बक्षीसे खूप देत. ते मोठे उदार होते. मारेकऱ्यांनी हल्ला केला असतां त्यांना "कारभाऱ्यानी पाहिले तर तुम्हास मारतील शस्त्रे देऊन निघून जा कसे," असे सांगून यास वाटेस लाविले. 'याप्रमाणे अजातशत्रु महाराज शत्रूसही घाताची इच्छा होऊ नये.' शाहू महाराज बादशाही छावणीत वाढले तेव्हा साहजीकच

१. मराठीरुमाल, भा. १, पृ. १३४.

२. म. रि. पेशवा बाळाजीराव, भा. १, पृ. १७९.

त्यांना बादशाही थाट करण्याची विशेष आवड होती. ह्याच रीतीने साताऱ्यास सण, उत्सव व मेजवान्यांचा धुमधडाका उडत असे. महाराज असे प्रसंग मुद्दाम घडवून आणीत. अशा ह्या दिगंत कीर्तीच्या मराठ्यांच्या बादशहाच्या नांवाचा शिक्का मरण समयी काशीपासून रामेश्वरापर्यंत चालत होता. दिल्ली तक्त आपल्या ताब्यात घेऊन मोगल बादशहाचे चालवून मराठी सत्ता सर्व हिंदुस्तानभर पसरविणे हे शाहू राजाचे इप्सीत होते. त्यांच्या हयातीत मराठ्यांचे राज्य सर्व हिंदुस्तानभर पसरले पण दिल्लीतख्त पुढे १७८४ च्या नोव्हेंबरात महादजी शिंदे यांनी आपल्या हुकमतीखाली आणून शाहू महाराजांची इच्छा पुरी केली.

शाहू महाराजांनी मृत्यूपूर्वी पेशव्यास स्वदस्तुरीच्या दोन याद्या दिल्या हे वर सांगितले आहेच. या दोन्ही याद्या म्हणजे मराठी दौलतीच्या सूत्र चालकत्वाची शाहू महाराजांनी पेशव्यास करून दिलेली सनद होय.

अंतकाळ येण्यापूर्वी रामराजास आपण दत्तक घ्यावे अशी शाहू महाराजांची फार इच्छा होती. पण त्यांची राणी सकवारबाई यांनी ती सफल होऊ दिली नाही. सकवारबाईच्या मनात आपल्या बहिणीचा मुलगा नागपुरचा मुधोजी भोसले यास शाहू महाराजांनी दत्तक घ्यावे असे होते. शाहू महाराज हे ऐकेनात तेव्हा तिने रामराजास मारेकरी घालून नाहीसे करण्याचा प्रयत्नचालविला. हे सर्व शाहू महाराजांस ठाऊक होते. म्हणून पेशव्यानी आपल्या पश्चात रामराजास आणून गादीवर बसवावे असे शाहू महाराजांनी लिहून ठेविले. शाहू महाराजांबरोबर राणी सकवारबाई सती गेल्यामुळे आता रामराजास कोणाची भीति नव्हती. शाहू महाराजांच्या इच्छेनुसार पेशव्यानी राजारामास साताऱ्यास आणण्याकरिता पानगावी पुरंदरे, खंडेराव चिटणीस यांस पाठवून बरोबर पांच हजार फौज दिली. तेथे जाऊन कृष्णाबाई निवाळकरसुद्धा रामराजे यास वर्ये नजीक सातारा येथे घेऊन आले. पुढे रामराजास ४ जानेवारी १७५० रोजी राज्याभिषेक झाला. मात्र पेशव्यांचे हाती राज्यकारभाराची सर्व सूत्रे राहिली याचे कारण रामराजाच्या पूर्व हकीगतीत सापडते.

**रामराजाची पूर्व हकीगत :**

राणी ताराबाईचे पुत्र शिवाजी यास त्यांची बायको भवानीबाई हिचेपासून रामराजा झाला. शिवाजी राजे देवी येऊन १७२६ च्या २४ मार्चला वारले. त्या नंतर रामराजाचा जन्म पन्हाळा मुक्कामी झाला. त्यावेळी कोल्हापूरच्या गादीवर राणी ताराबाईंची सवत राजसबाई यांचे पुत्र संभाजी राजे हे राज्य करीत होते. त्यानी व त्यांची राणी जिजाबाई यांनी हे मूल मारण्याचा प्रयत्न केला. तेव्हा ताराबाईंनी ह्या मुलाचे प्राण वाचविण्यासाठी एक युक्ति योजिली. एके दिवशी मूल मेल्याचे जाहिर करून या मुलास खाजगी चौकीचा घाशीराम नांवाचा राजपूत होता त्याच्या बायकोच्या स्वाधीन केले. त्याच्या बायकोचे मूल वारले होते. तिचे स्तनीचे दूध या मुलास मिळेल, आबाळ होणार नाही हा विचार केला. चौकीच्या राजपूतास त्याचा हिशेब चुकता करून गांवास

रवाना केल्याचा बहाणा केला. राजपुतानें संभाजी महाराजास आपण उदईक आपल्या गांवास जातो असे कळविले. त्याच रात्री मुलास जास्त अफू दिली त्यामुळें त्याचे चलनवलन राहिले. दोन घटका रात्री मूल वारले म्हणून रडारड होऊन मूल रजपुताच्या बायकोच्या स्वाधीन केले. काकासाहेब भोसले जितीकर हे या कटात सामील होते. त्यांनी मूल पुरावयास जातो म्हणून बरोबर जाऊन खळंगा उरकवून, त्यात भाकर व कोंबडी घालून पुरुन रजपुताचे घरी मूल पोचते करून माघारे आले. दुसरे दिवशी रजपुताची वायको मुलासह बावडयास पंत अमात्यांकडे गेली. तेथें पंत अमात्यांनीं पांच वर्षे मुलाचे संरक्षण केले. हे वृत्त जिजाबाईस कळले. आता चौकशी होणार असे समजताच मुलास खाली कोंकणात रजपुताबरोबर पाठविले. तेथे तो दोन वर्षे होता. नंतर रजपुताची बायको वारली, तेव्हा रजपुताने मुलाची वडिल वहिण कृष्णाबाई (दर्याबाई निंबाळकर) ही पानगांवी होती तिजकडे तारीख १७ फेब्रुवारी १७४५ रोजी या मुलास सुपुर्त केले. इत्यर्थ रामराजाची पहिली एक-दोन वर्षे पन्हाळयावर गेली. नंतर १५-१६ वर्षे बावडयास व सन १७४५ च्या फेब्रुवारीनंतर पानगांवास त्याची रवानगी झाली. तेथे तो अज्ञातवासात वाढला. त्यास मारण्यासाठी प्रथम जिजाबाई नंतर सकवारबाई यांनी प्रयत्त केले. पण त्याचे वास्तव्य अज्ञातवासात असल्यामुळे ते सफळ झाले नाही. जिजाबाईंनी तर त्याला ठार मारण्याची आपल्या परीनें शिकस्त केली. रामराजा बावडयास आहे असे कळताच ती बावडयावर चालोन आली. ते समयी घासीराम परदेशीने व त्याच्या बायकोने त्यास पळवून घाटाखाली नेले यामुळे त्याचा बचाव झाला. ताराबाई मात्र गुप्तपणे माणूस पाटवून त्याचा समाचार घेत असत. त्यास गादीवर आणण्याचा विचार शाहू महाराजांनी १७४५ च्या सुमारास केला असावा. कारण यावर्षीपासून शाहू महाराजांची राणी सकवारबाई या त्यास मारण्याचा प्रयत्न करीत असलेल्या दिसतात. या संबंधीची हकीगत ताराबाईनी भगवंतराव अमात्य यास पाठविलेल्या खालील पत्रावरून लक्षात येते :

"तुम्हाजवळ रामराजे आहेत अशी बातमी सौ. सकवारबाईस समजली आहे. म्हणून शाहूबावा यांनी सूचना केली, त्यास गोविंद खंडेरावाचे व तुमचे बोलणे झाले. ते त्यांनी आम्हास व शाहूबाबास सविस्तर सांगितले. त्यांनी व तुम्ही मनसुबा केला की, चिरंजीवास पानगांवी दर्याबाई निंबाळकर यांचे स्वाधीन करून तुम्ही महायात्रेस जावयाचे निमित्तें निघोन निरोपास म्हणून यावे. तदनंतर जो विचार जाहला आहे तो होईल. तेथे तूर्तकाळी संचार फार जाहला. त्यास हाल्ली भगवंतराव नरहर पाठविले आहेत व पानगांवी चिरंजीवास पाठवितो. वरकड शाहू बाबांनी तुम्हास वचन दऊन पत्रेंही दिल्ही आहेत. याजकरिता बहुत सावधपणे चिरंजीवाची रवानगी करणे."

रामराजा १७४५ पर्यंत बावडा येथे होता. तदनंतर तो पानगांवास गेला हे निश्चित. शाहू महाराजांच्या मनात त्याच त्यास वेळी आणूनच आपल्या

डोळ्यादेखत राज्यावर बसवावा असे होते परंतु सकवारबाई त्यास अपाय करतील सबब तूर्त त्यास आणू नये असा विचार ठरला. रामराजास आपण दत्तक जाणार व मराठी राज्याचे धनी होणार हे कळले तेव्हा तो पानगांवाहून निघून सप्तर्षीस येऊ लागला. शाहू महाराजास हे वर्तमान कळले तेव्हा त्याने येऊ नये हे उत्तम असे सांगितले. शाहू महाराज आजारपणाने अंथरुणास खिळलेले, त्यांच्या शुश्रुषेस शेजारी राणी सकवारबाई सतत बसलेल्या. त्यामुळे महाराजांच्या मनातील विचार त्यास कोणाकडे बोलता येईना. महाराज बरे झाले म्हणजे पुढची व्यवस्था करता येईल असा पोक्त विचार एका पत्रात दिसतो.

पण दुर्दैवाने शाहू महाराज त्या दुखण्यातून बरे झाले नाहीत. महाराज अंथरुणात असतानाच पेशवे व चिटणीस यांनी सकवारबाई महाराजांच्या जवळ नाहीत असे पाहून राजियास सकवारबाईंची सर्व कारस्थाने सांगितली व रामराजास आपले पश्चात आणावा आणि गादीवर बसवावा अशा व्यवस्थेच्या राजियाचे हस्ताक्षराच्या दोन याद्या लिहून घेतल्या हे वर आलेच आहे. या याद्या मृत्यूपर्यंत अगदी गुप्त ठेविल्या. नंतर १५ डिसेंबर १७४९ रोजी शाहू महाराज निधन पावले. आणि त्यांच्या अंतिम इच्छेनुसार ४ जानेवारी १७५० रोजी रामराजाच राज्यारोहण झाले. हा राज्यारोहण समारंभ पेशवे यांनी स्वतःच्या देखरेखीखाली घडवून आणिला. त्याची हकिगत पेशव्यांनी सर्व सरदारास पत्र लिहून जाहिरपणे कळविली ती अशी, "कै. महाराज वर्तमान असता आम्हास बोलावून स्वकीय सार्थकाविशी व सलतनतेच्या बंदोबस्ताविशी कित्येक प्रकारे सांगितले. त्यावरून आगावू पंचवीस-तीस हजार फौज जमा करून सातारा येथे राहिलो. राजश्रींनी परलोक साधन करताच तमाम पुरे जात कारखाने व राजमंदिरी चौक्या ठेवून बंदोबस्त केला. राजश्रींस माहुली संगमी, नेऊन यथोचित सार्थक केले. राजश्री राजाराम साहेब पानगावी होते त्यास आणावयाच्या विचारात कैलासवासी महाराज होते. तेव्हा प्रसंग जाहलियावरी आणावयास फौज पाठविली. छ २६ मोहरमी आले. तमाम राज्यातील सरदार, सरकारकून, अरकानी दौलतानी (दौलतीचे आधारस्तंभ) समस्त लहान थोरी तसलीमात बजाविली. मोठा जुलूस जाहला. उमर बेवीस तेवीस वर्षाची, तारुण्या तेजयुक्त आहेत. तदनुरुप किमपि व्यंग न पडता राज्याचा बंदोबस्त उत्तम रीतीनें जाहाला. उभयता सरदार शिंदे, होळकर माळवा प्रांते रवाना झाले."

अशा रीतीने पेशव्यांनी रामराजास छत्रपति बनविले. पण त्या अगोदरच त्याजवळील सत्ता शाहू महाराजांच्या आज्ञेने काढून घेतली. पुढे रामराजास राज्य यंत्रणेचा भार सहन होईना. त्यांचे अगोदरच जीवन अज्ञातवासात गेल्यामुळे राज्यकारभाराचे शिक्षण त्याना मिळू शकले नाही. गुहेतून येऊन एकदम विशाल अशा मराठी दौलतीचे धनी रामराजे झाले खरे पण त्याबरोबर राज्यधुरा हाकण्याची अक्कल त्यास आली नाही. तेव्हा त्यास दर दिवशीचे अनेक गुतागुतीचे प्रश्न सोडविणे फार जड जाऊ लागले. एका बाजूस सरदारांचे

हेवेदावे तर दुसऱ्या बाजूस बाहेरील शत्रूंचे डावपेच हे समजून निर्णय देणे रामराजास जड जाऊ लागले. ताराबाईंचे म्हणणे रामराजे यांनी आपल्या तंत्राने चालावे असे होते. रामराजास राज्यकारभाराचा अनुभव नसल्यामुळे सर्वांची समजाविसी करून राज्यशकट हाकणे जड जाऊ लागले. पंतप्रधान या नात्यानें नानासाहेब पेशव्यानी छत्रपतीस वारंवार सल्ला देऊन राज्यकारभाराचे धडे द्यावयास हवें होते. पण नानासाहेबास एवढी सवड नव्हती. छत्रपतीची नड पुढील राजकारणात येऊ नये म्हणून पेशव्यांतर्फे सदाशिवराव भाऊ व रामचंद्र बाबा यांनी तोड काढली. प्रतिनिधींच्या ताब्यात सांगोले व मंगळवेढे ही दोन स्थळे होती. ती पेशव्यांनी आपल्याकडे मागितली. प्रतिनिधी ऐकेनात. हा पेच निवारण्याकरिता पेशव्यांनी सदाशिवराव भाऊ, रामराजे व रामचंद्र बाबा यास फौज देऊन सांगोल्यावर रवाना केले. तिथे यमाजी शिवदेव शरण आले. सांगोले ताब्यात घेतले. तदनंतर सदाशिवराव भाऊ व रामचंद्र बाबा यांनी राज्यकारभाराचा बंदोबस्त, पदे, मुलुक, महाल वगैरे छत्रपतींच्या आज्ञेने कायम केला आणि छत्रपतींकडून लिहून घेतले की पेशव्यांनी छत्रपतींच्या नावे मराठी दौलतीचा कारभार करावा व राजास त्याच्या इतमामासाठी छपन्न लाखाचा मुलूख तोडून द्यावा. या करारनाम्यास सांगोल्याचा तह असे म्हणतात (२५ डिसेंबर १७५०). या तहामुळे पेशवे सर्व सत्ताधारी बनले. छत्रपति नामधारी राहीले. पेशवे पुण्यात राहून कारभार करू लागले. रामराजानी राज्यकारभाराच्या सोयीकरिता स्वखुशीने सर्व सत्ता पेशव्यांच्या स्वाधीन करून ते पेशव्यांच्या तंत्राने वागू लागले. हे पाहून ताराबाइस रामराजांच्या या कृत्याची चीड आली. त्यानी रामराजास सिंहगडावर बोलावून कैदेत ठेविले. रामराजे इथून ताराबाईंच्या कैदेतच राहिले. पेशव्यांनी छत्रपतीस सोडविण्याचा प्रयत्न करावा तर छत्रपतींच्या घराण्यातील राजमाता ताराबाई हिला दुखवावे लागते. तिचा अपमान होतो. तो होऊ द्यावयाचा नाही हे एक कारण. दुसरे कारण म्हणजे पेशव्यास रामराजाची छत्रपति म्हणून गरज आता राहिली नव्हती. उलट रामराजे तुरुंगात असले तर राज्यशकट व्यवस्थित चालेल तेव्हा "असेनात बापडे आपल्या आजीच्या कैदेत" हा पोक्त विचार करून नानासाहेब पेशव्यानी राजास ताराबाईंच्या कैदेतून सोडविण्याची फुका खटपट केली नाही.

रामराजानी पेशव्यांचे हाती सत्ता सुपूर्त करताच ताराबाईंनी पेशव्यांचा पाडाव करण्यासाठी अनेक कारस्थाने केली. त्यामुळे त्यास ताराबाई, छत्रपती रामराजा, कोल्हापूरकर छत्रपती संभाजी व दमाजी गायकवाड इत्यादिकांशीं उघड लढाया किंवा गुप्त कारस्थाने करावी लागली आणि या सर्व अंतर्गत संकटातून ते सुरक्षित बाहेर पडले.

ताराबाईंनी रामराजास अटक करून त्यास सिंहगडावर ठेविले व दादोबा व यमाजी शिवदेव यास हाताशी घेऊन किल्ल्यावरून ती कारभार हाकू लागली. पेशव्यांशी झगडा करण्याकरिता त्यांनी (१) दाभाडे व दमाजी यांस भेट देऊन पुणे साताऱ्यावर जरब बसविली, (२) बाबूजी नायकास प्रतिनिधी करून

त्या दोघांचे युद्ध लावून दिले, (३) कोल्हापुरकर संभाजी राजांना पेशव्यांविरुद्ध चिथविले, (४) निजाम व पोर्तुगीज याकडे कारस्थाने चालवून पेशव्यांचा पाडाव करण्याचा व्यूह रचला. पेशवे या सर्व संकटातून आपल्या कर्तबगारीने मुक्त झाले. ताराबाईंचे कारभारी यमाजी यास पकडून पेशव्याने इगतपुरी-जवळच्या कावनई किल्ल्यावर अटकेत ठेविले व ताराबाईशी समेट करण्याचे अन्य प्रयत्न सुरू केले. ताराबाई स्वभावाने रागीट व तामसी होती. आपल्या मनाजोगते घडत नाही असे दिसताच त्यानी रामराजास काढून कोल्हापुरकर संभाजी राजास आणावे असा प्रयत्न सुरू केला. पण संभाजी राजांनी यास चालना दिली नाही. पेशव्यांनी कोल्हापुराकडील बंदोबस्ताकरिता वारणेच्या तीरी तीन हजार फौज ठेऊन दिली.[१]

**दाभाडे-पेशवे झगडा :**

दाभाडे व पेशव्यांचे वैर होते. दाभाडयांचे हस्तक गायकवाड सुद्धा पेशव्यांचा द्वेष करीत होते. कारण शाहू महाराजांच्या पश्चात् छत्रपतींची सत्ता पेशवे गाजवू लागले. गुजरातच्या मिळकतीत आपल्या निम्मे हिश्श्याची पेशव्यांनी दाभाडे-गायकवाडांकडे मागणी केली. दमाजी गायकवाडास हे न खपून ते पेशव्यांविरुद्ध १७५१ मध्य ताराबाइच्या पक्षास मिळाले. त्यांच्या सांगण्यावरून त्यानी पेशव्यांविरुद्ध चढाईस सुरवात केली. दमाजी खानदेशातून थेट पुण्याच्या रोखाने चालून आले. सालपी घाट चढून लांब लांब मजला मारीत ते फौजेसह साताऱ्याला आले. तेथे गेंडा मैदानात पेशव्यांच्या फौजेस त्यानी जेरीस आणले. पेशव्यांची फौज हरली. इतक्यात पेशवे स्वतः निजामाचे प्रकरण संपवून २४ एप्रिल १७५१ रोजी साताऱ्यास पोचले. त्यांचे दमाजीशी तडजोडीचे बोलणे झाले. ऐक्याविषयी परस्पर वचनप्रमाण, इमान भाषा होऊन पेशव्यानी दमाजीशी सुलुख केला.[२] त्यामुळे दमाजी गाफील राहीले. त्यावर अकस्मात् फौज पाठवून दमाजीसह गायकवाड व दाभाडे मंडळीस पेशव्यांनी पकडून कैदेत ठेवले (३० एप्रिल). पेशवे दमाजीकडून गुजरातच्या वसुलाचे हिशेब व वसुलातील आपल्या हिश्श्याची तुंबलेली बाकी मागत होते. दमाजींचे म्हणणे पडले की, "आपण स्वतः स्वतंत्र सरदार नाही सेनापतीचा हस्तक सेवक म्हणून कामगिरी केली. उमाबाई धनी आहेत, त्यांशी जे बोलणे ते बोला".[३] अशा रीतीने दमाजी अटकेत असता बऱ्या बोलाने दाद देईनात. तेव्हा त्या सर्व मंडळीस १२ मे रोजी पुण्यास आणले. त्रिंबकराव पेठेंनी या सर्व कैद्यास पुण्यास बंदोबस्ताने ठेवण्याची व्यवस्था केली.

दमाजी कैदेत अडकून पडले असता पेशव्यांनी गुजरातेत राघोबा दादास सैन्य देऊन पाठविले. पण त्यास विशेष प्राप्ती न होता परत यावे लागले.

---

१. पे. द. २६, ले. १६३; का. सं. प. या., ले. ७१.

२. गायकवाडांची हकीकत–ब, स., पृ. १३.

३. ब. रा. द. ऐ. वें. भाग १, पृ. ३८.

कालांतराने दमाजी रामचंद्रबावाच्या मध्यस्तीने तडजोडीस तयार झाले. दमाजीनी पेशव्यांच्या अटी कबूल केल्या म्हणून पेशव्यांनी सेनाखासखेल हे पद व निम्मी गुजरात करार करून दिली. मुक्ततेसाठी १५ लाख रुपये रोख दमाजीनी पेशव्यांस पोचविले व जरूर पडेल तेव्हा १० हजार फौजेनिशी राज्याचे चाकरीस यावे, दाभाडेच्या खर्चास सवापांच लाख रुपये खंडणी बद्दल दरसाल देत जावे आणि निखालसपणे पेशव्यांचे लक्षात वागावे असा करार दमाजीनी पेशव्यास लिहून दिला (३० मार्च १७५२).[१]

करार झाल्यावर त्याचा अंमल करण्यासाठी पेशव्यानी रघुनाथराव दादास दमाजीसह गुजराथेत पाठविले. हा वेळपर्यंत संपूर्ण गुजरात मराठ्यांच्या ताब्यात आला नव्हती. गुजरातची राजधानी अहमदाबाद ही गुजरातचा सुभेदार कम्लुद्दीनखान याच्या ताब्यात होती. मराठ्यांनी अहमदाबादेवर हल्ला करून ते शहर आपल्या ताब्यात घेतले. त्या दिवसापासून गुजरातवरील मुसलमानी सत्ता संपुष्टात आली. मराठ्यांनी अहमदाबादचा कारभार आपल्या देखरेखीखाली सुरू केला. दमाजीनी आपला अंमल गुजराथेत व काठेवाडात स्वाऱ्या करून बसविला.

**प्रतिनिधी व बाबुजी नाईक :**

ताराबाईंनी पेशव्यांचा पाडाव करण्याचा उद्योग चालविला. त्याता प्रतिनिधी व बाबुजी नाईक सामील झाले. पेशव्यांच्या हातात सांगोल्याच्या तहाने सर्व शासकीय सत्ता आल्याने प्रतिनिधींची किंमत उतरली. प्रतिनिधी जातीने मुळीच कर्तृत्ववान नव्हते. म्हणून त्यानी आपले कर्तृत्ववान मुतालीक यमाजी शिवदेव यांच्यावर भिस्त ठेवली होती. यमाजी शिवदेव हे पेशव्यांस सामील झाल्यावर प्रतिनिधींची व यमाजी शिवदेवाची मुले माणसे पेशव्यांनी आपल्या कबज्यात घेऊन प्रतिनिधींवर आपला शह राखला.[२]

बाबूजी नाईक हे पेशव्याचे प्रतिस्पर्धी. त्यानी पेशवाई बाळाजी बाजीरावास न मिळता आपणास मिळावी म्हणून मागे खटपट केली होती. कर्नाटक मामलाही आपणास मिळावा म्हणून त्यानी शाहू महाराजांपाशी धरणे धरून उपोषणहि आरंभले होते. बाबूजी नाईकांचे पेशव्यांशी असलेले वैर सर्वांस ठाऊक होते. ताराबाईंनी बाबूजी नाईकास आपल्या पक्षात घेऊन त्यास प्रतिनिधी विरुद्ध फितविले. नाईक प्रतिनिधीच्या मुलुखावर चाल करून ताथवडा[३] दहिवडीजवळ किल्ला घेण्यास आले. प्रतिनिधीनी त्रिंबकराव पेठ्यांची मदत घेतली. हा लढा दोन महिने चालला. पेशव्यानी नाईकांविरुद्ध कोल्हापूरकर छत्रपतींचे साह्य मिळविले. चव्हाणकडूनहि बंडाळी करविली. शेवटी नाईकांचा नाइलाज होऊन त्यांना स्वस्थ बसावे लागले.

१. ब. रा. द. ऐ. ले. भाग १, पृ. ५१; गा. फ. क. सी., नं. २६, त. क. पृ. २७६.
२. पे. द. २६, ले. २०६.
३. पे. द. २६, ले. २०८, २१०; ना. रा. ६६, ७१.

ताराबाईनी तुळाजी आगरे, ज्यांच्याशी पेशव्यांचा उभा दावा होता, त्यास पेशव्यांविरुद्ध उठविले. त्यांनी १७५३ च्या जानेवारीत प्रतिनिधीच्या ताब्यातील विशाळगडास वेढा घातला. पेशव्यांनी प्रतिनिधी व कान्होजी मोहिते यांस आंग्र्यांशी बोलणी करण्यास पाठविले. सामोपचाराची बोलणी होऊन आंग्रेनी गडाचा वेढा उठविला.[१]

## निजाम व पोर्तुगिज यांजकडे ताराबाईची कारस्थाने :

आपल्या सत्ता संपादनात निजामाचे साह्य मिळविण्याकरिता ताराबाईनी निजामाचा कारभारी रामदासपंत यास छत्रपतींची पेशवाई देऊ केली. पोर्तूगिजांकडे पत्र पाठवून त्यांच्या लष्करी मदतीच्या मोबदल्यात त्यास वसई परत देण्याचे कबूल केले. पेशव्यांनी १७५० पासून साताऱ्च्या किल्ल्याभोवती चौक्या ठेविल्यामुळे आणि स्वतः निजामाच्या मदतीस गेल्यामुळे ताराबाईस निजामाची किंवा पोर्तुगिजांची मदत त्यांच्या कारस्थानात मिळाली नाही.

## तुळाजी आंग्रे व पेशवे :

संभाजी आंग्रे १२ जानेवारी १७४२ त निवर्तल्यावर सरखेलपद तुळाजी आंग्रेकडे गेले. संभाजीच्या ताब्यातील त्याचे बलाढ्य आरमार व दक्षिण कोंकणचे राज्य याचे स्वामित्त्व तुळाजीकडे आले. तुळाजी महापराक्रमी, इंग्रजांचा कर्दनकाळ होता. पण स्वभाव तापट असल्यामुळे त्याने पेशव्यांशी जमवून घेतले नाही. आपण सातारा महाराजांचे सरदार, पेशवेसुद्धा आपणासारखे महाराजांचे सरदार. तेव्हा पेशव्यांना ज्येष्ठ व श्रेष्ठ मानून त्यांचे हुकूम पाळण्यांचा प्रश्न येतोच कोठें? अशी तुळाजीची धारणा म्हणून तो पेशव्यांशी फटकून वागे. उलट सातारा स्वामीच्या दौलतीचे आपण मुखत्यार तेव्हा आपण सर्वात ज्येष्ठ म्हणून सर्वांनी आपले हुकूम मानावे अशी पेशव्यांची मनीषा. या दोन मत प्रणालींचा संघर्ष सुरू झाला. ह्या संघर्षाचे पर्यवसान युद्धात झाले. युद्धापर्यंत गोष्टी थराला गेल्या म्हणजे शत्रू राष्ट्रही मित्र राष्ट्र होऊन लढाया जुंपतात. तशीच लढाई आंग्रे व पेशवे यांजमध्ये झाली. आंग्रे आरमाराने बलिष्ठ, त्याचे सागरावर प्रभुत्त्व. तेव्हा त्याच तोलाच्या सागरी सत्तेच्या मदतीशिवाय आंग्रेचा पराभव आपणा एकटयाच्याने होणार नाही हे पेशवे जाणून होते. त्यांनी त्याकरिता इंग्रजांची मदत घेतली. आंग्रे पेशव्यांच्या आज्ञा पाळत नव्हते. पण प्रत्यक्षात इंग्रजांचा छळ व नुकसान अतोनात करत होते. इंग्रजांना पेशव्यांकडून मदतीचे आमंत्रण आल्याबरोबर त्यांनी त्याचा स्विकार ताबडतोब केला. इंग्रज पेशवे यांचे मेतकूट जमायला लागले. दरम्यान पेशव्याच्या व मराठमंडळाच्या विरूद्ध उद्धटपणे वागण्याचे तुळाजीचे सत्र सुरू राहिले. सन १७४६ मध्ये वाडीकर सावंतांचा झगडा पोर्तुगिजांशी चालू असता तुळाजीने वाडीवर चाल केली. पहिल्याच फटकाऱ्यात

१. पे. द. ४०, ले. ८१, शा. रो. १२८, १२९, २४०.

वाडीकरांवर विजय मिळविला. पण वाडीकरांनी पेशव्यांच्या मदतीने कुडाळ नजीक आंग्रेच्या फौजेस सडकून मार देऊन हाकलून लाविले.[१]

तुळाजीने सन १७५० च्या सुमारास तिसऱ्यांदा वाडीकरांवर हल्ला केला पण तोही अयशस्वी झाला. पुढे विशाळगडकरांचा मुदागड किल्ला, डोंगर पिसागी व परसाली तालुके व मलकापूर या गावानजिक होता. तो तुळाजीने अकस्मात येऊन त्या किल्ल्यावर फौजबंदी करून पन्हाळे सुभ्यास व बावडे विशाळगड तालुक्यास मनस्वी उपद्रव करू लागला, तो कोणासही ऐकेना. ठिकठिकाणी चौक्या बसवून कोकणपट्टीचा वसूल घ्यायला लावला. तेव्हा आंग्र्यांचा पाठलाग जगजीवन परशुराम याने केला. तेव्हा आंग्रे चौक्या उठवून स्वस्थळास गेले[२] व आपल्या आरमाराला काम मिळावे म्हणून त्यानी मलबार किनाऱ्यांवर छापे घातले. त्यांचे हे जमिनीवरील व समुद्रावरील उपद्व्याप, विशाळगडकर, बावडा प्रतिनिधी, कोल्हापूरकर व सावंतवाडीकर यांना मोठे जाचक ठरले, इंग्लिश, पोर्तुगिज, डच यांनाही तेवढेच तापदायक झाले. तुळाजी आंग्र्यांचा बंदोबस्त करण्याचे काम नानासाहेब पेशव्यास मराठमंडळाचा मुख्य या नात्याने करणे भाग पडले. त्याकरिता त्याने सातारकर छत्रपति, करवीरकर छत्रपति, ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर (मृत्युपर्यंत), पंत अमात्य बावडेकर, पंतप्रतिनिधी विशाळगड, वाडीकर सावंत, अप्पाजी आंग्रे, नागोजी आंग्रे,या सर्वांना तुळाजी विरूद्ध उठविले. तसेच इंग्रजांच्या आरमाराची मदत घेतली. तुळाजीचा उच्छेद करावा हा हेतु मनात धरून इंग्रज व पेशवे यांचे मेतकूट बरेच दिवस चालले होते. सन १७५४ मध्ये तुळाजीने डचांची ५०, ३६ व १८ तोफांची अशी तीन जहाजे पकडली. पैकी पहिली दोन तुळाजीने जाळली व तिसरे धरून नेले. याचवेळी तुळाजीने आपल्या काफिल्यात अनेक नविन जहाजे बांधविली व त्यावर कित्येक युरोपियन कामगार लोक पगारी ठेविले. सन १७४३ ते १७५५ पर्यंत तुळाजी हा समुद्रावरचा एकंदर मालक होता. त्याचे वैभव परमोच्च कोटीला जाऊन पोचले होते. पश्चिम किनाऱ्यावरील कोणतेही जहाज त्याच्या तावडीतून निसटून जात नसे एवढा त्याचा दरारा होता. त्याची तीन हजार फौज, ६० लढाऊ जहाजे व त्यावर भरपूर दारूगोळा एवढी सामुग्री त्याजकडे होती. सन १७५४ मध्ये त्यास कळून चुकले की, पेशवे मुंबईकर इंग्रजांच्या सहाय्याने आपल्या सत्यानाशाची तयारी करीत आहेत. तेव्हा त्याने मुंबईकर इंग्रजांबरोबर तह करण्यासाठी आपला वकील पाठविला. पण इंग्रजांचे बोलण्यात एक व करण्यात एक असल्यामुळ त्यांनी तुळाजीने देऊ केलेल्या सवलती नाकारल्या. तसेच तुळाजीचा मैत्रीचा हात झिडकारला. यावेळी इग्रजांचा तगादा आंग्र्यांना बुडविण्याची मोहिम पेशवे व आपण या दोघांनी मिळून हाती घेण्याचा होता. सन १७५५ मध्ये आपल्याविरूद्ध कारस्थान शिजून तयार झाले असल्याचे तुळाजीला समजले. त्यावेळी तुळाजीने नानासाहेबास पत्र लिहून त्यात

१. पे. द. २४, ले. ३०, ४१, ८६, ९८, ९९, १०१, १०३, ११०, ११३, ११५.

२. भारतवर्ष, भाग १ ( पंतप्रतिनिधीची बखर ), पृ. ५६-५७

"उभयपक्षाचा घरोबा चालत आहे, त्याची अभिवृद्धी प्रतिदिनी व्हावी हे उचीत व योग्य आहे." याप्रमाणे लिहिले, पण पेशव्यांनी त्याची दखल घेतली नाही.

तुळाजीवर स्वारी करण्यापूर्वी इंग्रज व पेशवे यांचा सात कलमी करार झाला (१९ मार्च १७५५). त्यात संयुक्त आरमार इंग्रजांच्या हुकमती-खाली रहावयाचे, इंग्रजांनी समुद्रावरून मोहिम सुरू करावयाची. व जी जहाजे घेण्यात येतील ती इंग्रज व पेशवे यांनी निम्मे निम्मे वाटून घ्यावयाची. आग्र्यांच्या किल्ल्यात जी लूट मिळेल ती पेशव्यांनी घ्यावयाची. तुळाजी विरुद्धचे पेशव्यांचे आरोप तीन होते —(१) पेशवे हे धनी व आंग्रे त्यांचे नोकर हे नाते तुळाजीने ओळखले नाही; (२) मराठी सत्तेच्या इतर महत्त्वाच्या घटकांशी ते "सौरस्ये वर्तत नसत", (३) मराठी सत्तेच्या विरुद्ध गोवेकर फिरंग्याची त्याचप्रमाणे मुंबईकर इंग्रजांची त्यांनी मदत मागितली.

तुळाजी आंग्रे याजवरील संयुक्त मोहिमेची प्रत्यक्ष सुरूवात दिनांक २६ मार्च १७५५ पासून झाली. पेशव्यांचे साष्टीचे सुभेदार रामाजी महादेवा याने इंग्रजास पुष्कळ सवलती देण्याचे आश्वासन देऊन वरील १९ मार्चचा करार पुरा केला.[१] इंग्रजांचे आरमार कमोडोर जेम्स यांच्या अधिपत्या-खाली निघून ते मराठ्यांच्या आरमारास चौल येथे मिळाले (२९ मार्च). ते सुवर्णदुर्गासमोर येऊन त्याने तोफांचा मारा दीड दिवस सारखा केला पेशव्यावर मारा होईल म्हणून तुळाजीने आपल्या लोकांस मारबंद करण्यास सांगितले व तहाचे बोलणे लावले. तेव्हा इंग्रजांनी पाणउतार होऊन किल्ल्यावर जाऊन सरखेलांचे आरमार जाळून नेस्तानाबूत केले. इंग्रज विजयदुर्गात शिरला व त्याने आपले निशाण रोविले. जंजिरे-विजयदुर्ग, जयगड फत्ते होऊन तुळाजी आंग्रे हाती आला. त्यास पेशव्यांच्या स्वाधीन करण्यात आले. येथे या मोहिमेचे कार्य संपले. इंग्रजांनी विजयदुर्गाचा ताबा स्वत:कडे घेऊन त्यातील खंडोगणती चीजवस्तू जहाजे भरभरून इंग्लंडला पाठऊन दिली. आणि कराराप्रमाणे वियजदुर्ग आपल्या ताब्यात द्यावा ही पेशव्यांनी अनेकवेळा केलेली मागणी सर्व चीजवस्तू फस्त झाल्यावर मंजूर करून तो भणंग किल्ला पेशव्यांच्या स्वाधीन केला. आगीत तुळाजीचे आरमार भस्म झाले. लाखो मोलाचे जडजवाहीर व संपत्ती लुटली गेली. या अचानक विजयाने इंग्रजांना हर्ष झाला. आणि त्याबरोबरच पश्चिम किनाऱ्या-वर मराठ्यांच्या नाविक सत्तेचा दबदबा नाहीसा झाला.[१] तुळाजीस कैदी म्हणून पुण्यास नेण्यात आले. तिथे कैदेतच तो सन १७८६ मध्ये वारला.

आंग्र्यांचा अस्त झाल्यानंतर सुवर्णदुर्ग विजयदुर्गचा प्रांत व आरमाराची सुभेदारी पेशव्यांनी आनंदराव धुळपास दिली. मोहिमेवरचा सरदार रामाजी महादेव याजकडे पेशव्यांनी सुवर्णदुर्ग तालुक्याचा कारभार दिला. रामाजी महादेवाच्या मृत्युनंतर सदर तालुक्याचा कारभार हरीपंत फडके याजकडे आला.

---

१. पे. द. १, भा. ३९, ले. ११५.

तुळाजीचा पराभव झाल्यानंतर पेशव्यांनी ऑक्टोबर १७५६ मध्ये इंग्रजांशी तह केला व त्या तहाने इंग्रजांना बऱ्याच व्यापारी सवलती मिळाल्या, तसेच बाणकोटचा किल्ला व त्याच्या आजूबाजूची गावे इंग्रजांना मिळाली. सन १७६०, २८ जानेवारीस पेशव्यांनी सिद्दीचा पराभव करून उंदेरी घेतली.[१] त्यामुळे पेशवे व आंग्रे यांचे अलीबाग तालुक्याच्या उत्तरेकडील पूर्व पश्चिम पट्टीतील गावे आंग्रे व पेशवे यांच्या संयुक्त अंमलाखाली आली. सन १७६० मध्ये पेशव्यांचा पहिला सुभेदार नारो तिरमल हा उंदेरी व जयदुर्ग येथे राहू लागला.

१. का. सं. प. या; ले. १८२; पे. द. २४ ले. २६१–६२.

## पेशवे-निजाम संबंध

# कालसूची

| | |
|---|---|
| १७४६, ऑक्टोबर २४ | नबाब अन्वरुद्दीनचा मुलगा महूफजखान याचा फ्रेंचाकडून पराभव. |
| १७४६, डिसेंबर | नबाब अन्वरुद्दीनशी डुप्ले शांततेचा तह करतो. |
| १७४८, मे २१ | निजामाचे निधन. |
| १७४८, जून | इंग्रजांच्या ताब्यातील सेंट डेव्हिड किल्यावर डुप्लेचा हल्ला. |
| १७४८, ऑगस्ट | इंग्रजांचा पांडेचरीस वेढा. |
| १७४८, ऑक्टोबर १८ | इंग्रज व फ्रेंच याच्यात शांतता तह. |
| १७४८, डिसेंबर ५ | नासिरजंगचा मृत्य. |
| १७४९, ऑगस्ट | मद्रास शहर इंग्रजाना फ्रेंच परत करतात. |
| १७५०, जानेवारी २९ | बाळाजी बाजीराव पेशवे सदाशिवराव भाऊसह पुणे सोडतात. |
| १७५०, फेब्रुवारी ३ | मुजफरजंगचा मृत्यू. |
| १७५१, नोव्हेंबर २० | बुसी व पेशवे यांच्या सैन्याची लढाई. |
| १७५१, नोव्हेंबर २१ | पेशवे स्नानास गेले असता मोगलांचा अचानक हल्ला. |
| १७५१, डिसेंबर २ | मराठे निजामापासून त्रिंबकचा किल्ला जिंकून घेतात. |
| १७५२, जानेवारी ७ | सलाबतजंग पेशव्यांशी तहाची बोलणी करतो. |
| १७५२, जून ३ | चंदासाहेबचा खून. |
| १७५२, ऑक्टोबर १६ | गाजीउद्दीन यावर विषप्रयोग. |
| १७५२, नोव्हेंबर २५ | पेशवे व सलाबतजंग यांची भेट व तह कायम. |
| १७५४, ऑगस्ट २ | डुप्ले युरोपला परततो. |
| १७५६, ऑगस्ट ३० | सलाबतजंग बुसीला नोकरीवर परत घेतो. |
| १७५६, डिसेंबर | बुसी मच्छलीपट्टणास जातो. |
| १७५७, जुलै २३ | शहानवाजखानाच्या फौजेत बंडावा. |
| १७५७, डिसेंबर १७ | पेशवे व निजाम यांचा संग्राम. |
| १७५८, मे ११ | शहानवाजखान व त्याचा मुलगा ठार. |
| १७५८ | निजाम अल्लीखान व जानोजी यात युद्ध |
| १७६०, जानेवारी १५ | उदगीरची लढाई. |

# १०

## पेशवे-निजाम संबंध

पेशवे-निजाम संबंधात कर्नाटकातील त्यावेळची परिस्थिती ध्यानात घ्यावयास हवी. निजाम हा कर्नाटकाचा नवाब होता. कर्नाटक सुभ्याची नेमणूक त्याच्या हस्ते होत असे. १७४४ एप्रिल[१] मध्ये अन्वरुद्दीनखान हा कर्नाटकचा नवाब झाला. त्याने अफगाण पठाणांना निपटून काढून पायन घाटातून त्यांचा नि:पात केला.[२] आणि सबंध कर्नाटकात शांतता प्रस्थापित केली. पण त्यास स्वास्थ्य मिळावयाचे नव्हते. कर्नाटकाच्या किनाऱ्यावर ज्या पश्चिमी राष्ट्रांच्या वखारी होत्या तेथील सत्ताधीशांनी म्हणजे इंग्रज व फ्रेंच या वखारवाल्यांनी त्यांच्या मायदेशी चाललेल्या आपसातील युद्धाची पुनरावृत्ती हिंदुस्तानच्या किनाऱ्यावर सुरू केली. ह्यावेळी फ्रेंचांचा महत्त्वाकांक्षी सेनापती कॅ. डुप्ले हा पाँडेचरीस रहात होता. फ्रेंचांकडे नाविक दल इंग्रजांपेक्षा कमी होते. ह्याची भिती डुप्लेस वाटत होती. ही भितीच खरी ठरली. इंग्रजांची युद्धनौका अरबी समुद्रात आल्याची बातमी डुप्ले यास समजली.[३] तेव्हा अन्वरुद्दीन पाँडेचेरीस आपल्या डुप्लेकडून खंडणी मिळविण्यासाठी गेला होता.[४] त्यास डुप्लेने असे सांगितले की तुम्ही मद्रास येथील इंग्रज गव्हर्नर यास पत्र पाठवून असे कळवा की तुमच्या युद्धनौकेपासून फ्रेंचास कोणत्याही प्रकारचा त्रास पोहचता कामा नये.[५] अन्वरुद्दीनखानने लागलीच इंग्रजांस पत्र लिहून कळविले की, ह्या किनाऱ्यावर शांततेचा भंग होणार नाही याची काळजी घ्या नाहीतर त्याचे परिणाम दूरवर होतील. अन्वरुद्दीनने अशी दोन तीन पत्रे मद्रास इंग्रजास पाठविल्यामुळे त्याचा उपयोग चांगला झाला.[६] त्यामुळे फ्रेंचावरील अरिष्ट टळले. पण फ्रेंचांची युद्धनौका कालांतराने अरबी समुद्रात आली तेव्हा डुप्लेचा नूर बदलला. त्याने व फ्रेंच युद्धनौकेचा कप्तान बार्डोना ह्या दोघांनी इंग्रजांकडून मद्रास घेण्याचा बेत केला व मद्रासला वेढा घातला. अन्वरुद्दीन यास ही बातमी

1. Orme, British Military Transactions in Indostan, I p. 61.
2. Burhan, Tuzaki-walajahi, I p. 111.
3. Orme, BMTI p. 61.
4. Dodwell, Madras Despatches, 1744-55, p. 9.
5. Orme, BMTI, p. 61.
6. Madras consultation March 4, 1745.
   Dodwell, Duplex & Clicve, p. 14.

कळताच त्याने डुप्लेस मद्रासचा वेढा उठविण्यास सांगितले.[१] हुशार डुप्लेने उलट निरोप पाठविला की, मद्रास इंग्रजांकडून जिंकून घेतल्यावर ते आपल्याच ताब्यात देण्यात येईल.[२] अन्वरुद्दीनचे ह्या उत्तराने समाधान झाले नाही. त्याने आपला मुलगा महफूजखान याला फौज देऊन मद्रासला वेढा देऊन बसलेल्या फ्रेंचावर पाठविले. फ्रेंचांनी त्याचा दिनांक २४ ऑक्टोबर १७४६ रोजी संपूर्ण पराभव केला.[३] ह्या विजयाने फ्रेंचाचा आपल्या शिस्तबद्ध सैन्यावरील विश्वास द्विगुणित झाला. नबाबाने आपल्या मुलाचा पराभव झाल्याची हाय खाल्ली. नबाबाचे दुसरे चिरंजीव महमद याजला फौज देऊन इंग्रजांच्या मदतीस पाठविले.[४] डुप्लेस ही बातमी कळताच त्याने मराठ्यांशी संधान बांधून त्यांच्या कैदेत असलेला चंदासाहेब यास सोडून आणण्याचा घाट घातला.[५]

निजामास पत्रे लिहून त्यात त्याच्या मुलाचे फ्रेंचाविरुद्धचे कृत्य व फ्रेंचाचे इंग्रजांना हिंदुस्तानातून घालवून देण्यासाठी चाललेले प्रयत्न, अन्वरुद्दीनच्या अधिपत्याखाली इंग्रजांकडून फ्रेंच लोकांनी जिंकून घेतलेले मद्रास, इंग्रज काफिल्याचा कारो मंडलच्या समुद्रात धुडगूस इत्यादि इंग्रजांविरुद्धच्या प्रक्षोभक गोष्टी त्याने लिहिल्या.[६] कर्नाटकातील पालेगारांची सहानुभूति आपल्या कृत्यास असावी म्हणून त्यांनाही पत्रे लिहून परिस्थिती समजावून सांगितली.[७] फ्रेंचाच्या ह्या कृत्यांचा राग येऊन अन्वरुद्दीनने आपल्या मुलास सैन्य देऊन इंग्रजांच्या मदतीस पाठविले. सेंट डेव्हीड येथे पुन्हा लढाई होऊन त्यांत फ्रेंचाचा पराभव झाला.[८] म्हणून डुप्लेने नबाब अन्वरुद्दीनशी शांततेचा तह डिसेंबर १७४६ त केला.[९] नबाबाच्या म्हणण्याप्रमाणे नामट्रन इंग्रजांना परत केले आणि नबाबाशी समझोता करून त्याची मैत्री संपादन केली.[१०] अशा रीतीने नबाबापासून होणाऱ्या त्रासातून आपण मुक्त झालो ह्याची खात्री डुप्लेस झाल्यावर त्याने इंग्रजांच्या ताब्यातील किल्ला सेंट डेव्हीड घेण्यासाठी निकराचा हल्ला जून १७४८ मध्ये कुडलोरवर केला तेव्हा तो हल्ला इंग्रजांनी परतवून लावून पाँडेचरीला वेढा घालण्यासाठी ऑगस्ट १७२८ मध्ये सैन्य रवाना केले. पण डुप्लेने इंग्रजांचा हल्ला परतवून लावून फ्रेंचांच्या पराक्रमाचा वचक एतद्देशियांवर बसविला.[११] डिसेंबर १७४८ मध्ये युरोपहून अशी बातमी आली की, इंग्रज व फ्रेंच यांजमधील युद्ध थांबून त्यांनी शांतता तहावर

1. Diary of Ananda Ranga Pillai, II, 285. 291.
2. Orme, BMIT I p. 69
3. Diary of Ananda Ranga Pillai, III, pp, 101 102
4. Orme I, p. 80
5. Pillai, Part III p. 140
6. Pillai, III pp, 101-102.
7. Sirinivasachari, Vignettes the History etc p. 17.
8. Dodwell, Dupleix and Clive, p. 121.
9. Orme, p. 85.
10. Orme p. 87.
11. कित्ता

एक्सलाचापेल येथे १८ ऑक्टोबर १७४८ रोजी सह्या केल्या. ही बातमी हिंदुस्तानात येताच इंग्रज व फ्रेंच यांनीही तह केला. मद्रास शहर इंग्रजांना फ्रेंचांनी परत केले (ऑगस्ट १७४९).

यानंतर इंग्रज फ्रेंच कंपन्यानी स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठीं एतद्देशीय संस्थानिकांना त्यांच्या भांडणात मदत करण्यास सुरवात केली. ह्या बाबतीत इंग्रजानी प्रथम सुरवात केली. तंजावरचा राजा प्रतापसिंह यांच्या विरुद्ध त्यांचा नातलग कुट राजा उर्फ शहाजी राजे यास मदत केली आणि प्रतापसिंहाच्या ताब्यातील देविकोटा शहर जिंकून घेतले व कुट राजास प्रतापसिंहाकडून ४० हजार रुपये पेन्शन देवविले. व त्याजबरोबर मैत्रीचा तह केला. इकडे इंग्रज देविकोटा घेण्यात गुंतले असता फ्रेंचांनी दुसरीकडे निजाम पुत्रांच्या भांडणात भाग घेऊन आपली सत्ता वाढविली. इंग्रजांनीही ह्या भांडणात हात धुवून घेण्याचे ठरवून फ्रेंचांनी ज्याला आपला पाठींबा दिला त्याजविरुद्धच्या लोकांस आपला पाठींबा दर्शविला. अशा रीतीने इंग्रज व फ्रेंच यांनी स्वतःस पाठीमागे ठेवून एतद्देशीय संस्थानिक राजांना भांडत ठेवण्याचे तंत्र साधले.

कर्नाटकातील ह्या घडामोडींकडे बाळाजी बाजीराव पेशव्याचे लक्ष होतेच. त्यांनी ह्या एतद्देशीय राजांच्या लढ्याची माहिती मिळविण्यासाठी शामराव यादव नांवाच्या आपल्या वकीलास कर्नाटकात पाठविले. मुरारराव घोरपडे, म्हैसूरचा नंद राजा ह्यांनीही भरपूर हालचाली केल्या. त्याचा वृत्तांत असा—निजाम इ. स. १७४८ मे २१ रोजी वारला. त्याने आपले मृत्यूपत्र करून ठेविले होते, त्यात मुजाफरजंग, मुलीचा मुलगा यास आपला वारस नेमिले. निजामास गाजीउद्दीन व नासिरजंग असे दोन मुलगे लग्नाच्या बायको पासूनचे तसेच दोन मुलीही होत्या. रक्षांपासून त्याजला आणखी चार पुत्र झाले. त्यांची नांवे, सलाबतजंग, बसालतजंग, निजामअली व मीर मोगल असून ते इतिहासात प्रसिद्ध आहेत. मुजफरजंगास गादीचा वारस नेमलेले नासिरजंग यास आवडले नाही. त्याने निजामाच्या हुकूमाप्रमाणे अर्काटकडे कूच न करता हे आपले दुःख पेशव्यास पत्र लिहून कळविले.[1]

**निजामउल्मुलकच्या मृत्यूनंतरच्या घडामोडी :**

निजामाचा मोठा मुलगा गाझीउद्दीन हा दिल्लीच्या बादशहाकडे होता व दुसरा मुलगा नासिरजंग यास निजामाने मुझफरजंगास वारस नेमलेले आवडले नाही. निजामाच्या मृत्यूनंतर मुझफरजंगास आपणास नासिरजंगाशी लढल्याशिवाय सहजासहजी गादी मिळेल याची खात्री वाटेना. म्हणून नासिरजंगाबरोबर लढण्याचा प्रसंग आल्यास त्यात आपणास खात्रीलायक विजय मिळावा म्हणून त्याने पेशव्यांकडे मदत मागितली. चंदासाहेब यावेळी सातारच्या कैदेत होता. त्याचीहि मुझफरजंगाने भेट घेतली. आणि फ्रेंचांच्या मदतीने चंदासाहेबाची सुटका केली. चंदासाहेब व

१. पे. द. २८, ले. ३१.

मुझफरजंग नासिरजंगाशी लढण्याकरता पाँडेचरीस डुप्लेपाशी गेले. डुप्लेने त्यांचा बहुमान केला व चंदासाहेब यास कर्नाटकचा नबाब नेमले आणि मुझफरजंगास दक्षिणेची सुभेदारी बहाल केली. उपकाराची फेड म्हणून चदासाहेबांनी डुप्लेस काही गांवे तोडून दिली. त्यावेळी कर्नाटकचा नबाव महमद अल्ली होता. त्याजवर चंदासाहेब चालून गेले. इकडे फ्रेंचांनी मुझफरजंग व चंदासाहेब यांची बाजू घेतली म्हणून नासिरजंगानें पेशवे, भोसले, कर्नाटकचा नबाब यांचे साह्य मिळविले. महमद अल्ली व मद्रासकर इंग्रज यांनीहि त्यांचा पक्ष स्विकारला. जिंजीच्या आसमंतात दोन्ही सैन्ये समोरासमोर लढाईस ठाकली. ५ डिसेंबर रोजी लढाईस तोंड लागण्यापूर्वी एकदम गलबला होऊन नासिरजंग एकाएकी मारला गेला. तद्नंतर लागलीच मुझफरजंग दक्षिणचा सुभेदार म्हणून व्दाही फिरविली.[1]

नासिरजंगाच्या मृत्यूची बातमी पेशव्यास कळताच पेशवे तारीख २९ जानेवारी १७५० रोजी सदाशिवरावभाऊ सह पुणे सोडून फौजेनिशी बाहेर पडले. फेब्रुवारीत औरंगाबादेस शह देऊन निजामाचा सरदार सय्यद लष्कर खानाकडून १७ लक्षाची खंडणी घेतली. इतक्यात तारीख ३ फेब्रुवारी रोजी मुझफरजंग मारला गेल्याची व सलाबतजंग निजाम झाल्याची वार्ता पेशव्यास कळली. सलाबतजंगास घेऊन बुसी हैद्राबादेस येत आहे अशी बातमी पेशव्यास समजताच बुसीवर चालून जाण्यासाठी पेशवा रायचूरकडे निघाला. सलाबतजंग निजाम झाल्याची व्दाही बुसीने तळावर डेऱ्यात दरबार भरवून फिरविली.[2] सलाबतजंगाने फ्रेंचांशी झालेले सर्व करार उडवून दिले. पुढील सर्व गोष्टी पांडेचरीच्या हुकुमाने ठरतील असे बुसीने जाहीर केले. या कामी रामदासपंत नांवाचा निजामाचा दिवाण डुप्लेस फार उपयोगी पडला. वर निर्देशिलेले खून घडवून आणण्यास रामदासपंतांची कामगिरी उपयोगी पडली. ही वर्तमाने दिल्लीस वास्तव्य करीत असलेला निजामाचा वडील पुत्र गाझीउद्दीन फिरोजजंग यास समजताच त्याने बादशहाकडून दक्षिणच्या कारभाराचे फर्मान मिळविले व तो दक्षिणेकडे येऊ लागला. गाझीउद्दीनास इकडे घेऊन येण्यास पेशव्यांच्या संमतीने शिंदेहोळकर यांनी भाग घेतला होता.

इकडे बुसी सलाबतजंगास घेऊन हैद्राबादेस आल्यावर तेथे दरबार भरवून सलाबतजंग सुभेदार झाल्याचे घोषित केले. सलाबतजंगाचे आसन बुसीने कवायती फौजेच्या बळावर स्थिर करण्यास सुरवात केली. कवायती फौजेच्या खर्चासाठी निजामाचा पूर्व किनाऱ्यावरील उत्तर सरकार प्रांत आपल्या ताब्यात घेतला. इतक्यात गाझीउद्दीन बादशहाचे फर्मान घेऊन दक्षिणेत येत आहे हे वृत्त बुसीस समजलें.[3] पेशवा सुद्धा गाझीउद्दीनास सामोरा जाण्यासाठी

---

१. पे. द. २५, ले. ९३-९५

२. रा. खं. ३, ले. ३७७; पे. द. २५, ले. १०५, १०९, ११०.

३. पे. द. २५, ले. १२७.

एक लाख फौज घेऊन पुण्याहून नगरकडे निघाला. हा सर्व व्युह हाणून पाडण्यासाठीं बुसीने नोव्हेंबरचे प्रारंभी पुणे प्रांतावर चाल केली. दोन्ही सैन्यांची गाठ घोडनदीच्या आसमंतात पडून २० नोव्हेंबर १७५१ रोजी लढाई झाली. दुसऱ्या दिवशी २१ तारखेला ग्रहणाच्या दिवशी पेशवे स्नानास गेले असता मोगलांनी एकदम हल्ला चढविला.[१] ते समयी मोठी तारांबळ उडाली. पेशवे स्वतः घोड्याच्या पाठीवर उघडे बसून निसटले. यापुढे मराठ्यांनी बुसीच्या तोफा चुकवून सर्व मुलूख जाळून उजाड केला. शत्रूस दाणा, वैरण, पाणी मिळू नये अशी भीषण अवस्था निर्माण केली. त्यामुळे बुसीला पुण्यावर जाणे अशक्य होऊन युद्ध आवरणे भाग पडले.

२ डिसेंबर रोजी मराठ्यांनी निजामापासून त्रिंबक किल्ला जिंकून घेतला. या दोन महिन्याच्या युद्ध धुमाळीत बुसीच्या तोफखान्याचा मराठ्यांच्या गनिमी काव्याच्या लढाईपुढे काही उपयोग झाला नाही. म्हणून सलाबतजंगाने तहाची बोलणी लावली. शिंगवे, परगणे राहुरी येथे ७ जानेवारी १७५२ रोजी उभयतास अटी मान्य होऊन तह झाला.[२] या तहात ठरल्याप्रमाणे पेशव्यांनी त्रिंबक किल्ला निजामास परत दिला.[३]

**निजामाचा कोंडमारा-भालकीचा तह :**

तहात ठरल्याप्रमाणे पेशव्यांनी त्रिंबक किल्ला निजामाच्या स्वाधीन तावडतोब केला नाही. त्याकरिता रामदासपंतांनी निकड लावली. त्यावरून उभयतांचे वैर वाढत गेले. यावेळी पेशव्यांची बाजू थोडी जास्त बळकट झाली होती. मद्रासकडे इंग्रज व महंमद अली हे वरचढ बनून त्यांनी चंदासाहेबास मारिले (३ जून १७५२). त्यामुळ इंग्रजांची सरशी होऊन बुसीचा पक्ष खालावला. त्यास पैशाची अडचण भासू लागली. ती भागवण्यासाठीं तो सलाबतजंगास घेऊन हैद्राबादेकडे निघाला असता त्याचा मुक्काम भालकीवर पडला. तेथे पगार न मिळाल्याने बिथरलेल्या सैनिकांनी तारीख ७ एप्रिल रोजी रामदासपंतांचा खून केला. तेणेकरून बुसीचा शेवटचा आधार तुटला.

तद्नंतर सलाबतजंगाने रामदासपंतांच्या मागून सय्यद लष्करखानास आपला दिवाण नेमले. पेशव्यांची मनिषा गाझीउद्दीन यास आणल्यावर उभयतांपैकी जे आपणास फायदेशीर वाटेल त्या निजामाचा आपण पुरस्कार करू अशी होती.[४] शिंदे-होळकरांसह गाझीउद्दीन ऑक्टोबरमध्ये औरंगाबादेस येऊन पोहोचला. १६ ऑक्टोबर १७५२ रोजी त्यास निजामअलीच्या आईने भोजनास बोलावून विषप्रयोगाने ठार मारिले. ही बातमी पेशव्यास

---

१. पु. द. १. ३७३; फु. रो., पृ. ७३; रा. खं. ६, ले. २३२, कित्ता ३, ले. ४००.

२. पु. द. १, के. ३७२.

३. ऐ. ले. सा. १, ले. १४५-१५३.

४. का. सं. प. या., ले. १०२, १०३; पे. द. २५, ले. १४४.

समजली. त्यावेळी पेशवे शहागडावर होते. तेथे त्यास शिंदे-होळकर भेटले. त्या सर्वांनी माघार न घेता सलाबतजंगावर चाल केली. यावेळी सलाबतजंगाचा मुक्काम भालकीवर होता. तेथे त्यास कोंडून धरले. बुसीने वाटाघाटी करण्यास पुढाकार घेतला. पेशव्यांनी गाझीउद्दीनने ज्या गोष्टी कबूल केल्या होत्या त्या सर्व कबूल करण्यास सलाबतजंगास भाग पाडले. पेशवे व सलाबतजंग यांची भेट होऊन तारीख २५ नोव्हेंबर रोजी तह कायम झाला.[१] या तहाने त्रिंबक किल्ला पेशव्यांकडे राहिला. तेथे मशीद काढून श्रीचे देवालयाचे काम चालीस लाविले. कुशावर्त बांधिले.[२]

पेशव्यांनी भालकीच्या तहानंतर कर्नाटक व हिंदुस्थान मुसलमानी सत्तेतून हळूहळू सोडविण्याचा आपला संकल्प आपले गुरु दीक्षित यास कळविला.[३] या तहाने जुन्नर नगर व खानदेश इत्यादि ठिकाणचा बराच प्रदेश पेशव्यास मिळाला.

या तहानंतर निजाम व बुसी हैद्राबादेस गेले. ह्याच तहात कर्नाटकचा मामला निजाम पेशव्यांनी एकमताने ठरवावा असे कलम होतें.[४]

**सलाबतजंगाचा कारभार :**

सलाबतजंग हैद्राबादेस परतल्यावर त्याने पेशव्यांच्या शिफारशीनुसार सय्यद लष्करखान यास आपला कारभारी नेमिले. शहानवाजखान घरी बसला. पुढे काही दिवसांनी फ्रेंचांचे व सय्यद लष्करखानाचे वाकडे आले त्यामुळे सय्यद लष्करखान घरी बसला. आणि त्याच्या जागी शहानवाज-खानाची नेमणूक झाली. हा मराठ्यांशी स्नेहाने वागे. याने बाळाजीच्या सावनूरकडील स्वारीस मदत मिळवून दिली (सन १७५४). असे असले तरी सलाबतजंगाच भाऊ निजामअली, बसालतजंग, मोगलअल्ली याची आपसात धुसफूस चालू होती. पण पेशव्यांच्या सल्ल्यानुसार वऱ्हाडच्या व विजापूरच्या सुभेदारीवर अनुक्रमे निजामअली व बसालतजंग यांच्या नेमणूका झाल्या.[५] इ. स. १७५३ पासूनची चार वर्षे निजामशाहीत बुसीचे वजन राहिले. बुसीने सलाबतजंगास सर्व बाजूने अगदी आवळून ठेविले होते. बुसीचा मुख्य हस्तक हैदरजंग मोठा खाष्ट होता. बुसीस निजामशाहीतून काढून लावण्यासाठी निजामीतील मुत्सद्यांनी खूप प्रयत्न केले.[६] बुसीस हे कळले तेव्हा तो पेशव्यांची मर्जी सांभाळण्याच्या उद्योगास लागला.[७] तारीख २ ऑगस्ट १७५४ रोजी डुप्ले युरोपात परत गेला. तेव्हापासून

१. पे. द. २५, ले. १४४, १४७-१४९, कित्ता २६, ले. २०२.
२. पु. द. १, ले. ३७२; ऐं. संकीर्ण सा. १, ले. १४५-१५३.
३. का. सं. प. या., ले.११४.
४. रा. खं. ३, ले. ४१५.
५. कित्ता, ३, ले. ४७८.
६. कित्ता, ४३२, ४३३.
७. कित्ता, १. १५-१८.

बुसी काही काळ उत्तर सरकार प्रांतातील आपल्या जहागिरीची व्यवस्था पहाण्यास निघून गेला तेव्हा पुन्हा हैद्राबादेस बजबजपुरी माजली.[१] इतक्यात सावनुरकरांशी पेशव्यांचे वाकडे आले. मोहिम झाली. या मोहिमेत सलाबतजंगाने शहानवाजखानाच्या सांगण्यावरून सहकार्य केले (एप्रिल १७५६). सावनूरची मोहिम आटोपल्यावर शहानवाजखानाने बुसीला निजामाच्या नोकरीतून बडतर्फ करविले.[२] पेशव्यांच्या मनात बुसीला नोकरीस ठेवावयाचा होता. करारही ठरला.[३] परंतु निजामास जो भारी तो आपल्याकडे कटकटी काय थोडया करील ? असा विचार करून ती कल्पना सोडून दिली.

बुसीला बडतर्फ करणे सोपे होते. पण ते निभावणे कठीण होते. बुसीने पूर्वेकडे जाता जाता हैदराबाद शहराचा ताबा घेतला. आणि स्वपराक्रमाने कवाईती फौजेच्या बळावर निजामास नमविले. सलाबतजंगाने बुसीला परत नोकरीवर घेतले (३०ऑगस्ट १७५६)..[४] पेशव्यांशी सलाबतजंगाच भाऊ व दिवाण यांचे संगनमत चालूच होते. त्याचा फायदा घेऊन त्याने जुन्नर, परगणा व शिवनेर किल्ला काबीज केला आणि ह्या सर्व मुलखाचा नवा शिवनेर तालुका बनविला.[५] पुढे पेशव्यांनी सलाबतजंगापासून पंधरा लाखाचा मुलुख उपटला व निजामाच्या ताब्यातील स्थळ अहमदनगर आपल्या कबजात आणण्याचे प्रयत्न चालू केले. याही पुढे जाऊन त्यांनी निजामाकडे पंचवीस लक्षाचा मुलूख व दोन चांगली स्थळे यांची मागणी केली.[६] सलाबतजंगाने पेशव्यांच्या या आक्रमणास तोंड देण्यासाठीं बुसीस उत्तर सरकार प्रांतांतून आपल्याकडे बोलाविले. डिसेंबर १७५६ मध्ये बुसी आपल्या जिल्ह्याची व्यवस्था पहाण्यास मच्छलीपट्टणास गेला. तेथें तो वर्षभर होता. निजामाचा दिवाण शहानवाजखान, ह्यास फ्रेंचांचे निजामाच्या दरबारातून निर्मूलन करणे कठीण होऊन बसलें. कारण बुसीचा हस्तक हैदरजंग हा मोठा जबरदस्त मुत्सद्दी योद्धा आपला वरचष्मा राखून सलाबतजंगाच्या दरबारात होता. तो फ्रेंचांच्या हव्या त्या मागण्या सलाबतजंगाकडून पुऱ्या करून घेत होता. शहानवाजखानास या गोष्टीचा राग येऊन त्याने हैदराबाद सोडले व तो औरंगाबादेस जाऊन राहिला. बरोबर निजामाचा भाऊ बसालतजंग यास घेतले होते. उद्देश हा की, फ्रेंच धार्जिण्या सलाबतजंगास गादीवरून काढून बसालतजंगास बसवावे. ह्याकरिता त्याने पेशव्यांची मदत मागितली. पेशव्यांनी मदतीच्या मोबदल्यात २५ लाखाचा मुलूख व दोन किल्ल्यांची मागणी केली.[७] सलाबतजंग औरंगाबादेस आला. इतक्यात शहानवाजखानाच्या

१. रा. खं. १, ले. २५.
२. पगडी, माराठे व निजाम, पृ. ७.
३. रा. खं. ३, ले. ४७७, ४७८, ले. ऐ. सं. १. ४.
४. पगडी, मराठें व निजाम पृ. ७.
५. रा. खं. २, पृ. १४३.
६. किता, १, ले ६५, ७३.
७. पगडी-मराठे व निजाम, पृ. ७.

फौजेत बंडावा होऊन फौजेने त्यास पळवून लाविले.[१] (२३ जुलै १७५७). शहानवाजखानाने दौलताबाद किल्ल्याचा आश्रय घेऊन आपल्या मदतीस पेशव्यास बोलाविले. पेशव्यांच्या फौजेत यावेळी त्याचा मुलगा विश्वासराव व दत्ताजी व जनकोजी शिंदे अशी समवयस्क तरूण मुले होती. विश्वासरावाच्या हाती लढाईची सुत्रे सोपवून पेशव्यांनी मराठी फौजेस औरंगाबादवर कूच करण्यास फर्माविले. लढाईस तोंड लागले. निजामाकडील कारभार निजामअल्लीने आपल्या हाती घेऊन युद्ध आरंभिले. मराठ्यांनी निजामाच्या नाड्या आवळण्याचे ठरविले होतेच. त्याप्रमाणे त्याकरिता त्यांनी दोन आघाड्या उघडल्या. औरंगाबादच्या बाजूने पहिली आणि जानोजी भोसल्यांकरवी वऱ्हाडातून दुसरी. त्यामुळे निजाम कात्रीत सापडला. त्याने बुसीस आपल्या मदतीस तातडीने बोलाविले. निजामाच्या बाजूस इब्राहिमखान गारदी तोफखान्याचा मुख्य होताच. इतक्यात दमाजी गायकवाड, पटवर्धन अशी मातबर सरदार मंडळी पेशव्यास सामील झाली. दोन्ही बाजूनी लढाईची जय्यत तयारी होऊन मराठे गोदा तीरावरून तर निजामी फौज औरंगाबादेवरून एकमेकांच्या रोखाने चालू लागली. दोन्ही सैन्यांची गाठ सिंदखेड येथे डिसेंबर तारीख १२ ला पडली. तेथे तारीख १७ डिसेंबर १७५७ पर्यंत पांच दिवस संग्राम झाला.[२] निजामी सैन्याचा पूर्ण मोड होऊन पेशव्यांच्या मागण्या निजामास मान्य करून घेऊन तह करावा लागला. तहात ठरल्याप्रमाणे २५ लाखाची जहागिर व नलदुर्ग किल्ला हीं पेशव्यास मिळाली. करार झाल्यानंतर विश्वासराव व निजाम यांची भेट तारीख ५ डिसेंबर १७५७ रोजी मोठ्या समारंभपूर्वक झाली.[३] दौलताबाद किल्ला शहानवाजखानाच्या ताब्यात राहू दिला. पेशव्याची आणि दोन निजामांची औरंगाबादेस भेट होऊन दिलजमाई झाली.

**दोन भिषण हत्त्या :**

लढाई संपल्यावर निजामाच्या दरबारातील गुंतागुतीच्या भांडणास सुरुवात झाली. सलाबतजंग, बसालतजंग व निजामअल्ली हे तिन्ही भाऊ एकत्र होऊन शहानवाजखानाचा काटा काढण्याकरिता गुप्त खलबते करू लागले. बुसीचा दिवाण हैदरजंग याने निजामअल्लीस कारभारावरून काढून हैदराबादच्या सुभ्यावर नेमणूक करविली व स्वतःकडे दिवाणगिरी घेतली. बुसीने दौलताबादच्या किल्ल्याचा ताबा घेऊन शहानवाजखानास आपल्या छावणीत अटकेदाखल ठेवून दिले.[४] निजामअल्लीने हैदराबादेस जाण्यासाठी निरोप घेण्याच्या निमित्ते एक समारंभ घडवून आणिला. हैदरजंग, विठ्ठलसुंदर

---

१. ऐ. ले. सं. १ ले. १०.

२. किता.

३. पे. द. १. ले. २५ ले. १८४.

४. पु. द. १. ले. ३८०.

वगैरे बडी मंडळी निजामअल्लीच्या भेटीस आली. तिथेच हैदरजंगास निजामअल्लीच्या माणसांनी कापून काढिले. सर्वत्र हाहा:कार उडाला. निजामअल्ली घोडयावर स्वार होऊन बुऱ्हाणपुराकडे दौडत गेला.[१] हैदरजंगाचा खून झालेला ऐकून फ्रेंचांचा एक अधिकारी लक्ष्मण याने संतापून शहानवाजखान व त्याचा मुलगा यांना ठार मारले. (११ मे १७५८)[२] यावेळी पेशवे फौजेनिशी औरंगाबादच्या जवळपास होते. शहानवाजाच्या खुनाचा सूड घेण्याकरिता ते कदाचित एकदम औरंगाबादेवर चालून येतील अशा भीतीने बुसीनें सलाबतजंगास कैद करून गोवळकोंडयाचे किल्ल्यात बंदोबस्ताने ठेविले. निजाम अल्लीस गादीवर बसवून स्वत: कारभार पाहू लागला. इतक्यात त्यास फ्रेंच गव्हर्नर लाली याजकडून हैदराबाद सोडून ताबडतोब निघून येण्याचा हुकूम आला. त्याप्रमाणे बुसी १८ जुलै रोजी सलाबतजंगाची रजा घेऊन आरकाट येथे लालीस मिळाला. याबरोबरच फ्रेंचांची हैदराबाद येथील सत्ता संपुष्टात आली. स. १७५८ मध्ये निजामअल्लीखान व जानोजी यात युद्ध झाले. निजामअल्लीने जानोजीस त्याचा खर्च देऊन तह केला. नंतर निजाम अल्लीखान हैदराबादेकडे रवाना झाला. बसालतजंगही अदोनीला निघून गेला. आता निजाम अल्लीच्या हातात सर्वाधिकार आला.[३] इब्राहीमखान गारदीही त्यास येऊन मिळाला.

निजामाकडून बुसी निघून गेल्यावर पेशव्याने निजामाचे पारिपत्य करून निजामाकडून, बऱ्हाणपूर, अशीरगड, दौलताबाद, अहमदनगर व विजापूरचे किल्ले घेण्याचे ठरविले व तसेच दक्षिणेतून मुसलमानी सत्ता नाहीशी करावी असेही ठरविले.

इब्राहीमखान गारदी याने फ्रेंचांपासून युद्धकला शिकून घेऊन आपली कवायती फौज व तोफखाना तयार केला होता. सदाशिवरावभाऊने त्यास मोठ्या पगाराची लालूच दाखवून आपल्या नोकरीत ठेवून घेतले. निजामअल्लीस याचा फार राग आला. शिवाय पेशव्यांची सत्ता वाढीस लागली असून पेशवे आपल्यावर केव्हाही हल्ला करतील हे निजामअल्ली जाणून होता. पेशव्यांनी अहमदनगरचा किल्लेदार कवीजंग यास लाच देऊन तो किल्ला आपल्या ताब्यात आणिला. त्यामुळे निजामअल्लीखानास राग येऊन त्याने सलाबतजंगासह दोन लाख सैन्य घेऊन तो पेशव्यांवर चढाई करण्यास निघाला. दोन्ही सैन्यांची गाठ उदगीरजवळ तारीख १५ जानेवारी १७६० रोजी पडली. पेशव्यांच्या बाजूस नामांकित सरदार होते. खऱ्या लढाईस तारीख २० जानेवारी पासून सुरवात झाली. पेशव्यांकडील बळवंतराव, विश्वासराव, गोपाळराव पटवर्धन, अंताजी माणकेश्वर, तुकोजी शिंदे, रायाजी पवार, विठ्ठल शिवदेव, दमाजी

१. पगडी, मराठे व निजाम, पृ. १०.

२. कित्ता.

३. कित्ता, पृ. ३९.

गायकवाड, सखाराम बापू, नाना फडणीस, आदि सरदार लढत होते. इब्राहिमखानाच्या तोफखान्याने तर निजामाची दाणादाण उडविली. निजामाच्या सहाय्यास ८ ते १० हजार फौज व्यंकटराव निंबाळकर आदिच्या अधिपत्याखालीं तयार होती. तीस जाऊन मिळण्याचे व त्याची मदत घेऊन लढाई करण्याचे निजामाने ठरविले. व त्याप्रमाणे निजामाचे सैन्य धारुरच्या दिशेने चालू लागले. ह्या दोन सैन्यांची गाठ पडल्यास आपणास भारी पडेल हे मराठी सैन्याने जाणून ते सैन्य निजामाच्या सैन्यावर फेब्रुवारी २-३ तारखेस तुटून पडले. संध्याकाळपर्यंत निजामबंधूनी शौर्याची शर्थ केली.[१] त्यांच्याकडील तोफखान्याची दारू संपली व बरीच माणसे लढाईत मेली हे पाहून निजामाने पेशव्यांशी तहाची याचना केलीं त्याजवरून बहुत रदबदली होऊन निजामाने साठ लक्षाचा मुलूख व (२) अशीरगड व दौलताबाद असे दोन किल्ले आणि (३) विजापूर व बऱ्हाणपूर ही दोन शहरे याप्रमाने पेशव्यांस देऊन सलूख घडवून आणिला, छत्रपतींनी पेशव्यांचे अभिनंदन केले.

• • •

१. पगडी, मराठे व निजाम, पृ. ८०-८१.

## मराठ्यांचा कर्नाटकातील उद्योग (स. १७५१–१७६०)

# कालसूची

| | |
|---|---|
| १७४३, जून १९ . . | बाबूजी नाईक बारामतीकर यास शाहू महाराजांकडून कर्नाटकातील मुलूखगिरीचे हक्क प्राप्त. |
| १७४६, नोव्हेंबर १२. . | बाबूजी नाईक बारामतीकर यांच्या उपोषणास प्रारंभ. |
| १७४६, डिसेंबर ५ . . | सदाशिवराव भाऊ यांची कर्नाटक स्वारीवर रवानगी. |
| १७४७ . . . . | कर्नाटक मामल्याच्या हिशेबाची शाहू महाराजांकडून तडजोड. |
| १७४७, मार्च . . . | सदाशिवराव भाऊंचा कर्नाटकातून परत येताना पंढरपूर येथे मुक्काम. |
| १७५१, जानेवारी ३१ . | बाळाजी बाजीराव पेशवे यांची सदाशिवराव भाऊसह कर्नाटक स्वारी |
| १७५१, एप्रिल २४ . . | बाळाजी बाजीराव पेशवे कर्नाटक मोहिमेवरुन सातान्यास परततात. |
| १७५३, मार्च ६. . . | बाळाजी बाजीराव पेशवे यांचा श्रीरंगपट्टणास मुक्काम. |
| १७५३, मार्च २० . . | होळीहुन्नरचा किल्ला मराठे सर करतात. |
| १७५४, जानेवारी २ . . | पेशव्यांचे कर्नाटक मोहिमेकरीता पुण्याहून प्रयाण. |
| १७५४, मार्च २३ . . | कर्नाटकातील संस्थानिकांकडून बाळाजी बाजीराव पेशवे खंडणी वसूल करतात. |
| १७५४, जून ४ . . . | कर्नाटक मोहिमेवरून बाळाजी बाजीराव पेशवे यांचे पुण्यास आगमन. |
| १७५४, ऑक्टोबर . . | बाळाजी बाजीराव पेशवे, सदाशिवराव भाऊ, महादजी पुरंदरे यांच्यासह कर्नाटक स्वारीवर निघतात. |
| १७५५, ऑक्टोबर २० . | बाळाजी बाजीराव पेशवे, सदाशिवराव भाऊसह सावनूरवर जाण्यासाठी निघतात. |
| १७५६, जानेवारी . . | मराठी सैन्य बागलकोट येथे. |
| १७५६, एप्रिल २० . . | सावनूरकरांचा पेशव्यांबरोबर तह. |
| १७५६, मे २ . . . | पेशव्यांचा सावनूरहून कंचनी गावी मुक्काम. |
| १७५९, ऑक्टोबर २८ . | हैदरखानाचा सदाशिवराव भाऊ यांजवर हल्ला. |
| १७५९, ऑक्टोबर ३० . | हैदरखान, मुजफरखान व त्याचे साथीदार यांना पेशव्यांकडून कैद व शिक्षा |

| | |
|---|---|
| १७५७, जानेवारी १ . . | श्रीरंगपट्टणवरील मोहिमेकरीता [बाळाजी बाजीराव पेशवे यांचे पुण्याहून कूच. |
| १७५७, मार्च . . . | पेशव्यांचा श्रीरंगपट्टण येथे मुक्काम. |
| १७५७, जून १५ . . | श्रीरंगपट्टणच्या स्वारीहून बाळाजी बाजोराव पेशवे पुण्यास परततात. |
| १७५७, सप्टेंबर २४ . . | कडाप्पाचा नबाव अब्दुल मजीदखान ठार.] |
| १७६०, जून ४ . . . | फ्रेंचांच्या मदतीकरीता हैदर सैन्य पाठवितो. |
| १७६१, जानेवारी १४ . | ब्रिटिश पाँडेचरी जिंकून घेतात. |
| १७६१, जून . . . . | कर्नाटकात सैन्य पाठविण्याची मुकुंद श्रीपतीची पेशव्यांस विनंती. |

# ११

## मराठ्यांचा कर्नाटकातील उद्योग (स. १७५१—१७६०)

शाहू छत्रपतींच्या दरबारात स. १७२४ मध्ये श्रीपतराव प्रतिनिधींनी आपलें म्हणणे मांडले. "मराठ्यांनी प्रथम दक्षिण दिग्वजय करावा दक्षिणेत आपली सत्ता प्रस्थापून दक्षिण ताब्यात आणावी आणि मग उत्तरेकडे जावे". प्रतिनिधीचे कोणीही ऐकले नाही. शाहू महाराजांनी बाजीराव पेशव्यास हिंदु पतपादशाहीचा झेंडा हिमालयापर्यंत घेऊन जाण्यास मुभा दिली. कर्नाटक-मामला फत्तेसिंग भोसले याजवर सोंपविला. फत्तेसिंगानी १७२५-२६ मध्ये एक स्वारी कर्नाटकात नेली. दुसरी स्वारी चित्रदुर्गची बाजीराव पेशव्यांनी नेली. स. १७३९ मध्यें रघोजी भोसले व फत्तेसिंग या उभयतांनी कर्नाटकावर चाल करून तेथील नवाबास मारीले व तंजावरचा राजा प्रतापसिंग यास अभय दिले. ह्यावेळी रघुजीचा संबंध फ्रेंच सेनापती डुमासशी आला. बाळाजी बाजीराव यास पेशवाई पद दिल्यावर छत्रपतीनी पेशवे पदासाठी झुंजणाऱ्या बाबुजी नाईकास कर्नाटक मामला दिला. वास्तविक कर्नाटक सुभा, विजापूर, भागानगर आणि तुंगभद्रा व रामेश्वर मधील सर्व प्रदेश हा राजाच्या खाजगीकडचा. त्या सर्व प्रदेशात मुलूखगिरी करण्याचा हक्क बाबुजी नाईक बारामतीकर यास शाहू महाराजांनी तारीख १९ जून १७४३ च्या हुकूमान्वये दिला. ह्या मोबदल्यात बाबुजी नाईकानी दरसाली महाराजास ७ लाख रुपये द्यावयाचे असून शिवाय ५ लाख रुपये खंडणी तंजावर राजाकडून घेऊन द्यावयाची असे बा. नाईकांनी कबूल केले होते.[1] कर्नाटक क्षेत्र आपल्यास मिळाल्यावर बाबूजी नाईकांनी कर्नाटकात दोन स्वाऱ्या केल्या. पहिल्या स्वारीत त्यास निजामाकडून कडक विरोध झाला. दुसरी स्वारी स. १७४५ त केली. त्यावर कर्नाटकचा नवाब अन्वरुद्दीन याने कडाडून हल्ला चढविला आणि बाबूजी नाईकास पळवून लाविले.[2] परत येताना अर्काटच्या दक्षिणेकडील काही शहरे एप्रिल १७४५ मध्ये लुटून[3] मे महात बाबूजी नाईकाची स्वारी साताऱ्यास जास्त लाभांश न होता येऊन पोहोचली.[4] बाबूजी नाईक परत आल्यावर त्यांनी शाहू महाराजांची भेट घेऊन आपणास कर्ज झाल्याचे सांगितले.

---

१. पे. द. ४०, ले. २८.

2. Records of Fort St. Gorge, Diary and consultation Book, 1745, p 58 dt 11-3-1745.

3. Ibid, p 69.

4. Ibid, p. 92.

अशा रीतीने कर्नाटक मामला कर्ज फेडीकरीता कोणास द्यावा या बद्दलचा खल शाहू महाराज पुन्हा करू लागले. कर्नाटक मामल्यापैकी दोन वर्षाचे चौदा लाख आणि पांच लाख चंदावरचे मिळून एकूण १९ लाख रुपये वसूल शाहू महाराजास जो कोणी सरदार देण्याचे कबूल करील त्यास कर्नाटक मामला द्यावयाचा असं शाहू महाराजांनी गोविंदराव चिटणीस, बाळभट वैद्य, रघुजी भोसले व फत्तेसिंग भोसले यांच्यासमोर सांगितले.[१] शेवटी फत्तेसिंग भोसले यांनी वीस लाख रुपये देण्याचे कबूल केल्यावरून त्यास कर्नाटक मामला महाराजांनी दिला.[२] या गोष्टीचा राग बाबूजी नाईकास येऊन तेही कर्नाटकच्या स्वारीस गेले (ऑक्टोबर १७४५). अर्काटपर्यंत गेल्यावर त्यांना निजामाने अडविले.[३] त्यावेळी निजामाचे मन वळविण्याच्या हेतूने त्यांनी निजामाची भेट घेण्यासाठी आपली माणसे पाठविली.[४] त्याचा उपयोग न होता निजामाचा विरोध वाढतच चालला. फेब्रुवारी १७४६ मध्ये नासिरजंग आणि कर्नाटकातील लहानमोठे संस्थानिक यांनी बाबुजी नाईकांचा पराभव केला. त्यास त्यांनी पळवून लाविले.[५] पराभूत बाबुजी नाईक काही वसूल न करता सैन्याच्या पगाराची थकबाकीसुद्धा न देता साताऱ्यास छत्रपतींकडे चार पांच लाख रुपयाची मागणी करण्याकरीता आले.[६] शाहू महाराजांनी बाबुजी नाईकांच्या पराक्रमाची उद्रेक येणारी कहाणी ऐकून त्यास ते चिडून बोलले की, "महाल व खंडणीचे ऐवज येणे त्यांचा हिशेब पाहून दुसरा सुभा नेमून त्याजपासून काम करवितो". महाराजांचे बोलणे सहन न होऊन बाबूजी नाईकांनी विष प्राशन केले. हे शाहू महाराजास समजल्यावर त्यांनी बाबुजी नाईकांची समजूत काढून कर्ज निवारण्याकरीता पैसे देऊन कर्नाटक मामला सदाशिवराव भाऊ यास लावून दिला.

नाईकांनी निजामाची भेट घेऊन कर्नाटकातील मराठी मुलुखातून आपणास निजामाने वसूल करण्यास मदत करावी असे विनविले. पण निजामान गोड बोलून या बाबतीत काही केले नाही.[७] त्यामुळे बाबुजी नाईकास फार वाईट वाटले. एवढ्यात शाहू महाराजांकडून बाबूजी नाईकास साताऱ्यास येण्याकरीता बोलावणे गेलें.[८] बाबुजी नाईकास याचा राग येऊन त्यांनी व त्यांचे बंधू आबाजी यांनी विष घेऊन आत्महत्या करण्याचे ठरविले. रघुजी भोसले यांच्या सांगण्यावरून ते उपोषणाचा आपला विचार सोडून देणार होते.[९] पण

१. पु. द. १, ले. १५५.
२. शाहू दप्तर, रु. १६, पु. ४, पत्र २३ मार्च १७४५.
३. पे. द. २५, ले. १०.
४. पे. द. १५. ले. १२–१३.
५. Burhan's Tusak'i—Walajahi, vol. I, p. 104.
६. चिटणीस, शाहू महाराजांची बखर, पृ. ११०–१११.
७. पे. द. २५, पृ. २३.
८. ऐतिहासिक पत्रव्यवहार लेख, ५३.
९. पे. द. २५, ले. २३, पृ २४.

रघुजींवर विश्वास नसल्यामुळे त्यांनी उपोषण चालू ठेवले. बाबुजी नाईकांचे उपोषण १२ नोव्हेंबर १७४६ पासून १५ दिवस चालू असावे.[1] शेवटी शाहू महाराजांच्या सांगण्यावरून बाबूजी नाईकांनी आपले उपोषण सोडले[2] तेव्हा त्यास महाराजांनी १७४७ सालाकरिता कर्नाटक मामला हिशेबाची तडजोड करून दिला.

त्या अगोदर करवीर छत्रपतींकडून कृष्णेच्या उत्तरेकडील प्रदेशाची खंडणी वसूल करण्याचे काम बाबूजी नाईकानी आपल्याकडे घेतले होते. पण ठरविलेल्या वसुलापैकी काहीच न पोहोचल्यामुळे संभाजी छत्रपतीस राग येऊन ह्या प्रकरणाचा निकाल लावण्यासाठी साताऱ्यास शाहू छत्रपतींकडे आले आणि त्यांच्याकडे त्यांनी बाबुजी नाईकाविरुद्ध तक्रार गुदरली. त्यावेळी पेशव्यांनी कर्नाटक मामला आपणास मिळण्यासाठी साताऱ्यास आपला मुक्काम ठोकलेला होता. त्यांच्या प्रयत्नास यश येऊन शाहू राजांनी आपल्या हिश्श्याची मामलत आणि संभाजी छत्रपतींच्या हिश्श्याचा कर्नाटकातील वसूल करून देण्याची कामगिरी पेशव्यांवर सोपविली.[3] पेशवे कर्नाटक मामला आपणास मिळण्यासाठीं १७४१ पासून प्रयत्न करीत होते. त्यांच्या या प्रयत्नास १७४६ च्या अखेरीस यश आले. महाराजांनी कर्नाटक मामला पेशव्यांवर सोपविल्यावर पेशव्यांनी १६ वर्षाच्या सदाशिवराव भाऊची रवानगी कर्नाटकात फौज देऊन केली.[4] (५-१२-१७४६). भाऊस निजामाकडून अडथळा होणार हे पेशव्यास ठाऊक होते.[5] पण स्वतः पेशव्यावरच शाहू महाराजांची गैरमर्जी होऊन त्याजकडून महाराजांनी पेशवेपद तात्पुरते काढून घेतले[6] महाराजाची समजूत होऊन पेशवेपद नानासाहेबास पुन्हा प्राप्त होण्यास २ महिन लागले. त्या काळात सदाशिवराव भाऊने सोंधे, बिदनूर,[7] या पाळेगारांकडून खंडणी वसूल केली. मार्च १७४७ पर्यंत त्यांनी जवळजवळ ६० हजार रुपये वसूली केली.[8] त्यानंतर सावनूरास गेले. सावनूरच्या नबाबांकडून खंडणी घेऊन,[9] भाऊसाहेब १७४७ च्या मे महिन्यात कर्नाटकातून पुण्यास येण्यासाठी पंढरपुरी आले.[10] भाऊसाहेबांच्या रोजकीर्दीवरून भाऊंनी या स्वारी १ लाख ६० हजार रुपये वसूल केले आणि स्वारीकरता २० हजार रुपये खर्च केले.[11]

---

१. ऐ. प. ले. ५३ ; पे. द. ४०–४३.

२. पे. द. २८. २.

३. ऐ. प. ले. ३३.

४. रा. खं. २, पृ. ११४.

५. ऐ. प. व्य. ६५, ५९.

६. कित्ता, ६५.

७. पत्रें, यादी, वगैरे, २५.

८. सदाशिवभाऊ रोजकीर्द, रू. ३४.

९. कित्ता, दि. १८-४-१७४७.

१०. पु. द. १. ६२.

११. सदाशिवभाऊ रोजकीर्द, रु. ३४, खोवरेकर, म. खा. मु. पृ. २८६.

बाबूजी नाईकांची कर्नाटकासंबंधीची कटकट पेशव्यांच्या मागे शाहू छत्रपति निधनापर्यंत चालू राहिली. सांगोल्याच्या तहानंतर कर्नाटक मामला स्वतः पेशव्यांकडे डिसेंबर १७५० मध्ये आला.[१] यापुढे पेशव्यांनी कर्नाटकात जातीने लक्ष घालण्याचे ठरविले.

फत्तेसिंग भोसले यांनीही पेशव्यांची चलती लक्षात घेऊन आपला पाठींबा पेशव्यास दिला.[२] बाळाजी बाजीराव पेशव्यांनी कर्नाटकात चाललेले फ्रेंच-इंग्रज झगडे याकडे बारीक लक्ष ठेवले होते. नासिरजंगाचा खून होऊन कर्नाटकात जे अराजक निर्माण झाले त्याचा फायदा घेऊन बिदनूरकर व सावनूरकर यांनी आपले हातपाय पसरून घेण्यास सुरवात केली. सावनूरच्या नबाबाने पेशव्यास खंडणी देण्याचे नाकारले.[३] यामुळेच पेशव्यांना कर्नाटक स्वारीवर निघणे भाग पडले. तसेच पेशव्यांच्या कर्नाटकातील वकीलांनी पेशव्यांविरुद्ध तयार होत असलेले वातावरण पेशव्यास पत्राने निवेदिले.[४] पेशवे सदाशिवराव भाऊंसह तारीख ३१ जानेवारी १७५१ मध्ये कर्नाटक स्वारीवर निघाले. गोदावरीच्या उत्तरेकडील प्रदेश आपल्या अंमलाखाली आणून पेशवे औरंगाबादच्या रोखाने चालले असता सलाबतजंगाने त्याची भेट घेतल्यावर त्यानी निजामाच्या गादीसाठी चाललेल्या तंटचात मदतकरू असे सांगितले, त्यावरून त्यांना १७ लाख रुपये देऊ केले.[५] पेशव्यांनी सलाबतजंगाची मागणी मान्य केली.[६] पेशवा सावनूरवर जाण्याच्या बेतात होता इतक्यात त्यास निजामाचा दिवाण रामदासपंत यानी पेशव्यांविरुद्ध ताराबाईशी सूत जमविल्याचे कळले. तसेच ताराबाईच्या सांगण्यावरून दमाजी गायकवाड साताऱ्यास चालून येत असल्याचे कळले. म्हणून पेशवे जलदीने २४ एप्रिल १७५१ रोजी साताऱ्यास परत आले.[७] हे व निजामाशी पुढील वर्षात झालेले युद्ध, सलाबतजंगाशी झालेला तह यात पेशवे १७५२ अखेरपर्यंत गुंतून राहीले.[८]

**श्रीरंगपट्टणची स्वारी (८ जानेवारी १७५३ ते १२ जून १७५३) :**

कर्नाटकात यावेळी फ्रेंचांचे प्राबल्य जास्त होते. म्हणून, फ्रेंचांशी पेशव्यांनी समझोता केला.[९] आणि सलाबतजंगाशी झालेल्या भालकीच्या तहातील अटी त्याने पाळणे, कर्नाटकातील चौथ वसूल पेशव्यास मिळणे, आणि पेशव्याने

---

१. पे. द. २८, ले. ६३.
२. कित्ता, ले. ५८ ;
३. कित्ता ले. ६६ ;
४. कित्ता ले. १०४–६, १०८–१०.
५. रा. खं. ३. ३८०.
६. पु. द. १. ३८२ (पृ. २४६).
७. रा. खं. ४; ले. २२९, १. ३४ ; काव्येतिहास संग्रह, ले. ८१.
८. पे. द. २५, पृ. १५८, रा. खं. ६, पृ. ८१.
९. Letters to Fort St. George, 1752-53, p. 261.

मागितलेली हत्यारे, दारू सामान तोफा वगैरे पेशव्यास देणे, बुसीनें कबूल केले. याउलट फ्रेंचांचे हितसंबंध राखून फ्रेंचांनी व्यापलेल्या प्रदेशातून पेशव्याने चौथ घेऊ नये हे कबूल केले आणि फ्रेंच मालास जकात माफ केली.[१] तद्वत् मुंबईच्या इंग्रजांशीहि पेशव्यांनीं सलूख घडवून आणला.[२] आणि मद्रासच्या गव्हर्नरच्या भेटीस आपला वकील भेट घेऊन पाठविला. तसेच कर्नाटक नवाब महमद अल्लीशी मित्रत्वाचा पत्रव्यवहार ठेवला.[३] एवढी तयारी झाल्यानंतर पेशव्यांनी अर्काट, कडाप्पा, कर्नूल, शिरे व सावनूर या पांच नबाबांकडून चौथाई घेण्यासाठी स्वारी केली. त्या नबाबांकडून खंडणी घेऊन पेशवे श्रीरंगपट्टणास ६ मार्च १७५३ रोजी पोहचले.[४] तेथील राजांनी पेशव्यास तीस लाखाची भरपूर खंडणी देऊन त्यांची रवानगी केली.[५] श्रीरंगपट्टणहून परत येताना तारीख २० मार्च रोजी मराठ्यांनी होळीहुन्नरचा किल्ला मोर्चे लावून घेतला. तिथून निघून धारवाड काबीज केले व तदनंतर कोल्हापूरास येऊन भाऊसाहेबांची भेट घेतली. तेव्हा करवीर छत्रपतींनी भीवगड, पारगड, वल्लभगड व कलानिधि हे चार किल्ले व पूर्वी कबुल केलेल्या खानापूर प्रांत भाऊसाहेबांचे हवाली केला.[६] इथून सासवडावरून स्वारी पुण्यास आली.

## कर्नाटक दुसरी स्वारी (ता. २ जानेवारी १७५४ ते ४ जून १७५४) :

पेशवे जून १७५३ त पुण्यास आल्यावर जानेवारी ५४ पर्यंत ते कर्नाटकात गेले नाहीत. या काळात कर्नाटकातील मुरारजी घोरपडे आदि मराठे सरदारांनी आपले उद्योग या भागात चालूच ठेवले होते. मुरारराव घोरपडे यांनी १७४० मध्ये रघुजी भोसल्यास कर्नाटक स्वारीमध्ये मदत केली होती. छत्रपतींकडे त्यांनी सेनापति पद मागितले होते. पण तसे करण्याने दाभाडे दुखविले जातील म्हणून छत्रपतींनी त्यास सेनापति पद देण्याचें नाकारले. पण त्रिचनापल्ली त्यांच्या ताब्यात दिली. मुरारराव घोरपडे काही वेळा इंग्रजांची बाजू, तर काही वेळा फ्रेंचांची बाजू घेऊन कर्नाटकातील घडामोडींमधून आपला फायदा करून घेत होता. पेशव्यांनी कर्नाटकात न येता कर्नाटक मामला आपणास द्यावा अशी आपली इच्छा त्यांनी पेशव्यास कळविली.[७] पण पेशव्यांनी कर्नाटक मामला आपल्याकडे ठेवून घेतल्यामुळे घोरपड्यांची निराशा झाली. तरीही मुराररावांनी पेशव्यांचा हस्तक म्हणून आपण कर्नाटकात कामगिरी बजावण्याचे कबूल केले.[८]

---

१. Ibid, pp. 263-264.

२. पे. द. २८, पृ. ११४.

३. कित्ता, ले. ९७, पृ. १२९.

४. बाळाजी बाजीराव रोजनिशी, २, पृ. २५०.

५. पे. द. २८, ले. १२५-६.

६. रा. खं. २, पृ. १२६.

७. पे. द. २८, ले. ६१.

८. कित्ता ३५.

चंदासाहेबाचा पराभव करण्यासाठी मुराररावांनी इंग्रजास मदत केली आणि इंग्रजास व फ्रेंचांस आपला दबदबा बसेल एवढा पराक्रम त्यांनी इंग्रज फ्रेंच यांच्या कर्नाटकातील लढाईत गाजविला.[१] चंदासाहेबास मारल्याची बातमी मुरारराव घोरपड्यांनी ताराबाईंना कळविली.[२] यात मुराररावाचा हेतू असा असावा की, करवीरकर छत्रपतींनी कर्नाटक मामला आपल्या स्वाधीन करावा.

इंग्रज आणि कर्नाटक नबाव यांच्या भांडणात मुराररावांनी मध्यस्थी केली व दोघांकडूनहि पैसे घेतलें.[३] तसेच फ्रेंचांबरोबर तह केला[४] व पुढील भांडणात ते इंग्रजांविरुद्ध लढले. आणि इंग्रज फ्रेंचांच्या कलहात भाग घेऊन त्यांनी आपल्या हातून गेलेली त्रिचनापल्ली पुन्हा मिळविली.[५] या घडामोडी पेशव्यास पेशव्यांचा कर्नाटकातील वकील लिहून कळवित होता. त्यान पेशव्यास कर्नाटकात त्वरीत येण्यासाठी लिहिले. त्याप्रमाणे पेशवे २ जानेवारी १७५४ रोजी पुणे सोडून कर्नाटक स्वारीस निघाले. हरपनहल्ली, बागलकोट, होटल्ली, कुडादंगी, बिदनूर इत्यादि संस्थानिकांकडून तारीख २३ मार्च १७५४ पर्यंत ३ लक्ष ६ हजार एवढी खंडणी पेशव्यांनी वसूल केली.[६] अशा रीतीने ज्यांनी खंडणी दिली त्या त्या पाळेगारांना अभय देऊन पेशवे ४ जून १७५४ रोजी पुण्यास परत आले.

वरील स्वारीत पेशवे कर्नाटकात असता त्यास निजाम पुण्यावर चाल करून जाणार अशी बातमी समजली. म्हणून पेशवे घाईने पुण्यास परतले. फेब्रुवारी १७५४ मध्ये मराठे-निजाम संबंध जास्तच बिघडले. पेशव्यांच्या कर्नाटकातील स्वाऱ्या निजामास बिलकूल आवडल्या नाहीत. त्यांचे म्हणणे असे की, बादशहाचे दक्षिणेतील प्रतिनिधी या नात्याने कर्नाटकाची खंडणी वसूल करण्याचा हक्क आपला असे असता पेशवे कर्नाटकातून चौथाई वसूल कशी करतात, हा विचार निजामास भेडसावू लागला. तसेच त्याजवळ गृहकलहामुळे त्याची तिजोरीतील शिल्लकही आटली. सैनिकांचा पगार देण्यास पैसे नसल्यामुळे ते बंड करतात की काय अशी त्यास धास्ती वाटू लागली. तेव्हा कर्नाटकात जाऊन वसूल करावा तर पेशवे कर्नाटकात गेलेले. त्यांस मागे आणून आपल्याकरिता कर्नाटक क्षेत्र मोकळ रहावे म्हणून पेशवे कर्नाटकात असताना फेब्रुवारी १७५४ मध्ये निजामाने पुण्यावर स्वारी करण्याचे ठरविले. पेशव्यांनी हे ऐकताच ते पुण्यास लगबगीने आले. इतक्यात दिल्लीतील शहाबुद्दीन निजामीवर हक्क सांगतो की काय अशी भीति वाटून त्याने पेशव्याशी मैत्री केली व दोघांनीहि म्हैसूरच्या राजाविरुद्ध चाल करून जाण्याचे ठरविले.[७]

---

१. Orme, History of Military Transactions in Hindostan. I, p. 360.

२. पे. द. २८, ले. ८५.

३. Burhan, II, p. 29.

४. भा. इ. सं. मं. त्रै. अंक २६, पृ. २२–२६.

५. Orme, I, p. 310.

६. पे. द. रोजकीद, ह. ५२.

७. Martineau, Bussy, p. 171.

**पेशव्यांची तिसरी कर्नाटक स्वारी (ऑक्टोबर १७५४ ते १२ एप्रिल १७५५) :**

ऑक्टोबर १७५४ मध्ये पेशवे कर्नाटकात स्वारीवर जाण्यास निघाले. बरोबर सदाशिवराव भाऊ व महादजी पुरंदरे होते. पेशवे सैन्यासह कृष्णा काठच्या धासर गांवापर्यंत गेले.[१] त्याचवेळी निजाम म्हैसूर राज्याच्या सीमेवर येऊन ठाकला होता.[२] त्याच्याहि मनात मराठे व आपण मिळून दोघांनीही म्हैसूरवर स्वारी करावी असे होते. पण पेशव्याच्या मनात म्हैसूरवर नैऋत्येकडून हल्ला करून आपल्यालाच खंडणी मिळविण्याचे आहे अशी बातमी निजामास लागली.[३] तेव्हा निजामान हैद्राबादेस नुकताच हजर झालेल्या बुसीस आपल्या मदतीस बोलाविले. बुसी जलद गतीने निजामास येऊन मिळाला आणि त्याने म्हैसूरच्या दलवाईस खडसावून पत्र लिहिले की, दख्खनच्या सुभेदारास खंडणीची बाकी न पोहचल्यास सुभेदार मराठ्यास सामील होऊन दोघेही म्हसूरचा नाश करतील.[४] म्हसूर राजावर या तंबीचा योग्य तो परिणाम होऊन त्याने निजाम सलाबतजंग यास खंडणी-दाखल ५२ लाख रुपये दिले. पेशव्यास ही बातमी समजली तेव्हा पेशवे-सुद्धा दलवाईकडे आपल्या खंडणीची मागणी करू लागले. त्यावर बुसीन निजाम व दलवाईतर्फे पेशव्यास भेटून त्याची समजूत काढीली. पेशवे तद्नंतर पुण्यास आले.[५] पेशवे कर्नाटकातून पुण्यास परत येताना पेशव्यांचे सरदार महादोबा पुरंदरे ऐनापूर गांवी (अदनी, बेळगांव जिल्हा) पेशव्या-पासून वेगळे होऊन बेदनुरावर गेले. त्याजला अन्ताजी माणकेश्वर व समशेरबहाद्दर आपल्या सैन्यासह येऊन मिळाले.[६] शिवाय मुजफरखान गारदी आपल्या तोफखान्यांसह महादजी सोबत होता. महादजी पुरंदऱ्यांनी सोंदे, विदनूर, बसवापट्टण, चित्रदुर्ग आणि लहान मोठ्या पाळेगारांकडून खंडण्या वसूल केल्या.[७] ह्याच स्वारीत त्याचे महादजींशी बिघडून त्याने मराठ्यांची नोकरी सोडली व तो श्रीरंगपट्टणास राजाच्या नोकरीत गेला.[८] तिथून कर्नाटकातील अनेक सत्ताधिशांशी मैत्रीचे संबंध जोडून पेशव्यांच्या विरोधी गट निर्माण केला. विशेषतः त्याने सावनुरकरास पेशव्यांविरुद्ध चिथविले.

**सावनूर स्वारी (२० ऑक्टोबर १७५५ ते १९ जुलै १७५६) :**

मुजफरजंगाची चिथावणी सावनुरकर नबावास मिळाल्यावर त्यान मुरारराव घोरपडे यास आपल्या पक्षात ओढले. कर्नाटकातून पेशव्यांची

१. बाळाजी बाजीराव रोजनिशी, भा. २, पृ. २५४.
२. Martineau, Bussy, p. 171. Wilks, Historical sketches of the south India, I, p. 346.
३. Martineau, Bussy, p. 181, Malleson, The Decisive Battles of India p. 482 Orme I, p. 403.
४. Malleson, op cit pp. 480-82.
५. Orme op cit I, p. 405, Pillai, IX, p. 260.
६. शिंदेशाही इतिहासाची साधने, भा. ३, पृ. २३४. ३५.
७. कित्ता, ले. २९५.
८. सरदेसाई, पेशवा बाळाजीराव, भा. २, पृ. १३९.

सत्ता उखडून टाकणे हा यांचा डाव पेशव्यास कळताच स्वतः पेशवे सदाशिवराव भाऊसह २० ऑक्टोबर १७५५ त सावनूरवर जाण्यास निघाले. वानवडी बेतगीवरून मराठी सैन्य जानेवारी १७५६ त बागलकोटास आले. बागलकोटचा किल्ला घेतल्यावर पेशवे तारीख १२ जानेवारी १७५६ ला होस्केरीस आले.[१] पेशवे आपल्याच दिशेने चालून येत आहेत हे सावनूर नबाबास ठावूक असल्यामुळे त्यानेही पेशव्यांशी झुंज देण्याची जय्यत तयारी केली. पेशव्यानी मुजफरजंगाचा तोफखाना आपल्या विरुद्ध बाजूस आहे ह्याची जाणीव ठेवून आपल्याकडेही फ्रेंचांच्या मदतीने तोफखाना उभारला व तोफखान्याची मुखत्यारी पानसे यास दिली. उत्तरेकडून आपले सैन्य बोलाविले. निजामास मदतीस येण्यास पत्र पाठविले. सावनूरच्या नबाबाचा निजामासहि राग होताच. सावनूरकर नबाब दक्षिण सुभेदाराचा मांडलीक न समजता आपण दिल्लीच्या बादशहाचे मांडलीक आहोत, असे सांगून त्याने निजामास खंडणी देण्याचे नाकारले म्हणून निजामाने आपले सैन्य पेशव्यांच्या मदतीस पाठविले[२] (फेब्रुवारी १७५६). पेशव्यांनी जय्यत तयारीनिशी सावनूरवर हल्ला चढविला.[३] सावनूर किल्ला जिंकण्याचे उद्दिष्ट ठेवून किल्ल्यास वेढा दिला.[४] शत्रू मोठ्या हिंमतीचा, त्याचा पराभव होण्यास वेळ लागेल हे ओळखून पेशव्यांनी होळकर व विठ्ठलराव विंचूरकर यांना किल्ला जिंकून घेण्याचे काम दिले.[५] विंचूरकर, होळकर या सर्वांनी किल्ल्यावर जोराचा हल्ला केला. इतक्यात बुसी निजामाच्या सैन्यासह येऊन पेशव्यांस मिळाला. त्यावेळी बुसीच्या तोफखान्याने सावनूर किल्ल्यावर आग ओकावयास सुरवात केली.[६] सावनूरकर नबाब हैराण होऊन त्याने सलुखाची बोलणी लावली.[७] व तारीख २० एप्रिल १७५६ रोजी सावनूरकरांचा पेशव्यांशी तह झाला.[८] तहात ठरलेली ११ लाख रुपयाची खंडणी पेशव्यास मिळाली[९] शिवाय सव्वा आठ लक्षाचा मुलूख सावनूरकरांकडून पेशव्यांनी आपल्या ताब्यात घेतला. त्यामुळे मराठी राज्याची हद्द कृष्णेवरून तुंगभद्रेस पोंचली. सर्व सरदारांस शाबासकी देऊन पेशव्यांनी सावनूर सोडून कंचनी या गांवी २ मे १७५६ रोजी मुक्काम केला. पेशव्यांच्या मनात तीन गोष्टींचे निकाल लावावयाचे होते: (१) बुसीची निजामाच्या दरबारातून हकालपट्टी; (२) मुझफरखान गारदीस सैन्यात घेणे; (३) मुरारराव घोरपडे, जे सावनूरकरांच्या बाजूने लढत होते, त्यांच्याशी समझोता करणे.

१. खोबरेकर, मराठ्यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम, पृ. २७४.
२. Malleson, Rise of the French Power in India, p. 484.
३. पे. द. २८, ले. १२२.
४. कित्ता, ले.१२१.
५. विं. घ. इ., पृ. २९.
६. राजवाडे, खंड ३, ले. ४७७.
७. कित्ता, ले. ४७२.
८. Commiade, Bussy in the Deccan, p. 245.
९. Military Country Correspondence, Vol. VI, No, 157, p. 76.

बुसीसंबंधी सलाबतजंगाच्या मनात वाईट भरवून, सलाबतजंगाकडून पेशव्यांनी बुसीस काढून लाविले.[१] मुझफरखान गारदीची स्थिती सावनूरच्या पराभवानंतर फारच हलाखिची झाली होती. त्याची दरिद्रावस्था होऊन तो बंगालला निघून जाण्याच्या गोष्टी करू लागला. आणि पेशव्याची चाकरी करण्यास आपण आनंदाने तयार आहो असे त्याने बोलून दाखविले.[२] पेशव्याने अखेरीस मुझफरखान गारदीस आपल्याकडे चाकरीस ठेविले.[३] खानाने मुरारराव व पेशवे यांचा समझोता घडवून आणला. मुझफरखान गारदीस नोकरी देण्यास सदाशिवराव भाऊंचा विरोध होता. मुझफरखान पेशव्यांच्या नोकरीत आल्यावर, त्याने कोंकणात आपल्यावर सोपविलेल्या अनेक कामगिऱ्या बजाविल्या. भाऊसाहेबास मुझफरखानाचे महत्त्व वाढू द्यावयाचे नव्हते. भाऊंनी मुझफरखानाचा शत्रु इब्राहिमखान गारदीस आपल्याकडे नोकरीस ठेऊन घेतले. मुझफरखानास अर्थातच् याचा राग आला. त्याने आपला जावई हैदरखान यास भाऊसाहेबांचा खून करण्यास पाठविले. गारपिरावर भाऊसाहेब तंबूत असता तारीख २८ ऑक्टोबर १७५९ रोजी हैदरखानाने भाऊंच्या पाठीत खजीरचा वार केला. लागलीच हैदरखान आणि त्याचे मुझफरखान आदि साथीदार यांना पेशव्यांनी पकडून ३० ऑक्टोबरला त्यांचा निकाल लावला.

पेशव्यांनी मुरारराव घोरपड्यांशी समझोता करून त्यांना आपल्या बाजूस वळवून घेतले.[४] सावनूरच्या लढाईनंतर बुसीला लालीच्या बोलावण्यावरून पाँडेचरीस जावे लागले आणि मुरारराव घोरपडे पेशव्यास सामील झाले. यामुळे मराठ्यास कर्नाटक क्षेत्र मोकळे मिळाले.

**श्रीरंगपट्टणची स्वारी (१ जानेवारी १७५७ ते १५ जून १७५७) :**

कर्नाटकात स्वारी करण्यास पेशव्याचे मुख्य दोन हेतु होते.— (१) मराठ्यांची सत्ता वाढविणे[५]; (२) कर्नाटकातील छोट्या मोठ्या संस्थानिकांकडून खंडण्या गोळा करणे.[६] हे हेतु मनात धरून पेशव्यांनी श्रीरंगपट्टणास जाण्याकरिता १ जानेवारी १७५७ रोजी पुणे सोडले.[७] श्रीरंगपट्टणास स्वारी करण्याचे तात्कालीक कारण, म्हैसूर दरबारातील राजकारण होय. तेथील राजा आणि मंत्री यांतील झगडा इतका विकोपास गेला की, राजाने पेशव्यांची तावडतोब मदत मागितली. पेशव्याने ही संधी साधून हैदरखानास बरोबर घेऊन[८] ते ६० हजार सैन्यासह भीमा काठी

१. पे. द. २८, ले. १४०.
२. कित्ता, ले. १३२, १३५.
३. कित्ता, ले. ११५.
४. कित्ता, ले. १५३-१६०.
५. पे. द. २७, ले. १२७, १३५, १३६.
६. Fort. St. George Country Correspondence, Military Department 1757, p. 36.
७. राजवाडे, खंड २, पृ. १४१.
८. पेशवा बाळाजीराव रोजनिशी, भाग २, पृ. ९३.

आले.[1] तिथून पेशवे मार्गात मिळणाऱ्या संस्थानिकांकडून खंडणी वसूल करत द्रुतगतीने श्रीरंगपट्टणास आले (मार्च १७५७).[2] श्रीरंगपट्टणच्या परिसरात मराठा सैन्य येताच दलवाई, म्हैसूरचे दिवाण, नंदा राजा याची घाबरगुंडी उडाली. त्याने म्हैसूरचा सरदार हैदरअल्ली दिंडीगढला होता त्यास परत बोलाविले. दरम्यान मराठे शहरात घुसले आणि त्यांनी नंदा राजाकडें थकलेल्या खंडणीची मागणी केली. नंदा राजाने एवढा पैसा तिजोरीत नाही तो कोठून देणार असे सांगून आपली अगतिकता प्रगट केली. तेव्हा सदाशिवराव भाऊंच्या सांगण्यावरून श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यास मराठ्यांनी वेढा दिला आणि २७ दिवसपर्यंत सारखा तोफांच्या गोळ्यांचा भडीमार केला.[3] राजाने पेशव्यांना निमंत्रण पाठविताना पेशवा आल्यावर ते आपल्याकडे कोटी रुपयें खंडणी मागतील असे त्यास वाटले नव्हते. पण या वस्तुस्थितीशी सांगड घालता आली नाही. मराठ्यांनी जे गोळे सोडले त्यापैकी एक गोळा श्रीरंगपट्टण येथील रंगा स्वामीच्या देवालयाच्या कळसास लागून कळस मोडला. हे अशुभ समजून पेशव्यांनी म्हैसूरकरांतर्फे महादेव विरकर मध्यस्थी करण्यास आलेल्या सावकाराची मध्यस्थी मान्य केली.[4] तूर्त २६ लाख रुपये पेशव्यांनी घेण्याचे मान्य केले. तिजोरीत पैसे नसल्यामुळे ५ लाख रुपये रोख देऊन बाकीचे पैसे पूर्ण करीपर्यंत दलवाईने १४ परगणे मराठ्यांकडे लावून दिले.[5] याप्रमाणे म्हैसूरच्या दलवाईशी तह करून मराठे परत फिरले (एप्रिल १७५७) आणि विनापट्टण, सिरा,[6] आदि स्थळे घेत-घेत पेशवे १५ जून १७५७ रोजी पुण्यास आले. म्हैसूरहून परत येताना पेशव्यांनी बळवंतराव मेहेंदळे यास ६ हजार घोडेस्वारांसह १४ तालुक्यांची व्यवस्था पहाण्यासाठी कर्नाटकात ठेवीले.[6] अशा रीतीने मेहेंदळ्यांच्या हाताखाली मराठी सैन्य पावसाळ्यात छावणीस रहाण्याचा क्रम तिथपासून सुरू झाला. सन १७५२ ते १७५७ या पांच वर्षांत मराठ्यांनी दक्षिणेकडे व उत्तरेकडें आपले सैन्य पाठवून मराठी राज्याच्या सीमा वाढविल्या. या वेळेपासून मराठी सत्ता हिंदुस्थानातील एक मोठी सत्ता गणली जाऊ लागली.

**बळवंतराव मेहेंदळ्यांचा कर्नाटकातील उद्योग (८ मे १७५७ ते फेब्रुवारी १७५८) :**

पेशव्यांनी सिऱ्याच्या नबाबाकडून निरोप घेण्याच्या अगोदर बळवंतराव मेहेंदळ्यांच्या हाताखाली इंद्रोजी कदम, सोनाजी भापकर, विसाजी कृष्ण

१. Fort. St. George Country Correspondance, Military Deptt. 1757, p. 36.
२. Orme, II, p. 226.
३. राजवाडे, खंड २, पृ. १४१.
४. राजवाडे, खंड ३, ले. १३८, १५५.
५. पेशवे शकावली, पृ. १४१, Fort St.George Country Correspondence Mil. Deptt.1757 p. 93, Wilks, History of Mysore Vol. I, p. 359.
६. Wilks, op cit, p. 420. ऐ. ले. सं. २, पृ. ६५३.
७. राजवाडे, खंड २, पृ. १४२.

आदि नामांकित सरदार देऊन त्यास बिदनूर होस्कोटे, कोलार, कडप्पा, येथील संस्थानिकांकडून खंडणी वसूल करण्याची कामगिरी सोपविली. बळवंतरावांनी सिऱ्यापासून कोलार कडप्पापर्यंत सर्व पाळेगाराकडून खंडण्या वसूल केल्या.[१] यावेळी इंग्रजांनीहि नमते घेऊन बळवंतरावास मदत पाहिजे का म्हणून विचारले होते. हे विचारण्याचा हेतु, मराठ्यांच्या मदतीने फ्रेंचांचा पाडाव करणे हा होता.[२] पण बळवंतरावांनी इंग्रजांची मदत नाकारली. कोलार घेऊन बळवंतरावांनी अर्काटला जाऊन मराठ्यांच्या चौथाई थकबाकीची मागणी केली.[३] मराठ्यांनी बाहेर जाणाऱ्या सर्व वाटा रोखून धरल्या आणि स्वतः बळवंतराव तिरुपतीच्या दर्शनास गेले.[४] मुराररराव घोरपडेसुद्धा बळवंतरावाबरोबर होतेच. बळवंतरावांनी त्यास वसुलातून खर्चास दिले. कर्नाटकच्या नबाबास इंग्रजांची मदत न मिळाल्यामुळे त्याने मराठ्यास काही पैसे देऊन त्यांची समजूत काढली आणि त्यामुळे कडप्प्याच्या नबाबानेंहि इंग्रजांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी इंग्रज फ्रेंचांशी लढण्यात गुंतले असल्यामुळे त्यांनी मदतीचा नकार कळविला. कडप्पा नबाब खंडणी देण्याचे लांबणीवर टाकू लागल्यावर मराठ्यांनी कडप्पा किल्ल्यास वेढा दिला.[५] त्यानंतर कडप्पा नबाबाने प्रतिकार केल्यामुळें भीषण लढाई होऊन त्यात कडप्पाचा नबाब अब्दुल मजीदखान हा गोळी लागून ठार झाला (२४ सप्टेंबर १७५७). मराठ्यांच्या बाजूस संभाजी घोरपडे नांवाचे सरदार पडले. मराठ्यांनी शहरात शिरून लाखो रुपयांची संपत्ती गोळा केली. कडप्याचा नबाब पडल्यावर त्याचा भाऊ अब्दुल नजीबखान यानें लढाई सुरू केली. मराठ्यांच्या जबरदस्त माऱ्यापुढे त्याचा टिकाव न लागून त्याने मराठ्यांशी तहाची बोलणी लावली आणि राज्याचा निम्मे मुलुख मराठ्यास देऊन तह केला.[६] बळवंतरावांनी आपला वकील श्रीरंगपट्टणला खंडणी मागण्यासाठी पाठविला होता. म्हैसूरच्या दलवाईशी बोलणी चालू असताच बळवंतरावांना पेशव्यांकडून तातडीचे बोलावणे आले. त्यावरून बळवंतराव फेब्रुवारी १७५८ मध्ये पेशव्यास येऊन मिळाले. बळवंतरावांनी आपला हस्तक अमृतराव यास अर्काटच्या नबाबाकडून खंडणी वसूल करण्याच्या कामगिरीवर पाठविले. त्याने नबाबाकडून खंडणी वसूल करून[७] तो इंग्रजांच्या बोलावण्यावरून मद्रासला गेला.[८] मद्रासहून अमृतराव फेब्रुवारी १७५८ मध्ये अर्काटला आला. तेथून तो चिदूरला गेला आणि पुढे तिरपातूराच्या

१. Fort. St. George, C.C.M.D., 1757, p. 130.
२. Ibid, p. 133.
३. Orme, II, P. 227.
४. C.C., Military Depptt. 1757, p. 262.
५. पे. द. २८, ले. १९८, पृ. २३२.
६. Fort, Country Correspondence, 1758, p. 23.
७. Pillai, XI, p. 31.
८. सरदेसाई, पेशवा बाळाजीराव, भा. २, पृ. १४९.

किल्ल्यास वेढा दिला. बळवंतरावांनी त्यास वारंवार लिहिले की, या भरीस न पडणे, असे असता मोर्चे दिले. त्यांचे यांचे तोंड लागले. गोळ्यांचा मारा झाला तेव्हा यास गोळी लागून घोड्याखालीं आले. दुसरे दिवशी देवाज्ञा झाली.[१] अमृतरावांच्या शौर्याबद्दल पेशव्यांनी वाहवा केलीच पण त्याच्या शत्रूनी सुद्धा वाहवा केली.[२]

## विसाजीपंत बिनीवाल्यांची कर्नाटकातील कामगिरी :

कडप्याच्या नवाबाबरोबर तह केल्यानंतर बेदनूर आणि कर्नूल येथील खंडणी वसूल करण्याकरिता बळवंतरावांनी विसाजी कृष्ण बिनीवाले या नामांकित सरदारास सैन्य देऊन पाठविले. विसाजी कृष्णानी खंडणी आणि दरबार खर्च मागितले[३]. थोड्याशा कुरबुरीनंतर नोव्हेंबर १७५७ मध्ये विदनूर राजाने मागितलेली खंडणी दिली. ती घेऊन विसाजी कर्नूलकडे गेले आणि व्यंकटगिरी, बेलाटी, अनंतपूर, कालहस्ती, रायदुर्ग व चित्रदुर्ग या संस्थानिकांकडून खंडण्या गोळा केल्या.[४] तिथून ते अडोणीला आले.[५] मार्च १७५८ त विसाजीनी व्यंकटगिरी, जनाल ताडपुरी, आदि संस्थानिकांकडून खंडण्या वसूल केल्या आणि श्रीरंगपट्टणास जाण्यासाठी फौज पाहिजे ती पाठवावी अशी मागणी पेशव्यांकडे केली.[६] पण इतक्यात पेशव्यांचा गुंता निजामाशी वाढल्यामुळे पेशव्यांनी कर्नाटकातून आपल्या सरदारास परत बोलाविले.[७] त्यामुळें श्रीरंगपट्टणचा गुंता अर्धवट तसाच सोडून व श्रीरंगपट्टणची त्या वर्षाची खंडणी न घेता मराठ्यांना परत यावे लागलें.

## गोपाळराव पटवर्धनांची कर्नाटकातील कामगिरी :

म्हैसूरकरांकडून खंडणीची बाकी वसूल करण्यासाठी डिसेंबर १७५७ मध्ये बळवंतराव मेहेंदळ्यांबरोबर गोपाळराव पटवर्धनास बरोबर १५ हजार फौज देऊन पेशव्यांनी कर्नाटकात रवाना केले होते. १७५८ च्या सुरुवातीस इंग्रज-फ्रेंचांचे कर्नाटकात युद्ध चालू होते. त्यावेळीच मराठी सैन्य म्हैसूरवर चालून गेले.

श्रीरंगपट्टणच्या आसमंतात तळ देऊन त्यांनी नंदराजाकडे वकील पाठवून खंडणीच्या थकबाकीची मागणी केली[८]. नंदराजाने मराठ्यांनी मागितलेली रक्कम देण्याचे नाकारले. याच सुमारास नंद राजास हैदर अलीने मराठ्यांविरुद्ध

१. पे. द. २८ ले. २३९.
२. पे. द. १६. ले. १७८.
३. कित्ता, २८ ले. २०२.
४. कित्ता, ले. २०४.
५. कित्ता, २१०.
६. कित्ता, ले. २१६.
७. ऐ. ले. सं. २, पृ. ६५३–५५.
८. पे. द. २८, ले. २२६.

फूस दिली. नंद राजाने हैदरास मराठ्यांविरुद्ध लढण्यास सेनापती नेमले.[१] हैदराने सैन्याचे पगार चुकते करून मराठ्यांविरुद्ध लढण्यासाठी जय्यत तयारी केली ही बातमी मराठ्यास समजताच गोपाळराव पटवर्धन, बळवंतराव मेहेंदळे व त्रिंबकराव पेठे, हे सरदार मोठ्या सैन्यानिशी म्हैसुरावर घसरले. त्यांनी म्हैसूरच्या राजापाशी दोन वर्षाची थकबाकी मागितली. म्हैसूर दलवाईने तहाच्या वाटाघाटी अनेक निमित्ते काढून पावसाळाभर लांबविल्या. तेव्हा मराठ्यांनी शेवटी निर्वाणीचा खलिता पाठवून बंगळूरवर सप्टेंबर १७५८ मध्यें हल्ला चढविला.[२] लागलीच त्यांनी कोलार, रेवनहळ्ळी, हसकोट, या स्थळांवर हल्ले करून खंडण्या वसूल केल्या.[३] मराठ्यांचा हल्ला हैदर बंगळूरवरुन परतविण्याकरिता चालून आला. त्यामुळे मराठ्यांना बंगळूरचा वेढा उठवावा लागला. मराठा सैन्य फेब्रुवारी १७५९ मध्ये चेन्नापट्टणला आले आणि त्यांनी खंडणीकरिता म्हैसूर राजाशी बोलणी लाविली.[४] पण हैदरामुळे मराठ्यास राजाकडून खंडणी न मिळता लढाईस तोंड द्यावे लागले. बंगळूराहून परतून हैदराने मराठ्यांवर हल्ला केला. मोठी लढाई होऊन हैदराने मराठ्यांशी तहाचे बोलणे लावले.[५] तह पुरा करण्यास हैदराने दोन महिने घेतले. शेवटी तहाच्या अटी ठरल्या त्या अशा : मराठ्यांनी घेतलेली १४ ठाणी सोडून देऊन त्याऐवजी ३२ लाख रुपये रोख घ्यावे. एवढी मोठी रक्कम तिजोरीत नव्हती म्हणून मोटमोठ्या श्रीमंत लोकांवर पट्टया बसवून सोळा लाख जमा केले, ते देऊन राहिलेला १६ लाखाचा हवाला मराठी सावकारांनी पत्करला. हैदराने लागलीच आपले सरदार १४ परगण्यांचा ताबा घेण्यास पाठविले. "हैदराने गोपाळरावांचे स्वरूप नेले" असें या तहासंबंधी पेशवे गोपाळरावास लावून लिहितात.[६] यावर गोपाळरावांचे म्हणणे असे की, हैदरास जेरीस आणला म्हणूनच तो तहास तयार झाला. यावेळी इंग्रजांनी पेशव्यांची मदत मागितली होती. पेशव्यांनी गोपाळरावास इंग्रजास मदत करण्यास सांगितले.[७] इंग्रजांनी गोपाळरावांशी पत्रव्यवहार करून पांडेचरीस दौडत जाणाऱ्या फ्रेंचांचे तुकडे पाडा म्हणजे तुम्हास आम्ही खंडणी देतो असे सांगितले.[८] इतक्यात गोपाळरावास पेशव्यांनी परत बोलाविले. त्यावरून दमालचेरी खिंडीतून करनूल, सावनूर, आदि ठिकाणाहून खंडणी गोळा करत गोपाळराव १७५९ च्या पावसाळ्यात पुण्यास येऊन पोचले.[९]

---

१. मोहिबुल हसनखान, हिस्टरी ऑफ टिपू सुलतान, पृ. ८.

२. पे. द. २८ ले. २३२.

३. कित्ता, ले. २३६–२३८.

४. कित्ता, ले. २५४.

५. सरदेसाई, म. रि. पेशवा बाळाजीरांव, भा. २ पृ. १४८.

६. ऐ. ले. सं. १ ·२४.

७. Madras Records, Sundy Books, Public Deptt. 1758-59, p. 174.

८. Despathas to Fort St. George, Feb. 1759, p. 96. Orme, III, p. 464.

९. पे. द. २८ ·२६२.

### विसाजी कृष्णा बिनीवाले यांची कर्नाटकात रवानगी (१७६०-६१) :

ऑक्टोबर १७५९ मध्ये कर्नाटकात निजाम बसालतजंग उतरला. कडप्याचा नवाब आणि उपडवाडी संस्थानिक यांजकडून खंडण्या घेतल्या. तसेच निजाम-अल्ली आणि त्याचा दिवाण हे सुद्धा कर्नाटकात यावेळी धुमाकूळ घालत होते. यावेळीं पूर्व समुद्रावर फ्रेंचांनी वांदिवॉश इंग्रजांकडून जिंकून घेतले. पांडीचरीला इंग्रजांचा वेढा पडला असता त्यातून सापडलेल्या फ्रेंच सेनापती लालीस बाहेर येण्याचा मार्ग सापडेना म्हणून त्याने हैदरखानाकडे गुप्त रीतीने मदतीची बोलणी लावून फ्रेंचांनी जिकलेल्या प्रदेशापैकी निम्मे प्रदेश हैदरअल्लीकडे देण्याचे आश्वासन देऊन त्याची मदत मागितली. हैदराने ४ जून १७६० रोजी फ्रेंचांच्या मदतीकरिता सैन्य पाठविले. दुसऱ्या महिन्यात त्याने आणखी सैन्य पाठवून फ्रेंचांवरील संकट दूर केले असते, पण श्रीरंगपट्टणला राजाने त्याच वेळी त्याला नोकरीतून दूर केले. परंतु हैदरअल्लीचा दोस्त राजाचा दिवाण खंडेराव याच्या चतुराईने हैदरअल्लीस पुनः सरसेनापतीपद मिळाले. पण कालांतराने हैदरास सेनापति पद दिल्याचा पश्चाताप खंडेरावास झाला. त्याने विसाजी कृष्ण बिनीवाले यांची मदत घेऊन हैदराचा नक्षा उतरविण्या-करिता बंगलोरास वेढा दिला.[१] वेढा ३ महिनेपर्यंत चालला. हैदराने तहाच्या बोलण्यास सुरुवात केली.[२] यावेळी विसाजीपंतास उत्तरेकडे जाण्यासाठी पेशव्यांकडून बोलावणे आल्यामुळे मोठ्या कष्टाने मराठ्यांनी तीन लाख रुपये खंडणी व बरमहाल परगणा आपणास मिळावा अशी मागणी केली.[३] परंतु तीन लाख रुपये खंडणी घेऊन मराठे पुण्यास येण्यास परतले.[४] मराठे निघून जाताच हैदरअलीने म्हैसूरच्या राज्यकारभाराची आपल्या मनाप्रमाणे उलथापालथ करून स्वतः सर्वाधिकारी बनला.[५]

विसाजीपंतांनी बंगलोरहून परत येताना एप्रिल १७६० मध्ये फ्रेंच गव्हर्नर लाली यास आपण मदत करण्यास तयार आहोत असे लिहिले. महमदअल्ली, अर्काटचा नवाब, यास ही बातमी कळताच विसाजीपंतास वीस लाख रुपये देऊ करून फ्रेंचास मदत न करण्याचे कबूल करून घेतलें.[६] त्याप्रमाणे सन १७६१ मध्ये विसाजीपंत सैन्यासह पुण्यास येण्यास निघाले. १४ जानेवारी रोजी पांडेचरी ब्रिटिशांनी जिंकून घेतली.[७] याच दिवशी मराठ्यांचा अबदालीकडून उत्तरेस पानिपती पराभव झाला. ही बातमी हैदरास कळताच त्याने बरमहाल महाल मराठ्यांकडे देण्याचे नाकारले.[८] विसाजीपंतांनी निघताना आपला हस्तक मुकुंद श्रीपती यास कर्नाटकात ठेवले होते.

---

१. पे. द. २८, पृ. २६२.
२. Peixoto Memorins of Hyder Ali, M,A.R. 1937, p. 89, 93.
३. Wilks Vol. I p. 425.
४. खरे, ऐतिहासिक लेख संग्रह भा. २ पृ. ६८२–८३.
५. Orme III, p. 685, Wilks I, p. 433
६. Wilks I, p. 425-26.
७. Orme III, p. 722-740.
८. सिन्हा, हैदरअल्ली, पृ. ३२.

पानिपती मराठ्यांच्या झालेल्या पराभवाची बातमी कर्नाटकात वायुवेगाने पसरली. तेव्हा बहुतेक पाळेगार मराठ्यांविरुद्ध बंड करून उठले. बसालतजंगानें रायदुर्गपासून हडपननगर पर्यंतची ठाणी स्वतःच्या ताब्यात घेतली. हैदरअल्लीने सुद्धा मराठ्यांकडे दिलेली ठाणी परत मिळविली.[1] मराठ्यांच्या नोकरीत असलेले स्थानिक लोक नोकरी सोडून हैदराकडे गेले. पेशव्यांनी कर्नाटकातील मराठ्यांची सत्ता मिळविण्यासाठी सैन्य रवाना करावे अशी विनंती जून १७६१ मध्ये पेशव्यास मुकुंद श्रीपतीने केली.[2] पण यावेळी पेशवे सदाशिवराव भाऊस मदत करण्यास उत्तरेस निघाले होते. विसाजीपंत व गोपाळराव यांना त्यामुळे पुण्यासच रहाणे भाग होते.

पेशव्याने कर्नाटक मामला स्वतःकडे न घेताना मुरारराव घोरपड्यांकडे सोपवून त्यासच या बाबतीत मुख्याधिकार दिले पाहिजे होते. म्हणजे, मराठ्यांच्या उत्तरेत झालेल्या दाणादाणीचा परिणाम कर्नाटकातील मराठ्यांची सत्ता विस्कळीत होण्यात झाला नसता. बुंदेले, शिंदे, होळकर, यांच्यासारखेच कर्नाटक प्रांत मुरारराव घोरपडे किंवा गोपाळराव पटवर्धन यांपैकी कोणी सरदाराकडे सोपविला असता तर कर्नाटकातील मराठ्यांच्या सत्तेस धक्का लागला नसता. पेशव्यांनी कर्नाटकांत मुलुखगिरी करून मराठी सत्ता १७५९ पर्यंत कर्नाटकात फैलाविली. ती एवढी जबरदस्त होती की त्याला पोर्तुगीज किंवा इंग्रज किंवा इतर कोणतीही सत्ता विरोध करू शकली नसती. हे खुद्द पोर्तुगीजांनी मान्य केले आहे.[3] मुलुखगिरी करून पैसा मिळविताना पेशव्यांनी जिंकलेल्या प्रांतांचा अंमल व्यवस्थित चालण्यासाठी आपली कारभारविषयक यंत्रणा पक्की केली नाही.



---

१. Kirmani, Nishan-i-Haidari, p. 89; Wilks I, pp. 425-26

२. पे, द. २८, पृ. ३३२.

३. पिसुर्लेकार, पोर्तुगिझ व मराठाज, भा. ६, पृ. ४५.

# बाळाजी बाजीराव व उत्तर हिंदुस्थान
## (सन १७५२ ते १७६१)

## कालसूची

| | |
|---|---|
| १७३९ . . . . . | नादिरशहाची दिल्लीवर स्वारी. |
| १७४७ . . . . . | अहमदशहा अब्दालीने नादिरशहास ठार मारून काबूलचा बादशहा झाला. |
| १७४८ . . . . . | अब्दालीची हिंदुस्थानावर पहिली स्वारी |
| १७४८, मार्च-एप्रिल . . | अलिअहंमदखान रोहिल्याने रोहिलखंडात अंमल स्थापिला |
| १७४९, जून २१ . . | जोधपूर राजा अभयसिंग याचा मृत्यू. |
| १७४९, नोव्हेंबर १२. . | कायमखान व पठाण याजमध्ये लढाई होऊन कायमखान ठार होतो. |
| १७५०, जुलै ६. . . | सफरजंग वजिर सैन्यासह निघतो. |
| १७५०, सप्टेंबर १३ . . | वजिराच्या व पठाणाच्या फौजांची झुंज; वजीराचा पराभव. |
| १७५१, फेब्रुवारी . . | मराठे सफदरजंगाचे मदतीसाठी आग्र्याकडे कूच करतात |
| १७५१, फेब्रुवारी २० . | शिंदे, होळकर वजीरास येऊन मिळतात. |
| १७५१, मार्च २० . . | मराठी फौजा दुआबात शादिलखान व बंगश यांच्या फौजांचा पराभव करतात. |
| १७५१, एप्रिल १९ . . | मराठे फत्तेगड काबीज करतात. |
| १७५१, जुलै ८. . . | बरसासिंग जोधपूरचे राज्य मिळवितो. |
| १७५२ . . . . . | अब्दाली पंजाबवर चालून येतो. |
| १७५२, मे ५ . . . | वजीर शिंदे होळकरांच्या पन्नास हजार फौजांसह दिल्लीस जातो. |
| १७५२, मे १४ . . . | गाजी उद्दीनाचे नावे निजामीचे फर्मान बादशहा काढतो |
| १७५२, ऑगस्ट २१ . . | जावेदखानाचा खून. |
| १७५२, सप्टेंबर २३ . . | बरससिंगचा मृत्यू. |
| १७५२, ऑक्टोबर १६ . | गाजी उद्दीनचा मृत्यू. |
| १७५३, जून १२ . . | राजेंद्रगीर गोसावी मारला जातो |



काबूल २
काश्मीर ३
कंदाहार १
लाहोर ४
मुलतान ६
दिल्ली ५
बिकानेर
जेसलमेर
जोधपूर
जयपूर
आग्रा
अजमेर
सिंध
गुजरात १५
अलाहाबाद १३
बिहार ११
माळवा १४
गोंडवना
बंगाल १२
खानदेश १६
वऱ्हाड १७
औरंगाबाद
ओरिसा २०
हैद्राबाद २१
विजापूर
अरबी समुद्र
बंगालचा उपसागर
सिंहलद्वीप
उ
— मराठयांनी पायाखाली घातलेला प्रदेश
मुघलांचे २२ सुभे
भारत १८ वे शतक

# १२

## बाळाजी बाजीराव व उत्तर हिंदुस्थान

## (सन १७५२ ते १७६१)

मराठे जयपूर प्रकरणात गुंतले असतां अयोध्येच्या नबाबाचा वकील राजा रामनारायण हा बंगश रोहिल्याविरुद्ध आपल्या मालकास मदत करावी म्हणून एकसारखा मराठे सरदारांना विनवीत होता.[१] अयोध्येचा नबाब सफदरजंग याने मराठ्यांनी रोहिले पठाणांचा पराभव केल्यावर पन्नास लाख रुपये देण्याचा करार केला होता.[२] मराठ्यांनी सफदरजंगाचे मदतीस जाण्यासाठी सन १७५१ च्या फेब्रुवारीमध्ये जयपुराहून आग्र्याकडे कूच केले.[३]

उत्तरेत यावेळी पेशव्यातर्फे शिंदे, होळकर, अंताजी माणकेश्वर, हिंगणे गोविंदपंत बुंदेले असे सरदार वावरत होते. ह्या सरदारांपैकी शिंदे, होळकर या प्रबळ सरदारास सफदरजंगाने आपल्या मदतीस का बोलाविले हे समजण्यासाठी मोगल दरबारची त्यावेळची राजकीय स्थिति लक्षात घेणे जरूर आहे.

### मोगल दरबारांतील दुफळी व रोहिल्यांचा उदय :

इराणचा बादशहा नादीरशहा याने सन १७३९ मध्ये दिल्लीवर स्वारी केल्यापासून दिल्लीच्या मोगल बादशाहीची अवनति वाढतच गेली. यावेळीं महमदशहा गादीवर होता. त्याचे कारकीर्दीत (१७१९-१७४८) अयोध्येचा सुभेदार, दक्षिणचा सुभेदार आणि बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांताचे सुभेदार मोगल बादशहास केवळ देखाव्यापुरते सार्वभौम मानीत असत, बाकी या प्रांतात ते स्वतंत्रपणे राज्यकारभार करीत होते. शिवाय आपल्या पश्चात आपल्या घराण्यातील पुरुषांकडे हा प्रांत एक स्वतंत्र राज्य म्हणून चालेल अशी या सुभेदारांची खटपट अव्याहत चालू होती. यावेळी मराठ्यांनीसुद्धा आपली सत्ता स्थापण्याचा प्रयत्न चालविला. मराठे जसे खिळखिळ्या मोगल सत्तेचे लचके तोडण्यास उद्युक्त होते तसेच हिंदुस्तानात १५५६ मध्ये पानिपतावर पराभव पावलेल्या पठाणांचे वंशज आपली गेलेली सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याचे उद्योग करीत होते. पठाणांनी चालू परिस्थितीचा फायदा घेऊन प्रचंड सैन्य उभारून गंगा व यमुना या दोन नद्यांमधील मोगलांच्या मुलुखात आपला अंमल

---

१. पे. द. २१, ले. ३८–४०, पे. द. २ ले. २८.

२. रा. खं. ६, ले. २०६, २०७; सरदेसाई, म. रि. पेशवा बाळाजीराव भा. २, पृ. २१०.

३. पे. द. २७ ले. ६४, ६५.

प्रस्थापित करण्यास सुरवात केली. बादशहास सिंहासनावरून दूर न करता बादशाही तक्ताचे संरक्षण करावयाचे, तेथें कोणी हिंदू सत्ताधीश दिल्लीच्या तक्तावर आणावयाचा नाही असें मराठ्यांनी अगोदरच जाहीर केल होत. त्यामुळे पठाणांनी आपले हातपाय आपआपल्या प्रांतात पसरविण्यास सुरवात केली. महमद बंगश याने फरुकाबाद शहर सन १७१४ त वसवून तेथे आपली राजधानी उभारली. म्हणून पठाणांना फरुकाबादचे रोहिले या नावाने संबोधिले जाते. सन १७४१ च्या सुमारास अलिमहंमदखान रोहिल्याने बरेली, मुरादाबाद, हारदोई वगैरे मुलुखावर आपली सत्ता प्रस्थापित केली. नंतर मोगल दरबारातील इराणी पक्षाच्या शिया पंथी अधिकाऱ्यांचा पाडाव करण्याचे ईर्षेने तुराणी पक्षाचा सुनी पंथी पुढारी वजीर कमरुद्दीनखानाने त्यास कायेर उर्फ रोहिलखंड प्रांताचा सुभेदार नेमल्याबद्दल बादशहाकडून फर्मान काढले. नादिरशहा इराणचा बादशहा झाल्यापासून पठाणांची अफगाणिस्थानातील सत्ता सपुष्टात आली होती. तेव्हा पुष्कळ पठाण नोकरी शोधण्यासाठी हिंदुस्थानात आले. अलि महमंदखान रोहिल्याने त्या पठाणांची आपल्या सैन्यात भरती केली. सन १७४२ सुमारास अलि महंमदखानाकडे जवळ जवळ तीस-चाळीस हजार फौज होती. सन १७४७ मध्ये अहमदशहा अबदाली या बलिष्ठ सेनापतीने इराणचा बादशहा नादिरशहा यास ठार मारून स्वतः काबूल येथे बादशहा झाला. अहंमदशहा अबदाली हा पठाण जातीचा असल्यामुळे या पठाण रोहिल्यांना चेव आला आणि त्यांनी आपला अंमल गंगा यमुनेच्या दुआबात (अंतर्वेदींत) वाढविण्याचे काम हाती घेतले.

अलि महंमदखान रोहिल्याने सन १७४८ च्या मार्च-एप्रिल मध्ये आपला अंमल रोहिलखंडात स्थापिला. सन १७४८ हे वर्ष दिल्लीच्या इतिहासात फार महत्वाचे आहे. याच वर्षी अबदालीने हिंदुस्तानवर पहिली स्वारी केली. अबदाली पठाण जातीचा असल्यामुळे सर्व पठाणांचा ओढा मोगल बादशहापेक्षा अबदालीकडे जास्त होता. हे बादशहा व वजीर सफदरजंग यांनी जाणून अबदालीची स्वारी हिंदुस्तानात झाली असता ती परतवून लावण्यास मराठ्यांची मदत मागितली. "आता आम्हास आश्रा राजश्री पंतप्रधान याखेरीज नाही". असे पातशहा भयभीत होऊन म्हणाला. बादशहाच्या बोलावण्याप्रमाणे पेशवे व जयाप्पा दिल्लीकडे जाण्यास निघाले. पातशहा वजीर यांनी अबदालीच्या तोंडावर जाऊन लढून त्याचा पराभव केला, तरी दिल्लीकरांकडील एक मोठा अधिकारी मीरमन्नू अबदालीस जाऊन मिळाला. मीरमन्नू व अबदाली एकत्र होऊन दिल्लीवर येणार अशा वार्ता येऊं लागल्या.[1] तेव्हा सफदरजंग वजीराने पठाणास एकमेकांविरुद्ध उठवून आपापसात लढवून त्यांचा नायनाट घडवून आणण्याचे योजिले. या योजनेनुसार द्रव्य लोभ असलेला व अति महत्वाकांक्षी पठाण काईमखान बंगश याला वजीर सफदरजंगाने बादशाही फर्मान देऊन रोहिलखंडाचे फौजदार नेमले.

१. पे. द. २१, ले. ५४.

कायमखान बंगशने रोहिल्यांकडून मुलूख ताब्यात घेण्यासाठी पठाणांकडे मागणी केली. त्या मागणीस वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या. वर कायमखान व पठाण याजमध्ये तारीख २२ नोव्हेंबर १७४९ रोजी लढाई होऊन काईमखान ठार झाला.[१]

मोगल दरबारातील मृत सरदारांची जिंदगी सरकार जमा करण्याच्या पद्धतीनुसार वजीर सफ़दरजंगाने फरुकाबाद शहर व बारा लहान गावे कायमखानाची बायको बिबीसाहेब हिजकडे राहू देऊन बाकीचा सर्व मुलूख जप्त केला व आपल्या मुलुखात सामील केला. त्यावर नवलरायास कारभारी नेमले.[२] नवलरायाने कनोज हे आपल्या कारभाराचे ठिकाण केले.

बिबीसाहेबास साठ लक्ष रुपये मोगल दरबारास द्यावयाचे होते. त्यापैकी ३-४ लाख रक्कम वारसाबद्दल नजर दिली होती. बाकीच्या पैशाकरिता तिला कनोज येथे नवलरायाचे तुरुंगात ठेविली होती. बिबीसाहेब नवलरायाचे ताब्यातून सुटली आणि तिने सर्व पठाणांना वजीर सफदरजंगाविरुद्ध चिथाविले. सर्व पठाणांना वजीराच्या हिंदू अधिकाऱ्यांचा कारभार दुःसह झाला होता.[३] तेव्हा कायमखानाचा धाकटा भाऊ अहमदखान याने ५,००० लोक जमा करून फरुकाबाद घेतले आणि वजीर सफदरजंगाचा अंमल आपल्या भावाच्या जहागिरीतून उठविण्याच्या कार्यास तो लागला.

नवलरायाने पठाण शत्रूस तोंड देण्यासाठी कनोजहून कूच केल फरुकाबादच्या दक्षिणेस १६ मैलावर खुदागंज येथे दोन्हीं सैन्याची गाठ पडली. या लढाईत नवलराय ठार झाला. त्याच्या सैन्याचा पूर्ण पराभव झाल्यावर अहमदखानाने कनोज शहर ताब्यात घेतले.[४] ही बातमी सफदरजंगास कळताच तो सैन्य घेऊन दिनांक ६ जुलै १७५० रोजी दिल्लीहून निघाला. वजीराच्या व पठाणांच्या फौजांची झुंज तारीख १३ सप्टेंबर १७५० रोजी होऊन त्यात वजीराच्या फौजेचा पराभव होऊन ते सैरावैरा पळू लागले. पठाणास संपूर्ण जय मिळाला.[५]

पठाणांनी केलेल्या पराभवाचा सूड उगविण्यासाठी काय योजना करावी हे ठरविण्यात वजीर सफदरजंग गुंतला. मराठे व जाट यांच्या मदतीशिवाय पठाणांचा पाडाव होण्यास दुसरे साधन नाही अशी वजीराची पक्की खात्री झाली. तेव्हा वजीराने रोहिलखंडाच्या मोहिमेत मराठ्यांची मदत, त्यांना पैसा देऊन मिळवावी असे ठरविले व त्यांच्याबरोबर बोलणे करण्यासाठी त्याने आपले वकील राजे जुगल किशोर व दिवाण राम नारायण यांना शिंदे, होळकरांकडे

१. पे. द. २, ले. १४ अे.

२. कित्ता.

३. सरदेसाई म. रि. पेशवा बाळाजीराव भा. २, पृ. २०७.

४. पे. द. २ ले. १४ अे.

५. पे. द. २ ले. २१, २२, २३, पे. द. २१ ले. ३०, ३१.

रवाना केले.[१] वजीराने मराठे सरदारास फौजेच्या खर्चाबद्दल एकंदर पन्नास लक्ष रुपये अगर दररोज रु. २५,००० किंवा रु. ३५,००० देण्याचे कबूल केले. यावेळी शिंदे-होळकर जयपूरच्या राजकारणात गुंतले होते. त्यांनी जयपूर येथील कार्य आटोपून नंतर वजीरास दिनांक २० फेब्रुवारी १७५१ रोजी येऊन मिळाले.[२] जाटानासुद्धा दररोज रु. १५,००० देण्याचे कबूल केल्यामुळे त्यांची फौज वजीरास येऊन मिळाली. अशा रीतीने जाट व मराठी फौजा बरोबर मदतीस घेऊन सफदरजंग रोहिल्यांच्या समाचारास निघाला.

मराठी फौजांनी दुआबात चाल केली. आणि शादिलखान व बंगश यांच्या फौजेचा इटव्याजवळ कादीरजंग येथें दिनांक २० मार्च १७५१ रोजी पराभव केला. ही बातमी कळताच अहमदखान बंगश आपल्या फरुखाबाद येथील राजधानीचे संरक्षण करण्यासाठी अलाहाबादहून त्वरेने निघाला. त्याने समस्त रोहिल्यांना मदतीसाठी हाक दिली. पण त्यांची कुमक त्यास मिळण्या-पूर्वीच मराठ्यांनी महमदखान बंगशला गंगा तीरी गाठून त्याचा पराभव केला.[३] पठाणांच्या सैन्याचा तळ लुटून पुष्कळ पठाणांची कत्तल केली आणि पठाणांची दोन-तीन ठिकाण देखील काबीज केली.[४] पंधरा हजार पठाण कापून काढल त्यामुळ मराठ्यांविषयी सगळीकड दरारा पसरला. मराठ्यांनी दुआबात आपला अंमल बसवून फत्तेगडास वेढा दिला. तेव्हा अलिमहंमद खानाचा मुलगा सादुल्लाखान १२,००० रोहिले फौज घेऊन अहमदखान बंगशाचे मदतीस आला. त्यांनी मराठ्यावर हल्ला चढविला. परंतु मराठ्यांनी पठाणांचा पराभव केला. सादुल्लाखान जीव घेऊन पळून गेला. हजारो पठाण जखमी व ठार झाले. त्यांची मालमत्ता, हत्ती, घोडे, गालिचे व उंची कपडे मराठ्यांच्या हाती लागले.[५] मराठ्यांनी दिनांक १९ एप्रिल १७५१ रोजी फत्तेगड काबीज केला. पठाणांचा पूर्ण पराभव झाला. त्यांचा म्होरक्या बहादूरखान दहा हजार पठाण सैनिकासह प्राणास मुकला. अहमदखान बंगश स्वतः रणातून जीव वाचविण्यासाठीं पळाला. याच युद्धात दत्ताजी शिंदे चमकला.[६] पठाणांचा पूर्ण मोड झालेला पाहून सफदरजंग खूष झाला. त्याने मराठ्यास त्यांच्या कामगिरीबद्दल तीन कोट द्रव्य व २५ लक्षाचा मुलूख अंतर्वेदीत देऊ केला.[७] पुढे पावसाळा सुरू होणार होता तेव्हा मराठ्यांनी बंगशाच्या मुलूखात तळ दिला आणि मनसोक्त लूट मिळविली.[८]

१. पे. द. २ ले. २८.

२. पे. द. २१ ले. ३८.

३. पे. द. २ ले. ३२, पे. द. २१ ले. ४३, राज ख. ३, ले. ३८३.

४. पे. द. २६ ले. १७६. रा. ख. ३ ले. ३८३.

५. का. सं. प. या. ले. ८३.

६. सरदेसाई म. रि, पेशवा बाळाजीराव भा. २, पृ' २१२.

७. रा. ख. ३ ले. ३८३.

८. रा. ख. ३ ले. ३८४.

पावसाळा संपल्यावर मराठ्यांनी रोहिलखंडात पठाणांविरुद्ध मोहिम सुरू केली. वजीर सफदरजंगही मराठ्यास सामील झाला. या मोहिमेमुळे रोहिल्यांनी घाबरून अंतर्वेदीतला मुलूख सोडून ते डोंगरात तराईत जाऊन राहिले. त्यांच्या पाठलागावर मराठे गेले पण दलदलीच्या प्रदेशातील दूषीत हवेमुळे मराठ्यांचे सैनिक मरू लागले. इतक्यात मार्च १७५२ मध्ये अबदाली पंजाबवर चालून आल्याची बातमी आली आणि सफदरअल्लीस बादशहाचे तातडीचे बोलावणे आले तेव्हा मराठ्यांनी रोहिले पठाणांबरोबर तह करून ही मोहीम संपविली.

**तहाच्या अटी अशा :** (१) सफदरजंगाने मराठ्यांना फौजेच्या खर्चासाठी कबूल केलेली रक्कम अहमदखान बंगशाने द्यावी; (२) हे कर्ज फिटेपर्यंत रोहिल्यांचा अर्धा मुलूख मराठ्यांचे स्वाधीन करावा; (३) मराठ्यांच्या या परगण्यांचा कारभार अहमदखानाचे हातात राहिल्यामुळे राज्यकारभाराचा खर्च वजा जाता बाकी जी रक्कम राहील ती मराठ्याना द्यावी; (४) कनोज, अकबरपूर आणि इतर काही बंगश घराण्यांची स्थळे मराठ्यांचा अधिकारी गोविंदपंत बुंदेले याच्या स्वाधीन करावी व वजीर सफदरजंगाने काही स्थळे स्वतःकडे ठेवावी. या तहाप्रमाणे उत्तरेस कोल-अलीगडपासून दक्षिणेस कुराजहानाबादपर्यंतचा प्रदेश मराठ्यास मिळाला. हा त्यांच्या दुआबातील सत्तेचा प्रारंभ होय. सन १७५२ पासून सन १८०३ च्या लॉर्ड लेकच्या आक्रमणापर्यंत हा प्रदेश शिंद्यांचे ताब्यात होता. अत एव पठाणांचा मनसुबा पातशाही घ्यावयाचा होता तो गेला. मराठ्यांहून मातब्बर कोणी नाही वजीरांत तर काहीच पीळ नाही हा देखावा दिसला.[1]

या मोठ्या विजयाबद्दल नानासाहेब पेशव्याने मराठे सरदारांच्या पराक्रमाची फारच प्रशंसा केली. "शाबास तुमच्या हिंमतीची व दिलेरी रुस्तुमीची. दक्षिणच्या फौजांनी गंगा यमुना पार होऊन पठाणांशी युद्ध करून फत्ते पावावे हे कर्म लहान सामान्य नव्हे. तुम्ही एकनिष्ठ, कृतकर्म दौलतीचे स्तंभ आहा. इराण तुराण पावेतो लौकीक जाहाला की, वजीर पळाला असता यांनी फत्तेच्या मनसदीवर बसविला.[2]"

मराठ्यांच्या बहुमोल मदतीमुळे पठाणांनी निर्माण केलेले अरिष्ट नाहीसे झाले.

**वजीर सफदरजंगाने बादशाही संरक्षणाच्या हमीचा करार मराठ्यांशी केला :**

सफदरजंग मराठ्यांच्या मदतीने पठाणांचा उच्छेद करण्यात गुंतला असता अहमदशहा अब्दालीने १७५१-५२ च्या हिवाळ्यात पंजाबवर हल्ला केल्याची बातमी येऊन थडकली. मार्च १७५२ मध्ये त्याने लाहोर जिंकले. ह्या बातमीने दिल्लीमध्ये भयाणता पसरली. बादशहाने सफदरजंगाकडे

---

१. रा. खं. ६, ले. २३१, २३३, २४६ रा. खं. ३, ले. १६०, ५४६.

२. का. सं. प. या. ले. ७९, ८२, ८३.

लखनौस खास दूत पाठवून अहमदशहाचे पारिपत्य करण्यासाठी कोणत्याही अटीवर मराठ्यांची मदत मिळवून त्वरीत दिल्लीस येणे असा निरोप पाठविला. हे पत्र मिळाल्यावर सफदरजंगाने मराठ्यांचा तळ त्यावेळी मथुरेस होता तिथे धाव घेतली. दिनांक १२ एप्रिल १७५२ रोजी वजिराने बादशहाचे तर्फेने व पेशव्यांचे तर्फेने शिंदे-होळकर यांनी बादशाहीचे बचाव करण्यासाठी एका कराराचा मसुदा ठरविला. आणि तो दिनांक २३ एप्रिल १७५२ रोजी धार्मिक शपथांनी व स्वदस्तुरच्या सह्यांनी हा अहदनामा किंवा करार कनोज येथे पुरा झाला. तो रा. खं. १ ले. १ यांत छापला आहे. या करारातील मुख्य कलमे अशी:—

(१) पठाण, राजपूत वगैरे देशातील बंडखोर किंवा अब्दाली सारखे परदेशीय शत्रू यांजपासून पेशव्याने मोगल बादशाहीचा बचाव करावा ;

(२) या मदतीबद्दल बादशहाने ५० लाख रुपये मराठ्यास खर्चास द्यावे. पैकी ३० लाख अब्दालीप्रीत्यर्थ व २० लाख पठाण, रोहिले, राजपूत, जाट यासारख्या अंतर्गत बंडखोरांचा मोड करण्याप्रीत्यर्थ ;

(३) फौज खर्च भागविण्यासाठी पेशव्यास बादशहाने पंजाब, सिंध व अंतर्वेदीतील काही जिल्हे या प्रांताची चौथाई वसूल करण्यास परवानगी द्यावी ;

(४) अजमीर, आग्रा, व मथुरा, या प्रांतांची सुभेगिरी पेशव्यास देण्यात यावी. या सुभ्यांचा कारभार पूर्वापार चालत आलेल्या रिवाजास अनुसरून मराठ्यानी करावा ;

(५) पेशवा स्वत: येण्यास असमर्थ असेल तेव्हा त्याचे बदल्यात मराठे सरदारांनी बादशहाच्या तैनातीत राहून इतर मनसबदारांप्रमाणे बीनतक्रार नोकरी बजवावी.[१]

या करारानुसार वजीर शिंदे होळकरांच्या पन्नास हजार फौजास बरोबर घेऊन दिनांक ५ मे १७५२ रोजी दिल्लीस गेला. पण यापूर्वीच बादशहाने पंजाबचा सुभेदार मीरमन्नूयाच्या सांगण्यावरून अहमदशहास पंजाब प्रांत देऊन त्याच्याशी तह करून त्यास मागे परतविले होते. ही बातमी वजीरास समजली तेव्हा त्याने बादशहाने मराठ्यास कबूल केलेले ५० लाख रुपये देण्यास गळ घातली. ख्याली खुशालीत व चैनीत दिवस घालविणारा बादशहा एवढे पैसे एकदम देण्यास चाल ढकल करावयास लागला. इतक्यात दिल्लीत तळ देऊन बसलेल्या शिंदे-होळकर या सरदारास पेशव्यांकडून निजामाचा पुत्र थोरला गाजीउद्दीन यास दिल्लीहून दक्षिणेत घेऊन येण्यासंबंधीचे पत्र आले. त्यावरून मराठ्यांनी बादशहास गाजीउद्दीनच्या नावे निजामीची सनद देण्याची विनंती केली व पन्नास लक्षाऐवजी आम्हास तीस लाख द्या म्हणजे आम्ही गाजीउद्दीनास घेऊन जातो असे त्यांनी बादशहास कळविले. बादशहाने

१. रा. खं., १–१. रा. खं. ६ पृ. ८२.

मराठ्यांची ही विनंती मान्य केली आणि निजामी बद्दल गाजीउद्दीनाने बादशहास जो ३० लाखांचा नजराणा द्यावयाचा तोच त्याने शिंदे-होळकरास द्यावा असे सांगून गाजीउद्दीनाचे नांवे लगेच निजामीचे फर्मान दिनांक १४ मे १७५२ रोजी काढीले. मराठ्यांनी पुन्हा खळखळ करू नये म्हणून बादशहाने आपल्या खजिन्यातून आणखी कांही लाख रुपये मल्हाररावास रोख दिले. शिंदे-होळकर पेशव्यांच्या हुकूमाप्रमाणे गाजीउद्दीनास दक्षिणच्या सुभेदारोची वस्त्रे देववून त्यास समागमें घेऊन दक्षिणेस येण्यास निघाले.[१] आपल्या तंत्राने चालणारा गाजीउद्दीन निजामशाहीचा मालक झाला म्हणजे फ्रेंचाचे निजामीतील महत्त्व कमी होऊन निजामास आपल्या छत्राखाली आणता येईल असा पेशव्यांचा डाव होता. पण गाजीउद्दीन दक्षिणेत पोचल्यावर त्याच्या सावत्र आईने त्यास मेजवानीस बोलावून विषान्न घातले त्यामुळे तो दिनांक १६ ऑक्टोबर १७५२ रोजी मृत्यू पावला. यामुळे तूर्त पेशव्याचा डाव फसून फ्रेंचाच्या सल्ल्याने चालणारा सलाबतजंग निजामीवर राहिला.

### उत्तरेत मराठ्यास मिळालेली खंडणी :

उत्तर हिंदुस्तानातील स्वाऱ्यात मराठ्यास एकामागून एक जय मिळत गेले. जयपुरचा राया माधोसिंग याजकडे व गंगापारचा सादुल्लाखान रोहिला याजकडे मराठ्यांनी खडण्या करार केल्या. तसेच, वजीर सफदर-जंगाकडे लावणीच्या खर्चाचे दहा लक्ष रुपये करार केले. या खंडणीच्या वाटणीबावत शिंदे, होळकर व पवार या त्रिवर्ग सरदारात असा शिरस्ता होता की, समाईक खर्च वजा होऊन बाकी जी रहाते त्याचा चौथा हिस्सा सरकारास देऊन, शिल्लक असलेल्या तीन हिस्से ऐवजाची वाटणी फौजवार होत असे. पवारास शिंद्याच्या हिस्श्यातून वाटणी घेण्याचा शिरस्ता असे.[२]

### मराठ्यांचे उत्तरेस आगमन (१७५३-५५) :

मराठे सरदार पेशव्याच्या सांगण्यावरून १७५२ च्या पावसाळ्यात दक्षिणेत आले त्याचा परिणाम असा झाला की, रोहिल्यास पुन्हा तयारी करण्यास वेळ मिळून पुन्हा ते शिरजोर झाले. तसेच दिल्लीतील व उत्तरेतील राज-कारणास निराळीच कलाटणी मिळाली. यावेळी दिल्लीचा मोगल बादशहा अहमदशहा हा निर्बुद्ध, आळशी आणि चंचल वृत्तीचा असल्यामुळे दरबारातील अधिकाऱ्यांवर वचक बसवून एकतंत्री राज्यकारभार बादशहाचे हातून होईना. त्यामुळे दरबारात दोन प्रमुख पक्ष पडले. एक इराणी व दुसरा तुराणी. अयोध्येचे सुभेदार व बादशहाचा वजीर सफदरजंग हा इराणी पक्षाचा होता. त्याचे वर्चस्व बादशहा व तुराणी पक्षाचे अमीर उमराव यांना सहन होत नव्हते. तुराणी पक्षाच्या लोकांनी वजीर सफदरजंगास जीवे मारून तुराणी पक्षाचा कारभार असावा असा कट रचिला. त्याची खबर सफदरजंगास मिळताच

---

१. शि. इ. सा. भा. ३ ले. २०३, २०४. पे. द. २१ ले. ५३.

२. संस्थान देवास घराण्याच्या इतिहासाची साधनें संपा. मा. वि. गुजर. ले. १२६ ; सं दे. (सि) पवार घराण्याचा इतिहास पृ. १४६.

तो आपल्या तोफखान्यासह दिल्लीस लाल किल्ल्यावर चाल करून गेला. त्यामुळे बादशहा घाबरून जाऊन त्याने मराठ्यांची मदत मागितली. इतक्यात नबाब वजीर सफदरजंगाने सुद्धा मराठ्यांस सांगून पाठविले की, " (मराठे) सरदार आमचे (सफदरजंगाचे) भाऊ (मराठ्यांना) अंतरवेद (प्रांत) आम्ही दिला. तेव्हा करार की ज्यावरी तुमची त्याजवरी आमची, ऐसा करार आहे.[1]" अशा प्रकारचे दोन्ही पक्षांचे बोलावणे आल्यावर बादशहाचे पक्षातील उमरावांची बाजू घेतल्यास दिल्ली दरबारात वर्चस्व प्रस्थापित होईल हा हेतू मनात धरून मराठ्यांनी बादशहाच्या पक्षास सहाय्य करण्याचे ठरविले.[2] व या राजकारणासाठी व जयपूर आणि रजपूत राजे रजवाड्यांकडील खंडणी वसूल करण्यासाठीं राघोबादादा, शिंदे, होळकर, पवार या सरदारांसह सन १७५३ च्या सप्टेंबर महिन्यात उत्तर हिंदुस्तानचे स्वारीवर निघाले.[3] यावेळी दिल्ली दरबारात दोन पक्ष होते हे मागे सांगितले आहेच. त्यातील मुख्य राजकारणी व्यक्ति जाबेदाखान हा होता.

**जाबेदाखान :**

हा मुळचा हलक्या कुळातला. जनानखान्यातील खोजा बादशहाची आई उधमबाई हीची त्याजवरील प्रीती व मिठास भाषण करण्याची शैली यांच्या योगाने प्रथम सर्व खाजगी कारभार त्याचे हाती आला. वजीराचे हातात काहीच सत्ता राहिली नाही. पुढे त्यास नबाब बहादूर असा किताब मिळून त्याचे सल्ल्याशिवाय दरबारात पान हालेनासे झाले. त्यानेच धाकट्या गाजीउद्दीनाची बक्षीच्या जागी नेमणूक केली. ह्या कृत्याचा राग वजीर सफदरजंग यास येऊन त्याने जाबेदाखानाचा दिनांक २७ ऑगस्ट १७५२ रोजी खून करविला. वजीराच्या या करणीने बादशहा अगदी चिडून गेला. उधमबाईने वजिराच्या विरोधकांचा स्वतंत्र पक्ष वजिराविरुद्ध तयार केला. पेशव्यांचे लष्करी अंमलदार अंतामी माणकेश्वर व वकील बापूजी हिंगणे त्यावेळी दिल्लीत होते. दोन्ही पक्ष या दोघांना आपल्याकडे ओढू लागले. अंताजी माणकेश्वरकडे पांच हजार फौज होती. बादशहाने वजिराचे दोन सुभे अयोध्या व प्रयाग मराठ्यांस मदतीच्या मोबदल्यात देऊ केले. तेव्हा माणकेश्वर व हिंगणे बादशहाच्या बाजूने उभे रहिले. हे दोन्ही सुभे वजिराचे होते त्यामुळे वजिराचे वैर मराठ्यांच्या पदरात पडणार होते.

बादशहा व वजीर या दोघांनी एकमेकांविरुद्ध लढाई पुकारली. राजधानीतील सरदार बादशहास मिळाले. वजिराने राजेंद्रगीर गोसावी[4]

---

१. ऐ. प. व्य, ले. ८९. पे. द. २१ ले. ५५.

२. जदुनाथ सरकार, फॉल ऑफ द् मोगल एम्पायर भा. १ पृ. ५१४-१६.

३. पे. द. २, ले. ३४.

४. राजेंद्रगीर गोसावी.—ह्या संन्यासी पंथाच्या गृहस्थास झांशीचा सुभेदार नारो शंकर याने मरेटची जागीर नेमून दिल्यापासून तो स्वतंत्र असा फौजबंद सरदार बनला. त्यास नारो शंकराने हुसकावून दिल्यावर तो अलाहाबादेस सन १७५१ त सफदरजंगाचे सेवेत दाखल झाला. तेव्हापासून तो शौर्याने वजीराची बाजू संभाळीत होता. याचे चेले उमरावगीर गोसावी व अनुपगीर पुढे प्रसिद्धीस आले.

व सुरजमल[1] जाट यास फौजेसह मदतीस बोलाविले. दोन्ही सैन्याच्या लढाया झाल्या. त्यात राजेंद्रगीर गोसावी दिनांक १२ जून १७५३ रोजी मारला गेला. बादशहाने वजीरीची वस्त्रे गाजीउद्दीन इमादुल्मुल्क[2] यास दिली. (३ जून १७५३) पुढे सहा महिने वजीर सफदरजंग व बादशहा यांजमध्ये लढाया झाल्या. शेवटी नवा वजीर इंतिजामुद्दौला व उधमबाई यांच्या आग्रहाने बादशहाने संधि ठरविला. सुरजमल जाटाने बादशहाकडे क्षमा मागितली म्हणून त्यास बादशहाने क्षमा केली. पहिला वजीर सफदरजंग याचे दोन्ही सुभे अयोध्या व प्रयाग त्याच्याकडेच ठेवले. दिनांक ७ नोव्हेंबर १७५३ ला हा तह ठरून सर्वजण आपापल्या स्थळी परत गेले. सफदरजंग अयोध्येस निघून गेला. बादशहाच्या दरबारात पठाणांचे वर्चस्व झाले तेच मराठ्यांच्या पानीपतावरील कलहास कारणीभूत झाले.

रघुनाथदादा सन १७५३ च्या सप्टेंबरात खानदेशातून निघाला. तो माळव्यातून राजपुतान्याकडे वळून जयपुरावरून जाटाच्या मुलुखात १७५४ च्या आरंभी येऊन पोहोचला. बरोबर शिंदे, होळकर आदि मराठे सरदार होते. सुरजमल जाटाने सफदरजंगास सहाय्य करून तमाम दिल्ली शहर लुटले सबब पातशहाने जाटांचे पारिपत्य करण्यासाठी मराठ्यांना कळविले. तेव्हा मराठ्यांनी जाटास हद्दपार करून पातशाहीचा बदोबस्त करण्याचे ठरविले.[3] जयपूर प्रकरणापासून सुरजमलावर मराठ्यांचा दात होताच. सुरजमल यावेळी चांगला बंदोबस्त करून कुंभेरीच्या किल्ल्यात येऊन राहिला होता. त्यास मराठ्यांनी वेढा दिला (२० जानेवारी १७५४) व मोर्चे लाविले. जाटांचा किल्ला वाळूच्या मैदानात. त्यामुळे सुरुंग काम देईनात. मराठे इरेला पेटले. गोळागोळी सुरू झाली. त्यांत जाटांकडील गोळी मल्हाररावाचा एकुलता एक मुलगा खंडेराव यास लागून तो मरण पावला. मल्हाररावास याचा राग येऊन त्याने घोरप्रतिज्ञा केली कीं, "सुरजमलचा शिरच्छेद करून कुंभेरीची माती यमुनेत टाकीन तरच जन्मास आल्याचे सार्थक. नाहीतर प्राण त्याग करीन." मल्हाररावाच्या या नवीन इर्षेमुळे वेढा जोराने पुढे चालू झाला जाट घाबरून गेला. जाटाची धोरणी पत्नी राणी किशोरी हिच्या सल्ल्यावरून सुरजमलने जयाप्पा शिंदेची मदत मागितली. जयाप्पाने जाटाचा बचाव करण्याचे वचन दिले. शिंद्यांच्या मध्यस्तीने जाटांशी एप्रिल अखेर तह ठरला. आणि तीस लाख रुपये मराठ्यांनी खंडणी घेऊन हा वेढा मे मध्ये उठविला.

---

१. सुरजमल जाट.—हा बदनसिंग जाटाचा मुलगा. महापराक्रमी. याने सन १७३२ त भरतपूर जिंकून तिथें आपली राजधानी केली. त्याचें राज्य उत्तरेस दिल्ली, दक्षिणेस चंबळ, पश्चिमेस जयपूर व पूर्वेस यमुना या टापूस जाठवाडा म्हणतात ते होय. त्यात भरतपूर, दीग, कुंभेर ही प्रसिद्ध स्थळे येतात. सुरजमलचा आणि मराठ्यांचा झगडा खूप वर्षे चालू होता.

२. गाजीउद्दीन इमादुल्मुल्क.—पहिला असफजाह निजाम याचा वडील पुत्र गाजीउद्दीनखान फिरोजजंग याचा धाकटा गाजीउद्दीन इमादुल्मुल्क हा मुलगा. याचा जन्म जून १७३७ चा. हा मीर शहाबुद्दीन उर्फ धाकटा गाजीउद्दीन म्हणून इतिहासात ओळखला जातो. हा धोरणी निश्चियी व तडफदार होता. मोंगलबादशाहीच्या ऱ्हास काळात हा २ जून १७५३ रोजीं दिल्लीचा वजीर झाला. मराठे-अबदालीच्या झगड्यात हाच गृहस्थ प्रमुख होता. पानिपतावरील संहाराने त्याचे वजन संपले आणि तो पुढे सन १८०२ पर्यंत जगला.

३. पे. द. २१ ले. ६०.

जाटांच्या राजकारणात लढाईचा खर्च मराठ्यांच्या डोक्यावर जास्त बसला. शिवाय जयाप्पाने जाटाला वाचविले ही गोष्ट होळकरास न खपून इथून शिंदे, होळकरांचे वांकडें आले. आग्र्याची जबाबदारी होळकरांची होती. त्याची अशी परवड झाली. मारवाडची जबाबदारी शिंद्यांनी स्वतंत्रपणे अंगावर घेतली.

## नागोरचा वेढा :

राघोबादादानें जयाप्पा शिंदे यास दिनांक २३ जून १७५४ रोजीं मारवाडला जाण्यास अनुमति दिली. त्याप्रमाणें तो ३० जून ला मारवाडांत दाखल झाला. जोधपुरांत रामसिंगास गादीवर बसवून त्याचा प्रतिस्पर्धि विजेसिंग याचा पराभव करावा ही कामगिरी त्याजवर सोपविली होती. शिवाय अजमीर हस्तगत करावयाचें होतें.

मारवाडचा (जोधपूर) राणा अभयसिंग दिनांक २१ जून १७४९ रोजीं वारला. आणि त्याचा मुलगा रामसिंग गादीवर बसला. पण अभयसिंगाचा भाऊ बख्तसिंग यानें बादशाही फौजेचें साहाय्य मिळवून रामसिंगास घालवून दिले आणि दिनांक ८ जुलै १७५१ रोजीं जोधपूरचें राज्य मिळविलें. तेव्हां रामसिंग स्वसंरक्षणार्थ जयपुरास पळाला. पुढें बख्तसिंग दिनांक २३ सप्टेंबर १७५२ रोजीं निवर्तला त्यानंतर बख्तसिगाचा मुलगा बिजेसिंग गादीवर आला. रामसिंग दिनांक १७ डिसेंबर १७५३ रोजीं राघोबादादास भेटून त्यानें जयपूरची गादी मिळविण्यासाठीं मराठ्यांची मदत मागितली. तेव्हां राघोबानें मारवाडवर जयाप्पा शिंद्यास ४० हजार सैन्यानिशी पाठविलें.[१]

जयाप्पानें सांबेरच्या मार्गे कूच करून अजमीरच्या उत्तरेचा किशनगड किल्ला ऑगस्ट १७५४ त काबीज केला.[२] व विजयसिंग मेडत्याच्या बंदीस्त किल्ल्यांत जाऊन बसला होता त्याजवर रामसिंगाची फौज बरोबर घेऊन जयाप्पा घसरला. दोन्ही सैन्यांची गांठ पडून दिनांक १५ सप्टेंबर १७५४ मेडत्यावर तुंबळ रणसंग्राम झाला. मराठ्यांनीं शत्रूची फौज लुटली. विजयसिंग मेडते सोडून नागोरला पळून गेला.[३] मेडते काबीज करून मराठी फौजांनीं नागोरकडे कूच केलें. बिजेसिंगाचे सरदार पळून गेले. तरीं बिजेसिंग दमला नाहीं. मारवाडांतील ही मराठी मोहिम फारच लांबली. २१ फेब्रुवारी १७५५ रोजीं मराठ्यांनीं अजमीरचा किल्ला सर केला. एकी-कडे रामसिगानें झालोरला गुप्त ठिकाणीं लपविलेला विजयसिंगाचा द्रव्य संचय आणि तें ठाणें अचानक हल्ला करून सर केलें. रामसिंगाचा सरदार जगन्नाथ पुरोहित आणि शिंद्यांचा सरदार संताजी साबळे यांनीं जोधपुरास

---

१. शिंदेशाही मुत्सद्यांचा पत्रव्यवहार भा. ३ ले. १५२ संस्थान देवास (सि.) पवार घराण्याचा इतिहास पृ. १३०.

२. शि. मु. प. व्य. भा. ३ ले. ४७.

३. शि. मु. प. भा. ३ ले. ५५.

वेढा घातला. विजयसिंगास ही सारी परिस्थिती अवघड झाली तो कासावीस होऊन गेला. त्याच्या फौजेस अन्नपाणीहि दुर्मिळ झाले. आणि तो अगदी टेकीला आला. अशा प्रकारे बिजेसिंगाचे लोकांवर कठीण प्रसंग गुदरल्यामुळे त्याने जयाप्पा शिंद्यांबरोबर तहाचे बोलणे सुरू केले. शिंद्यांनी ५० लाख रुपये दंड मागितला. बिजेसिंगाचा वकील गोड थापा मारून शिंद्यास झुलवू लागला. पेशव्यांनी शिंद्यांस लिहिले होते की, "एकंदर परिस्थिति लक्षात घेऊन राठोडांशी लढण्याच्या ईर्षेत न पडता आपले हित साधावे.[१]" शिवाय मल्हाररावास मायेत घेऊन तह करून मोकळे व्हावे असाही निरोप पाठविला होता.[२] पण शिंद्यांनी आपल्या मनसब्यात होळकरास घेतले नाही. तहाच्या वाटाघाटी नागोरच्या बाहेर ताऊस सरोवरावर जयाप्पाची छावणी होती तिथे चालू असता दिनांक २५ जुलै १७५५ ला जयाप्पा दुपारचे स्नान करून उठत असताच त्याचा खून विजेसिंगाने करविला. जयाप्पा चौरंगावरून एकदम खाली कोसळले.[३] जिकडे तिकडे आरोळी पडली. तहाच्या वाटाघाटीस आलेले बिजेसिंगाचे वकील विजयभारती व जगनेश्वर, राजासिंग चव्हाण आदिना जागच्या जागीच मराठ्यांनी कंठस्नान घातले आणि त्या दगाबाज अवलादीची पाळेमुळे खणून काढण्यासाठीं मराठ्यांनी छावणीतील प्रत्येक रजपूत हुडकून काढून ठार केला. नागोर, जालोर, व जोधपूर येथील पूर्वी दिलेले वेढे मराठ्यांनी तसेच कायम ठेविले आणि शह न सोडता रांगडे कापून काढावे हा विचार केला.[४]

बिजेसिंगाने सलोखा घडवून आणण्यासाठी पुणे दरबारकडे वकील पाठविला होता, परंतु प्रकरण या थरावर गेले तेव्हा पेशव्याने बिजेसिंगाचे वकीलास सांगितले की, या उपर आम्हास तह करणे अनुकूल पडत नाही. मराठ्यांनी हिंमत धरून मारवाडच्या मनसुब्यास हात घातला. तो सिद्धीस जावा म्हणून पेशव्याने ग्वाल्हेर प्रांतातून अंताजी माणकेश्वर यास मारवाडातील मराठे फौजेच्या कुमकेस पाठविले. तसेच यशवंतराव पवार व समशेर बहादूर यांना १० हजार फौजेनिशी रवाना केले.[५]

इकडे बिजेसिंगाने मराठ्यांना उत्तर हिंदुस्तानातून काढून लावण्याचा बेत करून त्यासाठी जयपूरचा राणा माधोसिंग याची मदत घेतली. माधोसिंगाने जयनगरात मराठ्यांचा मामलेदार ठार मारला आणि दिल्लीस वकील पाठवून पातशहा व वजीर यांना विनंती केली की, "आपण मराठे याचा खून केला. तुम्ही बाहेर निघावे. आम्ही सामील होतो". माधोसिंगाने बादशहाचे फौजेचा खर्च चालविण्याची जबाबदारी घेतली. त्याचा मनसुबा असा की, जाट, रोहिले, वजीर व पातशहा एक करून तोफखान्यासह बाहेर पडावे आणि

१. शि. मु. प. भा., ३ ले. ५९.
२. कित्ता, ले. २९८, २९९.
३. कित्ता, १६५, ३२०.
४. पे. द. २ ले. ४८.
५. का. सं. प. या. ले. १४१, १४२.

मराठ्यांवर चाल करून जावे व त्यांना मारवाड प्रांतातून उधळून लावून तमाम मुलूख दस्त करावा.[१] अशा प्रकारे माधोसिगानें बिजेसिगाच्या सहाय्यास धावून जाऊन मराठ्यांविरुद्ध बादशहा, सुरजमल जाट, रोहिले यांची जूट करण्याचा प्रयत्न केला. रजपुतांनी मराठ्यांवर हल्ले करण्यास सुरवात केली. जयाप्पा पडला तरी त्याचा मुलगा दत्ताजी शिंदे रजपुतांना धूळ चारण्यास खंबीर होता. जयाप्पाच्या सुतकाचे तेरा दिवस संपायच्या आतच मराठे रजपुतांच्या पारिपत्यासाठी बाहेर पडले. "रांगड्यांनी मराठ्यांपुढे अधिक करावे असे नाही. सर्वही पादाक्रांत होतील". असा जोर दत्ताजी व जनकोजी यांनी दाखविला.[२]

**बिजेसिगाची शरणागति :**

अडचणीच्या प्रसंगात दत्ताजी शिंदे फार धूर्ततेने वागला. बिजेसिगाने माघोसिगाच्या मदतीने मराठ्यांविरुद्ध केलेल्या उठावास तो पुरा पडला. झालोरहून चालून आलेल्या संताजी वाबळयाने प्रथम राठोडास गाठले. आणि बेजरब मारा करून त्याचा मोड करून गोदवजच्या किल्ल्यात कोंडले. अनिरुद्ध खंगोरात याच्या नेतृत्वाखाली बिजेसिगाचे मदतीस येणाऱ्या फौजेस दत्ताजीनें गांठलें.[३] दत्ताजीच्या मदतीस यावेळी अंताजी माणकेश्वराची फौजही दौडत येत होती. मराठ्यांनी दिनांक १५-१६ ऑक्टोबर १७५५ ला अनिरुद्धसिगाच्या फौजेस गाठून त्याला सडकून चोप दिला. सात आठशे राजपूत लोक जागचे जागी ठार केले. खुद्द खासा अनिरुद्धसिग पराभव पावल्यावर दिडवाण्याचे रोखे पळू लागला. तेव्हा मराठ्यांनी त्याच्या मार्गातील विहिरी बुजविल्या. जाग जागची तळी रोखून धरीली त्यामुळे अनिरुद्धसिगाच्या फौजेतील पुष्कळ जनावरे व सैन्य पाण्यावाचून मेलें.[४] अनिरुद्धसिग दिडवाण्यास पोहोचल्यावर मराठ्यांनी त्यास फारच हैराण केले तेव्हा त्याचा नाईलाज होऊन त्याने तहाची वाटाघाट १७५६ चे जानेवारीत चालू ठेविली.[५] नागोरचा वेढा मराठ्यांनी इरेला पडून अधिक आवळला. बिजेसिग नागोरातून बाहेर पडला. एवढ्यात अंताजी माणकेश्वर १० हजार फौजेनिशी जयनगर दिडवाण करत मारवाडात घुसला. आडव्या आलेल्या चारशे राठोडांना कापून तो नागोराहून निघालेल्या बिजेसिगाला आडवा गेला. त्याला घाबरून बिजेसिग बिकानेरकडे पळाला. १७५५ च्या अखेरीस यशवंतराव पवार आणि समशेर बहाद्दर यांच्या फौजा राजपुतान्यावर येऊन आदळल्या. त्यांनी जयपूर आणि आखाडचा सारा प्रदेश गिळून टाकला. बिजेसिगाने दिल्लीस व इतर ठिकाणी वकील पाठवून पातशहा, वजीर व

१. पे. द. २१ ले. ७३.

२. पे. द. २, ले. ४९. ५६. का. सं. प. या. ले. १४३.

३. पे. द. २१ ले. ७४, ७७.

४. पे. द. २ ले. ५०.

५. शि. मु. प. भा. ३ ले. १७५, २१८.

अबदाली यांच्याकडे मराठ्याविरुद्ध राजकारण केले.[1] परंतु निरुपाय होऊन शेवटी बिजेसिंगास सन १७५६ चे फेब्रुवारी महिन्याचे अखेरीस मराठ्यांशी तह करणे भाग पडले.[2] तहाची कलमे घेऊन विजेसिंगाचा वकील शिंद्यापुढे हात जोडू लागला. पन्नास लाखाचा दंड, नागोर-झालोरचे दोन किल्ले मराठ्यांना द्यायचे आणि रामसिंगास अर्धे राज्य द्यायचे या अटीवर विजेसिंगाने तह केला. अजमीर शिंद्यास मिळाले. पैसा वसूल करण्यासाठी दत्ताजी दोन महिने नागोरास राहीला. तेथून रुपनगरास गादीचा तंटा मिटविण्यासाठी गेला. मध्यस्थी करून आपल्या तर्फेचा सामंतसिंग यास गादीवर बसवून तंटा तोडला. जूनचे आरंभी तो उज्जैन येथे स्वस्थळी आला.

शिंदे विजेसिंग लढ्यात रजपूतांची मने अपेक्षेबाहेर दुखावली गेली आणि रजपूत मराठ्यांना कायमचे दुरावले.

**दिल्लीच्या बादशहाचा खून :**

शिंदे मारवाडच्या मोहिमेस गेल्यावर रघुनाथराव व मल्हारराव होळकर दिल्लीवर आले. मराठे जाटाच्या मोहिमेत गुंतले असताना दिल्लीत अगदी बेबंदशाही माजली होती. यावेळी गाजीउद्दीनाने बादशहाला नामधारी बनवून दिल्लीच्या राजकारणाची सूत्रे चालवू लागला. गाजीउद्दीनाचा बादशहास एवढा जाच होऊ लागला की त्यामुळे जुना वजीर सफदरजंग याचा जाच पुरवला असे त्यास वाटू लागले. बादशहा आणि गाजीउद्दीन यांचे वैर उघड सुरू झाले. मराठ्यांच्या मदतीने गाजीउद्दीन बादशहास छळू लागला. गाजीउद्दीनच्या सैन्यास बरेच महिने पगार मिळाला नाही. बादशहाने सरकारी तिजोरीतून हा पैसा न दिल्यामुळे ही स्थिती उद्‌भवली. याचा गाजीउद्दीनास राग येऊन त्याने राजवाडा घेरून आतील निवासी यांची उपासमार घडविली. तदनंतर त्याने यमुनापार होऊन दुआबातील मुख्य मुख्य शहरे लुटली. इतिमाजुद्दौला जरी वजीर होता तरी गाजीउद्दीनाचे चाळे थांबविण्याएवढी सत्ता त्यास नव्हती. पण त्याने गाजीउद्दीनास शह देण्यासाठी बादशहास शिकारी निमित्त बरोबर घेऊन दिल्लीपासून दुर असलेल्या शिकंदराबाद शहरी येऊन छावणी केली. खरा हेतू गाजीउद्दीनाच्या विरुद्ध राजपूत, जाट व सफदरजंग यांची मदत मिळविण्याचा होता. बरोबर बादशाही जनानखाना आणि त्यांचे जडजवाहीर होते. त्या दिवशी बादशहा शिकंदराबादेस पोचला. त्या दिनांक सतरा मे सतराशे चौपन रोजी मराठ्याचा जाटांशी तह होऊन समेट झाला. या दिवशी गाजीउद्दीन मल्हारराव होळकराच्या सात्वनासाठी कुंभेरीस आला व त्याने बादशहाविरुद्ध रघुनाथराव व होळकर यांची मदत मागितली. मल्हारराव व रघुनाथराव यानी गाजीउद्दीनाच्या मदतीस दिल्लीस येण्याचे कबूल केले. मराठ्यांची फौज दिल्लीवर

---

१. पे. द. २७ ले. ११९, १२०, १२२.

२. पे. द. २१ ले. ८२.

यंत आहे या बातमीनें बादशहा घाबरला. त्यास जेव्हा समजले की, गाजीउद्दीन तख्तावर दुसरा बादशहा आणणार तेव्हा बादशहा उदास व चिंताग्रस्त होऊन तारीख २५ मे ला दिल्लीकडे येण्यास त्वरेनें निघाला आणि बरोबर आई उद्यमबाई आणि बायको इनामतपुरी यांना घेतले आणि दिल्ली किल्ल्यात स्वतःस बंद करून घेतले. बादशहा दिल्लीस निघून गेल्याचे वृत्त मलीकाझमानी आदी जनानखान्यातील स्त्रियास कळले तेव्हा त्यानी आपले जडजवाहीर व सामान हत्तीवर घालून दिल्लीस येण्यास निघाली. होळकरांच्या सैन्यातील पेंढाऱ्यानी वाटेत त्यांच्यावर हल्ला करून जनानखन्यातील सर्व स्त्रियांचे वित्त लुटले. काही स्त्रियांना कैद केले. शिकंदराबाद येथील छावणी लुटून फस्त केली. गाजीउद्दीन व होळकर यास ही बातमी कळताच त्यांनी शरमेने माना खाली घातल्या मलीकाझमानीनें होळकरास बोलवून त्याच्या सन्याच्या कृत्यांचा जाब विचारला. होळकरानें बाईची माफी मागून संताप व्यक्त केला. आणि २ लाख रुपये जनानखान्याच्या खर्चास दिले. दुआबात वरील प्रकार चालू असता इकडे दिल्लीस बादशहाकडे मल्हार-राव होळकरानें भरमसाट मागण्या केल्या. बादशहानें ३१ मे, १७५४ ला त्या सर्व मागण्या मान्य केल्या. मागण्याप्रमाणे त्यांना पैसा मिळेना म्हणून दिल्लीच्या आसमंतांत त्यानी लुटालुटीस सुरवात केली. १ जून ला ठरावाप्रमाणे बादशहाने इंतिजामउद्योल्यास वजीरीवरून दुर करून गाजी-उद्दीनास वजीर नेमिले. कुटील व दगाबाज गाजीउद्दीनानें दुसऱ्या दिवशी दरबार भरवून बादशहाची खुप निंदा केली आणि त्याला बादशाहीवरून दूर करून त्याला व उदयबाईला ठार केले व बहादुरशहाचा नातू अजिदुल्ला यास आलमगीर दुसरा या नांवानें तक्तावर बसविले.

रघुनाथराव आणि मल्हारराव सैन्यासह दिल्लीस आले आणि त्यांनी गाजी-उद्दीननें कबूल केलेले ८२ लाख रुपयें मागितले. मराठ्यास बेसुमार रकमा कबूल करून त्यांना त्यानें आणले. पण रकमेची फेड होईना. नवा बादशहा गादीवर येताच मराठ्यांचा मुशाहीरा म्हणून २५ लाख रुपये मिळत होते तेही अधिक मिळतीलया आशेनें रघुनाथरावानें स्विकारले नाहीत. पांच महिने होळकर व रघुनाथराव कबूल केलेली रक्कम वसूल करण्यासाठी वजीरास तगादा लावीत बसले. शेवटी ९ लाख रोख व १७½ लाखांच्या सावकारी हुंड्या घेऊन रघुनाथराव दक्षिणेत परतला. दिल्लीत फौजा घेऊन बसण्यापेक्षा पंजाबात जाऊन अबदालीचा बंदोबस्त करावा अशी सारखी टोचणी गाजी-उद्दीन रघुनाथरावास पहील्यापासून करीत होता. पण हा कार्यभाग इष्ट असता त्यानें स्विकारला नाही. स्वतः गंगास्नान संपादून अनुप शहरापावेतो जाऊन पठाण व रोंहिले यांची मामलत मनास आणून दिल्ली समीप यमुना उतरून फेब्रुवारी १७५५ मध्ये दादासाहेबांनी ऐलतीरी मुक्काम केला.[१]

---

१. पे. द. २ ले. १०६, १०७. हिं. द. २ ले. ३४.

**ग्वाल्हेर काबीज :**

जाटांची एक शाखा ग्वाल्हेर येथे येऊन वसाहत करून राहिली. ग्वाल्हेरचा किल्ला बांधून त्याच्या ईशान्येस बावीस मैलावर गोहदचे ठाणं आहे तेथेही किल्ला बांधून एक लहानशी जहागिर वसविली तीच भिमसिंगाची राजधानी.

दरम्यान मराठी फौजांनी आणखी एक पराक्रम गाजविला. कुंभेरच्या मराठे-जाट संग्रामात गोहदच्या भीमसिंग जाटाने मराठ्याविरुद्ध भाग घेतला होता. रघुनाथरावाने या जाटाचे पारीपत्य करण्याची कामगिरी विठ्ठल शिवदेवाकडे सोपविली. गोहादचा किल्ला ग्वाल्हेरच्या ईशान्येस बावीस मैलावर होता. विठ्ठल शिवदेवाने ग्वाल्हेर व गोहाद या दोन्ही ठिकाणच्या किल्यांना मोर्चे लावले. विठ्ठल शिवदेवच्या अनुपस्थितीत भीमसिंग जाटाने ग्वाल्हेरचे मोर्चे उधळून ग्वाल्हेरात प्रवेश केला. विठ्ठल शिवदेवाच्या कित्येक सैनिकांनाहि त्याने कैदेत टाकले. त्यांच्या सुटकेसाठी रदबदली करण्यास आलेल्या विठ्ठल शिवदेवाच्या वकीलाचा अपमान करण्याचे जाटाने कमी केले नाही. दिल्लीहून फौजफाटा मागविला तिकडून आलेल्या नव्या फौजेमुळे विठ्ठल शिवदेवाचा दम वाढला. जाटावर हल्ले करून त्याने जाटाचा दम कोंडला. महादजी शितोळ्याने भीमसिंगाला घोड्यावरून खाली पाडले. आणि विठ्ठल शिवदेवाने क्षणार्धांत त्याचा शिरच्छेद केला. जाट पडल्यावर त्याची फौज मोडावयास मराठ्यांना किती उशीर? किल्ला सर करून मराठ्यांचे निशाण ग्वाल्हेरच्या किल्यावर डौलाने फडकू लागले. (७ जून १७५५)[१] ग्वाल्हेरीचा किल्ला सरकारात आल्यानंतर 'तीर्थरुपांची' पत्रे जलदीने परत येण्याविषयी आल्यावरून दादासाहेब ग्वाल्हेरहून पुण्यास तसाच परत गेला.

१७५६ च्या सावनूरच्या लढाईसाठी पेशव्याने मल्हारराव होळकरास दक्षिणेत बोलावून घेतले आणि नागोरवर जयाप्पाचा खून झाला यामुळे उत्तरेतील मुलखात बंदोबस्तासाठी पहिल्या प्रतीचा सरदारच कोणी राहिला नाही. बर्वे, बुंदेले, हिंगणे, अंताजी, माणकेश्वर हे दुय्यम लोक या सरदारांच्या गैरहजेरीत मुखत्यार होते.

दिल्लीतील मध्यवर्ती सत्ताच ढिली झाल्याने उत्तरेतील परिस्थिति बिकट झाली होती. 'हिंदुस्तान प्रांती' हमेशा फौज पाहिजे तरच बंदोबस्त राहील. बुंदेलखंडापासून अंतर्वेदीपर्यंत रखवाली पाहिजे. मातबर जागा, रांगडे लोक हरामजादे, तेव्हांच पिसाट करतात. दिल्लीत बंदोबस्त नाही, तेथे गडबड झाली म्हणजे सर्व रजवाड्यांची नजर फिरते, आम्हाजवळ फौज नाही. हमेशा वीस हजार इकडे छावणी असावी[२], असे बुंदेले पेशव्यास लिहितात ते खरे होते.

---

१. पे. द. २७, ले. ४१, ४४, ४५, १०५.

२. पे. द. २, ले. ४४, ४५, रा. खं. ३ ले. १५१ ; म. रि. बाळाजी बाजीराव, भा. २, पृ. २६८.

**हत्याकांड :**

रघुनाथराव व शिंदे-होळकर दक्षिणेकडे परतत असतांना दिल्लीच्या सल्तनतीवर एक वादळ घोंघावत होतें.

मराठ्यांचें उत्तरेंतील दडपण हलकें होतांच पुनरपि दिल्लींत मराठ्यांविरुद्ध कारस्थानें चालू झालीं. त्यांत मुख्य पुढारी नजीबखान रोहिले[१] होय. हा माणूस प्रथम गाजीउद्दीनाचे वशिल्यानें पुढें आला आणि अल्पावधींत प्याद्याचा फर्जी बनून मराठ्यांचें बस्तान दिल्लींत बसू न देण्याचा प्रचंड खटाटोप करूं लागला. दिल्लींत बादशहाचे संरक्षणास अंताजी माणकेश्वर पांच हजार सैन्य घेऊन राहिला होता. त्याचा वचक शत्रूस फारसा वाटला नाही. गाजीउद्दीनानें मराठ्यांची मदत आणून बादशहास कबजांत घेऊन सर्व कारभार बळकाविला हा प्रकार मल्लिका अज्जमानी[२] वगैरे मंडळीस दुसःह होऊन त्यांनीं अबदालीकडे संधान बांधून त्यास गाजीउद्दीनच्या पारिपत्यासाठी हिंदुस्थानांत बोलाविलें.

मागील स्वारींत अबदालीनें पंजाब प्रांत जिंकून घेऊन त्याजवर मीर मन्नूस आपल्यातर्फे सुभेदार नेमिलें होतें. हा मीरमन्नू दिनांक ३ नोव्हेंबर १७५३ ला घोड्यावरून खालीं पडून अपघातानें मरण पावला. त्याची बायको मुघ्लानी बेगम हिनें मुलाच्या नांवानें अबदालीकडून कारभाराची मान्यता मिळविली व ती अदिनाबेगच्या सहाय्यानें कारभार पाहूं लागली. परंतु काहीं दिवसांनीं तो अल्पवयी मुलगा मरण पावला व बाईवर तिचेच अधिकारी उठले. याचवेळीं शिखही जोर करून एकेक प्रांत बळकावू लागले. तेव्हां अबदाली पासून पंजाब परत घेण्यास ही संधि चांगली आहे असें पाहून गाजीउद्दीनानें दिनांक १७ फेब्रुवारी १७५६ रोजीं पंजाबवर चाल केली. आदिनाबेग त्यास मिळाला. पंजाबचा कारभार त्यानें आदिनाबेगकडे देऊन मुघ्लानी बेगम हिच्या मुलीशीं जबरदस्तीनें लग्न लावून बेगमेस दिल्लीस नेलें. याच सुमारास नजीबखानानें जुना वजीर सफदरजंग याचा मुलगा शुजाउद्दौला, मारवाडचा बिजेसिंग, जयपुरचा माधोसिंग, सुरजमल जाट वगैरेंशी संधान बांधून मराठ्यांविरुद्ध अबदालीस हिंदुस्थानांत बोलाविण्याचें कारस्थान रचिलें. त्यांत गाजीउद्दीनाचा पुरेपूर सूड उगविण्याच्या इर्षेनें मुघ्लानी बेगम ही सामील झाली. अबदालीस आणून गाजीउद्दीनाची वजिरी नजीबखानास द्यावी आणि मराठ्यांना दिल्लींतून हांकलून द्यावें असा बेत जमला. या गोष्टी इतक्या गुप्तपणें शिजत होत्या कीं वजीर गाजीउद्दीन यास त्यांची वार्ताही कळत नव्हती.

---

१. नजीबखान.—नजीबद्दौला हा रोहिला प्रमुख बसरतखानाचा पुतण्या. अलि महमदशहाच्या कारकीर्दीत हा रोहिलखंडात आला. बादशहा अहमदशहाने त्यास नजीबद्दौला हा किताब दिला. अहमदशहा अबदालीस हिंदुस्थानात आणण्यात हा प्रमुख होता. पानिपतच्या युद्धात ह्याने सक्रीय भाग घेऊन अबदालीस मदत केली होती. म्हणून त्यास १७६१ मध्यें दिल्लीचा वजीर नेमिले. ती वजीरी त्याजकडे १७७१ पर्यंत चालू होती. तो स. १७७० मध्यें मरण पावला.

२. मल्लीका-अज्जमानी—ही दिल्लीचा बादशहा मुहम्मदशहा (मृ. १७४८) याची पत्नी. ही कर्तबगार राजकारणी स्त्री होती.

प्रथम अबदालीने पंजाब प्रांतावर आपला हक्क आहे हे कबूल करून घेण्यासाठी त्याने आपला वकील कलंदरखान यास गाजीउद्दीनकडे पाठविले. पण गाजीउद्दीनाने त्यास वाटाण्याच्या अक्षता लावल्या. याचवेळी नजीबखानाचा भाऊ सुलतानखान अबदालीसमोर आमंत्रण घेऊन उभा. एकूण या बाबतीत अबदालीचा संताप व नजीबाचे आमंत्रण या गोष्टी अगदी वेळेवर घडल्या. अबदालीने हिंदुस्थान स्वारीची तयारी करून तो स. १७५६ च्या नोव्हेंबरात पेशावरास दाखल झाला. पंजाबच्या सुभ्यावर असलेल्या आदिनाबेगवर त्याने आपला सरदार जहानखानाला आणि मुलाला फौज देऊन पाठविले. आदिनाबेगचा पराभव करून जहानखानाने लाहोर आणि सतलजचा प्रदेश काबीज केला. अबदालीने पंजाबातून बीयास ओलांडून सतलज नदीच्या जवळ मुक्काम केला तेव्हा त्याचा सरदार जहानखान सरहिंदपर्यंत चाल करून आला. अबदालीने दिल्लीस येऊ नये म्हणून गाजीउद्दीनने मोघलानी बेगमला शहाकडे आपल्यातर्फे रदबदली करण्यास पाठविलें. ती कर्नाल जवळील शहाच्या छावणीत दिनांक १२ जानेवारीस पोचली. शहानें तीला खालील अटी सांगितल्या :

(१) २ कोटी रुपये खंडणी ;

(२) बादशहाच्या मुलीशी लग्न लावून देणे ;

(३) सरहिंदच्या नैऋत्येकडील पंजाब, काश्मीर व मुलतान हा प्रदेश शहास द्यावा.

वजीर किंवा बादशहा ह्यापैकी कोणीही ह्या अटी कबूल करण्यास धजेनात. एकतर त्याजवळ पैसा नव्हता व लढण्याची ताकदही नव्हती.[१]

अब्दाली दिल्लीवर निघाला ही बातमी दिल्लीस येताच दिल्लीत एकच गडबड उडाली. दिल्लीत पातशहाची फौज अगदी थोडी होती. तीतही नजीबखानान फितुरी करून ठेवली होती. अंताजी माणकेश्वराची मराठी फौज दिल्लीस रक्षणास होती पण ती लहान असल्यामुळे तिचा टिकाव अब्दालीच्या प्रचंड फौजेपुढे लागणे शक्य नव्हते. १२ जानेवारी १७५७ ला अब्दालीचा सेनापति जहानखान पानिपतावर आला. नजीबखान रोहिलाससैन्य त्याला जाऊन मिळाला. १९ जानेवारीस अब्दाली दिल्लीजवळ येऊन ठेपला. वाटेत त्याला अडविणारे, थोपविणारे कोणीच नसल्यामुळे तो बिनधोक दौडत होता. अंताजीने अब्दाली दिल्लीजवळ येताच दोन लहानशा लढाया त्याशी दिल्या. पण सभोवारची स्थिती पाहून तो मागे सरकत फरीदाबादेस आला. मराठ्यांचे वकील हिंगणे, नारो शंकर वगैरे दिल्लीतून पळून गेले. गाजीउद्दीन दिल्लीची आशा सोडून त्याला भेटायला गेला. अब्दालीने त्याला धारेवर धरून एक कोट रुपये घेऊन वजिरीवर कायम करण्याच आश्वासन दिले. पण वजिराने आपल्याकडे लाखहि नसल्याचे सांगितले. मग मात्र अब्दालीने दिनांक २८ जानेवारी रोजी दिल्ली

१. सरदेसाई, म. रि. पेशवा बाळाजीराव, भा. २, पृ. २८९.

हस्तगत केली. अब्दालीच्या तीस हजार फौजेने खणती लावून रावापासून रंकापर्यंत सर्वांना लुटले. कोणालाही सोडले नाही. बादशहा व गाजीउद्दीन यास कैदेत टाकले. माणसे बहुत मारली, बहुत स्त्रिया भ्रष्ट केल्या. "पठाणांनी घर नीघर लुटले. चौक्या बसवून प्रत्येक घरवाल्याचे नांवाने हुकूम पाठवून पैसा उकळला. ज्यांनी नाकबूल केले त्यांचे हाल केले. लोकांनी आपला दाग-दागिना, वस्त्र-प्रावण विक्रीस काढले. पण विकत घेणाराच कोणी मिळेना. पुष्कळानी विष प्राशन केले. कित्येक तर हाल झाल्यानेच मेले."

"खान खानानइ निजामुद्दौलाचे घरी चार करोडीची मालीयत निघाली. गाजीउद्दीनाचे घरी एक करोड इतर सावकार देखील सात करोड, एकूण बारा करोड रुपयें घेऊन गेला.[१]"

दिल्लीतील लूट चालू असतानाच अब्दालीने आपले लष्कर मथुरेवर पाठविले दिनांक २८ फेब्रुवारी ते ६ मार्चपर्यंत या अब्दालीच्या पठाणांनीं मथुरा, वृंदावन व गोकूळ येथे हिंदूंच्या कत्तली करून अक्षरश: रक्ताचे पाट वाहिले. तीन हजार लोक मारून मुंडक्यांचा ढीग रचला. स्त्रीयांनी यमुनेत जीव दिले. पठाणांच्या या कत्तलीने यमुनेच्या काठावरील गांवेच्या गांवे ओस पडली. मथुरा लुटून तो आग्ऱ्यास आला व तेंही शहर त्याने घेतले. जाटांवर जाण्याचा विचार सुरजमलच्या गोड वागणुकीमुळे त्याने स्थगित केला. इतक्यात उन्हाळा आला. महामारीने फौजेंतील लोक मरू लागले. तेव्हा अब्दालीने आपली मोहिम आवरती घेतली. गाजीउद्दीनास वजिरी व नजीबखानास बक्षिगिरी देऊन बारा कोट रुपयें व सुंदर तरुणींचा तांडा बरोबर घेऊन अब्दाली स्वदेशी परत निघाला.

**परत जातानाची व्यवस्था :**

परत जाताना गाजीउद्दीन यास शहाने वजीर नेमिले आणि नजीबखानास अमीर-उमराव करून पांच हजार फौजेनिशी त्यास बादशहाचे बंदोबस्तास ठेविले. तसेच सरहिंद येथे त्याने अब्दुस्समदखानास दहा हजार फौजेनिशी बंदोबस्तास ठेविले. लाहोरास आपला मुलगा तैमुरशहा व जहानखान यांची स्थापना केली. नजीबखानाच्या मनातून मोगलपातशाही मोडून पठाण पातशाही व्हावी असे होते. पण अब्दालीने नजीबचे न ऐकता जुनी व्यवस्थाच चालू राहू दिली. मुघलानी बेगम मुलतानपर्यंत अब्दाली बरोबर पंजाबची व्यवस्था आपणास द्यावी अशी विनवणी करत गेली. पण अब्दालीने तीस साफ नकार दिल्यामुळे तिला पंजाबात परत जाऊन आपले राहिलेले दिवस हालात काढावे लागले.

दादासाहेब व होळकर उत्तरेतून पुण्यास ऑगस्ट १७५५ त आले व जनकोजी शिंदे जाटांचे पारिपत्य करून मुलूख मिळवून एप्रिल १७५६ त पुण्यास

---

१. पे. द. २७, ले. १५२; रा. खं. १ ले. ६३.

आला. ह्या मातब्बर मराठे सरदारांच्या पश्चात पेशव्यांनी जिंकलेल्या मुलखाची व्यवस्था कोणती केली ते पाहू.

पेशव्यांच्या हाती सर्व सत्ता आली त्यावेळीं मुख्य सरदार व मामलतदार म्हटले म्हणजे शिंदे, होळकर, पवार, गायकवाड, भोसले, पटवर्धन, अंताजी माणकेश्वर, विठ्ठल शिवदेव, गोविंद बल्लाळ, गोपाळराव पटवर्धन, नारो शंकर, मानाजी आंग्रे, सदाशिव रामचंद्र शेणवई, रामचंद्र गणेश कानडे, त्रिंबकराव विश्वनाथ पेठे, मेहेंदळे, पुरंदरे, चिटणीस, पायगुडे, थोरात वगैरे होत. हे सर्व सरदार पेशव्यांचे नोकर होते. उत्पन्नाच्या संबंधानें या सरदारांची गणना मामलतदार म्हणून होत असे. ह्यांनीं आपापल्या प्रांतातील वसूल उत्पन्न करून, खासा, कारकून, शिबंदी यांचा खर्च करून बाकी राहिल तो पैसा पुण्यास पोचवावा असा करार असे. ह्या फौजांच्या खर्चाकरिता जे निव्वळ मामलतदार असत, त्यांना महालातून रोकड रक्कम मिळे व जे सरदार असत त्यांना सरंजामाला महालातील काही प्रांत स्वतंत्र तोडून दिलेला असे. याप्रमाणे मुलकी व लष्करी अशा दोन नात्यांनी पेशव्यांशी सरदारांचा संबंध येई. सरकारी मोहिमास पेशवे सांगतील तेव्हा सरदारांना आपापल्या फौजा घेऊन जावे लागे.

सन १७५१ ते १७५६ पर्यंत उत्तरेत स्वाऱ्या करून पेशवे व सरदार यांनी जो मुलूख मिळविला त्यांची व्यवस्था काय केली ते पाहू.

बापूजी महादेव व दामोदर महादेव हिंगणे हे पेशव्यांच्या तर्फे दिल्ली प्रांतात मामलतदार होते. यांच्यावर पैशांच्या बाबतीत पेशव्यांची गैरमर्जी होती.[1] गोविंदपंत बुंदेले याजकडे अंतर्वेद व बुंदेलखंड ह्या प्रांतातील पेशव्यांच्या व सरदारांच्या वाटणीचा मुलूख कमाविशीने होता.[2] गोविंदपंत आपल्या मामलती व पैशांची अफरातफर करतो, तो पेशव्यास ऐवज देत नाही व हिशेबही देत नाही[3] असा पेशव्यांचा त्याच्यावर आरोप होता.

सन १७५४ च्या मार्च महात पेशव्यांनी सरकार अंमलातील मुलूखाची आकार वाटणी शिंदे होळकरास कळविली ती अशी—जे परगणे सरकारात असतील त्यांचा आकार जो होईल, त्यातून दिल्लीस समाईक फौज राहील त्याचा खर्च वजा होऊन बाकी जो ऐवज त्याची वाटणी हिस्सेप्रमाणे अशी— दर शेकडा रु. ५३ ६ आणे, सरकारची वाटणी, २३ (५ आणे) मल्हारजी होळकर, २३ (५ आणे) जयाजी शिंदे, एकूण १०० येणेप्रमाणें दर शेकडचाला जो निव्वळ ऐवज राहील त्याची वाटणी वरीलप्रमाणे.[4]

१. रा. खं. १, ले. ६९.
२. कित्ता, ले. ६१.
३. कित्ता, ले. ६०, रा. खं. प्र. पृ. ५६.
४. बा. बा. रो. भा, १ पृ. १३०.

या वाटणीप्रमाणें पेशव्यांची खासा फौज दादासाहेबाबरोबर दिल्लीहून ऑगस्ट १७५५ त आली. शिंदे एप्रिल १७५९ मध्ये पुण्यास आले. पाठी-मागे दिल्लीस अंताजी माणकेश्वराच्या ताब्यात पांच हजार फौज दिल्ली संरक्षणाकरिता होती. अब्दाली आपल्या ३० हजार पठाण सैनिकांसह दिल्लीवर चालून आल्यावर ह्या फौजेने माघार घेतली. तसेंच गोविंद बल्लाळ, नारो शंकर आदि मामलेदारांनींसुद्धा समंजसपणाने अंताजीची री ओढली आणि हे सर्व लोक चंबळ नदीच्या दक्षिणेस येऊन राहिले.

पेशव्यांना आपल्या दिल्लीतील हस्तकांकडून अबदाली पुन्हा हिंदुस्तानात येण्याची तयारी करीत आहे असे कळले तेव्हा त्याने आपला भाऊ राघोबादादा यास होळकरास बरोबर देऊन उत्तरेस अबदालीच्या समाचारास जाण्यास सांगितले व पेशवा स्वतः श्रीरंगपट्टणास गेला.[1] रघुनाथराव व होळकर दक्षिणेतून दिल्लीवर निघाले होते. त्याचवेळीं सन १७५६ च्या नोव्हेंबरात अबदाली काबूलहून निघाला होता. १७५७ च्या या स्वारीत पेशव्याने रघुनाथरावाला खालील कामे नेमून दिली होती: (१) राजपुतान्यातील संस्थानिकांची व्यवस्था लावावयाची; (२) दिल्लीच्या पातशहाची व्यवस्था लावावयाची; (३) अबदालीचे पारिपत्य करावयाचे; (४) रोहिल-खंडातील रोहिल्यांची व्यवस्था लावावयाची; (५) काशी, प्रयाग, बंगाल वगैरे प्रांतावर पूर्वेकडे स्वारी करून मातब्बर पैका मिळवावयाचा; (६) सर-कारी मुलुखातील मामलतदारांची चौकशी करावयाची; (७) दामोदर महादेव, बापूजी महादेव, लक्ष्मण शंकर, गोविंदपंत बुंदेले, नारो शंकर, अंताजी माणकेश्वर वगैरे मंडळी पैशांची अफरातफर करितात. त्यास तंबी देऊन पैसा वसूल करावयाचा; (८) नजीबखानास नाहीसा करावयाचा व (९) जिंकलेल्या प्रदेशातून पैका मिळवून पुढे मोहिम करावयाची.[2] या कामांपैकी रघुनाथरावाने किती कामे केली ते पाहू.

दादा होळकरासंगे पुण्याहून नोव्हेंबर १७५६ त निघून माळव्यात आले. किरकोळ खंडण्या वसूल करीत राहिले. राघोबाच्या हाताखालील ही मुलुख-गिरी फौज फेब्रुवारी १७५७ ला इंदूरला आली. पण सैन्याचे पगार थकलेले ते देण्यास पैका जवळ नसल्यामुळे राघोबा इंदूरलाच रेंगाळत रहिले. सांप्रत भलता एखादा मनसवा करून मुलूख अथवा रुपये मिळावयाची सोय दिसत नाही. अबदालीचे पारपत्य करावे तरी फौज अद्यापि जमा झाली नाही असे राघोबादादा पेशव्यास इंदूराहून लिहितात.[3]

उत्तर हिंदुस्तानातील बुंदेलखंड ते अंतर्वेदीपावेतो मुलूख रक्षिण्यास किती फौज पाहिजे याचा अंदाज पेशव्यास बुंदेले याने २४ फेब्रुवारी १७५५ च्या पत्राने दिला होता. वरील प्रदेश व दिल्ली रक्षिण्यास हमेशा वीस हजार फौज

१. रा. खं. १, ले. ६५.
२. राजवाडे खं. १ पृ. ५८-५९.
३. रा. खं. १ ले. ५२.

हवी. एवढी फौज नसल्यास पैसा वसूल होणार नाही, हयगय होऊन फजिती होईल." खरोखर मराठ्यांची अशी फजिती अबदाली दिल्लीस आल्यावर झाली होती. कारण अंताजी माणकेश्वरच्या ताब्यात पांच हजार फौज होती. तिची कशी अवस्था झाली हे मागे सांगितलेच आहे. तेव्हा जवळ फौज बेताची व पैसा वसुलीने मिळवायचा म्हणून खंडणी वसूल करण्यासाठी दादा व होळकर प्रथम राजपुतान्याकडे वळले. राजपुताना, रोहिलखंड या प्रदेशांची व्यवस्था लावण्यात जूनपर्यंतचे दिवस गेले. मल्हारराव होळकर माधोसिंगाशी दोन महिने खंडणीचा घोळ घालत बसले. आणि लटकी लचांड काढून तीन महिने लांबविले.[१]

रघुनाथरावास मल्हारराव ऐकत नव्हता असे दिसते. माधोसिंगाची मसलत विल्हेस लावून दिल्ली सुभा व लाहोर सुभा जप्त करू या, त्यामुळे चार पैसे मिळतील व दबदबाही वाढेल असे मल्हाररावास दादा सांगत होते. पण होळकराने ते मनावर घेतले नाही.[२] त्यामुळे दादाना राग येऊन त्यानी माधोसिंगाच प्रकरण निकालात काढून ते जयनगरकर, रामसिंग मेडतेवाले, पृथ्वीसिंग पन्नावाले इत्यादि रजपूत लोकांची राजकारणे निभावण्याच्या उद्योगास लागले.[३] ती व्यवस्था लावून १७ जून १७५७ चे सुमारास मराठे यमुनेपलिकडे दुआबात उतरले. अंताजी माणकेश्वराने सिकंदराबादचा प्रदेश कबजात घेतला. पण मुख्य उद्योग दिल्ली ताब्यात घेण्याचा होता. दिल्लीस सर्व अखत्यार नजीबखानाकडे असून अंतर्वेदचा प्रदेश त्याचे ताब्यात होता. गाजीउद्दीन नजीबखानास काढून लावण्यास उत्सूक होता ह त्याना दादास मी आपला दोस्त, आपण येऊन बंदोबस्त करावा असे पाचारण केले त्यावेळी सिद्ध झाले. नजीबखानास ही बातमी कळताच त्यास आपला अंतर्वेदीचा प्रदेश जाणार याची धास्ती पडून त्याने मल्हाररावातर्फे दादाची मनधरणी करण्यास सुरुवात केली व आपली ६ कलमी शांतता योजना राघोबास सादर केली.

(१) मी तुमचा निष्ठावंत चाकर तुम्ही सांगाल त्याप्रमाणे दिल्ली व मुलूख स्वाधीन करून यमुना पार उतरून जाईन ;

(२) किंवा मी शहाअब्दालीकडे जाऊन तुमचा त्यांचा कायम तह ठरवून उभयताची हद्द वाटून देईन ;

(३) पुत्र झाबेताखान यास सात हजार फौजेनिशी तुमच्या जवळ ठेवीन म्हणजे मजबद्दल तुमचे मनात संशय राहू नये ;

(४) या गोष्टी कबूल नसतील व लढाई करण्याचा इरादा असेल तर लढाईही देईन व परमेश्वर यश देईल तर राज्य करीन.[४]

---

१. रा. खं. १ ले. ६७.
२. रा. खं. १-६७.
३. रा. खं. १-७२.
४. पे. द. २ ले. ७७.

वरीलपैकी शेवटची अटच मराठ्यांनी मान्य केली.

अंतर्वेदीत अंताजी माणकेश्वरची फौज उतरली होती. तीने सहारणपूर-पासून इटाव्यापावेतोचा तमाम प्रदेश अल्पायासे व्यापला. आता दिल्लीच घेण्याचे काम बाकी राहिले. वजीर गाजीउद्दीन पहिल्यापासून मराठ्यास अनुकूल होता त्यास मराठ्यांचा आश्रय इष्ट वाटत होता. त्याने हिंगण्याचे मार्फत रघुनाथरावाशी पुढील व्यवस्थेचे बोलणे सुरू केले. ते मान्य करून रघुनाथराव जून १५ रोजी दिल्लीवर निघाले. यमुनेच्या उभय काठांनी मराठी फौजा चालून गेल्या त्या ऑगस्ट १७५७, ११ ला दिल्ली पुढे येऊन ठाकल्या.[१] रघुनाथरावानी बादशहाकडे चौथाईची मागणी केली. तेव्हा बादशहाने कळविले कीं, अब्दालीने एक पै देखील शिल्लक ठेविली नाही. आम्ही द्यावे काय? नजीबखानाने मात्र दिल्ली लढविली. मराठी फौजांनी चोहीकडून दिल्लीस गराडा घातल्यावर शहरात महर्गता होऊ लागली. नजीबखानाने गाजीउद्दीन मराठ्यास मिळाला म्हणून त्याचा वाडा लुटून त्याच्या जनानखान्याची विटंबना करून त्या सर्वांस बाहेर काढीले. आपण स्वतः पंधरा दिवस दिल्ली लढविली. शेवटी विठ्ठल शिवदेवाने त्यास सर्व साथीदारांसह पकडून दिल्लीचा कबजा घेतला. या बहादुरीबद्दल बादशहान विठ्ठल शिवदेवास पोषाख, जवाहीर, "राजे उमदेतुलमुल्क बाहादर" किताब व चांदवड तालुक्यांत जागीर नेमून दिली.

नजीबखानाने आपले वकील अतस्थपणे मल्हाररावाकडे पाठवून "मी आपला धर्मपुत्र, माझा बचाव करावा मी तुमचे उपकार विसरणार नाही." अशी विनवणी केली. नजीबखानास मारून टाकावा जिवंत राहिल्यास नाश करील. अशी सूचना रघुनाथरावास पुष्कळानी केली. पण मल्हार-रावाने दादासाहेबाकडे नजीबखानास अपाय करू नये अशी भीड घातली. तेव्हा दादासाहेबानी मल्हाररावाचे म्हणणे मानून नजीबखानास जीवदान दिले. राजधानीतील सर्व अधिकार सोडून व अंतर्वेदींतील आपली सर्व ठाणी सोडून नजीबखान ६ सप्टेंबर रोजी मोठ्या कष्टाने दिल्ली सोडून गेला. उपकारकर्त्या मल्हाररावाला भली मोठी रक्कम दिली असावी. नजीबखानास मोकळा न सोडता चंदासाहेबास जसा सातार्‍यास आणून ठेवला तसा दक्षिणेत कोठेतरी बंदोबस्ताने ठेवला असता तर पुढील अनर्थ टळले असते त्यास मोकळा सोडून मालकीच्या जागेत नादू दिले ही मोठी राजकारणी चूक पुढे मराठ्यास भोवली.

नजीबखानास काढून लाविल्यावर दादासाहेबानी अलमशहास तक्तावर बसवून, गाजीउद्दीनास वजिरी व अहंमदखान बंगस यास मीरबक्षीगिरी देऊन पूर्ववत आपली ठाणी बसवून पांच हजार फौज दिल्लीस रहावी असा करार करून बंदोबस्त केला[२].

---

१. पे. द. २७ ले. १९३-१९७.

२. पे. द. २१ ले. १४४-१४८.

दिल्लीहून पुढे लाहोरकडे जावे की, नाही हा दिल्लीच्या मुक्कामात रघुनाथरावांच्या सल्लागारांपुढें मुख्य प्रश्न होता. अबदालीने पंजाब प्रांत काबीज करून लाहोरास पुत्र तैमुरशहा व सेनानी जहानखान यांस बंदोबस्तास ठेवून मग स्वदेशी प्रयाण केले. पंजावही शिखांची मातृभूमी, ती परक्यांच्या ताब्यात राहाणे शिखांस मोठे लांच्छन वाटे. अबदालीने सन १७५७ एप्रिलात परत जाताना अमृतसर येथील शिखांचे सुवर्णमंदीर पाडून जवळचे ते पवित्र सरोवर मातीने भरून त्या जागी शेती बनविली. पण अबदाली निघून जाताच शिखांचे प्रमुख पुढारी जसासिंग आलूवालिया, अलासिंग जाट आणि जसासिंगराम गडीया यांनी ते मंदीर व सरोवर पुनः पूर्ववत् बनवून पंजाबात शिखांचे राज्य सिद्ध केले.

इतकेच नव्हेतर लाहोर येथे तैमूरशहाचा कोंडमारा केला तेव्हा अफगाणांनी तेवीस हजार फौज घेऊन शिखांवर चाल केली. त्याचा फन्ना शिखांनी उडविला आणि रघुनाथराव दिल्लीस होता त्यास त्वरेने मदतीस बोलाविले. या मदतीबद्दल त्यानीं मराठ्यास चालींच्या दिवसाचे दररोज एक लाख व बैठ्या मुक्कामाचे अर्धा लाख कबूल केले.[1] (डिसेंबर १७५७).

तसेच पंजाब हिसकावून घेण्यासाठी बादशहा व वजीर यांचाही आग्रह मराठ्यास सारखा चालू होता. बादशहाच्या आग्रहास्तव शिखांनी दाखविलेल्या विलोभनास रघुनाथराव बळी पडले. त्यानी १७५८ च्या सुरवातीस पंजाब मोहीम अंगावर घेतली.

मल्हारराव कुंजपुऱ्यावर चालून गेले. तेव्हा बरोबर कुरुक्षेत्र यात्रेसाठी जनानखाना व परिवार होता पलिकडे सरहिंद येथें अबदालीच्या तर्फेने अद्बुसमदखान बंदोबस्तास होता, त्याने होळकराच्या मंडळीवर चाल करून अटकावून ठेविले पण होळकराच्या संरक्षकांनी अफगाण पहारेकऱ्यास कापून बायकास सोडवून परत नेले. नंतर एक दिड महिना आपले बेत ठरविण्यास घेऊन रघुनाथराव, मल्हारराव वगैरे पुढे चाल करून गेले. ते तारीख ८ मार्च स. १७५८ ला सरहिंद येथे पोचले. तेथे त्यांना अलाजाठची शीख फौज सामील झाली. त्यांनी सरहिंदला वेढा घातला. लढाई चालू झाली. अब्दालीचे सरदार अब्दुस्समदखान व जंगबाजखान यास जखमा लागल्या धरून आणून वस्त्रे भूषणे देऊन आपल्यापाशी ठेविले. शहर लुटून घेतलें. श्रीमंतांनी अबदालीची दहा हजार फौज बुडविली. त्याचा सूड घेतला.[2]

सरहिंद व दुआब प्रांत हे दोन्ही तालुके आदिनाबेग मोगलचे स्वाधीन खंडणी ठरवून केले. पंजाबात शीख व बादशाही अंमलदार आदिनाबेग पठाणांचा उच्छेद करीत होते. त्यांच्या आग्रहावरून दादानी लाहोरकडे प्रयाण केले. आदिनाबेगचा जावई ख्याजामीझी हा हुशार सरदार मोगल फौज घेऊन

---

१. पे. द. २ ले. ८३.

२. पे. द. २७ ले. २२०, पे. द. २१ ले. १५८.

मराठ्यास मिळाला. मानाजी पायगुडे हा मराठा सरदार व आदिनाची फौज जहानखान व अवदाली पुत्र विसहजार फौजेनिशी लाहोरात होता. त्याजवर चालून गेले. तेव्हा ते घाबर होऊन बुणगे, तोफखाना, फौज मागे टाकून साडे तीन, चार हजारांनिशी चिनाब नदी उतरोन जीवरक्षणासाठी पळाले. आपल्या फौजेने नदीपर्यंत पाठलाग करून फौज व तोफखाना लुटून घेतला. चिनाबचे पाणी खोल व गार म्हणून नदीपार गेले नाहीत, चिनाबेला पाणी थोडे असते तर फौज अटकेपर्यंत जाती.[1] इकडे मागे दादासाहेबाने येऊन लाहोरचा कबजा आदिनाबेगच्या मुलामाणसास सोडवून दादानी मुलतान अटकेपर्यंतचा पंजाबचा मुलूख आदिनाबेगचा दिवाण लक्ष्मी नारायण याच्या स्वाधीन केला. आदिनाबेगने दादासाहेबाचा भव्य सत्कार शालीमार बागेतील पुरातन वाड्यात केला. त्यास एक लाख रुपये खर्च झाले पुढे शिंदे होळकरांच्या फौजेने अटकेपावेतोचा प्रदेश हस्तगत केला. अटकेवर मराठ्यांचा झेंडा रोविला.

**जिंकलेल्या मुलुखाची व्यवस्था :**

सरहद्द हिंदपासून अटकेपर्यंतच्या पंजाब प्रांताचे लाहोर, मुलतान व काश्मीर या नांवाचे तीन सुभे होते. त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था रघुनाथरावानी केली. लाहोर व मुलतान या प्रांताचा कारभार आदिनाबेगचे हवाली केला. त्याचे सहाय्यास लाहोर प्रांती रेणकोअनाजी, रायाजी सखदेव, गोपाळराव गणेश बर्वे[2] यास ठेविले. अवदालीच्या तर्फे त्यांचा सरदार अब्दुस्समदखान हा सरहिंद येथे बंदोबस्तास होता त्याचा पराभव झाल्यावर तो मराठ्यास शरण आला. यास्तव त्यास व काबूलचा सुभा अब्दुल रहीमखान या दोघांकडे अटकेपलिकडे पेशावरच्या सुभाचा बंदोबस्त सोपविला. दिल्लीपासून लाहोर पावेतोच्या मुलूखाचा कारभार मल्हाररावांना देऊन रघुनाथरावानी दक्षिणेत यावे अशी आज्ञा पेशव्याने केली.[3] पण मल्हाररावनेही जबाबदारी स्विकारली नाही. दादानीही या बाबतीत पर्याय म्हणून दुसऱ्या एकाद्या मराठा सरदाराची नेमणूक आपल्या अखत्याराने केली नाही. शिंद्यांच्या तर्फेने साबाजी व होळकरांचा तुकोजी यांची पथके व दुसरे कित्येक दुय्यम प्रतीचे मराठे सरदार ठिकठिकाणी ठेवून रघुनाथराव व मल्हारराव सोमवती अमावस्येचा योग (५ जून स. १७५८) साधण्यास कुरुक्षत्रावर गेले. रघुनाथरावानी दक्षिणेत जाऊ नये म्हणून वजीर गाजीउद्दीनापासून आदिनाबेग पर्यंत सर्वांनी नानातऱ्हेने विनवणी केली. यावेळी अवदाली परत फौज घेऊन निघाला. ही बातमी गाजीउद्दीनास समजली तेव्हा तो रघुनाथरावांस मिळण्यासाठी आपली फौज घेऊन निघाला. मराठ्यांना त्याने वीस लाख रुपयाची देणगी दिली.

---

१. पे. द. २७ ले. २१८.

२. हा रघुनाथरावाचा मेहुणा.

३. फाळके, शि. शा. इ. सा. भा. ३ ले. ९२.


मराठा साम्राज्य
(इ.स. १७५८)
काबूल
पेशावर
अफगाण साम्राज्य
लाहोर
सतलज नदी
मुलतान
बहावलपूर
सिंधु नदी
पानिपत
दिल्ली
बिकानेर
जयपूर
रजपुत
जैसलमेर
जोधपूर
बुंदी
ग्वाल्हेर
शिंदे
आलाहाबाद
लखनौ
औंध
गंगा नदी
बनारस
पाटणा
चितोडगड
उदयपूर
होळकर
इंदूर
नर्मदा नदी
गायकवाड
बडोदा
कलकत्ता
भोसले
महानदी
तापी नदी
नागपूर
कटक
गोदावरी नदी
उदयगिरी
निझाम
पुणे
हैद्राबाद
सातारा
कृष्णा नदी
मच्छलीपट्टम
तुंगभद्रा नदी
मद्रास
श्रीरंगपट्टम
कावेरी नदी

**जनकोजी शिंदे उत्तरेत जाण्यास निघतात :**

निजामास नरम करण्याकरिता पेशव्याने शिंद्यास १७५७-५८ त दक्षिणेत ठेवून घेतले. शिंद्याचे हिशेब तुंबले होते. त्यांची चर्चा व शिंदखेडची मोहिम उरकून स. १७५८ च्या फेब्रुवारीत पेशव्यानी जनकोजीची रवानगी उत्तरेत केली. एप्रिलात जनकोजी उज्जयनीस आला.[१] तिथून खंडण्या घेत तो मुकुंदवारीने कोटयास आला. जुलैत उदेपुरच्या राण्याशी त्याच झुंज झालें.[२] तिथे रघुनाथरावाची व त्याची गांठ पडली. "नजीबखानाचा काटा काय वाटेल ते झाले तरी काढ" असे दादाने त्यास कळकळीने सांगितले. उलट मल्हाररावानी नजीबखानास आपला धर्मपुत्र समजून त्याचे अगत्य धरून अंतर्वेद, कुरुक्षेत्र, कुंजपुरा आदि प्रांताची मामलत आपले तर्फेने त्याचे स्वाधीन केली. आणि जनकोजीची भेट १० ऑगस्ट रोजी घेऊन त्याचा पेशव्यांविरुद्ध बुद्धीभेद करून नजीब तेवढा जिवंत ठेवून त्याचा आपल्या कामी उपयोग करून घ्यावा त्यास अपाय करू नये, ही गोष्ट मल्हाररावानें सांगितली असावी आणि ती मानिली असावी. कारण जनकोजी पुढे नजीबला बरोबर घेऊन त्याचा विश्वासघात होतो तोवर वावरताना दिसतो.

ऑगस्टमध्ये मल्हाररावाची भेट घेऊन जनकोजी मारवाड राजपुतान्याच्या खंडण्या वसूल करण्यास गेला. यावेळी बादशहा व वजीर गाजीउद्दीन यांच्यामध्ये बिघाड उत्पन्न झाला होता. तेव्हा बादशहाचा वजीर गाजीउद्दीन याने मल्हारराव होळकर व जनकोजी शिंदे यांना तावडतोब मदतीस बोलाविले परंतु दत्ताजी शिंदे आल्याखेरीज जनकोजी दिल्लीकडे जाण्यास तयार नव्हता. ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यात जनकोजीने आपला मुक्काम राजपुतान्यात केला त्यासमयी त्यांनी मारवाड व जयनगरकडून खंडणी घेण्याचा करार केला. आणि कोटा संस्थानचाही बंदोबस्त केला.[३] इकडे वजिराची हाक पेशव्यापयत पोचली तेव्हा पेशव्याने दत्ताजी शिंद्यास दिल्लीस जाण्यास फर्माविल. त्यास पेशव्याच्या आज्ञा अशा—

(१) नजीबाचे पारिपत्य करावे; (२) लाहोरचा बंदोबस्त करावा; (३) तीर्थक्षेत्रे सोडवावी; (४) पटणे, बंगालपर्यंत स्वारी करून क्रोड दोन क्रोड रुपये मिळवून दौलतीचे कर्ज निवारणे; (५) अंताजी माणकेश्वराचा बंदोबस्त करणे.[४]

दत्ताजी दक्षिणेतून मे १७५० त निघून माळव्यात आल्यावर त्याची व दादासाहेब याची भेट उज्जयनीजवळ जुलै १७५८ त झाली. दादासाहेब दक्षिणेत सरकले आणि दत्ताजी उत्तरेस जाताना रुपनगरमध्ये खंडणी वसूल करण्याचे कामात गुंतला. दत्ताजी जनकोजीची भेट वाडीस नोव्हेंबर १७५८ त

१. पे. द. २१ ले. १६२, पे. द. २ ले. ९५.
२. पे. द. २ ले. ९४-९६, १०१.
३. सरदेसाई म. रि. पेशवा बाळाजीराव, भा. २ पृ. ३१९.
४. का. सं. प. या. ले. १६५.

झाली. तदनंतर तारीख ६ डिसेंबरास दत्ताजीने संस्थान इंद्रगड, सरकार, रणथंबो, सुभा अजमीर येथील मुलुखावर खंडणी वसूल केली. पुढे दत्ताजी शिंदे आणि त्यांच्या समागमे पवार प्रचंड मराठा फौजेनिशी दिल्लीकडे कूच करून गेले, आणि दिनांक २६ डिसेंबर १७५८ रोजी नजफगडला पोहोचले.

पेशव्यास रघुनाथरावाकडून उत्तरेतील घडामोडीची हकिगत सप्टेंबर १७५८ त कळली. विशेषत: मल्हाररावानें नजीबास जीवदान दिल्याचे समजताच पेशव्याने मल्हाररावास आपल्या भेटीस पुण्यास बोलाविले. पण मल्हारराव आजारी होऊन अंथरुणात होता. त्यास बरे वाटल्यावर तो डिसेंबरात पेशव्यांच्या भेटीस आला. पेशव्याने मल्हाररावास उत्तरेत शिंद्याच्या मदतीस जाण्यास हुकूम दिला. मल्हारराव जानेवारी १७५९ त उत्तरेत जाण्यास निघाला. पण एक वर्ष त्याने रजपुतांकडून खंडण्या घेण्यात घालविले; आणि जानेवारी १७६० त तो दिल्लीस पोहोचला.

## दत्ताजी शिंद्याची उत्तरेतील कामगिरी :

नजफडला पोहोचल्यावर शिंदे यांनी वजीर गाजीउद्दीनाकडे थकबाकीच्या वसूलीकरिता तगादा लावला. त्याकरिता दिल्लीचे आसपास एक महिना काढून वजिरास जेर केले आणि वजिरापासून किती रक्कम घ्यावयाची तो करार करून फेब्रुवारी १७५९ त त्यांनी पंजाबकडे मोर्चा वळविला. सन १७५९ च्या एप्रिल महिन्यात मराठे सतलज नदीचे पूर्व तटावर पोहचले; आणि माछीवाडा येथे तीन आठवडे मुक्काम करून राहिले. पंजाबचा सुभेदार अदीनाबेग मृत्यू पावला होता, त्याचा मुलगा या ठिकाणी मराठ्यास भेटला. त्याने बापाने कबूल केलेल्या खंडणीपैकी काही रक्कम मराठ्यास दिली. मराठ्यांनी पंजाब प्रांताचा सर्व कारभार आपले ताब्यात घेण्यासाठी थोडी फौज लाहोरास ठेविली व ते मे महिन्याचे सुमारास, दिल्लीस परत आले.[1] पुढे मराठे नानासाहेब पेशवे यांनी सांगितलेली कामगिरी करण्याच्या उद्योगास लागले.

लाहोरास असता दत्ताजीने सन १७५९ च्या मार्च मध्ये पेशव्यास लिहिले की, "गाजीउद्दीनखानास वजीरीचे पदावरून दूर करून सुजाउदौल्यास बादशहाची वजिरी व नजीबखानास मीरबक्षीगिरी मिळवून देण्यात मदत करावी. कारण ह्या मदतीबद्दल ते दोघे अनुक्रमे ५० लाख व ३० लाख रुपये नजर मराठ्यास देण्यास तयार आहेत". ह्या राजकारणासंबंधी पेशव्याने सरदारास समजाविले की, रोख जास्त पैसे देईल तिकडे जा, त्याची बाजू घ्या, त्याला अधिकारावर स्थापा व येनकेन प्रकारेण उत्तरेकडील सुवर्ण नदी पुण्यातील रूक्ष वाळवंट सुपीक करण्यासाठी वाहू द्या एवढीच पेशव्यांची इच्छा व आज्ञा. त्याच्या सिद्धीसाठी दत्ताजीसारख्या राजनिष्ठ नोकराला नको ती गोष्ट करण्याची पाळी आली. त्याने प्रथम नजिबास "मजबरोबर चल, आपण अयोध्ये पासून बंगल्यापर्यंत प्रदेश जिंकित जाऊ". असे सांगितले या गोष्टीस

---

१. खोबरेकर, मराठ्यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम, पृ. ४९४.

गाजीउद्दिनाची संमति नव्हती, कारण दत्ताजीने त्यापासून प्रयाग, काशी व पटणे या तीन शहरांची सनद मागितली होती व एकंदर स्वारीत जे द्रव्य मिळेल त्यातील रुपयातील दहा आणे मराठ्यांचे व सहा आणे वजिरांचे म्हणजे पातशाहीचे, अशी आणेवारी ठरविली होती. गाजीउद्दीन दुबळा होता. तरी मोगली राज्याचा वजीर म्हणून काहीही सोडावयास तयार नव्हता. याच वेळी त्याने नानासाहेब पेशव्याला किंवा त्यांच्या सरदारांना गुंडाळून ठेऊन आपल्या अधिकारात इंग्रजांना सुरतेचा किल्ला व शिद्दीच्या जागी मोगली साम्राज्याची आरमारी मुख्य सत्ता, नजराणा घेऊन सुपूर्त केली होती. दिल्लीची पातशाही मराठ्यांनी जिंकली होती. असे जे म्हणतात, त्यांनी ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. पराभव केलेल्या शत्रूचे परराष्ट्रीय राजकारणसुद्धा मराठ्यांनी कधी स्वतःच्या ताब्यात आणले नाही. याच गाजीउद्दीनाने ज्या बंगाल प्रांताची चौथाई भोसल्याने मिळविली होती, त्या बंगाल प्रांताची सुभेदारी नजराणा हबकून इंग्रजांचे बाहुले झालेल्या मिरजाफराला दिली व याबाबत मराठ्यांच्या हितसंबंधाचा विचारही मनात आणला नाही. दिल्लीच्या बादशाहीला आता एवढेच उत्पन्न उरले होते ते गमावून बसणे वजीराला शक्य नव्हते. गोष्ट होऊन गेल्यानंतर नानासाहेब पेशवा, अंताजी माणकेश्वराला व दत्ताजीला सुरतेची व जंजिऱ्याची सनद पातशहाच्या नांवाने करून पाठविण्यास लिहितो. नजिबाची मनधरणी दत्ताजीने चालविली तर ते वजीराला कसे आवडावे? वजिराची इच्छा मराठी फौजेच्या मदतीने गेलेले पूर्वेकडील सुभे परत जिंकण्याची होती. पण स्वारीचा सर्व अधिकार स्वतःच्या हाती राखण्याची त्याची खटपट होती. दत्ताजीने ती चालू दिली नाही. त्यामुळे दोघांचे सूत राहिले नाही[१].

गोविंदपंत बुंदेले यावेळी अंतर्वेदीतील मुलूख जिंकित जिंकित दिल्लीच्या पूर्वेस गुलावरीपर्यंत येऊन ठेपला, तेव्हा नजीबखानास त्यांच्या ताब्यातील मुलखाबद्दल भिती उत्पन्न झाली[२]. म्हणून त्याने अंताजी माणकेश्वरास भीड घालून त्याच्याकडून वजिराच्या मध्यस्थीने गोविंदपंताची पुढील स्वारी मना करविली. याबद्दल गोविंदपंतास घासदाणा म्हणजे घोडे व सैन्य यांची पोटगी मिळाली. खेरीज गोविंदपंतास महत्व देण्यासाठी वजिराने त्याला दिल्लीस बोलाविले आणि आपल्या तर्फेने सामोरे पाठवून त्यास आपणाजवळ आणविले. वजिराची व त्याची खाजगी भेट व बातचीत होऊन पंत मजकूरास दरबारी पोशाख, जवाहीर व घोडा दिला. तसाच सन्मान त्याचे मुलगे व जावई यांचाही झाला. गोविंदपंताचे व नजीबखानाचे राजकीय सूत जमल्याचा यात उल्लेख नाही. झाली ती गोष्ट अंताजी माणकेश्वराच्या हितासाठी झाली व तो यानंतर म्हणजे सन १७५९ च्या पावसाळ्यात पेशव्यांच्या बोलावण्यावरून दक्षिणेस निघून गेला.

दत्ताजी पंजाबातून परत आल्यानंतर त्याच्याकडे नजीबखानाचा वकील येऊन त्याने दत्ताजीबरोबर फौजसुद्धा पूर्वेकडील स्वारीस येण्याचे मान्य केले. याबाबत दत्ताजी पेशव्यास स्पष्ट लिहितो कीं, "येमुना उतरते समयी येऊन

१. सरदेसाई, म. रि. पेशवा बाळाजीराव, भा. २ पृ. ३२७.

२ हरिराम गुप्ता, मराठांज् अॅन्ड पानिपत, पृ. ३१५.

केल्या कराराप्रमाणे फौजसुद्धा आवरा तर उत्तम जाले. नये तरी आज्ञेप्रमाणे त्याचे पारिपत्य करून तेथील बंदोबस्त करून पूर्वेस जाऊ याच कामास गुंतावे तरी दिवसगत लागेल, थोरल्या कामास अंतर पडेल. गंगापार जावयास अवकाश थोडका यास्तव त्याची समजावीस काढून बराबर न्यावयाची तजवीज काढली असे".

**नजीबखान रोहिला व सुजाउद्दौला यांचा समाचार :**

सन १७५९ च्या मे महिन्यात पंजाबातून सर्व मराठा फौज दिल्लीकडे परत आली हे पूर्वी सांगितले आहे. या सर्व मराठा फौजेने यमुना नदी ओलांडून शामळी येथे मुक्काम केला. पुढे मे महिन्याचे शेवटी मराठे दक्षिणेस बागपताकडे गेले, व नजीबखान रोहिल्याने भेट घेण्यास यावे म्हणून त्यांनी त्याचे मन वळविले. कारण वजीर गाजीउद्दीनखान हा बादशहाचा कारभार करण्यास नालायक होता. बादशाहाचे संरक्षणासाठी दिल्लीत ठेवलेल्या मराठ्यांचे खड्या फौजेच्या खर्चाबद्दल ठरलेली रक्कम वेळेवर मिळण्यासाठी, अमीर उमराव ताब्यात ठेऊन चोख राज्यकारभार करण्याची पात्रता त्याचे अंगी बिलकुल नाही, अशी मराठ्यांची खात्री असल्यामुळे त्यांनी वजिरास कारभारावरून दूर करण्याच ठरविले. तेव्हां मराठ्यांना या समयी नजीबखानाच्या सहाय्याची जरूरी होती. त्यांनी नजीबखानास सामील करून घेण्याचे प्रयत्न केले. परंतु नजीबखानाने मराठ्यास सामील होऊन त्यांच्याबरोबर बंगाल बिहारच्या स्वारीवर जाण्याचे नाकारले, कारण इतक्या दूर स्वारीवर गेल्यावर पश्चात मराठे आपला मुलूख लुटतील ही भीति नजीबखानास होती. जून महिन्याचे शेवटी नजीबखानाने स्वसंरक्षणासाठी गंगा नदीच्या दक्षिण तटावर वसलेल्या आणि मुझफर नगरपासून सोळा मैल अंतरावर पूर्वेस असलेल्या शुक्रताल या ठिकाणी छावणी केली[१], आणि मराठ्यांचे हल्ल्यापासून स्वतःचे संरक्षण सहा महिनें करून शेवटीं विजयी झाला.

थोड्याच दिवसात मराठे नजीबखान रोहिल्याचे पाठोपाठ येऊन शुक्रतालचे पश्चिमेस येऊन दोन मलावर छावणी करून राहिले. हल्ला करण्यास ते ठिकाण कठिण असल्यामुळे मराठ्यांनी त्या ठिकाणास वेढा दिला. वेढा देऊन वसलेल्या या फौजेत कृष्णाजीराव व जिवाजीराव पवार फौजेनिशी होते मराठे व रोहिले यांच्या सैन्यात वारंवार झुंडा होत असे. जुलै ते सप्टेंबर या तीन महिन्यात अशीच लढाई चालू राहिली. तारीख १५ सप्टेंबर १७५९ रोजी झालेल्या झुंजात मराठ्यांचे पांचशे लोक व बरेच घोडे मारले गेले[२]. त्यानंतर पावसाळा कमी होऊन गंगा नदीस उतार मिळण्याची चिन्हे दिसू लागताच, दत्ताजीने गोविंद वल्लाळ बुंदेले यांच्याबरोबर दहा हजार घोडदळ देऊन शुक्रतालचे उत्तरेस बत्तीस मैल अंतरावर हरिद्वारनजीक त्यांना गंगापार केले, आणि रोहिलेच्या नजीबाबाद ठाण्यावर हल्ला करण्यास सांगितले. नजीबाबादच्या किल्ल्यात नजीबखानाने आपले काही अनुयायी व मालमत्ता सुरक्षिततेकरीता ठेविली होती. गंगापार झालेल्या या दहा हजार मराठा फौजेत कृष्णाजीराव व जिवाजीराव पवार आपल्या फौजेनिशी होते[३]. या

१. सरदेसाई म. रि. पेशवाबाळाजीराव भा. २ पृ. ३३२-३३.

२. कित्ता.

३. सं. दे. ३. सा. ले. १३०, १३१.

मराठा फौजेनें नजीबाबादच्या आसपासचा मुलूख जाळून राख केला, आणि ते जलालाबादेस गेले. वाटेत रोहिल्याचे संबळगड ठाणे होते. रोहिल्यांनी मराठ्यांची आवई ऐकून संबळगड ठाणे उभाउभी सोडून दिले. पुढे नजीबखानाचा पुत्र झाबेतखान, तसेच बुंदेखान, सादुल्लाखान व हफीज रहमतखान वगैरे रोहिले दहा हजार फौज व दहा हजार प्यादे जमा करून आणि जोडीला तोफा, समागमे घेऊन जलालाबादेजवळ जमा झाल. मराठ्यांनी या रोहिल्यांबरोबर एक दोन लढाया करून रोहिल्यांच्या चाळीस तोफा व बाण हिरावून घेतले. रोहिल्यांच्या सैन्यास मराठ्यांनी वेढा दिल्यामुळे रोहिल्यांचे लष्करात धान्य महाग होऊन पीठ रुपयास चार शेर झाल्यामुळे रोहिल्यांना घुगऱ्या खाऊन रहावे लागले. नजीबखानानें शुक्रताल येथील आपल्या फौजेभवती जो कोट केला होता त्याच्या आग्नेयेस गंगा नदीवर नावांचा पूल उभारिला होता. त्या पुलापर्यंत मराठ्यांनी चाल करून गाव जाळले. पुलाजवळ मराठ्यांनी रोहिल्यांचे ५० घोडे घेतले आणि पुलाच्या दोन नावा तोडून टाकिल्या[1]. अशा प्रकारे मराठे व रोहिले यांच्यामध्ये रोज चालू असलेल्या लढाईत रोहिलेच शिकस्त खाऊन जात होते. मराठ्यांकडील पेंढाऱ्यांनीं तमाम मुलूख लुटला व शहरे जाळली. त्यामुळे मुलखात कोठे दाणा, गुरू अगर वस्तवाब राहिली नाही हा प्रकार दहाबारा दिवस रोज चालू होता[2]. मराठ्यांनी रोहिल्यांचा एक हत्ती व बाणांच्या गाड्या व जेजाल्यांची उटे व घोडी लुटून आणली. सारा मुलूख ओस होऊन रोहिले पहाडात गेले. नजीबखानाचे लोक देखील घाबरून शुक्रतालाहून गंगापार बहुत गेले. त्याच्याजवळ लोक थोडे राहिले, त्यामुळे एकदोन रोजांनी तोही पळून जाणार होता, परंतु अयोध्येचा नवाब सुजाउद्दौला त्याच्या कुमकेस आला[3]. सुजाउद्दौल्यानें आपले सरदार अनुपगीर व उमरावगीर गोसावी यांच्या हाताखाली दहा हजार फौज रोहिल्यांचे मदतीस पाठविली. तारीख ३ नोव्हेंबर रोजी या फौजेनं मराठ्यांवर छापा घातला. सुजाउद्दौला रोहिल्यांचे मदतीस आला हे वर्तमान ऐकून मराठे फौजेने आवई खाल्ली आणि सर्व फौज गंगेअलिकडे आली. सुजाउद्दौला पुलापलीकडे येऊन राहिला आणि त्याच्या व नजीबखानाच्या भेटी झाल्या. त्याच दिवशी उमरावगीर गोसावी हजार पांचशे फौजेनिशी पुलावरून अलिकडे आला. ते युद्धप्रसंग करावा हे चित्तात ऐकून खंदकाबाहेर थोडे दूर आले, तो इकडून मराठे फौज उठली. मराठ्यांनी तोफांचा मार केला. तेव्हा ते लागलीच पुलापलीकडे पळून गेले, व फिरून माघारे आले नाहीत. यावेळी रोहिल्यांचे व सुजाउद्दौल्याचे चित्तात मराठ्यांबरोबर सलूख करावयाचे होते. परंतु त्यांनी नजीबखानाकडून पंचवीस लाख रुपये खंडणी मागितली ती देण्यास तो कबूल न झाल्यामुळे लढाई तशीच चालू राहिली[4].

मराठ्यांनी नजीबखान वगैरे रोहिल्यांना जेर केले होते, परंतु नजीबखानानें छावणी केलेले ठिकाण जिंकण्यास कठिण असल्यामुळे व पावसाचे दिवस असल्यामुळे नजीबखान इतके दिवस मराठ्यांचे हातून वाचला. त्याने

१. रा. खं. १ ले. १३८.
२. कित्ता ले. १४०.
३. सं. देवास (पवार) घ. इ. पृ. १५४.
४. कित्ता.

अब्दालीस पैका पाठवून बोलाविले होते, म्हणून रोहिले तग धरून राहिले होते. पुढे अब्दाल्ली तीस पस्तीस हजार फौजेनिशी चालून आला, तेव्हा नजीबखानाचा कारभार तसाच ठेवून मराठे सरदार व वजीर गाजीउद्दीनखान सर्व मराठे फौजेनिशी अब्दाल्लीवर चाल करून गेले[१].

**शूर दत्ताजी वेढा उठवितो :**

अब्दाली पंजाबात आला ही खबर आल्यावर दिल्ली व आग्रा ही शहरे भीतीने गडबडून गेली. वजीर आदि करून सर्व लोक आपले कबिले सुरक्षिततेसाठी जाटाचे मुलखात पाठवून खडे झाले[२]. अब्दालीचे सैन्य पंजाबात उतरल्यावर साबाजी शिंदे त्या सैन्याचे मुकाबल्यास गेला, परंतु त्याचा पराभव होऊन तो दत्ताजीचे छावणीकडे आला आणि दत्ताजीस तारीख ८ नोव्हेंबर रोजी भेटला. दत्ताजीनें वजीर गाजीउद्दीनखान, अहंमदखान बंगश, सूरजमल जाट व मल्हारराव होळकर यांना ताबडतोब मदतीस येण्यास पत्रे रवाना केली आणि तारीख ९ नोव्हेंबर रोजी वाटाघाट करून शत्रूस कसे जेर करावे या विषयी योजना ठरविली. वजीर गाजीउद्दीनखानाने नोव्हेंबर महिन्याचे १६ तारखेस शुक्रतालकडे मराठ्यांच्या मदतीस जाण्यासाठी बादशहाचा निरोप घेतला. परंतु अब्दालीने मराठ्यांना पंजाबातून काढून, तो प्रांत काबीज केला, ही बातमी त्यास कळताच त्याने अलमगीर बादशहास २९ नोव्हेंबर १७५९ रोजी ठार मारले आणि दुसऱ्या दिवशी इन्तिजामउद्दौलाचीही तीच गत केली. बादशहाचा खून केला, ही वार्ता अब्दालीस समजताच बंडखोर व राजद्रोही वजीर गाजीउद्दीनखान याच पारिपत्य करण्यासाठी अब्दालीने दिल्लीवर चालून येण्याचे ठरविले[३]. मुलतान येथे ठाण्याचे बंदोबस्तासाठी जी सहा हजार मराठे फौज ठेविली होती त्या लोकांवर अब्दालीने हल्ला करून पांचशे सैनिक खेरीज सर्व फौज गारद केली. हे जीव बचावून आलेले पाचशे सैनिक देखिल उघडे बोडके अशा परिस्थितीत दत्ताजीच्या छावणीस २३ नोव्हेंबर १७५९ रोजी आले.[४] तेव्हा दत्ताजीस शुक्रतालचा वेढा उठविणे भाग पडलें.

पश्चिमेकडून अब्दाली चालून येत आहे असे कळताच मराठ्यांनी सुजाउद्दौला व नजीबखान यांच्या मदतीची अपेक्षा न करता ते अब्दालीवर चालून गेले. मराठे अब्दालीवर चालून गेल्याने जर अब्दालीचा पराभव झाला तर आपणास आपल्या मुलूखास ते त्रास दिल्याशिवाय राहाणार नाहीत, तेव्हा नजीबखान व सुजाउद्दौला ह्यांनी विचार केला की, "ज्याअर्थी आपणच अब्दालीस बोलाविले आहे त्याअर्थी आपणच अब्दालीचीच पूर्णपणे मैत्री करावी आणि सर्वांनी मिळून मराठ्यांचा पराभव करून त्यांना उत्तर हिंदुस्तानातून पाय काढण्यास लावावे. बादशहाचा वजीर गाजीउद्दीनखान तर केवळ मराठ्यांच्याच तंत्राने चालतो. त्यामुळे मराठे व वजीर यांचाच बोलबाला बादशहाचे राज्यकारभारात प्रामुख्याने दिसतो. आपल्या हातात बादशहाचा

१. रा. खं. १, ले. १५७.

२. पे. द. २१, ले. १७६.

३. पे. द. २७, ले. २४५.

४. सरजदुनाथ, फॉल ऑफ द मु. ऱ्हा. २, पृ. २१६.

कारभार नाही व इतरास जागा मिळत नाही. शिवाय मोगलांच्या कुळात कोणी पातशाही राखिसा नाही तेव्हा आपण अब्दालीचा मुलगा तैमूरशहा ह्यास दिल्लीत आणून पातशहा करावे." अशा प्रकारे सुजाउद्दौला व नजीबखान यांनी मराठ्यांविरुद्ध कट रचिला. सुजाउद्दौलाच्या मनात वजीर व्हावे असे होते. तसेच नजीबखानास मीर बक्षीगिरी पाहिजे होती.

### बादशहाचा खून (नोव्हेंबर १७५९) :

पण वजिराने अब्दालीचा लाहोर येथे जय झालेला ऐकताच अब्दालीला बोलविणाऱ्या बादशहाचा काटा काढण्याचे ठरविले. इतक्यात इमादला बादशहाने अब्दालीस पाठविलेली काही पत्रे मिळाली तेव्हा इमादचा बादशहा विषयीचा संशय खरा होऊन तो त्याचा अतिशय तिरस्कार करू लागला. २९ नोव्हेंबरला बादशहास कोटील्यास संत आलेला आहे त्यास भेटण्यास नेण्यात आले आणि कोटील्यात प्रवेश करीत असतानाच त्याचे शीर धडावेगळे झाले. दुसऱ्या दिवशी (दिनांक ३० नोव्हेंबर) एका राजपुत्रास शहाजहान २ रा हे नांव धारण करून बादशहा म्हणून जाहीर केले. त्याच दिवशी पूर्वीचा वजीर व इन्तीझमाउद्दौला आणि त्याचा साथीदार लतफुल्लाबेग ह्यांचेही खून करण्यात आले.[१]

### अब्दाल्लीची दिल्लीवर चाल (नोव्हेंबर १७५९) :

इकडे अब्दालीने पंजाब प्रांत परत जिंकून घेतल्यावर आपल्या तर्फेचे प्रांतीय गव्हर्नर नेमून आपल्या मुलास जहानखानास बरोबर घेऊन अब्दाली लाहोरहून धिमेपणे सैन्यासह निघाला. त्याने बियास नदी दि. २० नोव्हेंबरला पार केली. सरहिंदला तो २७ नोव्हेंबरला आला आणि अंबाल्यास २० डिसेंबर रोजी मुक्काम केला ह्याच ठिकाणी तरावरीवर तुराणी सैनिकांना नजीबाच्या हुकमाने कुंजपुऱ्यास तयार केलेल्या टोप्या वाटल्या.[२]

### तारावडीची लढाई (२४ डिसेंबर १७५९) :

अब्दालीचें सैन्य अंबाल्याचे उत्तरेस १६ मैलावर येऊन ठेपलें.[३] ही बातमी दत्ताजीस समजताच त्याने आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या करून निवडक अधिकारी व पंचवीस हजार सैन्य स्वतःबरोबर घेतले आणि सैन्याची दुसरी तुकडी जनकोजीचे हाताखाली ठेविली. जनकोजी-बरोबर तोफखाना, वजिर गाजीउद्दीन, त्याची फौज आणि वजीर व मराठे सरदारांची कुटुंबे होती.[४] दत्ताजीने अशा प्रकारे जनकोजीस वीस मैल दूर ठेविले. संकटकाळी त्याने आपल्या मदतीस यावे आणि अधिकच आपत्ति कोसळली तर त्यांनी लगेच दिल्लीस जावे अशा प्रकारचा दत्ताजीचा विचार

१. पे. द. २, ले. १०९.
२. पे. द. २१, ले. १७७; रा. खं. १ ले. १४७.
३. पे. द. २१, ले. १७८.
४. पे. द. २, ले. १०९, ११७.

जनकोजीस एवढ्या दूर ठेवण्याचा होता. दत्ताजीस अब्दालीच्या सैन्याच्या हालचाली कळताच तो कुंजपुऱ्याहून २२ डिसेंबर रोजी शत्रूवर चाल करून गेला.[१] डिसेंबर २४ रोजी ठाणेश्वरनजीक तरावडीच्या मैदानात अफगाण सैन्याचे व मराठ्यांचा सरदार भोईटे याच्या हाताखालील ५,००० मराठे फौजेचे झुंज झाले. त्यात अफगाण सैन्य पराभव पावून पळू लागले. त्यांचा पाठलाग मराठी सैन्याने शिस्त मोडून केला. अब्दालीने हे पहाताच आपला सरदार शहापसंदखान याचे हाताखाली ४,००० मोगल घोडेस्वाराची तुकडी मराठ्यांवर हल्ला करण्यास पाठविली. दुसऱ्या अफगाण तुकडीने त्याच वेळी मराठ्यांच्या बाजूवर हल्ला केला. चार सहा युद्ध प्रसंग झाला. भोईटे रणातून पळाला. मराठ्यांचे ४०० लोक अब्दालीच्या सैन्याने कापून काढले. इतक्यात दत्ताजी शिंदे तेथे जाऊन पोचला पण शिरावेगळी धडे पाहून तो त्या जागेवरून २० मैल दूर जाऊन राहिला. अब्दाली बुढियानजीक मुक्काम करून राहिला.[२] दुसरे दिवशीं २५ डिसेंबर रोजी अब्दालीने बुढिया घाटाजवळ यमुना ओलांडिली व तो दुआबात उतरला. शहरानपूरला नजीब येऊन त्यास मिळाला व नजीबच्या सहाय्याने तो दिल्लीस येण्यास निघाला.[३]

### दत्ताजी धारातीर्थी (९ जानेवारी १७६०) :

दिल्लीच्या बाजूने अब्दाली आल्यास आपण अफगाण सैन्याच्या कचाटयात सापडणार हे दत्ताजीच्या ध्यानात आले आणि दिल्लीचा बचाव अब्दालीच्या धाडीपासून करावा म्हणून त्याने वजीर इमाद यास दिल्लीच्या बंदोबस्तासाठी पाठविले पण इमादने तसे काहीच न करता त्याने मराठ्यास सोडून तो सुरजमल जाटाचे आश्रयास जाऊन राहिला. दत्ताजीने आपली कुंजपुऱ्याची छावणी २७ डिसेंबर रोजी हलवून तो २९ ला सोनपती आला. तिथे पाच दिवस शत्रूच्या हालचालीची टेहळणी करण्यात घालविले आणि ६ जानेवारीस दिल्लीस येऊन सर्व लूट, जड सामान आणि कुटुंबे यांचा बंदोवस्त करून ती रेवाडीकडे रवाना केली[४] आणि स्वतः दिल्लीच्या उत्तरेस १२ मैलावर असलेल्या बरारी गांवी छावणीस आला. साबाजीस बदाऊच्या घाटाचे संरक्षण करण्यास सांगितले. बदाऊजवळ हिंवाळयात यमुना नदिचे दोन प्रवाह होऊन एक बेट तयार होते. पाण्याचा मुख्य प्रवाह पूर्वतहाने वाहातो. पश्चिम तटावरील प्रवाह आटला असल्यामुळे त्या ठिकाणी खार जमीन तयार झाली होती. बेटात बोरू व झुडपे वाढून इतके दाट जगल माजले होते की, तेथे उभे असलेल्या एका घोडेस्वारास दुसरा घोडेस्वार दिसत नव्हता. ९ जानेवारीस नजीबखान यमुना ओलांडून, बेटाचे पश्चिम बाजूवर आला. मराठे, शत्रू दृष्टीस पडताच चाल करून गेले. एक तास झुंज झाले. परंतु

१. पे. द. २ ले. १०९.
२. राज. खं. १ ले. १५५, १५७, पे. द. २ ले. ११७, १२२.
३. पे. द. २, ले. १०९, १११, ११२, राज. खं. १, ले. १४७, १५०.
४. सरकार भा. २ पृ. २५०.

अफगाणाच्या जेजाला व बंदुकाच्या माऱ्यामुळे मराठ्यांच्या भाल्याचे व तलवारीचे काही चालले नाही. म्हणून दत्ताजी जेजाल्याची गोळी डोळ्यात लागून ठार झाला.[१] तेव्हा मराठे पळू लागले. नजीबाने जोराचा हल्ला चढविला. जनकोजी सामोरा गेला तेव्हा चार घटका युद्ध होऊन जनकोजीच्या दंडास गोळी लागली. जनकोजीस रणातून उचलून घेऊन मराठे दिल्लीकडे धावले.[२]

## जनकोजी व मल्हारराव यांची भेट कोटपुतळीस (१५ जानेवारी १७६०):

मराठे तारीख १० जानेवारीस दुपारपासून पळत पाटोडीस वीस कोस आले, तेथपर्यंत्त पठाणांनी पाठलाग केला. नंतर गुरुवारची रात्र व शुक्रवारचा दिवस वाट चालून मांडण म्हणून जाटांची जागा होती तेथे आले. तेथे रात्र क्रमून पुढे तीन दिवस लांबलांब मजली करीत दिनांक १४ रोजी कोटपुतळीजवळ आले. तेथे मल्हारजी होळकर याची भेट झाली. दोन दिवस विचार करून दोघांनी आपली कुटुंबे व जड सामान उज्जनीकडे गोविंदपंत बुंदेल्याबरोबर रवाना केले. प्रवासात चंबळेवर दिनांक ३ फेब्रुवारी दत्ताजीची बायको भागीरथीबाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. पण तो लवकरच मरण पावला. इकडे अफगाणांशी मुकाबला करावयाचा तर त्याच्या हालचाली ठावूक होणे आवश्यक, तेव्हा गनिमि काव्याने लढून अफगाणांचा दाणा वैरण तोडण्याचा बेत केला. जनकोजी वयाने लहान, मल्हारराव यावेळी ७५ वर्षाचे. तेव्हा मल्हाररावास मराठी फौजेने आपला सर्वाधिकारी मानून त्यांनी २४ जानेवारीस १७६० त दिल्लीकडे कूच केले.[३]

## मल्हारजी होळकरचा शिकंदराबाद येथे पराभव (४ मार्च १७६०) :

दत्ताजी शिंदेस ठार मारून दिनांक ९ जानेवारीस विजय मिळविल्यावर अब्दालीने आपल्या सैन्यासह दिल्लीच्या लाल किल्ल्यात प्रवेश केला. आणि दिल्ली लूटुन, कत्तल करून करोडीची लूट मिळविली. यापूर्वीच वजीर गाजीऊद्दीन, दिवाण नागरमल व नजीब बादशहा शहाजहान सानी हे पळून जाटाच्या राज्यात जाऊन राहिले. अब्दालीने बादशहा नवीन केला नाही. पण वजीर शहावलीखानाचा चुलत भाऊ याकूब अलीखान यास दिल्लीचा गव्हर्नर नेमिले.

अब्दालीने २७ जानेवारीस दिल्लीहून जाटाच्या मुलूखाकडे कूच करून ७ फेब्रुवारीस दीगला येऊन तिला वेढा घातला. इथून त्याने काही तुकड्या मराठ्यांवर पाठविल्या. तेव्हा पळत पळत मराठे दिल्लीच्या पश्चिमेस पन्नास कोसावर नारगोळ प्रांतात मुकाम करून राहिले. जवळचा मुलूख लुटण्याचा

---

१. पे. द. २१ ले. १८९, पे. द. २७ ले. २४७.

२. पे. द. २१ ले. १८९.

३. पे. द. २ ले. ११४; राजवाडे १, ले. १५३, १५६, १६२.

तडाखा मराठ्यांनी लावल्यामुळे अबदालीच्या लष्करात अन्नाचा दुष्काळ पडला. २४ फेब्रुवारीला मराठे दिल्लीजवळील कळका गावी आले. अब्दालीचें सैन्य आपल्या पाठीवर आहे हे पाहून २७ फेब्रुवारीस यमुना पार होऊन शिकंदरा हे शहर दिनांक १ मार्च रोजीं लुटले.[१] पुढील बेत अनुपशहास जाऊन नजीबखानाचा अबदालीच्या छावणीकडे निघालेला १० लाखाचा खजीना लुटणे हा होता. अबदालीस ही बातमी समजताव त्यानें आपली १५ हजार फौज मराठ्यांवर पाठविली. मराठी सैन्यास पठाणांची चाहूल लागताच त्यानीं लढाईस तोंड दिले. अबदालीचा सरदार जहांखान होळकराच्या सैन्यावर अकस्मात येऊन पडला व त्याने त्यांची लुट हिरावून घेऊन कत्तल चालविली. त्यावेळी मराठी सैन्याची शिस्त मोडून ते मिळेल त्या उतारास यमुना नदी ओलांडून कसेबसे आग्र्याकडे आले. मल्हाररावाची फार धांदल उडाली. आग्र्याहून मल्हारराव भरतपुरला आला. तिथे सुरजमल जाटाने त्याचे स्वागत केले. आणि आपण आपले संरक्षण जीवाचे मोल देऊन करू असे आश्वासन गंगोदक हाती घेऊन दिलें. अब्दालीने अलीगड येथे ५ मार्च १७६० रोजी मुक्काम केला. यावेळी ऊन्हाळा सुरू झाला तो आपल्या सैन्यास अहितकारक हे त्यास ठावूक असूनहि, “तुम्ही गेल्यास आम्ही हिंदुस्तानातील अफगाण मराठ्यांकडून मारले जातो. तेव्हा दक्षिणचे सैन्य येत आहे. त्याशी मुकाबला करून आमचे रक्षण करण्यासाठी तुम्ही हिंदुस्तानात छावणी करावी.” अशी विनंती आणि मनधरणी नजीबखानाने केल्यामुळे अब्दालीने आपला मुक्काम वाढविला. त्यास पैसा देण्याचे नजीबाने कबूल केले.

**अब्दाली व मराठे यांचा आपला पक्ष बळकट करण्याचे प्रयत्न :**

अब्दालीचे प्रयत्न :—अलीगडला राहून दक्षिणेतून येणाऱ्या मराठे सैनिकांशी मुकाबला करण्याचे ठरल्यावर अबदालीने त्यावेळच्या उत्तर हिंदुस्तानातील सत्ताधिशांची मदत मिळविण्याचे प्रयत्न चालविले. उत्तर हिंदुस्तानात बादशहा व मराठे सोडून पांच सत्ता प्रमुख होत्या :
(१) फरुकाबादचा नबाब अहमदखान बंगष ; (२) अयोद्धेचा नबाब सुजाउद्दौला ; (३) व्रजराज सुरजमल जाट ; (४) राजपुत राजे ; (५) शीख.

अहमदशहा अबदाली व मराठे यांनी या पांचही सत्ताधिशास आपआपल्या बाजूस ओढण्याचा प्रयत्न केला. त्यात अबदालीस यश आले. मराठ्यांना अपयश आले. हिंदुस्तानात मुसलमान सत्तेची घडी पूर्वीप्रमाणे बसावी हा हेतू सिद्धीस जाण्याकरिता नजीबखान व त्याचा गुरु शहावली उल्ला यांनी अबदालीस हिंदुस्तानात मराठ्यांचा पराभव करण्यासाठी बोलाविले होते. ह्या

१. पे. द. २, ले. १२०, १२१; पे. द. २१ ले. १८७-१८८.

दोघांनी अबदालीचा पक्ष बळकट करण्यातच इस्लामी सत्तेचे पुनरुज्जीवन आहे हे अहमदखान बंगषला पटवून दिले. अहमदखान बंगष हा मराठ्यांचा चहाता होता पण अहमदशहा अबदालीच्याच पठाण जातीचा असल्यामुळ त्यानें धर्मरक्षणार्थ अबदालीच्या छावणीत आपले प्रस्थान दिनांक १३ एप्रिल १७६० रोजी ठेविले.

शुजा उद्दौल्यास वळविण्याची कामगिरी भाऊने गोविंदपंत बुंदेलेकडे सोपविली होती आणि अबदालीतफ नजीबखान स्वतः शुजाउद्दौल्याकडे लखनौला गेला. या अगोदर महमदशहा बादशहाची राणी मल्कझमानी हिलासुद्धा शुजा-उद्दौल्याच्या आईस भेटण्यास अबदालीने पाठविले होते. कारण शुजा आपल्या आईच ऐकत असे. नजीबखानाने विनवणी केल्यावर अबदालीतर्फे अभयाचे आश्वासन दिल्यावर सुजाउद्दौला अब्दालीला येऊन मिळाला. त्याचे स्वागत अबदालीने केले. त्याजबरोबरची १० हजार नागांची फौज व उत्कृष्ट तोफ-खानाही अब्दालीस मिळाला. सुरजमल जाटास स. १७५७ मध्ये अबदालीने दुखविले होते. हिंदू राजा अति बलाढ्य आणि श्रीमान, त्याची मदत आपल्यास अत्यावश्यक, हे अबदालीच्या ध्यानात येता त्याने त्यास गोड बोलून गोंजारण्यास सुरवात केली. त्याजकडून पैसे मिळाले तर पैसे, नाही तर निदान तो मराठ्यास मिळणार नाही व आपल्याविरूद्ध लढणार नाही एवढी खबरदारी घेण्याचा प्रयत्न अबदालीने सुरजमल जाटाच्या बाबतीत केला आणि तो यशस्वी झाला.[1]

राजपूत राजात जयपूर आणि जोधपूरचे दोन राजे प्रमुख होते. जयपूर राजा ईश्वरीसिंग व जोधपूरचा माधोसिंग ह्या दोघांनी अबदालीस हिंदुस्तानात बोलविण्यात भाग घेतला होता. नजीब, राणी मलीक-इ-झमानी आणि राजपूत राजे यांनी मराठ्यांना उत्तरेतून दक्षिणेत हाकलून देण्यासाठी अबदालीस बोलाविले होते. अबदाली हिंदुस्तानात आल्यावर त्याने राजपूत राजांशी पत्रव्यवहार सुरू केला आणि दाक्षिणात्यांना उत्तर हिंदुस्तानातून घालवून द्या. या बाबतीत तुमचे आणि आमचे ध्येय एकच आहे. आम्हास त्यांच्याविरूद्ध लढण्यास मदत न केलीत तरी चालेल पण त्यांना सहाय्य करू नका. अशा आशयाची पत्रे अबदालीने या दोन्ही राजास पाठविली. इतकेच नव्हे तर राजपुतांना मराठ्यांपासून होणारा त्रास कायमच नाहीसा करण्यासाठी आपण १९६० च्या ऊन्हाळ्यात हिंदुस्तानात राहून हिवाळ्यात दक्षिणेत चालून जाऊन मराठ्यांचा पराभव करू अशा प्रकारची आश्वासनेही अब्दालीने राजपूत राजास दिली[2] त्याचा इष्ट तो परिणाम होऊन राजपूत राजे व जाट यांनी पुढील संग्रामात कोणासही मदत न करता बघ्यांची भूमिका पत्करली व अबदालीशी वरच्यावर जाबसाल राखीत राहिले.[3]

उत्तर हिंदुस्तानातील दुसरे प्रबळ शिखांना पंजाबातून दिल्लीस शहाने जाऊ नये असे वाटत असे. त्यांना पंजाबवर अबदालीची किंवा मराठ्यांची सत्ता

---

१. पे. द. २१, ले. १८६

२. पवार घ. इतिहास पृ. १६१.

३. पे. द. २ ले. ११८

नको होती. पंजाबवर अबदालीच्या वारंवार धाडी येत असत. त्यांना पायबंद घालण्यासाठी शीख मराठ्यांशी हातमिळवणी करण्यास तयार होते. पण त्यांना मराठ्यांची सत्ता पंजाबवर नको होती हे मराठ्यांसही ठावूक असल्यामुळे त्यांनी शिखांची मदत मागितली नाही.

अब्दालीस नजीबखान, दुन्देखान, शुजाउद्दौला देखील सर्व मुसलमान सामील झाले, त्यामुळे त्याची फौज भारीच झाली. शिवाय त्या फौजेबरोबर भारी तोफखाना व सामान होते.

**भाऊसाहेबांचे दिल्लीस प्रस्थान :**

उद्गीरच्या लढाईत निजामाचा संपूर्ण पराभव करून तहाच्या अटी ठरवून पेशवे रघुनाथराव आणि भाऊसाहेब याजसह पडदुरावर मुक्कामास आले. निजामाकडून ४५ लाखाचा मुलूख आणि बऱ्हाणपूर, अशीरगड, दौलताबाद, विजापूर, अहमदनगर आणि मुल्हेर असे किल्ले मराठ्यांना मिळाले होते. मराठे निजामावरील विजयाच्या नादात असताना उत्तरेतून दत्ताजी पडल्याच्या बातम्या येऊन थडकल्या. तसेच जनकोजी जखमी, मल्हारराव पराभूत होऊन गेला अशी वर्तमाने नानासाहेबास येऊ लागली. काही वेळ मराठे निस्तेज झाले, त्यावेळी रोहिल्यास चेव येऊन ते म्हणू लागले की, दिल्लीत मोगलांची पातशाही जाऊन पठाणांची कदीम पातशाही झाली.[1] म्हणून मराठ्यांनी मदतीकरिता पेशव्यास वारंवार पत्रे पाठविली. पडतूर येथे पेशवे मंडळीचा मुक्काम सन १७६० मार्च ७ ते १३ असता उत्तरेकडील बोलाविण्याचा विचार पेशव्यांनी केला.[2] पेशव्यांना उत्तरेत बोलावणाऱ्या मंडळीत नुसते मराठे सरदार नसून अहमदशहा बादशहा तर्फे जावेतखान व वजीर मन्सूरअली म्हणजे सफदरजंग हेही होते. शिवाय खुद्द सदाशिवराव भाऊस फर्मान रुपाने "आमच्या मुलुखाचे मुख्यत्यार व्हा व आमची तनखा वगैरेंची तरतुद करा, पूर्वीचे करारनामे आम्ही पाळू" असा दिनांक २० ऑगस्ट १७५९ चा मुख्यत्यारनामा आलमगीर दुसरा याने पाठविला होता[3]. सदाशिवराव भाऊनीच उत्तर हिंदुस्थानात स्वारीस जावे असे पेशवे मंडळात ठरल्यावर भाऊ पडदूराहून १३ मार्च रोजी निघून १५ मार्च रोजी शिंदखेडास डेरेदाखल झाले.[4]

**भाऊंबरोबरील सैन्य व सरदार :**

भाऊबरोबर निघताना पन्नास हजार सैन्य होते.[5] या पन्नास हजारात दादासाहेबांपैकी १० हजार, समशेरबहाद्दर, धायगुडे, माने, निंबाळकर

१. पे. द. २१ ले. १८८.

२. राजवाडे खंड, १, पृ. २६६ व २७१,

३. शिंदखेड पडदूरापासून २६ मैलावर उत्तरेस, रा. खं. १, पृ. २६९.

४. खोबरेकर मराठ्यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम पृ. २०२.

५. म. रि. बाळाजी बाभा. २, पृ. ३५२.

इत्यादी सरदारांचे १२ (१३) हजार खेरीज देशचे फौजेपैकी २० हजार व गारदी ८ हजार होते.[१] यात दमाजी गायकवाड, भापकर, विंचूरकर, पवार, देरकर, जाधव, हे सरंजामदार असून नाना पुरंदरे, हरि दामोदर, हरि सदाशिव, महिपतराव चिटणीस, नाना फडणीस इत्यादी कारकून मंडळही होते. तोफखाना सुद्धा होता. ह्या सर्व फौजेसह भाऊ सिरोंजला ६ मे रोजी पोहोचला. भाऊसाहेबाबरोबर हे जे सैन्य होते त्याचा मासिक खर्च सुमारे ५ लाख रुपये होता. निघताना भाऊने नालबंदी केली, म्हणजे वर्षाच्या पगारापैकी चौथा हिस्सा आगावू खर्चासाठी या फौजेस देण्यात आला. पण पुढील खर्चासाठी भाऊ उत्तरेतील मामलतदारांच्या आधारावर व त्याबरहूकुम मिळणाऱ्या पैशावर अवलंबून होता. त्याचे मध्यप्रदेशात दोन महिने गेले. या दोन महिन्यात त्याने रजपूत, बुंदेले सामील करून घेण्यासाठी जयपूरचा राणा माधोसिंग, मारवाडचा राणा बिजेसिंग आणि कोटयाचा राणा यांना पत्रे पाठविली व त्याजकडे वकील रवाना केले. रजपूत व बुंदेले यांनी कोणासही सामील होता अबदाली व मराठे यांना झुलवित ठेवले. भाऊसाहेबाने गोविंदपंत बुंदेल्यास पुढील कामगिऱ्या सांगितल्या :—"सुजाउद्यौला मराठ्यांचा स्नेही त्याजकडे जाऊन त्यास अबदालीचा पाय हिंदुस्थानचे पातशाहीस रुतु देणे अयोग्य हे मनावर ठसवून, गोड बोलून त्यास आपले बाजूस ओढण्याचा प्रयत्न करावा. अबदालीचे लष्करातील चहूकडे बारीक खबर राखून लिहीणे, यमुनापारचे रजपूत यास आपल्या बाजूस यावयास सिद्ध करावे. हिंदुपत वगैरे बुंदेले व जाट रजपूतांचे ३,००० लोकांची पलटण तयार करावी, खर्चास वीस लाख रुपयेपर्यंत तरतूद करून माळव्यात स्वारी आली म्हणजे तावडतोब पाठवून द्यावे.[२] वरील पत्रातील अबदालीचा पाय हिंदुस्थानचे पातशाहीत रूतू देणे अयोग्य" ह्याविचारसरणीचा मराठ्यांचा हेतूचा उलगडा एतद्अर्थ करताना भाऊ दुसऱ्या पत्रात शुजास लिहीतो. "पातशहा दिल्लीस कायम करून परकी शत्रू नाहीसा करावा. मग घरचा बंदोबस्त सहजात होईल. घरचे पेच असतील ते त्या (शुजा) चे आनचे विचार दूर होतील.[३] अशा प्रकारची बोलणी करून मातवर राजेरजवाड्यास आपलेकडे ओढून घेण्याचा प्रयत्न भाऊ करीत होता तर भाऊचा पक्ष दूर्बल बनून आपला पक्ष कसा सबल बनेल ह्यासाठी अबदाली व नजीब प्रयत्न करीत होते. भाऊच्या प्रयत्नास यश न येता अबदालीलाच उत्तरेतील सर्व सत्ताधीशांनी सहाय्य केले. त्यापैकी काही दोन्ही दगडांवर पाय ठेऊन कसे राहीले हे वर सांगितले आहेच. सिरोजपासून ग्वाल्हेरपर्यंत प्रवासास एक महिना घेऊन भाऊने २ जून रोजी पुढे कूच केले. ग्वाल्हेरहून आग्र्यास व तिथून मथूरेस भाऊ १६ जुलै रोजी आला.

---

६. कित्ता.

१. रा. ख. १, ले. १६७, १८७.

२. इ. स. ऐ. टि, २, पृ. ५९-६०, रा. खं. १ ले. १७३ व टीप २६१.

आग्र्याजवळ भाऊचा मुक्काम असता तो मल्हारराव होळकर यास भेटला. ही भेट धोलपूराजवळ झाली. आणि कालांतराने जनकोजी शिंदे भाऊस जून महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात येऊन भेटला. सुरजमल जाट हा अबदालीचा द्वेष करीत होता. तो भाऊसाहेबास येऊन भेटला. भेटीत त्यान भाऊस नजराणा अर्पण केला. भेटीत तो भाऊस म्हणाला की, माझा मुलुख मराठ्यांच्या जाण्यायेण्याच्या मार्गावर आहे. तेव्हा सैन्याची चाल सुरू झाली म्हणजे सैनिकांनी मुलुखाची लुटालुट, खंडणी मागू नये, आपण तुमच्याबरोबर १०,००० फौजेनिशी पठाणांशी झुझण्यासाठी येतो. तुमच्या वायकामुलांस आणि फालतू माणसास मी आश्रय देईन. जाट राजाचे हे भाऊस पसंत पडून त्याने आपल्या सैन्यास हुकुम केला की, जाटांच्या मुलुखात कोणीही लुटालुट करू नये.[१]

वरील गोष्टी होईपर्यंत जुलै उजाडला. जुलै महिन्यात पाऊस पडून यमुना दुथडी भरून वाहू लागली त्यामुळे मराठ्यास यमुना आपल्या तोफ-खान्यासह पार करून मनात असूनही लवकरात लवकर लढाई संपविणे शक्य झाले नाही. सुजाउद्यौला अबदालीस मिळाल्याचे कळताच भाऊने गोविंदपंत बुंदेल्यास सांगितले की, "सुजाचे मुलुखात आपली फौज उतरवावी आणि तेथील जमीनदार आपल्या लगामी लागणार असतील त्यांना उत्तेजन देऊन दंगा करावा, तमाम अंमल सुजाउद्यौल्याचा प्रयाग प्रयत्न अंतवदीत आहे तो उठवावा. तसेच यमुना उतरण्यास नावा जमविणे". पठाणी फौजेचा जोर, नदीला पूर आणि अंतर्वेदीतील जमीनदारांचा आवई ऐकून वारवार उठाव यामुळे गोविंदपंत बुंदेल्यास होड्या मिळणे अशक्य झाल्या. त्यामुळे यमुना ओलांडून अबदालीच्या छावणीवर हल्ला करण्याचा भाऊचा बेत तडीस गेला नाही.[२]

## सुरजमल जाटचा सल्ला झिडकारला :

यावेळी सुरजमल जाटाने भाऊस पोक्त सल्ला दिला की, मराठ्यांनी पठाणांबरोबर मैदानात समोरासमोर न लढता नेहमीच्या गनिमी काव्याने लढावे, तसेच लढताना त्यांनी आपली बायका मुले, झांशी किंवा ग्वाल्हेर येथे ठेवावीत. मल्हाररावने ह्या जाटाच्या उपदेशास मान डोलावली.[३] परंतु भाऊने हा उपदेश झिडकारून लावला.[४]

## मराठे दिल्ली काबिज करतात :

यावर्षी पावसाळा लवकर सूरू होऊन यमुना नदीस महापूर आल्यामुळे मराठ्यांनी अंतर्वेदीतील स्वारी तहकूब केली. पुढे भाऊसाहेबाने व वजीर

१. पुरंदरे दप्तर भाग १, ले. ३८७.

२. रप. खं. १, ले. २०५.

३. ग्रँट डफ, पृ. ६०७.

४. हरिराम गुप्ता, मराठाज् अँन्ड पानिपत पृ. १५३.

गाझिउद्दीनखान, बळवंतराव मेहेंदळे, मल्हारराव होळकर आणि जनकोजी शिंदे यांना दिल्लीस रवाना केले.[१] या मराठा फौजेने दिल्लीस जाऊन, हल्ला करून दिल्ली शहर घेतले पण किल्ला घ्यायचा राहिला, त्यास मोच लाविले. किल्यात अबदालीनें दि. ३१ जानेवारी १७६० रोजी आपल्यावतीनें नेमलेला दिल्लीचा सुभेदार वजीर शहावलीखान याचा चुलतभाऊ याकूबअलीखान हा आपल्या लोकासह होता. मराठ्यांनी मोर्चे कायम करून ते तोफांचा भडीमार सुरू केला त्यामुळे किल्यातील दिवाणी-इ-खास रंगमहाल, मोतीमहाल व शहाबुरुज या सुंदर इमारतींना तोफांच्या माऱ्यामुळे चिरा पडल्या. तेव्हा किल्यातील अबदालीचे लोक घाबरे होऊन कौल मागू लागले. सदाशिवराव भाऊ २९ जुलै रोजी दिल्लीस पोहोचला त्यानंतर २-३ रोज लढाई चालू होती. त्यात किल्लेदार याकूबचा निरुपाय होऊन त्याने मराठ्यांशी सुलुखाचे बोलणे सुरू केले. भाऊने त्याची शरणागती पत्करुन त्यास आपल्या मंडळीसह सुखरूप जाऊ दिले. तो यमुनेपलीकडील पटांगणावर अबदाली व नजीबखान यांच्या फौजेचा तळ पडला होता तेथे उतरुन गेला. दि. २ ऑगस्ट १७६० रोजी पातशाही किल्यात मराठ्यांचे ठाणे बसले.[२] काही दिवसानी नारो शंकर यास भाऊने दिल्लीचा सुभेदार नेमले आणि बाळोजी पाळंदे यास सुभेदाराच्या हाताखाली किल्लेदार नेमले.[३]

### दिल्लीच्या विजयानें भाऊचा आत्मविश्वास वाढला :

ह्यानंतर मराठ्यांनी यमुनेपलीकडे पटांगणावर तळ देऊन बसलेल्या अबदाली, सुजाउद्दौला व नजीबच्या पन्नास हजार फौजेवर यमुना ओलांडून हल्ला करण्याचा विचार केला. परंतु यमुनेस पाणी फार असल्याने उतार मिळणं मुष्कील हे पाहून मराठ्यांनी तूर्त तो विचार सोडून दिला.[४] दिल्ली हे शहर सार्वभौमाची राजधानी. मराठ्यांनी दिल्ली काबिज केल्यावर अबदालीच्या फौजेत घबराट निर्माण झाली. रोहिले अबदालीची छावणी सोडून गंगापार आपल्या मुलुखात जाऊ लागले. सुजाउद्दौल्यास देखील अबदालीच्या पक्षास मिळून फसल्यासारखे वाटू लागले. अबदालीही मराठ्यांच्या ह्या विजयाने चरकला. आपण नजीबखानाच्या नादी लागून फसलो. मराठ्यांशी सलुख करावा, लढाई करू नये असे विचार त्याच्या मनात येऊ लागले. सुजाउद्दौल्याने मराठ्यांना सुचविले की, आपले व नजीबखान रोहीले यांच्या हाते अबदालीकडील तह भाऊसाहेबाने करवावा म्हणजे आम्ही सर्व ठिक करून देऊ आणि अबदालीस देशांस पाठवू.[५] कारण हाफत रहमतखान, अहमदखान बंगश आणि वजीर गाजिऊद्दीनखान हे तहाच्या वाटाघाटीत नसावे असे सुजाउद्दौल्याचे मत होते

१. रा. खं. १, ले. २२३, २२४.

२. कित्ता,

३. पे. द. २७, ले. २५८.

४. पे. द. २१, ले. १९१.

५. रा. खं. १, ले. २२२.

परंतु मराठ्यांकडे या सर्वांची राजकारणे चालू होती व सर्वांचे वकीलही येत होते. तेव्हा ज्या राजकारणात मराठ्यांचे जास्त हीत साधेल तेच राजकारण मराठ्यांनी स्वीकारावे असे मराठ्यांनी ठरविले.[१] मराठ्यांनी दिल्ली सर केल्यामुळे "सुजासुद्धा सारे फजीत झाले. अबदालीच्या लष्करात गडबड झाली. सर्व लहानथोरांनी मराठे यासी सलुख करून आपले देशास जावे हा मनसुबा केला. याउपरि लढाईची हिंमत त्यात राहिली नाही. दहा हजार घोडे, उंट, खेचर अनुपशहरी मेले"[२] यामुळे अनुपशहरची हवा वाईट म्हणून अबदाली सिकंदऱ्यावर येऊन राहिला.

या विजयामुळे मराठ्यांचा अंमल अंतर्वेदीत पूर्वीप्रमाणेच एकही माणूस जाया न होता प्रस्थापित झाला. पुढे सदाशिवरावभाऊने शत्रू पक्षाचे बळ खच्ची करून मनाप्रमाणे तह घडवून आणावा म्हणून अबदालीच्या लष्करात फूट उत्पन्न करण्यांचा प्रयत्न केला.[३] यासमयी अबदालीने लहानथोर सर्व फौज जमा करून मसलत केली की,आपणास हिंदुस्थानात राहणे नाही, मराठ्यांचा जोर दिवसेंदिवस होऊ लागला तेव्हा नजीबखान रोहीले वगैरे कोणाची गोष्ट ऐकू नये. मराठ्यांशी सलुख करून आपल्या देशास खैबरखिंडीपार निघून जावे.[४] अबदालीने शिपायांचे देणे भागविण्याकरिता सुजाउद्दौल्याकडे १ कोट रुपये मागितले. त्यामुळे सुजास अबदालीचा वीट आला व नजीबखानाच्या नादी लागून अबदालीशी सलुख केला व शेवटी फजीत झालो असे त्यास वाटू लागले.[५] अशाप्रकारे अबदालीचे साथीदार उदासीन बनले.

भाऊने दिल्ली घेतल्यानंतर अलाहाबाद येथे रहात असलेल्या अलिगोहरला म्हणजे दुसऱ्या शहाअलम या मोगल राजपुत्रास बादशहा म्हणून पुकारले. त्यामुळे भाऊ बरोबर असलेल्या सुरजमल जाटाची व गाजिउद्दीन वजिराची निराशा झाली. वजीर गाजिउद्दीन मराठ्यांना सोडून जाट राजाच्या आश्रयास एक वर्षापूर्वी गेला होता. हा महाकपटी व पाताळयंत्री होता. स्वतःच्या स्वार्थाकरता वाटेल त्या कुटीलनीतीने आपल्या शत्रूचा बळी घेण्यात तो पटाईत होता. जाटांच्या राज्यात वजीर गाजिउद्दीनाजवळ धाकटा शहाअलम बादशहा रहात होता. सुरजमल व गाजिउद्दीनाचे सूत असल्यामुळे सुरजमलची इच्छा ही की, भाऊने बादशहा वजिराची जोडी दिल्लीस स्थापावी व तेथील कारभार नजीबखानाच्या ऐवजी आपणास मिळावा. परंतु भाऊने हे कबूल केले नाही. तेव्हा भाऊबरोबर दिल्लीस आलेले गाजिउद्दीन व सुरजमल हे नाखूष झाले. भाऊ आपला कट्टर शत्रू जो सुजाउद्दौल्यास आपल्या बाजूस येण्यासाठी वजिरी देण्याचे गुप्तपणे कबूल केले असल्याचे गाजिउद्दीनास जेव्हा कळले तेव्हा त्याच्या

२. कित्ता, ले. २२६.
३. कित्ता, ले. २४६.
४. कित्ता, ले. २३६.
५. कित्ता, ले. २२४, २२६, २४२.
६. कित्ता, ले. २३६, २४६.

अंगाचा तिळपापड झाला. सुरजमलाची महत्वाकांक्षा जी, राजधानीचा कारभार आपल्या हाती आगण्याची होती ती सुद्धा भाऊने धुळीस मिळविली. त्यामुळे ते दोघे निराश होऊन मराठयांचे सैन्य आपणास पैशासाठी अडवून धरेल या शंकेने भयभीत होऊन भाऊचा निरोपही न घेता कूच करून निघून गेले.[1] सुरजमल रुसून गेला असे ऐकल्यानंतरही भाऊने ३ ऑगस्टला त्यास परत आणण्यासाठी महिपतराव चिटणीस, गंगोबा चंद्रचूड व रायाजी अनंत दाभोळकर यास रवाना केले. यावरून सुरजमलाचे महत्व भाऊस किती होते हे कळून येते.

## दोन्ही फौजांचे पानिपतवर आगमन आणि भाऊच्या अडचणी :

भाऊसाहेबासह मराठे सैन्य दिल्लीत दि. २२ जुलै ते ११ ऑगस्ट पर्यंत राहीले. त्यानंतर त्यांनी आपली छावणी दिल्ली पासून १० किलोमीटर अंतरावर असलेल्या शालीमार बागेत हलवली. तेथे मराठयांची दि. १० ऑक्टोबर १७६० पर्यंत छावणी होती. ह्या ८० दिवसांच्या वास्तव्यात मराठयांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. उत्तरेकडील मामलतदारां-कडील येणाऱ्या पैशावर खर्च भागविण्याची पाळी आली. जाटांकडील सालाबाद खंडणीचे पैसेही भिडेमुळे भाऊस मागता आले नाहीत. उत्तरेत गारा व गव्हावरली रोग पडल्यामुळे दुष्काळ पडला, महागाई झाली तसा सैन्याचा खर्च वाढत चालला होता. दिल्ली घेतल्यामुळे तेथील राजवंश व राजवाडा यांच्या खर्चाचा बोजाही मराठयांवर पडला. तो खर्च महिना सुमारे १ लाख रुपये होता.[2] मराठयांच्या छावणीच्या दरमहाच्या ७ लाख रुपये खर्चात आणखी एक लाख रुपये खर्चाची भर पडली. हा खर्च भागविण्यास भाऊस पैशाचा पुरवठा सारखा व्हावयास हवा होता. पण तसे होईना. पेशव्यांच्या पत्राप्रमाणे उत्तरेतील मामलेदारांनी अर्धा वसूल भाऊकडे व अर्धा पेशव्यांकडे पाठवावयाचा होता.[3] तेव्हा मामलेदार भाऊस लिहित की, वसूल झालेले पैसे पेशव्यांस पाठविले व पेशव्यास लिहित की, भाऊस पाठविले. आणि पैशाचा भरणातर कोठेच करत नसत. ह्यामुळे हलाखी निर्माण झाली. "फौजभारी पण पोटास नाही. घोडी दाणा खावयास विसरली, माणासास अन्न मिळतां कठीण असे झाले" [३अ] मराठयांच्या तोफखान्याचे बैल खाण्यास न मिळाल्यामुळे व आजारामुळे मरु लागले.[4] यामुदतीत अबदालीच्या फौजेने अंतर्वेदीतील मुलुख व्यापला त्यामुळे दिल्ली शहरात धान्याचा व घासदाण्याचा पुरवठा होईना. सैन्यास उपवास पडू लागल्यामुळे बादशाही दिवाणी-इ-खास ह्या दरबारच्या जागेस रुप्याचे छत होते त्याचा पत्रा काढून गरज भागविण्याची भाऊने तोड काढली. दि. ६ ऑगस्ट रोजी छत फोडून ते वितळवून ९ लक्ष

---

१. सरकार, फॉल ऑफ मुघल एम्पायर, खंड २, पृ. २५७.
२. पे. द. खंड २७, लें. २५७.
३. पे. द. २७, ले. २५७, पृ. २४७. ३अ. पे. द. २, ले. १३०, १३१.
४. रा. खं. १ ले. २३१.

रुपये तयार केले. ह्या छताचा काही भाग वजीर गाजिउद्दीन खानाने त्यापूर्वी काढून नेला होता. ह्या ९ लाखापैकी काही रुपये सरदारास दिले, बाकी फौजेस वाटले. तेणेकरुन सुमारे एक महिना गुजरण झाली.

सप्टेंबरच्या मध्यास पुन्हा हाल सुरु झाले.[१] त्याची वर्णने जिज्ञासूनी तत्कालीन पत्रात पहावीत. ऑक्टोबर संपेपर्यंत यमुना नदीस उतार मिळणे शक्य नव्हते. म्हणून मराठ्यांना स्वस्थ बसणे भाग पडून त्यांना दिल्लीचे आसपास घास, दाणा मिळणे कठीण झाले म्हणून मराठ्यांनी दरम्यान सलुखाची बोलणी होण्यास उत्तेजन दिले. मराठ्यांचा तळ दिल्लीत ऑक्टोबरपर्यंत होता तोपर्यंत सलुखाची बोलणी चालली. मराठ्यांना अबदाली भारी आहे हे कळून चुकले होते.[२] म्हणून सुजाउद्दौल्याने जेव्हा मराठ्यांकडे आपला वकील पाठविला, त्यावेळी मराठ्यांना आपल्या तहाच्या अटीही कळविल्या. अबदालीकडील तहाच्या अटी अशा :—

(१) सरहिंदची हद्द अबदालीची करून द्यावी
(२) पातशाही बंदोबस्त अबदालीच्या हवाली करावा
(३) पातशाहीची वजिरी शाजाउद्दौला मागतात त्यास द्यावी
(४) बक्षीगिरी नजीबखान मागतात त्यास द्यावी.

अबदालीच्या या मागण्यांसंबधी मराठ्यांचे असे मत होते की, अटकेची हद्द अबदालीची असावी आणि पातशाही बंदोबस्त पूर्ववत् चालावा.[३] पंजाब प्रांतात मराठी अंमल व्हावा असे नानासाहेब पेशवे ठासून सांगत असल्यामुळे आणि अबदाली जिंकलेला पंजाब प्रांत गमविण्यास तयार नसल्यामुळे या गोष्टीचा निकाल करण्यासाठी यमुनेचे पाणी उतरल्यावर आपणास लढावे लागेल अशी मराठ्यांची ठाम समजूत झाली.[४]

### कुंजपुरा सर होते (दि. १७ ऑक्टोबर १७६०) :

यमुनेला पाणी फार, याकरिता दिल्लीवर बसून उपयोगी नाही यास्तव कुंजपुरास जाऊन तेथील किल्लेदार फौजदार अब्दुल समदखान यांचे पारिपत्य करावे म्हणून भाऊने कुंजपुऱ्याकडे कूच केले.[५] मराठे दिल्लीहून निघाले ते १५ ऑक्टोबरच्या सुमारास कुंजपुऱ्यास पोहोचले. कुंजपुरा स्थळ मजबूत व नाकेबंदीचे होते. अबदालीचे त्याच्या देशाशी असलेले दळणवळण तोडण्यासाठी मराठ्यांना हे ठिकाण काबिज करणे जरुर होते. शिवाय

१. पे. द. २, ले. १३१, भाग २७, ले. २५७, २५८,
पुरंदरे दप्तर भाग १, ले. ३८९, पृ. २९३.
रा. खं.–१, ले. २४४, पृ. ३५०.
२. कित्ता.
३. पुरंदरे दप्तर खंड १, ले. ३८९.
४. पे. द. २, ले. १३१.
५. रा. खं. १, ले. २५८, २५९, २६०.

पठाणांनी कुंजपुऱ्याचे किल्ल्यात धान्याचा भरपूर पुरवठा करून ठेवला होता. तेव्हा तो हस्तगत झाल्यास मराठ्यांना काही दिवस सुखाने घालविता येण्यासारखे होते. किल्यात पठाण १५ हजार फौजेनिशी खंदक खणून व भिताडे घालून मजबूतीने होता. त्याजवर मराठ्यांनी १७ ऑक्टोबर १७६० रोजी हल्ला चढविला व किल्यास मोर्चे लाविले.[१] दुसऱ्या दिवशी मराठ्यांनी किल्ला घेतला. मोमिनखान गोळी लागून ठार झाला. अवदालीकडील अब्दुल समदखान व नजीबखान रोहिल्याकडील कुतुबशहा यास धरून त्यांचा मराठ्यांनी शिरच्छेद केला; व त्यांची डोकी भाल्यास लावून लष्करात फिरविली. शत्रूचा निपा:त केला. सगळी वस्तभाव लुटून आणिली. किल्यात खणत्या लाविल्या. लुटीचे व भूमिगत मिळून १०-१२ लक्ष रुपये प्राप्त झाले. दहा हजार खंडी गहू मिळाला.[२] अशाप्रकारे मराठ्यांनी हल्ला करून सर केलेल्या कुंजपुऱ्याच्या ठाण्यात लूट मिळाली.

**भाऊ पानिपताच्या बाजूस येतो (२६ ऑक्टोबर १७६०) :**

कुंजपुरा हस्तगत झाल्यावर तेथे आठवडा राहून मराठ्यांनी १९ ऑक्टोबरचा दसरा सण मराठ्यांच्या इतमामास शाजेशा रितीने मोठ्या आनंदाने साजरा केला. तद्नंतर मराठ्यांनी कुरुक्षेत्री जाऊन तीर्थविधी उरकून दिल्लीस परत जाण्याचा बेत केला.[३] भाऊसाहेबाच्या मनात हेही होते की, कुरुक्षेत्रावरून सरहिंदकडे जाऊन तो प्रांत काबिज करून तिकडील शीख, जाट वगैरे जमीनदार सामिल करून फौज ताजी करावी.[४] हा मनसुवा करून मराठे दिनांक २५ ऑक्टोबरला कुंजपुऱ्याहून निघून त्याच संध्याकाळी तरावरी येथे मुक्कानास आले. हे ठिकाण कुंजपुरा व कुरुक्षेत्र याच्या मध्यावर आहे. तिथे त्यांना बातमी मिळाली की, अवदालीने उत्तरतीरी बागपत गावाजवळ यमुना उतरण्यास सुरुवात केली असून भाऊची दिल्लीकडून येणारी रसद तोडली. आपली पाटीमागिल रसद तुटल्याचे भाऊस समजताच त्याने पानिपतच्या बाजूने कूच केले आणि त्याने अवदालीच्या हालचालीसंबंधी माहिती मिळविण्यासाठी माणसे पाठविली तो त्यांस कळाले की, अवदालीने दिनांक २३ ऑक्टोबर रोजी यमुना उतरण्यास सुरुवात केली व त्याने २९ ऑक्टोबर रोजी फौजेनिशी पानिपतपासून दोन कोसावर येऊन तळ दिला.[५] अशा रितीने दोन्ही सैन्ये पानिपती आली.

**पानिपत संग्राम :**

कुंजपुऱ्याहून पानिपतला परत आल्यावर भाऊसाहेबान त्या ठिकाणी इब्राहिमखानास तोफखान्यासह आघाडीवर ठेवले. त्याच्या मागे भाऊ,

---

१. पे. द. खंड २१, ले. १९८.
२. कित्ता, ले. १९२, १९३, १९५, १९७, १९८; शि. इ. सा. खं. ३, ले. २३४, रा. खं. १, ले. २६५.
३. पे. द. खंड २१, ले. १९४.
४. कित्ता, ले. १९७.
५. खोबरेकर, म. त्वा. मुक्काम पृ. २९३.

विश्वासराव व हुजरात फौज ठेविली. भाऊने आपल्या उजव्या बाजूस पश्चिमेस शिंद्यांच्या गोटास जागा दिली. शिंद्यांच्या पाठीमागे उत्तरेस होळकर व पवार राहिले. गावांच्या उत्तरेकड गायकवाड विठ्ठल शिवदेव व इतर सरदार ठेविले. सर्वांच्या पाठीमागे पेंढारी ठवण्यात आले होते. पेंढारी व हुजरात यामध्यें बुनगे होते. अशी एकदर मराठी फौज ४० ते ६० हजार असावी तेवढीच फौज अबदाली व नजीबखान यांची होती. भाऊ-जवळ तोफखाना असल्यामुळ तोफांच्या आगीने आपण शत्रूस भाजून काढू अशी भाऊसाहेबास उमेद होती. त्याप्रमाणे ३० ऑक्टोबरपासून झुंझास तोंड लागून १०-११ दिवस चालू असलेल्या लढचात एकमेकांवर तोफाच डागत होत्या.[१] यावेळी तोफखान्यातील गोळयांच्या वर्षावामुळे मराठ्यांनी अबदालीचे हजार-बाराशे घोडे, उंट, हत्ती व बैल लुटून आणले.[२] यमुना उतरल्यावर अबदालीस काही दिवस रसद मिळाली नाही. त्यामुळे त्याच्या सैन्यात महर्गता झाली. सैन्यावर अनर्थ ओढवला हे पाहून मराठ्यांचा विश्वास दुणावला. त्यांना वाटू लागले की, अबदालीच्या हातून पराक्रम होत नाही.[३] त्याला मराठ्यांवर चाल करून येण्याचे धैय झाले नाही. त्यावेळी मराठ्यांनी अबदालीवर चाल करून जावयास हवे होते पण आपण चाल करून जाण्यापेक्षा अबदालीने चालून आल्यावर तोफा मारून त्यास बुडवावा असा विचार भाऊचा झाला.[४] परंतु मराठ्यांना तोफांची आग शेवटपर्यन्त चालू ठेवणे शक्य झाले नाही. दिनांक १५ नोव्हेंबरच्या सुमारास दारू गोळयाची उणीव भासू लागली.[५] यावेळी अबदालीच्या सैन्यास मिळणारी रसद व दारूगोळा तोडण्याची कामगिरी गोविंदपंत बुंदेले व गोपाळराव गणेश बर्वे यांजवर सोपविली.[६] ह्या दोन सरदारांनी भाऊची ही रसद तोडण्याची योजना तर कार्यान्वित केली असती तर अंतर्वेदीतील मराठी फौजेच्या व भाऊकडील फौजेच्या कचाटयात अबदाली सापडून त्याची वाताहात झाली असती. परंतु अबदालीच्या हालचाली व डावपेचांवरून मराठे सरदार रसद मारण्याचे काम करण्यास असमर्थ ठरले. उलट अबदालीनेच मराठ्यांची रसद मारल्यामुळे मराठी लष्करास फाके पडू लागले. मराठ्यांचा तोफखाना दारूगोळयाच्या अभावी बंद पडण्याची अवस्था निर्माण झाली. भाऊसाहेबाने ५ नोव्हेंबर रोजी मराठा फौजेच्या तळाभोवती तो जुना खंदक होता तो साठ फूट रुंद व बारा फूट खोल खणला आणि मातीच्या बुरूजावर तोफखान्याची मांडणी करून शत्रूच्या हल्ल्यापासून संरक्षण करण्याची सर्व सिद्धता केली. मराठ्यांनी आपले तंबू व डेरे पूर्व-पश्चिमेस सहा मैल लांब व दक्षिणोत्तर

१. शिंदेशाहीच्या इतिहासाची साधनें, खंड ३, ले. ३९१.

२. पे. द. खंड २१, ले. १९७.

३. रा. खं. १, ले. २६५.

४. पुरंदरे दप्तर खंड १, ले. ३९१.

५. रा. खं. १, ले. २६८.

६. कित्ता, ले. २६४.

दोन मैल इतक्या विस्तीर्ण टापूवर दिले.[१] अवदालीची छावणी मराठ्यांच्या छावणीपासून सात मैल अंतरावर होती. दोन्ही छावण्यामधील झाडी तोडून व तेथे मैदान करून एक रणखांब उभारण्यात आला. दोन्ही बाजूचे सैन्य व तोफखाना आपापल्या छावणीबाहेर या खांबाच्या अनुरोधाने येत व लढाई करीत आणि सायंकाळी आपापल्या छावणीत परतत. ही जागा छाजपूर गांवी आहे. याच ठिकाणी चकमकी झडल्या. मराठ्याची फौज घोडेस्वार व पायदळ यांनी भरलेली होती. बरकंदाजांच्या पाठीवर बंदुका व हातात नंग्या तरवारी असत. घोडेस्वार फार चपळ असत. तोफखानाही बरोबर असे. द्रुतगतीने व अत्यंत चपळतेने शत्रूवर हल्ला करावयाचा तो घोडेस्वारांनीच. पण सबंध सैन्याचा मुख्यधिपती एक नव्हता. निरनिराळ्या सरंजामी सरदारांची पथके भाऊंच्या हुजराती पथकांबरोबर एकत्र आली होती. प्रत्येक पथकाची निष्ठा आपल्या धन्यावर असे. स्वारीच्या मुख्यावर असण्याचा प्रसंग येत नसे.

पठाणांची लढण्याची पद्धत वेगळी होती. धर्माच्या नावाखाली ते एक झाले होते. त्यांजवळ बंदुका होत्या व भारी तोफखानाही होत्या. नजीबखान रोहिला व सुजाउद्यौला यांची फौज कवायतबद्ध होती. इतके असूनही मराठ्यांच्या चपळ घोड्याने सबंध हिंदुस्थान पादाक्रांत केला होता. तोच त्याचा खरा आधार होता. नोव्हेंबर महिन्यात लहान लहान झुंज होत गेली.[२] दिनांक ७ डिसेंबर रोजी नजीबखान रोहिल्याचा भाऊ सुल्तानखान यान्ने एक हजार घोडदळ आणि पाच हजार पायदळ घेऊन संध्याकाळी मराठ्यांवर हल्ला केला. त्यात मराठ्यांकडील शूर सेनापती बळवंतराव मेहेंदळे यांची आहुती पडली.[३]

अवदालीने मराठ्यांची रसद तोडण्यात यश मिळविले. त्याच्या शहापसदखान व जहानखान ह्या दोन अनुभवी सेनानींनी आपल्या पाचहजार सैनिकांच्या दोन तुकड्यासह अर्धवट किंवा वर्तुळाकृती चाल करून रसद येण्याच्या सुमारास मराठ्यांच्या छावणीस वेढा दिला.[४] त्यामुळे मराठ्यांना रसद मिळणे बंद झाले. पैसा नाही व महागाई फार. मराठ्यांचे लष्कर गडबडले. त्यांची जनावरे घासदाण्याच्या अभावी मरू लागली.[५]

## गोविंदपंत बुंदेले पडतो (२०डिसेंबर १७६०)!

गोविंदपंत बुंदेले हा उत्तरेतील मामलेदार. कारकुनी पेशाचा माणूस त्याजवर पांच लाख सैन्यास रसद पोचविण्याची कामगिरी भाऊने सोपविली अवदालीची रसद जवळच्या नदीपलीकडील मुलुखातून सरळ येत होती.

१. कित्ता, ले. २५४, पे. द. खंड २, ले. १३४.
२. पे. द. २१, ले. १९७.
३. रा. खंड १, पृ. ३७५.
४. सरकार, कॉल ऑफ मुघल एम्पायर, खंड २, पृ. २३१.
५. कित्ता, पृ. २३३.

ती तोडण्याची कामगिरी भाऊनें त्यास सांगितली. तेव्हा तो तसाच निघून दिल्लीहून मेरतकडे आला व त्याने तो मुलुख लुटून अबदालीकडील रसद तोडण्याचा तडाखा सुरू केला. ही बातमी अहमदशहास कळताच त्याने अफगाणिस्तानातून नुकत्याच आलेल्या अताईखान व करीमदादखान ह्या नव्या दमाच्या तरूण सरदारास गोविंदपंतावर रवाना केले. गोविंदपतावर हल्ला करून त्यानी त्याचे शीर कापले व त्याची छावणी लुटली. भाऊकडे पोचविण्यासाठी गोविंदपंताने गोळा केलेले धान्यही पठाणांच्या हातात पडले. गोविंदपंताचे शीर अबदालीने भाऊसाहेबांकडे त्यास खिजविण्यासाठी पाठविले. मराठ्यांच्या छावणीत त्याचे दहन झाले.[1]

## मराठ्यांचा ऐवज पठाणांच्या हातात पडतो :

भाऊसाहेबांच्या तगाद्यावरून गोविंदपंताने मरणापूर्वी ४,२०,००० रुपयाचा ऐवज नारो शंकराकडे दिल्लीस सुरक्षितपणे रवाना केला. त्यापैकी दिनांक २२ डिसेंबर रोजी दिल्लीहून रुपये १ लाख १० हजार पायगुड्याच्या तुकडीबरोबर पानिपतास पोचविण्यात आले व ते छावणीत पोचले. पुढे दिनांक २ जानेवारी १७६१ मध्ये पराशर दादाजी हा सरदार प्रत्येक घोडेस्वाराबरोबर ५०० रुपयाची एक थैली, असे थैली नेणारे ३०० घोडेस्वार घेऊन पानिपताकडे रवाना झाला.[2] मराठ्यांच्या हालचालीवर दुराण्याची पूर्ण टेहळणी होती. दिल्लीहून पानिपताकडे जाण्यास निघालेला पराशर दादाजी दिनांक ४ जानेवारीस रात्री अबदालीच्या लष्करापाशी चुकून गेला आणि ही कोणत्या सरदाराची छावणी आहे असे मराठीत चौकशी केली. दुराण्यांनी हे मराठे आहेत असे त्यांच्या बोलण्यावरून ओळखले व त्यांच्यावर हल्ला केला. ह्या हल्यात २९३ मराठे घोडेस्वार ठार होऊन फक्त १ घोडेस्वार बचावून दिल्लीस ७ जानेवारी रोजी परत आला.

## मराठ्यांचा कोंडमारा :

रोज सकाळपासून तो रात्रीचा एक प्रहर होईपर्यन्त दोन्ही सैन्यात चकमकी व गोळागोळी होई. अहमदशहाने मराठा छावणीच्या भोवती ४-४ हजार स्वारांची पथके लावून दिली होती. रात्रंदिवस टेहळणी करून रसद मुळीच पोचू द्यावयाची नाही असे त्यांना बजावण्यात आले होते. त्यामुळे मराठ्यांच्या फौजेत अन्नाचा दुष्काळ पडला. अशाप्रकारे दुराण्यांनी मराठ्यास खंदकातच कोंडून टाकले होते. एके दिवशी धान्य व लाकूडफाटा नेण्यासाठी वीसहजार बुनगे खंदकातून बाहेर पडले असता अफगाण घोडेस्वारांनी त्यांजवर हल्ला करून त्यापैकी बहुतेकास कापून काढले. भाऊला ही बातमी कळून तो कष्टी झाला. त्याचा धीर सुटला.[3]

---

१. रा. खंड ३. ले.५११.

२. रा. खंड १, ले. २८१

३. फाटक, पगडी, पानिपतचा संग्राम, पृ. ९३.

### तह करण्याचा प्रयत्न :

काशिराज म्हणतो की, भाऊने आपले वकील तह करण्यासाठी अबदालीकडे पाठविले. अबदालीचा वजीर शहावलीखान याच्या मनात मराठ्यांशी सलुखाचा तह घडवून आणावयाचे होते परंतु नजीबखान रोहिला तहाच्या विरूद्ध होता कारण मराठ्यांचा पूर्ण नायनाट केल्याशिवाय आपणास सुरक्षितपणे राहाता येणार नाही. एका हल्ल्यात हा काटा काढून टाकता येण्यासारखा आहे असे त्याचे म्हणणे पडले. हे धर्मयुद्ध शेवटपर्यन्त चालू ठेवणे असे काजी इंद्रिस याने अबदालीस टाहो फोडून सांगितले. त्या सर्व दुराणी सेनानींनी माना डोलावल्या. त्यावर लढाईकरिता प्रार्थना करा, तहाचे बोलणे रद्द केले आहे असे अबदाली उद्‌गारला व त्याने मराठे वकीलांना विन्मुख पाठवून दिले.[१] "गिलच्या आमच्या लष्कराभोवती फिरोन रस्ता बंद केली, वैरग जाळली, त्यामुळे लष्करात काळ पडला. दोन अडीच शेर दाणे झाले. लोकास अन्न न मिळे ऐसा प्रसग आला. घोडी तो बहुत लोकांची मेलीच होती. राहीली तीही पोटामुळे तुटली होती".[२] माणसे व जनावरे मरू लागली. लष्करात उपासमार झाली. त्याने पानिपतचे गांव धुवून काढले. पण एवढ्या मोठ्या फौजेस ते काय पुरे पडणार. शेवटी १३ जानेवारीस सैन्यातील सरदार व शिपाई भाऊकडे गेले आणि म्हणाले की, "गेले दोन दिवसापासून कोणालाही अन्नाचा कण मिळाला नाही, दोन रुपये देऊनही एक शेर धान्यही मिळत नाही अशा हलाखीपेक्षा शत्रूशी लढणे बरे". भाऊलाही हा विचार पसंत पडला व सर्वानुमते ठरले की, दुसऱ्या दिवशी सुर्योदयापूर्वी एक प्रहर आधी सर्वांनी लढाईच्या तयारीने बाहेर पडावे.[३]

### १४ जानेवारी १७६१ दोन्ही सैन्याची रचना :

लढाईस दिनांक १४ जानेवारी रोजी सुरुवात होण्यापूर्वी दोन्ही बाजूंनी आपापल्या सैन्याची रचना कशी केली होती ते पाहू. भाऊसाहेबाने आपल्या सैन्याची रचना फार काळजीपूर्वक केली होती. भाऊ स्वतः विश्वासरावासह हुजरातीची १३५०० घोडेस्वारांची पलटण घेऊन मध्यभागी उभा होता. त्याच्या डाव्या बाजूस इब्राहीमखान गारदी आपल्या ८००० बंदूकधारींसह होता. त्याच्या बाजूस दमाजी गायकवाड, २५००, विठ्ठल शिवदव, १५०० आणि इतर मराठे सरदार २००० घोडेस्वार घेऊन उभे होते. भाऊच्या उजव्या बाजूस अंताजी माणकेश्वर १०००, सटकोजी जाधव १५००, इतर सरदार २०००, यशवंतराव पवार १५००, समशेरबहाद्दर १५००, जनकोजी शिंदे ७०००, मल्हारराव होळकर ३००० घोडेस्वार घेऊन होते.[४] भाऊकडे एकूण ५० हजार सैन्य होते.[५]

---

१. कित्ता. पृ. ९३-९४.
२. रा. खंड ६, ले. ४०६.
३. फाटक, न. र. व सेतूमाधवराव पगडी (संपा.) पानिपतचा संग्राम, पृ. ९४-९४.
४. हरीराम गुप्ता, मराठाज् अँन्ड पानिपत, पृ. २१.
५. फाटक, न. र. व पगडी (संपा.) पानिपतचा संग्राम, पृ. १७७.

अबदालीने आपल्या सैन्याची रचना पुढीलप्रमाणे केली होती : मध्यभागी अठरा हजार देशी फौज ठेऊन त्यावर वजीर शहावलीखान याची नेमणूक केली. उजवे व डावे बाजूचे टोकास ५-५ हजार अफगाण घोडेस्वारांची तुकडी होती आणि मध्य व उजवे बाजूस तसेच मध्य व डावी बाजू यांच्यामध्ये नजीबखान रोहिला व सुजाउद्दौला यांचे सैन्य उभे केले. शत्रूच्या बाजूवर अचानक हल्ला करून शत्रूची गाळण उडविणे हा मराठ्यांचा हातखंडा डाव असे. परंतु अबदालीने पूर्व व पश्चिम बाजूच्या दोन्ही टोकास ५-५ हजार घोडेस्वारांच्या तुकड्या उभ्या करून मराठ्यांचा हा डाव हाणून पाडला. अबदालीच्या सैन्यात घोडदळ पायदळाच्या तिप्पट होते. त्याचा तोफखाना अधिक परिणामकारक व सहज हालचाली करता येण्यासारखा होता. त्याच्याजवळ उंटावरील २,००० मोठ्या तोंडाच्या बंदुका होत्या. त्या बंदुकातून होणारा आगीचा वर्षाव परिणामकारक असून त्या तुकडीची सहजरित्या हालचाल करता येत होती. मराठ्यांचा तोफखाना अवजड असल्यामुळे लढाईस तोंड लागल्यावर परिस्थितीनुरूप सैन्याच्या हालचालीबरोबर तोफखान्याची हालचाल करणे अशक्य झाले. शेवटी दारूगोळ्याची उणीव असल्यामुळे मराठ्यांचा तोफखाना बंद पडला. शिवाय अबदालीचे सैन्य मराठ्यांचे समोर दिल्ली वगैरे मुलुख पाठीस घालून असल्यामुळे मराठ्यांचे आपल्या देशाशी दळणवळण तुटले होते.

मराठ्यांनी तोफास सरबत्ती देऊन लढाईस तोंड फोडले. इब्राहिमखान गारदी आपल्या ८ हजार गारद्यांसह हफीजरहमतखान, दुंदेखान, अहमदखान बंगश यांच्या फौजेवर तुटून पडला. लवकरच तोफखाना बंद पडला. त्यानंतर गारदी व पठाण यांची हातघाईची लढाई झाली. गारद्यांच्या मदतीस दमाजी गायकवाड गेले. इब्राहिमखान गारदी लढत असता भाऊसाहेबांनी अबदालीच्या मध्यभागावर चाल केली; आणि जोराचा हल्ला करून पठाणांचे पेकाट मोडले. सकाळपासून मध्यान्हापर्यंत युद्ध निकराने चालू होते. लढाई हातघाईवर आली आणि अबदालीचे सैन्य आघाडीवरून पाठीमागे फिरू लागले दोन प्रहरी अहमदशहाला आढळून आले की शहावलीखान रोहिले आणि उजव्या बाजूचे बादशाही सरदार (बखुर्दाखान वगैरे) यांची सैन्ये मोडली आहेत. यावेळी अबदालीने खरे युद्धकौशल्य दाखविले. ताज्या दमाचे दोन हजाराचे पथक बोलावले. कडक शिस्त अंमलात आणून पळून गेलेली ६-७ हजारांची फौज पुन्हा लढाईच्या तोंडावर उभी केली. त्यांच्या मदतीस एक हजार फौज देऊन अबदालीने स्वतःचे संरक्षणासाठी राखून ठेवलेली ५ हजार शिपायांची एक तुकडी मदतीस रवाना केली. त्यापैकी तीन हजार सैन्य इब्राहिमखान गारद्याच्या तोंडावर पाठविले आणि दहा हजार सैन्य वजीर शहावलीखान याच्या मदतीस दिले.[1] त्यांना हुकुम देण्यात आला की चहू बाजूने निकराने शत्रूवर तुटून पडावे. शहापसंदखान व नजीबखान यांना फर्मविण्यात आले की शहावलीखान हा हल्ला चढविल त्यावेळी त्यांनी पुन्हा हल्ला चढवावा.

---

१. सरकार, फॉल ऑफ मुघल एम्पायर, खंड २, पृ. ३३५–३३६.

सारांश, दोन प्रहरिची घटिका गुदरल्या असता शहावलीखानाबरोबर असलेल्या फौजेने मराठ्यांच्या मुख्य दळावर हल्ला केला. त्या दळात सदाशिवरावभाऊ व विश्वासराव होते. त्यावेळी उजव्या व डाव्या बाजूची सैन्ये ही त्यांच्यावर तुटून पडली. नजीबखानानेही हल्ला केला आणि त्याचवेळी आपल्या पायदळाला बाण उडविण्याची आज्ञा केली. एकावेळेस हजारो बाण उडविण्यात आले. त्या योगाने उभय दळांना आकाश आणि पृथ्वी दिसेनाशी झाली. शहावलीखान शत्रूवर तुटून पडला. दोन घटिका तुंबळ युद्ध झाले. तरवारी, भाले, बरच्या, परशु इत्यादी शस्त्रांनी उभय दळांनी जी निकर केली त्याचे वर्णन करणे अशक्य आहे. मराठ्यांनी तलवारी, भाले, बरच्यांनी शौर्य दाखविण्यात कसूर केली नाही. त्यांनी निकराने हल्ले केले. त्यात त्यांचे बरेच लोक मारले गेले. दिवस मावळण्यास एक प्रहर दोन घटिका राहिल्या असता विश्वासराव मारला जाऊन घोड्याखाली आला. भाऊला ही बातमी कळताच त्याने आज्ञा केली की, विश्वासरावाला खाशा हत्तीवर घालावे. त्यावर अंबारीच्या मागे खवाशीत बाबू पंडीत हिंगणे बसला होता. यानंतर भाऊने कमरेला तलवार आणि हातात भाला घेऊन शहावलीखानाच्या दळावर हल्ला केला. एक घटकेपर्यंत निकराचे युद्ध झाले.[1] शस्त्रसंधानाची एकच घाई झाली. परंतु फौज जमून नाही यास्तव सर्वांचे उपाय राहिले. मुड्यावर मुडदे पडू लागले. जनकोजी शिंदे जखमी होऊन रणात पडले. यशवंतराव पवार जखमी होऊन ठार झाले. तेव्हा रेटत नाही असे जाणून ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे लोक पळू लागले.[2] पानिपतावर विश्वासराव पडल्यावर गिलच्यांचे पायदळ मराठ्यांच्या हुजरातीत घुसून त्याने हातानेच तोडातोड चालविली. हे पायदळ तिन्ही बाजूने हुजरातीवर गोळ्यांचा वर्षाव करीत चालले. नजीबच्या रोहिल्यांनीही दाटी केली. शहापसंदखान व बखुरदारखान यांच्या स्वारांनी नंग्या तलवारीनिशी दाटी केली. हुजरातीच्या मराठी सैन्यास पळून जाण्यास कुठेच वाव मिळाला नाही. ते व त्यांचे घोडे लढता लढता पटापट मरु लागले. त्याचवेळी बहुधा मल्हारराव, साबाजी, जानराव, विठ्ठल शिवदेव, अंताजी माणकेश्वर, दमाजी गायकवाड, नाना पुरंदरे, गंगोबा चंद्रचूड आदिची सैन्ये माघार घेऊन झपाट्याने लढाईतून निसटली. त्यांनी मागे परतावे म्हणून भाऊच्या हुकुमावरून फत्ते झाल्याची शहाजणे वाजविण्यात आली, परंतु मागे कोणीही परत आले नाही. हुजरातीचे लोक मात्र भारती युद्ध खेळून धारातीर्थी पतन पावले. त्यात विश्वासराव, भाऊसाहेब, जनकोजी शिंदे, इब्राहिमखान गारदी, समशेरबहाद्दर आदि अनेक सरदार आपल्या हजारो सैन्यासह गारद झाले.

या युद्धात मराठ्यांचे सैन्य सुमारे ५० हजार होते. छावणीत बाजारबुणगे नोकरचाकर, मजूर वगैरे मिळून सुमारे १ लाख माणसे होती असे म्हणतात, सैनिकांपैकी अदमासे दहा हजार बचावून परत आले. ते सोडून बाकी

१. फाटक, न. र. व सेतूमाधवराव पगडी (संपा.) पानिपतचा संग्राम, पृ. ९९–१००.

२. पुरंदरे दप्तर, भाग १, ले. ३९७, रा. खंड ६, ले. ४०९.

रणांगणावर पडले किंवा गुलाम केले गेले. जिवंत सापडलेल्या बायकामुलास गुलाम करून विकण्यात आले. पुरुषांची कत्तल करण्यात आली. रणातून जे पळाले त्यापैकी काहीजण बचावले, बाकीच्यांना आसपासच्या खेड्यातील लोकांनी नागवून ठार मारले.[१] पानपतावर मराठ्यांच्या एकंदर दिड लाख माणसांचा संहार झाला असावा. अबदाली रोहिले वगैरेंचे सुमारे ३०-४० हजार माणूस ठार झाले, बरेच घोडे ठार झाले. बाकी दुसरे त्यांचे काही नुकसान झाले नाही.

एक धान्य सोडले तर मराठ्यांच्या छावणीत सामान भरपूर होते. दुकाने, तंबू, राहुट्या, बाजार ही सर्व विविध सामग्रीनी भरलेले होते. युद्धसामग्री आणि खजिना याबद्दल मराठ्यांना काळजी नव्हती. ही कोट्यावधी रुपयांची संपत्ती पठाणांच्या हाती सांपडली. प्रत्येक गरीब पठाण श्रीमंत झाला.[२]

पानिपती प्रेतांचा खच पडला. भाऊ, विश्वासराव यांच्या प्रेतास काशिराजाच्या सहाय्याने अग्नि दिला गेला. अनेक लोकांना शुजाउद्दौल्याने आश्रय दिला. या लढाईतून अहमदशहा अबदालीस खरे मराठे सैन्य दिसले व त्याने तसे आपल्या पत्रात नमूद करून ठेविले आहे.

**पानिपतच्या पराभवाची कारणे :**

मराठ्यांचा पराभव पानिपती झाला. त्यात मराठ्यांची एक पिढीच्या पिढी कापली गेली. असे बोलतात की, त्यावेळी महाराष्ट्रात एक घर असे नव्हते की त्यापैकी कोणी ना कोणी लढाईवर गेलेला नसावा. सन १७२० पासून १७६१ पर्यंत मराठ्यांनी मुलुखगिरीच्या अनेक लढाया दिल्या. त्या सर्व ते जिंकले. हा विजयाचा उन्माद तर त्यांचा नक्षा उतरविण्यास कारण झाला नसेल ना? कसेही असो, पराभव झाल्यानंतर पराभवाची कारणे शोधणे क्रमप्राप्त आहे.

**दोन्ही पक्षातील सेनानी :**

मराठ्यांचा सेनापती भाऊ होता. पण सर्वाधिकारी विश्वासराव होता. भाऊ आणि विश्वासराव दोघेही रणात जातीनिशी लढले. अबदाली भाऊपेक्षा लढाईत अनुभवी व कसलेला सेनापती होता. भाऊप्रमाणे त्याने पानिपतच्या लढाईत प्रत्यक्ष भाग घेतला नव्हता. दूर राहून तो फौजांचे संचलन आपल्या हुकुमाने करत होता. तसेच स्वतःकडे दहा हजार राखीव सैन्य त्याने ठेवले होते. हीच फौज त्याला आयत्यावेळी उपयोगी पडली. अशी राखीव फौज अल्लाउद्दीन खिलजीनेही देवगिरीच्या वेढ्याच्या वेळी ठेविली होती. मराठ्यांचे पहिल्या प्रतीचे सेनानी मल्हारराव होळकर, जनकोजी शिंदे आदिचा दुराण्यांनी पानिपतच्या अगोदर अनेक वेळा पराभव केला होता. हे सेनानी दुराण्यांच्या

१. फाटक, न. र. व सेतूमाधवरान पगडी (संपा) पानिपतचा संग्राम, पृ. ५९.
२. फाटक न. र. व सेतूमाधवराव (संपा) पानिपतचा संग्राम, पृ. ७९.

जहानखान, शहापसंदखान, करीमदादखान आदि सेनानींची बरोबरी करू शकत नव्हते. अबदाली तर त्यांच्याहून कितीतरी पटीने कसलेला सेनापती होता हे पेशव्याने लक्षात घेतले नाही.

**मराठी फौज :**

मराठी फौज ही जहागिरदार व सरंजामदारांची फौज होती. शिंदे, होळकर यांच्या फौजेस त्यांच्या मुलुखातून जो वसूल येत असे त्यावर गुजरण करता येत असे. पण हुजरातीच्या फौजेस उत्तरेतील मामलतदारांकडून वेळेवर पैसा येत नसल्यामुळे उपासमार होत असे. मराठ्यांचे सैन्य प्रत्येक सेनानीच्या अधिकाराखाली लढत होते. मराठ्यांनी स्वतःबरोबर बायका, पोरे व इतर लवाजमा नेला होता. तो सुरजमलच्या राज्यात किंवा दुसरीकडे सुरक्षित स्थळी ठेवावयास पाहिजे होता. पण तो बरोबर घेतल्यामुळे सैन्याच्या चपळ हालचालींना अडथळा येऊ लागला तसेच सैन्याला मिळणारी रसद ह्या लवाजम्यास तुटपुंजी पडू लागली. मराठ्यांची रसद अबदालीने तोडली त्यामुळे त्याजवर उपासमारीची पाळी आली. भाऊचा जास्त भर इब्राहिमखानाच्या तोफखान्यावर होता. पण आयत्यावेळी तोफखान्याला दारू न मिळाल्याने तोफखान्यातून आग ओकणे बंद पडले. भाऊ आणि अबदाली यांच्या एकंदर वागणूकीवरुन मराठे लढाई खेळण्याच्या डाव-पेचात कमी पडले. अबदालीस अडथळा न होता यमुना उतरून पानिपती यावयास मिळाले. भाऊने स्वतः जातीने लढाईत भाग घेतला. अबदालीस मराठ्यांची रसद तोडता आली, त्यांचा दिल्लीकडे जाण्याचा मार्ग रोखता आल्या, ह्या गोष्टी मराठ्यास मारक ठरल्या.

पानिपती मराठ्यांचा राष्ट्रीय पराभव झाला. त्यात राष्ट्राचे सर्व दोष व उणीवा यांचे प्रदर्शन झाले. मराठे गिलच्याच्या बरोबर एकाकी लढले. हिंदुस्थानातील रजपूत, जाट आदि हिंदु राजे-रजवाडे मराठ्यास मदत न करता त्यांचे वाईट चिंतून राहीले. मराठ्यांनी ह्या संस्थानिकास वेळीअवेळी चोपल्यामुळे ते मराठ्यांचा द्वेष करू लागले होते. शुजाउद्दौला व इतर संस्थानिकांची मदत मराठ्यास झाली असती तर मराठ्यास विजय मिळाला असता. ह्या युद्धात मराठ्यांनी सुद्धा अबदालीच्या सैन्याचा बराच नाश केला. त्यामुळे त्यास एवढी दहशत बसली की, तो पुन्हा हिंदुस्थान जिंकण्याच्या भानगडीत पडला नाही. त्याने मराठ्यांशी कायमचा तह घडवून आणला. ह्या घनघोर युद्धात भाऊ आणि इतर मराठे सेनानींनी अनेक चुका केल्या. पण त्यांनी त्यात लोकोत्तर शौर्य गाजवून शिपाईगिरीची शर्थ केली याबद्दल संशय नाही. भाऊ उत्तम सेनानायक होता, याबद्दल संशय नाही. मल्हारराव आदिंच्या हाताखालील सैन्याने जर अवसानघातकीपणा केला नसता तर गिलच्यांचा धुव्वा उडवून विजयश्री मराठ्यांनी ओढून आणली असती. भाऊसाहेबास जय मिळाला असता तर त्यांच्या सर्व चुकांवर सर्वांनी मोठ्या आनंदाने पांघरुण घातले असते.

मराठे या युद्धात हरले. पण मराठी सत्ता कायमची मेली नाही. पुढील दहा वर्षात मराठ्यांनी आपल्या घोडदौडीनी संपूर्ण हिंदुस्थान पादाक्रांत केला. शहाअलम बादशहास सन १७७१ मध्ये संरक्षण देऊन दिल्लीस आणून सिंहासनावर बसविले आणि पुढे तीस वर्षे दिल्लीची सुत्रे हालविली.

अहमदशहा अवदालीनंतर पुढे तीन दिवसांनी दिल्लीकडे परतला. दिल्लीस परत आल्यावर अबदालीने विजयोत्सव साजरा केला. दिल्लीतून अबदालीने हिंदुस्थानातील अनेक राजे-रजवाड्यास आपणास येऊन भेटण्यासाठी पत्रे व वकील पाठविले. त्यानी घोळ घातला. सुजाजवळ पैशाची गोष्ट काढताच त्याने गुपचुप दिल्ली सोडली व तो आपल्या राज्यात आला. नजीबखानाकडे पैसा मागितल्यावर त्याने तुम्ही माझ्याबरोबर जाट, राजपूत, मराठे याजवर दक्षिणेकडे चला म्हणजे त्याजकडून आपणास लागेल तेवढा पैसा हबकू असे अबदालीस सांगितले. तेव्हा अबदालीस नजीबाचा कावा कळला. त्याचे सैन्य हिंदुस्थानात बरेच दिवस राहिल्याने कंटाळले होते. ते बंड करून उठले होते. पेशवासुद्धा उत्तरेत येण्यास निघाला होता. तेव्हा शांततेचा तह करण्यासाठी अबदालीने आपला वकील याकूब अल्लीखान यास पेशव्याकडे रवाना केले. त्या पत्रात त्याने लिहले "आमची स्वत:ची इच्छा युद्ध करण्याची नव्हती. तुमच्याच हट्टामुळे ते झाले. त्यात तुमचे बंधू, पुत्र व सरदार मेले याबद्दल आम्हास फार खेद होतो. पण आता त्याला काय उपाय? अत:पर तरी आपण कायमचा तह करून एकमेकांच्या हद्दी ठरवून त्याप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करू या". पेशव्याने मल्हारराव होळकरास आपल्यातर्फे तह करण्याचे अधिकार दिले होते. तेव्हा मराठे सरदारांनी अबदालीच्या दूतास तसे सांगितले व पेशव्यातर्फे अबदालीकडे समाधानाचे पत्र घेऊन जाण्याची तजवीज केली तोच अबदालीच्या शिपायांनी बंड केल्यामुळे अबदाली स्वदेशास मार्चच्या अखेरच्या आठवड्यात जाण्यास गेला.

तदनंतर अवदालीचे हस्तक गुलराज व आनंदराम हे पुण्यास माधवराव पेशवे याजकडे आले आणि त्यानी अवदालीतर्फे माधवराव पेशव्यांशी शांततेचा तह फेब्रुवारी १७६३ मध्ये केला. पेशव्याने शांततेच्या तहानंतर शहास भारी किमतीची वस्त्रे व एक चांगला हत्ती भेट म्हणून पाठविले.[१]

### पेशव्याची प्रकृति बुंदेलखंडात ढासळते :

उत्तरेत भाऊ मोठ्या लवाजम्यानिशी अब्दालीशी सामना देण्यास गेला असता पेशवा भाऊस मदत करण्यासाठी उत्तरेस जाण्यास १७६० च्या दसऱ्यानंतर निघाला. अब्दालीचा पराभव करून त्यास घालवून दिल्यावर हिंदुस्थानची काय व्यवस्था करावयाची याचा मसुदा मनाशी ठरवून पेशवा धिम्या चालीने उत्तरेच्या मोहिमेस सरकत होता. भाऊचे शेवटचे १४ नोव्हेंबरचे पत्र जे पेशव्यास मिळाले त्यात त्याने आपण अब्दालीशी समोरासमोर राहून लढाई

१. माधवराव रोजनिशी भा. १, ६७; ऐतिहासिक टिपणे १, ५६.

देत आहोत असे लिहिले होते. अब्दालीचा पराभव होणार हे निश्चीत, असे मनात ठरवून पेशवा ढीलाईने चालत होता. अहमदनगरहून गोदातीरी येऊन त्याने दोन महिने तिथे घालविले. पण उत्तरेतील काहीच बातमी कळत नाही हे पाहून त्याची अस्वस्थता वाढीस लागली. त्याचबरोबर बंधु रघुनाथराव, दोन्ही भोसले बंधू, गोपाळराव पटवर्धन, सदाशिव रामचंद्र, यमाजी शिवदेव आदि सरदार होते. ९ जानेवारीस पेशव्याने रघुनाथरावास निजामाच्या हालचालीवर लक्ष ठेविण्यासाठी मागे पाठविले. १८ जानेवारीस पेशव्याने माळव्यात प्रवेश करून भाऊस पत्र लिहिले की, आपण येईपर्यंत अब्दालीस थोपवून धरावे. तिकडे आल्यावर दोन्ही बाजूने त्यास चेपीत मार देऊ. भिलशाळा मुक्कामास असता त्यास "दोन मोती गळाली, पंचवीस मोहरा नाहिशा झाल्या आणि चांदीतांब्याच्या नाण्यांची तर गणतीच नाही" अशा आशयाचे पत्र मिळाले व पानिपतवर झालेल्या मराठा संहाराच्या बातम्या येऊ लागल्या. त्या ऐकून पेशवा दुःखवेगाने आपल्या तंबूत व कोसळला. जे पानिपती घडले त्याचे सविस्तर निवेदन त्यास कोणीच देईना. एक महिना अशाच अवस्थेत गेला आणि फेब्रुवारीमध्ये पानिपतहून परतलेला नाना पुरदरे पेशव्यास भेटला. तेव्हा त्याच्या तोंडून पानिपती उडालेल्या हाहाःकाराची बातमी पेशव्यास समजली. आधीच पेशव्याची तब्येत विघडली होती, ह्या बातमीने ती जास्तच बिघडली. त्याने उत्तरेस जाण्यासाठी पाचोरला आपली छावणी हालविली. तिथे महिना मुक्काम करून सर्वांच्या विचारे त्याने २२ मार्च रोजी परत दक्षिणेस जाण्याचे ठरविले.

मराठे पानिपत लढले ते केवळ "हिंदुस्थान हिंदवासीयाकरिता" हे ध्येय समोर ठेवून ह्या ध्येयाचा उच्चार भाऊसाहेबाने शुजासंबंधी लिहिलेल्या पत्रात होतो. "परकीय शत्रू नाहिसा करावा. घरचा बदोबस्त सहजात होईल. घरचे पेच त्याचे (सुजा) आमचे विचारे दुर होतील. पण हा शत्रू नाहिसा करावा"[1] मराठ्यांना पठाण परकी वाटत होते. त्यांचे धोरण बादशाही रक्षिण्याचे होते. दिल्ली कारभारात आपला हात अधिकाअधिक शिरकावून त्याबरोबरच त्या शाहीचे म्हणजे हिंदुस्तानचे रक्षण करणे. ह्या करिता मराठे पानिपती लढले आणि अमर झाले. भाऊने आपल्या अनेक बांधवांबरोबर आपला जीव धारातीर्थी ठेविला. त्याच्या शौर्याचे पोवाडे (त्यांचा पराभव झाला तरी) आजही पंजाबभूमित गायिले जातात. पराभवामुळे मराठे मोडले नाहीत, वाकले पण पुन्हा दुप्पट जोमाने उठले आणि आपली दिल्ली कारभार चालविण्याची मनिषा पूर्ण केली. पेशव्याचा परतीचा प्रवास सुरू झाला तरी इतर सरदारांनी माळवा-बुंदेलखंडात आपली सत्ता दृढ केली. जमीनदारांकडून खंडण्या घेतल्या. मल्हारराव होळकर, नारोशंकर, पवार आदि जे पानिपताहून पळून आले त्यांचे सरंजाम जप्त केले आणि आणिगाणीची परिस्थिती निवडल्यावर त्यांचे त्यास परत केले.

---

१. १३ इ. स. ऐ. टि. २, पृ. ६०.

पानिपतच्या पराभवाची कारणे काय होती याची चर्चा वर केलीच आहे.

**पानिपत पराभवाचे महत्त्व :**

नेहमी असे बोलले जाते की, पानिपतच्या पराभवामुळे मराठ्यांची उत्तरेतील सत्ता खलास झाली. आणि त्यापासून मराठा साम्राज्य सत्तेस उतरती कळा लागली. पण हे खरे नाही. अभावित माणसे व पैसा ह्यांचा चुराडा पानिपती झाला हे खरे पण मराठी सत्ता मेली नाही. यापुढे नाना फडणीस व महादजी शिंदे या सारखे दोन मुसद्दी महाराष्ट्राने हिंदुस्थानचे राजकारण खेळण्यास दिले. त्यांनी आपल्या अक्कल-हुशारीने आणि शौर्याने पुढील ४० वर्षे मराठी साम्राज्यसत्ता हिंदुस्थानात वाढविली, दृढ केली.

शुजाउद्यौला मराठ्यांना सोडून अबदालीच्या बाजूस गेला त्याचा परिणाम अखेर त्यास इंग्रजांकडून पराभव झाला. त्यांचे मांडलिक व्हावे लागले. रोहिल्यांनी देशाचा विचार न करता धर्माच्या आस्थेने दूरचा अब्दाली आणि शेरजारचा शुजा यांसी आत्मसंरक्षणासाठी संगनमत केले पण अखेर त्यांचा इंग्रजांची मदत घेवून शुजाने संहार केला. सारांश, मराठ्यांचा दिल्लीच्या बादशहाच्या छत्राखाली हिंदु-मुसलांमानांचे संयुक्त साम्राज्य चालविण्याचा प्रयत्न हाच सर्वांच्या हिताचा होता. अवदालीस कायमची याद राहिल असाच तडाखा मराठ्यांनी दिला याचा परिणाम त्याने दिल्लीचे नाव कायमचे सोडून देण्यात झाला. भाऊच्या म्हणण्याप्रमाणे पंजाब मराठ्यांकडे ठेवण्यास तो राजी नव्हता. अखेर त्यास तो प्रांत शीखांच्या स्वाधीन करणे प्राप्त पडले.

**इंग्रज सत्तेचा उदय :**

मराठ्यांच्या पानिपतच्या पराभवाच्या दुसऱ्या दिवशी शहाअलम बादशहाचे ब्रिटीशांसी युद्ध होऊन त्यास पराभव पाऊन ब्रिटीशांच्या आश्रयास जावे लागले. बंगाल बाहेरची सुभेदारी ब्रिटीशांना मिळाली. १६ जानेवारीला ब्रिटीशांनी फ्रेंचांकडून पांडेचरी जिंकून घेतली. हे तीन दिवस ब्रिटीश सत्तेच्या हिंदुस्थानातील उदयास कारणीभूत झाले असे म्हणावे लागेल.

मराठ्यांची एक सबंध कर्तबगार पिढी पानिपती पडली. म्हणून त्यांचा वेग थंडावला नाही. त्यांची जागा लगेच तरुण रक्ताने घेतली. माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत ही वालपिढी तरुण झाली आणि पुढे हिंदुस्थानचे राजकारण आपल्या हाती घेतले. कर्तबगार राष्ट्राच्या वाटयास बरे-वाईट दिवस यायचे होते. तसेच ते महाराष्ट्राच्या वाटयास आले व ते त्यांनी धैर्याने सहन केले.

**पेशव्यांचा शेंवट :**

पेशव्यांची प्रकृती मुळात नादुरूस्त होती पण पानिपतचा संहार ऐकल्यापासून त्यात अधिक विघाड झाला म्हणून पेशव्यांनी पुण्यास जावे असे ठरले.

पाचारेहून २५ मार्चला निघून, वाटेत मुक्काम करीत, पेशवा गोदातीरी टोक्यास १६ मे ला आला. वडिलांची श्राद्ध घालून तिथेच त्यांची सुवर्णतुला केली, तेव्हा त्याचे वजन ४५६८ तोळे म्हणजे ११४ पौंड भरले. सहा वर्षापूर्वी त्यांचे वजन १७८ पौंड होते. नारायणरावास देवी झाल्यामुळे त्यास त्याच्या आईसह मागे ठेवून पेशवा ५ जूनला पुण्यास पोहोचला. एका वेळची त्याची बळकट शरीर प्रकृती आता काठीसारखी दिसू लागली. त्याला भ्रम निर्माण झाला. राज्याची गुपिते बोलू नयेत ती बोलू लागला. १२ जूनला त्याने शनिवारवाडा सोडून तो पर्वतीस राहावयास गेला आणि तेवीस जूनच्या रात्री तेथेच मरण पावला. नव्या लाकडी पुलाजवळ त्यास अग्नी दिला.[1] तद्नंतर माधवराव पेशव्यास छत्रपतीकडून साताराहून पेशवाईची वस्त्रे दिनांक १७ जुलैला आणविली.

**पेशव्यांचा स्वभाव :**

नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीत मराठेशाहीचा अपरंपार विस्तार झाला यावरून त्यांच्या कर्तबगारीचे महत्त्व मनात भरते. त्यांच्या कामात उरक फार मोठा होता. दररोज ५-१० पत्रे ते स्वतः लिहित असावेत. मनुष्यस्वभावाची पारख करून त्यास आपल्या लगामी लावून घेण्यात नानासाहेब विशेष कुशल होते. ते आंतल्या गाठीचे असून, स्वतःचा अंत लागू न देता, दुसऱ्याचे इंगीत काढून घेऊन आपला शह कायम ठेवणे, अडचणीच्या प्रसंगातून काही तरी युक्ती काढन निभावून जाणे, प्रसंगी पड खावून आपला हेतू सिंद्धीस नेण्याची संधी निर्माण करणे, भिन्न प्रकृतींच्या व्यक्ति नानाउपायांनी नरम करणे अशा प्रकारची अष्टपैलू वागणूक नाना साहेबांची होती. नानासाहेब समतोल बुद्धीचे होते. त्यांनी राज्यकारभाराच्या वसुलीची वाटणी, हिशेब, न्याय, जमीन महसूल वगैरे बद्धलची जी रीत घालून दिली ती प्रशंसनीय होती म्हणूनच शेवटपर्यन्त पाळली. ज्यांत अर्थ प्राप्ती नाही असे राघो भरारीने केलेले उद्योग नानासाहेबास मुळीच आवडत नसत. त्यांच्या पशांच्या मागणीमुळे सरदारांसही अनेकवेळी इष्टनिष्टता बाजूस ठेवून पैशांच्या मागे जावे लागे. पण शेवटपर्यन्त त्यांचा दरारा कायम होता.

१. रा. खं. ६ ले. ४१६, पे. द. १८ ले. १६३.

## मराठाशाहीचे पुनरुत्थान--पेशवे माधवराव यांची छाप बसली

### कालसूची

| | |
|---|---|
| १७५५ . . . | च्या सुमारास हैदर दिंदिगलचा सुभेदार. |
| १७५७ . . . | मराठ्यांची म्हैसूरवर स्वारी. |
| १७५८ . . . | पेशवे आपला वकिल मुंबईकरांकडे पाठवितात. |
| १७६०, नोव्हेंबर २० . | फत्तेसिंग भोसले यांचा मृत्यू. |
| १७६१, जून . . . | हैदरअल्ली मराठ्यांचा मुलूख घेण्यास शिरे प्रांती हजर |
| १७६१, जून १३ . . | नानासाहेबांचा मृत्यू. |
| १७६१, जुलै २० . . | माधवरावास पेशवाईची वस्त्रे. |
| १७६१, ऑगस्ट २० . | निजामअल्लीची पुण्यावर चाल. |
| १७६१, सप्टेंबर १४ . | इंग्रजांचा मराठ्यांशी एक व्यापारी करार. |
| १७६१, सप्टेंबर २५ . | निजाम–पेशवे तह कायम. |
| १७६१, ऑक्टोबर . | बसालत जंग आणि हैदर होसकोट व दोड बालापूर ही ठाणी घेतात. |
| १७६१, नोव्हेंबर . . | पेशव्यांची निजामावर चाल. |
| १७६१, डिसेंबर १० . | ताराबाईचा मृत्यू. |
| १७६२, जानेवारी . | मराठ्यांचा निजामअल्लीशी तह. |
| १७६२, जानेवारी १७ . | मोगल माधवरावांशी तह करून परत जातात. |
| १७६२, जून १३ . . | पेशवे पुण्यास परत. |
| १७६२, नोव्हेंबर १३ . | दादा व पेशवे यांची भेट. |
| १७६२, नोव्हेंबर २३ . | दादा निजामअल्लीस मेजवानी देतात. |
| १७६२, नोव्हेंबर २३ . | जानोजी भोसले निजामास सामील होऊन पुणे जाळण्यास मदत करतो. |
| १७६३, ऑगस्ट १० | राक्षसभुवनची लढाई. |
| १७६३, सप्टेंबर . . | हैदरचा सेनापती मीर फैजुला, शिरहट्टी धारवाड ठाणी घेतो. |
| १७६३, सप्टेंबर १९ . | निजामअल्लीकडून सलाबतजंगाचा खून. |
| १७६४, नोव्हेंबर ५ . | धारवाडच्या किल्यावर पेशव्यांचा कब्जा. |
| १७६४, डिसेंबर १ . | पेशव्यांचा हैदर छावणीवर मारा. |
| १७६५, जानेवारी . | हैदर गुपचूप बिदनुरास पोहचला. |
| १७६५, जानेवारी २७ . | पेशवे व दादा यांची हरपनहळ्ळीस भेट. |
| १७६५, जलै . . . | चुलते-पुतणे (दादा-पेशवे) पुण्यास एकत्र आले. |
| १७६५, ऑक्टोबर १३ | वऱ्हाडकडे पेशव्यांची स्वारी. |
| १७६६, जानेवारी १८ . | जानोजी व पेशवे यांच्या दर्यापूर मुक्कामी भेटी. |



थोरले माधवराव पेशवे

# १३

# मराठेशाहीचे पुनरुत्थान--पेशवे माधवराव यांची छाप बसली

**माधवरावांची छाप बसली :**

(१) १७६१, जून १३ नानासाहेबांचा मृत्यू.

(२) माधवरावास पेशवाईची वस्त्रें (२० जुलै १७६१).

(३) निजामअल्लीची पुण्यावर चाल (२० ऑगस्ट).

(४) पेशव्यांची निजामावर चाल--निजामअल्लीकडून टोक्याचा विध्वंस (नोव्हेंबर).

(५) निजामअल्लीचा मुकाम चासेवर

(६) ताराबाईचा मृत्यू.

**माधवरावास पेशवाईची वस्त्रें :**

नानासाहेब पेशवा पर्वतीवर २३ जून १७६१ रोजी मृत्यू पावल्यावर अशौच निवृत्तीचा काळ मागे पडताच सर्व जाणत्या माणसांच्या विचाराने माधवरावास पेशवाईची वस्त्रे मिळवून दादाने त्यास सहाय्य करावे असे ठरले. तदनुसार दादा व माधवराव सातान्यास गेले, तिथे माधवरावास दिनांक २० जुलै १७६१ रोजी वस्त्र मिळाली. बरोबर सखाराम बापू, आबा पुरंदरे, नाना फडणीस, त्रिंबकराव पेठे अशी मंडळी होती. त्याच वेळी आबा पुरंदरे यास मुतालकीची व सखाराम बापूस दिवाणगिरीची वस्त्रे देण्यात आली. "दरबारी कारभारी सखारामपंत व बाबूराव फडणीस असून उभयताचे एक चित आहे. सखारामपंत करार म्हणतात, दादा द्यावे म्हणतात". रामराजा ताराबाईच्या अटकेत होता. त्याची सुटका ताराबाईचे दिनांक १० डिसेंबर १७६१ रोजी देहावसान झाल्यानंतर झाली.[१]

दादासाहेबांच्या मनात माधवरावास आपल्या छायेत ठेवून आपण कारभार करावा असे होते. पानिपतचे अरिष्ट दादाच्या अव्यवस्थेमुळे उद्भवले तरी आपण पानिपती विजय मिळविला असता अशा घमेंडीत दादा सर्वांना सांगत असे. पुण्यास आल्यावर त्याने पानिपती मोडली बाजू सावरून गड किल्ले मजबुतीने राखून दौलतीचा बंदोबस्त करण्याचे कर्तृत्व करावयास हवे

१. रा. खं. १, ले. २८९, २९२, २९४, का. सं. प. या. ले. ४८९.

होते. पण ते न करता दादाने कारभारात आपले दुटप्पी धोरण चालू ठेविले त्यामुळे कारभारात एकसूत्रीपणा बिघडला व तणाव उत्पन्न झाला आणि उघड दोन पक्ष उपस्थित झाले.

हा पुण्यातील गोंधळ निजाम-हैदरादी शत्रूस कळताच पानिपतचा पराभव ऐकून त्यांना जो आनंद झाला होता त्यापेक्षा अधिक होऊन ते आपला गेलेला मुलूख परत मिळविण्यासाठी मराठ्यांवर चाल करून जाण्याची तयारी करू लागले. निजामाने उदगीर येथें झालेली आपली मानखंडना भरून काढण्यासाठी उघड चढाई आरंभिली. रायचूर दुआबांतील पंचमहाल नांवाचा निजामाकडून मिळालेला भाग फत्तेसिंग भोसल्यांकडे वहिवाटीस होता. फत्तेसिंग भोसले २० नोव्हेंबर १७६० रोजी निवर्तल्यावर ह्या प्रदेशावर निजामाने चाल केली. त्यास अडविण्यासाठी पेशव्याने दादास निजामावर पाठविले. ह्या निजाम-मराठे झगड्यात पटवर्धन आघाडीवर होते. रघुनाथरावाजवळ २५ हजार फौज होती. त्याने पटवर्धनास मदत करावयास हवी होती. पण तसे न करता नानासाहेबाच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर तो आपले काम टाकून परत आला.[१] पटवर्धन उघडे पडले. निजामाचा सरदार लाला ब्रिजलाल याने पंचमहालाचा प्रदेश काबीज करून अक्कलकोटच्या मुलुखावर चाल केली आणि पेशव्याचा नळदुर्ग किल्ला घेतला. खुद्द निजामअल्ली गाडदी व तोफखाना घेऊन सोलापूरच्या रोखाने चालून आला. निजामाच्या दुसऱ्या भागाचा रोख पुण्यावर चालून येण्याचा होता. हे कळताच "रघुनाथराव व माधवराव हे पण सैन्य व जय्यत तोफखाना घेऊन पुण्याहून निघाले." शहागडच्या मैदानात उभय पक्षांची सैन्ये एकमेकाजवळ आली. औरंगाबादला पोचेपर्यन्त मारामारी चालू होती. निजामअल्लीखानाने वरकड सामानसुमान औरंगाबादेस ठेविले आणि पुणे गाठण्याचा निश्चय करून (नोव्हेंबर १७६१) तेवीस तारखेस औरंगाबाद सोडले. आणि गनिमाला मारीत मारीत पुण्याहून ७ कोसापर्यन्त पोहोचविले. वाटेत टोक्याचे हिन्दूंचे क्षेत्र होते तेथील मंदिरे फोडून ते गांव पूर्णपणे उध्वस्त केले. पुण्याची पण तीच स्थिती झाली असती. पुण्याजवळ १४ मैलावर मोगल फौज आल्याचे कळताच पुण्यातून सावकार व खजिना सिंहगडास गेला. पण इतक्यात रामचंद्र जाधव व अलिखानचा धाकटा भाऊ मीर मोगल हे दोघेही मराठ्यास येऊन मिळाले.[२] त्यामुळे मोगलांचे बळ कमी झाले. त्याने सख्याचा संदर्भ लाविला. दादाचा सल्लागार सखाराम बापू हा यावेळी दिवाणगिरीवर होता. मोगलास न दुखवता सलूख घडवून आणला तर माधवरावांशी होणाऱ्या पुढील भांडणात आपणास हैदराबादची मदत मिळेल हा दुष्ट हेतू मनात ठेवून दादा व बापू यांनी निजामापासून ४० लाख रुपयाचा मुलूख घेऊन तह घडवून आणला.[३]

१. पगडी, मराठे व निजाम, पृ. ८१.

२. किता, पृ. ५४.

३. पे. द. २०, ले. १२८, रा. खं. १०, ले. २, ऐ. प. ले. १०३.

मोगल साफ बुडत असता त्यास तहाच्या काडीचा आधार देऊन दादाने जिवदान दिलेले गोपाळराव पटवर्धन, बाबूजी नाईक आदि सरदारास आवडले नाही. ही तक्रार गोपिकाबाईकडे गेली. तिने त्याचा रुसवा काढण्यासाठी पटवर्धनास मिरजेचे ठाणे दिले. त्रिंबकराव मामा पेठे व बाबूराव फडणीस यांनी दिवाणगिरीचे काम दादाच्या सल्ल्याने करावे असे ठरविले आणि पेशवा हैदरावरील स्वारीस जाण्यास निघाला होता, त्यास जाऊन मिळण्यास बाबुरावास सांगण्यात आले.

**इंग्रजांची कुरबूर :**

पानिपतच्या पराजयामुळे मराठ्यांच्या राज्यात चोहोकडे दंगेखोर संस्थानिक प्रबळ होऊन बखेडे करू लागले. त्यांत इंग्रजांनीही आपला भाग उचलला. इंग्रजांनी पेशव्यांशी संगनमत करून आंग्रयांचा पाडाव सन १७५६ मध्ये घडवून आणला. त्यानंतरच्या इंग्रज-मराठ्यांच्या तहाच्या वाटाघाटीत इंग्रजांनी पेशव्यास फसविले. आणि ह्याचा राग पेशव्यास होताच, त्यामुळे इंग्रजही मनातून पेशव्यांवर रुष्ट होते. १७५८ मध्ये पेशव्यांनी संभाजी मंगेश नावाचा आपला वकील मुंबईकरांकडे पाठविला. पण त्याजशी मित्रत्वाची बोलणी चालू ठेवून दुसरीकडे मुंबईसच दहा-बारा हजार फौज जमा करून राम नगरकर व जवारकर आणि गोवेकर फिरंगी याजशी मैत्री करून विघाडाची तयारी करीत राहिले.[1] सन १७५५ मध्ये पेशव्यांकडे इंग्रजांचा वकील मदतीची याचना करण्यास गेला असता "आम्हास सिद्दीपासून जंजिरा घेण्यास मदत करत असाल तरच मैत्रीच्या गोष्टी बोला" असे पेशव्याने त्यास चक्क सांगितले.[2] सन १७६१ मध्ये निजामअल्ली पुण्यावर चालून येत आहे असे पाहून रघुनाथ-रावाने मुंबईकरांकडून दारुगोळा व सैनिक कुमक मागितली. मुंबईकर इंग्रजांनी ही चालून आलेली संधी न दवडता १४ सप्टेंबर १७६१ रोजी मराठ्यांशी एक व्यापारी करार केला. त्यात सहा कलमे असून व्यापाऱ्यास व जहाज.स मराठ्यांच्या मुलखात त्रास होता कामा नये; जे मराठे अधिकारी इंग्रजी व्यापाऱ्यास त्रास देतील त्यांना शिक्षा व्हावी; मराठ्यांकडे जे युरोपियन सैनिक असतील त्यास त्यांनी इंग्रजांच्या स्वाधीन करावे; मराठे सैनिक फितूर होऊन इंग्रजांच्या आश्रयास गेले असतील त्यांना इंग्रजांनी मराठ्यांच्या स्वाधीन करावे; रामजीपंताने सिद्दीचा घेतलेला मुलुख त्यास परत करावा; एकमेकांच्या ताब्यात असलेले कैदी ज्याचे त्यास परत करावे; उंदेरीचा किल्ला इंग्रजांचे स्वाधीन करावा. ह्या कराराने इंग्रजाने मराठ्यां-कडून खूप सवलती मिळविल्या. मात्र सैनिकी मदत केली नाही. हा करार झाल्यावर माधवराव पेशव्यांनी इंग्रजांकडे अति त्वरेने मदत मागितली.[3] रघुनाथरावानेंही बाजी गंगाधर नावाचा वकील त्यासाठींच इंग्रजांकडे पाठविला.[4]

---

१. पे. द. ४०, ले. १०९.

२. Forest, Selections from Maratha Series, Vol. I; pp. 125-138.

३. Bombay Archives, Public Deptt. Diary No. 37 of 1761, p. 672.

४. Ibid.

बाजी गंगाधरने आठ कलमी तहाची यादी इंग्रजांपुढे ठेविली. त्यात इंग्रजांनी दोन हजार सैनिक व १५ तोफांची मदत पेशव्यास करावी. पेशव्याने १ लाख रुपये इंग्रजास खर्चास द्यावे. पुण्यास फौज आल्यावर मराठ्यांनी जंबुसारच्या जवळचा दीड लाखाचा उत्पन्नाचा प्रदेश इंग्रजास लावून द्यावा. इंग्रजी फौजेच्या मदतीने विजय झाल्यास पेशव्याने इंग्रजास दोन लाख रुपये द्यावे इत्यादि.[1]

मुंबई इंग्रजास वाटले की, आपल्या मदतीशिवाय मराठ्यांना निजामअल्लीवर विजय मिळविणे शक्य नाही. म्हणून त्यांनी पेशव्याने सुचविलेल्या अटींना प्रतिउत्तर म्हणून आपल्याकडून काही अटी सुचविल्या. त्यांतील मुख्य अट इंग्रज, निजाम व जंजिरेकर सिद्दी यांचा पाडाव करण्यास मदत करतील. पण पाडाव केल्यावर पेशव्याने इंग्रजास साष्टी बेट द्यावे अशी होती. पेशव्यांनी ह्या गोष्टीस मान्यता दिली नाही. हा वाटाघाटीचा घोळ चालू असता बंगालच्या इंग्रजांनी मद्रास येथील आपल्या बांधवास मराठ्यांविरुद्ध निजाम-अल्लीस मदत करण्यास सांगितले. आणि सलाबत व निजामअल्लीस मराठ्यांविरुद्ध इंग्रजांच्या मदतीचे आश्वासन दिले.[2] मराठ्यांचा वकील बाजी गंगाधरपंत याने पेशव्यांना इंग्रजांच्या अटी आणि हालचाली कळविल्या. पेशव्याला इंग्रजांच्या कुटील कारवाईचे आश्चर्य वाटले. पण इतक्यात मोगलाचा पराभव होऊन तह करून तो परत गेला असे माधवरावाने, इंग्रजांस आपल्या दिनांक १७ जानेवारी १७६२ च्या पत्राने कळविले.

**कर्नाटकची स्वारी :**

हैदरअल्लीने म्हैसुरच्या राजास कैदेत ठेवून त्याचे सारे राज्य बळकाविले होतेच. शिवाय मराठ्यांचा कर्नाटकातील मुलूख ताब्यात घेण्यासाठी तो जून १७६१ मध्ये फौज तयार करून शिरे प्रांती आला. त्यास अदवानीचा नवाब व निजामअल्लीचा भाऊ बसालतजंग हाही येऊन मिळाला. त्यानी शिरे, होसकोटे, बालापूर आदि मराठ्यांची ठाणी घेतली. मुरारराव घोरपडे-गुत्तीकर यांजबरोबर तंटा उपस्थित करून त्याच्या राज्यावर स्वारी केली. हैदराच्या या धामधुमीचा बंदोबस्त करण्यासाठी माधवराव पेशवे व त्रिंबकराव पेठे कर्नाटकात गेले. तुंगभद्रापावेतोच्या प्रदेशावर आपली हुकूमत बसवून व थोडी बहुत पैदास करून पर्जन्य सुरुवातीस १३ जून १७६२ ला ते परत पुण्यास आले.

**भाऊबंदी तेढ प्रकरण :**

पेशवे पुण्यास आल्यावर गोपिकाबाई व राघोबादादा यांचे भांडण विकोपास गेले. आपला मुलगा गादीचा खरा वारस असता त्यान निर्माल्यवत राहून दादांच्या हुकूमतीत सारे राज्य चालवावे हे गोपिकाबाईस आवडत नव्हते.

---

१. Bombay Archives, Pub. Deptt. Diary No. 37 of 1761, pp. 720-21.

२. Bombay Archives, Pol. Deptt. Diary No. 8 of 1762, p. 54.

तिने दादा व बापू यांचे महत्व नाहीसे करण्याचा प्रयत्न चालविला. माधवराव पेशव्यांस या गृहकलहाचा तिटकारा आला होता. पण सर्व सत्ता त्याची आई व तिचे कारभारी यांच्या हाती असल्यामुळे त्याचे काहीच चालेना. इतक्यात अफवा पसरली की, गोपिकाबाईने गोपाळराव पटवर्धनाचे विचारे दादास कैदेत घालण्याचा उद्योग चालविला आहे. या वार्तेने दादासाहेब घाबरून नाशकास गेले. आणि तेथून आपल्या पक्षीय मंडळीस विंचुरास जमण्यास पत्रे लिहिली विंचुरास निजामाचा मुरादखान व नागपूरकर जानोजी भोसले यास मिळवून माधवरावाविरुद्ध दादांनी नवीन घाट रचिला.[1]

दादासाहेबांची फौज जमा होऊ लागली. निजामाचा सरदार मुरादखान व विठ्ठल सुंदर आपल्या फौजा घेऊन दादास सामील झाले. मल्हारराव रास्ते व गमाजी यमाजी हे पेशव्यांकडून दादासाहेबास जाऊन मिळाले. जानोजी भोसले दादांच्या पक्षातला. तो आलेगांवच्या तळावर येऊन दादास सामील झाला.[2] माधवरावानेही युद्धाची तयारी केली. आपल्याकडे त्रिंबकराव, गोपाळराव पटवर्धन, आनंदराव रास्ते, मल्हारराव होळकर, पिराजी नाईक निंबाळकर आदि सरदारास फौजेसह बोलावून घेतले आणि युद्धाच्या तयारीने माधवराव दसऱ्यास दिनांक २७ सप्टेंबरला बाहेर पडला. इतक्यात त्याच्या प्रकृतीत बिघाड झाला. म्हणून काही दिवस वाया गेले. दरम्यान दादाकडे शिष्टाईचा प्रयत्नही त्याने चालविला. दोन्ही पक्ष युद्धाच्या तयारीने वाटचाल करीत होते. त्यामुळे शिष्टाईचे प्रयत्न फुकट गेले. कांही सरदारास धनी कोण आणि शत्रू कोण, या बद्दलचा संभ्रम उत्पन्न होऊन त्यांची त्रेधा उडाली.

पेशव्यांच्या फौजा घोड नदीवरून कूच करून आलेगांव नजीक आल्या आणि आलेगांवी दोन्ही फौजांचे युद्धास तोंड लागले. प्रहर दिवसापासून दिवस मावळेतो झुंज झाले. दादांनी पेशव्यांच्या फौजेत फितुर केला. उभयताकडील तीन-चारशे माणूस ठार व जखमी झाले. पण पेशव्यांच्या फौजेचा धीर सुटून ते रातोरात भीमा उतरून अलिकडे आले. आणि विचार ठरला की, सलुख करावा. त्याप्रमाणे पेशवे दादासाहेबास जाऊन भेटले. शनिवारी, दिनांक १३ नोव्हेंबर १७६२ रोजी दोन प्रहरी दादाच्या व पेशव्यांच्या भेटी पारगांवावर झाल्या.[3] उभयताच्या भेटी मल्हारराव होळकराने घडवून आणिल्या. "भेटीत रावसाहेबांनी चार किल्ले मात्र मागून घेतले. वरकड दादाचे मर्जीप्रमाणे जावसाल करून आपली काबू साधिली. दादानी मुद्दे लिहून दिले. त्यावर त्यांनी करार याद लिहून दिली. मल्हारराव दरम्यान होऊन सल्ला ठरला."[4] माधवराव आपण होऊन चुलत्याचे

---

१. विंचूरकर घराण्याचा इतिहास, पृ. ५१-५६.

२. पे. द. २०, ले. १३०-१३२.

३. खोबरेकर, म. स्वा. मु. पृ. ३०६.

४. सरदेसाई, रि. नि. माधवराव, पृ.२९.

स्वाधीन झाल्याने मुत्सद्दी व लढवय्ये विरोधी पक्षात सामील झालेले फशी पडल्यासारखे झाले. या संघर्षांत दादास मदत करण्यास निजामअली आला होता. त्यास दादानी मेजवानीस दिनांक २३ नोव्हेंबर रोजी बोलावून स्नेह राखिला. पेशजी उदगीरवर घेतलेली ८५ लक्षाची जहागीर व दौलताबाद किल्ला परत देऊन सल्ला केला.[१] ही जणू दादानी निजामास पुढील सहाय्यार्थ दिलेली लाचच होय. तेथे एकमताने असे ठरले की, मराठे व निजाम यांनी एकत्र होऊन निजामअल्लीचा कांटा काढावा.

**दादासाहेबांचे राजकारण :**

दादासाहेबांच्या हातात संपूर्ण सत्ता आल्यावर त्यांनी आपल्या विरुद्ध गेलेल्या सरदारांवर सूड घेण्यास सुरवात केली आणि राज्यकारभारात आपल्या पक्षाची माणसे मोक्याच्या जागी नेमिली. सखाराम बापू आणि नीळकंठ महादेव पुरंदरे यांना मुख्य मंत्री नेमिले. सखाराम बापूस सिंहगड रहाण्यास दिला आणि ९ लक्षांची जागीर दिली. पुरंदऱ्यास पेशव्यांकडील पुरंदर किल्ला दिला.[२]

फडणीस घराण्यावर दादाची वक्रदृष्टी वळली. बाबूराव फडणिसास फडणिशीवरून दूर करून ती जागा चिंतो विठ्ठल यास दिली. प्रतिनिधी पदावरून श्रीनिवास गंगाधर **उर्फ** भवानराव यास दूर करून ते पद आपला अल्पवयीन मुलगा भास्करराव यास दिले. प्रतिनिधीच्या मुतालकीचे काम आपल्या पक्षातील नारो शंकर यांस दिले. तसेच मुरादखानीस दौलताबाद, जानराव निंबाळकरास अहमदनगर, पिराजीस नेवासे वगैरे महाल दिले. नाना पुरंदरे याची मामलत काढून घेतली. देशत्याग करून जाण्यास सांगितले. बाबूजी नाईकास शिव्यागाळी करून बारामतीस घालविले.[३]

दादासाहेबाकडे निर्विघ्नपणे पेशवाईपद चालू रहावे अशी इच्छा त्यांच्या चहात्यांची होती. पेशवाईची वस्त्रे छत्रपतीकडून मिळतात तेव्हा छत्रपति पदावर दादासाहेबांच्या पक्षातील नागपूरकर जानोजी भोसले आणावयाचा हा मनसुबा निजामाचा दिवाण विठ्ठल सुंदर याचा. पेशवाईची वस्त्रे देण्यास प्रतिनिधी लागतो तोही दादासाहेबांच्या पक्षातील असावा म्हणून हे पद दादासाहेबांचा अल्पवयी मुलगा जो दिनांक २६ फेब्रुवारी १७६२ रोजी जन्मला त्याला द्यावे ही कल्पना सखाराम बापूची, ती दादांनी अंमलात आणिली.

दादासाहेबांनी राज्यकारभारांत वरीलप्रमाणे बदल करून आपल्या पुतण्याच्या पक्षाच्या लोकांवर सूड घेण्यास सुरुवात केली. त्यामुळे असंतोष माजला. दादांची प्रथम वक्रदृष्टी पटवर्धनांकडे वळली. हैदरावर

---

१. खरे, भाग १, पृ. १०४ ; पृ. १३७ वर उद्धृत केलेला मुलूख निजामास न मिळता फक्त दौलताबाद किल्लाच निजामाच्या ताब्यांत गेला.

२. कित्ता.

३. कित्ता.

स्वारीस जाण्यासाठी निघून वाटेत पटवर्धनांकडील मिरज घेण्याचा मनसबा दादांनी रचिला. गोपाळराव पटवर्धनास ह्याची चाहूल लागताच तो निजामाकडे गेला. याच सुमारास भवानराव प्रतिनिधी त्याचा मुतालिक गमाजी यमाजी, नरसिंगराव धायगुडे, पिराजी नाईक निंबाळकर वगैरे अनेक मराठे सरदार दादांवर रुष्ठ होऊन मोगलाकडे गेले. जानोजी भोसल्याचेही निजामाकडे सूत्र लागले होतेच. यातूनच राक्षसभुवनची लढाई उद्‌भवली.

**मोंगलांशी लढाई :**

मराठे सरदार निजामास जाऊन मिळाल्यावर पेशव्यांशी बिघाड करून त्यास जिकावे, ते न जमल्यास त्यांच्या राज्यापैकी बराचसा मुलूख आपल्या ताब्यात आणावा असा मनसबा निजामअल्लीने केला. गमाजी यमाजीने निजामास सातारा ताब्यात घेऊन तिथे जानोजी भोसल्याची छत्रपति म्हणून स्थापना करण्याचा सल्ला दिला. जानोजीस ही कल्पना आवडली. निजामअल्लीने ती उचलून धरली. म्हणून जानोजी व निजामअल्ली यांच्यात "साठचाळीशीचा" तह झाला. म्हणजे जितका नवीन मुलूख व खंडणीचा पैका मिळेल त्याच्या दहा वाटण्या व्हाव्या व त्यापैकी सहा निजामाने घ्याव्या व चार भोसल्याने घ्याव्या. यानंतर पेशव्यांशी लढाई करण्याच्या इराद्याने निजामाने जय्यत तयारी केली आणि आपल्या चढाईच्या मागण्या पेशव्यास कळविल्या : (१) भीमेपलिकडील सर्व मुलूख निजामाचे हवाली करावा ; (२) पेशव्यांचे ताब्यातील निजामाकडून घेतलेले महत्त्वाचे किल्ले व स्थळे पेशव्यांनी आपले हवाली करावी ; (३) पेशव्यांनी आपला कारभार निजामाचे विद्यमाने करावा.

वरील अपमानकारक मागण्या पेशव्यास कळतात, तोच बातमी आली की, मोगल आपल्या एक लाख फौजेसह महाराष्ट्रावर स्वारी करण्यास येत आहे. हा मोठा आणीबाणीचा प्रसंग सर्व सरदार व मुत्सद्दी यांच्यासमोर उभा राहिला. तेव्हा सर्व सरदारांनी एकनिष्ठ राहून मोगलास "गनिमी काव्या" ने लढाई देऊन जेरीस आणावे असें ठरले. गनिमी काव्याच्या लढाईत वाकबगार सरदार मल्हारराव यास पेशव्यांनी बोलावून घेतले आणि पेशव्यांच्या फौजांनी कूच करून मार्चच्या पहिल्या आठवड्यात औरंगाबादला तळ दिला. दादानी दिनांक १३ मार्चला त्या शहरावर हल्ला केला तो सफल झाला नाही. मुरादखान शहर रक्षण करीत असून त्याने मराठ्यास दोन लक्ष देऊन शहरास उपद्रव देऊ नये असा करार केला.[१] रघुनाथरावानी औरंगाबाद सोडून वऱ्हाड खानदेशची वाट धरली आणि तो भाग उध्वस्त करू लागला. निजामअल्लीखानाने पिंपळगांवपर्यंत त्याचा पाठलाग केला. नंतर निजामअल्लीखानाने परत वळून पुण्याची वाट धरली.[२] तेव्हा पुण्याचे लोक चिंतातूर झाले. पुण्यावर मोगलाच्या सेनेचे धुरीण जानोजी

१. खरे, भाग १.९३.
२. पगडी, मराठे निजाम : उर्दू-फारसी साधने, पृ. ८४.

भोसले व गमाजी चालून आले. त्यांनी लोकांकडून भले मोठे दंड वसूल केले, शिवाय लूट करायची ती केली. पर्वतीच्या मूर्ती फोडल्या. पुण्यात एक देव लहानमोठा राहिला नाही. धर्मशाळा जाळल्या. एक महिनापावेतो लूट व जाळपोळ झाली.[1]

पुण्याची नासाडी थांबविण्यासाठी रघुनाथरावानी चिडून ऐंशी हजार सैन्यानिशी हैद्राबाद शहरावर चाल केली. तो जिल्हा धुळीला मिळविला आणि ठिकठिकाणहून जबर खंडणी वसूल केली. हैद्राबादहून मराठे निघून फरुखनगर, नळदुर्ग आणि धारुरच्या वाटेने पुढे गेले. निजामाचे सैन्य पुण्याहून निघून गोदावरीच्या काठी राक्षसभुवन येथे पोहचले. इतक्यात खबर आली की, मराठे अहमदनगराकडे जातात यावर निजामाने औरंगाबाद गाठण्याकरिता गोदावरी ओलांडली. काही फौज घेऊन राजा प्रतापवंत गोदावरीच्या दक्षिण किनाऱ्यावर राहिला. ही संधी साधून रघुनाथरावानी त्याच्यावर चढाई केली.[2] इतक्यात पावसाळा सुरू झाला आणि उभय पक्ष आपापल्या छावणीच्या विचारास लागले. पेशव्याने गोपाळराव पटवर्धन, जानोजी भोसले यांना आपल्याकडे वळविले. रुसलेल्या सरदारांची समजूत काढली. माधवरावाने निजामअलीचा भाऊ बसालतजंगाशी करार करून त्यास आपल्या बाजूस आणिले. तसेच जानोजीचा सरदार पिराजी निंबाळकर निजामाचे पक्षात होता त्यास आपल्याकडे सामील केले. अशा रीतीने मोगलांच्या सैन्यात फूट पाडून मोगलांचे सैन्य ऑगस्ट महिन्यात राक्षसभुवनावर होते त्याजवर तोफखान्यासह पेशव्यांचे सैन्य चालून गेले.

### राक्षसभुवनची लढाई :

यावेळी दक्षिण तीरी राक्षसभुवनावर दहा-पंधरा हजार फौज व गारदी व तोफखाना घेऊन विठ्ठल सुंदर राहिला होता. त्यावर पेशव्यांच्या सैन्याने झडप घातली. चार-सहा घटका निकराचे युद्ध होऊन मोगलांचा मोड झाला. विठ्ठल सुंदर, विनायकदास व खंदारचा राजा हे मारले गेले. उदाजी पवार, जोत्याजी घाटगे, मालोजी घोरपडे, बाबूराव जंगी, माधवराव व रघुनाथराव पिंगळे, बाबूराव जाधव, शहाजी सुपेकर, जयाप्पा जाधव, बाजीराव पाटणकर, शिवराव पवार, मुरादखान, अजमखान पठाण आदि सोळा सरदार पाडावात सापडले. शिवाय मोगलांच्या कमीत कमी वीस तोफा, पंधरा हत्ती, घोडे, उंट, बैल, डेरे, राहुटया वगैरे सर्व सामान मराठ्यांचे हाती सापडले. अशा रीतीने मोगलांचा पराभव झाला. या युद्धात मराठ्यास जे यश आले त्याचे श्रेय माधवराव पेशव्यांच्या शौर्य, धोरण व व्यवस्थितपणा याकडे जाते.[3] रघुनाथरावानेही पेशव्यांच्या शौर्याबद्दल गौरवोद्गार काढून गोपिकाबाईस

---

१. खरे, भा. १, ले. २२०, २५९, २६१, २६२.

२. पगडी, मराठे निजाम-उर्दु-फारसी साधनें, पृ. ६४.

३. खरे भाग १, पृ. ३४२.

कळविले आहे. राक्षसभुवनावर निजामअल्लीच्या फौजेचा मराठ्यांनी धुव्वा उडविला हे ऐकून निजामअल्ली थंड पडला. विजयी मराठा फौज आपला पाठलाग करीत येईल या भीतीने त्याने औरंगाबादच्या दिशेने कूच केले[1] आणि गोदातीरी ज्या होड्या उताराकरिता ठेविल्या होत्या त्याचा नाश केला. गोदावरीला पूर आल्यामुळे ती दुथडी वाहत होती. त्यामुळे तीस उतार मिळणे अशक्य होते. निजामअल्ली औरंगाबादेस येऊन पोचल्यावर त्याच्या पाठोपाठ त्याचा औरंगाबादचा गव्हर्नर मुरादखान यास मराठ्यांनी आपल्या कैदेतून सोडबून त्यास औरंगाबादेस निजामअल्लीकडे तहाच्या अटी घेऊन रवाना केले. एक कोट मुलूख, दहा लाख रुपये आणि तीन किल्ले सलुखासाठी मराठ्यास द्यावे अशी मराठ्यांची मागणी होती.[2] निजामअल्लीने ही मागणी नाकारल्यावर मराठे औरंगाबादेवर चालून गेले. पण अनेक कारणांमुळे मराठ्यास निजामाचा पूर्ण पराभव करता येईना. पावसाळाभर मराठा सैनिक रणांगणात असल्यामुळे युद्धास कंटाळून घरी जाण्याची वाट पाहू लागले. इतक्यात तिकडे कर्नाटकात हैदरअल्लीने मराठ्यांचा मुलूख पादाक्रांत केल्याच्या बातम्या येऊन ठेपल्या. अशा स्थितीत निजामअल्लीशी तह करणेच पेशव्यास भाग पडले. तहात उदगीरच्या तहातला साठ लाख व नवीन बावीस लक्ष असा एकंदर ब्याऐंशी लक्षावर २५ सप्टेंबरला तह कायम झाला. उभयतानी युद्धप्रसंगी एकमेकांचे सहाय्य करावे असा करार ठरला. राक्षसभुवनाची लढाई १० ऑगस्टला होऊन वरील तह २५ सप्टेंबरला कायम झाला.

तह होत असतांच १९ सप्टेंबरला निजामअल्लीने सलाबतजंगाला ठार मारिले. पुढे १७६४ च्या ऑगस्टात औरंगाबादचा कारभारी महमद मुरादखान यास फितुरीच्या आरोपावरून अटकेत ठेविले व १७६५ च्या जूनमध्ये त्यास ठार मारिले.[3]

निजामाकडून जो मुलूख मिळाला त्यापैकी ३२ लाखाचा जानोजी भोसल्यास दिला आणि बाकीचा निरनिराळ्या सरदारास वाटून दिला. गोपाळराव पटवर्धनास मिरज दिली. भवानरावास त्याचे पूर्वीचे प्रतिनिधिपद दिले. गमाजी यमाजी यामुळे असंतुष्ट राहिला.

बाळाजी जनार्दन उर्फ नानासाहेब फडणीस यास फडणिशी दिली. या तहापासून तो तह १७९५ पर्यंत निजाम व पेशवे यांचे वितुष्ट आले नाही.

राक्षसभुवनावरील विजयामुळे माधवरावाचा दरारा आणि वचक दक्षिण-उत्तरेच्या राज्यकारभारांत बसला.[4] इथून रघुनाथराव मागे पडून माधवरावाकडे मराठी सत्तेची सर्व सूत्रे आली.

---

१. खरे, भाग १, ३४२-४३.
२. कित्ता ५७५; रा. खं. १३·८५.
३. पे. द. २८, ले. १०६.
४. सरदेसाई, म. रि. निग्राहक माधवराव, पृ. ५१.

### कर्नाटक स्वाऱ्या

### हैदरावरील पहिली व दुसरी स्वारी :

(पहिली स्वारी सन १७६४ जानेवारी ते सन १७६५ जून अखेर).— मराठ्यांच्या पानिपत पराभवाने त्यांच्या शत्रूंनी उचल खाल्ली. त्यात म्हैसूरचा हैदरअल्ली प्रमुख होता. माधवरावास पेशवेपद प्राप्त झाल्यानंतर पहिली तीन वर्षे घरगुती कलह मिटविण्यात व निजामाचा बंदोबस्त करण्यात गेली. हा वेळ पावेतो हैदराने म्हैसूरच्या राज्याच्या सीमा थेट कृष्णेस आणून भिडविल्या. मराठ्यास खडणी देणाऱ्या कर्नाटकातील पाळेगाराकडून स्वत: खंडण्या वसूल करून त्या मुलखातील मराठ्यांची ठाणी उचलून लावी. हैदरासंबंधीच्या कागाळ्या पेशव्यांच्या कानी वारंवार येत होत्या. त्यामुळे हैदराचे लवकरात लवकर पारिपत्य करणे भाग होते. पेशव्यांनी हैदराशी मुकाबला कसा केला हे सांगण्यापूर्वी हैदरअल्लीचा उदय कसा झाला व त्याने म्हैसूरचे राज्य बळकावून म्हैसूर राज्याचा विस्तार कसा केला हे प्रथम सांगितले पाहिजे.

### हैदरचा उदय :

हैदर हा म्हैसूरकरांच्या पायदळात एक नाईक होता. म्हैसूरचा अल्पवयी राजा चिक्क कृष्णराज हा आपला राज्यकारभार देवराज व नंदराज ह्यांच्या सल्ल्यानुसार चालवित असे. देवराज यास सर्वाधिकाराचा मान होता. नंदराजा हा सैन्यावरचा मुख्य अधिकारी व प्रधान ही दोन्ही कामे पहात असे. नंदराजाचा हैदरावर अतिशय लोभ होता. त्याचा फायदा घेऊन हैदराने अमाप द्रव्य मिळविले आणि त्या पैशाच्या जोरावर त्याने कवायती पायदळ व जय्यत तोफखाना उभारला. हैदराची हुशारी आणि धडक पाहून सन १७५५ च्या सुमारास त्यास दिंदिगलचा सुभेदार नेमिले. मराठ्यांनी १७५७ मध्ये म्हैसूरवर स्वारी करून श्रीरंगपट्टणास वेढा बसविला. तेव्हा म्हैसूरकरांनी मराठ्यांशी तह करून वेढा उठविण्यास मराठ्यांस भाग पाडिले. तहात बत्तीस लक्ष रुपये मराठ्यांस देण्याचे नंद राजाने कबूल केले. नंद राजाने रोख पाच लाख रुपये दिले आणि बाकी रकमेच्या फेडीकरिता त्याने म्हैसूर राज्यापैकी उत्तम सुपीक चौदा परगणे मराठ्यांकडे लावून दिले. त्या परगण्यांची नांवे– (१) नागमंगल; (२) बेळूर; (३) किकरी; (४) चेनरायपट्टण; (५) कडूर; (६) बाणावर; (७) यकनहळ्ळी; (८) होनवल्ली; (९) तुरविकिरें; (१०) कंदीकिरे; (११) चिक्कनायकनहळ्ळी; (१२) कडप्पा; (१३) नेलूर; (१४) हुलियादुर्ग. या चौदा परगण्यात वसूलाकरिता कमावीसदार नेमविले. त्यांच्या रक्षणाकरिता थोडीशी फौज ठेविली आणि शिरे, होसकोटे, बालापूर, कोलार व बेंगळूर हे एकमकास लागून असलेले शिवकालीन स्वराज्यापैकी परगणे ताब्यात घेतले. तसेच अर्काट, शिरे, कडपा, कर्नुळ, सावनूर, येथील नवाबाकडून मराठ्यांनी खंडण्या घेतल्या. शिरे संस्थान खालसा करून तिथे मराठ्यांनी

आपली पावसाळी छावणी उभारली. कडप्याच्या नबावाशी पुढील वर्षी युद्ध चालू असता हैदरअल्लीच्या सांगण्यावरून नंदराजाने मराठ्यांच्या ताब्यात दिलेले चौदा परगणे हुसकावून घेतले. ह्या म्हैसूरकरांच्या आगळिकी-बद्दल त्याचे पारिपत्य करण्यास पेशव्यांनी गोपाळराव पटवर्धनास पाठविले. ह्या परचक्राचे निवारण करण्यास म्हैसूर दरबारात हैदर पुढे सरसावला. त्यास सैन्याधिकार देऊन म्हैसूर दरबारने मराठ्यांशी लढत देण्यास सांगितले. हैदराने गोपाळराव पटवर्धनच्या अधिपत्याखाली पराक्रमी व बलाढ्य सैन्याशी मोठ्या हिकमती व जिद्दीने टक्कर दिली. दोघांनीही आपापल्या सैन्याची नासाडी होऊ न देता ही लढाई चालविली. शेवटी दोघांसही युद्धाचा कंटाळा येऊन त्यांनी तह केला. त्यात असे ठरले की, रोख बत्तीस लाख रुपये घेऊन मराठ्यांनी चौदा परगण्यावरचा हक्क सोडावा व प्रांतातून निघून जावे; नंदराजाकडून सोळा लाख घेऊन हैदरने बाकीच्या सोळा लाखाकरिता म्हैसूर-कडील मराठी सावकार वीरकर यांचा मराठ्यांस हवाला देऊन बत्तीस लाख रुपये चुकते केले. तेव्हा मराठी फौज म्हैसूर सोडून निघून गेली. हैदरने त्या परगण्यात तात्काळ आपले लोक पाठवून आपला अम्मल बसविला. त्यामुळे हैदराच्या पराक्रमाचा म्हैसूर दरबारात फारच बोलबाला झाला. आतापर्यंत त्याने म्हैसूरच्या निम्म्या राज्यावर ताबा मिळविलाच होता. सबध राज्य ताब्यात येण्यासाठी त्याने कुभांड रचून नंदराजास हाकलून लाविले आणि स्वतः सरसेनापति बनला. राजास म्हैसूरचे राज्य गिळंकृत करण्याच्या, हैदरअल्लीच्या कपट नीतीचा वास येताच त्याने मराठी सरदार विसाजीपंत बिनीवाले व गोपाळराव पटवर्धन यांच्या सहाय्याने हैदराचा नायनाट करण्याचा व्यूह रचला. त्याचप्रमाणे मराठी सैन्य हैदरावर चालून गेले. मराठी सैन्य आणि हैदर यामध्ये बऱ्याच चकमकी झडल्या. यात हैदराच्या प्रसंगावधाना-मुळे, कावेबाजपणामुळे आणि मर्दुमकीमुळे हैदर बचावला. त्याच्या नशिबाने त्याला चांगला हात दिला. हैदराचा पराभव होत असताच, पानिपतच्या वार्ता मराठ्यांच्या कानी येऊ लागल्यामुळे त्यांनी हैदराच्या तहाच्या अटी मान्य केल्या. हैदरने बारा महाल मराठ्यास कबूल केले. त्यानंतर मराठे घाईने स्वदेशी परतले. हे हैदराच्या पथ्यावर पडले. कर्नाटकाकडे मराठ्यांची पाठ वळताच त्याने नंदराज, प्रधान खंडेराव व राजा चिक्क कृष्णराज या तिघांसही कैदेत ठेवून म्हैसूरचे राज्य बळकाविले व शिरे प्रांत व तुंगभद्रे-कडील इतर स्वराज्याचा मुलुख त्याने मराठ्यांपासून हिसकावून घेतला. कर्नाटकातील बहुतेक पाळेगारांकडून खंडणी वसूल केली. जाळपोळ, लूटालूट आणि कत्तल या साधनांचा उपयोग हैदराने प्रत्येक स्वारीत केला. हैदराने आपली सत्ता वाढविण्यासाठी निजामअल्लीचा भाऊ बसालतजंग याच्याशी मैत्री केली. बसालतजंग यास हैदराच्या मदतीने कर्नाटकात स्वतंत्र राज्य स्थापावयाचे होते. त्याने मराठ्यांच्या ताब्यातील शिरे आपल्या ताब्यात घेतले. ऑक्टोबर १७६१ मध्ये बसालतजंग आणि हैदर यांच्या संयुक्त सैन्याने होसकोट, दोडबालापूर ही ठाणी घेतली. गुत्तीकर मुराररराव घोरपडे याजवर हल्ला करुन त्यास खडे चारले. मुराररावांचे अर्धे राज्य

खालसा करून आपल्या राज्यास जोडिले.[१] त्याने नंतर आपली दृष्टी उत्तरेकडील ठाण्याकडे वळविली आणि कोदीकोंडा, पेनुकोंडा आणि मदकिसरे ह्या जागा जिंकून घेतल्या. रायदुर्ग, हरपनहल्ली, चित्रदुर्ग येथील पाळेगारांनी हैदरास खंडण्या दिल्या. हैदराच्या या चढाईखोरपणामुळे मराठ्यांचे दरसाल ५० लाख रुपये कर्नाटकातून येणाऱ्या खंडणीचे बुडाले.[२]

निजामअल्लीशी तह केल्यानंतर जानेवारी १७६२ मध्ये मराठ्यांची स्वारी कर्नाटकाकडे वळली होती. रघुनाथरावाकडे त्या स्वारीचे अधीपत्य होते. तरुण पेशवा आणि त्रिंबकराव पेठे हेही स्वारीत होते. रघुनाथरावाचा हेतू तुंगभद्रेपर्यंत जाऊन खंडणी गोळा करुन मराठ्यांचा अंमल बसविणे हा होता. फेब्रुवारी महिन्यात कोल्हापूरच्या आसपास स्थळाकडून खंडणी घेऊन मार्चमध्ये विचूरला स्वाऱ्या आल्या.[३] एप्रिलमध्ये बिदनुरकराकडून खंडणी घेतली.[४] जुलै महिन्यात मराठी सैन्याची हैदराशी गाठ पडली. हैदराने पेशव्याशी मैदानात लढण्याचे टाळले. त्यामुळे मराठ्यास आपली मुलूखगिरी स्वारी लांबवावी लागली. त्याचा परिणाम असा झाला की मराठ्यांस पावसाळी कर्नाटकात स्वारीवर रहावे लागले. त्यामुळे खर्च वाढून सैन्यात महागाई सुरु झाली. पेशव्यास पैशाची टंचाई भासू लागली. म्हणून रघुनाथरावाने मल्हारराव होळकरास पैसे पाठविण्यास लिहिले. परंतु पावसाळा आणि रघुनाथरावांचे त्रिंबकरावाशी झालेले भांडण यामुळे पेशव्यास ही स्वारी तशीच अर्धवट टाकून पुण्यास येणे भाग पडले.

यावेळी गमतीची गोष्ट अशी घडली की, इंग्रजांचा मराठ्यांशी सलोख्याचा तह झाला असतांनाही मुंबईकर इंग्रजांनी हैदरअलीस मराठ्यांविरुद्ध मदत करण्याचे ठरवून त्यास शस्त्रास्त्रे व दारुगोळा पुरविण्याचे ठरविले. मराठी सत्तेला पायबंद घालण्याकरिता अर्काटच्या नबाबास युद्धनौका बांधण्यास मदत केली.[५] माधवराव पेशवे आणि त्याचे चुलते दादासाहेब यांचे भांडण चालू असता आणि निजामावरील स्वारीत मराठे गुंतले असता हैदराने बिदनुर आणि सोंदा ही स्थळे काबीज केली. त्याने निजामअल्लीशी त्यास नजराणा पाठवून दोस्ती केली. पेशव्याकडेसुद्धा मेहदी अल्लीखान नावाचा आपला वकील पाठवून गोडी करण्याचा प्रयत्न केला. हैदरास हे पक्के ठाऊक होते की, मराठ्यांची स्वारी आपल्यावर केव्हाही होईल, त्याकरिता त्याने सावनुर, करनुल आणि कडप्पा ही संस्थाने काबीज केली. सावनूरकर मराठ्यास खंडणी देत होते. हैदराने त्याजकडून खंडणी घेऊन त्यास आपला मांडलीक बनविले. नंतर गोपाळराव पटवर्धनाच्या जहागिरीतील बंकापूर घेतले.[६] हैदराचा सेनापति

---

१. खरे, भा. २, पृ. ६९६.
२. पे. द. २७, ले. ४.
३. कित्ता, ले. ५, ८.
४. रा. खं. ६, ले. १३१.
५. खरे., भा. १ पृ. ३४३, ३५२.
६. कित्ता, ३७६.

मीर फैजुल्ला यानें सप्टेंबर १७६३ मध्ये शिरट्टी घेऊन पुढील महिन्यात धारवाड घेतले.[1] अशा रीतीने हैदराची सत्ता कृष्णा काठापर्यंत पसरली आणि त्याचा हा विजय आणि भरभराट ही मराठ्यांच्या आपसातील भांडणामुळे होऊ शकली.

निजामअल्लीच्या भानगडीतून मुक्त झाल्यावर रावसाहेब पेशवे कर्नाटकात गेले आणि मनोळीहून सर्व सैन्यासह कूच करून धारवाडास आले. पण हैदराने धारवाडचा बंदोबस्त विशेष केल्यामुळें मराठी सैन्य हुबळीस गेले. हुबळीस वेढा घालून ते ठाणे काबीज केले. तदनंतर सावशी, कुंदगोळ, नवलगुंद, मुकगुंद, बालीघा इत्यादि ठाणी मराठ्यांच्या हाती लवकरच आली. तिथून स्वारी सावनुरास गेली. सावनूरकरानी पेशव्यास थाटाची मेजवानी दिली. सावनूरच्या नबाबाची भीति एवढीच होती की, मराठे कर्नाटकातून परत गेल्यावर हैदर आपणावर झडप घालील. पेशव्यानें त्याच्या संरक्षणाकरिता दोन हजार सैन्य सावनुरास ठेवून दिले. नंतर चित्रदुर्ग आणि हरपनहल्ली घेण्याच्या मार्गास लागले. पेशव्यास यावेळी पैशाची गरज भासू लागली. शिवाय हैदराने रानात दडी मारल्यामुळे त्याजबरोबर मराठ्यांना मैदानात लढता येईना. हैदराची वाट बघत व्यर्थ वेळ दवडण्याऐवजी पेशवा तुंगभद्रा ओलांडून चित्रदुर्गच्या दिशेने गेला. हैदरास ही बातमी कळताच तो लपलेल्या ठिकाणाहून रानातून बाहेर आला आणि सावनुरमध्ये मोठ्या दिमाखानें संचार करू लागला. पेशव्यास ही बातमी कळताच गोपाळराव पटवर्धनासह पेशवा हैदरावर चालून गेला. मराठ्यांनी हैदरास वेढा घातला. मराठ्यांची आणि हैदर व त्याचा सरदार मीर फैजुल्ला यांची झुंज बरेच दिवस चालली. एक दिवस तर सारखे सहा तास लढाई चालू होती. त्यात हैदराचे एक हजार लोक मारले गेले आणि तेवढेच जखमी झाले. ह्या हानीमुळे हैदर एवढा धास्तावला की मराठ्यांबरोबर उघड सामना देण्याचे तो टाळू लागला. हैदर झाडीत लपलेला पाहून पेशव्याने त्यास असा निरोप पाठविला की, तुझ्या शौर्याच्या कैक गोष्टी आम्ही पुण्यास ऐकलेल्या आहेत. त्या जर खऱ्या असतील तर तू भागूबाईसारखा रानात दडून न राहता, मैदानात येऊन आमच्याशी मुकाबला कर. त्यातच तुझे शौर्य आणि मर्दुमकी आहे आणि असे जर तू केले नाहीस तर तू खरा सैनिक नसून तुझ्या पराक्रमाच्या ऐकलेल्या गोष्टी कपोल कल्पित आहेत असे मी समजीन आणि पुण्यास जाण्याअगोदर तुझ्या छावणीस आनंदाने भेट देईन.[2]

हे पत्र वाचून हैदर हादरला. पण पेशव्याच्या अवाढव्य सैन्यापुढे (८० हजार) आपल्या चाळीस हजार सैन्याचा टिकाव लागणार नाही हे जाणून हैदरानें गुपचूप वारीहून पलायन करून मायेनहळी या डोंगरातील दाट झाडीत असलेल्या ठिकाणी जाऊन राहिला. ती जागा जंगलात कडेकपारीत असल्यामुळे तेथे घोडेस्वारांचा झगडा चालण्याजोगा नव्हता आणि आसपासच्या जागी आता पर्जन्य पडू लागल्यामुळे धान्याची अतिशय महागाई झाली. यामुळे

---

१. खरे, भाग १. पृ. ३८७-८९.

२. किता, पृ. ४२७.

यंदा हैदराचे झाले इतके पारिपत्य बस झाले असे मानून तेथून लष्कर परत आणणे प्राप्त झाले. अशा रीतीने मे महीना संपला. पाऊस सुरू झाल्यावर पेशव्याने हैदरावरील मोहिम अर्धवट टाकून जाण्याचे टाळून धारवाडांस पावसाळयात छावणीस राहिले.[१]

पेशवा दूर गेला असे पाहून हैदरअल्लीने जूनमध्ये आपला सरदार लालखान यांस सावनुरावर पाठविले. पेशव्यास हैदराचा सावनुरावरील हल्ला अपेक्षित नव्हता. सावनूरचे रक्षण व्हावे म्हणून पेशव्याने १,००० फौज व सैन्य उभारण्यासाठी पन्नास हजार रुपये सावनूर नबाबाकडे दिले होते. सावनूरवर हल्ला होणार हे कळताच पेशवा बिदनूरहून तडक सावनूरवर आला त्यामुळे सावनूर हैदराच्या तडाख्यातून वाचले. सावनूर हे अगदी नाकेबंदीचे ठिकाण आपल्या ताब्यात असावे असे पेशवा व हैदर या दोघांसही वाटत होते. पेशव्यांच्या तंत्राने तेथील नबाब वागत असल्यामुळे पेशव्याने सावनूरच्या रक्षणासाठी गोपाळराव पटवर्धनास रहाण्यास सांगितले.

पंधरा दिवस झाल्याबरोबर श्रीमंतानी मोबदला फौज सावनूरास पाठवून आपणास सोडवावे व वैरणीबद्दल प्रत्येक घोडेस्वारास दररोज चार आणे सावनुरकराने द्यावे अशा गणपतरावच्या शर्ती होत्या त्या पेशव्याने कबूल केल्या. तो आपल्या बाराशे स्वारानिशी ज्येष्ठी पौर्णिमेस सावनुरास आला. सावनूरचा नबाब हैदरास एवढा घाबरत होता की त्याने गोपाळराव पटवर्धनाच्या मसलतीने राहाण्याचे पेशव्याकडे साफ नाकारले. गोपाळरावाच्या तुटपुंज्या फौजेवर हैदराने हल्ला करावयाचे ठरविले. पण गोपाळराव फारच सावध असल्यामुळे हैदराने केलेले प्रयत्न वाया गेले. शेवटी त्या रेंगाळत चाललेल्या कुचक्या लढायांचा हैदरास कंटाळा येऊन तो बंकापुरास गेला आणि तिथून तो अनवडीस गेला. लौकरच गोपाळरावाच्या मदतीस नारो शंकर यास पाठवून स्वतः पेशवे सावनूरकडे गेले. ऑगस्टमध्ये हैदराने आपला वकील शामराव गोपाळ याच्या तर्फे तहाची बोलणी पेशव्याकडे लाविली. पण तहात आपला मुलुख सोडण्यास हैदर तयार होईना. म्हणून पेशव्यानी लढाई बन्द करण्याचे नाकारले.[२] पेशव्याने मराठ्यांचे आरमाराधिपती जानोजी धुळप यास हैदराच्या सोन्दे व बिदनुर येथील बंदरे पोर्तुगीज यांच्या साह्याने हस्तगत करावी असे सांगितले.

त्यावरून असे कळून येते की, दोन्ही पक्ष परकीय सत्तेची मदत घेण्याचा प्रयत्न करत होते. हैदर निजामअल्लीची आर्जवे करत होता. तर रघुनाथराव दादा निजामअल्लीस मैत्रीची पत्रे लिहून माणसे आणि शस्त्रास्त्र यांची कुमक मागत होता. पेशव्याने मद्रास कौन्सिलची मदत मागितली पण ब्रिटीशांनी ती अति सभ्यतेने नाकारली. पण मुंबई कौन्सिलने त्यास काही तोफा, बंदुका आणि दारू पुरविली.

---

१. पे. द. ३७, ले. ३७; खरे भा. २, ले. पृ. ४३४

२. किन्ता, पृ. ४७४, ४७५.

सप्टेंबरमध्ये मराठ्यानी हावेरी काबीज[1] करून धारवाडास वेढा घातला. या पूर्वी सावनूरच्या संरक्षणाचे काम विंचूकरर, रास्ते व भोसले याजवर सोपवून गोपाळराव धारवाडास पेशव्याच्या स्वारीत येऊन मिळाला होता. यावेळी मीर फैजुल्लाचा भाऊ फजलअल्लीखान हा धारवाडचा किल्लेदार होता. तो व त्याचे लोक यांनी हैदराकडून कुमक होण्याची आशा नसतानाही हिकमतीने व कौशल्याने किल्ला झुंजवू लागले. शेवटी मदतीची आशा सोडून किल्लेदाराने किल्ला दोन महिन्यानंतर मराठ्यांचे स्वाधीन केला. (५ नोव्हेंबर १७६४).[2] धारवाडात पेशवे सरकारचे ठाणे कार्तिक शुद्ध द्वादशीच्या दिवशी बसले. आता फक्त बंकापूर हैदराच्या ताब्यात राहिले होते. हैदराने तहाची बोलणी पुन्हा सुरू केली. पण त्यातून निष्पन्न असे काही झाले नाही.[3] पेशव्याने बंकापूर घेण्याचा बेत तहकूब करून अनवडीस हैदर छावणीस होता त्याचे पारिपत्य करावे असे सर्व सरदारानुमते ठरविले, कूच केले आणि अनवडीजवळ दिनांक १६ नोव्हेंबर रोजी छावणी केली. महिन्याचा उरलेला काळ दोन्ही पक्षाच्या लहान लहान अशा शेकडो चकमकी झडण्यात गेला. मराठ्यांचे सारे लष्कर अनवडीस होते व तेथेच हैदराची छावणी एका टेकडीच्या पायथ्यास होती. मराठ्यांनी त्यास बिदनूरकडून होणारा धान्याचा पुरवठा बंद करविला. हैदर धावरून सैन्यासह बिदनुरास निघाला असता पेशव्यांनी आपला एक सैन्य विभाग त्याच्या वाटेवर उभा केला आणि त्यास लढाईस उभे रहाण्यास भाग पाडले. हैदराने आपल्याकडून लढाईसाठी सैन्य उभे करण्याची शिकस्त केली. मराठ्यांनी चोहोकडून हल्ला केला आणि हैदराच्या पुष्कळ सैन्याची कत्तल केली. हैदर आपल्या उरलेल्या पंचवीसशे स्वार व दहा हजार पायदळ या सैन्यासह बिदनुरास पळून गेला.

डिसेंबरला जडीहनवटीला एक निर्णायक लढाई झाली.

धारवाड घेतल्यावर माधवराव पेशवे हनगळास आले व तेथून त्यांनी दिनांक १ डिसेंबर रोजी हैदरच्या अनवडी येथील छावणीवर जोरांत मारगिरी केली. हैदराकडील हजार बाराशे गाडदी कापून काढिले. चहूकडून मराठा फौजेने हैदरास घेरले. पण हैदर झाडीत लपून हतवीर्य होऊन पळून गेला. या लढाईत पेशव्याच्या पराक्रमाचा व कर्तृत्वाचा हैदरावर असा पगडा पडला की, त्याने पेशवा हजर असलेल्या स्वारीत पुनः समोरासमोर झगडण्याचे धाडस केले नाही.[4]

हैदरास शरण कसा आणावयाचा याबद्दलचा मराठ्यांनी आराखडा तयार केला. त्याची बिदनुरावरून येणारी रसद तोडली. त्याच्या छावणीबाहेरच्या वाटा तोडलेली झाड वाटेवर वेडीवाकडी ठेवून दुर्गम केल्या.

---

१. खरे भाग २, पृ. ४७४, ४७५.

२. पे. द. ७, ले. ४४, ४५, ४७.

३. खरे भा. २, पृ. ५२२.

४. किता, ५०९, ५१० ; पे. द. ३७, ले. ५४, ५५.

मराठ्यांचा हा डाव हैदराने ओळखला आणि सन १७६५ मधील जानेवारीत थोड्या लोकानिशी छावणीबाहेर निसटून तो बिदनुरास पोचला. त्यास जेरीस आणून खुद्द बिदनुरातच त्यास कायमचा बुडविण्याची तयारी पेशव्याने केली असता आयत्या वेळी दादासाहेबाने येऊन जणू त्याचा बचाव केला हे कसे ते पाहू.[१]

ह्या स्वारीच्या हकीगतीत माधवराव पेशवे आपला चुलता दादासाहेब यास नाशिकास वारंवार लिहित होते. दादाने नाशिकास राहून अधिक उचापती करू नये म्हणून माधवरावाने त्यांना मुद्दाम आपल्याजवळ कर्नाटकास बोलाविले. १७६४ चा दसरा होताच दादासाहेब पांच-सात हजार फौज बरोबर घेऊन नाशिकाहून टोक्यास व तेथून पैठणास गेले. तेथून आपला अधिकार गाजवित जवळ जवळ तीन महिन्यांनी कर्नाटकास पोहोचले. दिनांक २७ जानेवारी १७६५ रोजी चुलत्या पुतण्यांच्या हरपनहळ्ळीस भेटी झाल्या. नंतर चुलते-पुतणे बिदनुरावर गेले. यावेळी तहाची बोलणी लाविली होती. मराठे सरदारांच्या मते तह न करता मोठी लढाई देऊन हैदरास कायमचा बुडवावा असे होते. त्यामुळे श्रीरंगपट्टणपावेतोचा तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील सर्व प्रांत पूर्णपणे मराठ्यांच्या ताब्यात आला असता. परंतु दादासाहेब आल्याने त्यांच्या हाती या लढाईची सूत्रे गेली. दादांनी युद्ध थांबवून तहाच्या बोलण्यास अनुकूलता दर्शविली. वडिलांची मर्जी जाते म्हणून माधवरावांनी दादांच्या ह्या कृत्यास विरोध केला नाही. वाटाघाटी होऊन हैदराशी मीर फैजुल्या-मार्फत तह ठरला. त्यातील अटी अशा : (१) तीस लक्ष रुपये हैदराने मराठ्यांस द्यावे ; (२) बंकापूर वगैरे तुंगभद्रेच्या उत्तरेकडील सर्व मुलूख द्यावा ; आणि (३) मुराररराव घोरपडे आणि सावनूरकर यांचे तालुके हैदराने परत करावे. मेघश्यामराव पटवर्धन कैदेत होते त्यास सोडवून आणिले. या तहास अनंतपूरचा तह असे म्हणतात. या तहाने हैदराला जीवदान मिळाले. शेवटी माधवरावास या तहास मान्यता द्यावी लागली. बंकापूर पेशव्यास मिळाले व हैदराकडे बसवापट्टण राहिले, तसेच सावनूर व गुत्ती ही दोन संस्थाने मराठ्यांच्या ताब्यात आली. रघुनाथरावानी हैदराशी जो तह केला त्याची बोलणी त्यांनी नारो शंकरमार्फत लाविली होती. माधवरावानी एकदा दादांच्या हाती स्वारीची सूत्रे दिल्यावर दादांच्या इच्छेप्रमाणे होणाऱ्या सर्व गोष्टीस त्यानी मान्यता दिली. कर्नाटकातून परत येतांना तेथील मुलुखाची व्यवस्था राखण्यास कर्नाटकात गोपाळराव पटवर्धन, विठ्ठल शिवदेव व रास्ते यास ठेविले. जुलै १७६५ अखेर चुलते-पुतणे पुण्यास परत आले.

## जानोजी भोसले व रघुनाथराव यांचे बखेडे

**नागपूरकर भोसले – जानोजी याजवर चढाई :**

नागपूरकर भोसल्याची तुटक वृत्ती––रघुजी भोसल्यांच्या पश्चात नागपूरकर भोसले कुटुंबात कलह सुरू झाला आणि त्या सर्व बंधूंची पेशव्यांशी

१. पे. द. ३७, ले. ५१, ५७.

तेढ उत्पन्न झाली. प्लासीच्या लढाईने बंगाल प्रांत हातचा गेला. तो मिळविण्यासाठी त्यांनी यत्किंचितही हालचाल केली नाही. उलट सातारच्या छत्रपतींची गादी बळकावून पेशव्यांच्या घरात बेबनाव उत्पन्न करण्याचे राजकारण हे भोसले बंधू निजामाशी सख्य जोडून करू लागले. भोसल्यांच्या निष्क्रीयपणाचा फायदा इंग्रजांनी घेतला. त्यांनी पाटणा शहर काबीज केले आणि भोसल्यांनी जिंकलेला प्रदेश बळकाविला. तरी तो मिळविण्याचा प्रयत्न न करता ते आपल्या घरगुती भांडणातच मश्गुल राहिले. पेशव्यांचा द्वेष हे भोसले पदोपदी करत होते. त्यांनी १७६२ मध्ये निजामास सामील होऊन पुणे जाळण्यास त्यास सक्रीय मदत केली. तेव्हा पेशव्याने वऱ्हाडातील काही मुलुखाची लालूच दाखवून त्यास निजामापासून फोडून आपल्या पक्षात आणविले. हैदरावरील स्वारीत पेशव्यानी भोसल्यास कर्नाटकात बोलाविले असता लटक्या सबबीने भरलेली पत्रे नागपुरातून लिहून कालहरण केले. याचे कारण जानोजी पेशव्यांचा मनातून द्वेष करीत होता हे होय. इतकेच नव्हे, तर पेशव्याविरुद्ध लढण्यास हैदरास जानोजी आतून फूस देत होता हे पेशव्यास कळले.[1] जानोजी एवढे करूनही न थांबता त्याने शिंदे, होळकर, जयपूरचा माधवसिंग याजबरोबर पेशव्यांचा पाडाव करण्यासाठी संधान जोडिले. खुद्द पुण्यास आपला वकील बाबूराव रायाजी यास पाठवून त्याजतर्फे पेशव्याविरुद्ध कारस्थाने रचीत होता. पेशव्याने ह्या सर्व गोष्टींचा निकाल लावण्यासाठी त्याच्या वकिलातर्फे जानोजीस निरोप पाठविला की, "तुमच्याने हजार राऊतानिशी यावयाचे असेल तर यावे. आपले येणे होत नसेल तर, पेशवे रावसाहेब फौजेसह वऱ्हाडात चालून येतील." या पत्राने जानोजी गडबडून गेला आणि पुण्यास येण्यास निघाला. तेव्हा त्यास खबर कळली की, पेशवे आपल्यावर चालून येत आहेत. ते भेटीच्या वेळीस दगा करण्यास चुकणार नाहीत असा इशारा त्याचा कारभारी देवाजीपंत यांजकडून जानोजीस पोचताच तो परत वऱ्हाडात गेला आणि युद्धाची तयारी करू लागला.[2] जानोजीने राघोबा दादाकडे संधान बांधून त्याचे साह्य आपल्यास मागितले होते. पण पेशव्यानी हे जाणून राघोबाची नेमणूक उत्तर हिंदुस्थानाच्या स्वारीवर अगोदरच केली होती. त्यामुळे राघोबादादास उत्तरेच्या स्वारीस निघणे भाग पडले. निजामअल्लीचा कारभार त्याचा धाकटा भाऊ मीर मोगल उर्फ रुकनदौला हा पहात होता. त्याच्याशी पेशव्याने स्नेह जोडून जानोजीवर चढाई करण्याचे ठरविले. यावेळी निजामाचे आणि भोसल्यांचे वाकडे येण्यास कारणही असेच घडले. राक्षसभुवनाच्या लढाईत भोसले आपला पक्ष सोडून शत्रू पक्षास मिळाले आणि पुढे तहात वऱ्हाड बळकावून आपणास तोंडघशी पाडले. हे निजामास सहन झाले नाही. तसेच १७६४ च्या पावसाळ्यात निजामाचा वऱ्हाडातील सरदार मोरो धोंडोजी याचा जानोजीने पाडाव केला. याचा निजामास राग येऊन त्याने जानोजीवर

१. पे. द. २८, ले. १५१.
२. पेठे द. भा. १, ले. ३५, ३७, ४०.

स्वारी केली. आणि तहात ठरल्याप्रमाणे जानोजी विरुद्ध पेशव्याची मदत मागितली. राक्षसभुवनानंतर जानोजीस मिळालेला निजामाचा मुलूख जिंकून घेऊन तो निजामास परत द्यावयाचा असे निजाम आणि पेशवे यांनी ठरविले.[१] माधवराव १३ ऑक्टोबर १७६५ रोजी पुणे सोडून स्वतः स्वारीवर वऱ्हाडाकडे निघाले. पेशव्यांनी आपले धोरण समजावून देण्यासाठी आपला वकील रामाजी बल्लाळ गुणे यास पुढे जानोजीच्या भेटीस पाठविले. दादासाहेब आपल्या सैन्यानिशी नाशिकहून निघून बाळापूर येथे पेशव्यास मिळाले. निजामाचा कारभारी रुकनदुल्ला आपल्या सैन्यासह पेशव्यास गोदा तीरी येऊन मिळाला. निजाम स्वतः वऱ्हाडच्या दिशेने चालून गेला.[२] जानेवारी १७६६ च्या अखेरीस निजामाचे सैन्य नागपूरच्या जवळ आले.[३] जानोजीने युद्धाची तयारी केली होती. पण एवढ्या मोठ्या भारी फौजेपुढे टिकाव लागणार नाही हे जाणून त्याने पेशव्याकडे तहाची बोलणी लावून कृपेची याचना केली. दादानेही अत्यंत काकुळतीने रदबदली केली. पेशव्यांनी दादांच्या म्हणण्यास मान देऊन शरण आलेल्या भोसल्यास भेटीस बोलाविले. दिनांक १८ जानेवारी १७६६ रोजी जानोजी व पेशवे यांच्या भेटी दर्यापूर मुक्कामी झाल्या. पुढे बोलणी व वाटाघाटी होऊन अमरावती जवळ सोलापूर येथे तह होऊन लढा मिटला. भोसल्याने २४ लक्षाचा मुलूख पेशव्यास परत द्यावा, त्यापैकी पेशव्याने १५ लक्षाचा मुलूख निजामास देऊन बाकीचा नऊ लक्षाचा आपणास ठेवावा आणि भोसल्याने इतउत्तर आपल्या सर्व फौजेनिशी पेशव्याचे स्वारीत हजर असावे याप्रमाणे तह ठरला.[४] जानोजी भोसल्याचा तीन कारणास्तव पेशव्याने उच्छेद केला नाही.[५] जानोजी भोसले दाती तृण धरून शरण आला. पेशव्यांनी जानोजीवर मर्जी राखावी, म्हणून होळकराने लिहिले होते. शिवाय भोसले पेशव्यांचा तह घडून दादासाहेब यास हिंदुस्थानच्या स्वारीवर जावयाचे होते. जानोजी भोसल्याने हिंदुस्थानच्या स्वारीवर येण्याचे प्रथम कबूल केले व नंतर दादांबरोबर आपले सैन्य पाठविले. पेशवे-जानोजी संघर्षात ज्या सरदारांनी जानोजीचा पक्ष धरला होता त्यास पेशव्यानी शिक्षा ठोठाविल्या.[६]

पंधरा लक्षाचा मुलूख देऊन मोगलांशी कायमची दोस्ती करण्याचा इरादा पेशव्यांनी दाखविला व यापुढे दक्षिण प्रांती मोहिम झाल्यास उभयतांनी मिळून करावी व आपआपले कार्य साधून घ्यावे असे या समयी उभयपक्षी ठरले.

---

१. पे. द. २०, ले. १६९, १६८.
जानोजी म्हणतो माझा मुलूख निजामास देऊन पेशवे सापास दूध पाजत आहेत.

२. कित्ता, ले. १७२.

३. कित्ता, ले. १६४.

४. खरे, भा. ३, पृ. १०१४.

५. पे. द. २०, ले. १८५.

६. कित्ता, ले. १७८.

**इतर किरकोळ गोष्टी :**

भवानराव प्रतिनिधी पदभ्रष्ट झाल्यावर त्याने भगवंतरावाशी दावा आरंभून मुलुखात दंगा करण्यास सुरुवात केली. पेशव्यांनी त्याच्या बंदोबस्तास रामचंद्र गणेश या सरदारास पाठविले. त्याने भवानरावास गाठून त्याचा पूर्ण पराभव केला. तेव्हा निरुपाय होऊन भवानराव पेशव्यास शरण गेला. पेशव्यांनी त्यास पटवर्धनांच्या मध्यस्तीवरून पन्नास हजार रुपयाची नक्त नेमणूक देऊन पुण्यास ठेवून घेतले व पुढे पाच लक्ष उत्पन्नाचा सरंजाम त्यास नेमून दिला.



## माधवराव पेशवें

## कालसूची

| | |
|---|---|
| १७५९, ऑगस्ट . . | प्राइस व त्याचा सहकारी थॉमस मॉस्टीन हे इंग्रज वकील मराठ्यांच्या दरबारी येतात. |
| १७६१ . . . . | इंग्रजांशी तह करण्यात पुढाकार घेतलेला गोविंद शिवराम यास मॉस्टीन भेटतो. |
| १७६२ . . . . | पासून दादासाहेब व माधवराव या चुलत्या पुतण्यात बेबनाव सुरू होतो. |
| १७६३ . . . . | इंग्रज मीर कासीमअल्ली या सुभेदारास सुभेदारीवरून दूर करतात. |
| १७६३, डिसेंबर . . | जाट राजा सूरजमल व नजीबखान यामध्ये युद्ध होऊन सूरजमल त्यात मारला जातो. |
| १७६५, मे ३ . . . | इंग्रजांची कवायती फौज सुजाउद्दौला व मीर कासीमअल्ली यांचा कोटा येथे पराभव करते. |
| १७६५, ऑगस्ट २ . . | दुसरा शहाअलम इंग्रजांस बंगाल, बिहार व ओरिसा या तीन प्रांतांची सनद देतो. |
| १७६५, सप्टेंबर. . . | बादशहा नजीबखान रोहिल्यास जाटांविरुद्ध मराठ्यांकडे मदत मागण्यासाठी पाठवतात. |
| १७६५ . . . . | पेशव्यांनी जानोजीस जो आठ लाखाचा मुलूख दिला होता तो जानोजी परत करतो. |
| १७६५ . . . . | जानोजी भोसले यास वठणीवर आणण्यासाठी माधवराव पेशवे निजामाच्या मदतीने भोसल्यावर स्वारी करतात. |
| १७६५, डिसेंबर . . | मोहरचा जाट मराठ्यांविरूद्ध कहर मांडतो. |
| १७६५ . . . . | हैदरावर मराठे स्वारी करून त्याच्याशी सख्य करतात. |
| १७६६ . . . . | रजपूत व शेखावत या जमातींचा बंदोबस्त करीपर्यंत मराठ्यांस १७६६ साल उजाडते. |

| | |
|---|---|
| १७६६, फेब्रुवारी . . | निजामअली व त्याचा पुत्र पंधरा हजार फौज व तोफखाना व गार्दी यांसह पेशव्यास सामील होतात. |
| १७६६, मार्च . . . | निजाम अनेगुंडी आणि चित्रदुर्ग या स्थळी पोहोचतो. |
| १७६६, एप्रिल . . . | निजाम मदगिरीवर येतो. |
| १७६६, मे २० . . . | मल्हारराव होळकर स्वर्गवासी होतात. |
| १७६६, जून . . . | हैदर मद्रास गव्हर्नरास दोस्तीसाठी पत्र लिहितो. |
| १७६६, जून ते १७६७, जून . . | हैदरावर पेशव्यांच्या तीन स्वाऱ्या होतात. |
| १७६६, जुलै . . . | मुंबईकर इंग्रज हैदरास दोस्तीचे पाचारण करतात. |
| १७६६, नोव्हेंबर . . | हैदर अट घालतो की, प्रसंगी एकमेकांनी पंधरा हजार फौजेची मदत करावी. |
| १७६६, नोव्हेंबर . . | माधवराव पेशवे सुरापुरकराकडून खंडणी वसूल करतात. |
| १७६६, डिसेंबर . . | हैदरने मराठ्यांच्या कर्नाटकातील संस्थानिकांकडून खंडणी वसूल केल्याची बातमी येते. |
| १७६६, डिसेंबर . . | पेशव्यांच्या सांगण्यावरून निजाम कर्नाटकच्या स्वारीवर जातो. |
| १७६७ . . . . | मराठे हैदराचा पाडाव करतात. |
| १७६७, जानेवारी १६ . | निजामअल्ली व इंग्रज एकमेकांशी दोस्तीचा तह करतात. |
| १७६७ . . . . | इंग्रज मराठ्यांशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करतात. |
| १७६७, फेब्रुवारी . . | दादा चमेलीवरून परत फिरतात. |
| १७६७ . . . . | जानोजी घोडपच्या लढाईत रघुनाथरावांचा पक्ष स्विकारतात. |
| १७६७, मार्च २७ . . | अहिल्याबाई पुत्र भालेराव यांचा मृत्यू. |
| १७६७, एप्रिल . . . | रॉड नावाचा इंग्रज गृहस्थ पेशवे दरबारात येतो व त्याला तेथील वातावरण इंग्रजास अनुकूल असें दिसते. |
| १७६७, एप्रिल . . . | पेशवे देवनहळ्ळी, होसकोट, नंदीगड व कोठार ही ठाणी आपल्या ताब्यात घेतात. |
| १७६७ . . . . | अबदाली पंजाबवर चालून आले असता शिंदे त्याचा दणदणीत पराभव करतात. |
| १७६७, एप्रिल २९ . . | निजामास सामील करून इंग्रज म्हैसूरवर स्वारी करतात. |
| १७६७, मे . . . | पेशवे कर्नाटकात गोपाळराव रास्ते यांची नेमणूक करतात. |
| १७६७, जून २८ . . | स्वतः पेशवे पुण्यास येऊन रहातात. |
| १७६७, ऑगस्ट . . | इंग्रज म्हैसूरकरांशी युद्ध सुरू करतात. |
| १७६७ . . . . | च्या मध्यास पेशवे आपला वकील इंग्रजांकडे पाठवतात. |
| १७६७, नोव्हेंबर २९. . | थॉमस मॉस्टीन पुण्यास पेशवे दरबारी येतो. |
| १७६७, डिसेंबर १४. . | जयपुरचा राजा जवाहरमल जाटाचा दणदणीत पराभव करतो. |

| | |
|---|---|
| १७६७, डिसेंबर २१ . . | जयपुरचा राजा माधोसिंग मरण पावतो. |
| १७६८ . . . . . | मराठ्यांच्या मदतीने दिल्लीस जावे हा शहा अलमचा बेत होता तो महादजी शिंद्यांच्या मदतीने पांचाली किल्ल्यावर पक्का झाला. |
| १७६८, जानेवारी ५ . . | मॉस्टीन हा पाचव्यांदा पेशव्यांची मुलाखत घेतो. |
| १७६८, फेब्रुवारी २३ . | हैदरास सोडून निजाम मद्रासच्या इंग्रजांशी नवीन तह करतो. |
| १७६८, फेब्रुवारी २७ . | थॉमस मॉस्टीन तीन महिने राहून पुणे सोडतो. |
| १७६८, मार्च . . . | पर्यंत गोपाळराव मराठ्यांनी ताब्यात आणलेल्या प्रांतातून खंडणी वसूल करतात. |
| १७६८, जुलै . . . | जवाहरमल जाटाचा एक नोकर संतापून खून करतो. |
| १७६८ . . . . . | माधवरावांनी, दादांनी बंडखोर म्हणून जाहीर केलेल्या महादजी शिंद्यास दौलतीची वस्त्रे पाठविली. |
| १७६८, ऑगस्ट १८ . . | दमाजी गायकवाड यांचा मृत्यू. |
| १७६८, सप्टेंबर. . . | पर्यंत सैन्याची जमवाजमव करण्याच्या उद्देशाने जानोजी युद्ध लांबवितात. |
| १७६८ . . . . . | माधवराव पेशवे जानोजीवर दुसरी स्वारी करतात. |
| १७६८, नोव्हेंबर . . | इंग्रज वकील ब्रूम यास मराठ्यांनी हैदराचा पक्ष धरल्याचा कळते. |
| १७६८, डिसेंबर ११. . | मॉस्टीन पेशव्यांची दुसऱ्यांदा भेट घेतो. |
| १७६९, जानेवारी १ . . | इंग्रजांचे सर्व तर्क निष्फळ ठरतात. |
| १७६९, एप्रिल ४ . . | पर्यंत तब्बल दोन वर्षे हैदर व इंग्रज यांची लढाई. |
| १७६९ . . . . . | रामचंद्र गणेश, महादजी शिंदे आणि तुकोजी होळकर पावसाळा संपताच जाटांच्या समाचारासाठी जातात. |
| १७६९, एप्रिल . . . | पेशवा व जानोजी यांच्या भेटी होऊन कनकपुरा येथे तह होतो. |
| १७७०, जानेवारी . . | पेशव्यांचा म्हैसूर प्रांतात शिरकाव. |
| जानेवारी-फेब्रुवारी . . | पेशवे बुंदेहाल, कंदीकिरे, होदीकिरे, चिकनाईकहल्ली, भैरवदुर्ग, नागमंगल, बालापूर आदि किल्ले घेतात. |
| १७७०, फेब्रुवारी १ . . | पेशवे बनगिरीवर रहातात. |
| १७७०, एप्रिल २ . . | मराठे निजगलच्या किल्ल्यास वेढा देतात. |
| १७७०, एप्रिल . . . | मराठे यमुना पार होऊन फरुकाबादच्या अहमदखान याच्या मुलखात येतात. |
| १७७०, एप्रिल २९ . . | निजगलचे किल्ल्यावर वेढा चढवताना नारायणराव पेशवे जखमी होतात पण किल्ला पेशवे जिंकतात. |
| १७७०, मे ९ . . . | बादशहा शहा अलम बंगालच्या गव्हर्नरास आपण दिल्लीस जाण्यास उत्सुक असल्याचे एक लांबलचक पत्र लिहितो. |
| १७७०, मे १३ . . . | पेशवे कर्नाटकच्या स्वारीतून परत निघतात. |

| | |
|---|---|
| १७७०, मे २५ . . . . | कोप्पल गावाजवळ सूर्य ग्रहणाच्या दिवशी स्वत:ला पेशवे सुवर्णतुला करवतात. |
| १७७०, जून १३ . . . | पेशवे पुण्यास परततात. |
| १७७०, ऑक्टोबर . . | नजीबखान मृत्यू पावतो. |
| १७७०, ऑक्टोबर ३१ . | नजीबउद्दौला मराठ्यांच्या लष्करातून आपल्या घरी जात असता वाटेत मरण पावतो. |
| १७७०, डिसेंबर २७. . | महादजीच्या पत्रावरून बादशहाने सैफुद्दीन अहमदखान नावाच्या हस्तकास करार करण्यासाठी मराठ्यांकडे पाठविले. |
| १७७१ . . . . . | च्या सुरवातीस हैदर श्रीरंगपट्टणात असतो. |
| १७७१, जानेवारी . . | गोपाळराव फौजेतून निघून प्रकृती स्वास्थ्यासाठी मिरजेस येतात. |
| १७७१, जानेवारी ११ . | गोपाळरावांची फौज वामनरावांच्या अधिपत्याखाली त्रिंबकरावमामांच्या मदतीस येते. |
| १७७१, फेब्रुवारी ६. . | प्रयाग सोडून दिल्लीचा बादशहा फरुकाबादेस येतो. |
| १७७१, फेब्रुवारी ९. . | बादशहा दिल्ली किल्ल्यावर मारा करून दिल्ली ताब्यात घेतो. |
| १७७१, मार्च १० . . | मराठे हैदराविरुद्ध श्रीरंगपट्टणास जाऊन मोर्चे लढवितात. |
| १७७१, मार्च १७ . . | त्रिंबकरावमामा हैदरावर तोफांचा मारा सुरू करतात. |
| १७७१, एप्रिल १८ . . | त्रिंबकरावमामा पट्टणचा वेढा उठवून मेलकोटचास आणतात. |
| १७७१, मे . . . . | रोहिल्यांचा पुढारी हाफीज रहमत हा लढाईतून पळ काढतो. |
| १७७१, जून ७ . . . | रास्ते यास मागे ठेवून जाण्याविषयी त्रिंबकरावमामास हैदराकडून निरोप येतो. |
| १७७१, सप्टेंबर १७ . . | त्रिंबकराव थेऊर येथे पेशव्यास येऊन भेटतात. |
| १७७१, नोव्हेंबर २९. . | मंगरोळ व भाटवाडा यांच्यामध्ये दोन दिवस युद्ध चालले. |
| १७७२, जानेवारी ६ . | बादशहा दिल्लीस पोहोचतो. |
| १७७२ . . . . . | च्या प्रारंभी बादशहा व मराठे सरदार यांच्या फौजा एकत्र होऊन जाबितखानाचा सूड घेण्यास सज्ज होतात. |
| १७७२ . . . . . | माधवराव पेशवे लोकांच्या आग्रहास्तव दादांची सुटका करतात. |
| १७७२, सप्टेंबर ३० . . | दादांच्या आग्रहास्तव माधवराव थेऊरास नऊ कलमी लेख पुरा करतात. |
| १७७२, मे . . . . | जानोजीचा मृत्यू, मरेपर्यंत पेशव्यांशी एकनिष्ठ. |
| १७७२, नोव्हेंबर १८. . | माधवराव पेशव्यांस देवाज्ञा होते. |
| १७७३ . . . . . | तुकोजी होळकर व विसाजीपंत तोफखान्यासह रोहिल्यावर चाल करतात. |

# १४

## माधवराव पेशवे

(१७६६-७२)

**हैदरावरील तिसरी स्वारी (सन १७६६ जून ते १७६७ जूनपर्यंत) :**

मागील वर्षी कर्नाटकच्या स्वारीहून परत येताना पेशव्यांनी कर्नाटकात गोपाळराव पटवर्धनास छावणीस ठेविले होते. आनंदराव रास्ते कडपे व कर्नूल येथील नवाब व मुरारराव घोरपडे हे सर्व गोपाळरावाच्या कुमकेस आले होते. गोपाळरावाने पूर्वी ठराव झाला होता त्याप्रमाणे हरपनहल्ली, चित्रदुर्ग, रायदुर्ग व बल्लारी वगैरे तमाम संस्थानांपासून खंडण्या वसूल केल्या. तुंगभद्रा तीरास येऊन अनागोंदी, कनकगिरी, केंचनगुड या संस्थानांच्या खंडण्या घेतल्या. तेथून पंचमहालात जाऊन चितापूर, यादगिरी, सुरापूर येथील खंडण्या घेऊन पावसाळा सुरू होण्यापूर्वीच तो मिरजेस येऊन दाखल झाला होता.[1] दरम्यान पेशवा निजामाशी वाटाघाटी करून त्याचे सहाय्य घेऊन हैदरावर स्वारी करण्याच्या बेतात होता. पेशव्याचा हैद्राबाद येथील वकील धोंडो राम हा निजामअल्ली व रुकनुद्दौला या दोघांच्या गाठीभेटी घेऊन त्यांचे मनामधील पेशव्यांसंबंधीचे अपसमज घालवून देण्याचा प्रयत्न करीत होता.[2] पेशव्याने निजामास भेटून १५ लाखाचा मुलूख दिला,[3] ह्यावेळी कोणत्याही प्रकारचा करार झाला नाही. पण मुलाखतीत हैदरावर संयुक्त स्वारी करावयाची हे बोलणे होऊन ह्यावर एकमत झाले होते.

हैदरचे ह्या घटनांकडे लक्ष होते. ह्या दोन प्रबळ शत्रूंच्या संकल्पित स्वारीविरुद्ध हैदराने इंग्रजांच्या दोस्तीसाठी प्रयत्न केला. जून १७६६ मध्ये त्याने मद्रास गव्हर्नरास लिहिले की, माझेजवळ जेवढी फौज आहे तेवढीच तुमच्याकडेही आहे. दोन्ही फौजा मिळून जर आपण निजाम व मराठ्यांच्या सैन्यावर चढाई केली तर त्याजपुढे त्यांच्या सैन्याचे काहीच चालणार नाही मुंबईकर इंग्रजांनी जुलै १७६६ मध्ये हैदरास आपल्याशी दोस्तीचा तह करण्यास पाचारण केले. अनेक अटी घातल्या व व्यापाराकरिता सवलतीही मागितल्या. शिवाय हैदराने अर्काटचा नवाब व त्रावणकोरचा राजा यापैकी

१. खरे, भा. ३, पृ. १०१६.

२. पे. द. २८, ले. १५७, १५८, १८९.

३. कित्ता ले. १५९, १६६, १६७.

कोणावरही हल्ला करू नये अशा अटी घातल्या. नोव्हेंबर १७६६ मध्ये हैदराने ही अट गाळून लिहिले की, ज्यावेळी कंपनी सरकारला फौजेची गरज असेल किंवा आपल्या सरकारला कंपनी सरकारच्या फौजेची गरज असेल तर प्रत्येकाने एकमेकास पंधरा हजार फौज जरूर लागेल त्यावेळी पुरवावी. पण इंग्रजांनी ह्या अटी कबूल केल्या नाहीत. इंग्रजांचा हेतू राज्य संपादनाचा होता. मात्र ते राज्य त्यास लढाईच्या दगदगीत, खर्चात व धोक्यात शक्य तो न पडता जितके मिळेल तितके अवश्य पाहिजे होते. दक्षिणेकडे त्याचे लक्ष साष्टी बेट मिळविण्यावर होते. कारण ते मराठ्यांच्या ताब्यात होते. दुसरे म्हणजे पूर्व समुद्राच्या किनाऱ्यावरील उत्तर सरकार या नावाखाली मोडणारे पाच परगणे गुंतूर, सिकाकौल, राजमहेंद्री वगैरे. ते पाच परगणे मद्रासनजीक असून निजामअल्लीच्या राज्यात होते. ते परगणे आम्हास मक्त्याने द्या असे इंग्रज निजामअल्लीस सांगत होते. त्याने साफ नकार दिल्यावर इंग्रजांनी राजमहेंद्री परगणा बळजबरीने ताब्यात घेतला. निजामास याचा फारच राग आला पण इंग्रजांचे किंवा हैदरचे पारिपत्य करण्याचे सामर्थ्य एकट्या निजामात नव्हते म्हणून त्याने मराठ्यांशी सलोखा केला. ही बातमी इंग्रजास समजताच मराठे-निजाम सैन्याचा पाडाव करण्याकरिता हदराची मदत मिळाल्यास त्यांना हवी होती. पण हैदर त्यांना वर उल्लेखिलेल्या भलत्याच अटी घालू लागला. म्हणून ते दोस्तीकरिता निजामअल्लीकडे वळले. निजामअल्लीने सलोख्याचे बोलणे इंग्रजांशी करून एक दोस्तीचा तह केला. त्यात असं ठरले की, इंग्रजांनी राजमहेंद्री वगैरे परगणे घेतले आहेत ते त्याजकडे जहागीर म्हणून कायम रहावे व त्याबद्दल त्यांनी दोन पलटणे व सहा तोफासह निजाम सांगेल ती चाकरी हरहमेषा करीत जावी. शिवाय पावसाळा संपल्यावर दोघांनी आपापल्या फौजा गोळा करून हैदरावर स्वारी करून त्याचे राज्य वाटून घ्यावे अशा प्रकारचा हा जानेवारी १६, १७६७ चा तह ठरला. या तहात इंग्रज व निजाम यांनी अशी गुप्त मसलत केली होती की, हैदर बुडविल्यावर मराठ्यांसही बुडवावे. कारण इंग्रजांच्या डोळ्यात हैदरापेक्षा मराठे जास्त सलत होते. इंग्रज-निजामाचा सलोखा झाला हे माधवराव पेशव्यास आवडले नाही. त्याने ह्या युतीपासून आपणास पुढे धोका होणार हे जाणले म्हणून हैदराचे पारिपत्य करण्यास इंग्रज व निजामाची मदत न घेता स्वसामर्थ्यावरच मोहिम करण्याचे ठरविले.

इतक्यात कर्नाटकातून सन १७६६ डिसेंबरात बातम्या आल्या की हैदर चित्रदुर्ग, रायदुर्ग, बेलारी, हरपनहल्ली आदि मराठ्यांच्या ताब्यातील संस्थानिकांकडून जबरदस्तीने खंडणी घेऊन गेला.[१] ह्या संस्थानिकांनी पेशव्यांना मदतीसाठी खलिते पाठविले. म्हणून पेशव्याने मिरज येथे असलेले आपले सरदार गोपाळराव पटवर्धन यास दसऱ्यास मिरजेपासून निघून स्वारीवर जाण्यास सांगितले. गोपाळराव पटवर्धनांबरोबर आनंदराव रास्ते, नरगुंदकर भावे व दौलतराव घोरपडे हेही सरदार कर्नाटकात स्वारीस गेले.

---

१. खरे. भा. ३, ले. ६१२, ६४०, ६४३.

पेशव्यांनीसुद्धा स्वतः स्वारीवर निघण्यासाठी पुण्यास जय्यत तयारी केली आणि सोलापूरच्या रोखे बरोबर नारायणराव, दादा, फडणीस व हरिपंत फडके यांना घेऊन निघाले. नोव्हेंबरात सुरापुरकराकडून खंडणी वसूल केली. बाबूजी नाईक अंतस्थ रीतीने हैदराशी संगनमत ठेवीत होता.[1] त्याजकडून सोलापूरचा किल्ला सरकारात घेतला. जानेवारी १७६७ मध्ये कृष्णा उतरून त्यावर पेशव्यांच्या फौजेस गोपाळरावांची फौज मिळाली. त्यानी जेतगी, कित्तूर, कांचनगड, गोडवाल, बेलारी, सिदनूर, अदोनी आणि देवदुर्ग हीं स्थळे जानेवारी अखेरपर्यंत घेतली.[2] इंग्रजांशी दोस्ती केल्यामुळे निजाम आपल्या मदतीस येणार नाही हे पेशव्यास ठावूक होते. तेव्हा पेशव्याने निजामाच्या मदतीची वाट पाहिली नाही. निजामअल्लीचा कित्ता सावनुरच्या नबाबाने गिरविला. त्यानेंही मनापासून ह्या मुलूखगिरी स्वारीत पेशव्यास मदत केली नाहीं.[3] लहान संस्थानिकांपासून १ ते ३ लाख व मोठ्या संस्थानिकांपासून ५ ते १० लाख अशा खंडण्या वसूल केल्या. याप्रमाणे एका महिन्यात पंचवीस लाख रुपये खंडणी जमा केली. देवदुर्गच्या मुक्कामी पेशव्याने तमाम सरदारांचे गोट तपासून लष्कराच्या गणत्या घेतल्या. तेणे-करून त्या सरदारास मोठी दहशत उत्पन्न झाली. शिस्त सुधारली. यामुळे लहानमोठे सर्व लोक पेशव्यांपुढे कापू लागले. पेशव्यांची आपल्यावर स्वारी होणार हे हैदरास ठावूक होते. त्याने बंगलोर, शिरे, बिदनूर ही ठिकाणे लढविण्याचा बंदोबस्त करून स्वतः श्रीरंगपट्टणात फौजेसह राहिला. मरा-ठ्यास उघड्या मैदानात तोंड देण्याची शक्ति आपल्यात नसल्याचे जाणून आपल्या मुलुखातून मराठे पुढे चाल करून येत असता त्यास दाणा, वैरण व पाणी मिळू नये म्हणून त्याने आपला मुलूख श्रीरंगपट्टणास येताना बेचिराख केला.[4] पण मराठ्यांचे सैन्य एवढे अफाट होते की, ते या उपायांनी आपल्यावर चाल करून येण्याचे थोडेच थांबणार? हे हैदरास ठावूक होते. म्हणून त्याने पुण्यास आपल्या वकिलास पेशव्यांची गाठ घेऊन तहाची बोलणी करण्यास सांगितले होते. पेशव्याने त्यास कळविले होते की, तुम्ही मुराररावास उपद्रव न देता त्याची घेतलेली ठाणी सोडून द्यावी. शिरा, सोंधा, चित्रदुर्गकर आदि संस्थानिकास उपद्रव देऊ नये व त्यांजपासून खंडण्या घेऊ नये व पाऊण कोट रुपये खंडणी द्यावी. पेशव्यांच्या अटी हैदरास पसंत पडल्या नाहीत. फेब्रुवारीत निजामअल्ली व त्याचा पुत्र पंधरा हजार फौज, तोफखाना व गार्दी यासह पेशव्यास सामील झाला. मराठ्यांनी या वेळी विचार केला की, हैदराच्या ताब्यातील शिरे जिंकून घेतल्याशिवाय हैदर काही आपल्याला शरण येत नाही. तेव्हा त्यांनी शिरे किल्ल्यास मोर्चे लाविले. शिरे किल्ला हैदराचा मेहुणा मीर रेझा याच्या ताब्यात होता. त्याने आपल्या पराक्रमाची

---

१. पे. द. ३९, ले. ७३.

२. खरे, भा. ३, ले. ६२४, ६२८, ६६४, ६६९-७१, पे. द. ३५, ले. १२२, १२८, १३०, १३३, १३४, १३५.

३. पे. द. ३७, ले. १२४.

४. खरे, भा. ३, पृ. १०५५.

शिकस्त केली. पण अखेरीस त्यास किल्ला मराठ्यांच्या ताब्यात द्यावा लागला. मीर रेझास माधवरावानें आपल्या चाकरीस ठेवून त्यास गुरंमकोंडचाचा परगणा व किल्ला जहागीर दिला. पेशव्यांच्या सैन्याचा तळ मदगिरीजवळ असता घोरपडे यांच्या लोकांनी मीर रेझाचे गोटावर अचानक छापा घालून त्याची सर्व जिंदगी लुटली. त्याबद्दल पेशव्याने अपराध्यास कडक शासन केले. प्रत्यक्ष मुराररावही माधवरावांच्या कडक शिस्तीस कापत होता.[१] शिरे घेतल्यावर सर्व संस्थानिकांवर वचक बसला.[२] मदगिरीचा किल्ला मार्चमध्ये मराठ्यांनी मोर्चे लावून घेतला. त्या किल्ल्यातच कैदेत असलेली बिदनूरकर राजा व त्याची आई यांना पेशव्याने सोडवून आपल्या गोटात आणिले. निरनिराळ्या तुकड्या करून त्या चिकबालापूर व मदकसिरे येथे पाठविल्या. पेशवा स्वतः चेन्नरायदुर्गावर चालून गेले आणि त्याचा ताबा घेतला.[३] गोपाळरावाने दोडबालापूर आदि ठाणी घतली.[४] मराठ्यांनी मारलेली मुसंडी लक्षात घेऊन हैदर तहाची बोलणी करण्यास सरसावला. विशेषतः मदगिरी किल्ल्याचे महत्त्व त्यास जास्त वाटत होते. तो किल्ला पेशव्याने आपल्या ताब्यात दिल्यास त्याबद्दल ३५ लाख रुपये खंडणी देण्याचे त्याने कबूल केले. पण पेशव्याने हा किल्ला परत देण्याचें नाकारून आणखीन ४० लाख रुपये मागितले.[५]

एप्रिल १७६७ मध्ये पेशव्यांनी देवनहळ्ळी, होसकोट, नंदीगड व कोलार ही ठाणी आपल्या ताब्यात घेतली. निजाम आपली आणखीन फौज घेऊन पेशव्यास येऊन मिळत आहे ही बातमी हैदरास कळताच त्याचे धाब दणाणल. त्याने पेशव्यांकडे वकील पाठवून गोपाळराव पटवर्धनातर्फे कळविले की, अर्काटचा महमद अल्ली व इंग्रज यांजविरुद्ध आपण संयुक्त लढाई देऊ. पेशव्याने उत्तर दिले निजाम आपला मित्र असून निजामाचा मित्र जो इंग्रज तोही आपला मित्र होय. आम्ही मंगलोरवर चाल करून जाऊ आणि निजाम श्रीरंगपट्टणला चाल करून जाणार. हे ऐकताच हैदराने आपले वकील मराठ्यांकडे पाठवून तहाचे बोलणे लाविले. ह्यावेळी पावसाळा समीप आलेला, पेशव्यांकडील पैशांची तरतूद संपुष्टात आलेली. शिवाय लढाई चालू ठेविल्यास आणि निजाम येऊन आपल्यास मिळाल्यानंतर तह झाल्यास विजयश्रीचा अर्धा वाटा आपसुख त्यास जातो. हे लक्षात घेऊन पेशव्याने हैदराबरोबर तहाची बोलणी लावण्यास संमति दिली.[६]

---

१. खरे, ६९२-७०६.

२. पे. द. २७, ले. १३३, १३४.

३. पे. द. ३७, ले. १४९, १५०, खरे भा. ३, ७०८.

४. कित्ता, ३, पृ. १०५९.

५. पे. द. ३७, ले १४४, १५३.

६. खरे, भा. ३, ७०६.

हैदराकडील वकील आपाराम व पेशव्यांतर्फे गोपाळराव यांमध्ये तहाच्या वाटाघाटी झाल्या. तह मे मध्ये ठरला.[१] त्याच्या अटी अशा: (१) चित्ररायदुर्ग, मदगिरी, दोडबालापूर आणि होस्कोटे ही ठाणी पेशव्यांनी आपलेकडे ठेविली; (२) शिरे, कोलार, चिकबालापूर आणि नंदीगड ही पेशव्यांनी जिकलेली हैदराची ठाणी हैदरास परत दिली; (३) कडप्पा आणि गुरुमकोंडा ही दोन मीर रेझाच्या ताब्यात रहावी; (४) हैदराने पेशव्यास ३१ लाख रुपये हप्त्याने देण्याचे ठरले;[२] (५) निजामास हैदराने दरसाल ६ लाख रुपयेप्रमाणे तीन वर्षे द्यावें.[३] पेशव्याने मे च्या आरंभी पुण्यास परतण्यास आपल्या सैन्यास हुकूम सोडिले आणि नवीन मिळविलेल्या प्रदेशाची देखरेख मुराररावाकडे लावून दिली.

### निजामाच्या हालचाली :

निजाम पेशव्यांच्या सांगण्यावरून डिसेंबर १७६६ मध्ये कर्नाटकाच्या स्वारीवर निघाला. बरोबर ३६,००० फौज होती. तसेच कर्नल स्मिथ होता. पण इंग्रजांचे तैनाती सैन्य अद्याप यावयाचे होते. त्याची एवढी गती मंद होती की, स्मिथला वाटले की, इंग्रजी पलटण येऊन मिळाल्याशिवाय निजाम कृष्णा नदी पार होणार नाही. पण या दरम्यान त्याने आपले वकील पेशव्यांकडे रवाना केले आणि हैदराच्या वकिलास भेटीस बोलाविले. तेव्हा त्याने निजामाने या युद्धात तटस्थ रहाण्याची किंमत बोलावी असा सवाल टाकला. निजामअल्लीच्या कारभाऱ्यासही ह्या वकिलाने लाच दिली असावी; कारण कारभारी निजामास सांगू लागला की, आतापर्यंत पावसाळा समीप येऊन ठेपला तर मग आताची स्वारी रद्द करून पुढील वर्षी जावे. फेब्रुवारीच्या अखेरीस सुद्धा निजामाकडे नियमबद्ध असा कार्यक्रम नव्हता. निजाम मार्चमध्ये अनेगुंडी आणि चित्रदुर्ग या स्थळी पोचला आणि एप्रिलमध्ये तो मदगिरीवर आला.[४] हैदर मराठ्यांच्या शांततेच्या वाटाघाटी सुरू असताच निजामाचा कारभारी रुकनुदौलाने पेशव्याबरोबर खाना घेतला.[५] पेशव्याने हैदराशी झालेल्या तहात निजामास जी खंडणी मिळण्याचे ठरविले होते त्याने निजामाचे समाधान झाले नाही. निजामाचा विचार असा की, पेशव्याने हैदराकडून आपल्यास जादा खंडणी देववावी. निजामाच्या या विचारास पेशव्याने संमति दिली नाही. तह ठरल्यावर पेशव्याने निजामास हैद्राबादेस परतण्यास सांगितले.[६]

---

१. पे. द. ३७, ले. १५८.

२. कित्ता, ले. १५८, १५९, १६१.

३. कित्ता, ले. १५८, खरे म्हणतात १४ लाख, खरे; भाग. ३, ले. ७२१.

४. कित्ता, ले. १४६, १५१, १५५.

५. कित्ता, ले. १५८, १५९.

६. कित्ता, ले. १६१,

**इंग्रज हैदरअल्ली युद्ध :**

ऑगस्ट १७५९ त प्राईस व त्याचा सहकारी थॉमस मॉस्टीन हे इंग्रज वकील मराठ्यांच्या दरबारी आले. ही इंग्रजांची पहिली वकीलात. त्यांनी बाणकोटच्या बदल्यात मराठ्यांकडून वसई, साष्टी किंवा करंजा मिळविण्याचा प्रयत्न चालविला. पण तो असफल झाला.

पानिपतच्या आपत्तीमुळे मराठ्यांचे सामर्थ्य थोडे खचले असता इंग्रज बंगाल व मद्रास किनाऱ्यावर आपली बाजू भक्कम करीत होते. थोरल्या माधवरावाने आपल्या सहकाऱ्यांच्या सहाय्याने मराठ्यांची पानीपती गेलेली पत परत मिळविली तेव्हा इंग्रजांचे मनात मराठ्यांविरुद्ध धास्ती उत्पन्न झाली.

**पेशवा माधवरावाचे इंग्रजाशीं संबंध :**

माधवराव पेशव्यांचे कारकीर्दीत मराठ्यास दक्षिणेत निजाम, हैदर हे दोनच प्रबळ शत्रू नसून पाश्चात्यांपैकीं इंग्रज हेही होते. हैदर-मराठे यांचा झगडा झाला. तसेंच निजाम-मराठे युद्ध झाले पण या दोहोतही इंग्रजांना आपले हात धुवून घेता आले नाहीत. सन १७६७ च्या हैदराच्या पाडावानंतर मराठ्यांची सत्ता वाढली. पण हैदर नामशेष झाला नाही. निजामाने हैदराशी इंग्रजांविरुद्ध तह केल्यामुळे तो खोटा मित्र ठरला. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडून मद्रास येथील अधिकाऱ्यास हैदर-मराठे संघर्ष चालू असता लिहिले की, या संघर्षात मराठ्यांचा पराभव झाल्यास आपणास आनंदच होईल. आपण मात्र कोणाचाही पक्ष घेऊन ह्या भांडणात प्रत्यक्ष उडी घेऊ नये. ह्या युद्धात धारातीर्थी पडणारा प्रत्येक मराठा सैनिक आपला मेलेला शत्रू होय असे समजावयाचे.

निजामाशी आपला विघाड यण्यापूर्वी इंग्रजांनी मराठ्यांशी १७६७ मध्ये सलोख्याचे संबंध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. मद्रास इंग्रजांनी कर्नल स्मिथ यास मराठ्यांकडे मदतीची बोलणी करण्यास पाठविले आणि सांगितले की, निजामास न दुखविता हळुवारपणे मराठ्यांशी बोलणी करून साष्टी व वसई ही स्थळे परत मिळतात का हे पहावे. कर्नल स्मिथला पेशव्यांच्या दरबारी इंग्रजास अनुकूल असे वातावरण दिसले नाही. पण एप्रिल १७६७ मध्ये रॉड नावाचा इंग्रज गृहस्थ पेशवे दरबारास गेला असता त्यास मात्र पेशवे दरबारातील वातावरण इंग्रजास अनुकूल असे दिसले.

सन १७६७ च्या मध्यास पेशव्याने इंग्रजांकडे आपला वकील पाठविला. त्याने कर्नाटकाच्या नबाबाकडील चौथाई वसुलाच्या थकबाकीची मागणी केली. पुष्कळ वर्षांची थकबाकी कर्नाटक नवाबाने न दिल्यास मराठ्यास कर्नाटकावर स्वारी करावी लागेल आणि त्याचे परिणाम नवाबास भोगावे लागतील असे वकील बोलू लागला. ब्रिटिशांचे निजामाशी असलेल्या मेतकुटाबद्दलची पेशव्याची नापसंतीही त्याने इंग्रजास कळविली आणि पेशव्यास न कळविता तुम्ही निजामाच्या दिमतीस इंग्रज लष्कर दिलेत याबद्दल पेशव्यास सखेद

आश्चर्य वाटले असे त्याने मद्रासकरास सांगितले. मद्रास गव्हर्नरच्या कच्छपी कर्नाटकाचा नबाव होता. इंग्रज आता कर्नाटक नबाबाच्या वतीने बोलू लागले. इंग्रजांनी पेशव्यांच्या वकिलास उत्तर दिले की, कर्नाटक नबाबामध्ये तुमची चौथाई बाकी देण्याचे त्राण नाही. आणि जर का त्याजवर याकरिता तुम्ही स्वारी केली तर त्याचे संरक्षण करण्यास ब्रिटिश फौज समर्थ आहे. त्याने हेही सांगितले की, निजामाशी ब्रिटिशांनी केलेली मैत्री म्हणजे मराठ्यांशी शत्रुत्व नव्हे.

इंग्रजांचे म्हैसूरकरांशी युद्ध ऑगस्ट १७६७ त सुरू झाले. यावेळी युद्धातील जय मराठ्यांनी ज्याची बाजू घ्यावी त्यास मिळणार असे होते, म्हणून इंग्रज व कर्नाटकचा नबाव मराठ्यांच्या मदतीसाठी त्यांचा अनुनय करू लागले. तर निजाम व हैदरअल्ली मराठ्यांनी म्हैसुरकरांना साथ द्यावी म्हणून आर्जवू लागले.[1]

बंगाल इंग्रजांना मराठ्यांची सारखी भीति वाटू लागली. त्यांनी मद्रासकरांना कळविले की, म्हैसुरकरांचा जर मोड करावयाचा असेल तर असा इलाज शोधून काढा की, मराट्यांना आपण कोणत्या बाजूस जावे याचा विचार करून आपल्या विरुद्ध पक्षास मिळण्याची संधि मिळू नये. मराटे म्हैसुरकर व निजाम यास सामिल झाले असाही संशय यांनी व्यक्त केला.[2] मद्रासकरांना सारखी भीति वाटू लागली की, पेशवा माधवराव महमद अल्लीकडून चौथाई वसूल करण्यासाठी कर्नाटकात स्वारी करील, तेव्हा त्यांनी यावर उपाय सुचविला की, पेशव्यास त्याच्या गृह कलहात गुंतवून ठेवणे किंवा अंतर्गत बंडाळी माजवून त्याचे लक्ष तिकडे वेधणे आणि अशा प्रकारचे कृत्य करण्यास जर सापडले नाही तर मराठ्यांशी मैत्रीचा तह करणे.[3]

यावेळी मद्रास इंग्रजास हैदराच्या भीतीने कापरे भरले होते. त्यांनी कलकत्तेकर इंग्रजास लिहिले की, हैदराशी मैत्री तरी केली पाहिजे किंवा त्यास शत्रू समजून त्याचा पूर्ण पराभव तरी केला पाहिजे. क्लाईव्हने यावेळी हैदराचा नाश करण्यासाठी मराठ्यांशी मैत्री जोडावी असा उपदेश केला होता. मद्रासकर इंग्रज मराठ्यांशी मैत्री जोडण्यास तयार होते. हैदराचा पराभव झाल्यावर मराठ्यांनी बिदनूरचा तावा मिळावा, म्हैसूरचा हिंदू राजा इंग्रजांच्या सहाय्याने पुन्हा गादीवर बसवावा, त्याने मराठ्यास चौथाई द्यावी, ह्या अटी त्यांना मान्य होत्या. परंतु मराठ्यांच्या यावेळच्या अटी इंग्रजास नामुष्कीच्या वाटल्या.

इंग्रजांशी मैत्री राखण्यासाठी ज्या अटी मराठी वकिलाने इग्रजांना देण्यासाठी अर्काटच्या नवावास दिल्या होत्या त्यात "हैद्राबाद येथील निजामाचा

---

१. ग्रँट डफ, भा. १ पृ. ५५७.

२. बॅनर्जी, पेशवा माधवराव, पृ. १०१.

३. कित्ता.

निःपात करून त्या जागी शहा अलमच्या एखाद्या मुलास दक्षिणेचा सुभेदार म्हणून बसवावे अशी सूचना होती." पण मद्रास इंग्रजांना हैद्राबादी निजाम शाबूत ठेवावयाचा होता. त्यांच्या विचारे हैद्राबाद निजाम जर नाहीसा केला तर, त्यांच्या बंगाल व मद्रास येथील वसाहतीना मराठ्यांच्या मुलुखाच्या सरहद्दी भिडतील आणि मग त्यांना मराठ्यांशी झगडण्याचा धोका पत्करावा लागेल. बंगालकर इंग्रजसुद्धा मराठ्यांशी मैत्री जोडण्यास तयार नव्हते.

कर्नाटकातील झगड्यात इंग्रज, मराठे, निजाम व हैदर यांचा संबंध येत होता. इंग्रजांनी आपला अंकित अर्काटचा नवाब महमदअल्ली यास वाचवून आपली सत्ता कर्नाटकात दृढ करण्याच्या उद्योगात होते. हैदर व निजाम यांचा डोळा ह्याच प्रदेशावर असल्यामुळे त्यांचे सख्य होणे शक्य नव्हते. हैदराचा पाडाव करावयाचा तर आपणास निजामाची मदत घेणे रास्त, असा विचार ठरवून इंग्रजांनी निजामाशी मैत्रीची बोलणी लाविली. त्यास यश येऊन निजामाने मद्रासकर इंग्रजांशी तह करून त्यास उत्तर सरकार प्रांत दिला व मैत्री संपादिली. इतक्यात मराठ्यांनी हैदरावर स्वारी करून सन १७६५ त त्याच्याशी सख्य जोडले. तेणे करून हैदराचे वजन वाढले. ते इंग्रजास जाचक वाटून त्यांनी निजामास सामील करून म्हैसुरवर स्वारी करविली (दिनांक २९ एप्रिल १७६७). निजाम ब्रिटिशांचे कवाइती पथक घेऊन म्हैसूरच्या हद्दीत घुसला. यावेळी पेशवा माधवरावसुद्धा म्हैसूरकराकडून अनेक महत्त्वाची ठाणी जिंकून घेऊन आपला अंमल कर्नाटकात बसवीत होता. हैदर नाईकास यावेळी निजाम इंग्रजांचे बाजूने आपल्यावर चाल करून आल्याने वाईट वाटले. त्याने निजामास आपल्या बाजूस वळविण्याचे आपले प्रयत्न चालू ठेविले. पन्नास हजार पगोडे, हत्ती व जवाहीर यांची हैदराकडून आलेली लोभसवाणी देणगी, आणि हैदराकडील अन्वरुद्दीन, महफूझखान व निजामाकडील सोनपतराव यांनी घातलेली गळ यांचा परिणाम निजामावर होऊन त्याने अंतस्थपणे हैदराशी सख्य जोडले. आता लढाईचा डाव इंग्रजांवर उलटला. हैदराचे व निजामाचे सख्य होऊन त्यांनी अर्काटच्या नवाबाच्या मुलुखात लढाई सुरू केली. इंग्रजांचा टिकाव यापुढे लागेनासा झाला. पण इंग्रजांनी धीर धरून हैदराचा पराभव प्रथम चंगप्पा व तिरुवन्नमलाई या दोन ठिकाणी केला. तेव्हा हैदराने समोर लढाई न देता चपळ स्वारानिशी इंग्रजास हैराण करण्याचा प्रयत्न चालविला. यावेळी निजामास सपशेल बुडवावा असे मद्रासकर इंग्रजास वाटू लागलें. पण कलकत्तेकर इंग्रजांनी निजामास आपल्या बाजूस वळवून घेण्याचे प्रयत्न सोडू नयेत असा सल्ला दिल्यामुळे इंग्रजांनी निजामअल्लीशी तह करण्याचे प्रयत्न केले. त्यास यश येऊन निजामाने हैदरास सोडून दिनांक २३ फेब्रुवारी १७६८ रोजी मद्रासच्या इंग्रजांशी नवीन तह केला.

निजामाशी मैत्रीच्या तहाच्या वाटाघाटी चालू असता मुंबईकर इंग्रजांनी पेशव्यांकडे थॉमस मॉस्टीन नावाच्या वकिलास पाठविले. त्याचा उद्देश एवढाच होता की, माधवराव पेशव्यांशी गोड बोलून पेशव्याला इंग्रज हैदर

युद्धात हैदर निजामाच्या मदतीस जाण्यापासून परावृत्त करणें.[1] हैदराबरोबरच्या युद्धात मराठ्यांची मदत मिळविण्याचे प्रयत्न मॉस्टिनने करावे. इंग्रज-मराठे मैत्रीच्या तहाच्या वाटाघाटीत मॉस्टिनने सोंदे व बिदनूर ही दोन्ही संस्थाने मराठ्यांकडे राहू देण्यास कबुली द्यावी. मात्र त्या बदल्यात मराठ्यांनी वसई व साष्टी हे दोन प्रांत इंग्रजास द्यावे, तसेच सुरत अठ्ठाविशीतील महसुलाचा मराठ्यांचा हिस्साही इंग्रजास द्यावा. तसेच इंग्रजास त्या प्रदेशात होणारे मिरी, चंदन आणि वेलदोडे हेही कराशिवाय निर्यात करण्यास द्यावेत. मंगलोरहून तेलीचरी किंवा मुंबईस तांदुळाने भरलेली तीनशे जहाजे दरसाल करमुक्त नेण्यास परवानगी द्यावी. ह्या सर्व अटी सांगताना साष्टी बेटाचा ताबा परत मिळविण्याचा मुख्य हेतू विसरू नये अशा सूचना मॉस्टिन यास देण्यात आल्या होत्या. रघुनाथराव व माधवराव या चुलत्या-पुतण्याच्या भांडणात लक्ष घालून हे भांडण ज्या रीतीने विकोपास जाईल असे करावे.[2] अशा सूचना थॉमस मॉस्टीन बरोबर घेऊन तो पुण्यास पेशवे दरबारी २९ नोव्हेंबर १७६७ मध्ये आला आणि पुण्यास तीन महिने राहून त्याने २७ फेब्रुवारी १७६८ ला पुणे सोडले.

**मॉस्टीनची पेशवा माधवरावाशी भेट :**

मॉस्टीन पुण्यास आल्यावर पेशव्याने एका शुभदिनी दिनांक ३ डिसेंबर १७६७ रोजी मॉस्टिनला आपल्या भेटीस बोलाविले. पेशव्याचे व इंग्रज वकिलाचें बोलणे मोठ्या खेळीमेळीच्या वातावरणात झाले. त्याचा अहवाल मॉस्टिनने ६ डिसेंबरच्या आपल्या खलित्यातून मुंबई सरकारकडे रवाना केला. मराठे कर्नाटकासंबंधीच्या भानगडीबद्दल तेवढेसे उत्सुक नाहीत. पेशव्यास सुरत ते विजयदुर्गापर्यंतच्या किल्ल्यास स्वतः भेट देण्याची इच्छा आहे. पेशव्याचा मुख्य हेतू जंजिरा ताब्यात घेणे हा आहे. यावेळी पेशव्यास उत्तरेकडून आलेले त्रिंबकराव मामा पेठेचें पत्रही मॉस्टीनला समजले. त्यात मामाने जाट, रोहिले व इतर उत्तरेतील लहानथोर बंडखोर यांचा बंदोबस्त करण्यासाठी इंग्रज व शुजाउदौला याशी दोस्ती करावी असे सुचविले असल्याचे मॉस्टिनने मुंबईस कळविले. उत्तरेच्या भानगडी मिटविण्यासाठी इंग्रजांनी जर पेशव्यांशी दोस्ती केली तर त्याचे कर्नाटकाकडील लक्ष उडून ते उत्तरेकडील भानगडीत जास्त गुंतेल असा मॉस्टिनचा कयास होता.[3]

मॉस्टिननें पेशव्याची दुसऱ्यांदा भेट ११ डिसेंबरला घेतली. तेव्हा त्यास पेशव्याकडून कळले की, मद्रासकर इंग्रजांनी व अर्काटच्या नबाबाने मिळून आपला नागोराम नांवाचा वकील मराठ्यांकडे कर्नाटकातील हैदराबरीबरच्या झगड्यात आपल्याला मदत मिळविण्यासाठी पाठविला आहे. तो पुण्यास येऊन पोहोचेपर्यंत आपण काहीच बोलू इच्छित नाही. असे माधवराव

१. फॉरेस्ट, सिलेक्टशन्स, मराठा सिरीज, व्हॉ. १, पृ. १४१-१४३.
२. कित्ता, होम सिरिज, व्हॉ. २, पृ. १३२.
३. कित्ता, मराठा सिरीज, व्हॉल्युम १, पृ. १४५-१४८

पेशव्याने मॉस्टिनला सांगितले. तसेच मुंबईकर इंग्रजांशी मराठ्यांचे अति स्नेहार्द संबंध असले तरी कलकत्तेकर व मद्रासकर इंग्रजांनी तो समंजसपणा आपण दाखवावयाचा आहे. गोपाळराव पटवर्धनास यावेळी पेशव्याने कर्नाटकास रवाना केले होते. त्याचा अर्थ काय असे पेशव्यास विचारता पेशवे म्हणाले की, कर्नाटकातील जिकलेल्या प्रदेशातून वसूल सैन्य पाठविल्याशिवाय मिळत नाही म्हणून गोपाळरावास सैन्य देऊन तिकडे पाठविले आहे. इंग्रज वकिलाने हे पेशव्याचे म्हणणे खरे मानिले.[१] पुढील वेळी इंग्रजांशी १७६१ मध्ये तह करण्यात पुढाकार घेतलेला गोविंद शिवराम यास मॉस्टीन भेटला. त्याच्या बोलण्यातून हे निघाले की, मद्रास इंग्रजांकडून नागोजीराव जरी पुण्यास येऊन दाखल झाला तरी निजाम व हैदरअल्ली यांजकडून येणारे वकील राजधानीत येऊन दाखल झाल्यावर सर्वांत जास्त हिताच्या सूचना कोणत्या सरकारच्या आहेत याचा विचार करून त्या स्विकारल्या जातील. मराठ्यांपुढे यावेळी तीन पर्याय होते असे मॉस्टीनला वाटत होते : (१) निजाम व हैदरअल्लीस मदत करणे ; (२) महमदअल्ली व इंग्रज यास मदत देणे ; (३) निजामास तटस्थ ठेवून हैदरअल्लीच्या विरुद्ध इंग्रज व महमदअल्लीस मदत करणे. मुंबईकर इंग्रजांनी यावर मॉस्टिनला कळविले की, पेशवा कर्नाटक युद्धात निदान तटस्थ राहील असे करावे. नागोजीरावाबरोबर मद्रास इंग्रजांनी पेशव्यास कळविले की,[२] मुंबईकर इंग्रजांच्या सहाय्याने मराठ्यांनी बेदनूरवर हल्ला करावा आणि त्याचा ताबा मिळवावा. शिवाय मैत्रीसंबंधी पुढील अटी अशा : (१) मराठ्यांच्या सहाय्याने हैदराचे पारिपत्य झाल्यास म्हैसुरच्या राजाची प्रतिष्ठापना म्हैसुर गादीवर करावी ; (२) राजाने मराठ्यांस ठरलेली चौथ खंडणी द्यावी ; (३) इंग्रजांचा लढाईत जो खर्च येईल तो त्यांनी भरून काढावा ; (४) दिंदिगल आदि कर्नाटकातील स्थळांवरील आपला चौथाईचा हक्क मराठ्यांनी सोडून द्यावा आणि पेशव्याने कंपनीस वसई व साष्टी ही स्थळे परत द्यावी आणि अशा प्रकारची मैत्री झाल्यानंतर ईश्वरकृपेने एकमेकांच्या मदतीने शहा अलम यास दिल्ली तक्तावर बसवून जाट आणि रोहिले यांस हाकलून देता येईल. जर पेशव्यांचे धोरण आपल्याशी असहकार करण्याचे आहे असे समजून आले तर त्यास कल्पना द्यावी की, नागपूरकर भोसले आमचेशी सहकार्य द्यायला तयार आहे. शेवटी नागोजीरावाच्या लक्षात हेही आणून दिले होते की, पेशव्यांची मदत इंग्रजांना फारशी आवश्यक नाही. फक्त त्याने निजाम व हैदरअल्ली यांना मदत करू नये, एवढे साधले म्हणजे झाले.

मॉस्टीन हा मुंबईकर इंग्रजांचा प्रतिनिधी. पेशव्यास डिसेंबर १९ रोजी तिसऱ्यांदा भेटला. इंग्रज वकिलाने पुढील चार कलमे, पेशव्यांच्या विचारार्ह आणि निर्णयाकरिता ठेविली : (१) चौल बंदरांत लाइव्हली नावाचे

---

१. फॉरेस्ट सिलेक्शन, मराठा सिरीज, व्हॉ. २, पृ. १४९-१५०.

२. कित्ता, व्हॉ. १, पृ. १५०–१५२.

इंग्रजी जहाज अकारण मराठ्यांनी दाबून ठेविले आहे ते सोडून द्यावे, पेशव्यांच्या सरदारांकडून इंग्रज व्यापाऱ्यांचे जे नुकसान झाले त्याची भरपाई मिळण्याबाबत आणि वरील जहाज ज्यावेळी पेशव्यांच्या लोकांनी पकडले तेव्हापासून त्या जहाजाच्या मालकांना विनाकारण मराठ्यांपासून त्रास होत आहे तो बंद व्हावा. कंपनीच्या अधिकाऱ्यांचे गुलाम मराठ्यांनी पकडून ठेविले आहेत त्यांना सोडून द्यावे. इंग्रजांचे जहाज सोडून देण्याचा हुकूम पेशव्याने ताबडतोब दिला.[1] बाकीच्या बाबींचा विचार करतानाच निजामाकडून पेशव्यास पत्र आले. पेशव्यास हैदरअल्ली व जंजिरा या बाबतीत आपल्याशी बोलावयाचे होते असे मत मॉस्टीन व्यक्त करतो.[2] पेशवे-इंग्रज वकील यांच्या भेटीत दोघेही मदतीसंबंधीचा विषय दुसऱ्याकडून निघेल अशी अपेक्षा करीत होते. जानेवारीला निजाम व हैदरअल्लीकडून मराठ्यांच्या दरबारी वकील आले. मॉस्टिनला ह्यावेळी असे वाटले की, आपणच मदतीबद्दल पेशव्यांशी उघड रीतीने बोलावे म्हणून त्याने मुंबई सरकारची त्या बाबतीत परवानगी मागितली. मुंबई इंग्रजांनी जेवढे काही करता येण्याजोगे असेल तेवढे तू अक्कलहुशारीने कर असा सल्ला मॉस्टीन यास दिला. मॉस्टिनने पेशव्यांची मुलाखत पाचव्यांदा दिनांक ५ जानेवारी १७६८ रोजी घेतली. त्यात हिंदुस्थान व इंग्लंड यामधील घडामोडीचा खल झाला. मॉस्टिनला हेही ठावूक होते की, आपल्या धन्यापेक्षा निजाम व हैदरअल्ली यांनी पेशव्यास त्याच्या मदतीच्या मोबदल्यात चांगल्या अटी कबूल केल्या असाव्यात. पण त्याची ही खात्री होती की, पेशवा स्वतःच्या आजारामुळे स्वतः कोणाच्याही मदतीस जाणे शक्य नाही.[3]

मराठे-इंग्रज यांच्या मैत्रीमध्ये किल्मिष आणणाऱ्या दोन गोष्टी होत्या. आंग्र्याच्या मुलांची कैद आणि जंजिरा मराठ्यांच्या ताब्यात नसणे ह्या त्या दोन गोष्टी होत. अब्दुल रहिम सिद्दी ह्याने विसाजीपंताच्या सहाय्याने मुदगरवर पुन्हा ताबा मिळविला. इंग्रजांचा हस्तक सिद्दी याकूबखान ह्याला ही गोष्ट लागून राहिली. त्याने पेशव्याकडे विचारणा केली की, विसाजीपंत यानी हे कृत्य आपल्या संमतीने केले का ?

याच वेळी दुसरा इंग्रज वकील ब्रोम नाशिकला जाऊन रघुनाथरावाशी वाटाघाटी करीत होता.

इंग्रज व महमदअल्ली आपणास भारी पडतील म्हणून निजाम व हैदर-अल्लीने इंग्रजांविरुद्ध पेशव्यांची मदत मागितली. निजामाने पेशव्यास आपल्या मैत्रीची आठवण करून देऊन स्वतः न जमल्यास १० हजार घोडेस्वार देऊन एखादा मराठा सरदार कर्नाटकात आपल्या मदतीकरिता त्वरित पाठवावा असे विनविले. पेशवा ह्यापैकी काहीच करू शकत नव्हता हे मॉस्टिनचे म्हणणे खरे ठरले.

---

१. फॉरेस्ट सिलेक्शन, मराठा सिरीज, व्हॉ. १, पृ. १५९.

२. कित्ता, पृ. १५४–५१, ५५७, १६०, १६५.

३. कित्ता, ६२.

मद्रासकर इंग्रजांच्या सूचनेप्रमाणे मुंबईकर इंग्रजांनी आपले आरमार हैदराच्या विरुद्ध मद्रासकडे जाण्यासाठी सोडिले आणि पुकारा केला की, कोल्हापूर राणीकडून सिंधुदुर्गाबावत ठरलेली खंडणी वेळी न मिळाल्यामुळे आपले आरमार सिंधुदुर्गावर जात आहे. पेशव्यास हे खरे कारण कळल्यावर त्याने मॉस्टीन यास गोविंद शिवराम व रामजी चिटणीस या उभयतास भेटण्यास सांगितले. या दोघांनी इंग्रजांनी मराठ्यांशी कसे संबंध ठेविले आहेत याबद्दल मॉस्टीनच्या नजरेस आणून दिले. तुकोजी आंग्रेचे दोन्ही मुलगे इंग्रजांनी स्वतःच्या कैदेत ठेविले. त्यांना मराठ्यांच्या स्वाधीन केले नाही. तसेच जंजिरा घेण्यासही मदत केली नाही. एवंच तुम्ही इंग्रज आमचे भाऊबंद जरी तुमचेकडे गेले तरी त्यास आश्रय देणार अशा अर्थाचे बोलणे मॉस्टीन यास ऐकविले. मॉस्टिननें प्रसंग येईल त्याप्रमाणे इंग्रज वागतील असे दिले. मॉस्टीन यास बिदनूरचा बाळ राजा पुण्यात भेटला. त्याची इच्छा इंग्रजांच्या मदतीने आपली गेलेली गादी हैदराकडून मिळावी. पण पेशव्यांच्या ताब्यात तो असल्यामुळे आणि बिदनूर व सोंदे हे दोन्ही प्रदेश पेशव्यांना हवे असल्यामुळे मॉस्टीनने इंग्रज तुला पेशव्यांच्या संमती शिवाय मदत देऊ शकत नाहीत असे त्यास सांगितले.

माधवराव पेशव्यांची मैत्री साधण्यासाठी निजाम, हैदरअल्ली, महमदअल्ली, इंग्रज आदि सत्ताधिशांकडून वकील आले होते. पेशव्याने कोणाच्या एकाच्या बाजूने आपला कौल दिला असता तरी दक्षिणेकडील राजकारणास निराळे वळण लागले असते. पण पेशवा यावेळी स्वतः आजारी होता. उत्तरेस जाट, रोहिले आणि राजपूत हे मराठ्यांविरुद्ध उपद्व्याप करीत होते. आणि सर्वात मोठा शत्रू जो राघोबा हा पेशव्यांविरुद्ध अंतस्थपणे प्रकरणे शिजवीत होता.

अशाही स्थितीत माधवराव पेशव्याने मराठ्यांचा दरारा एवढा वाढविला होता की, हैदराकडील रुकनुदौला पुण्यास गेला. त्या बरोबर चन्दासाहेबाचा मुलगा राजासाहेबही होता. त्यांनी पेशव्याने हैदरास मदत करण्यासाठी घातलेल्या अटी मान्य केल्याचे इंग्रज वकील ब्रूम यास नोव्हेंबर १७६८ मध्ये समजले. मराठे आता हैदराचा पक्ष धरून कर्नाटकचा नवाब महमदअल्ली याच्या प्रदेशावर हल्ला करतील ह्या भीतीने मद्रास इंग्रजांनी हैदराशी तह करून लढाई आटोपती घ्यावी असा विचार जानेवारी १७६९ मध्ये केला. कलकत्तेकर इंग्रजास जानोजी भोसल्याबरोबर पेशव्यांविरुद्ध तह करून पेशव्यास शह द्यावयाचे मनात होते. पण पेशव्याने जानोजी भोसल्याच्या वऱ्हाड प्रांतात आपले सैन्य घुसविल्याच्या बातमीने त्यानी तो आपला विचार रद्द केला. इंग्रजांचे सर्व तर्क वितर्क एप्रिल २, १७६९ रोजी वितळले. कारण या दिवशी हैदराने इंग्रजांशी तह करण्याकरिता आपल्या अटी पाठविल्या. त्यात एक अट अशी होती की, जर तह करणाऱ्यांपैकी कोणा एकावर शत्रूने हल्ला केला तर त्यास आपला शत्रू समजून तह करणाऱ्या आपल्या मित्राच्या सहाय्यास दुसऱ्याने यावयाचे. इंग्रजांनी यांत सुधारणा सुचविली. हैदराचा शत्रू

मराठे आणि मराठ्यांनी हैदरावर हल्ला केल्यास मराठ्यांवर आपण हल्ला करणार नाही. मात्र त्यांनी आमचेवर हल्ला केला तर आम्ही आमचे संरक्षण त्याजपासून करू, असे इंग्रजांनी हैदरास ठासून सांगितले. शेवटी हैदरने या गोष्टीस मान्यता देऊन इंग्रजांशी तह केला.

पेशव्यासही हैदर-इंग्रज लढाईची संधी चांगली चालून आली होती. त्याने सक्रीय भाग घेतला असता तर त्यास बिदनूर व सौंदा हैदरापासून सोडवून घेता आले असते. पण ह्या परिस्थितीचा फायदा पेशव्यास घेता आला नाही. ह्याचे खापर जानोजी भोसलेचा आगलावेपणा आणि रघुनाथरावाचा घरभेदे-पणा यांच्या डोक्यावर फोडावे लागेल.

**गोपाळरावाची कर्नाटकातील कामगिरी :**

मे १७६७ मध्ये पेशव्यांनी कर्नाटकात गोपाळराव व रास्ते यास बंदोबस्तास ठेवून स्वत: चुलत्याने चालविलेल्या उपद्व्यापास तोंड देण्यासाठी पुण्यास परतले; ते जून २८ सन १७६७ रोजी पुण्यास येऊन पोहचले. ह्यावेळी हैदर-इंग्रज यांची लढाई जुंपून ती ४ एप्रिल १७६९ पर्यंत तब्बल दोन वर्षे चालली. या मुदतीत पेशव्याने दरबारी कामे उरकली. उत्तर हिंदुस्तानात फौज रवाना केली. दादासाहेब व जानोजी भोसले यांना चोपले व गप्प केले. ते विषय कर्नाटकातील हैदर मराठ्यांच्या हकिगती पूर्ण सांगितल्यावर पुढे विस्ताराने मांडिले आहेत. इथे तूर्त कर्नाटकात इंग्रज, महमदअल्ली, हैदर व मोगल यांचे भांडण चालू असता पेशव्यानी गोपाळराव पटवर्धनास कर्नाटकात पाठवून कोणते धोरण स्विकारले त्याचे विवेचन करावयाचे आहे. गोपाळराव पटवर्धनाची छावणी कर्नाटकात या काळात पडताच हैदराने आपल्या वकिलातर्फे पेशव्यांशी बोलणे लाविले की, मी इंग्रजांशी लढाई करण्यात गुंतलो असल्याने माझे फार नुकसान होत आहे, हे ध्यानात आणून यंदाची खंडणी मला माफ करावी. तिजबद्दल गोपाळरावाने आमच्या मुलुखास उपद्रव देऊ नये. ही खंडणी माफ करण्याविषयी निजामानेही पेशव्यास आग्रह केला परंतु पेशव्याने त नाकबूल करून अदवानीच्या नबाबाकडे थकलेल्या साडे तीन लाखाच्या खंडणीची मागणी केली. कर्नाटकात गोपाळरावाने चित्रदुर्ग, रायदुर्ग, अनागोंदी येथील पाळेगारांकडून व अदवानी, कडपे, कर्नुल येथील नबाबांपासून खंडणी घेतली. पाळेगारांना हैदराकडून पेशव्यांविरुद्ध मदतीची आशा नव्हती म्हणून त्यांनी गोपाळरावास मागेल त्याप्रमाणे खंडणी दिली. मदगिरी, बालापूर वगैरे मराठ्यांनी ताब्यात आणलेल्या आपल्या प्रदेशात मराठ्यांची पंचवीस हजार फौज जमलेली पाहून इंग्रज व हैदर या दोघासही काळजी उत्पन्न झाली. पण गोपाळरावाने कोणाच्याही वाटेस जाऊ नये अशी पेशव्यांकडून त्यास ताकीद असल्यामुळे तो १७६८ च्या फाल्गुनपर्यंत तिकडे राहून खंडण्या घेत परत येऊ लागला. येताना त्याने फ्रेंचांकडून चार लाख रुपये खंडणी व पेशव्यांसाठी नजराणा घेतला. वैशाखाच्या आरंभी गोपाळराव यादगिरी, सुरापुर, चितापूर येथील खंडण्या घेऊन पंचमहालात आला. तेथील चौथाईची

तुंबलेली बाकी वसूल करून तो गुलबर्ग्यास आला (मे १७६८). यावेळी दादासाहेबाने कलह करून जानोजी भोसले यास पेशव्यांविरुद्ध उठविले होते. त्याच्या पारिपत्यासाठीं पेशव्याने गोपाळरावाची फौज गुलबर्ग्यास होती ती तावडतोब बोलावून आणिली.

**हैदरावरील चौथी स्वारी (सन १७७० जानेवारी ते सन १७७२ जुलै पर्यंत) :**

इंग्रजांशी जोपर्यंत लढाई चालली होती तोपर्यंत हैदराने मराठ्यांच्या कर्नाटकातील मुलुखास उपद्रव दिला नाही. पण इंग्रजांशी तह करून मोकळा झाल्यावर हैदराने मराठ्यांशी झालेल्या मागील तहाप्रमाणे न वागता पेशव्यांच्या ताब्यातील संस्थानांकडून खंडण्या घेऊन त्यास उपद्रव देण्यास सुरुवात केली. यावेळी हैदराचे वकील आपाजीराम व रेजा अल्लीखान तहाप्रकरणी पुण्यास पेशवे दरबारी बोलतच होते. पेशव्यांनी त्यास सांगितले की, सन १७६८-६९-७० या तीन सालांबद्दल चाळीस लाख खंडणी द्यावी, चित्रदुर्ग संस्थानापासून घेतलेली खंडणी परत करावी, मीर रेजा तुमच्या पक्षास मिळाल्यामुळे त्याजकडे असलेला गुरुमकोंडा आमचा आम्हास परत द्यावा व मीर रेजास स्वाधीन करावा. या चार अटींपैकी फक्त खंडणीची अट त्याने कबूल केली. बाकीच्या अटी तो कबूल करीना. शिवाय खंडणीबद्दलही जाबसाल सांगू लागला. हे ऐकून पेशव्याने हैदराच्या वकिलास निरोप देऊन ते लढाईची तयारी करण्याच्या उद्योगास लागले.

मिरजेहून गोपाळराव पटवर्धनास पावसाळा संपताच कर्नाटकात जाण्यास सांगितले. बरोबर रास्तेही होते. हे दोन सरदार नरगुंदाजवळ[1] येताच हैदरही तुंगभद्रा उतरून सावनुरापासून वीस कोसावर येऊन उतरला. तेव्हा हे सरदार सावनूरच्या पूर्वेस दहा कोसांवर मुलगुंद येथे तळ देऊन राहिले. हैदर व गोपाळराव या दोघांनीही सावनुरकरांकडे खंडणीची मागणी केली, तेव्हा सावनूरच्या नबाव गोपाळरावास खंडणी न देता हैदराचें बळ ओळखून त्यास गुप्तपणे चाळीस हजार रुपये पावतें केले व गोपाळरावाशी लबाडीच्या गोष्टी बोलू लागला. इतक्यात पेशवे पाऊण लाख फौज व पन्नास तोफा बरोबर घेऊन कर्नाटकात ऑक्टोबरमध्यें उतरला.[2] हैदराची फौजही पाऊण लक्षावर होती[3] व त्याजवळ कवाइती पायदळाचा भरणा फार होता व तोफखानाही उत्तम होता. एकंदर स्वार वीस पासून पंचवीस हजारापर्यंत असून त्यात काही मराठे होते.[4]

शिरहट्टी येथे गोपाळराव पटवर्धनाचा तळ असता पेशवे तुंगभद्रेवर येऊन पोचले व पुढील मसलतीकरिता गोपाळरावास बोलावून घेतले. पेशव्याचा हेतू हैदर नाईकाशी सलोखा न करिता तमाम इकडील पाळेगार

---

१. खरे, भाग ३, ले. ८०६, पृ. १३७८-१३७९.

२. पे. द. २७, ले. १७४, १७५, १८२, खरे, भाग ३, पृ. १३३.

३. पे. द. २७, ले. १०४, १०५, १८२, खरे, भाग ३, पृ. १३३.

४. Wilks, Vol II, p. 132.

वगैरे मिळवून पारिपत्य करावे[1] असा होता. हैदराचे पुरे पारिपत्य करण्याचा पेशव्याचा मुख्य हेतु असल्याचे कलकत्तेकर इंग्रजांनाही ठावूक होते.[2] माधवराव कर्नाटकात आल्यापासून हैदर घाबरून झाडीत जाऊन बसला. पेशव्याने बुंदेहाल, कंदीकिरे, हंदिकिरे, चिकनाइकहल्ली, भैरवदुर्ग, नागमंगल, बालापूर आदि स्थळे जानेवारी-फेब्रुवारी १७७० मध्ये काबीज केली. पटण तालुक्याची ठाणी घेतली. पण त्यामुळे हैदर गडबडला नाही. जानेवारी १७७० च्या अखेरीस त्याने उडगणी ठिकाण सोडले आणि तो तुरुवेकिरे या स्थळास आला. नंतर फेब्रुवारी १ ला तो बसवापटणचे अलीकडे चेनगिरीवर राहिला.[3] पेशव्यांनी फेब्रुवारी १५ पर्यंत बुंदेहाल वगैरे नागमंगलपर्यंत ठाणी घेतली. काही पाडली, काही ठेवावयालायक मजबूत पाहून ठेविली. बंदोबस्त केला व हिरदुर्ग पहाडी जागा चांगली, दोन तीन दिवसात घेतली. हैदरखान ह्यावेळी झाडीतच होता.[4] त्याच्या तोंडावर फौज ठेवून श्रीमंत पाच सात ठाणी घेत श्रीरंगपट्टणानजीक बारा कोसापर्यंत आले.[5] हैदराने आपला वकील पेशव्याकडे सुलुख करण्यासाठी पाठविला पण तो सरळ काहीच बोलत नव्हता. हैदराने मात्र झाडी सोडून लढाईस येण्याचे नाकारले. त्याजकडील दोन तीन हजार फौज मराठी फौजेपासून दहाबारा कोसाचे अंतराने लपून फिरते.[6] मार्चच्या ६ तारखेपर्यंत हैदरखानाकडील दहा-पंधरा मातबर ठाणी घेऊन वीस लक्षाचा प्रांत सोडविला. कोलार, बेंगरुळचे किल्ले घेतले. फक्त पटण आणि बिदनूरच घ्यावयाचे बाकी राहिले.[7]

पेशव्याचे मनात त्या प्रांतातील पाळेगार, सरदार कडपेकर, कर्नोलकर पठाण यांना एकत्र आणून हैदरखानाचे पारिपत्य करून दोन तीन करोड रुपयांचा प्रांत मध्येच त्यानें दाबिला होता तो सोडवावा. हैदरखान ह्यावेळी ठाणे तरीकिरे येथें होता. गोपाळरावाची फौज त्याजपासून चार कोसावर होती. तिजवर पहाटेची चार पाच घटका रात्र रहाताच तोफांचा भडिमार केला. थोडी गडबड झाली. पण मराठे सावध असल्यामुळे नुकसान झाले नाही.[8] एप्रिल महात हैदर श्रीरंगपट्टणास गेला आणि पेशवे मुलबागलाहून माघारी फिरले. पेशव्याने यावेळी असा विचार केला की, सरंजामी फौज छावणीस गोपाळरावाबरोबर ठेवावी व स्वतः देशी जावे.[9] एप्रिलमध्ये

१. पे. द. २७, ले. १९४.
२. Peixoto, Vol. VI, pp. 11, 12, 14.
३. पे. द. ३७, ले. १९२.
४. कित्ता, ले. १९५.
५. कित्ता, ले. १९६.
६. कित्ता.
७. कित्ता, ले. १९८.
८. कित्ता.
९. कित्ता, ले. २०१.

मराठ्यांनी निजगलच्या किल्ल्यास वेढा दिला. दिनांक २९ एप्रिल रोजी निजगलचे किल्ल्यावर हल्ला चढवित असता "थोरले श्रीमंताचे मागे नारायणराव उभे होते, त्यांच्या उजव्या मनगटास गोळी लागून जखम झाली. हाड व शिरा जाया जाल्या नाहीत".[१] पुढे तो किल्ला पेशव्याने जिंकला.[२] इतके होत आहे तो पर्ज्यन्यकाळ समीप आला. मराठ्यांनी हैदरच्या राज्यापैकी एक कोट उत्पन्नाचा मुलूख लुटून फस्त केला, कित्येक प्रांत ओसाड पाडले, किल्ले व शहरे काबीज केली. हैदरची लाखो रयत नागवली. पुष्कळ लोक प्राणांस मुकले. मुख्य ठिकाण बेंगरुळचा किल्ला काबीज केल्याशिवाय हैदराचा पाडाव होणार नव्हता. त्यामुळे हैदर तहास तयार होईना.

**त्रिंबकराव पेठेकडे स्वारीचे आधिपत्य :**

पेशव्यास या स्वारीत फारच ताण पडला. त्याने समस्त सरदारास बोलावून पुढील स्वारीच्याविषयी त्याशी खल केला. मुरारराव घोरपडे याजसहित बहुतेकांचे म्हणणे असे पडले की, एकाद्या मातबर सरदारास पावसाळ्यात कर्नाटकात छावणीस ठेवावे. पेशव्यानी यावर विचार करून त्रिंबकरावमामा पेठे यास स्वारीचा मुखत्यार दिला. समागमे गोपाळराव व रास्ते व हुजरातची फौज सात आठ हजार ठेविली.[३] अशी व्यवस्था करुन पेशवे स्वारीतून दिनांक १३ मे १७७० रोजी परत निघाले. वाटेत दिनांक २५ रोजी कोप्पलजवळ सूर्य ग्रहणाच्या दिवशी सुवर्णतुला केली. दिनांक १३ जूनला पुण्यास परतले.[४]

जून १७७० पासून १७७२ च्या जून पावेतो दोन वर्षे कर्नाटकात मराठ्यांनी त्रिंबकरावमामा पेठे यांच्या अधिपत्याखाली राहून पेशव्यांनी सोपविलेला कार्यभाग पुरा करण्याचा कसोशीने प्रयत्न केला. सुरवातीस त्रिंबकराव मामाने परिस्थितीचा विचार करण्यासाठी गोपाळराव पटवर्धन, मुरारराव घोरपडे, आनंदराव गोपाळ, आनंदराव रास्ते वगैरे मंडळीशी एकत्र बसूनच चर्चा केली व युद्धाचे धोरण ठरविले.

जूनच्या (स. १७७० च्या) सुरवातीसच गोपाळरावाने चिकबालापुरावर हल्ला करून ते ताब्यात घेतले.[५] कडप्याजवळ गुरुमकोंडयाचा बळकट किल्ला असून हैदरचा शूर सरदार मीर रेझा हा मराठ्यांच्या बाजूचा होता. पण ह्या स्वारीत हैदराच्या बाजूने मराठ्यांचा उच्छेद करू लागला. त्रिंबकराव मामानी गुरुमकोंड्यास ऑगस्टमध्ये मोर्चे लाविले.[६] याच

१. पे. द. ३७, ले. २०६.
२. कित्ता, ले. २०८.
३. पे. द. (नवीन) ३, ले. ६१.
४. पे. द. ३७, ले. १७०, २०७, २०९.
५. पे. द. ३७, ले. २११.
६. खरे, भाग. ३, पृ. १००८.

महिन्यात श्रीमंत पेशवे यांनी हैदरावर स्वारी करण्याकरिता झाडी तोडण्यास कुऱ्हाडी दोन हजार व कुदळचा दोन हजार तयार केल्या.[१] गुरुमकोंड्यात हैदर होता, त्याने पुरा सप्टेंबर गुरुमकोंडा झुंजविला. पण सप्टेंबर २९ ला लाविलेले सुरुंग उडाले. एका सुरुंगाने गुरुमकोंड्याच्या तळ्याचे कोनाचा सुरुंग उडाला, खंदक भरून निघाला व एक सुरुंग किल्ल्याचे भिताड टाकून आत गेला.[२] शेवटी गुरुमकोंड्यावर दिपवाळीचे प्रतिपदेस मराठ्यांचे निशाण चढले.[३] त्रिबक सूर्याजीने बांधारी कोकणपट्टी, किल्ले मर्दनगड पासून गोकर्ण महाबळेश्वर, होनावरपर्यंत हैदराच्या ताब्यातील जिकून घेण्याचा पैगाम केला.[४] पेशव्यानेही कर्नाटकात युद्ध सामुग्री पाठविण्यासाठी पुण्यास बंदुका ओतविण्याचा कारखाना सुरू केला.[५] पेशवे स्वतः कर्नाटकात येण्यास निघाले पण त्याना आजारामुळे पुण्यास मागे परतावे लागले.[६] त्रिबकराव मामाने गुरुमकोंडा काबीज केल्यावर ते पुढे तिरुपतीकडे स्वारीस गेले.[७] १७७१ च्या सुरवातीस हैदर श्रीरंगपट्टणात होता. त्यास मराठ्यांनी दोन्ही बाजूने घेरले. हैदराचा नाईलाज होऊन पुन्हा तो खंडणी देऊन तह करण्यास तयार झाला. त्याचा वकील अप्पाजीराम मराठ्यांच्या छावणीत गेला पण हैदराच्या तहाच्या अटी त्रिबकराव मामाने नाकारल्या.[८]

जानेवारी १७७१ च्या अखेरीस मराठ्यांची बाजू थोडी कमकुवत झाली. पेशव्यास आपली प्रकृती नादुरुस्त झाल्यामुळे कर्नाटकात येता आले नाही[९] पण मलबा बापू व कृष्णराव बळवंत याजबरोबर १० तोफा आणि १० हजार सैन्य दिले. ते त्रिबकरावास येऊन मिळाले.[१०] जानेवारीत गोपाळराव फौजेतून निघून मिरजेस आले.[११] प्रकृतीस स्वास्थ्य नव्हते. तिसऱ्या दिवशी निवर्तले. गोपाळराव सर्व ब्राह्मणात केवळ मुगुटमणि होते. ते आपल्या वयातच गेले. (११ जानेवारी १७७१). गोपाळरावाची फौज वामनरावाच्या अधिपत्याखाली त्रिबकराव मामाच्या मदतीस आली.[१२] त्रिबकराव स्वतः कर्तबगार एकनिष्ठ जरी असला तरी करारी आणि तोंडाचा

१. खरे, भाग ३, पृ. १०१३.
२. कित्ता, पृ. १०२७.
३. कित्ता, पृ. १०४७, पुरंदरे भाग ३, ले. १०३.
४. वाड १, ३६८.
५. कित्ता.
६. खरे, भाग ३, पृ. १०६२, १०६३.
७. पे. द. ३७, ले. २१९
८. कित्ता, ले. २२३, २२४.
९. कित्ता.
१०. कित्ता, २२, ले. २३१.
११. खरे, भा. ३, पृ. १०६४.
१२. कित्ता, १०८६, पे. द. ३७, ले. २२३.

फटकळ. गुरुमकोंडयाच्या विजयाचा गर्व होऊन त्यास मनुष्य तृणप्राय झाले.[१] त्यामुळे तो सर्व फौजेत अप्रिय झाला. त्रिंबकरावाने फेब्रुवारीच्या शेवटच्या आठवडयात शिवमोडयाचे रोखे वाटेतील किल्ले जिंकित जाण्याचा बेत केला.[२] मार्चच्या पहिल्या आठवडयात तो श्रीरंगपट्टणास आला. यावेळी हदरानेही फौजफाटयाचा बंदोबस्त करून मामाशी दोन हात करण्याचा उद्योग आरंभिला.[३]

## मोती तलावाची लढाई :

त्रिंबकराव मामास हैदर पटणाच्या बाहेर आला हे कळल्यावर तो बिदनुरच्या झाडीत शिरल्यावर आपला इलाज चालणार नाही म्हणून मराठा सैन्य बिदनूरचा रोख सोडून तुरुवेकिऱ्यावर आले. तो हैदर मेलकोटे देवाचे स्थल, बिकट जागा त्याच्या आश्रयास येऊन राहिला. यावरून मराठयांना बिदनुरास जाऊ द्यावयाचे नाही हा हैदराचा हेतू आणि हैदराने उघडया मैदानात लढाई द्यावी हा मामाचा हेतू या दोन्ही सफल झाल्या. मेलकोटयाच्या आजूबाजूस सर्वत्र उंचच उंच डोंगर असल्याने ती जागा अत्यंत बिकट होती. त्याच्या डोंगरी आश्रयास हैदर येऊन राहिला. बाहेर पडावयास एकच खिड असल्यान शत्रूने ती अडविली तर हैदर आतल्याआत अडकून त्याच्या सैन्याचा फन्ना होण्यास फारसा अवसर नव्हता. मराठयांनी आपल्या लष्कराची मेलकोटयाभोवती अशी मांडणी केली की, त्यामुळे हैदर त्या अवघड जागी कोंडला गेला व त्याला त्या कोंडीतून बाहेर पडणे अशक्य झाले. दिनांक ६ मार्चला सकाळी मराठयांच्या तोफानी हैदराच्या लष्करावर आग ओकण्यास सुरवात केली. हैदराचा तोफखानाही सुरू झाला. पण त्याचा तोफखाना लहान होता. त्यामुळे त्याचे नुकसान होऊ लागले. म्हणून त्याने काळोख्या रात्रीचा फायदा घेऊन गुप्तपणे तो पट्टणच्या दिशेने दक्षिणेकडील खिडीतून बाहेर पडू लागला. ही बातमी घेऊन सरकारची माणसे आली म्हणून त्याचा पाठलाग मराठयांनी केला. चौफेर फौजा घातल्या. हैदरानेही मारगिरी सुरू केली. हैदरखान पुढे आघाडीस चालला होता, पिछाडीस तोफा व गाडदी फिरंग्याचे बुरुज बांधून चालत होता, ते उधळून मारीत मारीत हैदरखानापावेतो निशाण घेऊन जाऊन पोहचलो. तेव्हा हैदरखानानी मोतीतळयासमीप डोंगर होता त्याचा आश्रय करून डोंगरावर पाच-सात हजार माणसानिशी सडा जीव घेऊन चढला. तमाम त्याची फौज मागून गारद केली. मोठी लढाई जाहली. सारी सलतनत लुटन फौज मारून ताराज केली. हैदरखान जीव घेऊन डोंगरावर पुन्हा चढला. तेथूनही एक वख्त चालून आला तेव्हा फिरोन मारीत मारीत डोंगरावर लाविला. नंतर कलसुचे सोंग घेऊन पाई उतारा अथवा एक घोडयानी अगोदर पळून पटणास गेला.

१. खरे, भा. ३, ले. १०८६, १०८९.

२. कित्ता, १०७४; पे. द. ३७, ले. २२६; Wilks, Vol II, p. 138.

३. Wilks, Vol. II, pp. 138-139.



माधवराव पेशवे शिकार करताना

त्याजकडील मोठमोठे सरदार पडले. फौज मारून काढिली, स्वामीचे पुण्यप्रतापे स्वामीची आजीम अस्मानी फत्ते जाहली.'[1] अशा रीतीने हैदराचा पाडाव झाला. या लढाईस मोती तलावाची लढाई असे म्हणतात. हैदराची यानंतर मराठ्यांनी सगळीकडे दाणादाण उडवून दिली. १० मार्च रोजी मराठ्यांनी श्रीरंगपट्टणास जाऊन मोर्चे लाविले. दिनांक १७ मार्च रोजी त्रिंबकराव मामाने तोफांचा मारा सुरू केला. पण अलोट धैर्याचा हैदर या माऱ्यास काही बधला नाही. त्याने मराठ्यास दाणावैरण मिळू नये म्हणून आजूबाजूचा सर्व प्रदेश उध्वस्त केला. मराठ्यांनीही वेढ्याचे काम जोरात चालविले पण अन्न व वैरण मराठ्यास मिळेनाशी झाली. शिवाय वेढ्याचे दिवस वाढत जाऊन पर्जन्य समीप येत चालला. लोक लढाईला कंटाळलेले, नद्यास पूर आले तर आपले नुकसान होईल अशा भीतीने त्रिंबकराव मामाने १८ एप्रिल १७७१ रोजी पट्टणचा वेढा उठवून तो मेलकोटचास आला. हैदरानेही मराठ्यांकडून आपला प्रदेश वचाविण्यासाठी शिकस्त केली. मराठ्यांनी बिदनूर घेण्याचा पुन्हा प्रयत्न केला. पण महमद कुमेदाखान नांवाच्या हैदराच्या सेनापतीचे लक्ष पिरेपाटण काबीज करण्यास जाऊन त्यांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले व तो बेत हाणून पाडला.

जुलै महिन्यात वामनराव पटवर्धनाने बाणावरपासून तीन कोसावर असलेल्या गर्दनगड नावाच्या किल्ल्यास वेढा घालून तो किल्ला ताब्यात घेतला. त्रिंबकराव पेठे यांनी देवरायदुर्ग, भैरवदुर्ग व उत्तरदुर्ग वगैरे किल्ले व नागमंगल देवलपूर, किकेरी ही ठाणी जिंकून घेतली. तेव्हा हैदराचे धाबे दणाणले व त्याने तहाकरिता आपला वकील आपाजीराम यास त्रिंबकराव मामाकडे पाठविले.

इतक्यात मामास श्रीमंताची पत्रे आली की, सलूक करून लवकर येणे.[2] ही आज्ञा प्रमाण मानून सलूक ठरला. हा तह दोन वर्षे मेहनत केल्यासारखा न जाहला असे त्रिंबकरावच आपले मत देतात.[3] हैदरची पासष्ट लक्ष खंडणी झाली. त्यापैकी तूर्त ३५ लक्ष घ्यावे (मे) कार्तिकात तीस घ्यावे. मामानी सर्व मुलूख सोडावा[4] असे हैदराच्या वकिलाचे म्हणणे. शेवटी हो ना म्हणता हैदराशी तह झाला. ऐन खंडणी ५० लक्ष, दहा लक्ष दरबार खर्च, पैकी तूर्त २८ लक्ष, बाकी सावकारी निशा पुरवावी याप्रमाणे करार झाला.[5] जून ७ ला हैदराकडून निरोप आला की, "तुंगभद्रा पार झाल्यावर ऐवज देऊ तवपावेतो रास्ते यास ठेवून जावे." तेव्हा मामानी जवाब पाठविला की,

१. पे. द. ३७, ले. २२६, खरे, भा. ३, ले. ११०२, ११२१; पेठे द. १, ले. ६०.

२. कित्ता, ले. ११६८.

३. पे. द. ३७, ले. २३३.

४. पुरं. ३, ले. १०६, ले. १०८.

५. खरे, भाग ३, ले. ११७१.

"टिपूस ओलीस दिल्यास रास्त्यास ठेवून आम्ही जातो. ऐवजासह रास्ते लष्करात येऊन पावल्यावर टिपूस सोडून देऊ." या उत्तराने हैदर थंडावला. त्रिंबकराव हैदराशी तहाची बोलणी चालली असताना पावसाळ्यात बेलूर येथे छावणीस राहिला.[१] ह्याच सुमारास तंजावरचे राजे तुळजाजी भोसले यांजवर अर्काटच्या नवाबाने हल्ला केला होता. हे संकट निवारण्यासाठी तुळजाराजे यांनी त्रिंबकराव मामांची मदत मागितली. सन १७७१ त त्रिंबकराव मामा पाईनघाट ओलांडून तंजावरच्या मदतीकरितां फौजेसुद्धा गेले.[२] प्रांताच्या रक्षणार्थ त्यांनीं पटवर्धन, नरसिंहराव घायगुडे, शहाजी भापकर, कवडे वगैरेना ठेविले.[३] मामा तंजावरास जाण्यापूर्वीच तंजावरकरांनी महमद अल्लीशी व इंग्रजांशी तह केला. त्रिंबकरावाने ४ लाख रुपये राजाकडून घेतले आणि इंग्रजांनी १५ लाख देऊ केले असता, त्याजकडे ३० लाख रुपये मागितले.[४] वर सांगितलेला तह उरकून त्रिंबकराव निघाला तो १० सप्टेंबरला थेऊर येथे पेशव्यास येऊन भेटला.[५]

**पेशवा माधवराव व उत्तर हिंद** (सन १७६१ ते १७७२) :

मराठ्यांचा पानिपतवर पराभव झाल्यावर उत्तर हिंदुस्थानातील यमुना व चंबळ यांच्या दक्षिणेकडील रोहिले, जाट, बुंदेले आणि राजपुत राजे यानी मराठ्यास नदीपार दक्षिणेस हाकलून देण्याचा आव आणिला. जयपूरचा राणा माधोसिंग याने मराठ्यांचे जू झुगारून देण्यासाठी उत्तर हिंदुस्थानातील सर्व सत्ताधिशांची जूट करण्याचा प्रयत्न केला. सर्व रजपूत राजांनी व शेखावतांनी मराठ्यांना खंडणी देण्याचे बंद करून त्यांचा अंमल उठविण्याचे ठरविले.[६] ह्याचा बंदोबस्त करण्यासाठी पेशव्याने मल्हारराव होळकरची नेमणूक केली. मल्हाररारावाने उत्तरेकडे येत असता माळव्यात गांगुर्णी स्थळ जून १७६१ मध्यें काबीज करून तेथील गढी जमीनदोस्त केली.[७] पावसाळा संपताच ऑक्टोबरमध्ये माधोसिंगाने मराठ्यांची ठाणी घेण्यास दहा हजार फौज रवाना केली. तेव्हा मल्हारराव होळकर फौजेनिशी चाल करून गेले. २९ नोव्हेंबरला मंगरोळ व भाटवाडा यांच्यामध्ये लढाई होऊन चार घटका रात्रीपावेतो गोळा गोळीचे युद्ध झाले. युद्ध दोन दिवस चालले. मराठ्यांनी कछव्याची तमाम फौज लुटून घेतली. रजपुतांची घोडी, उंट वगैरे सरंजाम लुटला. कछव्याकडील कित्येक मोठमोठे घायाळ होऊन पडले.[८]

---

१. पे. द. ३७, ले २३५; A. C. Bannerji, Madhav Rao I, p. 205.
२. खरे, मा. ४, ले, ११५३.
३. कित्ता, ले, ११५४.
४. कित्ता, ले, ११५७.
५. कित्ता, ले, १२०५.
६. पे. द. २१, ले. ७५.
७. पे. द. (नवीन) ३ ले. ७२७.
८. कित्ता २१, ले. ९२ ते ९४; कित्ता २, ले. ५ व ६.

पुढे राणा माधोसिंगाचा दिवाण कणीराम याने मराठ्यांशी मध्यस्थी करून दोन लक्ष रुपये खंडणी ठरविली. या विजयामुळे मराठ्यांचा उत्तरेतील सत्ताधिशात दबदबा वाढला. मल्हाररावास मदत करण्यास माळव्याचा सुभेदार म्हणून नारो शंकराचे चिरंजीव विश्वासराव लक्ष्मण यांची नेमणूक केली.[1] मराठ्यांचा हा विजय क्षणिक ठरला. कारण पुण्यास सन १७६२ पासून दादा व माधवराव या चुलत्या-पुतण्यात बेवनाव होऊन त्याचा फायदा निजाम, हैदर, जानोजी भोसले आदि पेशव्यांचे हितशत्रू घेऊ लागले. ह्या घरगुती कलहात पडल्यामुळे दादा, निजाम व हैदर यांचा पराभव होऊन बंदोबस्त करीपर्यंत १७६६ साल उजाडले. तोपर्यंत उत्तरेत खालील घडामोडी झाल्या.

पानिपतच्या लढाईनंतर स्वदेशास परत जाताना अब्दालीने मोगल बादशहा दुसरा आलमगीर याचा ज्येष्ठ पुत्र शहा अलम यास बादशहा म्हणून मान्यता दिली. शहा अलम यावेळी बिहारात रहात होता. त्याने दिल्लीस येऊन रहावे असे अब्दालीने त्यास कळविले. तेव्हा सन १७६३ मध्ये शहा अलमने अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला आणि अंतर्वेदीतील रोहिले सरदार अहमदखान बंगश, हफीज रहमतखान, दुंदेखान वगैरे यांच्या सहाय्याने राजधानीकडे जाण्याचा बेत केला. परंतु सुजाउद्दौला आणि रोहिले सरदार यांच्यामध्ये वैमनस्य असल्यामुळे शहा अलमचा हा हेतू सिद्धीस गेला नाही. शहा अलम यास रोहिले सरदारांची खात्री वाटत नव्हती म्हणून तो सुजाउद्दौल्याचा अनुनय करू लागला. दरम्यान सन १७६३ मध्ये इंग्रजांनी मीर कासीम अल्लीस बंगाल, बिहार प्रांताचे सुभेदारीवरून दूर केले. तेव्हा मीर कासीमने सुजाउद्दौला व शहा अलम यांची मदत घेऊन, इंग्रजांवर चाल केली. इंग्रजांनी शहा अलम, सुजाउद्दौला व मीर कासीम यांच्या संयुक्त फौजेचा बक्सार येथे लढाईत पराभव केला. या लढाईपूर्वी बादशहाचे सुजाउद्दौल्याशी भांडण झाले होते. म्हणून बादशहा बक्सारच्या लढाईनंतर इंग्रजांचे आश्रयास गेला. इंग्रजांच्या कवाइती फौजेने सुजाउद्दौला व मीर कासीम यांचा कोरा येथे दिनांक ३ मे १७६५ रोजी पूर्ण पराभव केला. इंग्रजांनी सुजाउद्दौल्याकडून कोरा व अलाहाबाद प्रांत घेऊन ते बादशहा शहा आलमास दिले. आणि सुजाउद्दौल्यास बादशहा शहा आलमचा वजीर नेमिले. इंग्रजांनी शहा अलम यास अलाहाबाद येथे ठेवून त्याचे संरक्षणास दोन इंग्रजी पलटणी ठेविल्या. बादशहाने इंग्रजांनी केलेल्या ह्या व्यवस्थेबद्दल इंग्रजास दिनांक १२ ऑगस्ट १७६५ रोजी बंगाल, बिहार व ओरिसा या तीन प्रांताच्या दिवाणीची सनद दिली.[2] इंग्रजांनी या दिवाणी हक्क प्राप्तीबद्दल शहा अलम बादशहास ३६ लक्ष रुपये देण्याचे कबूल केले.[2] याचा परिणाम असा झाला की, शहा अलम बादशहा इंग्रजांचा अंकित झाला. याच सुमारास होळकराने जाट व

---

१. बॅनर्जी, माधवराव १ ला, पृ. २०५.

२. वजीर फिरंगी याणे बंगाल्याची व आजिमाबाद पटण्याची मामलत सालतमाम दरसालची ३६ लक्षावर जायसमा केला. पे. द. ३, (न) ले. ८०.

नजीबखान यांचा १७६५ च्या फेब्रुवारीत तह घडवून आणला.[१] कलकत्त्याच्या अंधारकोठडीत १५० इंग्रजांना कोंडून मीर कासीम यास इंग्रजांनी आपल्या हवाली करण्यासाठी सुजास सांगून पाठविले. सुजाने मीर कासीम यास इंग्रजांचे हवाली करण्याचे नाकारल्यावर इंग्रज सेनापती प्लेचर याने सुजाचा पाठलाग करून चुनारगड हे सुजाचे नाक्याचे ठाणे जिंकून घेतले व ते त्यांनी बादशहापासून मागून घेतले. अशा रीतीने प्रयागपासून बंगालपर्यंतचा प्रदेश इंग्रजांचे कबजात गेला. मात्र सर्व कारभार बादशहाचे नावाने केला. सुजास शिंदे, होळकरांचे स्मरण होऊन होळकरांची मदत त्याने इंग्रजांविरुद्ध लढण्यास मिळविली. त्याप्रमाणे इंग्रज-होळकरांचा सामना मे महिन्यात झाला. त्यात होळकर यास माघार घ्यावी लागली. होळकरास प्लेचरने काल्पीवरून पिटाळून लाविले.[२] त्यानंतर क्लाइव्हने सन १७६६ च्या जुलैमध्ये बिहार प्रांतात उत्तरेस असलेल्या छप्रा गावी बादशहा शहा अलम, सुजाउद्दौला, जाट राजे आणि रोहिले सरदार यांची बैठक भरवून मराठ्यांच्या विरुद्ध त्यांची जूट बनविली. मराठ्यास उत्तर हिंदुस्थानातून दक्षिणेत घालवावे, हा ह्या जुटीचा उद्देश होता.[३]

पानिपतच्या लढाईनंतर जाट राजे प्रबळ होऊ लागले. त्यांचा उपद्रव वाढतच चालला. बादशहाचा वजीर नजीब याचे व जाटांचे वाकडे आले. भरतपुरला जाट राजा सुरजमल व नजीबखान यामध्ये युद्ध होऊन सुरजमल डिसेंबर १७६३ मध्ये मारला गेला.[४] तेव्हा त्याचा मुलगा जवाहरमल जाट याने जाटांचे पुढारीपण स्विकारून मोगलास व मराठ्यास त्रास देण्यास सुरवात केली. मराठ्यांचे अंमलदार उठवून लाविले. त्यावेळी मराठ्यांनी जाटांचा नक्षा उतरविण्याचा प्रयत्न केला.[५] त्यांनी जाटांचा अंमल उडवून लावण्यासाठी "उदीना" ला वेढा दिला.[६] मराठ्यांचा काफिला नोव्हेंबर १७६४ मध्ये जवाहरमलाने उधळून लाविला.[७] सप्टेंबर १७६५ मध्ये बादशहाने नजीबखान रोहिल्यास जाटांचा पराभव करण्यासाठी मराठ्यांची मदत घेण्यास सांगितले. या हेतूने बादशहाने आपला वकील महमदखानास मल्हारराव होळकर याजकडे बोलणी करण्यास पाठविले.[८] डिसेंबर १७६५ त गोहदच्या जाटाने मराठ्यांविरुद्ध कहर मांडिला. अताजी माणकेश्वरचा मुलगा बहिरो अनंत याजकडील गुलगढी या घेतल्या म्हणून बहिरो अनंत

१. सरकार, Fall of the Mughal Empire, Vol. 2, pp. 334—342.

२. पु. द. ३, ले. ११७.

३. सरकार, फॉल ऑफ द मोगल एम्पायर, भा. २, पृ. ५४८.

४. पे. द. (न) ३, ले. ७५.

५. कित्ता, ले. ७७.

६. कित्ता, ले. ७९.

७. कित्ता, ले. ७८.

८. कित्ता, ले. ८०.

पेशव्याकडे फौजेची कुमक सांगू लागला.[1] जाटांचा बंदोबस्त करण्यासाठी रघुनाथदादा फौजेसह गोहदेस आले आणि त्यांनी गोहदच्या किल्ल्यास वेढा दिला.[2] गोहदकर मराठ्यास खंडणी देईना. राजकारण सलुखाचे लागेना. चमेलीपलीकडील राजे एक झाले. त्यांनी मराठ्यांची रसद बंद केली. त्यामुळे फौजेत महर्गता वाढली. जाटशरण येईना. शेवटी महादजी शिंदे यांचे मध्यस्तीने गोहदकराने १५ लाख खंडणी करार केली. तेव्हा गोहदचे मोर्चे उठले.[3] यापूर्वीच मल्हारराव होळकर २० मे १७६६ रोजी निवर्तले. दादाने बादशहाच्या म्हणण्याप्रमाणे बादशहास घेऊन दिल्लीस जावयास हवे होते. पण इग्रजांच्या वाटेस न जाता दादा धोलपुरास जवाहरमल जाटाचे पारिपत्य करण्यासाठी गेला. यावेळी दादा पैशाच्या पेचात होता. त्याच्या सैन्याचे पगार थकले होते. इतक्यात पंजाबात अहमदशहा अब्दाली आल्याची बातमी आली. त्यावेळी जवाहरमल जाटाकडून रघुनाथरावाशी सलुखाचे बोलणे करण्यास त्याचा वकील आला. आपला जाट राजा रघुनाथरावाबरोबर अहमदशहा अब्दालीवर स्वारी करण्यास येण्यास तयार आहे असे सांगून रघुनाथरावास त्याने काही नजराणा दिला. होळकरांकडे जी खंडणी देण्याचे गतवर्षी कबूल केले होते ती या वर्षी खंडणी देण्याचे जवाहरमलने कबूल केले. तात्पुरता तह घडून येऊन जवाहरमल भरतपुरच्या इशान्येस जहागीर करून राहिला. दादाने दक्षिणेचा मार्ग पत्करला. १७६७ च्या फेब्रुवारीत तो चमेलीवरून परत फिरला. दक्षिणेकडे येताना दिनांक २७ मार्चला अहिल्याबाईचा पुत्र भालेराव मरण पावला. तेणेकरून नवीन वारस नेमताना पैसे उकळण्याची संधी दादास आली. ती त्याने फुकट दवडली नाही. अहिल्याबाई आपणास बधत नाही हे पाहून त्याने गंगाधर चंद्रचूड व चितो विठ्ठल या आपल्या दोघा पक्षकार यांस इंदूरवर चालून जाण्यास सांगितले. अहिल्याबाईनेही इंदूरच्या संरक्षणाची जारीने तयारी केली; तेव्हा आपली फटफजिती टाळण्यासाठी ह्याचा बेत तहकूब करून दादा अहिल्याबाईस भेटले. अहिल्याबाईने वारसाचा प्रश्न पुण्यास पेशवे याजकडे सोपविल्यामुळे दादासाहेबांचे काहीच चालले नाही. त्यांना हात हालवीत आनंदवल्लीस जून महिन्यात यावे लागले.

### जाटांचे पारिपत्य :

दरम्यान मागे गोहदेस बसलेला दादाचा जम जाटाने मोडून काढिला. भरतपुर जवाहरमलाने बुंदेलखंडावर स्वारी करून मराठ्यांची त्या प्रांतातील सर्व स्थळे काल्पीपर्यंत काबीज केली. फक्त ग्वाल्हेर आणि झाशी मराठ्यांकडे राहिली.[4] ऑक्टोबर १७६७ पर्यंत सबंध बुंदेलखंड जाटांच्या अमलाखाली आणिला. काल्पीचा सुभेदार बाळाजी गोविंद खरे यास त्याने हाकलून दिले.

१. कित्ता, ले. ८१.
२. कित्ता, ले. ८३.
३. खरे, लें. ५९४, ६१०, ६३३ ! पे. द. २९, १६४-५.
४. कित्ता, ३९, ले. ६०.

पंजाबात अहमदशहा अब्दालीने स्वारी केली. मराठ्यांनी पानिपतनंतर उत्तरेकडे पाहिले नाही. अहमदशहा अब्दालीने १७६४ मध्ये पेशव्यांकडे आपले वकील पाठवून मराठ्यांशी सलुख केला.[१] यावेळी मराठे पंजाबला आले असते तर पंजाब त्यांना कदाचित मिळाला असता पण पानिपतनंतर पंजाबात शिखांनी आपला जम एवढा बसविला की, अब्दाली १७६७ मध्ये पंजाबवर चालून आल्यावर त्याचा दणदणीत पराभव करून त्यास परत जायला लाविले. सन १७७३ मध्ये अहमदशहा मरण पावला. पंजाब मराठ्यांच्या हातचा कायमचा गेला. पुण्यास उत्तरेतील घडामोडीच्या बातम्या थडकल्या. पेशव्यास उत्तरेत स्वारी करण्याची तयारी करावी लागली. इतक्यात जवाहरमल जाटावर जयपुरच्या राजाने स्वारी केली आणि मावंढ्यास १४ डिसेंबर १७६७ रोजी जवाहरमलचा दणदणीत पराभव केला.[२] जवाहरमलचा पुढील वर्षी जुलै १७६८ मध्ये त्याच्याच नोकराने संतापून खून केला.[३] त्याचा वारस रतनसिंग याचा ८ एप्रिल १७६९ ला गोसावी साधुने खून केला.[४] रतनसिंगाचा अल्पवयीन मुलगा केसरीसिंग गादीवर आला. त्याचा कारभार जाट सरदार दाणाशहा पाहू लागला. दाणाशहा हा नवलसिंगाचा मेहुणा पण नवलसिंग व रणजितसिंग ही रतनसिंगाची मुले असल्यामुळे त्यांना दाणाशहा या त्रयस्थाने कारभार करावा हे आवडले नाही. दाणाशहावर या दोघानी स्वारी करून त्यास डीगच्या किल्ल्यात कोंडून धरिले व सत्तेचा त्याग करून जाईन या अटीवरच त्यास सोडून दिले. दाणाशहा निघून गेल्यावर नवलसिंग व रणजितसिंग यांच्यात भांडणे सुरू झाली. रणजितसिंगाने डीगचा किल्ला ताब्यात घेऊन आपल्या भावाविरुद्ध कारवाई करू लागला. एवढ्यात मराठे उत्तरेत आले. जवाहरमल जाटाने मराठ्यांची बळकावलेली ठाणी परत घेण्यासाठी व उत्तरेत मराठ्यांचा अंमल बसवून दिल्ली आपल्या ताब्यात घेण्यासाठी माधवराव पेशवे उत्तरेत फौज पाठविण्याच्या विचारात होते.

**रामचंद्र गणेशची स्वारी** (सन १७७० जानेवारी ते १२७७ जून) :

दादासाहेबांशी गृहकलह व जानोजी भोसल्यांशी भांडण निघाले. त्यामुळे १७६९ साल उजाडले. या दोन्ही गोष्टींची समाप्ती सन १७६९ त झाल्यावर माधवराव पेशव्यांनी उत्तरेस स्वारीवर रामचंद्र गणेश कानडे या सरदाराची मुख्य म्हणून नेमणूक केली आणि विसाजी कृष्ण बिनीवाले यास त्याचा कारभारी नेमिले.[५] तुकोजी होळकर व महादजी शिंदे यासही या स्वारीबरोबर जाण्याचे हुकूम काढिले.[६] त्या प्रत्येकाबरोबर पंधरा-पंधरा हजार फौज होती. रामचंद्र गणेश व विसाजीपंत यांच्या खास पथकाची पांच हजार व

१. पे. द. २९, ले. २४, ५४.
२. पे. द. २८, ले. १९२.
३. पे. द. २९, ले. १९२, C. P. C. II, 789, 835, 1100.
४. सरकार, फाल ऑफ मो. ए. ३, पृ. ४.
५. Grant Duff, Vol. I, pp. 562, 570.
६. Ibid, Vol. I, p. 563.

हुजरात पंधरा हजार मिळून एकंदर पन्नास हजार फौज व शिवाय पायदळ व तोफखानाही बरोबर होता. नर्मदा तरून हे मराठा सैन्य प्रथम बुंदेलखंडात गेले. तेथे त्याचे तीन भाग झाले आणि त्यांनी तीन कामगिऱ्या स्विकारून त्या पार पाडल्या. रामचंद्र गणेश बुदेलखंडात पावसाळ्यात छावणीस राहिला व त्या प्रांतातील जमीनदारांकडून खंडण्या घेतल्या. महादजी शिंदे यांनी उदेपुरकरांकडून खंडणी वसूल केली.[१] तुकोजी होळकरने बुंदी, कोटा आदि संस्थानांकडून खंडण्या घेतल्या[२] आणि १७६९ चा पावसाळा संपताच हे तिन्ही सरदार जाटांच्या समाचारास गेले. जवाहरमल जाटाचा भाऊ नवलसिंग जाट याने मराठे भरतपुरावर येणार हे गृहित धरून त्यांच्याशी मुकाबला करण्यासाठी जोराची तयारी केली होती.[३] मराठे भरतपुरवर चढाई करून आले आणि त्यांनी जाट सैन्याची धुळधाण केली तेव्हा नवलसिंग शरण आला. त्याने मराठ्यास आग्रा प्रांत व किल्ला आणि पासष्ट लक्ष रुपये खंडणी देण्याचे कबूल केले. आग्रा प्रांतांत आपला अंमल मराठ्यांनी बसविला आणि पुढे डीगवर मोर्चे लाविले. मराठ्यांच्या जाटांवरील विजयाने त्या बादशहास आपण दिल्लीस जाण्यास त्यांची मदत घ्यावी असे वाटू लागले. जाटांचा उल्लेख मराठ्यांनी केल्यास आपण ५० लाख रुपये त्यास खर्चास देऊ असे बादशहाने मराठ्यास सांगून पाठविले. इतक्यात उत्तरेतील राजकारणात प्रामुख्याने भाग घेणारा जयपुरचा राजा माधोसिंग २१ डिसेंबर १७६७ मध्ये वारला. त्यावेळी त्याच्या राज्यात गादीसंबंधी तंटे उपस्थित झाले. त्याच्या गादीचा वारस प्रतापसिंह मराठ्यास मिळाला. तसेच भोपाळच्या नबाबानेहि सलुख केला. माधवराव पेशव्याच्या इच्छेप्रमाणे मराठ्यांना दिल्लीला जावून दिल्लीचा ताबा घ्यावयाचा होता. पण जाटांचा अडसर होता तो आग्रा घेतल्यामुळे दूर झाला. तेव्हा दिल्लीस नजीब होता. त्याला कापरे भरले. मराठे दिल्लीवर चालून आल्यास आपला नायनाट करतील हा विचार त्याच्या मनात येताच त्याने मराठ्यांशी संगनमत करून त्यांना त्यांचे शत्रू जे रोहिले, पठाण व शुजाउद्दौला यांनी यमुनेच्या पलिकडील बळकाविलेला प्रदेश मिळवून देण्यास मदत करण्याचे आश्वासन दिले. त्याप्रमाणे मराठे एप्रिल १७७० मध्ये यमुना पार होऊन फरुकाबादच्या अहमदखान बंगषाच्या मुलुखात आले. त्यांनी रामघर येथे आपल्या सैन्याचा तळ नजीबच्या सांगण्यावरून दिला. नजीबखानान आपला दुटप्पीपणाचा पानिपतपूर्वीचा जुना डाव खेळण्यास सुरुवात केली. ह्यावेळी त्यास त्यावेळेप्रमाणे अब्दालीसारखा परकीय योद्धा मदत करणारा नव्हता. एवढाच फरक. गंगेच्या पलिकडे अहमदखान बंगषाच्या सैन्याची छावणी होती. या अहमदखानाशी नजीबने गुप्त संधान अशा रीतीने ठेविले की, त्यामुळे मराठे, पठाण व रोहिले यांच्या कचाट्यात सापडून त्यांचा समूळ नाश व्हावा. मराठ्यांना रामघाटला

१. पे. द. ३८, ले. १८५.
२. कित्ता, ३९, ले. ९७.
३. C. P. C. III, p. 161.

असता आपण पठाणांकडून घेरले गेलो आहोत हे त्यांच्या लक्षात आले. नजीबवर विश्वास न ठेविता दिल्लीचे राजकारण करावे ; इतकेच नव्हे तर त्याचा समूळ उच्छेद करावा, असे मत रामचंद्र गणेश, महादजी शिंदे यांचे. पण होळकर व विसाजी कृष्ण यांचे मत असे पडले की, आपले काम साधेपर्यंत तूर्त त्यास हाताशी धरावा व नंतर त्याचे पारिपत्य करावे. अशा तऱ्हेने मुख्य सरदारात मतभेद होऊन दोन्ही पक्षांचे म्हणणे पुण्यास पेशव्यांकडे निर्णयाकरिता कळविले. तेव्हा पेशव्यांनी कळविले की, तूर्त दिल्लीच्या राजकारणात नजीबचा काही फायदा होत असल्यास तो करून घ्यावा, त्याच्याशी कायम दोस्ती करू नये. रामघाटवर छावणी असता यमुना, गंगा या नद्यांना पावसामुळें पूर आले. त्यामुळे मराठी फौज कोंडल्यासारखी होऊन त्यांना हालचाल करिता येईना. त्यामुळे पुण्यास माधवराव पेशव्यास वाटू लागले की, आपले लोक नजीबच्या नादी लागून फसले म्हणून पेशव्यांनी दुसरी फौज उत्तरेत मदतीकरिता पाठविण्याची तयारी सुरू केली. इतके होईतो अश्विन महिना उजाडला. आणि पावसाळा कमी झाल्यामुळे नद्यांचे पाणी ओसरून मराठ्यांच्या कोंडलेल्या फौजेस चारी दिशा मोकळ्या झाल्या. शिवाय मराठ्यांनी आपल्या फौजा मोठ्या शिताफीने यमुनेच्या पलीकडे उतरविल्या. त्यामुळे मराठ्यांच्या फौजेस सुरक्षितता निर्माण झाली.

नजीब उद्दौला मराठ्यांच्या लष्करातून आपल्या घरी नजीबगडला जात असता वाटेत दिनांक ३१ ऑक्टोबर १७७० रोजी मरण पावला. नजीबाचा मुलगा जाबिताखान हाही मराठ्यांच्या लष्करात होता. नजीबच्या मृत्यूची वार्ता ऐकताच रामचंद्र गणेशाने जाबिताखानास एकदम नजरकैदेत ठेविले. यावेळीही जाबिताखानास तुकोजी होळकराने मदतीचा हात देऊन एका अंधाऱ्या रात्री लष्करातून बाहेर काढून लाविले. अशा रीतीने नजीबखानास पाठीशी घालण्याची मल्हारराव होळकर परंपरा तुकोजीने चालविली.

जाबिताखानाची सुटका होताच तो बादशहाकडे तडक जाऊन त्याने मीरबक्षीचा किताब बादशहाकडून घेतला. अशा आपल्या वाढीव अधिकाराच्या गुर्मीत त्याने मराठ्यांशी ताबडतोब युद्ध करण्याचे ठरवून तो दुआबात रामचंद्र गणेशवर चालून गेला. यावेळी पावसाचे दिवस संपले होते. रोहिले व पठाण मराठ्यांविरुद्ध एक होऊन लढू लागले. रोहिल्यांचा मुख्य सरदार हाफीज रहमत याने लढाईची शिकस्त केली. मराठ्यांनी कित्येक लढायात रोहिल्यांचा पराभव केला. बहुतेक दुआब प्रांत मराठ्यांनी लुटून फस्त केला. शेवटी नाईलाज होऊन रोहिल्यांचा पुढारी हाफीज रहमत याने सन १७७१ च्या मे महात लढाईतून पळ काढिला. तेव्हा अहमद बंगष मराठ्यास एकटाच सापडला. त्याला आपला बचाव होण्यासाठी मराठ्यास शरण येणे भाग पडले. अहमदखान बंगषास आपण शरण आल्याचे मरणप्राय दुःख होऊन तो सन १७७१ च्या जुलै महात मरण पावला.

अहमदखान बंगषबरोबर लढाई चालू असता इकडे बादशहास दिल्लीस आणून तक्तावर बसविण्याचे मराठ्यांचे प्रयत्न चालूच होते.

बादशहा शहाअलम यावेळी इंग्रजांच्या पेन्शनवर अलाहाबादेस रहात होता. बादशहाला सर्व सुखसोई इंग्रजांनी दिल्या होत्या. पण आपण दिल्लीस गेल्याशिवाय आपल्या सार्वभौमास काही अर्थ नाही, असे बादशहास वाटत असे. सन १७६१ पासून इंग्रजांनी दरवर्षी बादशहास दिल्लीस नेऊन तक्तावर बसविण्याची आश्वासने दिली. १७७०, ९ मे ला त्याने बंगालच्या गव्हर्नरास एक लांबलचक पत्र लिहून आपण दिल्लीस जाण्यास का उत्सुक आहो हे कळविले होते.[१] तसेच बादशहाची आई झिन्नत महाल आणि वडील राजपुत्र जवान बख्त बादशहास दिल्लीस येण्यास वारंवार लिहित होते.[२] नजीब बादशहाच्या गैरहजेरीत दिल्ली कारभार रेटीत होता. पण त्यासही बादशहाच्या अनुपस्थितीत भारी पडायला लागले. नजीब ऑक्टोबर १७७० मध्ये मरण पावल्यावर त्याचा तरुण व शासकीय कारभारात नवखा मुलगा झबिताखान यावर भिस्त ठेवणे त्यास कठीण होऊन बसले. आपण जर लवकर दिल्लीस गेलो नाही तर मराठे किंवा शीख दिल्ली तक्तावर कोणाला तरी बसवतील अशी साधार भीती शहा अलम यास वाटत होती.[३] रघुनाथरावाकडून बादशहा दिल्लीस तक्तनशीन झाला नाही तेव्हा शिखांनी बादशहास दिल्लीस नेऊन बसवितो असे सांगितले. बादशहाला शिखांचा भरवसा वाटला नाही म्हणून तो कबूल झाला नाही.[४] तेव्हा मराठ्यांच्या मदतीने आपण दिल्लीस जावे असे शहाअलम यास वाटू लागले. शहा अलमचा हा विचार महादजी शिंद्यांच्या सल्ल्याने १७६८ मध्ये पंचाली किल्ल्यावर पक्का झाला.[५] मराठ्यांच्या नादास लागू नये म्हणून शहा अलम यास इंग्रजांनी विनविले. तेव्हा सुजाउद्दौल्यास बादशहाने आपणास दिल्लीस नेण्यास सांगितले. पण सुजा इंग्रजांच्या हातचे बाहुले होता. तो इंग्रज जे कृत्य करण्यास तयार नाहीत ते स्वतः कसे करील? त्याने नकार दिला.[६] महादजी शिंद्यांच्या पत्रावरून बादशहाने सैफुद्दीन महमदखान नावाच्या आपल्या हस्तकास मराठ्यांकडे पाठवून त्याजबरोबर दिनांक २७ डिसेंबर १७७० रोजीं करार केला.[७]

**करारांतील अटी अशा :** मराठ्यास बादशहाने १० लक्ष रुपये खर्चास द्यावे. मराठ्यांनी त्याला गादीवर बसवावे व पुढे दिल्लीच्या कारभारात मराठे जी जी धोरणे ठरवितील त्यास बादशहाने संमति द्यावी. पानिपत होण्यापूर्वी मराठ्यांकडे ज्या ज्या जहागिरी चालत होत्या त्या त्या पुन्हा सुरू कराव्या. चौथाईची तुंबलेली बाकी द्यावी, बादशहाच्या शत्रूचे मराठ्यांनी पारिपत्य करावे व पुढील मोहिमा दोघांनी मिळून करून लूट सारखी वाटून घ्यावी.

१. C. P. C. III, 199.
२. Sarkar, Fall of M. E. II, P. 404,
३. C. P. C. I, 2688.
४. C. P. C. I, 2735.
५. C. P. C. II, 1007.
६. C. P. C. III, 330.
७. C. P. C. II, 480, 548.

याप्रमाणे करार झाल्यावर बादशहा आपल्या लवाजम्यानिशी प्रयाग सोडून दुआबात फरुकाबादेस आला. तिथून जानेवारी १७७१ मध्ये निघून तो दिल्लीसमोरील पातपरंग येथे दिनांक ५ फेब्रुवारीस येऊन मुकाम केला. बरोबर महादजी शिंदे होते व विसाजी कृष्ण होतेच. त्यांनी दिनांक ९ रोजी दिल्ली किल्ल्यावर मारा करून दिल्ली ताब्यात घेतली[१] व जाबिताखानास घालवून शहा अलम बादशहास दिल्ली तक्तावर नेऊन बसविले आणि ठरल्याप्रमाणे काही पैसे मिळाल्यावर दिल्लीचा बादशहा पण नजीबजंगला येऊन तीन महिने थांबला आणि नोव्हेंबर १७७१ मध्ये त्याने दिल्लीची वाट धरिली. दिल्लीत बादशहा दिनांक ६ जानेवारी १७७२ रोजी पोहचला.[२]

**पानिपत पराभवाचा वचपा :**

बादशहाची दिल्लीस स्थापना केल्यावर रोहिल्यांवरील मोहिम मराठ्यांनी हाती घेतली. १७७२ च्या प्रारंभी बादशहा व मराठे यांच्या फौजा एकत्र होऊन जाबिताखानाचा सूड घेण्यास सिद्ध झाल्या. जाबिताखानाने शुक्रतालचा आश्रय घेतला. पण मराठ्यांनी तिथून हुसकून लाविल्यावर तो चंडीघाटाच्या उताराशी गंगा उतरण्याकरिता आला. तेथे त्याच्या फौजेवर तोफांचा मारा करून मराठ्यांनी त्याची फौज धुळीस मिळविली. पुढे तो नजीबाबादला गेला तेव्हा तेही स्थळ मराठ्यांनी काबीज केले व नजीबउद्दौल्याची तेथील कबर फोडून छिन्नविछिन्न करून टाकिली. नंतर मराठ्यांनी फत्तरगडास वेढा घातला व तो किल्ला घेतला. या ठिकाणी नजीबउद्दौल्याने पानिपतच्या लढाईत मराठ्यापासून लुटून घेतलेली अपार संपत्ती साठवून ठेविली होती. ती सर्व मराठ्यांनी ताब्यात घेतली. जाबीताखानाच्या बायकामुलास सुरक्षित स्थळी पोचविले. नंतर घोसगडचा किल्ला घेऊन जाबिताखानाच्या जहागिरीचा सर्व मुलूख काबीज केला. मराठ्यांची फौज सर्व रोहिलखंडभर पसरली व तो मुलूख त्यांनी जाळून बेचिराख केला. अशा रीतीने मराठ्यांनी पानिपतचा पुरा सूड उगवून पानिपतचे अपयश धुवून काढले.

सर्व रोहिलखंडभर मराठे पसरल्यावर हाफीज रहमतखान, फत्तेखान, सरदारखान, महीबुद्दीखान आदि रोहिले सरदार उत्तरेस सराईच्या रानात पळून गेले. मराठ्यांनी सर्व रोहिलखंडाचा विध्वंस करून टाकला आणि बादशहाकडून मीरबक्षीचे पद महादजी शिंद्याने पेशव्यांचे बंधु नारायणराव यास देवविले. उत्तरेतील मराठ्यांच्या पराक्रमाचे वृत्त ऐकून पेशव्यास आनंद झाला. मराठ्यांनी दिल्लीस आपली सत्ता प्रस्थापित केली. एक जाबिताखान काय तो काटा म्हणून त्यांना शत्रू राहिला. दिल्ली ताब्यात आल्यामुळे गेल्या तीन पिढ्या जे श्रम केले त्यांचे फळ मिळाल्याचे सार्थक झाले असे पेशवे आणि मराठा मंडळातील थोर अधिकारी यास वाटले. बादशहा

१. C. P. C. III, 632, 649; पे. द. २९, ले. २६५.
२. C. P. C. III, 717.

मराठ्यांच्या ह्या पराक्रमाने खजील झाला आणि पुन्हा मराठ्यांविरुद्ध अंतस्थ कारस्थाने करू लागला. पण त्या कारस्थानांमुळे तो पुढे कादीरच्या हाती सापडला आणि त्यास तक्त आणि डोळे गमवावे लागले. सरदारांपैकी महादजी शिंदे यांनीच त्यास वाचविले आणि दिल्ली तक्तावर पुन्हा आणून बसविले.

बादशहाप्रमाणे ब्रिटिशांना व सुजाउद्दौल्यासही हा मराठ्यांचा पराक्रम व त्यांचे दिल्लीवरील वर्चस्व आवडले नाही. सुजाने वास्तविक मराठ्यांशी संगनमत करून ब्रिटिश छत्रापासून दूर व्हावयाचे ते न करता ब्रिटिशांची मदत घेऊन तो मराठ्यांचा उच्छेद करण्याच्या उद्योगास लागला. पण मराठे त्यासही पुरून उरले.

मराठ्यांमधील आपसातील कलहाच्या खुळाने यावेळीही डोके वर काढिले. महादजी, तुकोजी होळकर, विसाजी कृष्ण या सरदारांचे आपसात पटेना. राजकीय घडामोडीवर एक निर्णय होईना. तुकोजी होळकर जाबिताखानाचा पाठीराखा बनला. महादजी व विसाजी कृष्ण या दोघास हे आवडले नाही. बादशहाच्या मर्जीखातर जाबिताखानास मीरबक्षीपद व मीर्झा नजफखान यास कारभारी नेमिले. पण मराठ्यांनी जाबिताखानाचा पाडाव केल्यावर बादशहाने मिर्झा नजफखान यास मीरबक्षी करून मराठ्यांचा पाडाव करण्यास सांगितले. त्याप्रमाणे दिल्लीबाहेरील मराठ्यांच्या छावणीवर बादशाही फौजेने हल्ला केला. त्या प्रसंगी तो हल्ला परतवून लावून मराठ्यांनी बादशाही फौजेचा दणदणीत पराभव केला आणि बादशहा मराठ्यास शरण आला. त्यामुळ बादशहाची सर्वत्र नाचक्की झाली. याच वेळी पेशवा माधवराव पुण्यास कालवश झाले.

सुजा व रोहिले यांनी एकविचारे मराठ्यांची ठाणी उठविण्याचा चंग बांधला. तेव्हा तुकोजी होळकर व विसाजीपंत यांनी सन १७७३ च्या प्रारंभी तोफखान्यासह रोहिल्यावर चाल केली. रोहिले सरदार हफीज रहमतखान यामुळे घाबरून जाऊन त्याने मराठ्यांशी मैत्रीचा तह केला. हे सुजाउद्दौल्यास रुचले नाही. तो रोहिल्यांचा मनातून द्वेष करीत होताच. त्यांच्या पाडावासाठी त्याने इंग्रजांची पलटणे आणविली आणि रोहिल्यांचा निःपात कसा केला ह्याची वर्णने Soldiering in India सारख्या ब्रिटिशांनी लिहिलेल्या तत्कालीन पुस्तकात सविस्तर वाचावयास मिळतात. घोडनदीच्या लढाईनंतर माधवरावांनी दादांचा वडीलकीचा मान राखून स्वतः लहानपणा घेतला व दादांशी जुळते घेतले. दादासाहेब व आम्ही एक झालो हीच करोडाची गोष्ट जाहली असे या दिलजमाईनंतर माधवरावांनी आपल्या आईस लिहिले. इथून दादासाहेब व माधवराव हैदरावर चालून गेले. "माधवरावांच्या कर्तेपणाचा भरवसा आम्हास आला, सांप्रत कारभार तेच करतात, आमचे मर्जीप्रमाणे वर्ततात.[1] तिळमात्र वाकडे चालत नाहीत" अशी ग्वाही दादासाहेब देऊ लागले. माधवरावांनी चुलत्यास आपल्या इच्छेप्रमाणे कारभार करण्यास

१. ऐ. ले. सं. पृ. ५८७.

मोकळीक दिली. त्यावेळी दादासाहेबानी माधवरावांच्या वर्तणुकीची ग्वाही दिली. "चिरंजीव (माधवराव) बहुत शहाणे जाले आहेत. कारभार आपले मर्जीप्रमाणे करतात. श्री कृपेनें उभयता तीर्थरूपांपेक्षा (भाऊसाहेब व नानासाहेब) यांच्यापेक्षा अधिक करीत आहेत".[1] तदनंतर सुद्धा लोकांना असे वाटत होते की, "उभयतां श्रीमंत वहुत संतोषे एकविचारे आहेत. काही तिळमात्र दुजाभाव नाहीं".[2] असे विचार १७६७ पर्यंतचे ऐकायला येतात. तदनंतर १७६७ पासून मतभेदाचे प्रश्न उद्‌भवलेले दिसतात. सन १७६७ च्या ऑक्टोबरात आनंदवल्ली येथे राघोबांचे २५ लाख कर्ज फेडण्याची जबाबदारी उचलून माधवरावांनी तडजोडीस मान्यता दिली. यावेळी तडजोड मोठ्या कष्टाने झाली.[3] यानंतर राघोबादादांनी दत्तक मुलगा घेतला व शिंदे होळकरांसंबंधी दोघात मतभेद वाढला.

**राघोबादादांचा उद्वेगजनक उद्योग :**

(१) दादांचे मन—आत एक, बाहेर दुसरे; (२) राज्याच्या हिश्याची मागणी; (३) अहिल्याबाईकडून पैसे उकळण्याचा मोह.

**दादांचे मन.**—दादासाहेब ासपेशव्यांनी उत्तर हिंदुस्तानात पाठविले होते. ते गोहदच्या स्वारीहून १७६६ च्या आषाढात परत आले. पंतप्रधान नाशकास गेले. नाना फडणिसास दादांचा कारभारी नेमिले होते. त्यासही नाशकास बोलावून घेतले. अहमदाबादचा कारभार आपाजी गणेशाकडून काढून तो गोपाळ गणेशास सांगितला. ह्या खांदेपालटीमुळे उत्पन्नात तूट येऊ लागली. तसेच दादांनी बऱ्हाणपुरला नारो कृष्ण दुर्वे यास सुभेदार नेमिले. ही दोन्ही माणसे दादांची माधवरावास जुमानिनात तेव्हा पेशव्यांनी त्यास कैद करविले. दादास ही बातमी गोहदेस समजताच त्यांनी आपल्या पक्षातील शेटयाजी आयतोळयास लिहिले की, "नारो कृष्णानी आपले मतलबाकरिता चिरंजीवाचेच होऊन रहावयाचे होते. तुम्ही त्यास मदत करणे. आमचे अंग यात आहे असे दाखवू नये. जाहिराणा न होता गुप्त कुमक करणे. फौज येईल त्यास बाह्यात्कारी सामील होऊन चिरंजीवांची मर्जी राखणे, गुप्त प्रकार निराळाच करणे. शहर स्वाधीन करून नारो कृष्णानी तूर्त नाशकास जाऊन रहाणे हे पत्र फारच गुप्त ठेवणे. कोणास न दाखवणे". या पत्रावरून दादांच्या दुटप्पीपणाच्या स्वभावाची कल्पना येते. एक व्यवहार कधी त्यांनी सरळ केला नाही. प्रतिनिधी, शिंदे, होळकर यांचे सरंजाम ठरवितानाहि तोच घोळ आणि आपले हातचे राखून रहाणे चालू ठेविले.

दादा उत्तरेतून आले ते पुण्यास आले. त्यास फूस देणारे त्यांचे साथीदार होते. त्यांच्या सांगण्यावरून दादांनी माधवराव पेशव्यांकडे दौलतीच्या निम्मे भागाची मागणी केली. तेव्हा माधवरावांनी ही छत्रपतींची दौलत

१. ऐ. ले. सं. पृ. ९९७.

२. कित्ता. पृ. १०२७.

३. पे. द. १९, ले. ५९.

मी कोण वाटणार? तुम्हीच चालवणे. "आम्ही चार बारगीर तसे तुम्हाजवळ राहू". असे सांगितल. मतभेद वाढत चालले. तेव्हा दादासाहेब आनंदवल्लीकडे गेले. घोडपेचा किल्ला घेतला. पुढे ज्येष्ठ मासी माधवराव घोडपेस जाऊन घोडप किल्ल्याखाली लढाई झाली.[1] दादांच्या फौजेचा पुरा मोड झाला. चिंतो विठ्ठल जखमी होऊन पाडाव झाला. मोर्चेबंदी घालून किल्ल्यास गराडा घातल्यावर दादासाहेबांचा निरुपाय होऊन दादा सहकुटुंब किल्ल्याखाली येऊन पेशव्यांच्या स्वाधीन झाले.[2] त्यांना आणून माधवरावांनी शनिवार वाड्यात नीट बंदोबस्ताने ठविले. दादास जे सामील होते त्यापैकी गंगाधर यशवंत, बाजी विठ्ठल, आप्पाजी महादेव यांचे पारिपत्य नांवनिशीवार केले.[3]

**राज्यकारभारातील इतर गोष्टी :**

मराठ्यांच्या राज्यात झालेली स्थित्यंतरे लक्षात घेता असे म्हणावे लागते की, शाहु छत्रपति मृत्यूनंतर छत्रपति घराणे राजकारणात मागे पडले. पानिपत पराभवानंतर पेशवे बाळाजीराव दुःखातिवेगाने मरण पावले. मराठी राज्याची धुरा वाहण्यास माधवरावांसारखा कणखर धैर्याचा आणि असाधारण कर्तृत्वाचा पेशवा पुढ आला. पण त्याच्या कर्तृत्वास राघोबादादांचे ग्रहण होते. त्यामुळ त्यास दादांनी निर्माण केलेले कलह व भांडण मिटविण्यासाठी आपली बुद्धी आणि शक्ति वेचावी लागली. गृहकलहाची साथ सरदारांपर्यंत पोहचली. शिंदे, होळकर, गायकवाड आणि भोसले ही सरदार मंडळी मराठशाहीचे मुख्य आधारस्तंभ. पण यांच्या घरातील गृहकलहही विकोपास गेले आणि ते विकोपास घालविण्यास दादासाहेबांची वर्तणूक कारणीभूत झाली. शेवटी वरील सरदारांचे गृहकलह माधवराव पेशवे यांस स्वतः जातीने लक्ष घालून मिटवावे लागले तो प्रकार असा :

राणोजी शिंदे व मल्हारराव होळकर ह्या दोन सरदारास पेशवे बाजीराव यांनीं माळवा हस्तगत करण्याचे सर्वाधिकार सन १७२३ मध्यें दिले.[4] माळव्यातील जमीनदार व संस्थानिक यांजशी चौथाईचे व खंडणीचे करार करण्याची मुखत्यारीसुद्धा पेशव्यांनी या दोन सरदारास १७३०-३१ साली दिली.[4] ह्या दोन सरदारांनी पवारांच्या सहाय्याने माळवा प्रांतात मराठ्यांचा अंमल जारी करण्याचे प्रयत्न सुरू केले. सबब या तीन सरदारास माळव्यातील जिंकलेल्या परगण्यात होणारा वसूल फौजेच्या सरंजामासाठी वाटून द्यावा असे ठरले. या प्रांतातील मराठ्यांच्या ऐन वसुलातून राजबाबती व सरदेशमुखी याबद्दल शेकडा ३५ रुपये हुजूर दरबाराकरिता काढून बाकी राहिलेले शेकडा ६५ पवार, शिंदे व होळकर यांनी सारखे वाटून घ्यावे असे

१. पे. द. १९, ले. ९२
२. कित्ता, ले. ९१-९२.
३. कित्ता, ले. ८४
४. कित्ता, ३०, पृ ३०४-६, दिघे बाजीराव, पृ. १०९.

ठरले. शिंदे, होळकरांनी बादशहापासून उदेपूर, पेडता, नागोर व अजमेर ह्या प्रांतातून चौथाई वसूल करण्याची सनद मिळविली. माळव्याचा कारभार त्यांनीच हाकावा म्हणून बादशहाने माळव्याची सुभेदारी ह्या दोन्ही सरदारास बहाल केली.[1] राणोजी शिंदे, सिरोंज, राजगड व पाटण्यापर्यंत गेला आणि त्याने चौथ वसूल केला.[2]

राणोजी शिंदे यास पहिल्या बायकोपासून तीन व खांडाराणी चिमाबाई हिजपासून दोन मिळून पाच पुत्र होते. पैकी जयाप्पा, जोत्याजी, दत्ताजी व तुकोजी हे पानिपतपूर्वी खपले.[3] जयाप्पाचा मुलगा जनकोजी पानिपती मारला गेला. तेव्हा पानिपत नंतर महादजी व दत्ताजीचे मुलगे केदारजी, खलोजी व आनंदराव एवढेच काय ते शिल्लक राहिले. माधवराव पेशवे होऊन कारभार रघुनाथरावांचे हाती आल्यांवर त्यांनी केदारजीस सरदारकीची वस्त्रे दिली आणि त्याजपासून नजराणा घेतला. यामुळे केदारजी शिंद्यांच्या दौलतीचे वारस झाले आणि महादजीस काही काळ वनवास भोगावा लागला. उत्तरेच्या राजकारणासाठी शिंदे, होळकरांची नेमणूक माधवराव पेशव्यांनी केली तेव्हा त्यांनी दादांनी ज्या महादजी शिंद्यास बंडखोर म्हणून जाहिर केले होते त्यास शिंद्यांच्या दौलतीची वस्त्रे नारो शंकरामार्फत पाठवून सन १७६८ मध्ये त्यास उत्तर हिंदुस्थानचे स्वारीस जाण्यास हुकूम सोडिले.[4] केदारजी पुढे १७७७ मध्ये निवर्तल्यावर महादजी शिंद्यांचे दौलतीचे निर्विवा वारस ठरले.

होळकरांच्या गादीच्या तंटयाविषयी वर उल्लेख आलेला आहेच. आता गायकवाड व भोसले यांच्या भावकीच्या तंटयासंबंधी पाहू.

**गायकवाड.**—गायकवाड हे दाभाडयांचे गुजरातेतील हस्तक. खंडेराव दाभाडे यांचे पुत्र त्रिंबकराव आणि पिलाजी गायकवाड यांनी आपल्या फौजा सन १७१९ पासून सतत गुजरातेत नेऊन मराठी सत्तेचा विस्तार गुजरातेत केला. त्रिंबकराव दाभाडे डभई येथे १७३१ मध्ये मारले गेल्यावर दाभाडयांतर्फे गुजरातची व्यवस्था गायकवाड पाहू लागले. दमाजी गायकवाडांनी आपल्या पराक्रमाने गुजरात, काठेवाड व्यापिले. पेशवे बाळाजी बाजीराव यांनी ह्या गायकवाडांशी सन १७५२ मध्ये करार करून गुजरात, काठेवाडची वाटणी झाली. दमाजीनीं पेशव्यांच्या तंत्राने वागावयाचे ठरविले. पेशव्यास गुजरातेतील अंमलाचा निम्मा हिस्सा दिला आणि पेशवे मागतील त्यावेळी गायकवाडांनी त्यांना दहा हजार घोडेस्वारांची मदत द्यावी हे कबूल केले. त्याप्रमाणे दमाजी गायकवाड पानिपतावर भाऊसाहेबांबरोबर गेले. माधवराव या चुलत्या-पुतण्याची भांडणे सुरू झाली. दमाजी गायकवाड यांनी

१. सरकार, भा. १, पृ. २५५.
२. पे. द. १४, पृ. २९.
३. महादजी जीव वाचवून दक्षिणेंत पानिपताहून आले रा. खं. १, ले. २८५.
४. म. रि. माधवराव, पृ. २००.

रघुनाथरावांसह बऱ्याच स्वाऱ्या केल्या असल्यामुळे त्यांचा ओढा त्याजकडे अधिक होता. पण दमाजी गायकवाड तसे धूर्त; त्यांनी पेशव्यांच्या गृह कलहात कोणाचीच बाजू घेण्याचे टाळले. पण आपले चिरंजीव गोविंदराव यांच्याबरोबर पथक देऊन रघुनाथरावांच्या मदतीस पाठविले. पेशव्यांनी दादांचा घोलप येथे पराभव केल्यावर दादांच्या पक्षास जे सरदार मिळाले होते त्यांना कठोर शिक्षा ठोठाविल्या. त्यात गोविंदराव होते. गोविंदरावास कैद करून त्याच्या गैरवर्तणुकीबद्दल ह्याजवर २३ लाख रुपये दंड माधवरावांनी लादला. दरम्यान दमाजी बाबांची प्रकृति बिघडून त्यांचा अंत सन १७६८ मध्ये झाला. दमाजीबाबांच्या पश्चात गादीच्या हक्कासाठी दमाजी बाबांच्या पुत्रात चुरस सुरू झाली. दमाजीना तीन बायकांपासून चार पुत्र होते. पहिल्या बायकोपासून गोविंदराव हे, दुसऱ्या बायकोपासून जन्मलेल्या सयाजीरावांपेक्षा लहान, तिसऱ्या बायकोपासून मानाजी आणि फत्तेसिंग. गोविंदराव कैदेत पुण्यास असल्यामुळे त्यांना पेशवे दरबारी खटपट करून गादी मिळविणे सोपे गेले. दमाजीबाबांच्या मृत्यूनंतर सहा महिन्यांनी फत्तेसिंग गायकवाडांना माधवराव पेशवे यांनी खरमरीत पत्र लिहून पुण्यास येण्याची आज्ञा केली. "गोविंदराव येथे आहेत. साऱ्या बंधूनी येथे यावे. योग्यतेनुरुप आज्ञा केली जाईल, दौलतीत बखेडा कराल तर कार्यास येणार नाही. वाकडी गोष्ट कराल तर फल समीप आहे, मुलाहिजा होणार नाही. सयाजीराव, तुम्ही जलद हुजूर येणे. आज्ञा अमान्य केल्यास पारिपत्य होईल".[1]

पेशव्यांनी गायकवाडांचा सर्व सरंजाम ताब्यात घेण्यासाठी अप्पाजी गणेश व त्याचा पुत्र चिटको अप्पाजी यास गुजरातेत रवाना केले.[2] भीषण दंड गायकवाडांचे गळचात बांधला. गायकवाडांकडून एकंदर आगळिकीचा हिशेब ६० लक्ष घेण्याचा ठराव माधवरावांनी केला. आणि गायकवाडास दिनांक २४ डिसेंबर १७६८ च्या पत्राने फर्माविले "दमाजीनें अन्यथा वर्तणूक केली. ते तुम्हावर नजर देऊन माफ करून दौलत बहाल केली. तुम्हाकडे अंतर पडल्यास क्षमा होणार नाही. सयाजी गायकवाड यास सेनाकर्ते व गोविंदरावास वडिलपण सेनाखासखेली सांगितली. सयाजीरावाने कारभार करावा. फत्तेसिंगाने त्यांच्याशी एकविचारे चालावे."[3] पेशव्यांनी गायकवाडास कठोर शिस्तीचा धडा शिकविला खरा पण यामुळे पुढील गायकवाड नेहमी मदतीकरिता इंग्रजांकडे पाहू लागले. पेशव्यांनी गोविंदरावास पुण्यातच दाबून ठेविले. सयाजीनी फत्तेसिंग बाबास साथ दिली. पेशव्यांनी वरील व्यवस्था रामशास्त्रींच्या सांगण्यावरून केली.

**नागपूरकर भोसले.**—नागपूरकर रघुजी भोसले व पेशवे यांचे अंतर्यामी ठीक नव्हते. रघुजीबाबांनी बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांती स्वाऱ्या

१. पे. द. इ. सं. पृ. १५८.

२. कित्ता, ३९, ले. ११९.

३. त. क. पृ. १६९; ऐ. लें. सं. ८२८; मा. रो. पृ. १४५.

करून राज्यविस्तार केला. रघुजी व पेशवे यांचे संबध शेवटी चांगले होते. पेशवे बाळाजी बाजीराव यांच्या कर्तृत्वास त्यांनी मान्यता दिली होती व पेशव्यांशी संबंध चांगले राखिले होते. रघोजीबाबा दिनांक १४ फेब्रुवारी १७५५ रोजी निवर्तले. त्यांना चार मुलगे होते. जानोजी, साबाजी, उधोजी व बिंबाजी. यांची व्यवस्था बाळाजी बाजीराव पेशव्यांनी लावून दिली. सेनासाहेब सुभा ही पदवी जानोजीस दिली. सेना धुरंधर असे नवीन पद निर्माण करून ते मुधोजीस दिले. पेशव्यांनी ह्या कारारावाबत आपणास वीस लाख रुपये भोसल्यांनी द्यावयाचे असे ठरविले. ह्या कराराच्या अगोदर व नंतरही मुधोजी व जानोजी ह्या दोन बंधूनी गादीकरिता आपसात लढाया केल्या आणि पेशव्यांशीहि वैर केले. आपण स्वतंत्र, पेशवे हे आपल्या सारखेच एक सरदार. छत्रपतीचे नातेवाईक आप्त आपण व नोकर पेशवे अशी भावना ह्या नागपूरकर भोसल्यांची होती. आपसातील भांडणामुळे आणि पेशव्यांचा द्वेष करीत राहिल्याने त्यांची सत्ता असलेले बंगाल, बिहार आणि ओरिसा हे तिन्ही प्रांत इंग्रजांनी घशाखाली घातले. तरी त्यांना काही वाटले नाही. किंबहुना ते इंग्रजांच्या वाटेस गेले नाहीत. पेशव्यांशीच झगडत राहिले.

माधवराव पेशवे गादीवर आल्यावर त्याजशी रघुनाथरावांची भांडणे सुरू झाली. ह्या भांडणात जानोजी भोसले उघडपणें रघुनाथरावांची बाजू घेऊ लागले. पेशव्यांबरोबरच्या भांडणातही कधी निजामाची मदत घेत तर कधी हैदराकडे संधान राखून त्यास पेशव्यांविरुद्ध उठव असे प्रकार जानोजीराव करीत असे.

जानोजीस वठणीवर आणण्यासाठी माधवराव पेशव्यानी निजामाच्या मदतीने सन १७६५ मध्ये भोसल्यावर स्वारी केली, तेव्हा दोन्ही सैन्यांनी वऱ्हाडाकडे कूच केले. या दोन्ही लष्कराच्यापुढे आपला टिकाव लागत नाही असे पाहून जानोजी भोसले शरण आले व तह केला.

इ. स. १७६८ मध्ये माधवरावांनी जानोजीवर दुसरी स्वारी केली. १७६७ च्या घोडपेच्या स्वारीत जानोजीनें उघडपणे रघुनाथरावदादांचा पक्ष स्विकारला. त्यांचा उद्देश असा होता की, माधवरावास पेशवाईवरून दूर करून रघुनाथरावांच्या नांवे सातारा छत्रपतिकडून पेशवाईची वस्त्रे आणणे. हे विचार जानोजीस सांगणे व त्याप्रमाणे पेशव्यांशी आपले वागणे ठेवले. हे काम भोसल्याचे दिवाण दिवाकरपंत आपला सल्ला देऊन करीत होते. पंत-प्रधानांनी भोसल्यांची खोड मोडण्याचे ठरविले आणि १७६८ मध्ये दुसरी स्वारी केली.

माधवराव पेशव्यांनी जानोजीवरील स्वारीसाठी निजामाची मदत मागितली व निजामाचा दिवाण रुक्नुद्दौला पेशव्यांच्या बोलावण्यावरून पुण्यास गेला. मैत्रीचे संबंध दृढ केले आणि जानोजीवरील मोहिमेत पेशव्यास सामील

झाला.[1] जानोजीनेही सैन्याची जमवाजमव करण्यास सुरुवात केली.[2] तयारी करण्यास वेळ मिळावा म्हणून जानोजीने सप्टेंबर १७६८ पर्यंत युद्ध लांबवावे अशी तजवीज केली. त्याने साबाजीस मोरोबा फडणिसाकडे पाठविले. मोरोबा आणि पेशवे एकविचारे चालतात[3] तेव्हा मोरोबांनी यात तोड काढावी, आपली भांडणे दिवाण दिवाकरपंत लावितात. पेशवे नसतील तर सारी दक्षिण यवनमय होईल, आम्ही पेशव्यांमुळेच जमत आहोत[4] पण हा सर्व बाह्य देखावा होता. अंतर्यामी दोघेही एकमेकांचा दुष्टावा करीत होते. जानोजी भोसलेने पिराजी निंबाळकरची मदत घेऊन चौदा हजार सैनिक गोळा केले.[5] त्याने हैदरखानास व मीर खलील यास मदतीकरिता पत्रे लिहिली.[6] पेशव्यांनी निजामाचा दिवाण रुक्नुद्दौला यास बरोबर घेऊन ही दोन्ही सैन्ये वऱ्हाडात घुसली. जानोजीचा वऱ्हाडातील गव्हर्नर नरहर बल्लाळ ह्यास पहिल्या झटापटीत प्राण गमवावे लागले.[7] पेशव्यांच्या फौजेने नागपूर लुटून अमळनेर आणि भंडारा हे किल्ले काबीज केले.[8] तेव्हा जानोजी पेशव्यांवर चाल करून येऊ लागला. त्यास गोपाळराव पटवर्धनाने अडविले. आपला पुढील मार्ग अडलेला पाहून जानोजीने पेशव्यांच्या मुलुखाची लुटालूट करण्यास सुरुवात केली.[9] त्याच्या पाठलागावर गोपाळराव व रामचंद्र गणेश यांना पेशव्यांनी सोडले.[10] जानोजीचा सरदार विठ्ठलपंत बल्लाळ याने खानदेश व वऱ्हाडात धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली. त्याला पेशव्याच्या फौजेने मारून काढले.[11] जानोजीच्या पाठलागावर सोडलेल्या गोपाळराव पटवर्धन व रामचंद्र गणेश यांना जानोजीचा पुरा मोड करणे त्यांचे जानोजीशी सूत जमल्यामुळे जमले नाही.[12] जानोजी पुण्याच्या रोखाने येऊ लागला. त्यास मदत करणारे राघोबा व इतर सरदार होतेच. पेशव्यास हेही ठावूक होते की, कदाचित इंग्रजसुद्धा जानोजीस मदत करील. ह्या भीतीस्तव पेशव्यांनी आपले नागपूर वऱ्हाडकडील सैन्य परत बोलाविले. आणि जानोजीचा चहूकडून पाठलाग सुरू झाला. तेव्हा त्याचे पंचवीस हजार सैन्य दाणा वैरणीशिवाय उपास करण्याच्या मार्गावर आले. माधवरावांची स्थितीसुद्धा काही चांगली

१. सेतु माधव पगडी, मराठे-निजाम, पृ. ८७.
२. पे. द. २०, ले. १९४.
३. कित्ता, ले. १९८.
४. कित्ता.
५. कित्ता, ले. २०२.
६. पे. द. २०, ले. २८७.
७. Grand Duff. Vol. I, P. 560 ; पे. द. २०, ले. २१५.
८. खरे, भाग ३, ले. ७८४; पे. द. २०, ले. २१६.
९. कित्ता, पृ. १३२८-१३२९.
१०. कित्ता, ले. ७८७.
११. पे. द. २०, ले. २२०, २२१.
१२. खरे, भाग ३, पृ. १३३०.

नव्हती.[१] दोन्ही बाजूचे वकील शांततेची बोलणी करण्यास सरसावले आणि एप्रिल १७६९ मध्ये पेशवा व जानोजी यांच्या भेटी होऊन कनकपुर येथे तह ठरला.[२] जानोजीने पेशव्यांनी जो सन १७६५ मध्ये ८ लाखाचा मुलूख दिला होता तो त्यास परत केला. तसेच पाच लाख रुपये खंडणी पाच हप्त्याने देण्याचे कबूल केले. औरंगाबादमधील पेशव्यांच्या स्थळांकडून घासदाणा वसूल करण्याचे हक्कही त्याने सोडले. पेशव्यानेसुद्धा आपण उत्तर हिंदुस्थानात सैन्य पाठविताना जानोजीच्या मुलुखास तोशीस देणार नाही, हे कबूल केले. जानोजी पेशव्यांचा शत्रू तो आपला असे मानून मरेपर्यंत[३] (मे १७७२) पेशव्यांशी एकनिष्ठ राहिला.

**जानोजी-इंग्रज संबंध :**

जानोजी भोसल्याशी इंग्रजांच्या त्यांना कटक प्रांत भोसल्याकडून मिळण्या-संबंधीच्या वाटाघाटीचा उल्लेख करणे आवश्यक होय. क्लाईव्ह ज्यावेळी दुसऱ्यांदा बंगालचा गव्हर्नर झाला त्यावेळी त्याने १७६६ मध्ये नागपुरास आपला हस्तक पाठवून नागपूरशी वाटाघाटी करून शांततेच्या मार्गाने कटक मिळविण्याचा प्रयत्न केला. जानोजीने ब्रिटिश वकिलाला भेट देण्याचे नाकारले. वेरेल्सत गव्हर्नर असताही इंग्रज-म्हैसुरकरांचे युद्ध चालू होते. अशा वेळी इंग्रज जानोजीशी तह करण्यास उत्सुक होते. त्यांचे दोन हेतू होते. एक जानोजीशी मैत्रीचा तह केल्यावर इंग्रज-म्हैसुरकरांच्या युद्धात पेशवा म्हैसुरकरांच्या मदतीस जाणार नाही आणि कलकत्तेकर इंग्रजास मद्रासकरांकडे भोसल्यांच्या प्रांतातून मदत पाठविणे सोपे जाईल. पण हीही योजना फुकट गेली. सन १७६९ मध्ये पेशव्यांनी जानोजीवर चढाई केली असताना भोसल्यांचा ओरिसातील गव्हर्नर संभाजी गणेश याने कलकत्तेकर इंग्रजांची मदत भोसल्यासाठी मिळविण्याचा प्रयत्न केला. पण इंग्रजांनी यावेळी तटस्थतेचे धोरण स्विकारले.

जानोजी भोसल्याचा पेशव्याकडून पराभव होऊन जानोजीने शरणागती पत्करल्यावर रघुनाथराव दादानी आपल्यावर लादलेली बंधने निमूटपणे स्विकारण्याचे नाकारले. सन १७६६ च्या मार्चमध्ये त्याने नजरकैदेतून पळून जाण्याचा प्रयत्न केला. तो फसला म्हणून पेशवे जानोजीचा बंदोबस्त करून पुण्यास परत आल्यावर त्यांनी (दादासाहेब) दहा दिवसांचे उपोषण केले. त्यात त्यांची प्रकृती बरीच खालावली. त्यांनी आपल्याकरता ५ लाखाची जहागिरी आणि दत्तक मुलाकरिता दोन लाखाची जहागिर मागितली. शेवटी असे ठरले की, दादासाहेबास दोन लाख रुपये दानधर्मा-करिता द्यावे, त्यांचे दत्तक मुलास वडगावास ठेवावे, आणि त्यांना पळून

१. पे. द. ३०, ले. २४५, २४९.
२. कित्ता, पृ. २७७-८०, २८३
३. कित्ता, ले. ३००, ३०१.

जाण्यास मदत केली होती त्यामुळे जे कैद झाले होते त्यांना मोकळे सोडावे.[१] यादी नंतर दादासाहेब पेशव्याविरुद्ध निजाम आणि हैदरअली याजशी संगनमत करताना आढळतात.[२] पण पेशव्यांच्या दक्षतेमुळे त्यांना काही गडबड करता आली नाही. शेवटी मार्च १७७२ मध्ये चुलत्या-पुतण्यामध्ये एक नवीन करार झाला. दादानी पाच लाख रुपये स्वतःच्या खर्चास घ्यावे. १० ते १५ लाख घोडेस्वार आणि इतर जनावरे यांच्या खर्चाकरिता व दादांचे अधिकारी आणि त्यांच्याबरोबर काम करणारी इतर माणसे यांच्या नेमणुका पेशव्यांनीच करावयाच्या. वर्षातून एकदाच कृष्णेला स्नानाकरिता जावयाचे. माधवरावांच्या शेवटच्या दिवसात दादा पुतण्याच्या आरोग्याकरिता प्रार्थना करीत असलेले आढळतात.

पुढे सन १७७२ साली लोकांच्या आग्रहास्तव फितुर राजकारण वगैरे प्रकरणे मिटल्यावर माधवरावांनी दादांची सुटका केली. आपण थेऊरास गेले तेव्हा दादासाहेबांसही थेऊरास बोलाविले. त्यावरून दादासाहेब दुसरे दिवशी रावसाहेबांच्या समाचारास थेऊरास आले. तेथे म्हातारीचे डोहावर मुक्काम करून राहिले. दुसरे दिवशी रावसाहेबांचे समाचारास आले. तेथे उभयतांची बोलणी झाली. रावसाहेबांनी दादासाहेबास विचारले की, आम्ही उभयता नारायणराव व मी असता आपण अमृतराव दत्तक घेतले त्यास आम्ही दोघांनी काय करावे व अमृतरावांनी काय करावे याची आज्ञा व्हावी. तेव्हा अमृतराव यास सात लक्षाची जहागिर द्यावी म्हणजे त्याचा अधिकार नाही असे मी लिहून देतो व मलाही बारा लक्षाची यादी करून द्यावी म्हणजे मीही दौलतीस अधिकार नाही असे लिहून देतो. एवंच माझी व्यवस्था ठरवून द्या असा दादांचा अति आग्रह पाहून पेशव्यांनी थेऊरास दिनांक ३० सप्टेंबर रोजी नऊ कलमी लेख पुरा करून व त्यावर कारभाऱ्यांची लेखी कबुलायत घेतली. (१) दौलतीने बंदोबस्त करावा. मसलत न करता कर्ज करावे, सावकारी देण्याची तोड काढावी. ऐशी पंचाऐशी लक्ष रुपये सावकारी देणे निघेल त्यापैकी पन्नास लक्षापर्यंत मामलेदारांवर वराता देविल्या. दादास पाच लक्षाची जहागीर निव्वळ लावून द्यावी. निदान सात लक्षाची जहागीर देऊन मर्जी राखावी अधिक मागू लागल्यास घेऊ नये. श्रावण मासाचा धर्मादाय पूर्वीप्रमाणे चालवावा. मातोश्रीस काशीची यात्रा घडवावी. काशीचे ब्राम्हणास वर्षासने द्यावीत. यापैकी दादांनी सावकारी देणे वारून खते परत घेतलेली रावसाहेबांपाशी दिली असे दादांचा आश्रित करंदीकर म्हणतो.[३] त्यामुळे रावसाहेब संतोष जाहले. दिवसेंदिवस प्रकृति क्षीण होत चालली. तेव्हा रावसाहेबांनी नारायणरावांचा हात धरून तो दादासाहेबांचे हातात दिला आणि म्हटले

१. खरे, भाग ३, ले. ८०८, पृ. १३०७-३८.
२. पे. द. २०, ले. १९८, २८७.
३. करंदीकर याद, बु. ३, पृ. ११.

की, 'याचा सांभाळ करावा. हर एकविसीचा दौलतीचा बंदोबस्त करणे तो आपणच वडीलपणे केला पाहिजे अशी विनंती केली.'[१] त्यावरून दादासाहेब यांनी सांगितले की, काळजी किमपी करू नये. पुढे कार्तिक वद्य ८, शके १६९४ (१८ नोव्हेंबर १७७२) रोजी माधवरावास देवाज्ञा जाहली.[२] नारायणरावसाहेब याजकडून उत्तरकार्य करवून स्वारी पुण्यास आली.[३]

● ● ●

---

१. पेशव्यांची बखर, देशमुख प्रकाशन पृ. ६४.

२. ऐ. ले. सं. ४, ले. १२२९.

३. कित्ता, ले. १२३०.

## नारायणराव पेशव्यांची ९ महिन्यांची कारकीर्द व बारभाईचे कारस्थान

(१७७३--१७७६)

### कालसूची

| | |
|---|---|
| १७३९ . . . . | शूर मराठे वसई येथे हिंदुधर्माच्या रक्षणार्थ आपले बलिदान करतात. |
| १७६५, ऑगस्ट १० . . | नारायणराव पेशवे यांचा जन्म होतो. |
| १७७२, मे . . . | जानोजी भोसले निपुत्रिक निवर्ततात. |
| १७७२, ऑक्टोबर . . | मॉस्टीन तिसऱ्या खेपेस पुण्यास येतो. |
| १७७२, नोव्हेंबर १८. . | माधवराव पेशवे निवर्ततात. |
| १७७२, डिसेंबर १५ . . | नारायणरावास छत्रपति रामराजे याजकडून पेशवाईची वस्त्रे मिळतात. |
| १७७२, डिसेंबर २० . . | नारायणराव छत्रपतींचा निरोप घेऊन वाईस येतात. |
| १७७२, डिसेंबर ३१ . . | नारायणराव पेशवे पुण्यास दाखल होतात व दरबार भरवितात. |
| १७७३, जानेवारी . . | इंग्रजांनी भडोच शहरावरील गायकवाडांचा वसुलाचा हिस्सा पूर्वीप्रमाणे दिला. |
| १७७३, जानेवारी . . | पेशवे व मुधोजी भोसले उभयपक्षी आलापुराजवळ कुंभारगाव येथे गाठ पडून मोठ्ठी लढाई होते. |
| १७७३, जानेवारी २८ . | पेशवे व मुधोजी यांची तडजोड होते. |
| १७७३, फेब्रुवारी ७ . . | दादासाहेबांची मुलगी दुर्गाबाई हिचे पांडुरंग बाबाजी नाईक यांच्याशी पुण्यात लग्न होते. |
| १७७३, मार्च १८ . . | नारायणराव पेशवे मातोश्रीस भेटण्यासाठी नाशिकास जातात. |
| १७७३, एप्रिल १८ . . | नारायणराव पेशव्यांनी दादांस वाड्यातच बंदीत ठेवले. |
| १७७३, ऑगस्ट १६ . . | साबाजी भोसले यास पेशवे "सेनासाहेब सुभा" पदाची वस्त्रे पाठवितात. |
| १७७३ . . . . | गाझीउद्दीन निराधार होऊन पुण्यास पेशव्यांकडे येतो. |
| १७७३, ऑगस्ट ३० . . | नारायणराव पेशव्यांचा गारद्यांकरवी खून होतो. |
| १७७३, सप्टेंबर १ . . | राघोबादादा स्वतःकडे कारभार घेऊन व्यवस्था पाहू लागतात. |
| १७७३, ऑक्टोबर १० . | निजामअल्ली व हैदर यांजवर स्वारी करण्याचा विचार करून दसऱ्याचे शुभ मुहूर्तावर दादा पुण्याहून निघतात. |

| | |
|---|---|
| १७७३, ऑक्टोबर २१ . | राघोबांचा मुलगा अमृतराव यास सातार्‍याहून पेशवाईचीं वस्त्रे आणून देवविली. |
| १७७३, नोव्हेंबर १८ . | दादासाहेब पेशवे व निजामअल्ली यांच्या भेटी होऊन तह होतो. |
| १७७४, जानेवारी १८ . | गंगाबाई हीस सुरक्षित स्थळी पुरंदरवर पोहोचती करतात. |
| १७७४, फेब्रुवारी . . | दादासाहेबांनी कल्याणदुर्ग येथे निजामाशी तह केला. |
| १७७४, मार्च २. . . | निजाम व मराठे सरदार यांच्या भेटी होतात. |
| १७७४ . . . . | राघोबादादा पेशवे पोर्तुगीजांची ठाणे, वर्सोवा व साष्टी ही तिन्ही ठाणी आपल्या ताब्यात घेतात. |
| १७७४, एप्रिल १८ . . | गंगाबाई प्रसूत होऊन त्यांना पुत्ररत्न होते. |
| १७७४, मे २८ . . . | पेशव्यांस (नारायणरावांच्या मुलास) ४० व्या दिवशी पेशवाईची वस्त्रे पाठवतात. |
| १७७४, ऑगस्ट. . . | मुरारराव घोरपडे हा कर्नाटकातील मुलुखगिरीत अनागोंदी करतो. |
| १७७४, ऑक्टोबर . . | दादासाहेब पेशवे आपला एक हस्तक पुण्यास मॉस्टीनकडे पाठवितात. |
| १७७४ . . . . | सवाई माधवराव व त्याचे आईस वाईट हवेचा त्रास होऊ नये म्हणून सखाराम बापू, नाना फडणीस त्यांना सासवडला आणतात. |
| १७७४, नोव्हेंबर . . | रघुनाथराव व इंग्रज यांचे दरम्यान तह होतो. |
| १७७५, जानेवारी ३ . . | राघोबादादा मोठ्या सैन्यानिशी बडोद्यास गोविंदराव गायकवाड यांस येऊन मिळतात. |
| १७७५, फेब्रुवारी १३ . | कॅ. मॅलेट याच्या सांगण्यावरून रघुनाथरावास भावनगरहून सुरतला आणण्यात येते. |
| १७७५, मार्च ६. . . | राघोबादादा व इंग्रज यांच्या तहावर एकमेकांच्या सह्या होतात. |
| १७७५, मे १८ . . . | रघुनाथराव व हरिपंत फडके यांच्या सैन्याची नाफाड येथे चकमक होते. |
| १७७५, ऑक्टोबर . . | नारायणरावाच्या खुनास सखारामबापू कारणीभूत आहेत असे मॉस्टीन गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्ज यास सांगतो. |
| १७७५, डिसेंबर २८ . . | इंग्रजांचा वकील कर्नल डफ्टन हा पुणे दरबारी येतो व तिथें तो १ मार्च १७७६ पर्यंत राहतो. |
| १७७६, मार्च १ . . . | पुरंदरच्या तहावर सह्या होतात |

# १५

## नारायणराव पेशव्यांची ९ महिन्यांची कारकीर्द व बारभाईचे कारस्थान

## (१७७३–७६)

### पेशवाईस ग्रहण लागते :

बाळाजी विश्वनाथ पेशवे झाल्यापासून तो पानिपत पराभवापर्यंत पेशव्यांना पराजय ठावूक नव्हता. हर हमेश पेशवे व त्यांचे सरदार चोहोकडे विजय मिळवीत होते. मराठी सत्ता चंद्रकोरीसारखी वाढत होती. पेशव्यांना १७६० पर्यंत म्हणजे जवळजवळ ४० वर्षे पराभव माहीत नव्हता. शाहू छत्रपति निवर्तल्यावर त्यांनी दिलेल्या सनदानुसार पेशवे मराठी राज्याचे मुख्य चालक झाले. त्यांनी आपली राजधानी पुणे केली व मराठी राज्याचा गाडा पुण्याहून हाकला जाऊ लागला. नानासाहेब पेशवे मुत्सद्देगिरी व लढाई यात तरबेज होते. त्यांच्या पश्चात त्यांचे चिरंजीव माधवराव यांनी अगदी कोवळ्या वयात मुत्सद्देगिरी, शहाणपण आणि शूरत्व या गुण समुच्चयांचा मिलाफ आपले अंगी आहे हे दाखवून मराठी राज्याची विस्कटलेली घडी सुधारली. पण अति परिश्रमांच्या दगदगीमुळे त्यांना क्षयाचा विकार होऊन ते सन १७७२ मध्ये निवर्तले. ह्या त्यांच्या मृत्यूमुळे मराठी राज्याची खूपच हानी झाली. त्यांच्या पश्चात त्यांचे अल्पवयीन बंधु नारायणराव यास पेशवेपद प्राप्ती झाली. नारायणरावात कर्तव्य फार थोडे, वृत्ती तापट यामुळे ते सरदार मंडळीच्या रोषास पात्र झाले. त्याजविरुद्ध कट होऊन त्यांचा खून झाला. तेव्हा मराठ्यांच्या आंतरबाह्य शत्रूंनी उचल खाल्ली. बारभाई स्थापन झाली आणि बारभाईस गुंडाळून ठेवून नाना फडणीस या सारखे मुत्सद्दी राज्याचा रथ अतिशय अडचणीतून ओढू लागले. इथूनच्या राजकारणाचा रंग लढाया आणि मुत्सद्देगिरी यांचा मिलाफ होय.

### नारायणरावास पेशवाईची वस्त्रे मिळतात :

माधवराव पेशव्यांनी अंत समयी नारायणराव पेशव्यांचा हात दादासाहेब यांच्या हातात घालून याचा सांभाळ करावा, हरेकविसी दौलतीचा बंदोवस्त करणे तो आपणच वडीलपणे केला पाहिजे अशी विनंती केली,[1] आणि माधवराव दिनांक १८ नोव्हेंबर १७७२ त वारले. क्रियाकर्म आटोपल्यावर

१. पेशव्यांची बखर, १९६३, पृ. ६४.

दादासाहेब नारायणरावांच्याबरोबर पेशवाईची वस्त्रे घेण्यासाठी साताऱ्यास गेले. तेथे नारायणरावास छत्रपति रामराजे ह्यांजकडून पेशवाईची वस्त्रे मिळाली (दिनांक १२). नाना फडणीस यास छत्रपतींकडून नारायणरावांच्या फडणिशीची वस्त्रे मिळाली व वहिवाटी-प्रमाणे अष्ट प्रधानांच्याही नेमणुका त्याच वेळी झाल्या. हे आटोपल्यावर साताऱ्यास दरबार भरला व नवीन पेशव्यास सर्व सरदारांनी नजराणे दिले. छत्रपतींचा निरोप दिनांक २० डिसेंबर १७७२ ला घेतल्यावर स्वारी वाईस आली. दादासाहेब साताऱ्याहून टोक्यास गेले आणि त्यांनी आपले दत्तक पुत्र अमृतराव यांचे लग्न करविले. नारायणराव दिनांक ३१ रोजी पुण्यास दाखल होताच त्यांनी दरबार भरविला व दुसऱ्या दिवशी नाशकास आपल्या आईच्या दर्शनास गेले.[1]

यापुढील हकिगती सांगण्याच्या अगोदर नारायणरावांचे बालपण व पेशवे पद प्राप्तीपर्यंतच्या हकिगती पाहू.

नारायणराव पेशवे हे नानासाहेब पेशव्यांचे सर्वांत धाकटे चिरंजीव. यांचा जन्म १७६५ ऑगस्ट, दिनांक १० रोजी झाला. सन १७६१ त नानासाहेब पेशवे ह्यास उत्तर हिंदुस्तानच्या फेरीत घेऊन गेले होते. १७६२ फेब्रुवारी २८ रोजी त्याची मुंज झाली. पानिपतच्या अरिष्टानंतर पेशव्यांची आई गोपिकाबाई यांनी भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई यांना 'नारायण तुझा' असे मानण्यास सांगितले व त्यांनी नारायणरावांना 'हा आपला' असे मानिले. त्यांचे लग्न गंगाबाईशी १७६३ एप्रिल, दिनांक २८ रोजी झाले व गर्भाधान १७६९ जुलै, दिनांक १७ रोजी झाले. नारायणरावांचा विद्याभ्यास मातोश्रींच्या देखरेखीखाली झाला. कौमुदी जगन्नाथ भट ह्याजवळ म्हटली. सन १७६९ त हे माधवराव पेशव्यांबरोबर कर्नाटकात निजगल किल्ल्यावरच्या मोर्चात होते. त्यास यावेळी मनगटास गोळीची जखम झाली. ह्या वर्षापासून माधवरावांच्या सांगीनुसार कारभाऱ्याजवळ बसून कामे समजून घेऊ लागले. सन १७७० ऑगस्टमध्ये माधवराव पेशव्यांनी त्यास दिवाणगिरीची वस्त्रे दिली. माधवरावांची लायकी नारायणरावात नव्हती. सर्व कारभारी मंडळीस त्यांचे स्वरूप 'वाघ गेला आणि हे कोल्हे राहिले' या अर्थाचे दिसू लागले. प्रथमतः चुलत्या पुतण्यांचे सौरस्य बरे होते. पण नंतर दादासाहेबास पेशवाईची हाव सुटल्यामुळे परिस्थितीत बिघाड होऊ लागला.

नारायणरावांनी पुण्यास आल्यावर आपल्या नांवाचे नवीन शिक्के करून पेशवाईचा कारभार करण्यास सुरवात केली व पुण्याहून नाशकास मातोश्रीस भेटण्यास गेले हे मागे सांगितले आहेच. नाशकास त्यांचा मुक्काम १७७३ मार्च १८ पासून एप्रिल ६ पावेतो झाला. नाशकास जाण्यापूर्वी पेशवे आपली चुलत बहिण दादासाहेबांची मुलगी दुर्गाबाई हिच्या लग्नसमारंभास जातीने हजर राहिले. लग्न पुण्यात पांडुरंग बाबाजी नाईक जोशी याच्याशी

१. ऐ. ले. सं ४, ले. १२२९.

दिनांक ७ फेब्रुवारी १७७३ रोजी झाले. तदनंतर पेशवे नाशकास गेले. तिथे मातोश्रीने दादासाहेबास कैद करण्याचा मंत्र दिला.[1] नारायणराव पुण्यास आल्यावर त्यांनी गारद्यांचे देणे वाढू नये म्हणून महमद इसफ या गारद्याच्या अंमलदारास त्याच्या हाताखालील सैन्यास नोकरीतून कमी केले. गारद्यांचे पगार थकले होते. मराठ्यांचे सर्व शत्रू थंडावले होते. तेव्हा सैन्य कमी करून वाढत चाललेले कर्ज रोखणे हा हेतू मनात धरून त्यांनी गारद्यांना जरी कमी केले तरी त्यांचे थकलेले पगार देण्यासाठी राहिलेल्या पगाराकरिता तीस हजार पगार पेटे दिले (ऑगस्ट १० ते १७७३).

**कारभाऱ्यात तेढ :**

इंग्रजास हुसकावून लावण्याकरिता त्रिंबक विनायकास विजयदुर्गावर जानेवारी १७७३ त पाठविले. इंग्रजांचा उपद्रव मोडण्यासाठी चुलते-पुतण्याचे विचार एक होते. त्यांनी तसे प्रयत्नही केले. नारायणरावांनी जुन्या व जाणत्या सरदारांचे ऐकण्याचे सोडून दिले होते. सखाराम बापूसारख्या वृद्ध मुत्सद्दीनी शिफारस केलेले विसाजीपंत लेले यास वसईचे किल्ल्यावर पुन्हा एकदा नेमण्याचे नाकारून त्या जागी त्रिंबक विनायक याची नेमणूक केली आणि दहा-वीस लाखाचा दंड विसाजीपंतांच्या गळी बांधिला. हे विसाजीपंत लेले यांचे प्रकरण कारभाऱ्यात तेढ उत्पन्न होण्यास कारण झाले.

दादांच्या मुलीचे लग्न लावावयाच्या अगोदर पार्वतीबाईचा वपन विधी माधवरावांच्या लेखी आज्ञेनुसार उरकण्यात यावा ही दादांची इच्छा. पण नारायणरावांचा ओढा पार्वतीबाईकडे असल्यामुळे तिच्या मनाविरुद्ध वपन विधी होऊ नये म्हणून तो पुढे ढकलला व मुलीचे लग्न अगोदर उरकून घेतले. कारभारी बापू व पटवर्धन यांचे फौजेच्या व हिशोबाच्या भानगडीवरून पुष्कळसे बिनसले. बापू सर्वथैव दादांचे विचारे चालतात असा संशय नारायणरावास आला. यानंतर पेशवे आपल्या मातोश्रींचा सल्ला घेण्यासाठीं बापूसह नाशकास गेले हे वर सांगितले आहे.

पेशव्यांच्या अनुपस्थितीत दादांनी पेशव्यांविरुद्ध कारस्थाने सुरू केली ती अशी : (१) हैदरखानाकडे राजकारणाची पत्रे पाठविली; (२) नागपूरकर भोसले बंधुतील वितुष्टात भाग घेऊन पेशव्यांनी ज्या मुधोजीना कारभारापासून वंचित केले त्याजशी दादांनी संधान बांधून आपणास कैदेतून मुक्त करण्याच्या व पेशवाईपद मिळवून देण्याच्या कटात सामील करून घेतले. दादांचा हैदरखानाशी गुप्तपणे चाललेल्या कारस्थानाचा सुगावा लागताच शहर रक्षक नारो आपाजी यांनी वाड्याभोवती कडक पहारे बसविले. पेशव्यास दादांच्या गुप्त कारस्थानांची वार्ता कळताच ते नाशकाहून लगवगीने परत आले. हैदरखानाचा वकील आप्पाजीराम ह्यास बेड्या घालून पुरंदरावर ठेविले आणि दादास दिनांक ११ एप्रिल १७७३ रोजी वाड्यातच बंदीत ठेविले.

---

१. Forrest, Maratha Series, Vol. I, Part II, p. 250.

साबाजी व मुधोजी या भोसले बंधूत तेढ उत्पन्न होऊन पेशवे व दादा यांनी दोघांचे दोन पक्ष घेतले. त्यामुळे चुलते-पुतण्यात तेढ निर्माण झाली. तो प्रकार असा :

सेनासाहेब सुभा जानोजी भोसले मिळून नागपूरकर भोसले चार बंधू. जानोजी सन १७७२ च्या मे महात निपुत्रिक निवर्तले. तेव्हा त्यांनी आपल्या बायकोच्या मांडीवर मुधोजीचे पुत्र रघुजी यास दत्तक घेऊन त्यास सेनासाहेब सुभा नेमावे व कारभार मुधोजी व साबाजी बंधुंनी संयुक्तपणे पहावा असे जानोजी जिवंत असता ठरले. पण जानोजीच्या मृत्यूनंतर प्रत्यक्षात घडले ते निराळे. मुधोजी दादासाहेबांचा पक्ष वारंवार धरीत होता म्हणून पेशवे माधवराव व नाना फडणीस यांची त्याजवर इतराजी. ह्या गोष्टीचा फायदा घेण्यासाठी साबाजींनी जानोजी भोसले यांची पत्नी दर्याबाई यांना आपल्या बाजूस वळवून घेतले. तेव्हा बाईनी दत्तक घेण्याचे नाकारले. पेशव्यांकडे राजकारण लाविले. तेव्हा पेशवा माधवराव यांनी साबाजीस 'सेनासाहेब सुभा' पद देवून तिकडील सर्व व्यवहार कळविण्यासाठी आपले वकील रामाजी बल्लाळ गुणे यास नागपुरास साबाजीबरोबर पाठविले.[१] ह्या प्रकाराने मुधोजीस राग आला. त्यानी फौज जमा करण्यास सुरवात केली आणि आपल्या पक्षात एलिचपुरचा नबाब इस्माइलखान यास सामील करून घेतले. साबाजीनी पेशव्यांकडे मदत मागितली आणि निजामाचे सरदार रुक्नुदौला व धौसा ह्यांस आपल्या बाजूस वळविल. दोन्हीकडील जोराची तयारी होऊन युद्धास प्रथम तोंड लागले ते १७७३ च्या जानवारीत बालापुराजवळ कुंभारगांव येथे. उभयपक्षी मनुष्यहानी व नुकसान झाल्यावर मध्यस्थी होऊन दिनांक २८ जानेवारी १७७३ रोजी तडजोड झाली. तडजोडीत रघुजीस दर्याबाईनी दत्तक घेऊन तोच सेनासाहेब सुभा समजावा, दोघा बंधूनी एकमेकांचे विचार कारभार करावा असे ठरले मात्र; पण हे व्यवहारात उतरायच्या अगोदर दर्याबाईनी मुधोजींचा पक्ष स्विकारला. तेव्हा पुन्हा तेढीस सुरवात झाली. मुधोजी व दर्याबाई यांनी नागपुरी देवाजीपंत चोरघोडे कैदेत होते त्यास सोडवून दिवाण नेमिले. साबाजीच्या मंडळींचा छळ करण्यास सुरुवात केली. तेव्हा साबाजीनी निजाम व पेशवे सरदार दरेकर यांच्या मदतीने मुधोजीवर चाल केली. मुधोजीनी हा हल्ला उधळून लावला. शत्रूस जरब बसविली आणि आपले दोघे सरदार बंधु व्यंकटराव व लक्ष्मण काशी गुप्ते यास रघुजीचे नांवे वस्त्रे आणण्यासाठी पुण्यास पाठविले. त्यांच्या खटपटीस यश आले नाही. नारायणराव पेशव्यांनी साबाजीस सेनासाहेब सुभा म्हणून मान्यता देऊन त्यांच्या सहाय्यार्थ फौज पाठविली हे दादांस आवडले नाही. मुधोजीच्या खटपटीस यश न आल्यामुळे ते चिडले व आपल्या हस्तकास लिहून पाठविल की, 'आता नारायणरावांची उपेक्षा करणे योग्य नाही. तुम्ही कळेल तसे दादांशीं राजकारण करून बनेल त्या तऱ्हेनें आपली गोष्ट सिद्धीस न्यावी.' दादासाहेब अटकेत असल्यामुळे प्रथम त्यांची सुटका करून घेण्यासाठी

---

१. ऐ. टि. ७ '२ इ. सं. वर्ष ८.

दादांचे शहरातील पक्षपातीची भेट घेऊन त्यांच्या सहाय्याने दादांची युक्तीने सुटका करावयाचा बेत लक्ष्मणराव गुप्ते यांनी आखला. पण बंदीतून सोडविण्याचा कट उघडकीस येऊन अपेशी ठरल्यामुळे दादांची कैद आणखी कडक झाली. नागपूरहून आलेल्या गुप्ते बंधूनी दादास सोडविण्याचा आपला डाव फसल्याचे पाहून पुण्यात राहून ते पेशव्यांच्या विरोधकात सामील झाले. साबाजी भोसल्यांचे लक्ष पुण्यांतील घडामोडींकडे होतेच. त्यांनी आपले वकील भवानी शिवराम याजला पेशव्यांकडे पाठवून मुधोजीस निर्बल करण्यासाठी 'सेनासाहेब सुभा' पदाची वस्त्रे मागविली. ती पेशव्यांनी त्याजकडे दिनांक १६ ऑगस्ट १७७३ रोजी रवाना केली. या योगाने गुप्ते बधूंच्या पेशव्यांविरुद्धच्या बनावास उग्र स्वरूप येऊ लागले. यावेळी उत्तर हिंदुस्तानात महादजी शिंदे व विसाजी कृष्ण बादशहास तक्तावर बसवून मराठ्यांचा जम बसविण्याच्या उद्योगात मग्न होते. मराठ्यांच्या लोभातील दिल्लीचा माजी वजीर गाजीउद्दीन निराधार होऊन पुण्यास पेशव्यांकडे सन १७७३ च्या जानेवारीत आला.[1] हेतू हा की नव्या पेशव्यांनी उत्तर हिंदुस्तान ताब्यात आणण्याकरिता एक योजना आखावी. नाना फडणीस आणि इतर कारभारी मंडळी यांनी गाजीउद्दिनाची पूर्वीपासूनची मैत्री स्मरून त्यास बुंदेलखंडात एक लहानशी जहागिर देऊन सोय लाविली. पेशव्यास यावेळी बाहेरील शत्रूंपैकी इंग्रजच तापदायक वाटले.

### इंग्रजांची कुटील कारस्थाने :

मुंबई जवळील साष्टी, वसई, एलिफंटा व करंजा वगैरे बेटे मराठ्यांच्या ताब्यात होती. ती पेशव्यांकडून परत मिळवावी हा इंग्रजांचा प्रधान हेतू होता. यासाठी कंपनीच्या डायरेक्टरांनी आपला वकील मॉस्टीन यास रदवदली करण्यास पेशवे दरबारी पुण्यास रवाना केले. मॉस्टीन तिसऱ्या खेपेस ऑक्टोबर १७७२ त पुण्यास आला. त्यावेळी माधवराव पेशवे आजारी होते व थेऊरास मुक्काम ठेवून राज्यकारभार तिथूनच पहात होते. मॉस्टिनला पेशव्यांनी निरोप पाठवून नारायणरावांची भेट घेण्यास सांगितले. मॉस्टिनने १६ ऑक्टोबर ते १९ ऑक्टोबर पर्यंत नारायणराव, रामजी चिटणीस, सखाराम बापू व नाना फडणीस या सरदारांच्या भेटी घेतल्या आणि कंपनीस आपला रिपोर्ट पाठविताना कळविले की, ह्या वर्षी व कदाचित माधवरावांचा मृत्यू होईपर्यंत मराटे सिद्दीकडून राजापुरी घेण्यासाठी हल्ला करीत नाहीत.[2] माधवराव पेशवे ह्या आजारपणातून उठत नाहीत आणि पेशवे पद मिळविण्यासाठी रघुनाथरावांनी सैन्य उभारून आपल्यापरी कसे प्रयत्न चालविले, ते सर्व प्रयत्न उघडकीस येऊन शेवटी दादांस पेशव्यांनी कसे कैदेत ठेविले ह्या हकीगती मॉस्टीन मुंबई गव्हर्नरास कळवित होता. एवंच पेशव्यांच्या आजारामुळे आणि दादासाहेबांच्या घरभेदेपणामुळे पुणे दरबारी सर्व मुत्सद्दी अडकून आहेत

१. पु. द. भा. ३, ले. ११२.

२. Gense and Banaji, The Third English Embassy to Poona (Mostyn to Bombay Council, 2nd October 1772), P. 19.

असे पाहून इंग्रजांनीं भडोचवर आपले सैन्य व तोफखाना रवाना केला आणि भडोचचा ताबा इंग्रजांनी १८ नोव्हेंबर १७७२ त घेतला.[१] भडोच इंग्रजांनी बळकाविल्याबरोबर पेशवे दरबारात रागाची लाट उसळली. फत्तेसिग गायकवाडांनी आपल्या भडोच येथील हक्कासंबंधी सुरतेच्या इंग्रजांशी बोलणी सुरू केली. त्यास पुणे दरबारने पुष्टी दिली. स्वारीचे अरिष्ट नको असा पोक्त विचार करून इंग्रजांनी १७७३ च्या जानेवारीत भडोच शहरावरील गायकवाडांचा वसुलाचा हिस्सा पूर्वीप्रमाणे दिला जाईल असे कबूल केले.[२]

भडोच इंग्रजांनी घेतल्यावर पेशवे दरबारचे रामजी चिटणीस यांनी मॉस्टिनशी भडोच इंग्रजांनी मराठ्यास परत करावे म्हणून बोलणी सुरू केली. पण मॉस्टिनने उत्तर दिले की, पेशवे जर भडोचबदली एकादे स्थळ देतील तर भडोच इंग्रजांकडून पेशव्यास मिळेल.[३] सखाराम बापूना मॉस्टिनच्या ह्या उद्दाम उत्तराचा राग आला.[४] पुढे पेशवे दरबारचे मुत्सद्दी व मॉस्टीन यांच्या बऱ्याच वेळा भेटी झाल्या. त्यात मॉस्टिनला दरबारने चांगली वागणूक दिली नाही अशी तक्रार मॉस्टीन करतो. तो दरबाराने दिलेल्या वागणुकीने कंटाळून परत मुंबईस परतण्याचा विचार करतो. पण कंपनीचे डायरेक्टरना त्याचे वास्तव्य पुण्यास असायला हवे असते; या करिता तो आपला पुण्याचा मुक्काम वाढवितो.[५] माधवराव पेशव्यांच्या मृत्यूची हकिगत कळताच पोर्तुगिजांनी विजयदुर्ग, रत्नागिरी वगैरे किनाऱ्यालगतची स्थळे घेण्यासाठी उचल खाल्ली. विजयदुर्गावर त्यांचे आरमार आले. ही बातमी कळताच सन १७७३ च्या जानेवारीत त्रिंबक विनायकास सरसुभा करून त्यास पेशव्याने पोर्तुगिजांवर रवाना केले. त्याने व कृष्णाजी धुळपाने मिळून पोर्तुगिजांशी सामना करून त्यास विजयदुर्गाहून हुसकून दिले.[६]

ह्याचवेळीं नारायणराव पेशवे यांनी प्रभु जातीस आपल्या निर्णयाने दुखविले. प्रभूस वेदोक्त पद्धतीने कर्मे करण्यास शिवाजी महाराजांपासून ते नानासाहेब पेशव्यांपर्यंत अटकाव कोणी केला नाही. ह्या पेशव्यांचे कारकीर्दीत ब्राह्मण मंडळींनी उचल खावून प्रभूंवर वेदोक्त कर्माची बंदी पेशव्यांच्या हुकुमाने आणविली. एवढेच नव्हे तर त्यास शुद्र ठरविणारी नऊ कलमांची यादी त्यांच्या पुढाऱ्यांकडून लिहवून देवविली. त्यामुळे प्रभु ज्ञातीत पेशव्यांविरुद्ध क्षोभ वाढला.

नारायणराव तापट व उद्दाम वृत्तीचा होता. त्यामुळे त्याचा दरारा लोकास वाटला नाही. नारायणरावांच्या खुनाच्या कटाची उभारणी दादास कैद दुःसह होऊन त्यांच्या मनाने घेतले की, आपणच नारायणरावास अटकेत

१. Letter from Bombay Government to Council of Directors, 4th Dec. 1772, Secret and Political Department Diary No. 13 of 1772.

२. Aitchison, Treaties Vol. IV, P. 176.

३. Gense and Banaji, The Third English Embassy to Poona, pp. 67—69.

४. Ibid., P. 87.

५. Ibid., P. 133.

६. खरे, ऐ. ले. सं. ले. १२३७, १२४०.

ठेवून कारभार करावा.[1] उलट दादांच्या सर्व हालचाली बंद पाडून त्यांचे-वरील पहारा कडक केला. तेव्हा पेशव्यांविरुद्ध कटाची उभारणी दादा करू लागले. त्यात भवानराव प्रतिनिधी, सखाराम हरी व सखाराम बापू, चिंतो विठ्ठल आदि सरदार दादांस सामील झाले. कटाची उभारणी दादांचा हुजऱ्या तुळ्या पवार याने केली.[2] दादांच्या कैदेची देखरेख सुमेरसिंगाकडे पेशव्यानी दिली होती. त्यास फितवून तुळ्या पवाराने दादांच्या पक्षास आणिले. "सुमेरसिंग, महमद इसफ, बहादुरखान व खरकसिंग या गारदी सरदारास[3] पैशाची लालूच दाखवून तीन लक्षाचा करार लिहून कारभाऱ्यांनी (बापू व मोरोबानी) दिला की, नारायणरावास धरावे, दादांनी ही चिठ्ठी स्वदस्तुरीने पुरी केली ती चिठ्ठी आनंदीबाईनी पाहिली. त्यात 'धरावे' होते त्या ठिकाणीं 'मारावे' केले असा बखरीतला उल्लेख आहे. अशा रीतीने कटाची उभारणी झाली. त्यात मुधोजीचे वकीलही सामील झाले. अशा कटास ऑगस्ट महिना साधारणतः योग्य; कारण यावेळी पाऊस पडून शेतीच्या हंगामांत सर्व सैनिक आपल्या वाडीवर जाऊन गुंतलेले असतात. त्यावेळी तीन ते चार हजार सैन्य पुण्यास होते. नारायणरावांच्या मनात आपला खून होईल यावद्दल कधीं शंकासुद्धा आली नाही. दादांची सक्त कैद गारद्यांच्या पहाऱ्यात चालू आहे. एवढेच पेशव्यास पहावयाचे होते.

मात्र रघुजी आंग्रे यांजकडून पेशव्यास धोक्याची सूचना मिळाली होती. गारदी दंगा करणार असे पेशव्यास समजताच त्यांनी हरिपंत फडके यास गारद्यांच्या दंग्याचा बंदोबस्त करण्यास फर्माविले. गारद्यांचे दंगे हे नेहमीचेच असतात. तेव्हा त्याचा बंदोवस्त आपण संध्याकाळी करू असा विचार करून हरिपंत गावातील भोजन समारंभास गेले. त्याच दिवशी (३० ऑगस्ट १७७३) दुपारच्या प्रहरी पेशवे वामकुक्षी करीत असता दोन हजार गारदी दिल्ली दरवाजाने आत आले. त्यापैकी शे-दोनशे लोक थोरले बाजीराव-साहेब यांचे दिवाणखान्यातून श्री गणपती महालाच्या दरवाजाजवळून मेघडंबरी बंगल्याचे दरवाजातून आत पेशवे यांच्या दिवाणखान्यापुढे गाई बांधतात तेथे आले. देवघरच्या रंगमहालाचा दरवाजा बंद करून तेथे नारायणरावास कैद करावे अशा बेतात होते. इतक्यात रावसाहेब हुशार होऊन धावत सातखणीतून पार्वतीबाई याजकडे गेले. तेव्हा इच्छारामपंत ढेरे श्रीमंतांच्या व गारद्यांच्या मध्ये आले. त्यांची झटापट गारद्यांशी होऊन गारद्यांनी त्यास तोडले. गारद्यांच्या मते रावसाहेब देवघराकडे गेले अशा समजुतीने गारदी तिकडे गेले. तेव्हा गारद्यास पाहून देवघरात बसलेला नारोबा फाटक गवई भयभीत होऊन पळू लागला. हे पाहून हेच रावसाहेब

१. हरिवंशाची बखर, पृ. १.

२. तुळ्या पवारास नारायणराव पेशव्यांनी चाबकाने बडविले होते. म्हणून तो वदला घेण्याच्या विकाराने पछाडला होता.

३. हेच गारदी शनिवार वाड्याचे रखवालदार होते. त्यांच्यात भरणा उत्तर हिंदुस्तानातील पठाण, आबि सिरियन अरब, राजपूत पुरभय्या यांचा होता. त्या प्रत्येकास दरमहा ८ ते १५ पगार असे. ते पैशाकरिता वाटेल ते साहस करण्यास धजत. त्यांची भक्ती धन्यापेक्षा जास्त पैका देईल त्याकडे असे.

असे समजून त्यास पाठीमागून वार करून ठार मारिले. पहातात तो रावसाहेब नव्हते. मग गारदी प्रमुख खरकसिंग व सुमेरसिंग व तुळच्या पवार पेशव्यांच्या पिच्छास गेले. पेशवे पार्वतीबाईकडे गेले. तेव्हा बाईंनी सांगितले की, तुम्ही दादासाहेबांकडे संरक्षणास जावे, त्यावरून दादासाहेब दिवाणखान्यात निजले होते तेथे आले आणि समोर येऊन सांगितले की, मला मारावयास तिघे जण पाठीमागे आले आहेत. त्यावरून दादासाहेब यांनी सांगितले की, "तू इथेच रहा मी बाहेर जाऊन बंदोबस्त करतो असे सांगून उठावयास लागले." तोंच रावसाहेब यांनी कमरेस मिठी घातली आणि म्हणू लागले की, मला सोडून जाऊ नये. इतक्यात तुळाजी पवार वगैरे तीन असामी आत आले आणि नारायणराव याचे पाठीमागे होऊन पाय ओढू लागले. तुळाजी पवार वार करावयास आला. त्यास दादासाहेब यानी उजवा हात पुढे केला तो तरवारेचा वार त्यांच्या हातास लागला. दुसरा वार खरकसिंग याने केला तो दादासाहेब यांचे पागोट्याचे पेच तुटून पुतळी कानापाठीमागे लागली. रक्तस्राव जाहला. तुळाजी पवार याने दुसरा वार केला तो नारायणराव यांचे कमरेवर लागला आणि दादासाहेबास म्हणू लागला की, नारायणराव यास सोडावे नाहीपेक्षा दोघासही ठार मारितो. हे ऐकून गोविंद गणेश बारगीर याने येऊन दादासाहेबांचे कमरेची मिठी सोडविली तेव्हा सुमेरसिंग याने वार केला तो नारायणराव यांचे कुशीस लागून ठार जाहले. वाड्यात सर्वत्र एकच हाहा:कार जाहला. दादासाहेबास फडावरच्या खणात आणून बसविले. इतक्यात वाड्यात गडबड झाली, ही बातमी शहरात पसरली. बातम्यावर बातम्या येऊ लागल्या. पहिली बातमी दादा व नारायणराव ठार झाल्याची आली. इतक्यात दुसरी बातमी आली की, नारायणराव ठार जाहले.[1] ह्या दुष्कृत्यात एकंदर ब्राम्हण असामी सात, एक हुजऱ्या, एक नाईक, दोन कुणबिणी व एक गाय इतकी ठार झाली.[2] गारद्यांनी नंतर राघोबादादा पेशवे झाल्याची ग्वाही फिरविली.[3] बाहेर मुत्सद्यांनी शहर कोतवालाकडून शहरची नाकेबंदी करविली. सर्व मुत्सद्दी कोतवाल चावडीत जमले. भवानराव प्रतिनिधी आपल्या लोकास बाहेर ठेवून एकटेच आत गेले. त्यांनी दादांची भेट घेतली. त्यावेळी दादाजवळ तुळाजी पवार, खरकसिंग व सुमेरसिंग होते. त्यांनी अभय मागितले व आपले देणे पुरे करावयास लाविले. दादासाहेबास एकांती घेऊन भवानरावाने दादांच्या संमतीने आपले लोक आत घुसविले आणि ठिकठिकाणी चौकी पहारे बसविले. त्रिंबकराव मामास बोलावणे पाठविल्यावर ते आत येऊन त्यांनी दादांचा निषेध केला. दादासाहेबांनी उत्तर केले की, होणारास उपाय नाही. तुम्ही आत जाऊन पुढील उपाय काय तो करणे. त्याप्रमाणे उत्तर कार्याची तजवीज

१. वरील हकिगत महादजी राम कर्दीकर या नावाच्या दादासाहेबांच्या आश्रिताने लिहून ठेविली ती Maharashtra Archives Bulletin, No. 4 मध्ये प्रसिद्ध झाली, त्यातून घेतली आहे.

२. खरे, भा. ४, ले. १२६०.

३. कित्ता, भा. ५, ले. १२६४.

पार्वतीबाईचे विचारे केली. श्रीमंतांचे प्रेत ओंकारेश्वरापासी नण्यासाठी दिल्ली दरवाजाने बाहेर काढिले. ओंकारेश्वरावर सर्व मुत्सद्दी मंडळी जाऊन प्रायश्चित्त संस्कार करून मंत्राग्नि त्रिंबकरावमामा याजकडून दिला. दहन करून चौदा घटिका रात्री आपआपले घरी सर्वत्र गेले.[१] भवानराव प्रतिनिधी, मालोजी घोरपडे आणि राजाबा पुरंदरे यांनी राघोबादादांची त्याच रात्री वाड्यात भेट घेतली. तेव्हा त्यास आढळून आले की, दादा स्वतः गारद्यांचे कैदी बनलेले. कारण गारद्यांनी पुरंदर नगर आणि साष्टी येथील तीन किल्ले आणि बक्षिसादाखल पाच लाख रुपये दादासाहेबांकडे मागितले. जर ती रक्कम आपणास मिळाली नाही तर आम्ही अलिबहादूर यास पेशवा करू अशी धमकी त्यांनी दादास दिली. शेवटी भवानराव प्रतिनिधींच्या मध्यस्तीने गारद्यांचा गुंता उरकला. तीन किल्ल्यांऐवजी त्यांनी पाच लाख रुपयांबरोबर आणखी तीन लाख घेण्याचे कबूल केले.[२] नारायणरावांबरोबर त्यांची बायको गंगाबाई ही सती जाण्यासाठी आकांडतांडव करीत होती. पण सतीचा शाप बाधेल या भीतीने दादांची बायको आनंदीबाई यांनी तीस खोलीत कोंडून ठेविली.[३] शिवाय तीस दिवस गेले होते.

हा बनाव सहा महिनें अगोदर शिजत होता असे मॉस्टीन सांगतो.[४] सखाराम बापू व दादास साखळदंड घालून कैद करणार असे दोघांनाही समजल्यावरून हा कट सिद्धीस नेण्याची घाई त्यांनी केली. बहुतेक कारभारी नारायणरावास धरावे या कटात होते असे मॉस्टीन लिहितो.[५] ग्रँट डफसुद्धा ह्या 'ध'च्या 'मा'त आनंदीबाईचा हात होता हे कबूल करतो. नारायणरावांच्या खुनास सखाराम बापू कारणीभूत असे मॉस्टिनने गव्हर्नर जनरल वॉरन हॅस्टींग्ज यास ऑक्टोबर १७७५ मध्ये मुलाखतीत सांगितले.[६] सखाराम बापूचे नारायणरावास 'धरावे' ह्या कटात अंग होते. पण त्यांचा वध झाल्यावर मात्र बापू पश्चातापदग्ध होऊन कित्येक दिवस पर्वतीच्या रानात फिरत होते.[७]

नारायणरावांचा खून झाल्यानंतर एक प्रकारची वैफल्याची व उद्वेगाची भावना मराठी राज्यात व विशेषतः पुण्याच्या परिसरात पसरली. राज्य लोभाने एका ब्राह्मणाचा खून दुसरा ब्राह्मण करवितो असे उदाहरण इतिहासात नाही. त्यास अनुसरून पेशवे म्हणत असत की, आमचे लोक सत्ता लोभासाठी आपल्या भाईबंधाचे खून करणार नाहीत.[८]

---

१. पेशवे बखर, पृ. ७१; म. द. रु. २, पृ. १०१.

२. खरे, भा. ४, ले. १२५७, १२६२.

३. कित्ता.

४. Gense and Balaji, pp. 199-200.

५. Ibid., p. 212.

६. Grant Duff, Vol. II, p. 6.

७. खरे, भा. ४, ले. १२५७.

८. Sailendranath Sen, Anglo Maratha Relations, p. 16; Forbes Oriental Memoirs, I, p. 303; हिं. द. १, ले. ११७.

दादांनी पेशवाई कारभार सुरू केल्यावर खुनाच्या तपासाचे काम रामशास्त्री प्रभुणे न्यायाधिश याजवर सोपविले आणि रामशास्त्रींच्या चौकशीत जर रघुनाथराव खुनी ठरले तर त्यांजशी राज्यशकट हाकण्यास सहभागी होऊ नये असा निर्णय सखाराम बापू, नाना फडणीस, हरीपंत फडके, पटवर्धन आणि रास्ते यांनी गुप्तपणे घेतला.

राघोबांनी आपला मुलगा अमृतराव यास सातान्यास छत्रपतिकडे पाठवून पेशवाईची वस्त्रे आणविली. दिनांक ३१ ऑक्टोबर रोजी ह्या वस्त्रांचा स्विकार दादासाहेबांनी दरबार न भरविता आळेगावी केला. आपल्या नांवाचा पेशवाईचा शिक्का तयार केला. त्यात छत्रपति रामराजा अपेशी म्हणून त्याचे नांव गाळले.

नारायणरावांनी मृत्यूपूर्वी उत्तरेतील मराठी फौज बोलाविली होती. त्यानुसार विसाजी कृष्ण फौज स्वारीचे हिशेब तसेच २२ लाख रुपये रोख आणि जडजवाहिर घेऊन पुण्यास परतले. ते नारायणरावांच्या खुनानंतर पुण्यास आले. त्यांनी हिशेब व वरील चिजवस्त्रे दादांच्या स्वाधीन केली. दादांना हे धन आयतेच सापडले. त्याच्या बळावर त्यांनी पुढील स्वाऱ्या हाती घेतल्या.

**रामशास्त्रींकडून खुनाचा तपास आणि निवाडा :**

रामशास्त्री प्रभुणे मुख्य न्यायाधिश होते. त्यांनी खुनाच्या चौकशीचे काम हाती घेतले. त्यात असे दिसून आले की, नारायणरावाचा खून करण्याचा मूळ कट नसून त्यास धरावे असे होते. हा कट राघोबाचे पाठीराखे आणि हितचिंतक यांनी खुनाच्या अगोदर पुरे सहा महिने शिजवला होता. त्यात मुख्य सूत्रधार राघोबादादा असून आणखी ४९ लोकांनी भाग घेतला होता. त्यापैकी १३ गारदी (८ हिंदु व ५ मुसलमान), २६ ब्राह्मण, ३ प्रभू व ७ मराठे गुन्हेगार होते.

सरदारांपैकी नाना फडणीस यास सखाराम बापू व चुलत भाऊ मोरोबा यांचा संशय होता, शिवाय आनंदीबाईचाही वहीम होता. नाना फडणिसांनी सत्ता ग्रहण केल्यावर पहिल्या दोघास अन्य कारणास्तव कैदेत ठेविले. आनंदीबाईस नानांनी जिवंत असेपर्यंत कैदेतच जीवन काढण्यास भाग पाडले.

**दादांचा कारभार व बारभाईच्या कारस्थानाची उभारणी (३ सप्टेंबर १७७३ ते जानेवारी १७७४) :**

पेशव्यांच्या खुनाच्या दुसऱ्या दिवसापासून म्हणजे दिनांक १ सप्टेंबर १७७३ पासून दादा स्वतःकडे कारभार घेऊन राज्यव्यवस्था पाहू लागले. पेशवे वंशात दादासाहेब हे एकच पुरुष होते. नारायणरावांच्या हत्येनंतर पेशवेपद त्याजकडे आले ते त्यांना टिकवता आले नाही. दादाजवळ लोकांना आपलेसे करण्याचा गुण नव्हता व म्हणून जे त्यांचे पक्षातील होते त्याजवर

मर्जी दाखवून त्यास चांगल्या जागा दिल्या आणि जे त्यांच्या विरुद्ध वागले त्यास शत्रू मानून त्यांचा काटा काढण्याचा उद्योग दादांनी सुरू केला.

पुण्यास गोंधळ माजलेला पाहून मराठ्यांचे शत्रू निजाम, हैदर व इंग्रज यांनी ह्या संधीचा फायदा घेऊन मराठ्यांचे मूलूख बळकावण्याचे उपक्रम सुरू केले. दादास पेशवाई मिळाल्यावर त्यांच्या मर्जीतील मुधोजी भोसले, हैदरअल्ली यांचे वकील सदाशिव रामचंद्र, बाजीराव बर्वे, सखाराम हरि प्रभू, भवानराव प्रतिनिधी, गंगाधर यशवंत, चिंतो विठ्ठल आदि लहान थोर मंडळीस तुमची कामे करून देतो म्हणून सांगितले. गायकवाडाच्या मामलतीवर फत्तेसिंग होते त्याजला काढून त्या जागी गोविंदराव गायकवाडास नेमण्याचे ठरविले. मुधोजीस नागपूर दौलत बहाल करण्यासाठी आपल्या भेटीस बोलाविले. हैदराच्या वकिलास सांगितले की, तुझ्या धन्याचे जे जाबसाल असतील ते तुझ्या मनाप्रमाणे नीटनेटके करून देतो. भवानरावास प्रतिनिधीची जहागिर देण्याचे कबूल केले. गंगाधर यशवंत यास होळकरांची दिवाणगिरी देतो म्हणून सांगितले. चिंतो विठ्ठल यास तर आपला दिवाण नेमिले. सदाशिव रामचंद्र व बाजीराव बर्वे यास सरंजाम देऊन सरदारकी देण्याचे आश्वासिले. तसेच नागपूरला जी भाऊबंदकी चालली होती त्यातील पूर्वीच्या पेशव्यांनी केलेल्या व्यवस्थेत ढवळाढवळ केली. दादांचे पक्षाचे मुधोजी, पण त्याचे बंधू साबाजी यांनी आपल्याला 'सेनासाहेब सुभा' पद नारायणराव पेशव्यांना मिळाल्यावर नागपूर राज्याची सर्व अधिकार सूत्रे आपल्या हाती घेतली. ह्यामुळे मुधोजींना आपल्यावरील अन्याय दूर करण्यासाठी त्यांनी दादांची मदत मागितली. मुधोजी-साबाजीच्या भांडणात साबाजीस निजामअल्लीचा धाकटा भाऊ रुक्नुद्दौला व सरदार धौशा मदत करीत होता. तेव्हा साबाजीचा बंदोबस्त करावयाचा तर निजामअल्लीचा प्रथम पाडाव होणे जरूरीचे असे दादासाहेबास वाटले.

ह्या दरम्यान पुण्यास हैदराचा धूर्त वकील अप्पाजीराम होता. त्याने पुण्यातील गोंधळलेल्या परिस्थितीचा अहवाल आपल्या धन्यास कळवून मराठ्यांनी घेतलेली ठाणी परत काबीज करण्यास सांगितले. हैदर ह्या संधीची वाटच पहात होता. त्याने कर्नाटकातील रास्ते व पटवर्धन यांच्या ताब्यात असलेली सर्व ठाणी तेथील मराठे ठाणेदारास हुसकून लावून आपल्या ताब्यात घेतली आणि आपला अंमल बसविला. ही बातमी कळताच हैदरावर स्वारी करणे क्रमप्राप्त झाले. दादांनी निजामअल्ली आणि हैदरयाजवर स्वारी करण्यासाठी विसाजीपंतांनी आणलेल्या पैशातून सैन्य उभारणी केली आणि वरील दोघावर स्वारी करावी अशी मसलत सखाराम बापू, प्रमुख मंडळी व शिंदे, होळकर वगैरे सरदार मानकरी याना बोलावून आणून विचार केला. सर्वांचा रुकार झाला. त्यावरून दसऱ्यास १० ऑक्टोबर १७७३ रोजी पुण्याहून निघून डेरे गारपिरावर दिले. बापू, त्रिंबकराव, नाना, हरिपंत, मोरोबा वगैरे मंडळीस

आपल्यामागे पुण्यास ठेविल्यास आपल्याला मोठा धोका निर्माण होईल अशी दादास सार्थ भिती वाटल्याने त्या सर्व आवळ्यांची त्याने मोट बांधली व त्यास आपल्याबरोबर लष्करात चालविले. गारपिरावरून ते पेडगांवला आले. तिथेच आनंदीबाईच्या सांगण्यावरून आणलेली पेशवेपदाची वस्त्रे दादांनी स्विकारली आणि ह्याच ठिकाणी रामशास्त्रींनी येऊन 'दादा तुम्ही खुनी आहात आणि खुनास शिक्षा देहांत प्रायश्चित्ताची, ती तुम्ही भोगली पाहिजे' हे त्यास ऐकविले. त्यामुळे दादांवरील कारभाऱ्यांचा विश्वास विचलित झाला आणि त्यांची मने दादांविरुद्ध एक झाली, आणि त्यातूनच बारभाईचे कारस्थान उभारले गेले.

नारायणरावास धरावे असा कट उभारणारे बापू आपण केले एक व झाले भलतेच या मनाच्या बोचणीने आणि दादांच्या ह्या कृत्याने त्यांचा त्यास अत्यंत तिटकारा उत्पन्न झाल्यामुळे, पेडगावी लष्कर तळावर असताच मामा, नाना, मोरोबा व हरिपंत वगैरे मंडळींशी गुप्त मसलती करू लागले. त्यातूनच दादांविरुद्ध एक कट उभा राहिला. पेडगांवीच आणा शपथा होऊन कटाची मुहूर्तमेढ तिथेच रोविण्यात आली. बापू व हरिपंत तात्या फडके यांनी ठरविले की, गंगाबाईस दत्तक पुत्र देऊन नारायणराव यांचा वंश चालवावयाचा त्यास इथे लष्करात राहून घाट[1] जमावयाचा नाही. तेव्हा सर्वांनी काही निमित्ये काढून निरोप घेऊन पुण्यास जावे. त्याप्रमाणे सखाराम बापू यांनी चिरंजिवांचे मुंजीचे निमित्त काढून दादांचा निरोप घेऊन ते सासवडास आले.[2] नंतर नाना फडणीस यांना आर्षाचा उपद्रव झाला, हवाही सोसत नाही अशी विनंती करून निरोप घेऊन पुण्यास आले.[3]

मुधोजी भोसले आपल्या सैन्यासह दादास आळेगांवी येऊन मिळाले. तिथून दोघेही नळदुर्गास आले. नळदुर्गास पाच नोव्हेंबर रोजी निजामअल्लीचा वकील दादास भेटला. त्याच्या मार्फत निजामअल्लीची फौज जी साबाजी भोसलेस साथ देत होती आणि जिच्या सहाय्याने साबाजी भोसले पुण्यावर चाल करून येत होते त्या फौजेस परत बोलवा असे बोलणे दादांनी निजामअल्लीकडे लाविले. निजामअल्लीने ही गोष्ट मानली नाही. त्रिंबकराव पेठे ह्यावेळी फौजेचे मुख्य होते. दादांनी त्रिंबकरावास दहा हजार सैन्य देऊन पुण्यावर घाला घालण्याच्या बेतात असलेल्या साबाजी भोसल्यावर रवाना केले. आणि स्वतः निजामअल्लीस भेटण्यास बिदरकडे कूच केले. दादा निजामअल्ली यांच्या भेटी १८ नोव्हेंबर रोजी होऊन तहाची बोलणी झाली आणि मित्रत्वाचा तह केला दादांनी आपला एक महिना फुकट घालविला. २३ डिसेंबरला दादांनी बिदर सोडले आणि अर्काटच्या दिशेने कूच केले. हेतू हा की, तंजावर राजाचे तंजावर स्थळ जे नबाब महंमदअल्लीने इंग्रजांच्या सहाय्याने बळकाविले होते ते त्याजकडून जिंकून घेऊन तंजोर

१. बारभाईचे कारस्थान स्वारीत शिजले व सर्व सरदार पुण्यास आल्यावर कृतीत उतरले (पे.द.५, ले.४).

२. Mostyn Diary, p. 305.

३. कित्ता.

राजास परत करणे. पण इथून पुढे जाणार तोच आपल्या विरुद्ध बारभाईची कारस्थाने सुरू झाली ही बातमी त्यास कळली.

नोव्हेंबरमध्ये ज्यावेळी दादा बिदरकडे जाण्यासाठी निघाले त्याच वेळी आपल्या सैन्यात असंतोष निर्माण झालेला आहे हे त्यांच्या नजरेस आले आणि आपल्या राज्यकारभारास बारभाईने नेकीचा सुसूत्र विरोध करण्याचे ठरवून बारभाईने साबाजी भोसल्यांना त्रिवकराव मामांच्या मार्फतीने आपल्याकडे वळविले.[1] हेही त्यास समजण्यास वेळ लागला नाही. इकडे पुण्यास गंगाबाई गरोदर असल्याचे समजल्यावर तीस मारण्याचे प्रयत्न दादांचे पक्षाकडून सारखे चालू झाले.[2] कारभारी व सरदार मंडळी पुण्यास कटासाठी जी जमली त्यांनी प्रथम गंगाबाईस सुरक्षित स्थळी नेण्याचे कारस्थान रचून पार पाडले. पुरंदरास गंगाबाईस १८ जानेवारी १७७४ रोजी सुरक्षित पोचविल्यावर दादांना पेशवाईवरून दूर करून आपल्या ताब्यात कारभार घेऊन तो गंगाबाईच्या नावे उघडपणे बारभाईनी सुरू केला. गंगाबाईचे नांवे द्वाही नारो आप्पाजीकडून पुण्यात फिरविली. दादांचे पक्षास जे लोक होते त्यांच्या घरी चौक्या बसवून सर्व बाजूनी त्यांचा उच्छेद आरंभिला. लगोलग नवीन फौज तयार करून ती हरीपंतांचे हाताखाली त्रिवकरावाचे मदतीस देऊन दादांवर पाठविली.

**कल्याणदुर्गचा तह (सन १७७४, फेब्रुवारी) :**

कारभारी मंडळींनी खूळ माजवून आपणास पदच्युत केलेसे पाहून दादासाहेबांनी कल्याणदुर्ग येथे हैदराशी नवीन तह केला. हैदरावर माधवराव पेशव्यांनी तीन स्वाऱ्या करून तिकडे जितके राज्य संपविले होते, तितके सर्व आता दादासाहेबांनी या तहाने हैदरास देऊन टाकिले. ते राज्य मिळविण्यास माधवराव पेशव्यास कोणते भगीरथ प्रयत्न करावे लागले हे वाचकास ठावूक असेलच. दादासाहेब इतकेच करून राहिले नाहीत तर त्यांनी जुन्या राज्यापैकी कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधला सर्व मुलूखही हैदरास दिला. या देणगीबद्दल हैदराने कबूल केले की, दादासाहेब पेशवे खरे, कारभाऱ्यांनी घडविले ते थोतांड असे मी समजेन आणि पेशव्यांकडून मिळालेल्या मुलुखाबद्दल सहा लक्ष खंडणी देईन आणि वेळोवेळी त्यास फौजेची कुमक करीन व त्याशी कायमचा स्नेह राखीन. या तहाने रास्ते, पटवर्धन, सावनुरकर नबाब, नरगुंदकर भावे यांच्या ताब्यातील मुलखाचा मालक हैदर झाला. अशा रीतीने दादानी या सर्व सरदारांवर सूड उगविला. यापुढे हैदराशी व टिपूशी ज्या लढाया झाल्या त्याचे कारण हा कल्याणदुर्गचा तह होय. बारभाईनी राजाराम पंडीत व भिकनखान यांना निजामाकडे आपल्या पक्षास वळवून घेतले. निजामाने राघोबादादाशी झालेला मैत्रीचा तह मोडून बारभाईस मदत करण्याचे ठरविले. निजाम व मराठे सरदार साबाजी भोसले, त्रिवक मामा,

१. पेठे दप्तर, भाग १, ले. ७५. आनंदीबाई गंगाबाईचा गर्भपात व्हावयाची साधने करितात. गर्भपात न झाल्यास मारावी, ते न झाल्यास पुत्र झाल्यावर त्याला अपाय करावा, या साधनात आहे (खरे, १२७२).

मल्हारराव रास्त्यांचा मुलगा, चिमणाजी पंडीत व चिमणाजी हरी यांच्या भेटी दोन मार्च १७७४ रोजी झाल्या.[१] आपल्यावर बारभाईची फौज येते आहे हे दादास कळताच दादाही कूच करून भीमा तिरी आले. त्याजवर पुण्याहून त्रिंबकराव मामा व हरीपंत फडके याजबरोबर पंचवीस हजार[२] फौज देऊन रवाना केलेच होते. त्यांची व दादासाहेब यांची लढाई भीमा तिरी झाली.[३] त्रिंबकराव मामा त्यात कामास आले.[४] हरीपंत फडक्यांनी जोर धरल्यावर दादासाहेब यांनी पुण्याकडील रोख सोडून ते खानदेशकडे निघाले.[५] त्यांच्या पिछाडीस हरीपंत तात्या फौजसुद्धा दौडत चालले.[६] बराणपुरानजीक फौज येताच फौजेत फितुर आहे असे समजले. तेव्हा सर्वांच्या झडत्या घेऊन फितुर प्रकरण मिटविले. यशवंतराव पवार धारकर याजपासी देऊन हरिपंत फडके यांनी भरारी मारणाऱ्या रघुनाथरावास गाठून त्यांचा पराभव केला असता पण निजामअल्ली आणि साबाजी या दोघांची फौज धीरे धीरे चालत होती. निजामअल्ली ठिकठिकाणी मुक्काम करीत होता. तर साबाजी आपली घरगुती प्रकरणे निभावण्यात गुंतला होता. त्यामुळे हरिपंत फडके यास ब्राह्मणपुरास तळ देऊन रहावे लागले.

**मोरोबांचे रुसणे :**

बारभाईचा कारभार एकजुटीने चालत असता नाना फडणिसांचे चुलत बंधू मोरोबा दादा यांचे मनात सैतान शिरला. मोरोबा थोरले माधवराव पेशव्यांचे वेळी दिवाण पदावर होते. बारभाईचा कारभार सुरू झाल्यावर दिवाणी कारभार नाना व सखारामबापू पाहू लागले व आपणास कोणीच विचारीत नाही याचे मोरोबादादास वैषम्य वाटून ते रुसून जुन्नरास जाऊन राहिले. नाना फडणिसांनी त्यांची समजूत काढिली आणि त्यांना कारभारात सामील करून घेतले. तरीही एकनिष्ठतेने बारभाईस सहकार्य देईनात. त्यांच्या बाजूला बाबूजी नाईक बारामतीकरही वळले. यामुळे आणखी जे कोणी फितूर होते ते सर्व मोरोबादादाच्या विचारे वागू लागले.

**पेशव्यांचा जन्म :**

अशा रीतीने कारभार चालत असता गंगाबाई प्रसुत होऊन त्यास दिनांक १८ एप्रिल सन १७७४ रोजी पुत्ररत्न झाले. ही बातमी पुण्यास समजताच लोकांना आनंद झाला. राघोबाचे पक्षपाती थिजले. सबंध मराठ मंडळाने आपणास धनी लाभल्यामुळे निःश्वास सोडले. मुलाचे नांव सवाई माधवराव ठेविले.

---

१. पगडी-मराठे व निजाम, पृ. ८९.

२. ऐ. ले. सं. भाग ५, ले. १३३२.

३. कित्ता, ले. १३४९ ; रा. खं. १०; ले. १३.

४. पेठे दपतर, भाग २, पृ. १२६, मामा पकडला गेल्यावर ८ दिवसांनी मृत्यू पावले.

५. पे. द. ५, ले. ४७.

६. कित्ता, ले. ४३.

नाना बापूनी इच्छित फळ मिळाल्यामुळे जगन्नियंत्याचे आभार मानिले आणि पेढे व मिठाई वाटली.

रघुनाथरावांनी हे मूल खरे नव्हे असा पुकारा केला. पण बाळंतपणाच्या वेळी दादांची मुलगी पुरंदरास होती. शिवाय इंग्रज रेसिडेंट कर्नल उप्टन यानेही बारीक तपास करून मूल खरे असा अभिप्राय दिला. आनंदीबाईनी नाना-बापूस स्वहस्ते पत्रे लिहून मूल खरे असल्याचे कळविले. तसेच दौलती-विरुद्ध झगडणाऱ्या आपल्या यजमानाबरोबर कडक धोरण ठेवून भांडण विकोपास जाऊ देऊ नये त्यामुळे दौलतीचे नुकसान होईल असाही इशारा त्यांना तिने दिला. सातारा छत्रपतींनीही त्या मंगल प्रसंगाचे हार्दिक स्वागत करून नव्या पेशव्यास ४० व्या दिवशी पेशवाईची वस्त्रे पाठविली. ती पुरंदरास दिनांक २८ मे १७७४ रोजी दरबार भरवून पेशव्यास दिली. दादासाहेबास ही बातमी कळली तेव्हा त्यास पेशवाई पुनः मिळण्याची आशा खुंटली. त्यांनी बारभाईशी समेट घडवून आणण्यासाठी आपल्या तर्फेची माणसे पाठविली. आपणास जहागिर द्यावी अशी दादांची मागणी तर कारभाऱ्यांचे म्हणणे पडले की दान-धर्माकरिता दोन लक्ष रुपये सालिना घेऊन श्रीमंतानी आनंदवल्लीस रहावे. हे दादासाहेबास मान्य न झाल्यामुळे तें पाठीवर फडके, भोसले व मोगल आहेत असे पाहून नर्मदा उतरून शिंदे-होळकरांच्या आश्रयास गेले. तो पावसाळा आल्यामुळे पाठलाग करणारी फौज बऱ्हाणपुरास छावणी करून राहिली.

दादासाहेब शिंदे-होळकरांकडे जाण्याचा विचार करू लागताच त्यांची फौज विसकटण्यास प्रारंभ झाला. मुधोजी भोसले व नारायणरावांचा एक खुनी गारदी महमद इसफ हे आपली ९ हजार फौज घेऊन नागपुराकडे गेले. दुसरा मारेकरी खरकसिंग हा सुद्धा सोडून गेला. बजावा पुरंदरे,शहाजी भापकर, खंडेराव दरेकर आदि सरदारांनी दादास सोडून आपल्या १५ हजार फौजेनिशी ते हरिपंतास लष्करात येऊन मिळाले. आता दादांकडे मानाजी फाकडे, सदाशिव रामचंद्र, मालोजी घोरपडे, बाबूराव पाटणकर हे सरदार, दोन हजार स्वार, एक हजार गारदी व तीन चारशे उंट व २५ हत्ती इतके सामान दादासाहेबाजवळ राहिले. त्यासह दादा इंदुरास होळकरांकडे गेले. तुकोजी होळकर दादास सामोरे जाऊन मोठ्या आदराने शहरात घेऊन गेले. महादजी शिंदे उज्जयनीस होते, तेही येऊन भेटले.

शिंदे-होळकरांनी दादासाहेबांकडे आपला बाहेरून कल दाखविला आणि कारभाऱ्यांशी पुरंदरास आपण समेटाचे बोलणे करतो असे आश्वासन दिले. कारण शिंदे-होळकरास दादासाहेबांना दुखवावयाचे नव्हते. उद्या पारडे फिरून दादासाहेबांची सरशी झाली तर आपली गत कशी होईल? दादासाहेब शिंदे-होळकरांच्या विश्वासावर न रहाता त्यांनी हैदरअल्ली, सुजाउद्दौला, रोहिले, इंग्रज या सर्वांशी राजकारणे सुरू केली. तसेच बारभाईस सामील असलेल्या सरदारांशीही पत्रव्यवहार सुरू केला. बऱ्हाणपुरास पेशव्यांची जी फौज होती ती नर्मदा उतरून येण्याच्या बेतात असता शिंदे-होळकरांनी

त्यास कळविले की, तुम्ही इकडे येऊ नका. श्रीमंतांची समजूत घालण्याचे काम आम्ही करीत असून त्यास देशी घेऊन येतो. पण मे महिना संपला तरी वाटाघाटीतून निष्पन्न काहीच होत नाही असे पाहून हरिपंत फडके व वामनराव पटवर्धन यांनी आपल्या सैन्यासह नर्मदा उतरून कूच केले. हे शिंदे-होळकरास समजताच त्यांनी या सरदारास कळविले की, दादासाहेबांचा व आमचा करार ठरला आहे की, त्यास सात लाख रुपये फौजेचे देणे आहे ते कारभाऱ्यांनी द्यावे, आम्ही उभयता सरदारांनी त्यास देशी घेऊन जावे व आमचे मार्फतीने त्यांचा बंदोबस्त करून द्यावा.[१] हरिपंत फडके यास हे समजताच त्यांनी दादासाहेबांकरिता ७५ लाख रुपये पाठविले.[२] पैसे हाती पडताच सरदार ह्याशी काहीतरी कुरापत काढून दादासाहेबांनी भोपाळच्या रोखे चाल केली.[३] पण शिंद्यांनी त्यास मागे परतण्यास भाग पाडले. तेव्हा दादासाहेब व त्यांच्या पाठीमागून सरदार ह्यांच्या फौजा देशाकडे येऊ लागल्या.

### कर्नाटकातील उलाढाली :

यावेळी कर्नाटकात काय घडामोडी झाल्या ते पाहू. दादासाहेब कर्नाटकातून देशी आल्यावर मुराररराव घोरपडे यांनी मुलुखगिरी करून अनागोंदी, कनकगिरी व चित्रदुर्ग आदि पाळेगारांकडून खंडण्या वसूल करून ते ऑगस्ट १७७४ त गुत्तीस परत आले. मराठे गृह कलह मिटविण्यात गुंतल्यामुळे बसालतजंगास कर्नाटक मोकळे मिळाले. त्यानेही मुलुखगिरी स्वारी अदवानीपासून सुरू करून तो वाटेतील मुलूख जाळीत बागलकोटापर्यंत आला. त्याच्या परिपत्यासाठी पुणे दरबारने पटवर्धनाच्या फौजा रवाना केल्या. पण बसालतजंग अदवानीस आल्याचे वर्तमान कळताच आषाढापासून पावसाळा संपेपर्यंत पटवर्धनांच्या फौजा पुण्याच्या आसपास छावणी करून राहिल्या. हैदरानेही मराठ्यांमधील दुहीचा फायदा घेण्यासाठी कमी केले नाही. कल्याणदुर्गच्या तहाने दादासाहेबानी दिलेला सर्व मुलूख हैदराने जरब दाखवून आपल्या ताब्यात आणिला.

### मोरोबादादाचे कारस्थान :

सन १७७४ च्या पावसाळ्याच्या सुरवातीस कारभारी सखाराम बापू व नाना फडणीस यांनी सवाई माधवराव व त्यांची मातोश्री यांना पुरंदर किल्ल्यावरील वाईट हवा लागू नये म्हणून खाली सासवडास आणिले आणि तिथूनच राज्य कारभार हाकण्यास सुरवात केली. इतक्यात त्यांना अशी बातमी लागली की, मोरोबादादांनी कारभाऱ्यांविरुद्ध कारस्थान करून दोन कारभारी व पेशवे आणि त्यांची मातोश्री चौघाना पकडण्याचे योजिले आहे. हा धाडशी बेत तडीस जाऊ नये म्हणून कारभाऱ्यांनी पेशव्यास अति धांदलीने भर पावसात

१. पे. द. ३६, ले. ४८.

२. सांगली दप्तर, रु, २१ अप्र.

३. खरे, ले. १३८८.

पुरंदरावर नेले.[1] इकडे जुलैच्या प्रारंभी दादासाहेब नर्मदा उतरले व ऑगस्टात तापी ओलांडून पुण्याकडे येऊ लागले. दादासाहेब फौजबंद होते. त्याजबरोबर एक मजल अंतराने शिंदे-होळकरही आपल्या फौजांसह चालत होते. तेव्हा कोणत्याही प्रसंगी आपल्याजवळ फौज असणे आवश्यक असा पोक्त विचार कारभाऱ्यांनी करून निजामअल्ली व त्याचा सरदार घौशा यास बोलावणे पाठविले. तसेच नागपुराहून साबाजीसही बोलाविले. इतक्यात शिंदे-होळकरांकडून कारभाऱ्यांकडे पुरंदरास वकील आले आणि बोलले की, दादास दरसाल दहा लक्ष उत्पन्नाचा मुलूख व मध्यम प्रतीचे दोन किल्ले द्यावे व त्यावर शिंदे-होळकरांची देखरेख असावी. कारभाऱ्यांनी हे म्हणणे तात्काळ मान्य केले व पुढील बोलणी करण्यासाठी नाना व बापू नर्मदेपर्यंत आले. त्याप्रमाणे शिंदे होळकरांनी दादासाहेबास पुणे दरबारचा करार मान्य करण्याविषयी सांगितले असता ऐकेनात. टाळाटाळ करू लागल तेव्हा हरिपंत फडके, पटवर्धन आदि सरदार त्यांच्या रोखे चालून गेले. ही बातमी दादास समजताच त्यांनी एकदम पलायन केले[3] आणि पहिले दिवशी वीस कोसांची मजल करून ते तापीवर गेले. तेथे ताळनेरास बुनगे व जड सामान टाकून देऊन नर्मदेवर गेले. तेथे आनंदीबाई होत्या. त्यास घेऊन संधव्याच्या घाटाने माळव्यात शिरून धारेस गेले. त्या गरोदर होत्या म्हणून त्यास धारेस ठेवून आपण उज्जयनीस गेले. तो मागून शिंदे-होळकर व हरिपंत फडके यांच्या फौजा समीप आल्या.

**दादासाहेबांचे गुजराथेकडे पलायन :**

दादासाहेब पळत होते आणि त्याबरोबरच शिंदे-होळकरांकडे समझोत्याच्या वाटाघाटीसाठी आपले हस्तक पाठवित होते. त्यांच्या मनात तीन गोष्टी घोळत होत्या व त्यापैकीं एक साधण्याचा त्यांचा प्रयत्न होता. एक सुजाउद्दौल्याकडे जावे,ते न होईल तर हैदरअल्लीकडे जावे,ही दोन्ही न होतील तर इंग्रजांकडे जावे. शिंदे, होळकर व हरिपंत फडके एकत्र आल्याचे समजताच पहिल्या दोघाकडे जाण्याचा बेत रहित करून सुरत व भडोच येथील इंग्रजांच्या आश्रयास जाण्याकरिता व गोविंदराव गायकवाडाचे साह्य मिळविण्याकरिता त्यांनी १० डिसेंबर १७७४ ला गुजरातकडे पळ काढिला. त्यांचे पाठीवर हरिपंत वगैरेंच्या फौजाही तिकडे गेल्या. नाना व बापू यांनी देशी परत येताना १५ डिसेंबरला औरंगाबादजवळ मुक्काम केला[4] व १६ डिसेंबरला ते टोक्यास आले.[5]

दमाजी गायकवाड निवर्तल्यावर माधवराव पेशवे यांनी फत्तेसिंग गायकवाडाचे हवाली गायकवाडाचा मुलूख व फौज करून त्यास बडोद्यास

१. ऐ. ले. सं. ५, ले. १४०५.
२. कित्ता, ले. १३९३.
३. कित्ता, ले. १३७२.
४. पे. द. ५, ले. ६८.
५. ऐ. ले. सं. ५, पृ. २२२७, ले. १४२३.

पाठविले व गोविंदरावास पुण्याजवळ तीन लाखाची जहागिर देऊन ठेवून घेतले. फत्तेसिंग आपले राज्य सुव्यवस्थितपणे चालवित होते. पण नारायणरावांच्या खुनानंतर दादासाहेबांनी गोविंदरावास गायकवाडाची सरदारी व सर्व मुलूख दिला. तेव्हा गोविंदरावाने सैन्य जमा करून व फत्तेसिंगास हुसकावून लावण्यासाठी बडोद्यास वेढा दिला. अशा स्थितीत दादासाहेब आपल्या फौजेनिशी गोविंदरावास येऊन मिळाले.

नारायणरावांच्या खुनानंतर लागलीच इंग्रज वकील मॉस्टीन दादास भेटले. तिथपासून दादांचा मॉस्टिनशी पत्रव्यवहार चालू होता. दादा ज्यावेळी बऱ्हाणपूरला आले तेव्हा दादांनी आपला एक हस्तक ऑक्टोबर १७७४ मध्ये पुण्यास मॉस्टिनकडे पाठविला व एक वकील सुरतेस रॉबर्ट गॉबिआर याजकडे सहाय्याची मागणी करण्यास पाठविला. पण कराराची बोलणी होऊन करार पूर्ण होण्यापूर्वीच दादांना बऱ्हाणपूर सोडावे लागले आणि धारेस आपली मंडळी ठेवून स्वतः ते गुजरातेत शिरले. दादासाहेबांच्या पाठीवर हरिपंत होतेच. त्यास शिंदे-होळकर येऊन मिळाले. तेव्हा राघोबास पळता भुई थोडी झाली. दादा काही सैन्य बरोबर घेऊन तापीकडे निघाले. सुरतच्या इंग्रजांशी त्यानी मदतीकरिता बोलणे सुरू केले. इंग्रजानी ही संधी वाया जाऊ दिली नाही. त्यांनी दादास मदत देण्याचे कबूल करून मदतीच्या मोबदल्यात दादानी वसई, साष्टी ही ठाणी आपणास मिळावीत अशी मागणी दादांकडे केली. दादांनी ह्या मागण्यास प्रथम नकार दिला. कारण वसई ही हिंदु धर्माचे संरक्षण करण्याकरिता शूर मराठ्यांनी आपले बलिदान करून स्वराज्यात आणली होती. हा १७३९ मध्ये घडलेला इतिहास राघोबांच्या डोळ्यासमोर होता. तेव्हा दादाने इंग्रजास कळविले की, ह्यापेक्षा मी तुम्हास तुमच्या मदतीच्या मोबदल्यात गुजरातमधील ११ लाख वसुलाचा मुलूख, ६ लाख रुपये रोख आणि दीड लाख युरोपियन सोजिर व पायदळ यांच्या निर्वाहाचा मासिक खर्च म्हणून देईन.[1] मुंबईकर इंग्रजांनी ह्यावर कौन्सिलच्या बैठकीमध्ये कडाक्याचे वाद घातले. इतक्यात पोर्तुगिज लोक वसई घेण्याच्या तयारीत आहेत अशी बातमी त्यांना कळल्यावर त्यांनी राघोबाशी चाललेली बोलणी अर्धवट टाकून त्यांनी ठाणे, वर्सोवा व साष्टी येथे सैन्य पाठवून ही तिन्ही ठाणी आपल्या ताब्यात १७७४ त घेतली.[2]

वर सांगितल्याप्रमाणे ३ जानेवारी १७७५ रोजी १० हजार घोडदळ व ४०० पायदळ बरोबर घेऊन राघोबा बडोद्यास गोविंदराव गायकवाडास येऊन मिळाले.[3] गोविंदराव शहरासमोर तळ ठोकून बसलेच होते व शहराचे आत शहराचे दरवाजे बंद करून फत्तेसिंग होते. शहरावर हल्ला करून बडोदा शहर ताब्यात घ्यावयाचे हा गोविंदरावांचा विचार होता. पण राघोबांनी शहरावर हल्ला न करता आपला हस्तक इंग्रजांच्या मदतीची याचना करण्याकरिता मुंबईस रवाना केला होता. त्यास फत्तेसिंगाच्या स्वाराने पारनेर

१. स. मा. रो. भाग २, पृ. ८४-८५.

२. Elliot, Rulers of Baroda, p. 55.

३. त. क. फ. सी. नं. २६, पृ. २६, २२८, ३२८ ते ३२.

येथे पकडले. ह्या हस्तकाने स्वारांची समजूत काढून आपली सुटका करून घेतली आणि सुरतेस जाऊन त्याने राघोबाचा आणि इंग्रजांचा तह घडवून आणला.

**दादांचा पराभव :**

पुणे दरबारने हरिपंत फडके यास ३० हजार फौज देऊन रघुनाथरावाच्या पाठलागास गुजरातमध्ये पाठविले हे वर आलेच आहे. हे सैन्य जवळ येताच गोविंदराव व रघुनाथराव बडोदा शहराचा वेढा उठवून महीकडे पळाले. हरीपंत फडक्याचे सैनिक त्यांचा पाठलाग करू लागले. त्यास फत्तेसिंगाचे सैन्याने साथ दिली. दोन्ही सैन्यांची गाठ १७ फेब्रुवारीला पडून कडाक्याची लढाई झाली. फडक्यांचा रोख रघुनाथरावावर होता. त्याच्या सैन्याने रघुनाथरावास चेपले.[1] रघुनाथरावाच्याने टिकाव धरवेना. त्यास खंडेराव गायकवाडाची कुमक अद्याप यावयाची होती. दादाकडील अरब सैनिकानी त्यांच्या पगाराची बाकी थकल्यामुळे शस्त्र धरण्यास नाखुशी दर्शविली. अशाच स्थितीत रघुनाथरावाकडील बरीच मातबर माणसे जखमी झाली.[2] तेव्हा रघुनाथरावाने लढाईतून पळ काढला. त्याच्या सैन्याचाही सपशेल पराभव झाला. रघुनाथराव एक हजार स्वारानिशी खंबायतला पळून गेला.[3] कॅ. मॅलेट ह्यावेळी खंबायतला होता. त्याने कंपनीच्या सांगण्यावरून रघुनाथरावास भावनगर येथे पाठविण्याची व्यवस्था केली व तिथून त्यास तारीख २३ फेब्रुवारी १७७५ ला सुरतला आणविलें.[4]

**रघुनाथरावाचा इंग्रजांशी तह :**

रघुनाथराव सुरतला पोचण्यापूर्वी त्याचा हस्तक नरोत्तमदास याने रघुनाथरावातर्फे इंग्रजांशी तह केला. तहाचा पहिला मसुदा नोव्हेंबर १७७४ चा असून त्यातील कलमे येणेप्रमाणे : इंग्रजांनी तीन हजार सैन्य व पुरेसा तोफखाना रघुनाथरावाच्या मदतीस द्यावा. सैन्यात ८०० गोरे व बाकीचे एतद्देशीय असावेत. याच्या मोबदल्यात रघुनाथरावाने साष्टी, वसई, जंबूसर आणि ओलपाड ही स्थळे इंग्रजास कायमची तोडून द्यावी. अंकलेश्वराच्या वसुलातून पाऊण लाख रुपये देऊन शिवाय अमोद, दासोट आणि वलसाड ही स्थळे इंग्रज सैनिकांच्या खर्चासाठी इंग्रजांकडे लावून द्यावी. तसेच गायकवाडांकडे असलेला भडोच येथील वसुलाचा हिस्सा राघोबाने इंग्रजास मिळवून द्यावा. या तहावर ६ मार्च १७७५ रोजी सह्या झाल्या.[5] तह करताना इंग्रजानी रघुनाथरावास पेशवा मानिले. रघुनाथरावाने मराठी दौलतीची पर्वा न करता इंग्रजानी घातलेल्या अटी स्वार्थापोटीं कबूल केल्या.

---

१. ब. रा. ऐ. वे. भा. ३, ले. ९६.
२. पी. आर. सी. व्हॉल्युम २, पृ. २५.
३. ब. रा. ऐ. वे. खं. ३, ले. ११६.
४. कित्ता. ले. ५९.
५. कित्ता, ले. १३.

तहात ठरल्याप्रमाणे रघुनाथरावाच्या मदतीस इंग्रजानी आपली फौज मुंबईहून सुरतेस पाठविली. ह्या सैन्यास बरोबर घेऊन रघुनाथराव खंबायतेस आला. ही बातमी कळताच वामनराव पटवर्धन काठेवाडाहून व फत्तेसिंगराव गायकवाड बडोद्याहून निघून हरिपंतास येऊन मिळाले. रघुनाथराव इंग्रजी फौजेसह खंबायत येथून निघून अहमदाबादच्या रोखाने चालू लागला. त्याजजवळ इंग्रज फौजेखेरीज ३० हजार फौज होती. एवढ्या फौजेस रोजमुरा कमी मिळू लागल्यामुळे फौज बेदिल झाली व तिने लढाईस उभे राहाण्याचे टाळले. त्यामुळें लढाईचा सर्व बोजा इंग्रजांवरच पडत गेला. हरीपंताच्या फौजेची स्थिती तीच होती. इंग्रजी फौजेवर मुख्य सरदार कर्नल किटींग होता. त्यास मराठी लोक किटन असे म्हणत. हा चांगला व हुशार अंमलदार होता. त्याने मराटे अंगावर चालून आले म्हणजे वाटेत थांबून तोफांच्या भडिमाराने त्यास हुसकून लावावे व पुन्हा वाट चालू लागावे असा क्रम चालविला होता. १८ मे रोजी इंग्रजी फौजेसह रघुनाथराव नापाड येथून निघून मही नदीच्या रोखाने कूच करून चालला असता त्याजवर हरीपंताच्या सैनिकानी झाडीतून तोफांचा भडिमार सुरू केला.[1] लढाईस तोंड लागले. दादांकडील अरब लोक पुष्कळ मारले गेले. हरीपंताच्या बाजूचेही बरेच नुकसान झाले. या नापाडच्या लढाईस एक चमत्कारिक गोष्ट घडली. शत्रूकडील लोक कोणते व रघुनाथरावाकडील लोक कोणते हे ओळखता यावे म्हणून इंग्रजानी दादाकडील सैनिकांच्या पागोटचात झाडपाल्याचे तुरे खोविले होते. ही गोष्ट हरीपंताकडील लोकास कळली तेव्हा त्यांनी तसेच तुरे लावून इंग्रजांचे लष्करात प्रवेश करून कत्तल केली.[2] अशा रीतीने ही लढाई अनिर्णित राहून पावसाळा जवळ आल्यामुळे संपली. दादासाहेबास बरोबर घेऊन पुण्यावर चालून येण्याचे आपल्याच्याने होत नाही असे पाहून कर्नल किटींग भडोचकडे जाऊ लागला. इंग्रजांबरोबर दादा भडोचला छावणीस राहाणार असे समजून हरीपंत फडकेने गणेशपंत बेहरे यास अहमदाबादच्या रक्षणाकरिता ठेवून स्वतः महेश्वराजवळ नर्मदा उतरून खानदेशात जुलैमध्ये छावणीस आला.[3] हरीपंत फडके गुजरातेतून निघून आल्यावर इंग्रजास व दादास गुजरात मोकळा सापडला. त्यांनी डभईचे ठाणे घेतले व त्या प्रांती नर्मदेच्या उत्तर तीरास पेशव्यांचा मुलूख होता तितका बहुतेक घेतला. फत्तेसिंग गायकवाड एकटा पेशव्याकडील पक्षाचा. त्याचा या तिघांबरोबर लढून कसा निभाव लागतो? इंग्रजांनी दादास सल्ला दिला की, बडोद्यावर चालून जावे पण गोविंदराव कबूल होईना. ही गायकवाडाची राजधानीची जागा एकदा इंग्रजाचे हाती गेली तर तेच बळकावून बसतील, मग ती आपणास मिळणार नाही असा संशय येऊन गोविंदरावाने ही इंग्रजाची मसलत साफ नाकारली. इतक्यात फत्तेसिंगाकडून इंग्रजास निरोप आला की, दादांचा व

१. कित्ता, पृ. २९५.
२. खोबरेकर, गुमरा, पृ. ६०.
३. पी. आर. सी. व्हॉल्युम २, पृ. २०६.

माझा समेट करून द्यावा. इंग्रजांच्या मध्यस्थीने दादा व फत्तेसिंग यांचा तह झाला. फत्तेसिंगाने पुण्यास पाठवावयाची तीन हजार फौज तिकडे न पाठविता दादाकडे पाठवावी. त्याने दोन महिन्यांनी दादास २६ लक्ष रुपये रोख द्यावे. मध्यस्थ म्हणून इंग्रजास अडीच लक्षाचा मुलूख द्यावा. फत्तेसिंगाने वेळ मारून नेण्याकरिता हा तह केला होता. तहाची कलमें पुरी होईनात तेव्हा गोविंदरावाने बडोदे प्रांती जाऊन लुटालूट चालू केली. याबद्दल फत्तेसिंगाने इंग्रजांकडे तक्रार केली. इंग्रजांनी दादा व गोविंदराव यास मागे बोलाविले. या पावसाळ्यात दादांचा सरदार अमिन याने अहमदाबादेकडे येऊन धामधूम आरंभिली होती पण तेथील सुभेदार अप्पाजी गणेश याने खंडेराव गायकवाडाची मदत घेऊन या अमिनास मोडून पिटून लाविले.

१७७५ चा पावसाळा संपताच हरीपंतांनी सर्व फौज तयार करून गुजरातेत जाण्याकरिता सोनगडच्या रोखे कूच केले. दादासाहेब व इंग्रज याजबरोबर चाललेल्या लढाईसंबंधात कारभारी काहीसे नाउमेद झाले होते पण खुद्द हरिपंताची व पटवर्धन वगैरे सरदारांची नाउमेद झालेली नव्हती. परंतु पुण्याकडून रोजमुरा व पैसा येण्याचे बंद झाल्यामुळे फौज हलेना.

कारभारी मंडळींनी निजामअल्लीस दादासाहेब प्रकरणी आपल्या बाजूस अनुकूल करून घेतले होते. त्याकरिता त्यांनी निजामास साडेबारा लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलूख जहागीर म्हणून दिला होता. गतवर्षी तो आपल्या मोठ्या फौजेसह मराठ्यांस सामील झाला होता. या वर्षी त्याने साडे सतरा लाखाच्या अधिक मुलुखाची मागणी केली व कारभाऱ्यास कळविले की, हा मुलूख आत्ताच्या आत्ता हवाली कराल तर मदत पाठवितो, नाहीतर नाही. इतके बोलूनच तो राहिला नाहीं तर त्याने कारभाऱ्यास भेडसावण्याकरिता भडोचला दादा होता त्याशी सूत्र लाविले. तेव्हा दादा बोलू लागला की, सवाई माधवराव खोटा, तेव्हा निजामअल्लीने सुचविले की, अमृतरावास पेशवाई द्यावी म्हणजे साराच तंटा मिटेल. कारभारी या काव्याने गांगरून गेले. त्यांनी निजामअल्लीस साडेसतरा लक्षाचा मुलूख दिला.

इतके होते तोच इंग्रजांशी लढाई तहकूब होण्याचा प्रसंग आला. कलकत्त्यास वॉरन हेस्टिंग्ज गव्हर्नर जनरल म्हणून आला. मुंबईकर इंग्रजांनी आपल्या अखत्यारांत दादासाहेबास आश्रय देऊन पुणे दरबाराशी लढाई सुरू केली. ही गोष्ट हेस्टिंग्ज यास आवडली नाही. कारण हे मुंबईकरांचे वागणे ईस्ट इंडिया कंपनीच्या हुकुमाविरुद्ध होते. त्याने मुंबईकरास लढाई बंद करण्याविषयी हुकूम सोडला. पुणे दरबारास पत्र लिहून त्याप्रमाणे कळविले. आपण ही लढाई बंद करावी. आम्ही आपणाकडे वकील पाठवीत आहो. तो वकील जो तह ठरवील तो आम्हास मान्य आहे. वकील कर्नल उप्टन फौज घेऊन पुण्यास आला. तो २८ डिसेंबर १७७५ ते १ मार्च १७७६ पर्यंत पुण्यास राहिला. पत्र येताच हरिपंतास लढाई बंद करण्याविषयी व सोनगडास

राहण्याविषयी कारभाऱ्यांनी कळविले. हरिपंतासही सुरत व भडोच इंग्रजांकडून अमिन दादास मदत करीत नाही. त्यांनी व तुम्ही इच्छेस येईल ते करावे असे कळविले. त्यावरून हरिपंत सोनगडासच राहिला.

हे सर्व माहित असतानाही दादा भडोचनजीक होते. ते नर्मदा उतरून हरिपंताच्या रोखे तीन मजले आले. दादा ज्या मसलतीने हरिपंतावर चाल करून आला, ती मसलत उघडकीस आली. फितूर गणेश विठ्ठल यास बेड्या पडल्या. मसलत उघडकीस येताच दादा सोनगडकडे येण्याचा रोख सोडून सुरतेपासून दहा कोसावर गळाकांबळा म्हणून स्थळ आहे तेथे जाऊन राहिला.

पुण्यात १ मार्च १७७६ रोजी पुरंदरच्या तहावर सह्या झाल्या. या तहाने पेशव्याने भडोचवरील वसुलासुद्धा आपले सर्व हक्क इंग्रजास दिले. राघोबाला इंग्रजांनी मदत करू नये. त्याने पेन्शन घेऊन कोपरगांवास रहावे. फत्तेसिंग गायकवाडने इंग्रजास देऊ केलेला मुलूख त्यास परत द्यावा असे ठरले.

राघोबाला ही बातमी समजताच दादा घाबरला. इंग्रजांनी त्यास तहाप्रमाणे आश्रय देण्याचे नाकारले. कारभाऱ्यांच्या हाती आपण सांपडलो तर ते आपला जीव घेतील असा दादाने बहाणा केल्यावरून इंग्रजांनी त्यास दोनशे लोकांनिशी सुरतेत राहू दिले.

• • •

## राज्यातील अन्य घडामोडी

## कालसूची

| | |
|---|---|
| १६९८ . . . . | मराठ्यातील आपापसातील वैरामुळे संताजी घोरपडेचा खून होतो. |
| १७०८ . . . . | कर्नल लेस्ली हे पलटणची काल्पी ही जागा काबीज करतात. |
| १७६१ . . . . | इंग्रज लोक इथपासून आपली जबरदस्त सत्ता हिंदुस्थानात निर्माण करण्यास सुरुवात करतात. |
| १७६२ . . . . | पटवर्धनांना २६ लाखाचा सरंजाम मिळून शिवाय कोल्हापूरच्या सीमेवर जहागीर मिळते. |
| १७६३ . . . . | इंग्रज व फ्रेंच यांचे सप्तवार्षिक युद्ध १७६३ च्या पॅरिसच्या तहाने संपते. |
| १७६४, . . . . | माधवराव पेशवे कर्नाटकच्या स्वारीवर जातात. |
| १७६४, ऑक्टोबर २३ . | च्या लढाईने इंग्रज बनारसच्या पूर्वेकडील प्रदेश आपल्या अंमलाखाली आणतात. |
| १७६५, ऑक्टोबर . . | मुराररावाचा नक्षा उतरविण्यासाठी हैदर गुत्तीवर छापा घालतो. |
| १७६७ . . . . | पर्यंत पाँडेचरीच्या जीवनात झपाट्याने फरक पडला. |
| १७६८, जून . . . | माधवराव पेशवे दादासाहेबास शनिवारवाड्यात नजर-कैदेत ठेवितात. |
| १७७०, डिसेंबर ९ . . | रामराजा कालवश होतात. |
| १७७४ . . . . | च्या प्रारंभी इचलकरंजीकर व करवीरकर यांची आपापसात धुसफुस सुरू होते. |
| १७७५, जानेवारी १० . | ल्युबिन नावाचा फ्रेंच प्रतिनिधी मराठे व फ्रेंच या उभयतांचा एक करारनामा तयार करून पुणे दरबारी सादर करतो. |
| १७७५ . . . . | दादासाहेब व इंग्रज यांच्या मागील कराराला हेस्टिंग्ज पुन्हा उजाळा देतो. |
| १७७५, फेब्रुवारी १५ . | पर्यंत मुरारराव शौर्याने किल्ला लढवतात. |
| १७७५, फेब्रुवारी १५ . | हैदर मारतुतीचा बुरुज उडवून हल्ला करतो. पण यात त्याचे एक हजार लोक कामास येतात. |
| १७७५, मार्च . . . | यशवंतराव, शिंदे नाना फडणीस यास पत्र लिहितात. |
| १७७५, मे . . . | करवीरकर कोल्हापुरास निघून जातात. |
| १७७५, जून ७ . . . | कोन्हेररावांनी अर्जुनगड, घरणगुती व हेराली येथे करवीरकरांशी लढाई केली. |

| | |
|---|---|
| १७७५, सप्टेंबर १२ . . | कोन्हेरराव कित्तुरकरांनी घेतलेली सर्व ठाणी दीड-दोन महिन्यात परत घेतात. |
| १७७५, ऑक्टोबर . . | देसाई व कोन्हेरराव यांचे दरम्यान तह होतो. |
| १७७५ . . . . . | करवीरकर व कोन्हेरराव पटवर्धन यांचे युद्ध होते व मुकुंदराव यांचे मध्यस्तीने तह होतो. |
| १७७५ . . . . . | मराठ्यांच्या फौजा इंग्रजांशी युद्ध करण्यात गुंतल्या असता हैदर संस्थानिकांकडून खंडणी वसूल करून त्यांना मांडलिक बनवितो. |
| १७७५, डिसेंबर . . | हैदर गुत्तीस वेढा घालतो. |
| १७७५, डिसेंबर ते . . १७७६, मार्च . . . | कर्नाटकातील गुत्तीच्या घोरपड्यांचे घराणे आपल्या महा-पराक्रमामुळे उदयास येते. |
| १७७६ . . . . . | हे वर्ष सदाशिवरावभाऊच्या तोतयाचे बंड मोडण्यात जाते. |
| १७७६, जानेवारी . . | चिकोडी घेण्यासाठी रामचंद्र नाईक यांनी कुमक मागितली. |
| १७७६, जानेवारी ३१ . | कोन्हेररावावर हुकेरी येथे असताना करवीरकर त्यांचेवर बेधडक हल्ला करतात. |
| १७७६, फेब्रुवारी . . | रत्नागिरीचे नाईक कुटुंबीय तोतयास मुक्त करतात. |
| १७७६, एप्रिल . . . | हैदरने हरिहर व हल्याल ही ठाणी घेऊन लक्ष्मेश्वरकडे आपला मोर्चा वळविला. |
| १७७६, जून-जुलै . . | हरिपंत तात्या गुजरातेतून परत येतात. |
| १७७६, जुलै ४ . . . | अमेरिका इंग्लंडशी स्वातंत्र्ययुद्ध जाहीर करते. |
| १७७७, सप्टेंबर १३ . . | वाईकर भोसले यांचा मुलगा विठोजी भोसले यास रामरावांच्या मांडीवर दत्तक म्हणून बसवतात. |
| १७७६, सप्टेंबर. . . | ल्युबीन फ्रान्सहून भारतात येण्यास निघतो. |
| १७७६, ऑक्टोबर . . | इंग्रज व पेशवे यांचे दरम्यान तह होतो. |
| १७७६, ऑक्टोबर . . | दादासाहेब पेशवे फिरत फिरत दमणकर पोर्तुगिजांच्या आश्रयास येतात. |
| १७७६, ऑक्टोबर ६. . | पांडुरंगराव फौजेसह मिरजेतून हैदराच्या मुलखावर निघतात. |
| १७७६, ऑक्टोबर ते . १७७७, जानेवारी . | सावशीची लढाई होते. |
| १७७६, नोव्हेंबर . . | मराठे फ्रेंचांशी सख्यत्व जोडण्याच्या वाटाघाटी करतात. |
| १७७६, नोव्हेंबर ११. . | दादासाहेब पेशवे मुंबईत येतात. |
| १७७६, डिसेंबर १८. . | भाऊसाहेब पेशवे ते आपणच असे सांगणाऱ्या तोतयास देहांत शासन देण्यात येते |
| १७७६ . . . . . | च्या अखेरीस राघोबादादा पेशवे मुंबईकरांच्या आश्रयास येतात. |
| १७७७, जानेवारी . . | म्हैसूरकरांच्या चढाईस तोंड देण्यासाठी म्हणून परशुरामपंत मनोलीस पोहोचतात. |
| १७७७, फेब्रुवारी १२ . | ल्युबीन भारतात येऊन पोहोचतो. |
| १७७७, मार्च . . . | च्या मध्यास मॉस्टिन पुण्यास येतो. |

| | |
|---|---|
| १७७७, मार्च २२ . . . | कुमेदान आपल्या कवायती पायदळ व तोफांसह भाऊवर हल्ला करतो. |
| १७७७, एप्रिल . . . | या मुदतीपर्यंत मॉस्टिन पुण्यात पेशवे दरबारी जाऊ शकत नाही. |
| १७७७, एप्रिल २६ . . | ल्युबीन फ्रेंच राष्ट्राचा प्रतिनिधी म्हणून पुण्यास येतो. |
| १७७७, मे २५ . . . | नरसो गोविंद हा बंडखोर पटवर्धनांचे करकंब हे ठाणे शिंड्या लावून घेतो. |
| १७७७, मे १९ . . . | पुणे दरबारचे रामचंद्र गणेश यांचेवर करवीरकरांचे येसाजी शिंदे चालून येतात व युद्ध होते. |
| १७७७, जून ५ . . . | भाऊराव हिरेपाल हे भक्कम ठाणे काबीज करतात. |
| १७७७, जुलै २९ . . | मराठी फौज शिरहट्टीस वेढा देते व याचे काम ऑगस्टपर्यंत चालते. |
| १७७७ . . . . | स्वातंत्र्ययुद्धात इंग्लंडचा पराभव होऊन अमेरिका विजयी ठरते. |
| १७७७ . . . . | कोल्हापूरचे महाराज व हैदर यांचा मिलाफ व पुणे दरबाराविरुद्ध उचल खातात. |
| १७७७, नोव्हेंबर ४ . . | पांडुरंगराव ज्वराच्या दुखण्याने हैदराच्या कैदेतच मरण पावतात. |
| १७७७, नोव्हेंबर २४. . | हरिपंत फडके व भाऊ हे फौजेसह तुंगभद्रा पार करतात. |
| १७७७ . . . . | रामचंद्र गणेश यांची करवीरकरांचा बीमोड करण्यासाठी नेमणूक होते. |
| १७७८, जानेवारी १. . | हैदरअल्ली हरिपंतांवर ते नदीपलीकडे सामान हलविण्याच्या घाईत असता अकस्मात हल्ला करतो. |
| १७७८ . . . . | चा पावसाळा इंग्रजांनी मराठ्यांविरुद्ध मोहिम संकल्पित करण्यात घालविला. |
| १७७८, जानेवारी ते १७७८, मार्च . | महादजींच्या सैन्याने तीन महिने करवीरकरास वेढा देऊन जिंकण्याचा आटोकाट प्रयत्न केला. |
| १७७८, मार्च . . . | मोरोबादादा मराठी सैन्य कोल्हापूर व कर्नाटकात गुंतले असता आपले कारस्थान रचतात. |
| १७७८, मार्च २० . . | घोशा मराठ्यांच्या फौजेनिशी हैदरावर चालून जाण्यासाठी दुसऱ्यांदा नदीपार करतो. |
| १७७८, एप्रिल ५ . . | दादासाहेबांचे कारस्थान मोडून काढण्यासाठी हरिपंत व परशुराम भाऊ यास पत्रे येतात. |
| १७७८, एप्रिल ९ . . | महादजी व कोल्हापूरकर कारभारी यांच्यात करार होतो की, पुणे दरबारला द्यावयाच्या पाच लाखापैकी तीन लाख ताबडतोब द्यावेत. |
| १७७८, एप्रिल २३ . . | कोल्हापूरकर व महादजी यांचे दरम्यान तह होतो. |
| १७७८, जून २० . . | मोरोबा, शिंदे व होळकर यांच्या फौजा चालून येताच घाबरून जाऊन कारभार सोडून बहुलास जातो. |
| १७७८, जून . . . | मॉस्टिन पुणे दरबारी येतो व पुरंदरच्या तहाच्या अटीविषयी विचारणा करतो. |

| | |
|---|---|
| १७७८, जुलै १० . . | वॉरन हेस्टिंग्ज फ्रेंचांचे चंद्रनगर काबीज करतो. |
| १७७८, जुलै ११ . | शिंद्यांची फौज मोरोबा दादा यांस बजाबा पुरंदरे व नारो गणेश यासह पकडते. |
| १७७८, ऑक्टोबर १६ . | वॉरन हेस्टिंग्ज पाँडेचरी काबीज करतो. |
| १७७८, नोव्हेंबर २४. . | दादासाहेबांशी इंग्रज नवीन करार करतात. |
| १७७८, नोव्हेंबर २४. . | इंग्रजी फौज मुंबई बंदर सोडते. |
| १७७९, जानेवारी १. . | मॉस्टिन हा वयाच्या ४८ व्या वर्षी मरण पावतो. |
| १७७९, जानेवारी ४. . | कॅप्टन स्टुअर्ट हा भिवराव पानश्यांच्याकडील तोफेच्या गोळ्याने ठार होतो. |
| १७७९, जानेवारी ७. . | ब्रिटीश सैन्य मराठ्यांच्या तोफखान्याला तोंड देत देत कामशेतला येते. |
| १७७९, जानेवारी १०-११. | इंग्रजी सैन्य पुण्याच्या वाटेस न जाता परत जाण्याचे ठरविते |
| १७७९, जानेवारी १४ . | राघोबादादांचा प्रतिनिधी फॉर्मर यास हातपाय बांधून नाना व महादजीसमोर उभा करतात. |
| १७७९, जानेवारी १६ . | तहाच्या वाटाघाटी करताना फॉर्मर महादजीपुढे कोरा कागद ठेवतो. |
| १७७९, जानेवारी १७ . | दादासाहेब आणि ओलिस रहाणारे स्टुअर्ट व फॉर्मर हे शिंद्यांच्या लष्करात येऊन दाखल होतात. |
| १७७९, फेब्रुवारी ३ . . | दादांचे कारभारी चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र व खरकसिंग हे दादांबरोबरच शिंद्यांच्या लष्करात येतात. |
| १७८१, ऑगस्ट २ . . | सखारामबापू यांना वृद्धावस्था–अतिसार होऊन रायगडावरच देवाज्ञा होते. |

# १६

## राज्यांतील अन्य घडामोडी

(१७७९ पर्यंत)

**साबाजी मारला जातो, मुधोजी सेनासाहेब सुभा होतो :**

दादाचा पाठलाग होत असता बऱ्हाणपुरला निजामअल्ली नाना फडणीस व सखाराम बापू यास येऊन मिळाला. पण दादा गुजरातेत पळाल्यावर निजामअल्लीने कारभाऱ्यांचा निरोप घेऊन वऱ्हाड प्रांती जाऊन इलिचपुराभोवतालची बरीच ठाणी घेतली. इतक्यात साबाजी व मुधोजी भोसले यांची लढाई जुंपली. मुधोजीच्या बाजूने नारायणराव पेशव्याचा खुनी जमादार महमद इसफ हा दोन हजार गारद्यांसह लढत होता. त्याजवर लढाऊ हत्ती घालून साबाजीने बहुतेक गारदी मारून तुडवून टाकिले. मुधोजीची फौज उधळण्याच्या बेतात होती. इतक्यात साबाजीस मुधोजीच्या पिस्तुलाची गोळी लागून तो प्राणास मुकला. तेव्हा राज्याचा अधिकार आयताच मुधोजीच्या हाती आला. मुधोजी दादासाहेबांच्या पक्षातला. त्याचे पारिपत्य होणे आवश्यक असे कारभाऱ्यास वाटून त्यानी निजामअल्लीस नागपूरवर स्वारी करण्यास सांगितले. त्याप्रमाणे निजामअल्लीने नागपुरावर चाल केली. यावेळी मुधोजीचा दिवाण दिवाकरपंत याने मध्यस्ती करून निजामास लढाईच्या खर्चाबद्दल बारा लाख रुपये देऊन सलुख घडवून आणला. मुधोजीने निजामामार्फत नाना फडणीस व सखाराम बापू यास विनंती केली. आपला मुलगा रघोजी यांचे नावे सेनासाहेब सुभ्याची वस्त्रे द्यावीत, आपण दादासाहेबांच्या बाजूस वळणार नाही, नेहमी पुणे दरबार सांगेल त्याप्रमाणे वागत जाऊ. तेव्हा पुणे दरबारने वस्त्रे देण्याचे कबूल केले. पण नारायणराव पेशव्यांचा खुनी गारदी महमद इसफ जो मुधोजीच्या सैन्यात होता, त्यास आमच्या स्वाधीन करावा असे सुचविले. ही बोलणी निजामअल्लीमार्फत चालत होती. तेव्हा मुधोजीने निजामअल्लीच्या सांगण्यावरून त्यास आपल्या राज्यातून घालवून दिले. कारभाऱ्यांनी मुधोजीच्या म्हणण्याप्रमाणे त्यास मान्यता देऊन त्याच्या मुलास वस्त्रे दिली.

वरील कारभार आटोपून निजामअल्ली औरंगाबादेस आला व त्याने पुणे दरबारास केलेल्या मदतीदाखल आपणास दौलताबादचा किल्ला मराठ्यांकडून मिळावा अशी मागणी केली. निजामअल्लीशी शत्रुत्व निर्माण होऊ नये म्हणून कारभाऱ्यांनीं त्यास दौलताबादचा किल्ला दिला.

**करवीरकरांशी तंटा :**

माधवराव पेशवे सन १७६४ मध्ये कर्नाटकच्या स्वारीवर जात असता त्यांनी स्वतः हुकेरी, रायबाग, मागल, चिकोडी आणि मनोली ही सर्व ठाणी कोल्हापूरकर जिजाबाईच्या इच्छेप्रमाणे बसवून दिली. त्यावेळी करवीर राज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने त्याच वर्षी एक करार पेशवे व करवीरकर यामध्य झाला.[1] यावेळी जिजाबाईनी कर्ज काढून पेशव्यांना ७ लाख रुपये दिले होते. या कर्जाची फेड व्यवस्थितपणे होऊ शकली नाही. त्यामुळे पेशव्यांनी मनोळी व चिकोडी या तालुक्यांचा वसुल पटवर्धनांना करावयास सांगून त्यांच्याकडून सावकाराची रक्कम भरण्याची व्यवस्था केली. करारा-प्रमाण म्हणजे कर्जफेडीसाठी चिकोडी व मनोळी हे दोन तालुके पेशव्यांचे सांगण्यावरून पटवर्धनास द्यावे लागले. तेव्हापासूनच कोल्हापूरकर व पटवर्धन यांचे झगडे व्हावयास सुरुवात झाली. हे झगडे जवळजवळ तीस-पस्तीस वर्षे चालू राहिले. एकमेकांच्या प्रदेशात शिरून जाळपोळ, लुटालूट करणे हा क्रम दोन्हीकडील फौजांनी ठेविला होता. पटवर्धनाना इचलकरंजीचे घोरपडे आपल्या सोयीप्रमाणे सहाय्य करीत असत. पटवर्धनाना सन १७६२ मध्ये २५ लक्षांचा सरंजाम देऊन कोल्हापूरच्या सीमेवर त्यांना मोठी जहागिर दिली व जहागिरीच्या रूपाने पेशव्यांनी कोल्हापूरच्या सीमेवर आपले ठाणे बसविले. इचलकरंजीकर व्यंकटराव घोरपड्यास बाजीराव पेशव्यांची बहीण अनुबाई दिली होती.

सन १७७४ च्या प्रारंभी इचलकरंजीकरांची व करवीरकर छत्रपती यांची धुसफूस सुरू झाली. इचलकरंजीकर घोरपडे हे पेशव्यांचे नातलग. त्यास पुणे दरबारकडून आतून फूस होती. म्हणून त्यानीही करवीरकरांशी मिळते घेतले नाही. परिणामी करवीरकरांचे सेनापती राजेश्री येसाजी शिंदे यानी इचलकरंजीवर चढाई केली. ही हकिगत पुणे दरबारास इचलकरंजीच्या लक्ष्मीबाई घोरपडे यांनी कळविल्यावर नाना फडणीसांनी कान्हेरराव पटवर्धनास फौज देऊन येसाजी शिंदेच्या पारिपत्यास पाठविले. त्यांची फौज येताच करवीरची फौज शहर सोडून परत निघाली. तिचा पाठलाग पटवर्धनांनी केला. मोठे झुंज झाले. दोन्हीकडील दहा-पंचवीस माणसे ठार व जखमी झाली. करवीरकरांचा अगदी मोड झाला व ते मे १७७५ ला कोल्हापुरास निघून गेले.[2] पण असा तह होऊनही त्या भागात शांतता नांदावयाची नव्हती. इचलकरंजीकरांकडील भवानराव प्रतिनिधी यांनी कोल्हापुरकरांच्या वडगाववर स्वारी केली. वडगाव व त्याच्या भोवतालची गावे लुटली. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी करवीरकर सेनापती यशवंतराव शिंदे फौजेनिशी चालून गेले. वरच झुंज होऊन करवीर फौजेला पराभव पत्करावा लागला. यापुढील एक-दोन प्रसंगी करवीर सैन्यास पराभव

१. मावजी, तह व करार मदार, पृ. ४७-५५.
२. ऐ. ले. सं. भा. ५, पृ. १४५३.

पत्करावा लागल्यामुळे कोन्हेरराव पटवर्धनास मिरजकर व इचलकरंजीकर यांच्या फौजा एकत्र होऊन त्यांनी कोल्हापुरास वेढा दिला. पटवर्धनांची फौज मोठी असल्यामुळे शहराचा पाडाव होण्याची वेळ आली तेव्हा कोन्हेर-रावानी आपण शहर लुटणार असे सगळीकडे जाहीर केले आणि त्याप्रमाणे आपला बेत तडीस नेला. या कटकटीना पुणे दरबारकडून पायबंद बसावा म्हणून सेनापती यशवतराव शिंदे यांनी मार्च १७७५ मध्ये नाना फडणिसास पत्र लिहिले, "राजश्री पंतप्रधानांकडून धन्याचे पायाशी अमर्यादा न व्हावी यासाठी तीर्थरूप महाराज आबासाहेब (संभाजी राजे) आणि मातुश्री आईसाहेब (जिजाबाई) यांच्याशी नानासाहेब पेशवे व त्यांचे चुलत बंधू सदाशिवरावभाऊ यांनी पूर्वी शपथपूर्वक करारमदार केला. त्या कराराप्रमाणे वर्तन व्हावे."[१] अशी अनेक पत्रे पुणे दरबारी करवीरकरांकडून जात असत. पण त्यांची बूज राखली जात नसे असे दिसते. कारण तारीख ११ जून १७७५ च्या पत्रावरून कोन्हेररावानी अर्जुनगड, धरणगुती व हेराळी येथे ७ जून १७७५ रोजी करवीरकरांशी लढाई केली.[२]

याच सुमारास कित्तूरकर देसायाचा दंगा सुरू झाला. कित्तूरकर प्रबळ होऊन त्याने बेळगाव व धारवाड जिल्ह्यातील बराच मुलूख बळकाविला. गोकाकपर्यंतची पेशव्यांची बहुतेक ठाणी घेतली. पंधरा हजार पायदळ, दीड हजार स्वार याशिवाय काही तोफा इतके सामान जमविल्यामुळे त्याचा व करवीरकरांचा बंदोबस्त करण्यासाठी पुणे दरबारने रामचंद्र गणेश कानडे व कृष्णराव पानसे यांजबरोबर फौज देऊन त्यांची रवानगी केली. ह्या फौजेशी व करवीर फौजेची लढाई कर्नाटकाच्या वाटेवरील कवठे गावी झाली. लढाईत यशवंतराव शिंदे यांना माघार घ्यावी लागली. याप्रमाणे ही लढाई रेंगाळत चालली असता करवीरकरांचे पुरंदरास गेलेले वकील महादेवशास्त्री व आपाजी शामजी यांनी पुणे दरबारशी तहाची बोलणी लाविली. सरकारच्या लौकिकाप्रमाणे करवीरकरांचे पारिपत्य असे काहीच झाले नव्हते. तरी कित्तूरकरांचे बंड मोडण्याचे काम फार जरूरीचे असल्या-मुळे कारभाऱ्यांनी कोल्हापूरकरांशी तह ठरवून हे प्रकरण तात्पुरते मिटविले.[३]

**कित्तूरकरांशी लढाई :**

नंतर कोन्हेरराव कित्तूरकरांवर चालून गेला. गोकाकपासून दीड कोसावर मालधनी येथे लढाई होऊन कित्तूरकरांचा मोड होऊन ते मागे हटले. नंतर चार दिवसांनी दुसरी लढाई होऊन तीतही त्यांचा मोड झाला. तेव्हा त्यानी समेटाचे बोलणे लाविले. पण हैदराकडून कुमक मिळविण्याची त्यास आशा असल्यामुळे ते तह ठरविण्याचे लांबणीवर टाकू लागले. तेव्हा

१. गुजर, क. छ. घ. इ. सा. भा. ४, ले. २७.

२. कित्ता, ले. २८.

३. तहाची याद सतरा कलमी, ऐ. ले. सं. ५, ले. १४७२.

१२ सप्टेंबर १७७५ पासून कोन्हेररावाने पुढील दीड महिन्यात कित्तूरकरांनी जी जी ठाणी घेतली होती ती ती सर्व परत घेऊन पूर्वीप्रमाणे अंमल बसविला आणि त्यांनी कित्तुरापासून पाच कोसांच्या अंतरावर राहून कित्तूरास शह देण्यास सुरुवात केली. हैदरखानाकडून कुमक वेळेवर येत नाही असे पाहून देसाईनी कोन्हेररावास शरण जाऊन त्यांशी तह केला. तह ऑक्टोबरमध्ये ठरवून तहात दोन लक्ष रुपये यंदाची खंडणी व मागील बाकी काही ती चुकती करावी असे ऑक्टोबर १७७५ त ठरले.

**शिंदे-होळकरांकडून हिशेब :**

शिंदे-होळकरांकडे कारभाऱ्यांनी जहागिरीच्या उत्पन्नाचे हिशेब मागितले. शिंदे गुजरातेतून हरिपंत फडक्यांची इंग्रजांच्या फौजेशी गाठ पडण्या अगोदर उज्जयनीस गेले. होळकरही काही दिवसानी छावणी झाल्यावर इंदुरास गेले. दोघे मातब्बर सरदार; ज्यावर राज्य संरक्षणाची भिस्त ते आपल्या जहागिरीत जाऊन वसल्याने कारभारी मंडळीस राग आला. शिंद्यांकडे साडे पासष्ट लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलूख पेशव्यांनी जहागिर दिला होता. त्याच्या उत्पन्नातून सरकारास कारण पडेल तेव्हा त्यांनी फौज ठेवून चाकरी करावी व कारण न पडेल तेव्हा वसुलाचा भरणा सरकारात करावा असा करार होता. शिंद्यांनी एवढ्या जहागिरीच्या उत्पन्नातून २० ते २२ हजार फौज बाळगायला हवी होती पण गेल्या दोन वर्षात त्यांनी सात आठ हजारांपेक्षा अधिक फौज बाळगली नव्हती व सरकारात पैसाही दिला नव्हता. होळकरही शिंद्यांच्या धोरणाने वागू लागल. या दोन सरदारांकडून कारभाऱ्यांनी हिशेब मागितले तेव्हा भांडण विकोपास जाते की काय असा रंग दिसू लागला. पण शिंदे-होळकरांनी आपण पेशव्यांचे नम्र सेवक हे न विसरून ऑक्टोबर १७७५ मध्ये आपापल्या जहागिरीचे हिशेब दाखविण्याचे व सवाई माधवराव यांची मनापासून चाकरी करण्याचे कबूल केले.

**राज्यातून अधिक पैसा वसूल :**

राज्यात चोहीकडे बंडे व धामधुमी सुरू झाल्या. नवीनही उपस्थित होऊ लागल्या. शिवाय इंग्रजांशी युद्ध सुरू होतेच. मुलखातून वसूल निर्वेधपणे येईना व जो वसूल येई तो फौजेच्या खर्चास पुरेना. राज्यातून अधिक पैसा वसूल करण्याकरिता कारभारी यांनी हक्क-रुसूम व दहकपट्टी हे एक वर्षापुरते नवीन कर यंदा बसवून वसूल घेतला. जमीन बाबीचा वसूल दर शेकड्यास दहा रुपये जास्ती घ्यावे. गांवगन्नाचे पाटील, कुळकर्णी, चौगुले, शेटचे, महाजन यांच्या हक्क मुशाहिऱ्याचे उत्पन्न एक सालचे अजिबात घ्यावे ; इनामदारांच्या इनामाचे एक सालचे उत्पन्न सर्व घ्यावे, सर्व सरदार दरकदार, तैनातदार यांच्या तैनाती एक सालच्या घ्याव्या. वाणी, उदमी वगैरे लोकांच्या प्राप्तीवर शेकडा एक रुपया घ्यावा. याप्रमाणे या करांचे स्वरूप होते. हे कर आपल्या रयतेवर न बसावे अशी पटवर्धनांची फार

इच्छा होती. पण नाना फडणिसांनी जिकिरीची पत्रे वारंवार लिहून सर्व पैसा वसूल केला (सन १७७५).

**तोतयाचा शेवट :**

सदाशिवरावभाऊंचे नांव धारण करून कोणी तोतया मुलखात दगा करीत होता; त्यास पकडून त्याची चौकशी करून माधवराव पेशव्यांनी त्यास अहमदनगर किल्ल्यात कैदेत ठेविले होते. त्या तोतयास एके स्थळी न ठेविता किल्ल्यावरून हिंडवीत असत. जून महात कारभाऱ्यांनी निजामअल्लीकडे दौलताबाद किल्ला सुपूर्त केला. तेव्हा तोतया तेथे होता. तेथून काढून कारभाऱ्यांनी त्यास आपल्या विश्वासाच्या अशा मिरज किल्ल्यात आणून ठेविले. त्यावेळी हा खरोखरीच भाऊ असावा असा भ्रम पटवर्धनांपैकी काही मंडळीस झाला. त्यास अनुबाई घोरपडे यांनीही साथ दिली. त्यामुळे या महत्त्वाच्या मुद्यावर आपल्या घरात मतभेद नकोत असा विचार करून पांडुरंगराव पटवर्धनांनी पुणे दरबारास लिहिले की, या तोतयास दुसरीकडे नेऊन ठेवावे. मिरजेस नको. भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई ही पुण्यास क्षय रोगाने आसन्नप्राय होती. तीस आपला नवरा जिवंत असून तोतया तोच आपला नवरा असे वाटत होते. तिने "सौभाग्यवती" हे उपपद सोडिले नव्हते. त्या बाईनी पांडुरंगरावास पत्रावर पत्रे पाठवून विनविले की, तूर्त तोतयास मिरजेतच ठेवावे. पण पांडुरंगरावांनी हे काही न ऐकता कारभाऱ्यास तोतयास दुसरीकडे हालविण्यासाठी ससेमिरा लाविला. तेव्हा त्यांनी तोतयास मिरजेतून काढून रत्नागिरीस पाठविले.

तोतयास रत्नागिरीच्या किल्ल्यात पाठविला. रत्नागिरीचा सुभा रामचंद्र नाईक परांजपे या सावकाराकडे होता. ह्या नाईक कुटुंबियास आपण तोतया नसून खरा सदाशिवरावभाऊ आहे हे पटवून दिले. त्यांची खात्री झाल्यावरून नाईक कुटुंबियांनी तोतयास फेब्रुवारी १७७६ त मुक्त केले व तोच सदाशिवराव-भाऊ म्हणून त्याच्या नावाची ग्वाही फिरविली. आपण खरा भाऊ असून माजी पेशव्याने व सांप्रतच्या कारभाऱ्यांनी लबाडीने आपणास कैदेत टाकिले होते असा पुकारा ह्या तोतयाने मुक्त झाल्यावर केला. तेव्हा त्यास हजारो अनुयायी येऊन मिळाले.[१] त्याने फौज चाकरीस ठेवून कोंकण प्रांत काबीज करण्याची झपाट्याने सुरवात केली. सुवर्णदुर्ग व देवगड हे किल्ले त्याने आपल्या ताब्यात घेतले.[२] धुलपाने आपल्याकडील पेशवे सरदारच आरमार तोतयाच्या हवाली केले. तोतयाने अंजनवेल व गोवळकोट हे किल्ले घेतल. पारिपत्यासाठी पाठविलेले गारदी सैन्य आपलेसे करून घेतले आणि उत्तर कोंकणचा सर्व मुलूख स्वारी करून घेतला. तोतयास पटवर्धन सरदारांचे पाठबळ होते. मुंबईचे इंग्रज, करवीरकर[३] व हैदरअल्ली यांची फूस होती.

१. Bombay Archives, political Dept. Secrect cons. 14th October 1776, No. 2.

२. खरे, ऐ. ले. सं. भा. ६, ले. १८८१.

३. कित्ता, ले. १८८२.

त्याजवळ २० हजार फौज जमा झाली. इंग्रजांचीही मदत मागितली.[१] दादांजवळ माणसे पाठविली.[२] त्यामुळ धैर्य येऊन त्याने बोरघाट[३] चढून राजमाची घेतली व सिंहगडच्या किल्लेदारास तो अनुकूल करून घेण्याच्या बेतात होता.

कारभाऱ्यांस तोतयाच्या या उद्योगामुळे त्याचे पारिपत्य करण्याची कामगिरी हाती घेणे भाग पडले. पायदळ, तोफखाना व शिंदे होळकरांची फौज त्यावर रवाना केली. पानशांचा तोफखाना आणि शिंद्यांची धडक तोतयास सिंहगडच्या पायथ्याहून बेलापुरास परतण्यास कारणीभूत झाली.[४] तोतया बेलापुराहून गलबतात बसून मुंबईस इंग्रजांच्या आश्रयास जात असता त्यास रघोजी आंग्र्याने पकडले व पुण्यास आणिले.[५]

पुण्यास तोतयाची चौकशी रामशास्त्रींच्या पंचायतीपुढे सुरू झाली. पंचायतीत शास्त्रींबरोबर गोपिनाथ दीक्षित, हरिपंत फडके, बाबूजी नाईक बारामतीकर वगैरे पंच होते.[६] त्यांजसमोर त्याने आपण छत्रपुरचा कनोजा ब्राह्मण असल्याचे कबूल केले.[७] सर्वानुमते तोतया खोटा ठरल्यावर त्याची धिंड काढून शहरात सर्व लोकास दाखवून नंतर मेखसूने डोके फोडून त्यास दिनांक १८ डिसेंबर १७७६ रोजी देहांत शासन देण्यात आले.[८] तोतयास जे सामील होते त्यांचे सरंजाम जप्त करून त्यांना प्रायश्चित दण्यात आले. कोणास कैद तर कोणास दंड अशा शिक्षा झाल्या आणि कोंकणात सर्वत्र अंमल बसविला.

### पुरंदरचा तह इंग्रजास व दादासाहेब या दोघांनाही नापसंत (१७७६ ते १७८२):

पुरंदरचा तह गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जच्या मनाविरुद्ध मुंबईकर इंग्रजास करावा लागला. यावेळी म्हणजे, १७७४ मध्ये ब्रिटिश पार्लमेंटने कायदा करून हिंदुस्थानांतील कपनीचा कारभार चोख चालण्यासाठी गव्हर्नर जनरल च्या मदतीस एक चार सभासदांचे कौन्सिल नेमिले. ह्या कौन्सिलचा अधिकार मुंबई व मद्रासच्या इंग्रजांवर चालत होता. मराठ्यांविरुद्धच्या लढाईन आपले नुकसान आहे तेव्हा मुंबईकर इंग्रजांनी मराठ्यांशी ताबडतोब तह करावा अशा प्रकारचे तंबीवजा मत या कौन्सिलने मुंबईकर इंग्रजास कळविले. ह्या कौन्सिलच्या युद्ध तहकुबीच्या ठरावास हेस्टिंग्जचा पाठिंबा नव्हता.[९]

---

१. Secret and Pol. Deptt. Diary No. 17 A of 1776, pp. 453-469.

२. Ibid.

३. खरे, भा. ८, ले. १८८९.

४. कित्ता, ले. १९०१.

५. कित्ता, ले. १९१३.

६. कित्ता, ले. १९२७, १९३२.

७. कित्ता, ले. १९३२.

८. कित्ता, ले. १९५७.

९. Gleig II, p. 194, Hastings to Sulivan 18th Aug. 1778.

म्हणून हेस्टिंग्जने आपले वरील मत व्यक्त केले. इतकेच नव्हे तर हा तह कंपनीचे अहित करणारा आहे अशी मुंबईकर इंग्रजांची खात्री झाली.[1] मुंबईकर इंग्रजांना येथील राजकीय परिस्थितीची प्रत्यक्ष जाणीव दूर अंतरावर असणाऱ्या कलकत्तावासी कौन्सिलपेक्षा असल्यामुळे मुंबई कौन्सिलने ह्या तहाविरुद्ध एकमुखी ठराव पास केला.

राघोबा दादांना तरी हा तह पसंत कुठे होता? इंग्रजांनी जेव्हा दादांना पुरंदरच्या तहाप्रमाणे आश्रय देण्याच नाकारले तेव्हा "कारभाऱ्यांच्या हाती आपण सापडलो तर ते आपणास जीवे मारतील". असा पोबारा त्यांनी केला तेव्हा इंग्रजांनी त्यास दोनशे लोकानिशी सुरतेत राहू दिले.[2] कंपनी सरकारने जरी दादास नाईलाजाने आश्रय दिला तरी त्या संरक्षणाचा अर्थ असा नव्हे की, मुंबईकर इंग्रज पुणे दरबारच्या विरुद्ध दादांना मदत करू इच्छितात[3] असे कंपनी सरकारचे नंतरचे म्हणणे होते. पुण्यास इंग्रजांचा वकील होता त्यास दादांच्या व मुंबई सरकारच्या निर्णयाने चिंता उत्पन्न झाली. सुरतेस दादासाहेब राहिले. ते आमच्या स्वाधीन होईपर्यंत आम्ही तहात ठरल्याप्रमाणे एक छदामही त्यास देणार नाही. हे पुणे दरबारने इंग्रजांना स्पष्ट केले. दादासाहेब सुरतेस राहू लागले. तिथेही त्यांना चैन पडेना. तेव्हा त्यांनी नवीन उपद्व्याप सुरू केला. आपले वकील कलकत्तेकर इंग्रजांकडे व मुंबईच्या इंग्रजांकडे पाठविले की पैसा व खर्चास लागेल तो देऊन पुस्तपना राखीत जावा.[4] वारंवार हुकुमाचा उजूर धरू नये म्हणून अशा अर्थाची पत्रे घेऊन सखाराम पंडित दादासाहेबांकडे आले. दादा इंग्रजांकडून फिरत फिरत दमणकर पोर्तुगिजांच्या आश्रयास ऑक्टोबर १७७६ त आले. आणि तेथील अधिकाऱ्यांमार्फत गोवे येथील पोर्तुगिज गव्हर्नराकडे बोलणे लाविले की, आपल्याला तुमच्या मुलखात रहाण्यास जागा द्यावी नाहीतर जलमार्गे हैदराकडे पोचते करावे.[5] ही बातमी पुणे येथे कारभाऱ्यास कळली. तेव्हा त्याने पुण्यात वास्तव्य करीत असलेल्या पोर्तुगिज वकिलास बोलावून तंबी दिली. तंबीचा उपयोग रास्त झाला. गोवे सरकारकडून दादाच्या विनंतीस नकार मिळाला. तुम्हास पाहिजे असेल तर फक्त पंचवीस माणसांसह दमणच्या किल्ल्यात येऊन रहावे असा त्यांनी दादास जबाब दिला. तेव्हा निराश होऊन सुरतेस चार हजार लोक नवे ठेवून मुंबईस येण्याची मसलत करून बाहेर निघाले. मार्गी पेशवाईचे मुलखात रोखे करून घासदाणा व खंडणी लाख दोन लाख रुपये घेतले[6] आणि तारापुरच्या मुक्कामास येऊन किल्ला घेतला. हे वर्तमान पुण्यास समजताच पुण्याहून भिवराव पानसे याजबरोबर तोफखाना देऊन त्यास रवाना केले.

१. *Ibid* pp. 266-271.

२. Bombay Archives, Sec. and Pol. Deptt. Diary No. 17 of 1976. Keating to Bombay Council, 11th March 1776, pp. 172—74.

३. Ibid, pp. 265-66.

४. बंगाल्याहून पत्रे आल्याचा उल्लेख का. सं. प. या. ले. २३६, पृ. २११ मध्ये आहे ; Secret & Poli. Deptt. Dairy No. 17 A, pp. 484-488.

५. ब. रा. ऐ. बे. सं. २, पृ. १९०.

६. Gense -Banaji, Gaikwad, Vol. II of 1776, p. 256.

दादासाहेब यांनी अमृतराव साहेबास तारापुर किल्ल्यात सरंजामसुद्धा ठेवून आपण ११ नोव्हेंबरला मुंबईस गेले. भिवराव पानसे यांनी येऊन तारापुरचा किल्ला घेतला.[१] तेव्हा त्यात अमृतराव होते. ते जहाजात बसून दादासाहेब यांजपासी मुंबईस आले.[२] रघुनाथरावास पुणे दरबारच्या संमतीविरुद्ध ठेवू नये असे मत सुप्रीम कौन्सिलचे होते.[३] तर पुणे कारभाऱ्यांनी पुरंदरच्या तहातील कलमे पाळली नाहीत त्या अर्थी रघुनाथरावास मदत करणे व आश्रय देणे हे आमचे कर्तव्य असे मुंबई इंग्रजांचे म्हणणे.[४] पण सुप्रीम कौन्सिलने मुंबई इंग्रजास निक्षून सांगितले की, तुम्ही पुरंदरच्या तहाच्या अटींचे पालन करा.[५]

ऑक्टोबर १७७६ च्या सुमारास पुरंदरच्या तहातील अटीस मूर्त स्वरूप येण्याची चिन्हे दिसू लागली. इंग्रजांकडून पेशव्यास तहात ठरल्याप्रमाणे प्रदेश मिळणार होता इतक्यात रघुनाथराव मुंबईकरांच्या आश्रयास जात असल्याचे कारभाऱ्यास कळले आणि त्यांनी ह्यास आक्षेप घेतला.[६] ह्या मुंबई सरकारच्या कृत्याने लागलीच युद्धास तोंड लागण्याची चिन्हे ब्रिटिश सेनानी ब्रिगेडीअर जनरल गोरडोन यास दिसू लागली.[७] सुप्रीम कौन्सिलला रघुनाथरावास मुंबई इंग्रजांनी आश्रय दिल्याचे बिलकूल आवडले नाही. कौन्सिलने मुंबईकरांना कळविले की तुम्हास जर पुणे दरबारशी असलेले मतभेद मित्रत्वाने मिटवावयाचे असतील तर तुम्ही आपल्या कोणत्याही वसाहतीत दादांस आश्रय देता कामा नये.[८] उष्टनला पुण्यातून परत बोलाविले आणि त्या जागी मुंबईकरांनी मॉस्टिन यास आपला वकील म्हणून पाठविले. पुणे दरबारने मॉस्टिन हा साष्टी बेट इंग्रजास घेण्यास प्रवृत्त करणारा असल्याचे गृहीत धरून त्यास पुण्यास येण्यास हरकत घेतली.[९] त्यामुळे मॉस्टिन एप्रिल १७७७ पर्यंत पुण्यास येऊ शकला नाही.

फॅरसनने या तहाचे वर्णन आपल्या मित्रांना आपल्या पत्रातून केले आहे.[१०] त्याचे म्हणणे असे की, मुंबई सरकारला किंवा इतर कोणीही मराठ्यांशी युद्ध करण्यास उत्तेजन वा हुकूम देऊ नये.[११]

सन १७७६ चे साल पुणे दरबारला सदाशिवरावभाऊच्या तोतयाचे बंड मोडण्यात गेले. त्यास दादासाहेबांनी आपल्याकडे बोलाविले होते. पण

१. ऐ. ले. सं. ६, ले. १९३६.
२. कित्ता, ले. १९३४.
३. Fifth Report from the Committee of Secretary, App. No. 129.
४. *Ibid*.
५. *Ibid*, p. 120.
६. Sec. Pol. Deptt. Diary No. 17 A of 1776, p. 602.
७. *Ibid*.
८. Fifth Report, App. No. 146.
९. *Ibid*.
१०. Macpherson, Soldiering in India, pp. 302—304.
११. *Ibid*. p. 304.

चौकशीअंती त्यास तो तोतया असल्याचे समजल्यावरून दादानी त्याचा नाद सोडला.[१]

मॉस्टिन मार्च १७७७ च्या मध्यास पुण्यात आला. त्याने कारभारी मंडळात मुंबईकर इंग्रज याजमधील पुरंदर तहासंबंधीचे मतभेद मिटविण्याचा प्रयत्न केला. कलमवार उजळणी केली आणि मराठे मंडळांनी जे आरोप मुंबईकर इग्रजांवर केले होते त्या सर्वांचे निराकरण करून मुंबईकरांच्या वतीने तुम्ही मराठे युरोपियन सोजिरास आश्रय देऊ नये असे तहात असता देता आणि तेही सन १७६१ पासून आजतागायत हे मराठ्यांच्या निदर्शनास आणिले तसेच तोतयांची जी माणसे साष्टीत घुसली त्यांना केवळ भूतदया म्हणून माणुसकीने आश्रय दिला. त्यांना, तसेच दादांना आश्रय देण्यात आणखी दुसरा हेतू नाही हे त्याने आवर्जून सांगितले. इतके होते तोच पुणे दरबारचा वकील ल्युबिन याच्यामार्फत मराठे फ्रेंचांशी सख्यत्व जोडण्यासाठी वाटाघाटी करत असल्याचा सुगावा इंग्रजांस नोव्हेंबर १७७७ मध्ये लागला.[२] मराठी राज्यातील फ्रेंच इभ्रत नाहीशी करून इंग्रजांचे वजन वाढविणे हे आपले प्रथम कर्तव्य असे हेस्टींग्जला वाटले.[३] तेव्हा त्यांनी मुंबईस वास्तव्य करीत असलेल्या दादांशी पुन्हा बोलणी सुरू केली. दादांशी झालेल्या १७७५ च्या करारास पुन्हा उजाळा दिला. करारावर सह्या केल्या. आणि मराठ्यांशी युद्ध करण्यासाठी जय्यत तयारीस लागले. कलकत्ता कौन्सिलला पुरंदरचा तह इंग्रजांच्या फायद्याचा असे कधीच वाटले नाही. पण त्यावर संतुष्ट रहावे. मराठ्यांशी युद्ध करून खर्च वाढवू नये असे त्यांचे मत होते.[४] पण कोर्ट ऑफ डायरक्टर्सच्या म्हणण्याप्रमाणे कलकत्ता कौन्सिलने मुंबईकर इंग्रजांस जेणेकरून फ्रेंचांचे प्रस्थ मराठी राज्यातून नाहीसे होईल अशा गोष्टी करण्यास मान्यता दिली[५] आणि मराठे जर पुरंदरचा तह मानीत नसतील तर राघोबादादांशी नवीन तह करण्यासही संमती दिली.[६]

**मोरोबादादांचे बंड :**

मागील प्रकरणी मोरोबादादा रुसून पुरंदरास गेले असता त्यांचा रुसवा काढून नाना फडणीस यांनी स्वतः जाऊन त्यांना बोलावून आणिले. पुण्यास कारभारी म्हणून नाना फडणीस व सखाराम बापू हे दोघे कागदपत्रांवर सह्या करीत असत. त्यांनी मोरोबांनाही सामील करून घेतले आणि अशा प्रकारे तिघे कारभारी पेशवाई चालवू लागले. दिवसेंदिवस नाना फडणिसांचे पारडे कारभारात जड होऊ लागले. हे सखाराम बापू व मोरोबा

१. खरे, भाग ६, ले. १८८९.

२. Sec. & Pol. Deptt. Diary No. 18 of 1777, p. 200.

३. Gleig II, p. 222, Hastings to Sulivan, 29 Nov. 1778.

४. Sixth Report from the committee of Secretary, App. No. 39.

५. Sailendra Nath Sen—Anglo-Maratha relations, p. 94.

६. Ibid.

दादांस खपले नाही. मोरोबा दादांनी सखारामबापूंच्या सल्ल्याने नाना फडणिसांना कैद करून कारभाराची सूत्रे आपल्या हातात घेण्याचे कारस्थान उभारले. मोरोबांचा कल राघोबादादांकडे पहिल्यापासून होता आणि राघोबांना पेशवाईवर इंग्रजांच्या सहाय्याने आणावयाचे असे मोरोबानी ठरविल. इंग्रज वकिलातीतील मॉस्टिनचा हस्तक लेविस याची फूस होती. त्यावेळी महादजी शिंदे कोल्हापूरला वेढा घालून बसले होते. हरिपंत फडके व परशुरामभाऊ पटवर्धन हे कर्नाटकात हैदराशी सामना देण्यात गुंतले होते. एकटे तुकोजी होळकर पुणे प्रांती फौजेसह होते. होळकरांचे सूत मोरोबा-दादाशी जमवून देण्याचे काम सखाराम बापूनी केले. तुकोजी होळकर मोरोबांस सामील झाले. अशा रीतीने सखारामबापू, बजाबा पुरंदरे व तुकोजी होळकर आणि इंग्रज यांच्या सहाय्याने दादांस पुण्यास आणण्याचे मोरोबांनी ठरविले व कटाची उभारणी केली.[१] त्यावेळी असेही ठरले की सवाई माधवरावास पेशवे म्हणून मान्यता देऊन राघोबांनी पेशवे अल्पवयीन असेतो कारभार पहावे.[२]

इंग्रजांनी ह्या योजनचे स्वागत केले. कारण त्यांना आपल्या संमतीचे सरकार पुण्यास आल्यावर पुण्यातील फ्रेंच वकिलास हाकलून देण्यास ही संधी नामी आहे असे त्यांना वाटले. आपल्या ह्या कार्यात आपणास मदत करतील तर ते इंग्रज अशी मोरोबांनी आपली खात्री करून घेऊन पुण्याचा कारभार हाकण्याच्या कामी इंग्रजांचे अभय आपणास हवे असे त्यांस वाटू लागले.[२] मोरोबांचे सर्व व्यवहार मोठ्या दक्षतेने आणि काळजीपूर्वक पण हेकेखोरपणे करण्याचे गुण इंग्रज वकील फार्मर यास आवडले. तो ह्या मोरोबांच्या गुणांवर एवढा खूष झाला की, पुण्याचा कारभार हाकावा तर तो मोरोबांनीच अस तो म्हणू लागला. सखारामबापू यावेळी म्हातारे झाले होते. त्यांना कारभाराची दगदग पेलणार नाहीं. त्यांनी बाल पेशव्यांबरोबर पुरंदरास इंग्रजांच्या संरक्षण छत्राखाली रहावे अशी इंग्रज इच्छा. बाल पेशव्यांचे पालकत्त्व बापूनीं स्विकारावे. नाना फडणीस आपल्या कोणत्याही विचारास भीक घालणार नाही तेव्हा त्याना अकस्मात पदच्युत करून खरा धक्का देणेच योग्य असा इंग्रजांचा विचार झाला.[३]

सन १७७७ मध्ये कोल्हापूर महाराजांनी हैदरास मिलाफ होऊन पुणे दरबारविरुद्ध उचल केली व हैदरानेही कर्नाटकातील मराठ्यांची ठाणी घेऊन त्याजविरुद्ध बंड पुकारले. हेतू हा की, पुणे दरबारचा नक्षा उतरवून दादांस पुण्यास आणून गादीवर स्थापावे. कोल्हापूरकर व हैदर यांशी लढण्यात मराठी फौज महादजी शिंदे, पटवर्धन याजसारख्या कुशल सेनापतींच्या अधिपत्या-खाली गुंतली असता मोरोबादादांनी सन १७७८ च्या मार्च महिन्यात आपले

१. Sen, Anglo-Maratha Relations, p. 95.

२. Ibid, पृ. ९४.

३. Ibid.

कारस्थान तडीस नेण्यासाठी उचल खाल्ली. नाना फडणिसास आपल्या कारस्थानाचा सुगावा लागू दिला नाही. नाना मेणवलीहून मार्च महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात परत पुण्यास आले असता पंढरपुरास जाण्याचे निमित्त करून नानांचा निरोप घेऊन मोरोबा आपल्या बायकामुलांसकट पुण्याहून सटकले. ते बारामतीस आले. मुले माणसे बारामतीकरांकडे ठेवून वाफेगावी येऊन होळकरास सामील झाले. यावेळी दादांचे अनुयायी चिंतो विठ्ठल, बजाबा पुरंदरे होळकराजवळ होतेच. ही प्रमुख मंडळी व आपली १६-१७ हजार फौज बरोबर घेऊन होळकर व मोरोबा यानी पुण्यावर चाल केली. नानास मोरोबा आपल्या रोखे होळकरांच्या सहाय्याने येत आहे ही बातमी समजताच ते पुरंदरास गेले. होळकरास फोडण्याचे काम त्यांनी विसाजीपंत विनिवालेकडे सोपविले. पण होळकरांनी विनीवाल्यांची भेट घेण्याचे नाकारिले.[१] मोरोबांनी पुण्यास येताच शहर व सरकारी वाडा ताब्यात घेतला आणि पार्वतीबाईकडून मुतालिकीची वस्त्रे, शिक्के कट्यार ही मुख्य कारभाऱ्याची व जरीपटका व नौबत हा मुख्य सरदाराचा मरातब मिळविला.[२]

या सर्व भानगडीपासून सखारामबापूने आपणास कटाक्षाने दूर ठेविले. पण नानांचे वाढत चाललेले प्रस्थ त्यास आवडत नव्हते. नाना फडणिसांनी ह्या प्रकरणी सखारामबापूंचा सल्ला घेतला. बापूनी यात मध्यस्थी करून नाना व मोरोबा यात करार ठरविला की, वडीलकीचा मान व मुख्य कारभाऱ्याचा अधिकार मोरोबांकडे आहे तो तसाच पुढेही रहावा. अखत्यारीचा कारभार आजपर्यंत नाना करीत होते तो यापुढे मोरोबांनी करावा. पण नानांच्या संमतीशिवाय त्यांनी वागू नये. दादासाहेबास तूर्त आणू नये. याप्रमाणे करार होऊन समेट झाला.[३] पण तो तात्पुरता. मोरोबांनी कारभार हाती घेतल्यावर ब्रिटिश वकील मॉस्टिन यांनी कारभाऱ्यांशी अनेकदा बोलणी करून फ्रेंच वकील ल्युबीन यास पुण्यातून लवकरच घालवून देऊ असे आश्वासन मिळविले.[४] तसेच रघुनाथराव व मुंबईकर इंग्रजांशी बोलणी करण्यास गोपाळ नाईक तांबवेकर यांस पाठविण्याचेही ठरले. कंपनीबरोबर झालेले सर्व करारमदार आम्ही रघुनाथदादा पुण्यास आल्यावर लागलीच पुरे करू असेही आश्वासन मोरोबांनी मॉस्टिन यास दिले.[५]

रघुनाथदादास मोरोबांनी कारभार हाती घेतल्याची वार्ता कळताच त्यास आनंदाच्या उकळ्या फुटू लागल्या. इंग्रजांशी सहर्ष बोलून दादांनी त्यास सुरतच्या तहात कबूल केलेली स्थळे देण्याचे कबूल केले. आपणास पुण्यास तावडतोब घेऊन चला म्हणून ते इंग्रजास निकड लावू लागले. इंग्रजांनी

१. Sec. Dep. Consultation, 6 Feb. 1778, No. 4.

२. Sec. & pol. Deptt. Diary No. 19 of 1778, Mostyn to Rumbold, 27 March 1778.

३. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. २२९२.

४. Sen—Anglo-Maratha relations, p. 97.

५. Sec. & pol. Deptt. Diary No. of 1778, Foreign Dept. Secet Consultations, 2 May 1778, No. 1.

त्यास थोडा धीर धरण्यास सांगितले.[१] कारण पुण्यास जी रक्तहीन क्रांती घडून आली होती ती इंग्रजांच्या सहाय्याशिवाय हे इंग्रजाना ठावूक होते. तसेच राघोबास पुण्यास आणण्याचा विचार कारभाऱ्यांनी सोडून दिला होता. दोन्ही पक्षांना चिमुकला पेशवा आपल्या हातातील बाहुले राहून आपणास निर्वेध कारभार करण्यास मिळावा ही इच्छा. असे असता आपण पुरंदर तहाच्या अटीसच चिकटून रहावे व त्या अटी पुऱ्या करून घ्याव्या असे इंग्रजांनी ठरविले.[२] आणि जून १७७८ मध्ये मॉस्टिनने मुंबईकर इंग्रजांच्या मार्गदर्शनानुसार दरबारला पत्र देऊन कळविले की, १४ दिवसांच्या आत तुम्ही पुरंदर तहाच्या अटी पुऱ्या करणार की नाही ते कळवावे[३] आणि लगेच वकिलास घालवून द्यावे.

इंग्रजांची आपले प्रस्थान बसविण्याची धडपड चालू असता नाना फडणिसांनी अंतस्थपणे गेलेली सत्ता पुन्हा मिळविण्याची योजना आखली. दक्षिणेकडून हरिपंत फडके, परशुराम भाऊ व शिंदे यांची फौज पुण्यास बोलाविली. ती फौज शंभु महादेवाच्या सुमारे येताच तीस मोरोबाच्या पक्षातील नरसिंगराव धायगुडे व दुसरी मुत्सद्दी मंडळी लष्करात जाऊन भेटली आणि आपण सैन्यास रोजमुरे वाटण्यास ऐवज आणिला आहे, तो त्रिवर्ग कारभाऱ्यांनी दिला आहे, तो ऐवज आम्ही तुम्हास देतो पण "मोरोबा दादाशी आपण इमानाने वागू" अशा शपथा घ्या असेही मुत्सद्दी मंडळी म्हणू लागली. ते या सेनानींनी नाकारले. लवकरच ह्या फौजेने शिंद्यांसह साळप्याच्या घाटाच्या तोंडी तळ दिला. तिथे सखारामबापू शिंद्यास येऊन मिळाले व म्हणाले "नानास सोडून आपण मोरोबास मिळालो ही चूक झाली याबद्दल तुम्ही आम्हास माफी करावी व हे खूळ लढाईशिवाय मोडावे." शिंद्यांनी ८ जून रोजी फडके व पटवर्धन यांजबरोबर फौजेसह पुरंदरास येऊन श्रीमंतांची भेट घेतली. नाना व बापू यांमध्ये समझोता घडवून आणून या दोघांनी परस्परांशी इमाने इतबारे वागावे. याबद्दल शिंद्यांच्या विद्यमाने उभयतात आणाशपथा व बेलभंडार झाला.[४] शिंद्यांनी होळकरास नऊ लाख रुपये त्यांच्या फौजेच्या खर्चास देऊन आपल्या पक्षास वळवून घेतले. तेव्हा मोरोबा एकटे पडले. त्यांनी इंग्रजांची मदत मागितली. राघोबांना आपल्या फौजेनिशी पुण्यास आणा अशी मागणी मॉस्टिनकडे केली. मॉस्टिननेही मुंबई इंग्रजास आपले व मोरोबांचे मत कळविले. पण इंग्रज मोरोबास मदत देण्यास धजले नाहीत.[५] मोरोबाच्या फौजेवर शिंदे-होळकरांची फौज चालून जाताच घाबरून कारभार सोडून त्यांनी बहुलास जाण्याचे कबूल केले व त्याप्रमाणे २० जून १७७८ त बहुलास निघून गेले. मोरोबा दादांच्या पक्षास मिळालेल्या सर्व सरदारांनी होळकरांचा

---

१. Sec. and Pol. Dept. Dairy No. 19 of 1778, pp. 168—173.

२. *Ibid.* pp. 212-13.

३. Foreign Dept. Sec. Cons, 17 August 1778, No. 10.

४. खरे, ऐ. ले. सं. भाग ७, ले. २३७१.

५. Sen, Anglo Maratha Relations, pp. 99—101.

आश्रय घेतला होता. होळकरानी आपला दिवाण नारो गणेश, गोपाळ नाईक तांबवेकर इत्यादी असामीना सरकारच्या स्वाधीन केले. त्यास शिक्षा झाल्या. मोरोबादादा बहुलास स्वस्थपणे राहीनात. आणखी मसलती करू लागले. म्हणून शिंद्यांच्या फौजेने त्यास बजाबा पुरंदरे व नारो गणेश यासह ११ जुलै रोजी पकडले.[१] मोरोबास नगरच्या किल्ल्यात रवाना केले. तेथे ते बावीस वर्षे कैदेत होते. होजिवंदन किल्ल्यावर ठेविले. पायगुडे यास आमरण मिरज किल्ल्यात रहावे लागले व बाकीच्यास किरकोळ दंड व कैद होऊन हे प्रकरण मिटले व नाना-बापू कारभार पाहू लागले.[२]

**यावेळचे जागतिक राजकारण व मराठे :**

मराठ्यांचे इंग्रजांशी जे १७७४ ते १७८२ पर्यंत युद्ध चालू राहिले त्यावर जागतिक परिस्थितीची छाया पडली होती. रघुनाथरावदादांना बारभाईनी पदच्युत केल्यावर त्यांनी हिंदुस्थानातील इतर सत्ताधिश निजामअल्ली, हैदर, करवीरकर छत्रपति, प्रतिनिधी, खानदेशचे कोळी, सुरापुर, कित्तूर येथील देसाई आणि कित्येक मराठे सरदार व मुत्सद्दी यास बारभाईविरुद्ध बंड करण्यास विनविले. पोर्तुगिज, फ्रेंच या सत्ताधिशांच्या प्रतिनिधींशी मदतीची बोलणी लाविली. शेवटी इंग्रजांच्या आश्रयास जाऊन आपणास पुण्यास घेऊन चला म्हणून ते विनंती करू लागले. मुंबईत इंग्रजांच्या आश्रयास राहून ते गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्ज, इंग्लंडचा राजा यास मदतीकरिता पत्रे लिहिली. त्यापैकी इंग्रजांनी राघोबादादांची बाजू उचलून धरली. त्यास कारणे दोन होती : (१) फ्रेंचांचे पुणे दरबारी असलेले महत्त्व नाहीसे करणे व त्यांची सत्ता हिंदुस्थानातून निपटून काढणे ; (२) पुणे दरबारची सूत्रे दादांच्या हाती देऊन आपणास मन मानेल तसा तह त्यांजबरोबर करून घेऊन त्याजपासून मुंबईजवळील वसई, साष्टी आदि स्थळे ताब्यात घेणे व व्यापाराच्या सवलती उकळणे.

राघोबादादा सन १७७६ च्या अखेरीस मुंबईकरांच्या आश्रयास आले. त्या अगोदरच सुरतचा तह दादांनी इंग्रजांशी केला होता. त्यास ईस्ट इंडिया कंपनीच्या कलकत्ता कौन्सिलने हरकत घेऊन मराठ्यांशी युद्ध करू नये, मुंबई इग्रजांनी दादांस आश्रय देऊ नये, असे कळविले होते. वॉरन हेस्टिंग्ज गव्हर्नर जनरल म्हणून हिंदुस्थानात आला. त्यावेळी ह्या कौन्सिलशी त्याचे मतभेद सुरू होते. याच सुमारास ४ जुलै १७७६ रोजी अमेरिकेने इंग्लंडशी स्वातंत्र्ययुद्ध जाहीर केले. फ्रान्ससुद्धा अमेरिकेच्या बाजूने लढाईत उतरला. सन १७७७ च्या अखेरीस इंग्लंडचा पराभव होऊन अमेरिकेचा जय झाला व अमेरिका स्वतंत्र झाली. इंग्लंडच्या पराजयाची बातमी सगळीकडे पसरली. एक वसाहत गेल्यावर हिंदुस्थानात दुसरी ब्रिटिश वसाहत स्थापण्याची किमया वॉरन हेस्टिंग्जच्या मनात आली. कलकत्ता कौन्सिलने ठराव करून राघोबास

१. Secret & Pol. Diary No. 19A of 1778 pp. 57, 59.

२. Ibid, खरे, ऐ. ले. सं. भा. ७. ले. २४००. Ibid, 57—62, 85—87.

मदत करू नका व मराठ्यांच्या वाटेस जाऊ नका असे बंधन घातले होते. ते बंधन डायरेक्टरांच्या अनुमतीने मुंबईकर इंग्रजांनी धुडकावून लावले आणि वॉरन हेस्टिंग्जच्या मदतीने व सल्ल्याने वागण्याचे ठरवून राघोबांना पुण्यास नेऊन बसविण्याचे पत्करले. त्यामुळे वर सांगितलेले फायदे त्यांना उपटावयाचे होते. पैकी फ्रेंचांचे प्रस्थ मराठ्यांच्या दरबारी कसे वाढीस लागले व त्याचे भय इंग्रजास कसे वाटू लागले हे सांगितले पाहिजे.

**फ्रेंच वकिलाची पुण्यातील कामगिरी :**

इंग्रज व फ्रेंच यांचे सप्तवार्षिक युद्ध सन १७६३ च्या पॅरीसच्या तहाने संपले. फ्रेंचांना हिंदुस्थानातील वसाहती परत करण्यात आल्या. फ्रेंचांतर्फे लॉरिस्टन ज्यावेळी हिंदुस्थानात आला त्यावेळी पाँडीचरीची अतिशय दयनीय स्थिती पाहून त्यास मोठी चिंता वाटली. महंमद अल्लीच्या लहरी स्वभावावर पाँडीचरीचे जीवन कंठणे प्राप्त झाले. पण पाँडीचरीचे जीवन १७६७ पर्यंत सुधारले. या काळात इंग्रजांनी कर्नाटकात आपला जम बसविला. केप कामोरिनपर्यंत कर्नाटक भूमीचे स्वामी झाले. महमदअल्ली नावाचा धनी राहिला. बंगालमध्ये त्यानी आपली शासनपद्धति सुरू केलीच. पण बक्सारच्या दिनांक २३ ऑक्टोबर १७६४ च्या लढाईने बनारसच्या पूर्वेकडील प्रदेश आपल्या अंकाखाली आणिला आणि स्वतः बादशहाने त्याचे संरक्षण पत्करले. अशा रीतीने इंग्रज ही जबरदस्त सत्ता हिंदुस्थानात सन १७६१ नंतर निर्माण झाली.

माधवराव पेशव्यांनी पानिपत संकटातून मराठी राज्यास चांगले दिवस दाखविण्याची करामत करण्यास सुरुवात केली. निजामास चेपले, घरचे भेदी राघोबादादा याजशी समझोता केला. उत्तरेतील मराठ्यांच्या सत्तेचा जम सरदार पाठवून बसविला. दक्षिणेत हैदरावर सारख्या स्वाऱ्या करून कर्नाटकातील पेशव्यांचा गेलेला मुलूख मिळविला. दादास शनिवारवाड्यात जून १७६८ मध्ये नजरकैदेत ठेविले.

माधवरावांच्या ह्या सर्व हालचालींचे व मराठी सत्ता वर्धमान असल्याचे फ्रेंचांचा चंद्रनगर येथील मुख्य ह्याने पाहून त्याच्या मनात मराठ्यांची मदत घेऊन इंग्रजाची सत्ता हिंदुस्थानातून निपटून टाकावी हे विचार आले. मार्च १७६९ मध्ये त्याने इंग्रज फ्रेंचांचे युद्ध झाल्यास इंग्रजांना बंगालमधून घालवून देण्यासाठी एक योजना आखली. नागपूरकर भोसल्यांच्या अंकित असलेला प्रांत इंग्रजानी बळकावला होता. त्याजवर जानोजी भोसलेने फ्रेंचांच्या मदतीने हल्ला करावा व इंग्रजांचा पाडाव झाल्यास अर्धा बंगाल फ्रेंचाना देण्यास जानोजीने कबूल केले होते. कॅव्हेलिअर सेठ ल्युबानने इंग्रजांवर हल्ला करण्यासाठी कोणकोणते उपाय योजावे हे ठरविण्यासाठी झनुल अबेदीन-खान नावाच्या आपल्या एजंटाला पुण्यास पेशवे दरबारी पाठविले. पण जानोजी पेशव्यांशी फटकून वागू लागले व घरगुती भांडणातच जास्त गुरफटून राहिले. ल्युबिन नंतर फ्रान्समध्ये जाऊन हिंदुस्थानात परत आला.

१० जानेवारी १७७५ रोजी त्याने मराठे व फ्रेंच या उभयतांच्या हिताचा एक करारनामा तयार करून पुणे दरबारला सादर केला. सन १७७६ च्या मार्चमध्ये त्याची फ्रेन्च राष्ट्राचा व्यापारी प्रतिनिधि म्हणून पुण्यास नेमणूक झाली. मराठ्यांशी व्यापारी तह करण्याचे काम त्याजवर सोपविले होते. एप्रिलमध्ये त्या तहासंबंधीच्या कलमवारी सूचना त्यास आपल्या राष्ट्राकडून मिळाल्या :[१] (१) फ्रेंच राष्ट्र मराठ्यांशी कायम मैत्रीचा तह करू इच्छिते ; (२) फ्रेंच राष्ट्र आपल्या दोस्तास त्यांच्या शत्रूविरुद्ध मदत देईल, मराठ्यांनी आपल्याकडून हिंदुस्थानातील फ्रेंच वसाहतीना अभय देऊन त्यांचे संरक्षण शत्रूपासून करण्यास मदत करावी. तसेच एकमेकांच्या राज्यात एकमेकाना मुक्त व्यापार सवलत व एकमेकांच्या बंदराना एकमेकांच्या जहाजानी भेटी देण्यास परवाने आदि कलमे ह्या तहात होती. तसेच ल्युबीनला मराठी राष्ट्राशी संरक्षणाचा तह करण्यासही फ्रेंच राष्ट्राकडून सूचना आल्या होत्या.

वरील सूचना घेऊन ल्युबीन सप्टेंबर १७७६ त फ्रान्समधून निघाला तो माहे येथे १२ फेब्रुवारी १७७७ रोजी आला.[२] तिथून तो १६ मार्चला चौल येथे आला.[३] ल्युबीन २६ एप्रिलला पुण्यास फ्रेंच राष्ट्राचा प्रतिनिधी म्हणून आला. नाना फडणिसानी त्याचा मित्र राष्ट्राचा वकील म्हणून यथोचित सन्मान केला. पुरंदरास जात असता तोफखान्याचे मुख्य भिवराव पानसे यांनी ल्युबीनची भेट घेतली.[४] ल्युबिनला पेशवे दरबाराने जी सलगीची वागणूक दिली त्यामुळे पुणे दरबारचा इंग्रज वकील मॉस्टिन याचे पित्त खवळले. त्याला शांत होण्यासाठी असे सांगण्यात आले की, ल्युबिनच्या आदरातिथ्यास राजकीय महत्व देऊ नये. त्याचे दरबारी असण्याने इंग्रज मराठे हितसंबंधात काही बाध येणार नाही.[५]

नाना फडणिसांनी यावेळी चतुराई करून इंग्रजास शह देण्यासाठी मराठे व फ्रेंच यांचा तह घडवून आणिला. वरील तहातील सर्व अटी मराठ्यांनी मान्य केल्या. पेशव्याच्या नावे पत्रक काढून फ्रेंचांशी मराठ्यांची मैत्री दृढ करण्याचे त्यात आश्वासन देऊन शिवाय फ्रेंच वसाहतीस मराठ्यांकडून सर्व तऱ्हेचे संरक्षण देण्यास मराठे बद्धपरिकर आहेत, असे त्या पत्रकात ठासून सांगितले. फ्रेंच वसाहतीवर हल्ला झाल्यास मराठ्यांचे २५ हजार घोडदळ फ्रेंचांच्या मदतीस देण्याचे आश्वासन दिले.[६] ह्या तहाने ल्युबीनचा गौरव त्याच्या वरिष्ठांनी केला. इंग्रजास मात्र विंचा झोंबल्यासारखे झाले. मॉस्टिनने हेस्टिंग्जला लिहिले की, ह्या तहात इंग्रजांच्या सत्तेस हिंदुस्थानातून

१. Proceedings of the Indian Historical Records Commission, Vol. XXXI : Artical by V.G.Hatalkar, Embassy of M.De.St. Lubin to the Maratha Court, 1777-78.
२. Mackintosh, Travels in Europe, Asia and Africa, Vol. I, Letter VII, 17 May 1778, pp. 74-75.
३. Forrest, Selections, Maratha Series, pp. 291-296.
४. *Ibid.*
५. Seu, Anglo Maratha Relations, p. 87
६. Indian Historical Records Commission, Vol. XXXI Article by V. G. Hatalkar.

उपटून टाकण्याची बिजे दिसत आहेत.[१] मुंबई कौन्सिलने तर ह्या तहामुळे कधी न संपणारा कलह आणि धोका निर्माण झाल्याचे जाहीर केले. अशा स्थितीत इंग्रजाना पुण्यास कारभारी मंडळीत फूट पाडून आपले हित संरक्षित करणारे मोरोबादादासारखे कारभारी हवे होते. दादासाहेबांसारखे पेशवे हवे होते. त्याकरिता मॉस्टिनची धडपड होती. पण मोरोबादादांची उचलबांगडी होऊन नानांच्या हातात कारभार आला. त्यामुळे इंग्रजांची निराशा झाली.

## इंग्रजांची पुण्यावर मोहीम, वडगांवचा पराजय व तह :

मोरोबांचे प्रकरण मिटून पुणे दरबारने फ्रेंचांशी संगनमत केलेले इंग्रजास आवडले नाही.[२] इंग्रजास असे वाटू लागले की, फ्रेंचांच्या मदतीने पुणे दरबारने आपणास हुसकून लावण्याचा प्रयत्न चालविला आहे. तेव्हा राजकारण सिद्धीस जाण्यापूर्वीच श्रीमंत दादासाहेबास पुण्याच्या गादीवर आणून स्थापावे. आपल्या पसंतीचे कारभारी मंडळ आणवावे व फ्रेंचांचे पाऊल मराठी दौलतीत कधीही न शिरकेल असा पक्का बंदोबस्त करावा असा मुंबई कौन्सिलने विचार केला व तो हेस्टींग्ज यास कळविला. गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जला हा बेत पसंत पडून त्याने मुंबईकरांच्या कुमकेस बुंदेलखंड, माळवा व नेमाड मार्गाने ६ पलटणे रवाना केली. फ्रेंचांचे पाय मलबार किनाऱ्यावरून ओढावे व त्यांचे मराठे दरबारी असलेले महत्त्व पार नाहीसे करावे हा हेतू मनात धरून त्याने फ्रेंच वसाहती व मराठे याजविरुद्ध युद्ध पुकारले. फ्रेंचांचे चंद्रनगर १० जुलै १७७८ ला काबीज केले.[३] पाँडेचरी १६ ऑक्टोबरला सर केली आणि पुण्यावर चढाई करण्यास मुंबई कौन्सिलला सांगितले. अशा रीतीने वॉरन हेस्टिंग्जने मराठ्यांशी युद्ध आरंभिले. स्वतः बंगालकडून ६ पलटणे पाठविली. तसेच मद्रासकर इंग्रजास मदतीकरिता सूचना पाठविल्या. मुंबईचे गव्हर्नर हॉर्नबी यांना युद्धकार्यास लागेल ती मदत घेण्याचे अधिकार दिले. फक्त महादजी शिंद्यानी हेस्टिंग्जने टाकलेला डाव ओळखून इंग्लंड व फ्रान्समधील लढ्याच्या गुंतागुंती जाणल्या. वॉरन हेस्टिंग्ज मुत्सद्दी होता. लढाईची सैनिकी तयारी करून तो थांबला नाही. मराठी राज्याची सूत्रे आपल्या पसंतीच्या व्यक्तिच्या हातात कशी येतील याचीही धूर्ततेने छाननी करून तो डाव हाकू लागला. मराठ्यांचा छत्रपति रामराजा एव्हाना म्हातारा होऊन मृत्यू शय्येवर साताऱ्यास होता. त्यास मूलबाळ नव्हते. छत्रपतीची गादी त्यामागून नागपूरकर भोसले घराण्याकडे जावी म्हणून हेस्टिंग्ज मुधोजी भोसल्यास फितवीत होता. बापू, नानांना जेव्हा हा हेस्टिंग्जचा डाव समजला तेव्हा त्यानी मुधोजीबाबांचे चिरंजीव व भोसले गादीचे वारस रघोजी यास पुण्यास आणून त्यांची मदत ब्रिटिशांविरुद्ध

१. S. P. P. D. No. 18 of 1777, p. 200.

२. *Ibid*, No. 19 A of 1778, pp. 64—69.

३. Forrest, Selections, Foreign Deptt. II, pp. 639-640.

लढण्याकरिता मिळविली. वास्तविक नागपूरकर भोसले यांना मराठी संघराज्यातून फोडण्याचे काम इंग्रज लोक लॉर्ड क्लाईव्ह पासून १७६६ पर्यंत करीत होते. ह्याच वेळी वाईकर भोसल्यांचा मुलगा विठोजी भोसले यास रामराजांच्या मांडीवर दिनांक १३ सप्टेंबर १७७७ रोजी दत्तक देऊन त्याचे नाव दुसरे शाहू असे ठेविले. रामराजा ९ डिसेंबर १७७७ रोजी कालवश झाले. त्या अगोदर दत्तक विधी झालेला होता. तरी पण हेस्टिंग्जने आपले खटयाळपणाचे उद्योग चालूच ठेविले होते. मुधोजी भोसले यांनी इंग्रजी फौजेच्या मदतीने सातान्यावर चालून जावे म्हणून त्यांचे मन हेस्टिंग्ज वळवीत होता. मुधोजीनी त्याचे म्हणणे ऐकले नाही.

वॉरन हेस्टिंग्जने महादजी शिंदेना मराठा मंडळातून फोडण्याचे शिकस्तीचे प्रयत्न केले. वॉरन हेस्टिंग्जने मराठ्यांबरोबरच्या युद्धात त्यांचा पराभव होण्यासाठी ज्या अनेक योजना आणि उपाय योजिले त्याचे प्रतिबिंब त्याने जो पत्रव्यवहार इंग्लंड, मुंबई, मद्रास, पुणे, राघोबादादा, निजामअल्ली आदिंशी केला त्यात दिसते. हे कागदपत्र जुळवून वाचले तर त्यातून त्यावेळच्या परिस्थितीचे सत्य, अर्ध-सत्य व खोटेपणा नजरेस येतो. रघुनाथरावदादांस पुण्यात नेऊन गादीवर बसविण्यात तर मुंबईस अपयश आले तर आपला बेत फसू नये म्हणून त्याने नर्मदाकाठी असलेल्या आपल्या गोडार्ड या सेनापतीस काही अधिकार देऊन पुण्याच्या कारभारी मंडळाशी तह घडवून आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे गोडार्डने आपला हस्तक ले. वेदरस्टोन यास नागपुरास मुधोजी भोसले याजकडे पाठवून इंग्रजांतर्फे पुणे दरबारशी मध्यस्ती करण्यास सांगितले. पण याचा काही उपयोग होण्याच्या अगोदर तळेगावला मराठ्यांनी इंग्रजांना मार दिला. यामुळे इंग्रजांना शेवटी कळून चुकले की, आपण मात्र राघोबादादासारख्या चुकीच्या माणसास हाताशी धरले. हेस्टिंग्जने या सर्व गोंधळाचे खापर डायरेक्टरांच्या धरसोड धोरणावर फोडले.

आनंदीबाईने एक पत्र नाना व बापूस लिहून आपल्या नवऱ्याचा स्वभाव कसा आहे याचे दिग्दर्शन केले. दादासाहेबांनी रानोमाळ भटकण्यापेक्षा इंग्रजांची मदत दौलतीत हिस्सा मिळण्यासाठी नाईलाजाने घेतली. त्यामुळे बुंदेलखंडात दोन कंपू झाले. हल्ली इंग्रज घरात येऊ पहातात. तमाम अंमल उठवून आपले अंमल बसवितात. आमचे निमित्त करून सर्व दौलतीस गिऱ्हाईक होतील तरी इंग्रजांच्या घरात ब्राम्हणी दौलत घालू नका असा इशारा आनंदीबाईंनी मोरोबांना दिला.[1] पदच्युतीनंतरसुद्धा मॉस्टिन मुंबई कौन्सिलला आर्जवून सांगत होता की, राघोबादादांस जर चटदिशी पुण्यास आणले आणि त्याची स्थापना केली तर इंग्रजांचे वर्चस्व पुणे दरबारात प्रस्थापित करता येईल. बापू आणि नाना यांनी इंग्रजांना तोंड देण्याची योग्य ती तयारी केली. बंगालच्या फौजा समुद्रमार्गे मुंबईस उतरत असत हा नेहमीचा शिरस्ता सोडून हेस्टिंग्जने मुंबई कौन्सिलच्या मदतीस ज्यावेळी

१. इतिहास संग्रह, पुस्तक १ ले, ऐतिहासिक टिपणे, पृ. २९-३०.

बंगालमधील ६ पलटणे मराठी मुलुखातून प्रवास करण्यास रवाना केली त्यावेळीं नाना-बापूनी ह्या कृत्याची नापसंती व्यक्त करून हेस्टिंग्जकडे तक्रार नोंदविली. बापूनी ज्यावेळी इंग्रजास दस्तके दिली होती त्यावेळी इंग्रजांशी मराठ्यांचें संबंध सलोख्याचे होते.

कर्नल वेलस्लीच्या नेतृत्वाखालील बंगालच्या पलटणीस काल्पी येथे मराठ्यांनी विरोध केला तेव्हा ती जागा मे १७०८ मध्ये क. लेस्लीनें हल्ला करून काबीज केली. दक्षिणेकडे जसा तो घसरू लागला तसतसे त्यास पाणी आणि अन्नाच्या दुर्भिक्षास तोंड द्यावे लागले. भूकेमुळे त्याचे अनेक सैनिक प्राणास मुकले. लेस्ली स्वत: ऑक्टोबर १७७८ ला निधन पावला. त्याचा नायब कर्नल गोडार्ड याने मोठ्या हिमतीने सर्व संकटाना तोंड देऊन आपले सैन्य हुशंगाबादला आणिले तिथे नागपूरकर भोसले याजकडून त्यास विरोध झाला. तिथून नदी पार करण्याकरिता दस्तके मिळविण्यात त्याचे दोन महिने गेले. ह्यावेळी त्यास मुंबई इंग्रजांची जी पलटणे राघोबादादास पुण्यास घेऊन जात होती, त्याजकडून लवकर येऊन आपणास मिळण्यासाठी तातडीची सारखी निमंत्रणे येत होती. पण गोडार्ड बऱ्हाणपुरला पोचण्याआधीच तळेगावच्या रणभूमीवर इंग्रजांचा फज्जा उडाला. ती हकिगत अशी–इंग्रजांनी १७७८ चा पावसाळा मोहिमेची तयारी करण्यांत घालविला. इंग्रजांच्या संकल्पित मोहिमेची बातमी पुणे दरबारास समजताच कारभारीही ह्या अरिष्टास तोंड देण्याच्या उद्योगास लागले. नोव्हेंबरच्या अखेरीस इंग्रजांची चार हजार फौज स्वारीस निघाली. तेव्हा तीबरोबर श्रीमंत दादासाहेब, त्यांचे दत्तक पुत्र अमृतराव व दिवाण चिंतो विठ्ठल हेही निघाले. बरोबर बुणगेही अपार होते. आणि दादासाहेबांची सात हजार फौजही बरोबर होती. २४ नोव्हेंबर १७७८ रोजी दादासाहेबांशी इंग्रजांनीं नवीन करार केला. त्यात माधवराव नारायण यास त्यांनी पेशवा म्हणून मान्यता देऊन त्याच्या अज्ञानावस्थेत दादांनी कारभार पहावयाचा. पेशवा सज्ञान होईपर्यंत पुरंदरास इंग्रजांच्या कडेकोट पहाऱ्यात रहावयाचा अशा अटी नमुद केल्या. इंग्रजी फौजेचे पुढारीपण कर्नल इगरटोनला दिले. त्यास राजकीय बाबतीत सल्लामसलत देण्यासाठीं सल्लागार म्हणून जॉन कर्नाक व थॉमस मॉस्टिन यांची नेमणूक केली.

ह्या सर्व फौजेने २४ नोव्हेंबरला मुंबई बंदर सोडले. पनवेल मार्गे खंडाळ्याच्या माथ्यावर पोचण्यास त्यास एक महिना लागला. पुण्याच्या कारभारी मंडळानेही ब्रिटिशांचा हा हल्ला मारून काढण्याची जय्यत तयारी केली. त्यांनी ह्या कवाईती फौजेशी मैदानात समोरासमोर येऊन सामना न देता गनिमी काव्याने त्याशी लढण्याचे व त्यांची लांडगेतोड करूनै त्यांना मिळणारी दाणावैरण व रसद बंद करून त्यांची कोंडी करावयाची पण त्याच वेळी त्यांच्या बंदुकांच्या माऱ्यापासून दूर रहावयाचे असे त्यांनी ठरविले. ब्रिटिश सैन्य घाट चढायला लागल्यावर त्यावर मराठी सैनिकांची टोळकी हल्ले चढवू लागली आणि स्वत: सर्वांच्या मागे रहाणाऱ्या रघोबादादांस

पकडण्याचा प्रयत्न करू लागली. यावेळी मॉस्टिनचा हस्तक लेव्हीस पुण्यात राहून पुण्याच्या हालचालींची माहिती ब्रिटिश सेनानीस कळवीत होता. मॉस्टिन स्वत: स्वारीत होता. पण खंडाळ्याला तो आजारी पडला आणि उपचारासाठी मुंबईस परतला. पण बरा न होता त्याच दुखण्यात त्याचा अंत १ जानेवारी १७७९ रोजी वयाच्या ४८ व्या वर्षी झाला. मॉस्टिनच्या निधनामुळे ब्रिटिशांच्या पुण्यासंबंधीच्या योजनेस जबरदस्त धक्का बसला. इंग्रज सैन्य खंडाळ्याहून पुण्याकडे सध्याचा जो पूर्व रेल्वेचा मार्ग आहे त्या रस्त्याने दौडत येऊ लागले. कार्ला-तळेगांवच्या मार्गावरही इंग्रज सैनिकांवर मराठ्यांच्या तुकड्यानी सर्व बाजूनी हल्ले चढविण्यास सुरवात केली. इंग्रजांच्या हाती दाणा वैरण मिळू नये म्हणून त्यांनी धान्याची कोठारे व वैरणीचे माच जाळले. त्यात तळेगांवचे धान्य कोठारही अग्नीच्या भक्षस्थानी पडले. नाना फडणिसांनी पुण्यांतील नागरिकास बाहेर घालवून ठिकठिकाणी गवताच्या गंज्या उभ्या करून ठेवण्याची व्यवस्था केली. हेतू हा की, संपन्न पुणे शहर शत्रूच्या हातात न पडता जळून खाक झालेले पुणे विजयी शत्रूस लाभावे.

४ जानेवारी १७७९ रोजी कॅप्टन स्टुअर्ट (यास मराठे इष्टुर फाकडा म्हणत), तो कार्ल्यास झाडावर चढून नेमबाजी करीत होता,त्यास भिवराव पानश्याकडील तोफेच्या गोळ्याने ठार केले. कर्नल खंडाळ्यास बाण लागून जाया झाला आणि उपचारार्थ तो मुंबईस गेला. सैन्याचा मुख्य कर्नल ईगरटोन आजाराने चांगलाच झपाटल्यामुळे त्यास आपला नायब कॉककर्न याजकडे सैन्याचे अधिपत्य व सोपवून मुंबईस जावे लागले. वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या अनुपस्थितीमुळे इंग्रजी सैन्याचा धीर खचू लागला. कार्ला सोडल्यावर त्यांना भिवराव पानसे पोर्तुगिज हस्तक नऱ्होना यांच्या तोफखान्यास तोंड देता देता पुरेवाट झाली. ब्रिटिश सैन्य मराठ्यांच्या तोफखान्यास तोंड देत कामशेतला (खडकला) ७ जानेवारीस आले. दुसऱ्या दिवशी वडगांवावरून दिनांक ८ ला तळेगावास मुक्काम केला. हा प्रवास इंग्रजी सैन्यास फारच महागात पडला. कारण ते ज्या मार्गाने आले त्या मार्गावर गवताची पातीसुद्धा त्यांच्या दृष्टोत्पत्तीस पडली नाही. यामुळे त्यांचा हिरमोड झाला. त्यात आणखीही निराशेची भर पडण्याची कारणे झाली. पूर्वी कबूल केल्याप्रमाणे दादासाहेबास येऊन मिळण्याचे तुकोजी होळकरांनी साफ नाकारले. चिंतो विठ्ठल मुंबईस म्हणत होता त्याप्रमाणे दुसरी काही मराठी फौज इंग्रजास येऊन मिळणार होती तीही मिळाली नाही. आपल्याशी लढण्यास नाना फडणीस फौज जमा करू शकणार नाहीत असा इंग्रजांचा कयास होता तो साफ चुकला. कारण नानांनी या मोहिमेवर चाळीस हजार फौज गोळा करून आणिली होती. इतक्या सेनासमुदायापुढे या चार हजार इंग्रजी फौजेचा निभाव कसा लागावा? तथापि, इतक्याही गोष्टीस न जुमानता मर्दुमकीने झुंजत झुंजत ती फौज तळेगावापर्यंत आली. तेथे महादजी शिंद्यांशी तिची गांठ पडून लढाई झाली. तळेगावापासून पुण्याच्या वाटेवरील सर्व गावे व भोवतालचा प्रदेश मराठ्यांनी जाळून ओस केला आहे. इतकेच नव्हे तर पुण्यासही आग लावून जाळून भस्म करण्याचे नाना फडणिसांनी

योजिल्याचे इंग्रजास समजले. तेव्हा पुढे चाल करणे आपल्याला झेपणार नाही असे समजून त्यांच्या वॉर कौन्सिलने १० व ११ तारखेस सभा भरवून मागे जावयाचे ठरविले व रात्री परत जाण्यास सुरवात केली, तो मराठी फौजा चोहोकडून धावून येऊन त्यास बिलगल्या. त्या गर्दीत इंग्रजाचे पुष्कळ सामन लुटले गेले. तो ते लढत लढत वडगावात शिरले तेथे बरीच लढाई झाली. शेवटी मराठे म्हणतील त्या अटीवर तह करून सुटका करून घेण्याखेरीज गत्यंतर नाही असे इंग्रज सेनानींना दिसून आले. त्यांनी सखाराम बापूतर्फे मुंबईस जाण्यासाठी कारभारी व महादजी शिंदे यांशी बोलणी सुरू केली.

या वेळी महादजी शिंदे यांजकडे मराठ मंडळाचे अधिपत्य होते. त्यांचा विश्वास सखाराम बापूवर नव्हता. हे जाणून रघुनाथराव दादांनी तुकोजी होळकरास विनंती करून सांगितले की, आम्हास वाचविण्याचा व ब्रिटिश सैन्यास सुखरूपपणे परत जाण्याचा आपणच काही तरी मार्ग काढावा. महादजीनी तुकोजी बावांची रदबदली करीत असता निक्षून सांगितले की, राघोबादादा विनशर्त आमचे स्वाधीन झाल्याशिवाय पुढील बोलणी होणे नाही. राघोबास हे समजले तेव्हा यांनी प्राप्त परिस्थितीत आपण शिंद्यांचे स्वाधीन होण्याशिवाय गत्यंतर नाही हे जाणून स्वाधीन होण्याचे कबूल केले. त्याप्रमाणे कराराच्या अटीबद्दल महादजीशी वाटाघाटी करण्यासाठी इंग्रजांकडील फार्मर यास मुक्रर केले. दोन्ही हात जोडून नमस्कार करण्याच्या पवित्र्यात हात व डोळे बांधलेल्या फार्मरला पालखीत बसवून नाना-महादजीसमोर १४ जानेवारी १७७९ रोजी उभे करण्यात आले. दोन्ही नेत्यांनी त्यास असे सांगितले की, दादासाहेबांनी विनशर्त मराठ्यांच्या स्वाधीन व्हावे म्हणजे इंग्रज फौजेस रसद देऊन मुंबईस परत पाठवू. दादासाहेबास हवाली करण्याची अट घातली ती कबूल करणे इंग्रज अंमलदारांच्या जिवावर आले म्हणून फार्मरने शिंद्यांची अनेकदा गाठ घेतली. पण दादासाहेब आपण होऊन शिंद्यांच्या स्वाधीन होण्यास कबूल झाले. त्यामुळे ही अडचण दूर होऊन खालीलप्रमाणे तहाची कलमे ठरली— (१) राघोबादादांनी विनशर्त मराठ्यांच्या स्वाधीन होणे; (२) साष्टी, ठाणे व जंबुसर ही ठाणी इंग्रजांनी घेतली होती ती सोडून देऊन माधवराव पेशव्यांचे कारकीर्दीत तह झाला होता त्याप्रमाणे चालावें; (३) बंगालमधून पलटणे येत होती त्यास मागे जाण्याची आज्ञा करावी; (४) इंग्रजांकडून वरील अटींची अंमलबजावणी होईपर्यंत दोन इंग्रज अंमलदार ओलीस ठेवावे. इंग्रज मराठ्यांच्या वाटाघाटी चालू असता इंग्रजांनी पहाटेस गुपचूपपणे पळून जाण्याचा प्रयत्न केला. तेव्हा मराठी सैन्याशी त्यांची गाठ पडून लढाईस तोंड लागले. त्यात पन्नास युरोपियन व ४०० शे एतद्देशीय अशी इंग्रजांकडील फौजेतील माणसे पडली. फार्मरने दिनांक १६ ला तहाच्या वाटाघाटीकरता महादजींच्यापुढे कोरा कागद ठेविला. दिनांक १७ ला दादासाहेब आणि ओलीस रहाणारे दोन अंमलदार स्टुअर्ट व फार्मर हे शिंद्यांच्या लष्करात येऊन दाखल झाले. लगेच ब्रिटिश फौजेच्या रसदेची व्यवस्था होऊन ती २० हजार मराठी फौजेच्या बंदोबस्तात मुंबईस रवाना करण्यात आली.

वडगांवच्या स्वारीत इंग्रजांची अगदी दुर्दशा झाली होती. शिंद्यांनी मेहरबानी करून इंग्रजी फौजेस जिवानिशी परत जाऊ दिले याबद्दल मुंबईकर इंग्रजांनी शिंद्यांचे अतिशय आभार मानिले. त्यांनी शिंद्यास भडोच महाल बक्षीस दिला आणि दरबार खर्चाबद्दल रोख एकेचाळीस हजार रुपये दिले. पण गंमत अशी की, वडगावचा हा अपमानकारक तह मुंबई व कलकत्ता कौन्सिलने कधीच स्विकारला नाही. हे गव्हर्नर जनरल हेंस्टिग्जनंतर असे जाहीर केले की, ज्यांनी हा तह मराठ्यांशी घडवून आणिला त्यांना तसे अधिकारही नव्हते. मराठ्यांच्या बाजूने नाना आणि इतर मराठे सरदार यांच्या इंग्रजविषयींच्या द्वेषयुक्त भावना उफाळून येत होत्या. त्या शांत होऊ देण्याचे काम महादजींनी केले. इंग्रजांचा आणखी छळ नको. आपण त्यांचा पाडाव करण्यास समर्थ आहोत. इंग्रज ही शक्ति लहान मानण्याचे कारण नाही असे शिंदे बाबा मराठे सरदारास सुनवीत असत. ह्या लढाईत इंग्रजांकडील कवाइती फौजेच्या कर्तृत्वाकडे पाहून महादजीबावांना मोठे आश्चर्य वाटले. वडगांवचा तह झाल्यावर त्यांनी इंग्रज वकिलाजवळ उद्‌गार काढले "या कवाइती पलटणांची करामत आश्चर्यकारक आहे. ही पलटणे म्हणजे आग ओकणारी पोलादी तांबडी भितच. एक शिपाई मेला तर त्याच क्षणी त्याच्या जागी दुसरा येतो, दुसरा गेला तर त्याच्या जागी तिसरा येतो, तिसरा गेला तर त्याच्या जागी चवथा येतो. ही पोलादी भिंत आपोआप सांधली जाते. आमच्या मराठी घोडेस्वारांना या कवाइती पलटणांची जोड मिळेल तर केवढी मोठी गोष्ट होईल. आमचे घोडेस्वार आणि ही पलटणे यांचा मिलाफ आपण केव्हातरी घडवून आणणार".

तहाच्या वाटाघाटी घडवून आणणारा फार्मर याने या लढाईच्या संदर्भात आपले विचार व्यक्त केलेले आढळतात. तो म्हणतो की, इंग्रजांनी गोडार्डच्या मदतीनेच मराठ्यांशी लढाई करावयास हवी होती. पण रघुनाथराव व मॉस्टिन यांच्या नादास लागून त्यांनी मराठी राष्ट्रावर उतावळेपणाने आघात केला, त्यामुळे सर्व मराठे एकत्र होऊन त्यांनी इंग्रजांचा पाडाव केला यात हेस्टिग्जला दोष देण्याचे कारण नाहीं[१]. या विजयाने निजाम, हैदर फिके पडले. नागपूरकर भोसल्यांची इंग्रजांशी स्वतंत्र तह करण्याची आशा मावळली आणि मराठ्यांच्या अंगात उन्नत्तपणाचा नवीन संचार झाला[२]. या संबंध घटनेचा सारांश असा की, मराठी राष्ट्र ह्या वेळी एवढे बलवान होते की, त्यावर केवढेही आघात केले तरी त्याचा पाडाव होणे अशक्य होते, असे त्याली लिहितो ही स्थिती खडर्याची लढाई होऊन जाईपर्यंत राहिली.

वडगावला पराभव पावल्यावर इंग्रजांनी आपल्या शिरस्त्यानुसार या पराभवाची चौकशी करण्यास मंडळ नियुक्त केले. त्यांनी ह्या दुर्घटनचे शिल्पकार कॉकबर्न व इगरटन यांना बडतर्फ केले आणि वॉरन हेस्टिग्जने हा

---

१. Dodwell—Warren Hastings, Vol. II, letter p. 176.

२. *Ibfd.* p. 229.

तह आपणास मान्य नाही असे सांगून अपमान भरून काढण्यासाठी त्याने मराठ्यांशी नवीन झगडा सुरू केला. त्यासही मराठ्यांनी टक्कर दिली. यात नाना फडणिसांचा मुत्सद्दीपणा दिसून आला.

राघोबादादा महादजींच्या लष्करात आल्यावर त्यांच्या इतमामास साजेशी वागणूक महादजींनी त्यास दिली. एक दीड महिना दादास वडगावी लष्करात ठेवून घेतले. तिथे त्यांनी अमृतरावांचे दुसरे लग्न करविले. दादास झाशीस ठेवण्याचे ठरले. त्यापूर्वी दादासाहेब व शिंदे, होळकर यात एक करार जाबता झाला. त्या करारात असे ठरले की, दादास १२ लक्षाची नेमणूक द्यावी. त्यांनी स्नान संध्या करून झाशीस रहावे. राज्यलोभाने दौलतीचा वारसा करू नये. पंतप्रधान सवाई माधवराव राज्याचे धनी, त्यांचे पश्चात चि. बाजीराव धनी. असे उभयता सरदार व चि. बाजीराव यांनी पूर्वील चालीप्रमाणें धनी व कारभारी या अन्वये वर्तावे. दिनांक ३ फेब्रुवारी १७७९ रोजी दादांचे कारभारी चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र व खरकसिंग हे दादांबरोबरच शिंद्यांचे लष्करात आले. त्यापैकी चिंतो विठ्ठल व सदाशिव रामचंद्र यांस दादांबरोबर हिंदुस्तानात जाण्यास परवानगी दिली. खरकसिंग हा नारायणरावाचे खुनात सामील होता. म्हणून त्यास देहांत शिक्षा दिली. दादा पुण्यास न जाता २४ फेब्रुवारीचे सुमारे परभारे उत्तरस निघून गेले आणि कारभारी मंडळी पुण्यास येऊन पुरंदरास पेशव्यांच्या दर्शनास गेली.

**सखाराम बापूस कैद :**

दादांनी उत्तरेस प्रयाण केल्यावर ते टोक्यास आले आणि टोक्याच्या मुक्कामाहून सखारामबापू यांच्या काही दस्तऐवजाच्या चिठ्या होत्या त्या नानांकडे पाठवून दिल्या. त्यात सखारामबापूंनी दादास मुंबईहून पुण्यास येण्यास फूस दिल्याचा पुरावा सापडला. त्याचा बंदोबस्त शिंद्यांचे मार्फतीने करण्याचे नाना फडणिसांनी ठरविले. नाना व शिंदे यांनी सखारामबापूस पुरंदरावर मेजवानीसाठी बोलावून कैद करविले. त्यास पालखीत घालून सिंहगडावर कैदेत ठविलें[1]. बापूंची मालमत्ता, कापड व नक्त पैसा वगैरे सर्व जप्त करण्याचे हुकूम सोडले. बापूंची रवानगी सिंहगडावर करण्यापूर्वी ते फितुरात राघोबादादास सामील होते. ह्यासंबंधीच्या चिठ्या त्यास दाखविल्या. तसेच नारायणरावांच्या खुनाच्या कटात त्यांचे अंग नारायणरावास धरण्यापर्यंत होत असाही नानांचा वहीम त्याजवर होता. बापूंची मालमत्ता व चीजवस्तू सरकारात जमा केली. त्याच वेळी चिंतो विठ्ठल, बाबूराव व सखाराम हरि गुप्ते, मोरोबादादा वगैरेंच्या घरांच्याही जप्त्या केल्या. सखारामबापूंना सिंहगडावरून मे महात प्रतापगडावर नेण्यात आले. तेथील हवा मानवेना म्हणून त्यांस रायगडावर ठेविले. वृद्धावस्था, अतिसार होऊन तिथेच त्यांना दिनांक २ ऑगस्ट १७८१ रोजी देवाज्ञा झाली.

---

१. खरे, ऐ. ले. सं. ७, ले. २४८६; म. द. रु. २, पृ. ११०.

**गुत्तीचा वेढा :**

सन १७७३ डिसेंबर ते १७७६ मार्च कर्नाटकातील गुत्तीच्या घोरपडचांचे घराणे पेशवेकाली आपल्या महापराक्रमाने उदयास आले. औरंगजेबाशी मराठचांचा जीवनमरणाचा लढा चालू असताना सेनापती संताजी घोरपडे यांनी अचाट पराक्रम करून मोगलांना कांपावयास लावले. सेनापती संताजीचा खून मराठचातील आपसातील वैरामुळे झाला. सन १६९८ त खून झाल्यावर त्यांचा भाऊ बहिर्जी व पुतण्या शिदोजी आणि कुटुंबातील इतर माणसे यांनी कर्नाटकात येऊन आपले वस्तान बसविले आणि आपल्या कर्तृत्वाने त्या प्रांती गजेन्द्रगड, सोंडूर आणि गुत्ती अशी स्वतंत्र संस्थाने स्थापन केली. या घोरपडे घराण्यात शिदोजीचा मुलगा मुरारराव सेनापती गुत्तीकर हे महापराक्रमी अलौकिक पुरुष होऊन गेले. पेशवे कर्नाटकातील मोहिमात मुररावांचे सहाय्य वारंवार घेत असत. कर्नाटकात इंग्रज, फ्रेंच, अर्काटचा नबाब, तंजावर आणि म्हैसुरातील राजे यामधे सारखे तंटे आणि लढाया चालू असत. अशा तंटचात मुराररावांनी भाग घेऊन मोठे पराक्रम गाजविले. यामुळे त्यांच्या नावाचा दरारा कर्नाटकात सर्वत्र प्रस्थापित झाला. मुरारराव हैदरावरील पेशव्याकडून मिळालेल्या प्रत्येक स्वारीत हैदराविरुद्ध सामील होत असत म्हणून त्यांजवर हैदराचा राग. हैदराने मुराररावाचा नक्षा उतरविण्याकरिता १७६५ ऑक्टोबरमधे गुत्तीवर छापा घातला. हैदराचा छापा तुमच्यावर येत आहे असे पटवर्धनानी मुराररावास आवर्जून सांगितले. पण ते न ऐकता हट्टी मुरारराव हैदराच्या भेटीस त्याने बोलाविल्यावरून गेले. हैदराने या भेटीत त्यास कैद न करता त्यांचा मोठा सन्मान केला. तीन हत्ती, शिरपेच, मोत्यांची कंठी व वस्त्रे देऊन दरसाल फक्त ५० हजार रुपये खंडणी त्यापासून घेण्याचा करार केला आणि मेजवानीबद्दल त्यास २५ हजार रुपये देऊन निरोप दिला. पण हे सख्य फार वेळ टिकले नाही. मार्च १७७१ मधे पेशव्यांनी हैदराशी मोती तलाव येथे मोठी झुंज दिली. त्यात मुराररावांनी पेशव्यास सामील होऊन हैदराचा तोफखाना काबीज केला.

सन १७७५ साली पेशव्यांच्या फौजा इंग्रजांशी लढण्यात गुंतल्या असता हैदराने अदवानी, बदलानी, कर्नूल, रायचूर या संस्थानिकाकडून खंडण्या वसूल करून त्यांना आपले मांडलिक बनविले. नंतर मुराररावास निरोप पाठविला की, "मोती तलावाच्या लढाईत तुम्ही आमच्या तोफा घेतल्या आहेत त्या परत द्या. कडपेकरांचा बळकाविलेला मुलुख परत द्या. शिवाय आम्ही मागू तेवढी खंडणी देऊन आमच्या भेटीस या आणि आमची नोकरी करा". सेनापतींनी यावर हदरास सांगून पाठविले की, चित्तास येईल ते करणे. तुझ्याशी लढाई करण्याची माझी तयारी आहे आणि सेनापतीनी निश्चय केला की, दौलत

गेली तरी जाऊ पण हैदराशी लढू[१]. त्यावर हैदराने गुत्तीस वेढा दिला. किल्ल्यात पाण्याची अतिशय टंचाई पण सेनापती निवडक पाच सात सरदार लोक घेऊन किल्ल्यात राहिले. वेढा डिसेंबर १७७५ मधे पडला. तो १५ फेब्रुवारीपर्यंत मुराररावाने मोठ्या शौर्याने किल्ला लढवून थोपविला. १४ फेब्रुवारी रोजी हैदराने शिकस्त करून तीन तोफा चौथे दरवाजावर किल्ल्यावर उतरवून किल्लेकरानी आडवा तिरकस मार मारिला. एक प्रहर पावेतो वरील मार जाहला. शत्रूचे पाचशे माणूस ठार, दोन तीनशे जखमी, भिंतीवरून उतरत होते. त्यास बंदुक व जेजालाची गोळी याप्रमाणे जाहले[२]. सेनापतींनी पराक्रमाची शिकस्त केली. सेनापतीनी पेशवे किंवा निजाम याकडून मदतीची अपेक्षा केली होती, पण कोणाकडूनही मदत येवू शकली नाही. १५ फेब्रुवारी रोजी हैदराने मार तुत्तीचा बुरुज उडवून हल्ला केला[३]. त्यात त्याचे एक हजार लोक कामास आले. आपणास आता मदत मिळत नाही असे पाहून मुराररावाने हैदराने मागितलेली १२ लक्ष रुपये खंडणी देण्याचे कबूल केले. तहाच्या वाटाघाटी हैदरचा मेहुणा मीर रेझासाहेब याच्या मध्यस्थीने झाल्या. सेनापतींनी आपल्याकडून जवाहिराचे १२ पेटारे भरून कुलूपे लावून पाठविले. निरोप पाठविला की चार दिवसांनी आमचा वकील आल्यावरच पेटारे उघडा. हैदराने ४ दिवसांची वाट न पहाता ओधायमान होऊन ते जवाहिराचे पेटारे कुलपे तोडून उघडविले. पहातो तो त्यात चार पेटचा गारगोटचा, चार पेटारे खापरीचे, बाकी चार पेटाऱ्यात नायकिणींच्या जुन्या पादरक्षा, याप्रमाणे दृष्टीनें पाहून हैदरास संताप आला. त्याने तोफा दुतर्फा लावून गोळ्यांचा वर्षाव करण्यास सुरवात केली. तो किल्ल्यावरून तोफांच्या गोळ्यांचा मारा, गारासारखा होऊन हजार बाराशे माणूस खतम झाले. सेनापतीनी वाटाघाटीच्या शेवटी खंडणीऐवजी जुनी पादत्राणे पाठविली म्हणून हैदरास त्वेश चढून त्याने गुत्तीच्या पेठेवर हल्ला करून ती घेतली[४]. किल्ल्यावर चहू बाजूंनी तोफा लावून हल्ला केला. हल्ल्याचे दिवशी आतल्यानी फारच शर्थ केली. बाहेरील माणूस गारद जहाले. आतलेही जहाले. पेशवे किंवा निजाम यापैकी कोणीतरी कुमक करील असा सेनापतींना भरवसा वाटत होता. परंतु शेवटी या प्रसंगी त्यांच्या कुमकेस कोणीच धावले नाही. तरीपण चार महिने चांगले लढले. हैदराचा मार भारी. किल्ल्यावर पाणी नाहीसे झाले. हैदराने फारच निकड केली. तेव्हा किल्लेदार मुसलमान होता. त्याने सेनापतीस खाली उतरवून आणले, कबिले (बायका मुले) व कारभारी किल्ल्याखाली पेठेत आले. टिपूने किल्ल्यावर जाऊन बंदोबस्त केला. सेनापतीभोवती चौकी बसवून बंदोबस्त पक्काच केला[५]. हैदराने सेनापतीच्या पायात चांदीच्या बेडया घालून त्याना कपालदुर्गावर कैदेत ठेविले. तेथेंच

१. खरे, ऐ. ले. सं. भा. ५, पृ. २४७८, ७९.
२. कित्ता, ले. १७९०.
३. कित्ता, ले. १७९५.
४. कित्ता, ले. १८२३

या पराक्रमी पुरुषाचा अंत झाला[1]. अशा रीतीने मराठ्यांच्या राज्यातील कर्नाटकातील मातबर सरदार हैदराने बुडविला.

वेढा संपताच वेढ्यात गुंतलेली हैदराची तीस चाळीस हजार फौज मराठे व मोगल यांच्या मुलखावर स्वाऱ्या करू लागली. मुरारराव कैदेत सापडल्यामुळे हैदराला तुंगभद्रेपलिकडे कोणी शत्रू उरला नाही. गुत्ती काबीज केल्यावर हैदराच्या सरदारांनी धारवाड प्रांतावर स्वारी केली. त्यांच्या पारिपत्याकरिता पांडुरंगराव व कोन्हेरराव पटवर्धन या सरदारांनी मोहिम काढली. तीच सावशीची मोहीम होय.

पण या मोहिमेअगोदर हैदराने कोल्हापुरकरांशी संगनमत करून त्यांना पुणे दरबारविरुद्ध उठविले. त्याचा बंदोबस्त करण्याची कामगिरी पटवर्धनांकडे आली. ती हकिगत अशी.

**करवीरकरांचा दंगा :**

सन १७७५ मध्ये करवीरकरांचे व कोन्हेरराव पटवर्धनांचे युद्ध होऊन पुरंदरास कारभाऱ्यांच्या विद्यमाने तह ठरला. त्या तहाने त्यांचे समाधान झाले नाही. शिवाय त्यास दादांची फूस होतीच. हैदराकडूनही मदतीचे आश्वासन होते म्हणून करवीरकरांनी रामचंद्र नाईक, परांजपे यांजकडे असलेले चिकोडी व मनोळी तालुके ताब्यात घेण्याच्या इराद्याने चिकोडीवर हल्ला केला. ठाणे घेतले व बाबूराव जगजीवन, महादेव शास्त्री आदि गृहस्थास धरून नेले. हे वर्तमान पुरंदरास कळताच रामचंद्र नाईक यांनी चिकोडी घेण्यासाठी जानेवारी १७७६ मध्ये कुमक मागितली. त्यावरून कारभाऱ्यांनी रामचंद्र गणेश यास फौज देऊन चिकोडीकडे रवाना केले. ते दोघे नीरेवर येतात तोच करवीरकरांनी आणखी एक विजय मिळविला. कोल्हापूरकरांनी पुणे दरबारविरुद्ध चढाई करण्याचे कारण त्यास हैदराची फूस हे होय. कोल्हापूरकरांनी कारभाऱ्यांच्या फौजेस लढाईत गुंतवून ठेवावे व तिचा पराभव परस्पर व्हावा म्हणजे कर्नाटक आपणास निर्वेध मिळावे अशी हैदराची मनिषा होती. त्याकरिता कोल्हापूरकरांना हैदराने एक लाख रुपये पाठविले होते. तेव्हा कोल्हापुरकरांचे पारिपत्य करणे कारभारी मंडळीस अगत्याचे वाटून त्यांनी कोन्हेरराव पटवर्धन कित्तूरच्या लगत्यास होते त्यास माघारा बोलाविले[2]. कोन्हेरराव ३१ जानेवारी रोजी बागेवाडी प्रांत हुकेरी या मुक्कामास जात असता करवीरकर सामानगडाच्या पायथ्याशी होते त्यांनी येऊन बेधडक हल्ला चढविला. मोठी लढाई होऊन कोन्हेररावांचा मोड झाला. तेव्हां पटवर्धनांनी आपणास भगवंतराव प्रतिनिधींचे सहाय्य मिळावे अशी खटपट चालविली. कारण "पंतसुद्धा मिळावे करवीरकरांचा रेंच चांगलाच मोडावा" हे उद्दिष्ट होते[3] (फेब्रुवारी १७७६).

---

१. खरे, ऐ. ले. सं. भा. ५, ले. १८२३.

२. कित्ता, १७६९.

३. कित्ता, ले. १७५६.

**महादजी शिंदे व करवीरकर :**

हे उद्दिष्ट साध्य होण्यासाठी कारभारी मंडळींनी करवीरकरांच्या बंडाचा बीमोड करण्यासाठी १७७७ त रामचंद्र गणेश याची नेमणूक केली व पुढे ही कामगिरी महादजी शिंदे यांनी जानेवारी १७७८ त स्वतःवर घेतली. त्याची हकिगत पुढे येईल.

**सावशीचो लढाई** (सन १७७६ ऑक्टोबर ते १७७७ जानेवारी) :

हैदरअल्लीने राघोबादादांना पाठिंबा दिला होता. तेव्हा पुणे दरबारने निजामअल्लीची मैत्री संपादन केली. मराठे इंग्रजांबरोबर लढण्यात व राघोबाचा बंदोबस्त करण्यात गुंतले असता हैदराने बेलारी व गुत्ती सर केली आणि दादाशी झालेल्या कल्याणदुर्गच्या तहात मिळालेला कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील सुमारे पाऊण कोट रुपये उत्पन्नाचा मुलूख हैदराने आपल्या सत्तेखाली आणिला. ह्या मुलुखात स्वराज्यापैकी मुलूख होता. पटवर्धन, रास्ते यांच्या जहागिरीचाही मुलूख होता. तसेच निजामास ज्या मुलुखातून खंडणी मिळत असे असाही मुलूख होता. तेव्हा हैदराच्या याच चढाईने पुणे दरबार व निजाम यांची हैदराविरुद्ध एकजूट होणे क्रमप्राप्त होते. पण ही एकजूट होऊन आपल्यावर स्वारी होण्यापूर्वी हैदराने आपले सरदार कृष्णराव व श्रीपतराव शिवमोघे यांजबरोबर सैन्य देऊन मोगल व मराठे मुलखावर स्वाऱ्या करण्याकरिता रवाना केले[१]. एप्रिल १७७६ त हरिहर, हल्याळ ही ठाणी घेऊन लक्ष्मेश्वरकडे आपला मोर्चा वळविला. त्यांच्या पाठोपाठ हैदराचा मेहुणा मीर रेझा आठ हजार सैन्यानिशी धारवाड प्रांतात घुसला आणि त्याने बंकापूर काबीज केले. नंतर खुद्द हैदर सर्व सैन्य घेऊन आला. त्याने प्रांतातील तमाम पाळेगारांपासून खंडण्या घेतल्या. आणखी पुढे मुलूख घेण्याचा उद्योग करावा तो मराठ्यांशी पुरंदर मुक्कामी इंग्रजांचा तह झाल्यामुळे मराठी फौजा गुजरातेतून देशी परत येत असल्याची बातमी त्यास लागली. तसेच त्याचा नामधारी राजा श्रीरंगपट्टण येथे निवर्तल्याचेही समजले. मलबारातील नायर लोकांचे बंड आणि मद्रासकर इंग्रजांच्या त्याच्या विरुद्धच्या हालचालींच्या बातम्याही त्यास लागल्यामुळे तो जून महिन्यात परत श्रीरंगपट्टणास गेला. पण आपला सरदार मीर रेझा यास ८,००० सैन्यानिशी बंकापुरास ठेविले. त्याने धारवाडपर्यंत स्वारी करून लुटालूट व जाळपोळ मनस्वी केली. त्यामुळे रयतेच्या मनात थरकाप उत्पन्न झाला. पाळेगारांनी आपआपली खंडणी मुकाट्याने मीर रेझाच्या स्वाधीन केली. अशा रीतीने सन १७७६ च्या जूनपासून ऑक्टोबरपर्यंत धारवाड प्रांती तमाम ठाणी बसवून तिकडचा मराठ्यांचा अंमल उठविला. आणखी दोन महिने हयगय केल्यास शत्रू मनोळीची बारी चढून बेळगाव शहापुराकडे येईल. हा अंदाज पेशवे व निजाम यांनी करून हे त्यासाठी हैदराचे पारिपत्य करून आपआपले मुलूख सोडविण्याचे काम पुणे दरबार व निजाम यांनी अंगिकारिले.

१. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. १८६५.

सन १७७६ च्या जून-जुलै मध्ये हरिपंत तात्या गुजरातेतून लष्करसुद्धा परत आले. सवंध पावसाळा तोतयाचे खूळ मोडण्याची तयारी करण्यात गेला. त्याचवेळी हैदरावर स्वारी करण्यासाठी निजामअल्लीशी संगनमत करून असे ठरले की, मोगल व मराठे या उभयतांनी हैदरावर स्वारी करून आपआपले मुलूख सोडवावे व शत्रूच्या मुलखापैकी जितका प्रांत व खंडणी मिळेल त्यांची निम्मेनीम वाटणी उभयतांनी करून घ्यावी.[1]

निजामाकडून त्याचा सरदार इब्राहिमखान घोशा व पुणे दरबारकडून हरिपंत फडके यांची नेमणूक या कामगिरीवर झाली होती. पण हरिपंत फडके यांच्या फौजेने आपल्या तीन वर्षांच्या थकबाकीची मागणी पेशवे व हरिपंत यांजकडे केली. त्याचा उलगडा होऊन स्वारीस उशीर लागणार असे पटवर्धन मंडळीस दसऱ्याच्या सुमारास समजताच त्यापैकी कोन्हेरराव व पांडुरंगराव पटवर्धनांनी आपण दहा हजार फौजेनिशी हैदरावर चालून जातो असे पुणे दरबारास कळविले.[2] हैदराने धारवाड जिंकून घेणे ही गोष्टच त्यांना लाज आणणारी वाटू लागली. ह्या आपल्या भावना त्यांनी पुणे दरबारास कळविल्यावर कारभाऱ्यांनी त्यांच्या मदतीस तोफखान्यासह कृष्णराव पानसे, शिवरामबाबा घोरपडे, गुत्तीकर, मनोळीचे नीळकंठराव शिंदे, नरगुंदीचे देसाई आदींची रवानगी केली.

दिनांक ६ ऑक्टोबर १७७६ रोजी पांडुरंगराव फौजेसह मिरजेहून ह्या स्वारीवर निघाले. त्यास वरील सरदार वाटेत मिळाले. ही सर्व मराठी फौज प्रांतात आलीसे पहाताच हैदरअल्लीच्या लोकांनी धारवाडचा वेढा उठऊन ते पळून बंकापुरास गेले. फक्त तीन हजार कन्नडिगे धारवाडच्या रानात मराठ्यांना त्रास देण्याकरिता लपून राहिले. डिसेंबर महात मराठ्यांनी धारवाड प्रांतातील सर्व ठाणी घेतली.

शिरहट्टीचा देसाई मराठ्यांचा पक्का द्वेष्टा होता. त्याने हैदराच्या फौजेने रिकामी केलेले सावशीचे ठाणे घेऊन हैदरास मराठ्यांशी झुंज देण्यासाठी आपणास मदत देण्याकरिता निरोप पाठविला. हैदराने सहा-सात हजार कवाइती पायदळ, दोन-तीन हजार स्वार व नऊ तोफा इतके सामान देऊन महमदअल्ली कुमदान याची रवानगी केली. दादासाहेबांकडून हैदराकडे बाजीराव बर्वे हे सरदार येऊन राहिले होते. त्यांचीही काही मराठी फौज कुमदानाबरोबर आली होती. तो कुमदान रटेहळ्ळीच्या जंगलात येऊन उतरला. पटवर्धनांचा पूर्वीचा मुलूख हैदराकडून सोडविण्याच्या इर्षेने पांडुरंगराव पटवर्धन धारवाड सोडून पुढे सटकले. कुमेदान बंकापुरास राहिला. जंगलाने त्यास आधार दिला. सावशीपासून मराठ्यांची फौज चार कोसावर येऊन राहिली. कुमेदान त्या स्थळी शिरहट्टी देसाईच्या सहाय्याने राहिला. मराठी फौजेवर रात्री छापा घालून ती उधळून

१. ऐ. ले. सं. भाग ६, ले. १८६५.

२. कित्ता, ले. १९३६.

लावावी असा कुमेदानने बेत केला होता. मराठी लष्कराच्या हालचालींचा वृत्तांत या कसलेल्या सरदारास शिरहट्टीकर देसायाच्या मार्फत कळत होत्या. रात्री हल्ला होणार हे गृहीत धरून पांडुरगराव सावशीपासून एक कोस अंतरावर येऊन मोठ्या सावधगिरीने राहिले. उजेडल्यावर त्यांच्या मनात सावशीवर चालून जाऊन कुमेदानाशी लढाई द्यावी असे आले. कूच करण्या-अगोदर आपल्या शत्रूची तयारी, फौज याचा काहीच विचार तेथील मराठी सरदारांनी केला नाही. सर्वांनी कुमेदानवर चालून जाण्याचे ठरले. ही बातमी कुमेदानास समजताच त्याने आपली काही फौज व तोफा किल्ल्याबाहेर तुरीच्या शेतात छपवून ठेविल्या. मराठी फौजेने सावशीवर हल्ला चढविला. त्यांना ही छपलेली फौज दिसली नाही. ते बेसावधपणे शत्रूच्या स्वारीवर चालून गेले. इतक्यात मराठी फौजेवर किल्ल्यातून व शेतातून तोफांचा भडीमार सुरू झाला. मराठी फौजेत एकच गोंधळ उडाला. पटवर्धनांची सारी फौज पळत सुटली. मराठी सैन्याचा पाडाव झाला. कोन्हेरराव पटवर्धन लढाईत मारले गेले. शिवराम घोरपडे, पांडुरंगराव वासुदेव, धोंडदेव, श्रीपत मोरेश्वर आदि सरदार जखमी होऊन शत्रूच्या हातात सांपडले. त्यास कुमेदानने बंकापुरास पाठविले. पुढे त्यांची रवानगी श्रीरंगपट्टणास हैदराकडे झाली. पांडुरंगराव कैदेतच ज्वराच्या दुखण्याने दिनांक ४ नोव्हेंबर १७७७ रोजी वारले. बाकीच्या बंदीवानास हैदराने चार वर्षे कैदेत ठेवून जबर दंड घेऊन सोडून दिले. त्यानें शिवराव घोरपड्यास मात्र न सोडता कमलदुर्गावर त्याचे चुलते मुराररराव घोरपडे कैदेत होते तेथे पाठवून दिले. सावशीच्या अनर्थाची वार्ता कुरुंदवाड, तासगांव, आदि पटवर्धनांच्या जहागिरीत समजल्यावर त्या भागावर दुःखाची छाया पसरली. पुण्यास बातमी कळताच पुणे दरबारने परशुराम भाऊ पटवर्धन कोल्हापूर येथील गुंत्यात अडकले होते, त्यांना म्हैसूरकरांच्या चढाईखोरपणास तोंड देण्यासाठी धारवाड-बंपुकार भागात जाण्याचा हुकूम केला. परशुरामपंत २२ जानेवारी १७७७ त मनोळीस पोहचले. सावशीच्या लढाईतून पळून आलेली व भाऊनी कोल्हापूर मोहिमेतून आपणाबरोबर आणलेली मिळून एकंदर दहा हजार फौज मनोळीस जमली होती. भाऊंजवळ फौजेस रोजमरा देण्यास पैका नसल्यामुळे त्या फौजेतील लोकांनी आपल्याच मराठा मुलूखातून दाणा-वैरण लुटून आणून खाण्याचा क्रम सुरू केला. अशा फौजेस बरोबर घेऊन कुमेदानच्या कवाईती फौजेवर हल्ला करावा तर निकाल ठरलेलाच होता. ह्याच वेळी म्हणजे ज्या दिवशी भाऊ मनोळीस दाखल झाले त्याच दिवशी कुमेदाननें धारवाडास वेढा घालून तोफांची मारागिरी सुरू केली होती. मनोळी धारवाड पासून १४ कोसावर. मनोळीपासून गर्द झाडी धारवाड-पर्यंत असून त्यातूनच धारवाडकडे जाण्याचा रस्ता होता. त्याला मनोळीची बारी हे नाव होते. ह्या बारीपलिकडे मुरगोड, हुळी, एकोडी, मोरब अशी मराठ्यांची ठाणी होती. त्यांचे संरक्षण करून धारवाडचा वेढा उठवावयाचा व कुमेदानास बारीअलीकडे येऊ द्यावयाचे नाही ही कामे हरिपंत फडके पुण्याहून मोठी फौज घेऊन येईपर्यंत भाऊने करावयाची होती.

कुमेदानच्या फौजेच्या हालचालींवर लक्ष ठेवून दोडवाडपर्यंतच्या मार्गाचे रक्षण करण्याचे काम पाच हजार फौजेच्या पथकावर सोपविले. पेंढाऱ्यांची रवानगी हुबळीवर केली. शत्रू समोर उभा असता त्याजबरोबर टिकून रहाणे महमदअल्ली कुमेदान याचे प्रथम कर्तव्य होते. दोघांसही एकमेकांची दहशत असल्यामुळे मोठ्या लढाईस तोंड न लागता कधी-कधी पेंढारी व शत्रूचे लष्कर यांची गाठ पडे. तेव्हा कधी बैल लुटले जात तर कधी पेंढारी बैलांना लुटीत. पण लढाईस तोंड लागत नसे. अशा रीतीने भाऊ मनोळीस व कुमेदान हुबळीस तळ देऊन राहिले. त्यावेळी हैदराकडून कुमेदानास मदत येऊ लागली. भाऊंना पुण्याहून मदत येण्याचे सोडाच पण मागच्या देण्याचा निकाल झाल्याशिवाय गुजरातहून स्वारीतून जुलै १७७६ त पुण्यास परत आलेल्या स्वारांपैकी एकही स्वार पथक अन्यत्र कोठे मुलूखगिरीवर जाण्यास तयार नव्हते. त्यामुळे भाऊस वेळीच मदत येऊ शकली नाही. हाती असलेल्या फौजेवरच गुजराण करणे त्यास भाग पडले. कुमेदानच्या मनात मनोळीची बारी ताब्यात घेण्याचे आले. तेव्हा तो प्रथम हुबळीहून कूच करुन बंकापुराच्या रोखाने दहा-बारा कोस स्वतः माघारा सरकला. हेतू हा की, परशरामभाऊस आपण दूर गेलोसे दाखवावे म्हणजे ते बेसावध रहातील. मग रात्री अकस्मात येऊन त्याजवर छापा घालावा. अशी त्याची मसलत होती. त्याप्रमाणे भाऊ सैन्यासह उमरगोळ येथे असता त्याने २२ मार्च १७७७ रोजी आपल्या कवाइती पायदळ व तोफांसह भाऊवर हल्ला चढविला. भाऊ सावध असल्यामुळे ह्या हल्ल्याची बातमी त्यांना होतीच. त्यांनी तात्काळ फौज तयार करून लढाई दिली. पण फौजेबरोबरचे लटांबर बारीपार लावून दिले व त्यांना मनोळीस पाठविले व स्वतःही लढत-लढत शिस्तीने माघार घेत मनोळीस आले. आणि कुमेदान उमरगोळास राहिला. पण भाऊ येऊन आपणाभोवती घिरट्या घालून आपला कोंडमारा करणार असे पाहून दुसरे दिवशी कुमेदान उमरगोळाहून परत हुबळीस गेला. अशा रीतीने दोन-अडीच महिने भाऊनी मनोळीस काढिले. कित्तूरकर व नवलगुंदकर हैदरास जाऊन मिळण्यास तयार झाले होते. ते ह्या पराक्रमाने वचकून जागच्या जागी राहिले. अशा रीतीने धारवाडचे संरक्षण झाले व मनोळीची बारी मराठ्यांच्या हाती राहिली.[1]

### पाळेगारांचे पारिपत्य (सन १७७७ एप्रिल-जुलै) :

मनोळीस धान्य व वैरण मिळेनाशी झाली व फौजेतले लोक रोजमुऱ्या-साठी दंगा करू लागले. तेव्हा पाळेगारास वठणीवर आणून त्यापासून खंडणी घेऊन फौजेचे पोट भरावे असे परशुरामभाऊंच्या मनात आले. कुमेदान हुबळीस गेल्यावर खंडणी वसूल करण्याचा व ठाणी घेण्याचा भाऊंचा उद्योग सुरू झाला. ते इडगळाहून निघून जालिहालाकडे गेले व तेथील देसायाने सरकारची ठाणी बळकाविली होती ती घेऊन प्रत्येक गांवापासून दोन-तीन

---

१. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. १९९८, २००४, २०१२, २०४१, २०५८, २०६४

हजारापासून पंचवीस हजार रुपयांपर्यंत त्यांनी खंडणी घेतली. इतक्यात त्यास हरिपंत येऊन मिळाले. नंतर त्यांनी डंबळच्या देसाईवर स्वारी केली. गदगचे ठाणे व पन्नास हजार रुपये देण्यास तो प्रथम तयार झाला होता. पण भाऊंपासून हरिपंताची फौज निजामाच्या मदतीस निघून जाताच डंबळकर देसाई लवाडीच्या गोष्टी बोलू लागला. तेव्हा भाऊंनी त्याची ठाणी हरलापूर, उमंचगी, नरेगळ, जखली वगैरे घेतली व हिरेगाळ या भक्कम ठाण्यास वेढा दिला. तिथे निकराची लढाई होऊन त्या लढाईत कृष्णराव पानसे गोळी लागून पडले. शेवटी ५ जून १७७७ मध्ये भाऊंनी ते ठाणे काबीज केले व डंबळकरांकडून रुपये ८० हजार खंडणी घेतली.

जून महिन्याच्या प्रारंभी नाना फडणवीस यास गारद्यांकडून दया करवून मारावे असे कोणी कारस्थान केले होते. परंतु ते उघडकीस आल्यामुळे नानांचे प्राण वाचले.

सोलापूर प्रांती नरसो गोविंद या नावाचा बंडखोर उठला होता. त्याने पटवर्धनांचे करकंब हे ठाण दिनांक २५ मे रोजी शिडचा लावून घेतले. त्या बंडखोराचे पारिपत्य करून ते ठाण सोडविण्याची कामगिरी कारभाऱ्यांनी तुकोजी होळकर यास सांगितली. तुकोजींनी फौज जमवून करकंबेकडे कूच करून बंडखोराचा पराभव केला.

हरिपंत भाऊंचा निरोप घेऊन फौजेसह निराळे होऊन निजामाचा सरदार धौशाकडे जाण्यास निघाले. जाताना कनकगिरी या संस्थानापासून रुपये ७० हजार खंडणी घेतली.

**धौशा व हरिपंतांची भेट व तातातूट :**

हरिपंत कनकगिरीहून कंचनगुडाकडे गेले. तेथे निजामाचा सरदार धौशा याची गाठ पडली. ते एकत्र होताच हैदरअल्ली मागे हटून चित्रदुर्गाकडे गेला. नंतर त्या दोघांनी कंचनगुड लुटून फस्त केले. इतके होईतो जून महिन्यास सुरुवात झाली. तेव्हा धौशाने ठरविल्याप्रमाणे हरिपंतासही तुंगभद्रेच्या अलीकडे मोगलाई मुलखात छावणी करणे भाग पडले. पण त्याची फौज पोटास मिळाल्याशिवाय छावणीत रहाण्यास कबूल होईना, तेव्हा परशुराम भाऊंनी हरिभाऊंच्या फौजेस चार लक्ष रुपये कर्जाऊ घेऊन वाटण्याची योजना केली.

**धारवाड प्रांती छावणी (सन १७७७ जुलै ते नोव्हेंबर) :**

हरिपंतांच्या फौजेस पावसाळ्यात थोपवून धरणे हे भाऊंचे पहिले काम होते. त्याकरिता फौजेस रोजमरा मिळण्याची सोय कोपळचे मामलेदार रामचंद्र नारायण हुपरीकर यांनी एक लाख रुपये कर्जाऊ दिल्याने झाली. तेव्हा सरदारांची लष्करे शिरहट्टीस आली.

लक्ष्मेश्वर परगण्याचा देसाई नेहमी शिरहट्टीस रहात असल्यामुळे त्यास शिरहट्टीकर म्हणत असत. त्या देसायाने हैदराच्या मदतीने पटवर्धनांचा लक्ष्मेश्वर परगणा बळकावला होता. तो परत घेण्याचे ठरवून त्यास २९ जुलै रोजी मराठी फौजेनें शिरहट्टीस वेढा दिला. वेढ्याचे काम ३१ ऑगस्ट पर्यंत चालले. शेवटी इरेस पडून मोठ्या इर्षेने हल्ला केला. "बातेऱ्यात घेऊन खंदकात शिरून दोन अडीचशे माणसे कापून काढिली. दरवाजास आगी दिल्या व बुरुजही खणावयास लाविले. आतले शरण आले. गांव घेतला. अगोदर दोन-अडीचशे माणूस कापून काढिले, वरकडांचे हातपाय, कान कापले. रात्रौ दिवट्या लावून देसाई याच्या तिघी बायका व शिवापा, हिऱ्यापा व सुरेराव वगैरे कारकून, दलवाई, नाईक, तमाम सापडले. कैदेत ठेविले आहेत. याप्रमाणे शिरहट्टी घेतल्याचे वर्णन भाऊंनी स्वतःच लिहिले आहे." हे जबरदस्त ठाणे पडल्यावर लक्ष्मेश्वर परगण्यातील इतर ठाणीही ताब्यात आली.

**हैदराची कामगिरी :**

मराठ्यांच्या फौजा जुलै-ऑगस्टमध्ये शिरहट्टीस वेढा घालून बसल्या होत्या. त्या आधीच तुंगभद्रेपलीकडे हैदराने चित्रदुर्गास वेढा घातला होता. कर्नाटकातील बल्लारी, गुत्ती व रायदुर्ग व चित्रदुर्ग, हरपनहळ्ळी ही पांच हिंदु संस्थाने होत, त्यापैकी बल्लारी, गुत्ती व रायदुर्ग ही तीन संस्थाने हैदराने अगोदरच्या दोन वर्षात बुडविली होती. आता पाळी चित्रदुर्गकरांची होती. चित्रदुर्गकरास तुंगभद्रेच्या अलीकडील मराठी फौजेचा आधार वाटत होता. पण तुंगभद्रेस पावसाळी उतार सापडणे कठीण त्यामुळे मराठ्यांची कुमक येणार नाही हे हैदराने जाणले होते. म्हणून त्याने भरमसाठ खंडणीची मागणी चित्रदुर्गकराकडे केली. तेव्हा खंडणी न देता चित्रदुर्गकर मोठ्या शौर्याने हैदराशी लढले. हैदराने मोर्चेबंदी केली. तरी किल्लेधारी हमेशा बाहेर पडून मोर्चावर चालून येऊन युद्ध करीत होते.[1]

यावेळी हैदराचे वकील पुण्यास लक्ष्मणराव रास्ते यांच्या विद्यमाने कारभाऱ्यांशी तहाचे बोलणे करीत होते. त्यांचे म्हणणे की, तुमच्या आमच्या राज्याची हद्द तुंगभद्रा नदी ही असावी. तीन लक्ष रुपये खंडणी व मागील बाकी तुमची सर्व देतो. शिवाय सावशीच्या लढाईत पाडाव झालेले पांडुरंगराव वगैरे सर्व सरदार सोडतो. मुरारराव घोरपड्यास त्याचा आमचा शीव शेजार असल्यामुळे त्यापासून आम्हास उपद्रव होईल म्हणून सोडणार नाही. कारभाऱ्यांचे म्हणणे की, हैदराने ती खंडणी व मागील बाकी द्यावी. मुराररावसुद्धा सर्व क़ैदी सोडावे. तुंगभद्रेपलिकडचा घेतलेला सर्व मुलूख परत द्यावा. हे बोलणे हैदरास कबूल न झाल्यामुळे तहाच्या वाटाघाटी फिसकटल्या.[2]

---

१. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. २१४८.

२ कित्ता, ले. २१५६.

**हरिपंत व हैदर (जुलै १७७७) :**

हरिपंतांच्या फौजेचा पगार थकला होता. पुणे दरबारने आश्वासिल्याप्रमाणे त्यांजकडून योग्य ती पैशांची तरतुद झाली नाही. परशुरामभाऊनी सावशी व मिश्रीकोट ही दोन्ही स्थळे काबीज केली. यावेळी मराठ्यास बातमी कळली की, हैदराने चित्रदुर्गकरांशी तह करून तो तुंगभद्रेच्या दिशेने चालून येत आहे. पण नदीला पूर असल्यामुळे त्यास नदी पार होता येणार नाही. त्यामुळे त्याजकडून अकस्मात हल्ला होण्याची भीति बाळगण्याचे कारण नव्हते. ह्यावेळी परशुरामभाऊंनी धारवाड व कोपल ही ठाणी रामचंद्र हुपेरीकर यास लावून देऊन त्याजकडून रुपय साडचार लाख घतले. सावनूरची खंडणी रुपये तीन लाख १५ हजार ठरविली[१]. चित्रदुर्गकरांशी तह केल्यावर हैदर हरिहरपासून पाच कोस पुढे सरकला. दोन्हीकडील फौजा पूर ओसरण्याची वाट पहात स्वस्थ बसल्या. चित्रदुर्गकरांनी मराठ्यांची आपणास मदत मिळेल या आशेने हैदराशी झालेल्या तहाच्या अटी मोडल्या[२]. लढाईचा खर्च देण्यास आपण तयार असल्याचे त्याने मराठे सरदारास लिहिले.

अंताजी महादेव व नारायणरावाच्या खुनाच्या कटातील तुळाजी पवार हे दादांच्या तर्फेचे हैदराच्या ताब्यात बंकापूर नांवाचा किल्ला होता तेथे राहून जवळच छावणीस असलेल्या मराठी फौजेत फितूर करीत होते. त्यांचा फितूर फौजेत दोन तीन वेळा हरिपंतास उमगला, तेव्हा त्यांनी फितुरी लोकास धरून त्यास कडक शासन केले. यावेळी भाऊंची आणि हरिपंतांची मिळून तीस ते पस्तीस हजार फौज छावणीस होती. पस्तीस हजार स्वारांचा सरसकट नुसता रोजमुरा दर स्वारास दरमहा वीस रुपये धरला तर छावणीचा खर्च दरमहा सात लक्ष रुपये म्हणजे चार महिन्याचे अठ्ठावीस लक्ष रुपये होतात. पैकी ह्या दोन्ही फौजास कोठून किती पैसे मिळाले ते लक्षात घेऊ. कारभाऱ्यांकडून पुण्याहून आलेले रुपये दोन लाख, परशुराम भाऊंनी चार लाखाचे कर्ज काढिले. धारवाड व कोपल तालुक्यातील रसद साडेचार लक्ष, नवलगुंदकरांकडून पासष्ट हजार खंडणी मिळाली आणि सावनुरकरांकडून खंडणीदाखल मिळालेले तीन लक्ष पंधरा हजार मिळून एकंदर चौदा लक्ष तीस हजार रुपये होतात[३]. एवंच खर्चाच्या निमपट मिळकत झाल्यामुळे नदी उतरून शत्रूच्या मुलखात जाऊन भरेल त्या रीतीने पोट भरणे मराठी सैन्यास क्रमप्राप्त होते. चित्रदुर्गकराने मराठ्यास सांगून पाठविले की, तुम्ही जर गलगनाथाजवळ तुंगभद्रा ओलांडीत असाल तर मी सव्वा लाख रुपये तुंगभद्रा ओलांडल्यानंतर होणाऱ्या पहिल्या मुक्कामास देतो. ह्यावेळी पुण्याहून सावकारांमार्फत साडेचार लक्ष रुपये आले म्हणून हरीपंत व भाऊ यांनी २४ नोव्हेंबर १७७७ त फौजेसह तुंगभद्रा पार केली. ही बातमी हैदरास कळताच तो हरिहरापलिकडे पाच कोसांवर

१. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. २१६५.

२. कित्ता, ले. २१५६.

३. कित्ता, ले. २१५३.

होता तेथून हरिहरास आला आणि तत्काळ सडा होऊन तो मराठी फौजेस आडवा आला. चित्रदुर्गकरांनी मराठ्यास ५ लाख रुपये देऊ केले होते. पण नदीपार होण्याच्या आदल्याच दिवशी परशुरामभाऊस मोडोशीचा व ज्वराचा प्रबळ विकार होऊन त्याने ते हैराण झाले होते म्हणून सर्व भिस्त हरिपंतावर होती. मराठी फौज ज्या वाटेने चित्रदुर्गास जाणार होती ती वाट पहिल्या पांच सहा मजली डोंगराळ व अडचणीच्या जंगलातून होती व असुरक्षिततेची होती. म्हणून हरिपंतांनी शत्रू आडवा येतो हे वर्तमान समजताच तो मार्ग सोडून तुंगभद्रेच्या काठाकाठान बल्लारीकडे येऊन धौशास मिळवून घेऊन तिकडून मैदानातून चित्रदुर्गास जाण्याची मसलत केली व तीस अनुसरून त्यांनी लष्कराचा रोख हंपीकडे धरिला[1]. हैदरही आपल्या पंचवीस तीस हजार कवाइती,पायदळ व तोफासह मराठ्यांच्या मागून ५ ते १० कोस अंतराने चालू लागला[2]. मराठ्यांना त्यावर उलटून हल्ला करणे मुलूख डोंगराळ असल्यामुळे शक्य नव्हते. ते दर कूच करीत सोंडूरबारी ओलांडून अदवानीच्या मैदानी प्रदेशात आले. हैदराने आपला मुक्काम मराठ्यांच्या छावणीपासून पंधरा कोस अंतरावर असलेल्या दारोजी गांवी केला. मराठ्यांनी आपला मुक्काम रायदुर्ग हद्दीत रारावी येथे केला. तिथे ते पंधरा दिवस राहिले. त्या मुदतीत परशुरामभाऊ आपल्या सैन्याचे अधिपत्य करण्यास आजारपणातून वरे झाले. मराठे धौशाची वाट पहात होते. कारण धौशासह त्यांना चित्रदुर्गाकडे जावयाचे होते. "मी आल्याशिवाय शत्रूवर चालून जाऊ नका". असे धौशाने मराठ्यास सांगितले. पण धौशा लवकर येऊन मिळण्याचा रंग दिसेना. मराठी लष्कर धौशा लवकर येऊन मिळेल या भरवंशावर पुढे चालून येऊन मोठ्या अडचणीत सापडल्यासारखे झाले होते. हैदराने आपली काही फौज दारोजीला ठेविली आणि काही लष्कर बेलारीपासून १७ कोसावरील मुरगोडला ठेविली. ह्या दोन्हीकडील फौजांच्या कचाट्यात मराठी फौज सापडली. मदत मिळणे मोठे मुष्कील होऊन बसले. हरिपंतानी असे ठरविले की, तुंगभद्रेपलिकडे आपल्या लष्कराचे सामान पोचवावे व शत्रूशी गनिमी काव्याने लढून धौशा येऊन मिळेपर्यंत वेळ काढावा.

पण हरिपंतानी लष्करचे सामान नदीपलीकडे हालविण्यास सुरवात करताच हैदराने १ जानेवारी १७७८ रोजी अकस्मात हल्ला चढविला. छाप्याची थोडी कुणकुण अगोदर मराठ्यास लागली होती. म्हणून काही बरोबरच्या संरक्षणार्थींनी शत्रूस थोपवून धरिले. शत्रू आल्याची वर्दी येताच हरिपंत व परशुरामभाऊ फौजेसह तयार होऊन आघाडीस जाऊन उभे राहिले[3] आणि बाजारबुणगे निमूटपणे तुंगभद्रेची वाट धरून चालू लागले. शत्रूच्या आगीच्या माऱ्यापुढे हत्यार चालेना. आपल्या फौजेत जबरदस्त फितूर असल्याखेरीज शत्रूस अंगावर चालून येण्याची छाती झालेली नाही. हे

१. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. २१९७.

२. कित्ता.

३. कित्ता, ले. २२२०, २२२१.

परशुरामभाऊ व हरिपंत यास कळून चुकले. म्हणून बुणगे सुरक्षितपणे तीन कोस पार झाल्याची वर्दी येताच मराठी फौज हळूहळू मागे सरकू लागली व शत्रूही त्यावर चालून न येता रारावी येथेच तळ देऊन राहिला.

फितुरीचा तपास बारकाव्यानें सुरू केला. तो मानाजी शिंदे फांकडे यास हैदराकडून आलेले पत्र व एक लाखापैकी पाऊण लाख रुपये रोख त्याजकडे सापडले. त्याचे पारिपत्य करावे म्हणून त्याच्या गोटावर हल्ला केला तोच तो मारामार करीत निसटून शत्रूकडे गेला. यशवंतराव माने म्हसवडकर हा फितुरात सापडल्यामुळे त्यास तोफेच्या तोंडी देण्यात आले[१]. बाकी जे सापडले त्यास पुण्यास कारभाऱ्यांकडे गुन्हेगार म्हणून पाठविले. अशा रीतीने फितुरांचा बंदोबस्त वेळीच झाल्यामुळे फौजेत आणखी फितूर झाला नाही. फितुराचा तपास सुरू व्हावयाच्या अगोदर मराठी सैन्य तुंगभद्रा ओलांडून अलीकडे आले. तेव्हा निजामाचा सरदार धौशा याची त्याशी गाठ पडली. पण धौशा मंदगतीनें चालणारा आणि एक मजल झाली की पांच चार मुक्काम करणारा बेपर्वाई सरदार मराठ्यास लढाईचा प्रसंग आणू देईना. हे पाहून हैदराच्या सैन्याने उलट मराठी मुलूखात शिरून लुटालूट करण्यास सुरवात केली. त्याने कोपल तालुक्यातील तमाम गांव, खेडी खुशालपणे लुटून फस्त केली आणि डंबळकर देसायाकडून लाख होन खंडणी घेऊन लक्ष्मेश्वर परगण्यातील बहुतेक ठाणी पुन्हा काबीज केली. टिपूने झपाट्याने धारवाडवर हल्ला चढवून ते शहर लुटले व जाताना त्याने हुबळीचा ताबा घेतला. धौशाची मंदगती व दुष्टपणा यामुळे हरिपंतांच्या फौजेचा उत्साहच मावळला. हरिपंतानी पुण्याकडून जादा कुमक मागितली. याचवेळी मोरोबादादा होळकरांच्या सहाय्यानें नाना फडणिसांविरुद्ध कट शिजवत असल्यामुळे नाना जादा फौज कर्नाटकात पाठविण्यास उत्सुक नव्हते. पण अखेरीस नाना फडणिसांनी ५००० फौज अप्पा बळवंताबरोबर हरिपंतांच्या मदतीकरिता पाठविण्याचे ठरविले. मराठ्यांनी तुंगभद्रा सिगटाळू येथे उतरून चित्रदुर्ग-करांच्या मदतीस जाण्याचे ठरविले. पण धौशाने त्याजबरोबर येण्याचे नाकारले. त्याने हरिपंतांस सरळ सांगितले की, तुम्ही उत्तर तीरास रहात असाल तर पाहिजे तितके दिवस मी तुम्हाबरोबर आहे. नदीपार होण्याचा आग्रहच असेल तर मी आमच्या मुलुखास परत चाललो. मराठ्यांचा नाईलाज होऊन धौशाच्या म्हणण्याप्रमाणे त्यांना फिरून कोपलास यावे लागले. धौशाने वाटेत मराठी मुलुखातून खंडणी गोळा केली. रयतेवर जुलूम केला तेव्हा परशुरामभाऊंनी त्याची कानउघाडणी केली. पण मागाहून असे कळले की, धौशाचे आणीबाणीच्या वेळी दिरंगाईचे वर्णन निव्वळ स्वार्थ साधण्याची प्रवृत्ति, त्याची टाळाटाळ या गोष्टी धौशा हैदराशी गुप्तपणे सामील होता म्हणून करीत असे. हे लक्षात आल्यावर अनागोंदीचा संस्थानिक शत्रूस मिळून मराठ्यास खंडणी देण्याचे नाकारीत होता. त्यावर भाऊंनी हल्ला चढविला.

१. खरे, ऐ. ले. सं. भाग ६, ले. २२२८, २२३१.

त्यास महमद अल्ली कुमदानची मदत होतीच. हल्ला एवढा जबरदस्त होता की, संस्थानिकाने शरण येऊन मराठ्यांकडे वकील पाठवून खंडणीचा तह ठरवून घेतला.

इतके होईतो मार्च महिन्याच्या अखेरीचे दिवस आले. शत्रूच्या पारिपत्याची तजवीज केलीच पाहिजे असे मनात आणून नदीपार होऊन हैदराचा मुलूख मारावा अशी योजना आखिली व धौशास सांगितले तेव्हा तो पूर्वीसारखाच येण्याचे नाकारू लागला. तेव्हा मराठ्यांनी त्यास निक्षून सांगितले की, तुम्ही आम्हाबरोबर न याल तर आम्ही तुम्हास शत्रू समजू व तसे वागू. हे ऐकताच धौशा निमूटपणे मराठ्यांच्या लष्करास येऊन मिळाला. दुसरे दिवशी दिनांक २४ मार्च रोजी लष्कर कूच करून दुसऱ्यांदा नदीपलीकडे मुक्कामास गेले. पण लष्करचे पुण्याहून मोरोबाचे दादास आणण्याचे कारस्थान मोडून काढण्यास निघून यावे, अशी नाना फडणिसांची पत्रे हरिपंत व परशुरामभाऊ यांस दिनांक ५ एप्रिल १७७८ रोजी आली. यामुळे मोहिमेची मसलत तशीच टाकून दुसरे दिवशी धौशासह कूच करून ते परत फिरले.

मराठी फौज कर्नाटकातून निघून गेल्यावर हैदर व टिपू यांस कर्नाटक मोकळे सापडले. त्यांनी मांडलिकांकडून जबरदस्त खंडण्या घेऊन आपला राज्य-विस्तार केला.

**करवीरकरांचा नक्षा उतरविला :**

परशुरामभाऊ व रामचंद्र गणेश करवीरकरांना जरबेत ठेवण्यासाठी पुणे दरबारने पाठविले होते. त्यापैकी परशुरामभाऊंना कुमदानच्या पारिपत्या-करिता कर्नाटकात जावे लागले. मागे रामचंद्र गणेशावर सरशी करण्याकरिता कोल्हापूरकरांनी त्यांचे काही मराठे सरदार फोडून आपणाकडे मिळवून घेतले. पण त्यापैकी करवीरकरांचे सेनापती येसाजी शिंदे यांशी कोणाचे न पटल्यामुळे ते आपापल्या घरी परत गेले. तथापि येसाजी शिंदे रामचंद्र गणेशवर १९ मे १७७७ रोजी चालून आले. तेव्हा कवठे हिंगणगांव येथे उभय सैन्याची गाठ पडून युद्ध झाले. त्यात येसाजी शिंदे यांचा पराभव होऊन ते व सखोजी भोसले दोन चारशे स्वारानिशी पन्हाळ्यास पळून गेले. करवीरकरांचा मोड झाल्यामुळे त्यांचा दंगा तात्पुरता बंद झाला. पुढे जून महिन्यात पावसाळा सुरू झाल्यावर रामचंद्र गणेश फौजेसह पुण्याकडे परत यावयास निघाले.

करवीरकरांच्या बंडाचा पुरा मोड करावा म्हणून त्या कामावर पुणे दरबारने महादजी शिंदे यांची योजना केली होती. त्यांनी फौज जमा करून रहिमतपुरला पावसाळ्याकरीता ते छावणीस राहिले. पुढे कारभाऱ्यांशी आपल्या जहागिरीसंबंधी पत्रव्यवहार करण्यात नोव्हेंबरपर्यंत वेळ घालविला. त्या महिन्याच्या अखेरीस कारभाऱ्यांकडून दहा लक्षाच्या जहागिरीचे वचन मिळाल्यावर महादजी शिंदे करवीरच्या मोहिमेस निघाले. फौज गोळा करीत वारणेवर आले. नंतर पन्हाळ्यास घेरा घालण्याची हूल दाखवून वडगावांस गेले. तेथील आसपासची ठाणी घेतली.

करवीरकरांनी आपला टिकाव महादजीपुढे मैदानात लागणार नाही हे जाणून पन्हाळा किल्ला व करवीर राज्य रक्षण्याकडे आपले लक्ष पुरविले. त्यावर महादजींनी मजल दरमजल करीत करवीरच्या परिसरात आपले सैन्य आणिले. महादजींच्या फौजेने करवीरास वेढा घातला. हा वेढा तीन महिने चालू होता. त्यावेळी शिवाजी राजे व राणी दुर्गाबाईसाहेब यांच्या स्वाऱ्या करवीरास होत्या. शहरास वेढा देऊन महादजींच्या फौजेने तीन महिनेपर्यंत (जानेवारी १७७८ ते मार्च ७८) ते शहर जिंकण्याचे आटोकाट प्रयत्न केले. महादजींकडे फौज तीस हजार. एवढ्या फौजेशी सामना देणे शक्य होणार नाही याची कल्पना कोल्हापूरचे प्रमुख कारभारी येसाजी शिंदे यांना आली, म्हणून त्यांनी तहाची बोलणी लाविली. लढाईचा खर्च तीन लाख रुपये देण्यास कबूल झाले. कारभाऱ्यास हे बोलणे महादजींनी कळविले तेव्हा कारभाऱ्यांनी पाच लक्ष घेऊन तंटा मिटवावा असा आदेश दिला. त्यावर तहाची बोलणी फिसकटली म्हणून महादजींनी पुण्याहून महाकाळी नांवाची मोठी तोफ मागविली आणि कोल्हापुरात शहराच्या बंदोबस्तास जी फौज होती त्यांची घरेदारे शहराभोवतालच्या खेड्यापाड्यातून विखुरलेली होती, त्यांचे जप्तीस राजश्री हरी बाबाजी रवाना केले. समागमे ५०० राऊत दिले. हुपरीस जाऊन जप्त्या केल्या. महाकाळी तोफेची वाट पहात राहिले. इचलकरंजीकर व पटवर्धन यांजकडून जादा फौज मागविली. एवढे सर्व झाल्यावर येसाजी शिंदे यांनी तहास कबुली दिली. चिकोडी, मनोळी या दोन्ही परगण्यांच्या सनदा येसाजी शिंद्यांना द्याव्या व पंधरा लक्ष खंडणीदाखल द्यावे. त्यापैकी तीन लक्ष ताबडतोब द्यावे व बाकीच्या ऐवजांचा करार करावा[१]; त्याप्रमाणे करार दिनांक ९ एप्रिल १७७८ रोजी झाला व शेवटी तहावर सह्या दिनांक २३ एप्रिल १७७८ रोजी झाल्या व महादजींच्या फौजा पुण्यास परत आल्या.

• • •

१ भोडक, को. प्रां. अ. इ. भा. १, पृ. ६४; खरे, इचलकरंजी संस्थानचा इतिहास, ले. १६५.

## इंग्रज-मराठे युद्धाचा शेवट

# कालसूची

| | |
|---|---|
| १७७९, जानेवारी . . | इंग्रज-मराठे यांचा वडगावी तह. |
| १७७९, डिसेंबर . . | हेस्टिंग्ज मराठ्यांविरुद्ध गोहदच्या राजाशी तह करतो. |
| १७८०, फेब्रुवारी . . | पेशवे व म्हैसूरकर यामधील तह. |
| १७८०, जून ३ . . | पोर्तुगीज मराठे तह. |
| १७८०, जुलै . . . | हैदरची मद्रासवर चाल. |
| १७८०, नोव्हेंबर १३ . | जनरल गोडार्डचा वसईस वेढा. |
| १७८०, डिसेंबर ११ . | इंग्रज, वसई काबीज करतात. |
| १७८०, डिसेंबर १२ . . | रामचंद्र गणेशचा लढाईत मृत्यू. |
| १७८१, फेब्रुवारी २ . . | कॅमकने सिप्री किल्ला घेतला. |
| १७८१, फेब्रुवारी . | परशुरामभाऊ पटवर्धनचे मराठ्यांच्या कुमकेस पुण्याहून प्रयाण. |
| १७८१, मार्च १६ . . | चौकदे येथे इंग्रज–मराठे लढाई. |
| १७८१, एप्रिल १२ . . | पनवेलीहून घाटाकडे इंग्रजी फौजेचे कूच. |
| १७८१, एप्रिल १९ . . | शिंद्यांचा मुक्काम सालबाईस. |
| १७८१, मे १७ . . . | इंग्रजांचा मराठ्यांशी तह. |
| १७८१, जून ११ . . | सिक्रेट कौन्सिलचा मराठ्यांशी सलोखा करण्याचा ठराव. |
| १७८१, ऑगस्ट १० . . | मुंबईची नाकेबंदी करण्यास नानांकडून हुकूम. |
| १७८१, नोव्हेंबर ४ . . | वॉरन हेस्टिंग्ज डेव्हिड अँडरसनला तहाची लेखी समजूत देतो. |
| १७८१, डिसेंबर २३ . . | डेव्हिड अँडरसन मराठ्यांच्या गोटात. |
| १७८२, फेब्रुवारी . . | हेस्टिंग्ज कलकत्यास जातो. |

# १७

## इंग्रज-मराठे युद्धाचा शेवट

## (१७७९-८२)

वडगांवचा इंग्रजांशी तह सन १७७९ च्या जानेवारीत होऊन पराभूत ब्रिटिश सेना फेब्रुवारीच्या अखेरीस मुंबईस परतली. तोच मार्च महात बऱ्हाणपुराहून गोडार्ड आपल्या कवाइती फौजेसह सुरतेस येऊन पोहचला. तदनंतर लगेच श्रीमंत दादासाहेबांनी त्याचे रखवालदार हरिबा बाजी केतकर याशी कुरापत काढून त्यास जीवे मारून स्वतः सुरतेस गोडार्ड याच्या आश्रयास गेले.

इंग्रजांची पलटणे मुंबईस परतल्यावर दादासाहेबांचा जो खाजगत सरंजाम होता त्या भोवती चौक्या बसविल्या. दादासाहेब शिंदे यांच्या गोटात आले. तेथे शिंदे यांचे बोलणे पडले की, दादानी झांशीस रहावे, तेथे खाजगी खर्चाचा सरंजाम तेरा लक्षाचा आहे तो व अमृतराव यास सात लक्षाचा घ्यावा व रहावे. त्याप्रमाणे मान्य आहो असे दादासाहेबांनी कबूल केले.[१] झांशीस दादासाहेब यास पोहोचवावयास शिंदे व होळकर याजकडील पाच हजार फौजेची नेमणूक केली. हरि बाबाजी हे दादासाहेबास झांशीस घेऊन जाण्यास निघाले. पहिला मुक्काम तुळापुरास केला आणि नानांस निरोप पाठविला की, आम्ही हिंदुस्थानात दूर देशी जातो, पाठीमागे दौलत बहुत, हुशारीने रक्षण करावी.[२] तुळापुरास दादांनी आपले चवथे लग्न केले. मुलगी सदाशिव भिकाजी पेंडसे यांची. तुळापुराहून कूच करून टोक्याच्या मुक्कामास गेले.[३] तिथून कूच करून येरुळच्या मुक्कामास गेले. पुढे मजल दर मजल बऱ्हाणपुरानजीक गेले. तेथे सौ. आनंदीबाई लहान बाजीरावासह पवारांकडील धारच्या किल्ल्यात होती ती येऊन मिळाली.[४] तेथून कूच करून महेश्वरानजीकच्या मंडलेश्वरावरून नर्मदा उतरावयाच्या घाटाजवळ मुक्कामास आले.[५] गोडार्डची फौज

---

१. 'तह व करारमदार' ह्या पुस्तकांत पृ. १३०-१३४ वर दादासाहेब ऊर्फ रघुनाथराव याजशी तीन करार दि. ३-२-१७७९ रोजी झालेले दिले आहेत. पहा—ऐ.टि.ले.७. म.इ. सा. खं. १९,ले. २०१.

२. पे. द. ५, ले. ९७; ऐ. टि. १, ले. ७.

३. खरे, ऐ. ले. सं. भाग ७, ले. २४८७.

४. कित्ता, ले. २५०३.

५. कित्ता.

बऱ्हाणपुरास मुक्कामास होती तीस सांगून पाठविले की, आपण सुरतेस निघून जावे आम्ही तिथे येऊन तुम्हास भेटतो.[१] दादांच्या मनात अशा रीतीनें सुरतेस पळून जाण्याचे विचार घोळत होते. त्याकरिता फौजेसह बरोबर असलेल्या शिंदे यांजकडील हरि बाबाजीचा काटा काढण्याचे ठरविले. त्याच्या फौजेत फितूर करून दंगा करविला. आपले लोक पाठवून त्याजशी रोजमऱ्याकरिता हुज्जत घातली. दगा देऊन कैद करणार इतक्यात हरि बाबाजी घोडयावर बसून नर्मदेच्या उताराकडे चालते झाले. त्यांचा पाठलाग करवून त्यास जखमी स्थितीत पकडून मुसक्या बांधून आणविला.[२] तेथे त्याचा अंत झाला. अशा रीतीने हरि बाबाजीची वाट लावून दादा अलीमोहन येथे मुक्कामास गेले. तेथून दादा सुरतेस जाणार ही बातमी महादजीबाबांनी फत्तेसिंग गायकवाडास लिहिली.[३] आपली फौज आडवी घालून दादासाहेब यांस फिरंग्यास मिळू न देणे अशी विनंती केली.[४] हे दादासाहेबास समजल्यावरून गायकवाडांचे फौजेस चुकविण्याकरिता त्यांनी चांदोर कर्नाळी वरून बाबापिराच्या घाटावर मुक्काम केला. तिथून अंकलेश्वरास गेले आणि सरकारचे महाल सुरत अठ्ठाविसीत होते तेथे जप्त्या करावयास कारकून पाठवून वसूल मिळविला आणि कूच करून सुरतेस गेले.[५] तिथे इंग्रज सेनापती गोडार्ड यांची भेट घेतली. दादा इंग्रजांकडे सुरतेस गेल्यावर त्यांनी त्यांचा धिक्कारच केला. 'तुम्ही बेईमान, तुमच्या वचनात दृढता नाही. तुमचे नादी लागून आम्ही कर्जदाद मात्र जाहलो. पेशजी तुम्हास रुपया दिला तो वसूल नाही. तुम्हाजवळ ना फौज ना खर्चास. तुमची सोबत आम्हास नको.'[६] तेव्हा दादास विषाद वाटला व सुरत अठ्ठाविशीत सरकारचे महालातून जप्त्या घालून ७ लक्ष रुपये मिळविले.[७] गोडार्डला दादासाहेब आपल्याकडे ठेवून पुणे दरबाराशी बोलणी करण्यास आयतीच संधी सांपडली. कारण वडगांवचा अपमानकारक तह गोडार्ड व मुंबई इंग्रजांना पसंत नव्हता. तेव्हा दादा पुन्हा आश्रयास आल्याने पूर्वीच्या परिस्थितीत एकदम बदल झाला. गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जने पुणे दरबारास सांगून पाठविले की, वडगांवचा तह इंग्रजांचे खास प्रतिनिधींनी केला नव्हता तेव्हा तो आम्हास मान्य नाही. करिता स्वतंत्र तह करण्याचा अखत्यार गोडार्ड यास दिला आहे. त्याजबरोबर तह करावा.[८] त्याप्रमाणे गोडार्डने पुणे दरबाराशी बोलणी लाविली. तेव्हा नाना फडणिसांनी ऑक्टोबर १७७८ त गोडार्ड यास निक्षून सांगितले की, दादास स्वाधीन करा आणि इंग्रजांनी ताब्यात घेतलेला ठाण्याचा किल्ला

१. Maharashtra Archivas Bulletin No. 3, p. 24
२. ऐ. टि. ४, ले. १०, का. सं. प. या. ले. ५०.
३. ब. रा. ऐ. वे. २, ले. ६२.
४. कित्ता, २, ले. ६९.
५. कित्ता, ले. ७२.
६. म. द. बा. १, ले. १.
७. ब. रा. द. ऐ. वे, ले. ७५.
८. CPC, Vol. V. L-No. 1726.

स्वाधीन करा म्हणजे मग बोलणी लावू.[१] नानांच्या पत्राची कडक भाषा गोडार्ड यास लागली.[२] त्याने मराठ्यांचा वकील घालवून दिला. त्याने दादास दरमहा हजार रुपये नेमणूक करून देऊन सुरतेस ठेवून घेतले व मराठ्यांशी युद्ध करण्याची मसलत कायम ठरविली. तदनंतर नोव्हेंबरच्या प्रारंभी सुरतेहून गोडार्ड मुंबईस आला व तेथील गव्हर्नर व कौन्सिलर याशी खलबत करून पुढे काय काय करावयाचे याचा नकाशा आधी ठरवून सुरतेस परत गेला. त्याच्या मदतीस मुंबई सरकारची फौज सुरतेस जाऊन पोहचली. गोडार्ड मुंबईहून परत आल्यावर त्याने फत्तेसिंग गायकवाड यास अनुकूल करून घेऊन त्याशी पेशव्यांच्या गुजराथमधील मुलुखाची वाटणी करून घेण्यासंबंधीचा तह ठरविला आणि अमृतरावास बरोबर घेऊन अहमदाबादेवर चाल केली. अहमदाबादचा किल्ला घेऊन महालो-महाली ठाणी घातली.[३]

### ब्रिटिशांविरुद्ध एतद्देशीय सत्तांची एकजूट :

गायकवाड इंग्रजास सामील झाल्यामुळे इंग्रजांची शक्ति द्विगुणीत झाली. अशा शक्तिशी गुजरातेत लांब ठिकाणी सामना देणे सोपे नव्हते. कारण ह्याच सुमारास खानदेशात गुलजारखानाचे खूळ माजले होते. तो गुलजारखान व दादासाहेबांचा कारकून केसो कृष्ण या उभयतांनी मोठी फौज जमवून दंगा सुरू केला होता. अशा कठीण प्रसंगी नाना फडणिसांची विशाल बुद्धी आणि शहाणपणा उपयोगी आला. नानानी धूर्तपणा दाखवून इंग्रजांविरुद्ध एतद्देशीय सत्ताधिशांची एकजूट घडवून आणिली. ह्या संघात चार सत्ताधिश सामील झाले. पेशवे, निजाम, हैदरअल्ली आणि नागपूरकर भोसले हे चार सत्ताधिश जरी इंग्रजांविरुद्ध एकत्र आले तरी इंग्रजांविरुद्ध सबंध हिंदुस्थानात सर्व एतद्देशिय सत्ताधिशांमध्ये एक प्रकारची उद्वेगाची भावना पसरलेली होती. कारण ह्या सर्व सत्ताधिशांबरोबर कोणत्या ना कोणत्या तरी कारणास्तव लबाडी करून त्यांच्या स्वातंत्र्यावर घाला घालण्याचे कृत्य हेस्टिंग्जने केले होते. अयोध्येचा नबाब, बनारसचा राजा, बंगालचा नबाब इत्यादि सत्ताधाऱ्यांना मांडलिक बनवून त्यांच्या संरक्षणाची हमी घेऊन त्याजकडून कित्येक लाख रुपये नजराण्यादाखल उपटले होते. त्यामुळे हे सर्व सत्ताधिश कफल्लक होऊन देशोधडीस मिळाले. ह्यांनाही इंग्रजांचे जू नको होते. नाना फडणिसास या वैफल्याचा उपयोग इंग्रजांबरोबर लढताना झाला. याचवेळी इंग्रज-फ्रेंचांचे युद्ध चालू असून फ्रेंचांचे माहे बंदर कर्नल ब्रेट वेटच्या हाताखालील ब्रिटिश नाविक काफिल्याने १९ मार्च १७७९ मध्ये काबीज केले. ह्याच बंदरातून हैदरास फ्रेंचांकडून युद्धोपयोगी सामुग्री मिळत असे ती त्यामुळे बंद झाली. त्यामुळे हैदर इंग्रजांचा कट्टर दुष्मन बनला. ही गोष्ट जेव्हा पुण्यातील कारभारी मंडळाच्या लक्षात आली तेव्हा त्यांनी हैदराशी चालू

---

१. खरे, ऐ. ले. सं. खं. ७, ले. ३५३०.

२. Cambridge History of India, Vol. V, p. 268.

३. Gaikwads of Baroda, Vol. III, p. 66.

असलेले युद्ध बंद करून त्याजला इंग्रजांशी युद्ध पुकारण्यास प्रवृत्त केले. नाना व महादजींनी हैदराशी सलोखा करून त्याजबरोबर संरक्षणात्मक तह इंग्रजांविरुद्ध घडवून आणण्यासाठी वाकबगार व हुशार वकील कृष्णाजी जोशी यास त्याजकडे पाठविले. हैदराशी झालेल्या तहात असे ठरले की, तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील जो मराठी मुलूख हैदराने जिंकला होता तो त्याजकडे रहावा आणि त्याने अर्काट व महमदअल्लीच्या ताब्यातील कर्नाटक हा प्रदेश उध्वस्त करावा. या अटी हैदरास कळविल्या.[१] रास्ते आणि महादजी शिंदे हे मराठ्यांचे दोन सरदार ह्या सलूखाच्या तारणास जामीन राहिले. हा तह होताच पेशवे व म्हैसुरकर यांजमध्ये आज अनेक वर्षे जो युद्ध प्रसंग सुरू होता तो बंद पडून दिनांक २० फेब्रुवारी १७८० रोजी तह होऊन एकोपा झाला.[२] या एकोप्याच्या पायावर एक प्रचंड कारस्थान उभारलें गेलें.[३]

या कारस्थानाचा मूळ उत्पादक हैद्राबादचा निजामअल्ली होय. सन १७७९ च्या उन्हाळयात त्याने पुण्यास नाना फडणीस यास व नागपुरास नागपूरकरांचा दिवाण दिवाकर पंडित यास पत्रे लिहून असे कळविले की, इंग्रज आता फारच बळावला आहे. त्याचे पारिपत्य करणे अत्यावश्यक आहे. हे काम आपण सर्व हिंदी सत्ताधाऱ्यांनी एकजूट करून करावयास हवे.[४] अशी पत्रे नानास मिळताच त्यांनी जामगांवी महादजी शिंदे होते त्यास व वाफेगावाहून होळकरास बोलावून आणून त्यांच्या विचाराने इंग्रजांविरुद्ध अति गुप्तपणे एक कारस्थान उभारले.[५] या कारस्थानाचे स्वरूप असे होते की, पेशवे, हैदर, निजामअल्ली व भोसले या चौघांनी एक संकेताने एकदम स्वाऱ्या करून हिंदुस्थानातून सर्व इंग्रजांस कायमचे हुसकून लावावे. त्यात पेशवे यांनी मुंबई, गुजराथ व अंतर्वेदी येथील इग्रजास पादाक्रांत करावे. भोसल्यांनी बंगाल्यावर स्वारी करावी, निजामअल्लीनी सिकाकोळ-राजमहेंद्रीकडे जाऊन तो प्रदेश घ्यावा आणि हैदराने आपले सर्व बळ पणास लावून मद्रासेवर स्वारी करावी व इंग्रजांचे तिकडील राज्य घ्यावे अशी चौघांमध्ये कामाची वाटणी झाली.[६] याची वार्ता वॉरन हेस्टिंग्ज यास बिलकूल लागू दिली नाही. सतराव्या शतकात ब्रिटिशांनी मद्रास व बंगाल प्रांत आपल्या ताब्यात आणिल्यावर त्यांना असे कळून चुकले की, या दोन्ही प्रदेशात दळणवळण करण्यास त्यामधील खालील प्रदेश दुसऱ्यांच्या ताब्यात असल्यामुळे पंचायतीचे झाले. ओरिसा नागपुरकर भोसल्यांच्या ताब्यात होते व कृष्णेच्या दक्षिणेकडील गुंतूर प्रांत निजामअल्लीच्या ताब्यात होता. पण हे गुंतूर सरकार म्हणजे उत्तर सरकार हे इंग्रजांनी बळकाविले होते. इंग्रज फ्रेंचांचे व इंग्रज मराठ्यांचे अशी दोन्ही

१. CPC, Vol. V, L. No. 1706.

२. राजवाडे, म. इ. सा. खं. १९, ले. ६९, ८४.

३. Alfred Lyall, British Dominion in India, p. 198.

४. CPC, Vol. V. L. No. 1956.

५. खरे, ऐ. ले. सं. भाग ७, ले. २५१६.

६. का. सं पं. या. ले. २७४, ३२१.

युद्धे एकाच वेळी सुरू झाल्यावर हा प्रदेश शस्त्रास्त्रांची व युद्ध सामग्रीची ने-आण मद्रास बंगालमध्ये अति त्वरेने होण्यास इंग्रजास फारच उपयोगी पडला. हा गुंतूर प्रांत निजामअल्लीने आपला भाऊ बसालतजंग यास लावून दिला होता. मद्रासचा गव्हर्नर रमबोल्ड याने बसालतजंगास आपलासा करून त्याजकडून हा प्रदेश इंग्रजांच्या ताब्यांत घेतला.[१] ही गोष्ट निजामअल्लीस बिलकूल पसंत पडली नाही. यामुळे त्या दोन्ही भावात वाकडे आले.

उत्तरेकडील सत्ताधीश इंग्रजांविरुद्ध उठविण्यासाठी गाजीउद्दीनास मराठ्यांनी आपलेसे करून घेतले आणि काल्पी येथे त्यास जहागिरी दिली. शहा अलमच्या मुलास आश्रय दिला व शहा आलम यास मराठ्यांवर अवलंबून रहाण्याचे राजकारण पार पाडले.[२] पन्नाचा राजा हिंदुपद आणि काशीचा चेतसिंग ह्यासही मोठी इनामे दिली.[३] इंग्रजांविरुद्ध गोवेकरांची मदतही नानाने मिळविली व त्यांजबरोबर ३ जून १७८० चा तह घडवून आणला.[४] तसेच डच व फ्रेंच यांनाही त्याने आपलेसे करून घेतले.

नानांनी हा व्यूह रचण्यात जेवढी हुशारी दाखविली त्याहूनही जास्त खबरदारी त्यांनी ही एकजूटीची बातमी इंग्रजांस न कळण्याची खबरदारी घेतली.

इंग्रजांना त्यांच्या विरुद्धच्या एकजुटीची बातमी प्रथमतः मुधोजी भोसले यांनी दिली.[५] बातमी ऐकून हेस्टिंग्जच्या पोटात भीतीचा गोळा उठला आणि त्याने ही जूट फोडण्याच्या उद्योगास आरंभ केला.[६]

हेस्टिंग्जने मोठमोठ्या रकमा उभ्या केल्या. पैसा जमविला. कटकला मुधोजीचा मुलगा खंडोजी भोसले बंगालवर स्वारी करण्याच्या तयारीनिशी होता. त्याजला भेटीदाखल पोशाख व हिरेंजडीत भेट पाठविली.[७] मुधोजीस १५-१६ लाख रुपये आपल्या सेक्रेटरीकडून पाठविले आणि मराठ्यांशी लढाई झाल्यास नागपूरकर भोसल्यांनी त्यात भाग न घेता स्तब्ध रहावे अशा प्रकारचे आश्वासन मुधोजीकडून मिळविले.[८] इतकेच नव्हे तर मुधोजीने सातारा गादीवर आपला हक्क सांगावा व तो कबूल करून घेण्यास इंग्रजांची मदत त्यास मिळेल असे आश्वासनही यास दिले होते. पण मुधोजीस अशी मागणी करण्याचे धैर्य झाले नाही.

---

१. CPC, Vol. V. L. No. 1756.

२. दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे, भाग १, पृ. १, ५.

३. का. सं. प. या. वगैरे ऐ. ले. ३०६, ४६४, पृ. २७५; ऐ. ले. सं. भा. ७, खरे, ले. २६५५, पृ. ३६६८-६९.

४. CPC, Vol. V. L. No. 1607.
महादजी शिंदे यांची कागदपत्रे, ले. ५४-५५.

५. Forrest, Imperial Selections Vol. II, Hastings report to the Court of Directors, dt. 30th April 1781.

६. राजवाडे, म. इ. सा. खं. १९, ले. ५६.

७. Sardesai, N. H. M. Vol. III, p. 98.

८. Gleig, Memoirs of the Life of Warren Hastings, Vol. II, p. 355.

इंग्रजांकडून १६ लाख रुपये मिळताच बंगालवर स्वारी करण्यासाठी बंगालच्या सरहद्दीवर सैन्यासह गेलेले खंडोजी राजे मागे परतले. ते सन १७८१ च्या फेब्रुवारीत नागपुरास येऊन दाखल झाले. नागपूरच्या भोसल्यांना चौकडीच्या गटातून फोडल्यावर हेस्टिंग्जने निजामअल्लीची समजूत काढिली. गुंतूर प्रांत ज्या रामबोल्डने लबाडीने बसालतजंगाकडून घेतला होता त्या मद्रासच्या गव्हर्नरास हेस्टिंग्जने नोकरीतून ह्या कृत्याबद्दल तात्पुरते दूर केले. गुंतूर प्रांत निजामअल्लीचा भाऊ बसालतजंग यास दिला आणि निजामअल्लीस सर्व खंडणीची बाकी देण्याचे आश्वासन दिले. तेव्हा निजामअल्लीने इंग्रजांशी मद्रासला जाऊन तटस्थतेचा तह केला.[१]

याचवेळी गोविंदराव व फत्तेसिंग गायकवाड यामध्ये गादीच्या वारसासंबंधी तंटा उपस्थित झाला. हेस्टिंग्जने ह्या भांडणाचा फायदा उचलण्यासाठी गुजरातेत असलेल्या गोडार्ड यास फत्तेसिंगाची बाजू घण्यास सांगितले. इंग्रजांनी फत्तेसिंगास असे कळविले की, तुम्ही जर पुणे दरबारने आमचेशी चालविलेल्या युद्धात आम्हास मदत कराल तर आम्ही तुमच्या गादीवरील हक्कास मान्यता देऊ. हे फत्तेसिंगास मान्य होताच फत्तेसिंगाचा दिवाण कामतेकर याच्या मध्यस्थीने इंग्रजांनी फत्तेसिंगाबरोबर २६ जानेवारी १७८० मध्यें मैत्रीचा तह घडवून आणिला.[२] नानांचे बेत हाणून पाडण्यासाठी हेस्टिंग्जन हैदराला या जुटीतून फोडण्याचे फार प्रयत्न केले. पण हैदर इंग्रजांचा कट्टर दुष्मन बनल्यामुळे त्यात त्याला यश आले नाही.[३]

मुधोजी आणि निजामअल्ली आपल्या जुटीतून फुटल्याचे कळल्यावर नानास ह्या दोघांचा राग आला. पण यावेळी त्यांचे काहीच वाकडे करू शकत नव्हते. नानांनी घडवून आणलेल्या एकजुटीस औरंगजेबकालीन मराठ्यांच्या एकजुटीस जसे स्वधर्म स्वदेश या तत्त्वांचे अधिष्ठान होते तसे यावेळी नव्हते. प्रत्येकास आपला स्वार्थ साधावयाचा होता. हे इंग्रजास पक्के कळल्यामुळें हिंदुस्थानांतील राजे-रजवाड्यास एकमेकांविरुद्ध खेळविण्यास इंग्रजास सोपे गेले.

मराठ्यांचे दिल्लीतील वकील हिंगणे आणि कलकत्त्याकडील लाला सेवकराम यांनी मात्र नानास धीर येण्याची बातमी दिली. हिंगणे यांनी दिल्लीच्या बादशहाचे मन इंग्रजांविरुद्ध कलुषित केले. तेव्हा त्या बादशहाने आपण इंग्रजांचा नाद सोडून मराठ्यांची मदत घेऊ असे आश्वासन दिले.[४] हेस्टिंग्जचे मराठ्यांविरुद्ध वागणे त्याचा कलकत्त्याचा सहकारी फ्रान्सीस यास

१. खरे, ऐ. ले. सं. खं. ७, पृ. ३५४८.

२. पुण्यास ही बातमी कळतांच नाना व महादजी यांनी फत्तेसिंग गायकवाड यांस याच्या वाईट परिणामाची जाणीव दिली. पण फत्तेसिंगानें त्यांचे न ऐकतां इंग्रजांशी मैत्रीचा तह केला Forrest, Maratha series, Vol. I, p. 394.

३. CPC. Vol. V, No. 1748, का. सं. प. या. ले. २७७.

४. दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणें, पृ. ५.

पसंत पडले नाही. ह्यावरून त्यांचे वितुष्ट येऊन दोघांनीही एकमेकांवर गोळ्या झाडल्या. फ्रान्सीस त्यामुळे जखमी झाला पण मेला नाही.[१]

गोडार्ड याची हाव फार होती. त्याने अमृतरावाच्या मदतीने अहमदाबादवर हल्ला करून ते ऑक्टोबर १७७९ मध्ये ताब्यात घेतले आणि महालोमहाली ठाणी घातली.[२] पण लवकरच त्यास ठाणी सोडून सुरतेस यावे लागले. पुन्हा जानेवारी १७८० त जनरल गोडार्डने सैन्याची सिद्धता करून डभईवर चाल केली व ते ठाणे दोन दिवसात घेतले.[३] नंतर त्याने फत्तेसिगराव गायकवाडांच्या सैन्याची मदत घेऊन गुजरातची राजधानी अहमदाबाद यावर चाल करून ते शहर १५ जानेवारीला घेतले.[४] इतक्यात त्या प्रांताचा बचाव करण्याकरिता व इंग्रजांशी युद्ध करण्यासाठी पुणे दरबारने महादजी शिंदे व तुकोजी होळकर यांची रवानगी गुजरातेत केली. त्यांजबरोबर २५ हजार फौज होती. त्यांचे व इंग्रजांचे युद्ध जुंपले. ते मे महिन्याच्या अखेरीपर्यंत चालले होते. महादजी शिंदे गनिमी काव्याच्या युद्धात पटाईत असल्यामुळे त्यांनी या युद्धात असा काय धुमाकूळ उडवून दिला की, गोडार्डच्या सैन्याभोवतील २० मैल टापूत सर्व मुलूख जाळून राख झालेला. ओला चारा गुरास मिळणे मुष्कील. अशी स्थिती गोडार्डच्या दृष्टीस दिसली.[५] अशा रीतीने सबंध मुलुखाची खराबी करून जणू ब्रिटिशांना विजयप्राप्ती नकोशी करून टाकली. गोडार्ड यास ठिकठिकाणी विजय मिळाला. पण मराठ्यांच्या गनिमी काव्याच्या युद्धतंत्रामुळे इंग्रजांना हे विजय महागात पडले.

इकडे जनरल गोडार्ड यास मुंबई सरकारचा तगादा लागला होता की, तुम्ही गुजरातेत मराठ्यांशी झुंज दण्याच्या भरीस न पडता इकडे यावे आणि वसईचा किल्ला व उत्तर कोंकणापैकी घाटापर्यंतचा प्रदेश काबीज करावा.[६] पण पावसाळा सुरू झाल्यामुळे गोडार्डने आपला मुक्काम सुरतेस ठेविला आणि शिंदे होळकर माळव्यात गेले.

गुजरातमधील उलाढालीत जून १७८० पयत इंग्रजांच्या ताब्यात खंवायत पासून दमणपर्यंतचा सुमारे १५० मैलांचा समुद्रकिनाऱ्यालगतचा पट्टा आला. फक्त वसई तेवढी मराठ्यांच्या ताब्यात राहिली.

गोडार्ड गुजरातेत मराठ्यांशी झगडत असता मुंबईकर इंग्रज स्वस्थ बसले नव्हते. त्यांनी कळवा गांव आणि बेलापूर किल्ला घेतला.[७] १२ एप्रिल १७८० ला कॅ. कॅम्बेलने ठाण्याजवळचा पार्सिकचा किल्ला काबीज केला.[७] दुसऱ्या

१. PDM V. Lala Sevakram's letter, dated 12th Oct. 1780.
२. Gaikwads, II, p. 66.
३. पे. द. ३६, ले. ३८७.
४. खरे, ऐ. ले. सं. भा. ७, ले. ३५३१-३२.
५. Bombay Secret Consultations 2nd March 1779, No. 3.
६. S. N. Sen, Anglo Maratha Relations, p. 166.
७. P. & S. Deptt. Diary No. 23 of 1780, p. 464.

दिवशी बेलापूर व पनवेल इंग्रजांच्या ताब्यात आली. त्यामुळे इंग्रजांना आपल्या सैनिकास धान्य पुरविणे सोपे गेले. इथूनच सर्व तयारीनिशी इंग्रजांनी कल्याणवर हल्ला केला आणि ते शहर मे १७८० त आपल्या ताब्यात घेतले.[१]

इंग्रजांना आपल्या यशाचे कौतुक वाटणे सहाजिक होते. पण मराठे ह्या पराजयामुळे दबून जातील असे जे त्यांना वाटत होते ते मात्र खोटे ठरले. आपला पराक्रम व यश हे क्षणिक असून मराठ्यांच्या निकाली हल्ल्यापुढे आपल्याला अपयशच ओढवून घ्यावे लागेल तेव्हा त्याजशी तह करणे हा उत्तम मार्ग, असे हेस्टिंग्जला वाटू लागले. हे जाणून हेस्टिंग्जने गोडार्ड यास पत्र लिहून मराठ्यांशी करावयाच्या तहाच्या संकल्पित वाटाघाटीतील अटी मार्च १७८० त कळविल्या. फत्तेसिंग गायकवाड व गोहदच्या राजास मराठ्यांकडून अभय मिळावे, राघोबास पुणे दरबारने आश्रय देऊन त्याच्या खर्चाकरिता जहागिर आपल्या मुलूखात द्यावी. फ्रेंचांना पुणे दरबारने आपल्या राज्यातून घालवून द्यावे. इंग्रजांनी जिंकलेल्या स्थळांपैकी काही स्थळे जर मराठ्यांना परत हवी असली तर त्याबद्दल दुसरी स्थळे इंग्रजांना देण्याच्या अटीवर ती द्यावीत.[२] जर मराठ्यांकडून या अटींना प्रतिसाद मिळाला नाही तर युद्ध चालू करावे. गोडार्डचा विचार वसई इंग्रजांच्या ताब्यात येईपर्यंत मराठ्यांशी तहाच्या वाटाघाटी करू नयेत असा होता. म्हणून त्याने सुप्रिम कोर्टास सुचविले की, उज्जयनीस महादजी शिंदे गेले आहेत. त्यांना तिथेच लढाईत गुंतून ठेवून नर्मदा उतरून दक्षिणेस पुणे दरबारच्या मदतीस येऊ न देणे, म्हणजे पुणे दरबारास इंग्रजांशी तह करण्यास भाग पडेल.

हेस्टिंग्जने मोठ्या धूर्त हेतूने मराठ्यांशी झगडण्याची योजना तयार केली होती. त्यात माळव्यातील मराठ्यांना शह देऊन एकाच वेळी दोन ठिकाणी लढाईची क्षेत्रे तयार करण्याचे राजकारण होते.[३] गोहदचा राजा मराठ्यांचा अतिद्वेष्टा होता. त्याजशी हेस्टिंग्जने मराठ्यांविरुद्ध मैत्रीचा तह डिसेंबर १७७९ मध्ये घडवून आणिला.[४] मराठी मुलखावर राणा व इंग्रज या दोघांनी हल्ला करावयाचा असे ठरवून राण्याच्या मदतीस फेब्रुवारी १७८० मध्ये कॅप्टन पोपॅम यमुना उतरून आला. त्याने काल्पीच्या आजूबाजूची मराठ्यांच्या ताब्यांतील लहार आदि ठाणी घेतली. हेस्टिंग्जच्या हुकुमाप्रमाणे त्यास ग्वाल्हेर किल्ला सर करावयाचा होता. तो त्याने १७८० च्या पावसाळ्यात ऑगस्ट महात मोठ्या शर्थीने जिंकून घेतला. तेव्हा महादजी शिंदे यास उत्तरेस इंग्रजांचे पारिपत्य करण्यास जावे लागले. नाना फडणविसाने इंग्रजास शह देण्यासाठी हैदरअल्लीस मद्रासवर हल्ला करण्यास सुचविले. हैदराने नव्वद हजार सेना तयार करून जुलै १७८० त श्रीरंगपट्टणाहून कूच केले व मद्रासवर चाल केली. त्या प्रांती गेल्यावर त्याने मद्रास भोवतालचा प्रदेश

१. Maharasntra Archives Bul'etin No. 3, Kalyan Diary of 1780, d. 63.
२. Sen, Anglo-Maratha Relations, p. 170.
३. *Ibid*, p. 155.
४. CPC. Vol. V, No. 1689.

जाळून टाकिला. सर हेक्टर मन्री यास लुटून घेऊन पिटून लाविले. कर्नल बेलीच्या टोळीचा फन्ना पाडिला व अर्काट काबीज करून घेतले.[१] इंग्रजास त्यामुळे हे युद्ध नको असे वाटू लागल.[२] तरी पण मुंबईकर टोपीवाल्यास कल्याण हाती आल्यावर मुंबई ते पुणे मार्गीचा वसईसह सर्व प्रदेश आपल्या ताब्यात यावा असे तीव्रतेने वाटू लागले. म्हणून जनरल गोडार्डने पावसाळा संपताच वसईस १३ नोव्हेंबर रोजी वेढा दिला व एक महिन्याने वसईचा किल्ला (दिनांक ११ डिसेंबर रोजी) काबीज केला. त्या अवधीत रामचंद्र गणेश व बाजीपंत मोठी फौज घेऊन पुण्याहून आले. त्यांशी लढयाची सर्व जोखीम कर्नल हार्टली याच्या शिरावर पडली. सबंध नोव्हेंबर महिना त्याच्या फौजेच्या व मराठ्यांच्या चकमकी होऊन दिनांक १२ डिसेंबर रोजी युद्ध झाले.[३] त्यात रामचंद्र गणेश मारले जाऊन मराठी फौज मागे हटली.[४] त्यामुळे पुणे दरबार खचून गेला नाही. पुणे दरबारने हरिपंताच्या नेतृत्वाखाली भली मोठी फौज तळ कोंकणात रवाना केली. मुंबई इंग्रजांनी मराठ्यास कुमक येणार हे जाणून कर्नल हार्टलीच्या नेतृत्वाखालील सैनिकांचे पहारे कल्याणपासून बोरघाटपर्यंत ठेविले.[५] पुण्याहून मोठी फौज घेऊन हरिपंत आल्याचे गोडार्ड यास समजताच तो वसईहून तळ हालवून हार्टलीच्या कुमकेस आला. हरिपंत तात्या दहीवलीस राहिले होते. बाजीपंत अण्णा तोफा, गारदी वगैरे सरंजामानिशी बदलापुरावर राहिले होते. मराठी फौजा दररोज इंग्रजांच्या बाजूने तळावा करीत तेव्हा थोडी बहुत लढाई होत असे. जनरल गोडार्ड याची मसलत बंदर किनाऱ्याची ठाणी घेणार असे मराठ्यास वाटत होते. पण गोडार्ड यास पुण्यावर चाल करून जावयाचे होते. म्हणून तो मराठी फौजेस न जुमानता धडक मारून बोरघाटपर्यंत गेला.[६] नाना फडणीस यांसही बातमी कळताच त्यांनी तुकोजी होळकरास खानदेशातून बोलावून घेतले. नाना व होळकर यांच्या भेटी २९ जानेवारीस पुण्यास झाल्या. त्या समयी मोठा समारंभ होऊन खाना झाला. होळकरांची नानांनी सल्ला मसलत घेऊन त्यांची रवानगी घाटाखाली केली.[७] पाच हजार फौज व पाच हजार पेंढारी होळकरांसमागमे होते. शेवटी हरिपंत तात्या, बाजीपंत अण्णा व होळकर या सर्वांची मिळून चौपटीने अधिक फौज असताही तिला धुडकावून लावून जनरल गोडार्ड पुण्यावर चालून येण्याच्या उद्देशाने बोरघाट चढून वर आला ही गोष्ट सिद्ध झाली. "तीस हजार स्वार व चार हजार पायदळ

१. पे. द. ३६, ले. ३६२, ३६३, ३६४.
२. कित्ता.
३. खरे, ऐ. ले. सं. भा. ७, पृ. ३५५३.
४. कित्ता, पृ. ३५३३.
५. कित्ता, पृ. ३५३२.
६. कित्ता, पृ. ३५३४.
७. कित्ता, ले. २५७६.

तुम्हाबरोबर असता तुम्ही इंग्रजास घाटावर कसे येऊ दिले? म्हणून नानांनी हरिपंत व होळकर यास खरमरीत पत्र पाठवून विचारले.[१] त्यांनी हरिपंत यास असे विचारले की, मराठ्यांची एवढी भली मोठी फौज असता गोडार्ड यास धान्य पुरवठा कसा झाला? ह्या कानपिचक्यांचा योग्य परिणाम होऊन इंग्रजांकडे जाणारे अन्न सामुग्री भरून दोन हजार बैलगाड्या, तीन उंट आणि पाच खटारे हरिपंतांनी पकडून आणिले.[२] बोरघाटाच्या माथ्यावर खंडाळे येथे इंग्रजी सैन्याचा मुक्काम झाला होता. त्याचे तोंडावर हरिपंत व होळकर हे कार्ल्याच्या मुक्कामी राहिले होते. त्यांनी इंग्रजांच्या छावणीवर तोफा मारण्याचा क्रम चालविला होता. परंतु फार अंतरावरून ते तोफा मारीत असल्यामुळे इग्रजांचे विशेषसे नुकसान होत नव्हते. फेब्रुवारी १७८१ त परशुरामभाऊ पटवर्धन मराठ्यांच्या कुमकेस पुण्याहून आले. ते हरिपंतांच्या लष्करास जाऊन मिळाले. मग सर्व सरदारांनी मिळून खलबत केले. त्यात असे ठरले की, घाटाखालून इंग्रजास रसद वगैरे पुरवठा दररोज होतो तो बंद केल्याखेरीज इंग्रजास हैराण करण्याचा दुसरा मार्ग नाही. या करिता परशुरामभाऊंनी स्वतःच घाटाखाली जाऊन इंग्रजास मुंबईहून पनवेलच्या रस्त्याने रसद पोचत असते ती बंद करावी. ती मसलत कबूल करून परशुरामभाऊ कोळंब्याच्या घाटाने तळ कोंकणात उतरले. रघुनाथराव कुरुंदवाडकरांच्या स्वारांनी खोपालीपर्यंत जाऊन इंग्रजांचे हजार दीड-हजार बैल भरताडाचे लुटून आणिले. भाऊंच्या स्वारांनीही इंग्रजांचे रसदेवर छापा घालून पाच-सातशे बैल, व तट्टे व उंट, भरताडाचे बैल, तुपाचे बुधले व साखरेच्या गोण्या आणिल्या. पटवर्धनांच्या लुटारु टोळ्यांनी गोडार्ड यास एवढे हैराण केले की, त्याने मुंबईकरास लिहिले की, त्यांची (मराठ्यांची) फौज, यामुळे रसद येऊन पोचत नाही. रसद न आली तर निभाव नाही.[३] पनवेलच्या बाजूने मराठ्यांची घाटाखाली फौज असून कर्नल म्यॉकेच्या हाताखाली इंग्रजी दोन पलटणे धान्य सामग्रीने लादलेले कित्येक हजार बैल घेऊन खोपोलीकडे जात होते. त्यांची व मराठी फौजेची चौक मुकामी दिनांक १६ मार्च रोजी गाठ पडून लढाई जुंपली. इंग्रजांकडील शे-पन्नास जखमी झाले. दहावीस घोडे ठार झाले. या लढाईनंतर पुन्हा दिनांक २९ मार्च १७८१ ला पनवेलीस रसद भरण्याकरिता घाटावरून रिताडाचे बैल घेऊन कर्नल ब्राऊन याचे अधिपत्याखाली तीन पलटणे चालली. त्या फौजेची व पटवर्धनांची गाठ पडून मोठी लढाई झाली. मराठ्यांनी इंग्रजांचे गोट लुटिले व कर्नल ब्राऊन जीव मुठीत घेऊन पनवेलास परत आला.[४]

ब्रिटिशांच्या पोटात मराठ्यांचे नांव काढल्यावर गोळा उठू लागला. पुन्हा रसद आणण्यास घाटाखाली जाण्यास इंग्रज सरदार धजेना. पण पुन्हा

१. कित्ता, ले. २५८५.

२. कित्ता, ले. २६०९.

३. कित्ता, पृ. ३५३८.

४. कित्ता, पृ. ३५४१.

एकदा दिनांक १२ एप्रिल १७८१ रोजी पनवेलीहून घाटाकडे इंग्रजी फौजेनं कूच केले. तीन कोसावर पहिला मुकाम केला. तिथून पुढे रसद घेऊन चालू लागल्यावर आघाडीस पटवर्धन व पिछाडीस होळकर यांनी मार दिल्यामुळे इंग्रज फौज बेजार झाली.[१] पुणे दरबारास इंग्रजांची रसद लुटल्याच्या बातम्या मिळाल्यावर इंग्रज खोपोली मार्गे मुंबईस परतेल अशी शंका घेऊन मराठी टोळकी खोपोलीस ठेवून दिली.[२] पटवर्धनांनी घाटाखालून येणारी रसद बंद केल्यामुळे आता बोरघाटावर रहाणेही गोडार्ड यास अशक्य झाले. दिनांक २० एप्रिल ते २३ एप्रिल १७८१ पर्यंत इंग्रजांच्या पिछाडी व आघाडीवर होळकर व पटवर्धन यांनी सारखा मारा केल्यामुळे गोडार्ड यास आपले पुण्याकडे कूच करणे निरर्थक वाटून त्याने मुंबईस परत जाण्याचे पत्करले.[३] गोडार्डच्या ह्या शिस्तीच्या माघारीत पनवेल येथे कॅ. वॅकर कामास आला[४] आणि इतर बुणगे आणि शिपाई अगणीत मेले. सर्व इंग्रजी फौज पावसाळी कल्याण येथे छावणीस राहिली.[५]

## गुजराथेतील नाकेबंदी :

नानास ह्यावेळी बातमी कळली की, इंग्रजांना सुरतेहून रसद मिळते॰ लगेच नानांनी मराठी सरदारास हुकूम काढून सुरत व मुंबईची नाकेबंदी करण्यास सांगितले.[६] ऑगस्ट १०, १७८१ ला बाबूराव साळुंखे व हरजी नाईक ह्या दोघा सरदारास हुकूम पाठवून इंग्रजास चैन पडू न देण्यास फर्माविले.[७]

यावेळी गोडार्डला हैदरअल्लीने कर्नाटकात इंग्रजांची जी दुर्दशा केली त्याची बातमी आली. हैदरअल्लीने मद्रासवर हल्ला करून इंग्रजांची कशी दाणादाण केली व कोरोमांडलच्या किनाऱ्यावरील इंग्रजांची सर्व ठाणी हैदराने कशी बळकाविली याची हकिगत वर आलीच आहे. हैदरानं सडकून मार दिल्यामुळे मद्रासचा सेनापती सर आयरकूट याने गोडार्डला आत्यंतिक तळमळीचा खलिता पाठवून विनविले की, कसेही करून मराठ्यांशी तह करा आणि हैदराचे पारिपत्यास या.[८] पण गोडार्डला मराठ्यांशी शांततेच्या वाटाघाटी करणे अपमानास्पद वाटू लागले. त्याने सर आयरकूटला लिहिले की, कर्नाटकात इंग्रजांना विजयश्री मिळण्यावरच मराठ्यांशी तहाची बोलणी समान पातळीवर करणे शक्य आहे. मुंबई

१. कित्ता, पृ. ३५४२.
२. पे. द. ३६, ले. ४०८.
३. खरे, ऐ. ले. सं. भाग ७, पृ. ३५४३.
४. पे. द. ३६, ले. ४०९, ४१०.
५. एस. पी. डी. डायरी नं. २२ ऑफ १७८०; पृ. ३२६-३३०, ३७४-३७५.
६. पे. द. ३६, ले. ४१६.
७. कित्ता, ले. ४२६.
८. Forrest, Maratha Series, pp. 445—47.

कौन्सिलही आता लढाईस कंटाळले होते. त्यांनीही मराठ्यांशी ज्या रीतीने तह घडवून आणता येईल तो लवकर आणावा असे कोर्ट ऑफ डायरेक्टर्संना लिहिले.[१]

हेस्टिंग्जच्या सुपीक डोक्याने असे हेरले की, पुणे दरबारला जो विजय प्राप्त होतो आहे तो महादजीच्या मदतीमुळे. तेव्हा महादजीना त्यांच्या मुलुखात लढाईत गुंतून ठेविल्यास ते पुणे दरबारला कोंकण व गुजरातेतील लढायात मदत करू शकणार नाहीत. म्हणजे मराठे तहास कबूल होतील. हेस्टिंग्जच्या हुकूमाप्रमाणे ले. क. कॅमॅक गोहदला येऊन गोहदच्या राजाशी वाटाघाटी करून त्याच्या मदतीने त्याने मराठ्यांच्या ताब्यातील माळवा जिकण्याचे ठरविले. कॅमॅकने हल्ला करून सिप्री किल्ला दिनांक २ फेब्रुवारी १७८१ रोजी घेतला. सिप्री ताब्यात आल्यामुळे इंग्रजांना ग्वाल्हेरशी सरळ संबंध प्रस्थापित करता आले. कॅमॅकला ह्या विजयाने जोर चढून तो सिरोंजवर हल्ला करण्यासाठी सरसावला. महादजींनी ह्यावेळी जोराची तयारी करून इंग्रजांच्या पिछाडीवर व आघाडीवर सतत हल्ले चढविले. रसद तोडली. कॅमॅक १६ फेब्रुवारीला सिरोंजपुढे येऊन बसला. पण मराठ्यांनी रसद तोडल्यामुळे त्याने कलकत्याहून अधिक पलटणींची कुमक मागितली. शिंद्याच्या सैन्याने इंग्रज सेनेला घेरा घालून त्यावर आठ दिवस सतत तोफांचा भडीमार केला. ७ मार्चच्या मध्यरात्री मराठ्यांच्या गराड्यातून गुपचूप निसटून जाण्याचा प्रयत्न इंग्रजांनी केला. दिवसा महादजींनी आपल्या तीस हजार सैनिकांसह कॅमॅकवर चोहीकडून हल्ला चढविला. पण २४ मार्चला कॅमॅकने उलट हल्ला करून मराठ्यांच्या १३ तोफा, २१ उंट व २ हत्ती पकडून आणले. कॅमॅकच्या मदतीस मूर धावून येत होता; त्यास ही बातमी कळल्यावर अधिक धीर आला. इतक्यात कलकत्याहून कॅमॅकला दूर करून त्याने आपली मुख्य सूत्रे मूरच्या हाती द्यावी असा खलिता आला.

कॅमॅकच्या पलटणी दौडत येत असता मूरने गोहदच्या राजाकडून रसद मिळविण्याचा प्रयत्न केला. गोहद राण्याचे वजन त्या प्रांती असल्यामुळे इंग्रजांस कोणीही धान्य देईना. मूरला याबद्दल वाईट वाटले. त्याने कलकत्त्यास लिहून कळविले की, इंग्रजांनी पूर्वी कबूल केल्याप्रमाणे गोहद राण्यास जर ग्वाल्हेरचा किल्ला दिला तरच इंग्रज सैन्यास रसद मिळेल. हेस्टिंग्जसुद्धा त्याच मताचा होता. शेवटी गोहद राण्याच्या स्वाधीन ग्वाल्हेरचा किल्ला इंग्रजांनी केला. तरीसुद्धा गोहद राणा इंग्रजांना मनापासून मदत करीना. ७ जून १७८१ च्या पत्रात मूर गोडार्डला कळवितो की, गोहद राणा आपल्या मागण्या व सूचना ऐकून फक्त हसतो. मदत करण्याचे आश्वासन देतो पण प्रत्यक्षात काहीच करत नाही. मराठ्यांनी त्यास अंतस्थपणे आमच्यापासून फोडला आहे असे वाटते.[२]

---

१. Forrest Selections, Maratha Series, p. 455.

२. Sen, Anglo-Maratha Relations, p. 193.

ह्या सर्व गोष्टींचा परिणाम हेस्टींग्जवर झाला. इंग्लडच्या सिक्रेट कमिटीनेही हेस्टिंग्जने मराठ्यांशी युद्ध चालू ठेविले म्हणून त्यास दोष दिला. त्याचे मित्र त्याच्या ह्या कृत्याचे समर्थन करण्यास असमर्थ ठरले. हेस्टिंग्जला जेव्हा हे समजले तेव्हा त्याने मराठ्यांशी सलूख घडवून आणण्यासाठी मुधोजी भोसले नागपुरकर व त्यांचा दिवाण दिवाकर यास मध्यस्ती करण्यास सांगितले.[१] त्याचवेळी सिक्रेट कौन्सिलनेही ठराव करून ११ जून १७८१ च्या पत्राने गोडार्डला मराठ्यांशी सलूख घडवून आणण्यास फर्माविले.[२] मुधोजी पुण्यास आल्यास त्याची गाठ घ्यावी व त्याच्यातर्फे बोलणी करावी. मराठ्यांनी वसई मागितल्यास ती त्यांना परत करावी. मराठे इंग्रजास हैदराशी लढण्यास मदत करत असतील तर पहावे. हे करण्यास ते कबूल न झाल्यास हैदर इंग्रज झगड्यात त्यांनी कोणाचीही बाजू न घेता स्तब्ध रहाण्याचे कबूल करावे. पाघोबांच्या जिवास धोका पोहचवू नये. त्यास त्यांच्या स्वाधीन करावे. रण त्यांच्या (राघोबांच्या) चरितार्थाकरिता त्यास जहागिर देण्याचे आश्वासन घ्यावे. अहमदाबाद व ग्वाल्हेर किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन करू नये.[३]

ह्या सूचना गोडार्ड यास ऑगस्ट १७८१ त मिळाल्या. तत्पूर्वी त्याने इंग्रजी पलटणे वाढवून सुरत-खंबायत नवाबांच्या मदतीने मराठ्यांशी युद्ध करण्याचे बेत केले होते. पण तहाच्या सूचना आल्यावर ते बेत त्यास मागे घ्यावे लागले.

मद्रासकर इंग्रजांनाही मराठ्यांशी तह करणे इष्ट वाटू लागले. कारण हैदराने मद्रासवर चढाई करून आसपासचा मुलूख जाळून लुटून फस्त केला. इतकेच नव्हे तर हैदरने इंग्रजांच्या कर्नल बेलीच्या हाताखालील होळीचा फन्ना उडवून अर्काट काबीज केले. तेव्हा मद्रासकर इंग्रजांनी आपला दूत पुणे दरबारास तह करण्यासाठी पाठविला.[४]

माळव्यात कर्नल मूर शिंद्यांशी लढाई देत होता. महादजी शिंदे त्याजबरोबर गनिमी काव्याने लढून त्यास जेरीस आणित होते. त्यामुळे त्यास मराठ्यांच्या ताब्यातील ठाणी व किल्ले घेणे जमले नाही. पावसाळा सुरू होताच कर्नल मूरने आपली छावणी सिप्री कोलारचे दरम्यान शेसईत्र माळव्यातच केली. शिंदेही लढाईच्या इराद्याने त्याच्यासमोर छावणी देऊन राहिले. इतक्यात कर्नल मूर ह्यास कलकत्तेकरांकडून महादजी शिंदे यांजतर्फे तह घडवून आणण्याच्या सूचना मिळाल्या. ह्या सूचना हेस्टिंग्जने गोडार्डला पुणे दरबारशी वाटाघाटी करण्यात यश येत नाही असे पाहून केल्या. त्याप्रमाणे मूरने महादजी शिंद्यांशी बोलणी केली.[५] त्यात असे ठरले की, कर्नल मूर

१. CPC. VI, L. 159.
२. Foreign Deptt. *See* Con. No. 5.
३. Sen-Anglo Maratha Relations, p. 195.
४. म. शि. का. प. ले. १९६.
५. म. शि. यांची कागदपत्रें, ले. १६९.

याने आपले सैन्य घेऊन यमुना उतरून अंतर्वेदीत परत जावे, मुंबई सरकारास लिहून त्यांजकडून दक्षिणेतील लढाई बंद करवावी. उलटपक्षी महादजी शिंद्यांनी स्वतः लढाई बंद करून शिवाय पुण्यास नाना फडणवीस यांस लिहून त्याजकडूनही इंग्रजांशी युद्ध करण्याचे बंद करवावे. गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जकडून शिंदे यांजकडे तह ठरविण्यास वकील येईल तेव्हा शिंदे यांनी मध्यस्थीची खटपट करून पेशवे व ईस्ट इंडिया कंपनी यामध्ये तहाचा पक्का ठराव घडवून आणावा. इंग्रजांनी यमुनेच्या दक्षिणेस महादजीचा जो मुलूख जिंकला असेल तो त्यास परत द्यावा. अशा प्रकारे कर्नल मूर बरोबर शिंद्यांनी तह करून मुख्य तह घडवून आणण्यासाठी वाटाघाटी सुरू केल्या.

वॉरन हेस्टिंग्जने दिनांक ४ नोव्हेंबर १७८१ रोजी इंग्रज वकील डेव्हीड अँडरसन यास तहाची लेखी समजूत दिली आणि त्यास महादजी शिंद्यांमार्फत पुणे दरबारशी तह ठरविण्याचा संपूर्ण अधिकार दिला. तसेच हेस्टिंग्जने मुंबईचे गव्हर्नरास हुकूम दिला की, मराठ्यांशी युद्ध बंद ठेवावे.[1]

हेस्टिंग्जने विचार केला की, स्वतः महादजीची भेट घेऊन ह्या मुत्सद्दी योध्दयास इंग्रजांचे बाजूस वळवून घ्यावे व त्याची मदत हैदराचे पारिपत्य करण्यासाठी घ्यावी.

हेस्टिंग्ज ह्यावेळी कलकत्त्यास होता. महादजी बुंदेलखंडात होता. आपल्या विचारास मूर्त स्वरूप आणण्यासाठी स्वतः बुंदेलखंडात महादजीच्या छावणीस भेट देण्याचे त्याच्या जिवावर आले. त्याने आपल्या वकिलास सूचना दिल्या की, महादजीची व आपली भेट दुआबात फरुकाबादेजवळ घडवून आणावी. महादजीससुद्धा हेस्टिंग्जची भेट घेणे कुठे पसंत होते? त्यांनी नाना फडणिसांच्या विचारे हेस्टिंग्जची भेट घेणे पद्धतशीरपणे टाळले. १४ डिसेंबर १७८१ त पळून आलेला काशीचा राजा चेतसिंग महादजीच्या आश्रयास आला. आठवड्यानंतर महादजीस गव्हर्नर जनरलकडून कळले की, त्याचा डेविड अन्डरसन नांवाचा खास दूत आपल्याला भेटावयास येत आहे. अन्डरसन महादजीच्या छावणीत पोहचण्यापूर्वी ब्रिटिश वकीलाने महादजींना सांगितले की, इंग्रजांचा शत्रू चेतसिंग यास तुम्ही काढून लावावे. महादजींनी शांतपणे उत्तर दिले की, चेतसिंग आमचा आश्रित आहे. त्यास दूर करणार नाही. चेतसिंग प्रकरणी रदबदली करण्यास जर गव्हर्नर जनरल चा दूत येत असेल तर त्याने भेट न घेता आल्यामार्गे परत जावे. ह्या चोख उत्तराचा परिणाम होऊन महादजीच्या गोटात डाविड अन्डरसन २३ डिसेंबर १७८१ रोजी आला.

हेस्टिंग्जला अन्डरसनवर सोपविलेली कामगिरी तो आपल्या मनाप्रमाणे पार पाडील याची खात्री नव्हती. त्याला नाना फडणिस व हैदर हे दोघेही ह्या तहाच्या वाटाघाटी फिसकटून लावतील अशी सार्थ भीती वाटत होती. म्हणून त्याने आपल्याला सतत मदत करण्यास तयार असलेले नागपुरकरांचे

१. म. शि. का. प. ले. १७९, १९२, १९६.

वकील वेणीराम व विश्वंभट ह्यांना बोलावून घेतले. त्याजला १ लाख रुपये रोख व २५ हजाराची जहागिरी देऊ केली आणि त्यांना पुणे दरबारशी तह घडवून आणण्याचे नागपुरकर मुधोजीस सांगण्याकरिता नागपुरास रवाना केले. ह्या दोन्ही वकिलांच्या कामगिरीकडे नजर राखण्यासाठी हेस्टिंग्जने आपला खास एजंट चापमन यास नागपुरास पाठविले. ह्यामुळे आणखीनच गोंधळात भर पडली. अशा रीतीने बनारस, कलकत्ता, मद्रास, मुंबई व पुणे ह्या सर्व ठिकाणी तहाची बोलणी सुरू करण्यात आली. अन्डरसन हुशार वकील होता. त्याने १७८२ च्या पूर्वार्धात मोठ्या चातुर्याने महादजीकडे आपला जम बसविला. तहाची सर्व बोलणी पुण्यास गोडार्डचा हस्तक बादरस्टोन होता त्यानेच करावी असा नानाचा प्रयत्न सुरू झाला. सर्व मराठी मुत्सद्यांनी तसेच हैदर व निजाम यांनी पुण्यास सवाई माधवरावाच्या लग्ना-निमित्त यावे आणि एकत्र बसून इंग्रजांशी तह करावा अशी नानांची मनिषा. हैदरअल्ली नानास पत्र पाठवून इंग्रजांशी एकटचान तह करू नका असे सांगत होता. त्याकरिता सवाई माधवरावांच्या लग्न सोहळ्याच्या निमित्ताने सर्वांस एकत्र बोलावून मराठी दौलतीचा दिमाख व आब मराठ्यांच्या हित-चिंतकास व शत्रूस दाखवावा असा नानांचा विचार होता. हा डाव खरोखरच चांगला होता. पण ह्याची दुसरी बाजू महादजीने नानांच्या लक्षात आणून दिली. जोपर्यंत तह घडून त्यावर सह्या झालेल्या नाहीत तोपर्यंत निरनिराळ्या आघाड्यांवरील मराठी सैन्य काढून घेणे उचीत नाही. ब्रिटिशांनी अलाहाबादला आपला पाय पक्का रोविला असून मराठी फौजा उत्तरेतून काढून घेतल्यास त्या भागात त्यांच्या अतिक्रमणास आळा घालणारा एकही नेटीव्ह सत्ताधारी समर्थ नाही. तसेच वाटाघाटी चालू असता वारंवार वॉरन हेस्टिंग्जचा विचार त्याच्या वकीलास घ्यावा लागेल. हे करणे हेस्टिंग्ज बनारसला असल्यामुळे त्याच्या वकीलास सहज सुलभ आहे. शिवाय लढाई अथवा तह करणे शेवटी गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जच ठरविणार आहे. इथेच बसून आपण मराठ्यांच्या हिताच्या अटी इंग्रजांकडून मान्य करून घेऊ. अशा स्थितीत आपण उत्तरेतून पुण्यास येत नाही असे महादजीने नानास कळविले. शिवाय हैदरअल्लीसुद्धा इंग्रजास कर्नाटक मोकळे सोडून पुण्यास येणार नाही. महादजीचे हे म्हणणे नानास पटून तहाची सर्व सूत्रे महादजींच्याच हाती राहिली.

तह होण्याची भूमिका लवकर तयार झाली. पण तहाची बोलणी होऊन तह घडून येण्यास विलंब लागला. कारण नाना आणि महादजीच्या पत्र व्यवहारानेच ह्या गोष्टी सिद्धीस जाणार होत्या. मद्रासकर इंग्रज व गोडार्ड यांनी पाठविलेले दूत पुण्याहून परत आले व तहाची बोलणी करण्याचे काम महादजींनाच करावे लागले.

नानांनी महादजीस कळविले होते की, इंग्रजांनी मराठ्यांपासून जितका मुलूख घेतला होता तितका सर्व त्यांचा त्यास परत द्यावा.

हेस्टिंग्जने पहिल्या प्रथम आपला वकील अन्डरसन याजतर्फे तहाच्या खालील अटी महादजीकडे पाठविल्या.

(१) महादजी शिंदे यांनी इंग्रज सरकार व पुणे दरबार यामधे तह घडवून आणण्यासाठीं मध्यस्थी करावी. तसेच इंग्रज व हैदर यांचा तह घडवून आणवावा.

(२) इंग्रजांनी मुंबई व गुजरातमधील जिंकलेला प्रदेश त्याजकडे राहू द्यावा.

(३) राघोबादादास योग्य ती जहागिर मराठ्यांनी द्यावी.

(४) ह्या तहामुळे इंग्रजांनी नागपूरकर, बडोदा गायकवाड व हैदराबादचा निजाम यांजबरोबर केलेल्या तहास बाधा येऊ नये. महादजींनी आपल्या मनाप्रमाणे गोहदच्या राण्याशी व्यवहार करावा.

(५) मराठ्यांनी युरोपातील इतर राष्ट्रातील नागरिकांना नोकरीस ठेवू नये.

वरील मुद्दे आणखी पुणे दरबारने उपस्थित केलेले मुद्दे, नाना फडणिसांनी त्यावर घेतलेले आढेवेढे, यात जानेवारी १७८२ ते एप्रिलपर्यंत चार महिन्याचा काल गेला. इंग्रजांनी जिंकून घेतलेला मराठ्यांचा सर्व मुलूख परत करावा ह्या अटीवरच पुष्कळशी चर्चा झाली व लांबली. महादजींनी ठामपणे सांगितले की, मराठ्यांची इंग्रजांकडील सर्व स्थळे परत मिळालीच पाहिजेत. या चार महिन्याच्या वाटाघाटीत अन्डरसन आणि महादजी यांची मैत्री खूपच वाढली. सबंध दिवसभर विचारांची देवाणघेवाण, चर्चेची खडाजंगी होई. पण रात्रीस ह्या दोघा उमरावांमध्ये दिलजमाईच्या मेजवान्या होत. हेस्टिंग्जने अन्डरसन वकीलास बोलणी करण्यास पूर्ण स्वातंत्र्य देऊन स्वतः हेस्टिंग्ज कलकत्त्यास फेब्रुवारी १७८२ त गेला. ३ डिसेंबर सन १७८१ पासून ते १७ मे पर्यंत अन्डरसन व महादजी यांच्या तहाबद्दलच्या वाटाघाटी चालल्या व शेवटच्या दिवशी तह कायम झाला. महादजी यावेळी गोहदकर राण्यावर मोहीम चालवत होते म्हणून त्यांचा मुक्काम चिन्होर, नूनकी सराई, सालबाई वगैरे ठिकाणी झाल्याचा उल्लेख येतो. दिनांक २९ एप्रिल रोजी शिंद्यांचा मुक्काम सालबाईस असून गोहदकरांकडून ग्वाल्हेर किल्ला परत घेण्याचे उद्योगात असल्याचे दिसतात.

अन्डरसन येताच त्याजपासून इंग्रजांच्या तहाच्या अटी घेऊन त्या रामजी पाटील व सदाशिव दिनकर याजबरोबर महादजीने पुण्यास नानाकडे रवाना केल्या. नाना फडणिसांनी लगोलग त्याजवर आपले मुद्दे घालून मसुदे परत पाठविले ते घेऊन मार्चचे आरंभी मंडळी परत महादजीकडे आली.

• • •

दिल्लीकडील राजकारणे

(सन १७८३–१७८८)

## कालसूची

| | |
|---|---|
| १७७२ . . . . . | मराठ्यांच्या सहाय्याने दिल्लीत प्रवेश करून शहा अलम तक्तावर बसतो. |
| १७८२, एप्रिल ६ . . | वजीर नजफखानाचा मृत्यू. |
| १७८२, एप्रिल ६ . . | शहा अलम बादशहाचे महादजी शिंदे यांस दिल्लीचा कारभार हाती घेण्यासाठी बोलावणे. |
| १७८२, मे. . . . | पहिले इंग्रज-मराठे युद्ध समाप्त, सालबाईचा तह. |
| १७८२ . . . . | अफरासियाबखान ह्यास वजिरी प्राप्ती. |
| १७८३, फेब्रुवारी २५ . | अफरासियाबखान इंग्रज वकील मेजर ब्राऊन यास भेटतो. |
| १७८३ . . . . | बादशहाच्या सांगण्यावरून हिंगणे वकील ग्वाल्हेर येथे शिंदे याजकडे जातो. |
| १७८३, जून . . . | महादजी शिंदे यांचे ग्वाल्हेरहून आग्र्याकडे प्रयाण. |
| १७८३, जून २७ . . | शहाजादा जवानबख्त व महादजी शिंदे यांची भेट. |
| १७८३, जुलै . . . | महादजी शिंदे ग्वाल्हेरचा किल्ला गोहदच्या राण्याकडून काबीज करतात. |
| १७८३, सप्टेंबर २३ . . | मिर्झा शफी यास हमदानी ठार मारतो. |
| १७८३, ऑक्टोबर २५ . | अफरासियाबखान यास बादशहाकडून मीरबक्षी पद मिळते. |
| १७८४, फेब्रुवारी . . | गोहद राणा महादजी शिंदे यास शरण जातो, गोहदवर मराठ्यांचा ताबा. |
| १७८४, फेब्रुवारी ५ . . | बादशहा व वॉरन हेस्टिंग्ज यांची भेट. |
| १७८४, मार्च १७ . . | वॉरन हेस्टिंग्ज कलकत्त्याहून लखनौस येतो. |
| १७८४, एप्रिल १४ . . | जवान बख्त यास दिल्लीहून पळून जाण्यास ब्राऊनची फूस |
| १७८४, मे. . . . | जवान बख्ताचे लखनौस वजीर व वॉरन हेस्टिंग्जकडून स्वागत. |
| १७८४, ऑक्टोबर २४ . | महादजी शिंदे व अफरासियाबखान यांची फत्तेपूर शिक्रीजवळ भेट. |
| १७८४, नोव्हेंबर २ . . | अफरासियाबखानाचा खून. |
| १७८४, नोव्हेंबर ३ . . | जैबुल आबादीखान अफरासियाबखानाचे डेऱ्यात जातो. |

| | |
|---|---|
| १७८४, नोव्हेंबर ३ . . | महादजी शिंदे कारभारी मंडळींच्या सल्ल्याने हमदानीचे पारिपत्य करण्याचे ठरवितो. |
| १७८४, नोव्हेंबर १३. . | बादशहा आपला मुलगा मिर्झा अकबरशहा यास महादजी शिंदे यांना सामोरे जाण्याकरिता पाठवितो. |
| १७८४, नोव्हेंबर १३. . | शहाजाद्यासमागमे महादजी शिंदे बादशहाच्या भेटीस येतात. |
| १७८४, नोव्हेंबर ३०. . | महादजी शिंदे, बादशहा, इंग्रजांचा वकील अँडरसन व ब्राऊन यांच्यासह दिल्ली सोडतात. |
| १७८४, डिसेंबर १ . . | महादजी शिंदे यांचा लवाजम्यासह पिंगोच्याजवळ मुक्काम. |
| १७८४, डिसेंबर ३ . . | महादजी शिंदे यांचा हेलेना येथे मुक्काम. |
| १७८४, डिसेंबर ८ . . | वकील मुतालकी व मीर बक्षीगिरी पदे मिळाल्याचे महादजी शिंदे पेशव्यास कळवितात. |
| १७८४, डिसेंबर ११. . | बादशहाची फौज माहेवा येथे. |
| १७८४, डिसेंबर २८. . | महादजी शिंदे आपला मोर्चा डीगकडे वळवितात |
| १७८४, डिसेंबर . . | महादजी शिंदे याजवर ८० लाख रुपये कर्जाचा बोजा पडतो. |
| १७८५, जानेवारी ३. . | डीगच्या किल्यासमोर महादजी शिंदे यांच्या सैन्याचा तळ |
| १७८५, जानेवारी १६ . | डीग व आग्र्याचे किल्ले रायाजी पाटील ताब्यात घेतो. |
| १७८५, जानेवारी १९ . | अंबाजी इंगळे यांची दिल्लीच्या बंदोबस्ताकरिता अखत्यार म्हणून नेमणूक. |
| १७८५, फेब्रुवारी ११. . | अंबाजी इंगळे याजकडे दिल्लीची सुभेदारी. |
| १७८५, मार्च २७ . . | अंबाजी इंगळे यांच्याकडे समझोत्यासाठी शीख सरदार येतात. |
| १७८५, मार्च . . . | मराठ्यांच्या ताब्यातील गुर्जर छबाडे हे प्रांत खेची राजा बळजबरीने घेतो. |
| १७८५, एप्रिल १० . . | महादजी शिंदे व शीख सरदार यांचा मथुरा येथे करार. |
| १७८५, जून १०. . . | महादजी शिंदे यांचा शीख सरदारांना निरोप. |
| १७८५, जुलै . . . | अलीगड महदजी शिंदे यांच्या ताब्यात दिल्याचा देखावा |
| १७८५, ऑगस्ट २ . . | मराठे गुर्जर छबाडे हे प्रांत खेच्यापासून जिंकून घेतात. |
| १७८५, ऑक्टोबर १७ . | मथुरा येथे बादशहासह महादजी शिंदे यांचा मुक्काम. |
| १७८५, नोव्हेंबर २०. . | अलीगड मराठ्यांच्या ताब्यात, अंतरवेदीत मराठे अंमल बसवितात. |
| १७८५, नोव्हेंबर २०. . | जहांगीरखान अलीगडचा किल्ला महादजी शिंदे यांच्या ताब्यात देतो. |
| १७८६, फेब्रुवारी . . | मराठे, खेची राज्य खालसा करतात. |
| १७८६, जानेवारी-मार्च . | दिल्ली व आग्रा हे प्रांत महादजी शिंदे यांच्या ताब्यात येतात. |

| | |
|---|---|
| १७८६, एप्रिल . . . | देवजी गवळी याची उमरावगीरचे पारिपत्य करण्यासाठी महादजी शिंदे रवानगी करतात. |
| १७८६, मे . . . | जयपूरकर राणा प्रताप महादजी शिंदे याजकडे खंडणीचा भरणा करतो. |
| १७८६, जून २२ . . | बादशहा दिल्लीस परततो. |
| १७८७, मार्च १० . . | बादशहाचा राज्यरोहण दिवस डीग येथे साजरा होतो. |
| १७८७, मार्च १६ . . | महादजी शिंदे स्वतः जयपुरावर चालून जातात. |
| १७८७, मे ६ . . . | झुल्फिकार अलीखान व मनसूर अलीखान जयपूरच्या राण्यास जाऊन मिळतात. |
| १७८७, मे २५ . . . | महमद बेग हमदानी मराठ्यांचे पारिपत्य करण्यासाठी जयपूर राण्यास मिळतो. |
| १७८७, जून . . . | मराठी फौजा जयपूर राज्यातील गढ्या घेण्यास सुरुवात करतात. |
| १७८७, जुलै २८ . . | मराठे व राजपूत यांची लालसोटजवळ लढाई. |
| १७८७, ऑगस्ट १ . . | महादजी शिंदे फौजेसह डीगकडे परततात. |
| १७८७, सप्टेंबर. . . | अलवारचे रावराजे व जयपूरकर यांच्या मुलुखात महादजी शिंदे फौज पाठवितात. |
| १७८७, सप्टेंबर ५ . . | गुलाम कादर रोहिल्यांसह दिल्लीस येऊन दिल्लीचा ताबा घेतो. |
| १७८७, सप्टेंबर ८ . . | महादजी शिंदे यांच्या मदतीसाठी तुकोजी होळकर व अलीबहाद्दर यांची रवानगी. |
| १७८७, नोव्हेंबर . . | लाडोजी देशमुख व शहा निजामुद्दीन यांचे दिल्लीहून पलायन. |
| १७८७, डिसेंबर ८ . . | शहजादा जवानबख्त यास बादशहा दिल्लीस बोलावितो. |
| १७८८, एप्रिल २१ . . | किरोली येथे गुलाम कादर व इस्माईल बेग यांजबरोबर भरतपूरच्या जाटाची लढाई. |
| १७८८, मे १ . . . | मराठे व जाट यांची भरतपूरजवळ इस्माईल बेगबरोबर लढाई. |
| १७८८, मे १८ . . . | इस्माईल बेग व गुलाम कादर डीगच्या किल्ल्यातून पळून जातात. |
| १७८८, मे २५ . . . | गुलाम कादर व इस्माईल बेग यांचा आग्र्याबाहेर सैन्यासह तळ. |
| १७८८, जून १५ . . | गुलाम कादर इस्माईल बेगला सोडून फौजेसह यमुना पार होतो. |
| १७८८, जून १८ . . | मराठ्यांचे इस्माईल बेगबरोबर युद्ध. |
| १७८८, जून १८ . . | बागडेहराजवळ झालेल्या लढाईत महादजी शिंदे यांचा विजय. |
| १७८८, जून-जुलै . . | महादजी शिंदे माळवा व राजस्थानातील परिस्थिती आटोक्यात आणतात. |
| १७८८, जुलै ४. . . | महादजी शिंदे यांचा मथुरेस मुक्काम. |

| | |
|---|---|
| १७८८, जुलै २९ . . | गुलाम कादर व इस्माईल बेग यांचा दिल्लीच्या किल्ल्यात प्रवेश. |
| १७८८, ऑक्टोबर २ . | इस्माईल बेग व गुलाम कादर यांचा दिल्ली किल्ल्यात मुक्काम. |
| १७८८, ऑक्टोबर ११ . | मराठी फौजांचा दिल्ली किल्ल्यात प्रवेश. |
| १७८८, ऑक्टोबर २२ . | मराठे सरदार बादशहा शहा अली यास भेटतात. |
| १७८८, डिसेंबर १७ . . | गुलाम कादर व मराठे यांची लढाई. |
| १७८८, डिसेंबर १९ . . | गुलाम कादर यास अटक व त्याची महादजी शिंदे यांजकडे रवानगी. |
| १७८९, मार्च ३ . . | गुलाम कादर यास ठार करण्यात येते. |
| १७९०, जून २० . . | मराठ्यांचा रजपूत व इस्माईल बेग यांच्या फौजेवर मारा. |
| १७९०, ऑगस्ट २८ . . | रजपुतांचा कायमचा निकाल लावण्यासाठी महादजी शिंदे डेरे दाखल. |
| १७९०, सप्टेंबर ११ . . | महादजी शिंदे यांचे राठोडबरोबर युद्ध. |
| १७९१, जानेवारी ६ . . | जोधपूरचा राजा बिजेसिंग याचा मराठ्यांबरोबर तह. |

# १८

## दिल्लीकडील राजकारणे

(सन १७८३–१७८८)

बादशाही दरबारात बखेडा — नजबखान आणि महादजी — बोनेट डि बॉईनच्या सहाय्याने कवाइती फौजेचा वापर — इंग्रजांची दिल्लीतील कारवाई — महादजीस बादशहाकडून वकील-इ-मुतालकी प्राप्त—दिल्लीचा कारभार महादजी शिंद्यांच्या हातात — महादजींचे राजपुतांशीं युद्ध — लालसोटचा संग्राम–महादजी गेलेले वर्चस्व परत मिळवतात — बादशहा गुलाम कादरच्या जाळ्यात — गुलाम कादरकडून बादशहाचा छळ.

माधवराव पेशवे यांच्या कारकिर्दीत महादजी शिंदे, तुकोजीराव होळकर, विसाजीपंत बिनीवाले वगैरे सरदारांची मदत घेऊन दिल्लीचा बादशहा शहाअलम दिल्लीस येऊन सन १७७२ मध्ये तख्तनशीन झाला. त्यानंतर नारायणराव पेशव्यांचा खून, दादासाहेबांचे राजकारण, बारभाईचे कारस्थान, दादासाहेबास हाताशी धरून इंग्रजांनी गुजरात, माळवा व कोंकण ह्या ठिकाणी मराठ्यांवर केलेला उठाव, त्यामुळे सालबाईच्या तहापर्यंत म्हणजे इ. स. १७७२ ते १७८३ पर्यंत मराठ्यास दिल्लीच्या राजकारणात लक्ष देण्यास फुरसत सापडली नाही. ह्या काळात मिर्झा नजफखान हा बादशहाचा वजीर होता. या वजिरास अयोध्येचा नबाब व इंग्रज यांचा पाठिंबा होता. इंग्रज-मराठे युद्ध संपल्यावर इंग्रज प्रबळ असल्याचे एतद्देशीय सत्ताधीशास कळून चुकले. इंग्रज हे व्यापारी निमित्ताने हिंदुस्थानात येऊन येथील एक सत्ताधीश झाले. त्याचे कारण त्यांची कवायती फौज होय. हे एतद्देशियांनी हेरले आणि आपल्या फौजा कवायती असाव्यात म्हणून त्यांनी युरोपियन साहसी सेनापती आपल्या नोकरीस ठेवले. मिर्झा नजफखानानेही हाच कित्ता गिरवला. मिर्झा नजफखान हा इराणच्या राजवंशातील शूर उमराव होता. त्याने मराठ्यांशी मैत्री संपादन करून मोगल बादशाहीचे नष्ट झालेले वैभव पुन्हा प्राप्त करण्यासाठी शीख, जाट, रोहिले वगैरे बादशहाचे शत्रूंचा मोठ्या धडाडीने पराभव केला. नजफखानास ब्रिटिशांचा सहवास लाभल्यामुळे कवायती फौजेच्या शिक्षणाकडे तो आकृष्ट झाला. ऐन उमेदीत इंग्रजी फौजांशी सामने देऊन नंतर त्याने त्याजशी हातमिळवणी करून कवायती शिक्षण आत्मसात केले होते. त्याने आपले सर्व लक्ष बंदुकधारी सैनिक तयार करण्यासाठी वेचले. दहा हजार बंदुकधारी सैनिक युरोपियन तंत्राने तयार केलेले त्याच्या पदरी होते; तसेच वजनदार तोफाही होत्या आणि ह्यांना मदत म्हणून नामवंत घोडेस्वारांची पलटणही त्याने तयार केली होती. आपल्या सैनिकांस कवायती शिक्षण मिळावे म्हणून त्याने बादशाही सेवेत काऊंट डी मोडॅवे व रेने मॅडेक

नांवाचे फ्रेंच व वॉल्टर रेनहार्ट उपनांव समरू नांवाचा जर्मन ह्या सेनानीस प्रवेश देऊन त्यांचा उपयोग करून घेतला. शिवाय आपल्या मर्जीतील हुशार अशा मोगल सेनानींनाही त्याने बादशाही सेवेत घेतले होते. त्यापैकी अफ्रासियाबखान नांवाचा सरदार त्याचा मानलेला पुत्र, मिर्झा शफी हा त्याच्या बहिणीचा मुलगा आणि महम्मद बेग हमदानी, आग्र्याचा किल्लेदार हे होत. त्यावेळी अब्दुल अहमदखान नांवाचा एक सरदार बादशहाजवळ नायब वजीराचे काम करीत होता. बादशहाची अहमदखानावर पुष्कळ मर्जी होती आणि अहमदखानाचे व नजफखानाचे वाकडे होते. त्यामुळे बादशहा शहाअलम हा आपला वजीर नजफखान याच्या वर्चस्वास कंटाळला. शहाअलम बादशहा हा मराठ्यांच्या मर्जीने रहाण्यास उत्सुक होता आणि वारंवार तो बोलून दाखवी की, महादजी शिंदे किंवा हरिपंत फडके यासारखा एक फौजबंद मराठा सरदार सतत दिल्लीस रहावा आणि मराठ्यांनी बादशहास दरमहा २ लक्ष रुपये देऊन करोडीची स्थळे हस्तगत करावी. ही परिस्थिती सन १७८० मध्ये होती. परंतु यावेळी मराठे व इंग्रज यामध्ये नेकीने युद्ध चालू असल्यामुळे मराठ्यास हे कार्य पत्करणे शक्य नव्हते. दिनांक ६ एप्रिल १७८२ रोजी नजफखान मृत्यू पावला. आणि पुढील महिन्यात सालबाईचा तह पुरा होऊन पहिले इंग्रज मराठे युद्ध थांबले. तेव्हा महादजी शिंदे यांना दिल्लीच्या राजकारणाकडे लक्ष पुरवण्यास अवसर मिळाला. बादशहास सन १७७२ त दिल्लीस आणून तख्तनशीन केल्यावेळेपासून महादजी शिंद्यांच्या मनात दिल्लीचा कारभार आपल्या ताब्यात घ्यावा असे होते पण वर सांगितल्याप्रमाणे सालबाई तहापर्यंत महादजींना दिल्लीच्या राजकारणाकड पहाण्यास फुरसत नव्हती. ह्या संधीचा फायदा मिर्झा नजफखान याने घेतला. पण मिर्झा नजफ ६ एप्रिल १७८२ मध्ये निवर्तल्यानंतर दिल्लीच्या बादशहाने महादजीस दिल्लीचा कारभार हाती घेण्याची विनंती केली. बादशहा शहाअलम महादजींना दिल्लीस आणण्यास एवढा उतावीळ झाला की, त्याने त्यावेळी दिल्ली दरबारी असलेले मराठ्यांचे वकील हिंगणे यास महादजीस दिल्लीस येण्यास आवर्जून लिहिण्यास सांगितले. त्याप्रमाणे हिंगणे यांनी पाटील बावांस लिहिले, "ही वेळ अशी आहे की, इकडे येण्याने तुम्हाला कीर्तीच नव्हे तर पैसाही मिळेल."

मिर्झा नजफच्या पश्चात कारभारासंबंधी वाटाघाटी करण्यासाठी मिर्झा शफी अफरासियाबखान आणि आग्र्याचा किल्लेदार महंमदबेग हमदानी हे सर्व एकत्र आले आणि त्यांनी ठरविले की, मिर्झा शफीने वजिरीचा कारभार करावा, परंतु महंमदबेग हमदानीचे व इतर सरदारांचे मत विरुद्ध पडले. तेव्हा मिर्झा शफीने आपला वकील अनूपगीर गोसावी यास शिंद्यांचे छावणीस पाठविले. हे समजून घेण्यासाठी दिल्ली दरबारात मराठ्यास अनुकूल-प्रतिकूल कोण कोण होते हे पाहिले पाहिजे.

नजफखान मरण पावल्यावर दिल्ली दरबारांत जी कर्तबगार मंडळी होती त्यांचे संबंध मराठ्यांशी कसे होते ते पाहू. नजफखानानंतर त्याचा दत्तक

पुत्र अफरासिबखान ह्यास वजिरीची वस्त्रे मिळाली. हा मराठ्यांच्या बाजूचा होता. दुसरा सरदार मिर्झा शफी. हा नजीवखानाचा पुतण्या व सरदार नजब कुलीखान हे दोघेही मराठ्यास अनुकूल होते. अनूपगीर गोसावी मराठ्यांचा पक्षपाती होता. या उलट मराठ्यांचा द्वेष करणारे जे होते त्यात आग्र्याचा सुभेदार महमद बेग हमदानी, इस्माईलबेग व गोहदचा जाट अग्रभागी होते. गोहदच्या जाटास हमदानी व इस्माईलबेग यांची फूस होती. आपल्यापैकी काहींचा मराठ्यास असलेला विरोध लक्षात घेऊन आपली बाजू बळकट करण्यासाठी अफरासियाबने इंग्रजांशी संधान बांधण्याचे ठरविले. त्यान इंग्रजांचा वकील मेजर ब्राऊन याची दिनांक २५ फेब्रुवारी १७८३ ला भेट घेतली [१]

इंग्रजांशी मैत्रीचे संबध जोडण्यास अफ्रासियाबखान फारच उत्सुक होता असे हेस्टिंग्ज लिहितो.[२] त्याने आपली इंग्रज बादशहाशी एकनिष्ठता दर्शवून इंग्रजांशी मैत्री करण्याचा बेत ब्राऊनकडे बोलून दाखविला.[३] ब्राऊनची अफ्रासियाबबद्दलची खात्री झाल्यावर अफ्रासियाबरोबर कसे वागावयाचे याच्या सूचना गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जने ब्राऊन यास दिल्या होत्या. आपणास मदत करण्यास इंग्रजही उत्सुक आहेत हेही त्याच्या ध्यानी आले. पण इतक्यात पाटील बावांचा हस्तक हिंमत बहादूर गोसावी हा मिर्झा शफीचा वकील म्हणून पाटील बावांचे भेटीस आग्र्यास गेला. तो पाटील बावांच्या छावणीत चार महिने राहिला. त्याने पाटीलबावांशी राजकारण लाविले की, "पाटील बावांचा आणि पातशहाचा घरोबा व नजफखान वजिरी करीत होते तेही भाऊपणादाखलच होते. याजकरिता मिर्झा शफी, नजफखानाचे भाचे यांचे मानस असे आहे की, ज्याप्रमाणे पहिलेपासून दक्षिणी सरदार यांचा घरोबा आहे त्याप्रमाणे पुढे चालावे आणि पातशाही वजिरी आपले नांवे करून द्यावी.[४]" याप्रमाणे पाटीलबावा आणि मिर्झा शफी यांचा पत्रव्यवहार चालला होता. शेवटी दोघांच्या भेटी होण्याचा निश्चय होऊन चंबळ नदीपार अटेरसमीप दिनांक ९ जुलै १७८२ रोजी पाटीलबावा व मिर्झा शफी यांची भेट झाली. दोघांचा पगडीबंद भाऊपणा झाला. ही गोष्ट महमदबेग हमदानीस आवडली नाही. अशा प्रकारे कारभाऱ्यात दुफळी माजली. तेव्हा सन १७८३ च्या उन्हाळ्यात बादशहाने हिंगणे वकिलास ग्वाल्हेरास शिंद्यांकडे पाठविले. हिंगणे यांनी स्वतः सर्व परिस्थिती पाटील बावास समजावून सांगितली आणि दिल्लीच्या कारभाराची सर्व सूत्रे विलंब न लाविता लवकरात लवकर आपले हाती घेण्यास मन वळविले.

महादजीबावा स्वतःच्या मार्गातील अडचणी जाणीत होते. ह्या कृत्यात पुणे दरबाराकडून पैसा व सैन्य यांचा पुरवठा होणे नाही कारण दरबारला

१. पी. आर. एम. एच. १, पृ. १२३.

२. *Grier*, The letters of Warren Hastings to Grier, p. 281-

३. Browne, L. 46.

४. म. शि. का. प. ले. २०७.

ह्यावेळी इंग्रजांशी लढल्यामुळे कर्ज झाले होते. त्यांना हेही ठाऊक होते की, आणिबाणी प्रसंगी मोगल दरबारवर विश्वासून रहाण्यात अर्थ नाही. दिल्लीचा कारभार हाती घेण्याचे साहस करावयाचे म्हणजे त्याकरिता बुंदेलखंडात आपले पाय घट्ट रोविले पाहिजेत आणि स्वतःपाशी चांगल्या प्रकारची सुसज्ज कवाइती फौज हवी. बुंदेलखंडात मराठ्यांचा अंमल वसविण्याच्या मार्गात गोहद राण्याची ब्याद अडथळा करीत होती. शिवाय कवाइती सैन्य तयार होण्यासाठी वेळ हवा होता पण ही तयारी करूनही दिल्लीस कोणाच्या विश्वासावर जावे याचा शोध घेता महादजींना इंग्रज वकील अॅन्डरसन आणि गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्ज यांच्या मैत्रीबद्दल भरवंसा वाटू लागला. परंतु दिल्लीचा इंग्रज वकील ब्राऊन व दुसरा मुत्सद्दी मॅकफर्सन आणि कर्कपॅट्रीक हे मात्र महादजींच्या विरुद्ध असून ते दिल्लीचा कारभार इंग्रजांनी हाती घ्यावा ह्या मताचे होते.

दिल्लीचा बादशहा शहाअलम याने महादजी बावानी जलदीने दिल्लीस यावे म्हणून आपला मुलगा युवराज मिर्झा जवानबख्त यास अफ्रासियाब व मिर्झा शफी या दोन उमरावांच्या सोबत आग्र्यास पाठविले. तिथून शाहाजाद्याने पाटील बावांस लिहिले "आम्ही आपल्या भेटीस ग्वाल्हेरीस येत आहोत." पाटील बावांनी त्यांस उत्तर दिले की, "आपण येण्याची तसदी घेऊ नये, मीच आपल्याकडे येतो" त्याप्रमाणे महादजी शिंदे जून १७८३ त ग्वाल्हेरहून आग्र्यास येण्यास निघाले. बरोबर मोगलातर्फेचा उमरावगीर गोसावी, पाच हजार उत्कृष्ठ फौज आणि दहा तोफा एवढा सरंजाम होता. महादजी बावा प्रथम अफ्रासियाबखानास भेटले. त्यास तसेच अॅन्डरसन व काशीराजा चेतसिंग यास बरोबर घेऊन शहाजादा जवानबख्त यास भेटावयास गेले.

शाहाजाद्याने उभे राहून पाटीलबावास अभिवादन केले. पाटीलबावानी त्यास नजराणा पेश केला. शाहजाद्याने पाटीलबावास व त्याजबरोबरच्या मंडळीस त्यांच्या इतमामाप्रमाणे वस्त्रे दिली. हा भेटीचा सोहळा २७ जून १७८३ पासून पाच दिवस चालला. लखनौ येथील इंग्रज वकील विल्यम पामर या भेटीच्या वेळी आग्र्यास हजर होता. दुसऱ्या दिवशी शाहाजाद्याने महादजीस दिल्लीस येऊन कारभार हाती घेण्याची विनंती केली. त्यावेळी पाटीलबावा उत्तरले की, "मी हा भार पावसाळ्यानंतर घेईन. अगोदर मला गोहदच्या राण्याचे पारिपत्य करू द्या." नजीबखानाचा मुलगा झबिताखान ह्याने पाटीलबावास भेटून अभिवादन करण्याची इच्छा प्रगट केली. पाटीलबावांनी ह्या शिंद्यांच्या शत्रूस नकार दिला. तसेच आग्र्याचा किल्लेदार हमदानी याची गोहदच्या राण्यास आतून फूस होती म्हणून त्यांनाही आपल्या भेटीस येऊ नये असे महादजीबावांनी कळविले.[1] यानंतर महादजीबावांनी जुलै महिन्यात ग्वाल्हेरचा किल्ला गोहदच्या राण्याकडून जिंकून घेतला.

१. शि. इ. सा. भाग १, ले. ६९.

पाटीलबावांनी आग्र्यास जवानबख्ताची भेट घेतली. त्यावेळी हमदानीची भेट घेण्याचे नाकारले. हमदानीस या अपमानाबद्दल फार वाईट वाटले. म्हणून त्याने मिर्झा शफीस गुप्तपणे मारण्याचा विचार केला. प्रथम तो अफ्रासियाबखानास भेटून आला. नंतर मिर्झा शफीच्या भेटीस गेला. "हत्तीवर स्वारी असता दोघांचे हत्ती जवळजवळ आले. हाताशी हात लावावा तो अमदानी आपले हत्तीवरून उडून मिर्झा शफीचे अंबारीत खवासीत जाऊन मागून मिर्झा शफीची मान दाबून धरून कटचार मारून ठार केला". हा प्रकार दिनांक २३ सप्टेंबर १७८३ रोजी घडला.[१] शफीचा काटा काढण्यास अफ्रासियाबाने हमदानीस फूस दिली होती असा त्यावेळी प्रवाद होता[२] आणि तो खराही असावा, कारण हमदानीस ह्या खुनाबद्दल अफ्रासियावने कांहीच शासन केले नाही.

शफीच्या खुनाची बातमी अवघ्या चाळीस तासात दिल्लीत पसरली. ती ऐकून शहाअलम बादशहा व अब्दुल अहमद यास कापरे भरले. शफीच्या छावणीत रहात असलेला इंग्रज वकील मेजर ब्राऊन अफ्रासियाबखानाशी सूत जमवून ब्रिटीश मिलिटरीच्या जोरावर बादशहाचा मुलगा सुलेमान शुको यास बादशहा म्हणून जाहीर करील अशी धास्ती त्या दोघांना वाटू लागली. त्यावर उपाय म्हणून अफ्रासियाबखानास बादशहाने मीर बक्षी पद दिल्याचे जाहीर करून त्यास लगेच दिल्लीस येण्यास तातडीचे बोलावणे पाठविले[३].

अफ्रासियाबखानाने मीरबक्षी पद ऑक्टोबर १७८३ च्या सुरवातीस स्विकारले आणि पुढील वर्षी बरोबर तेरा महिन्यांनी २ नोव्हेंबर १७८४ रोजी त्याचा खून झाला. ह्या काळात बादशाही राज्यकारभाराची स्थिती न सुधारता ती अधिक खालावली. म्हणून महादजी शिंद्यास दिल्लीचा कारभार हाती घेणे भाग पडले.

शफीचा निकाल लागल्यावर अफ्रासियाबखानाने शफीच्या बावरलेल्या सैन्याचा तावा घेतला आणि त्यांना धीर दिला. हमदानीची समजूत काढून त्याच्याशी गुप्त करार करून काही पैसे देऊन त्याला धोलपूरबारीच्या जहागिरीवर जाण्यास कबूल करविले. तसेच जयपूरकरांकडील जी खंडणी येईल तीही देऊ असे सांगितले.[४]

बक्षी पद १८ ऑक्टोबरला स्वीकारल्यावर शफीच्या हस्तकांकडून आग्रा व त्या भोवतालचा मुलुख ताब्यात घेण्याचे काम अफ्रासियाबखान यास करावे लागले. आग्रा ताब्यांत घेतल्यावर त्याने डीगकडे आपला मोर्चा वळविला.

मिर्झा शफी मारला गेल्यावर अफ्रासियाबखान आणि अनूपगीर गोसावी त्याच्या आईस डीग येथे भेटावयास गेले. ह्या सर्वांना धीर देऊन व अफ्रासियाबखानास वस्त्रे देऊन हमदानीचे पारिपत्य करण्यास सांगितले.

---

१. Historical Papers relating to Mahadaji Sindia, p. 265.

२. दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे. भा. १, ले. ९३.

३. कित्ता, ले. ९२, ९४.

त्याच वेळी अनूपगीर गोसाव्याने पाटीलबावास सर्व हकीगत कळवून, त्यांची मदत अफ्रासियाबखानास मिळावी असे ठरविले. कारण शफीच्या मरणानंतर सर्व मुसलमान सरदारांनी आपणास त्याचे अधिकार मिळावे म्हणून आपसांत भांडण सुरू केले. त्यांना दहशत बसविण्याची कामगिरी एकट्या अफ्रासियाबखानास करता येईना. त्यास पाटीलबावांची मदत हवी झाली म्हणून तो शिंद्यांशी अधिक मैत्री जोडण्याचा प्रयत्न करू लागला.

ह्यावेळी शिंदे गोहदच्या किल्ल्यास वेढा घालून होते आणि सर्वांशीच गोड बोलत होते. त्यांस गोहद काबीज करण्यास पाच महिने लागले. शेवटी फेब्रुवारी १७८४ त महादजीस गोहद राणा शरण गेल्यामुळे तिथे मराठ्यांचे ठाणे बसले. गोहदवर मराठ्यांचे निशाण चढले. आणि यानंतर महादजीबावांनी लागलीच दिल्लीचे राजकारण हाती घेतले.

डीग व आग्र्याचा बंदोबस्त करण्यात दोन महिने घालविल्यावर अफ्रासियावखान दिल्लीस दिनांक १४ डिसेंबर रोजी परत आला. अब्दुल अहद यास क्षमा करून त्यास २४ हजाराची तैनात दिली व त्याचे अधिकार वाढविले.[१]

**शिखांचे हल्ले :**

यावेळी उत्तर हिंदुस्थानात दुष्काळ होता. शीख सरदारांचे हल्ले बादशाही मुलुखावर वारंवार होत असत. यावेळी पतियाळाचे आसपासचे लहान लहान सरदार युद्धकाळातून आपला बचाव करण्यासाठी आपली बायका मुले घेऊन वरच्या दुआवात उतरले. त्याजवळ ३०–३५ हजाराचे सैन्य होते. त्यांचे सरदार भागसिंग व भोगलसिंग ह्या शिख सरदारांनी नहरसिंग गुजरास सामील होऊन घासगडच्या रोखाने चाल केली आणि झबिताखानाचा पराभव करून त्यास हाकून लाविले.[२] हे विजयी सैन्य मिरतच्या रोखे लूट करीत चालले. ही बातमी अफ्रासियाबखानास समजताच त्याने शिखांना पिटाळून लावण्यासाठी झबिताखानाची समजूत काढिली. स्वतः शिखांवर चाल करून गेला आणि अप्पर दुआब झबिताखानाकडे सोपविले. दिल्लीस आल्यावर बादशाही खर्चाचा पेच अफ्रासियाबपुढे आ वासून उभा राहिला. त्यात अब्दुल अहद याने बादशाही मर्जी सांभाळून बादशहास अफ्रासियाबबद्दल वाकडे सांगून त्यांचे मत कलुषित केले होते. अहद हा मराठ्यांचा द्वेष्टा होता. त्यास इंग्रजांनी बादशाही चालवावी असे वाटत असे. त्याकरिता त्याने इंग्रजांचा वकील जनरल ब्राऊन ह्याच्याशी दोस्ती केली. ब्राऊनने शफीचा व जाट राजा रणजितसिंग ह्यांचा तह घडवून आणिला होता. जाट राजाने शफीस देण्यासाठी ९० हजारांचा ऐवज ब्राऊनकडे अनामत ठेवला होता. पण अफ्रासियाबखानाने इंग्रजांशी ठरलेल्या अटी न मानल्यामुळे ब्राऊनला राग आला व त्याने ते पैसे भरतपूर जाटाकडे परत केले[२].

---

१. दि. रा. भा. १, ले. ९६, ९८, १२४.

२. जदुनाथ सरकार, फॉल, ऑफ दी मुल एंपायर, भा. ३, पृ. १९०

यानंतर खंडणी वसूल करण्याच्या तंत्रावरून अफ्रासियाबखानाचे आणि बादशहाचे मोठे भांडण झाले. त्याच सुमारास एक धुळीचे वादळ झाले. ह्या सर्व गडबडीचा फायदा घेऊन ब्राऊनने राजपुत्र जवानबक्त यास फूस लावून १४ एप्रिलच्या रात्री दिल्लीहून पळून जाण्यास फूस दिली. जवानबख्त ६ मे रोजी लखनौला पोचला. वजीर व गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टींग्ज यांनी त्याचे समारंभपूर्वक स्वागत केले. बादशहा व अफ्रासियाबखान यांनी या घटनेचा बोध घेऊन राजपुत्रास दिल्लीस परत येण्यासाठी पत्रे लिहिली व ती ब्राऊनबरोबर देऊन त्यास जवानबख्ताच्या भेटीस रवाना केले.

त्याने अयोध्येचा वजीर व इंग्रज याजशी बोलणे लाविले. "तुम्ही दिल्लीस येऊन पातशाहीचा बंदोबस्त करावा" असे तो त्यास सांगू लागला. यावेळी गव्हर्नर जनरल हेस्टींग्ज यास वजिराच्या दरबारी असलेला इंग्रज वकील कर्नल पामर याने सल्ला दिला की बातशहा हा वृद्ध आणि अजागळ आहे. शहाजाद्याला हाती धरून आपण दिल्ली प्रांतातून मराठ्यांचे उच्चाटण करुया. ह्या प्रकारास गव्हर्नर जनरल हेस्टिंग्जने संमति दिली नाही; कारण त्यावेळी इंग्रजांचे टिपूशी युद्ध चालू होते. मराठ्यांशी मैत्री नच केली तर ते आपल्या विरुद्ध जातील आणि टिपूचा पराभव न होता मराठे टिपूस मिळाले तर आपलाच पराभव होईल या भितीने वॉरन हेस्टिंग्जने महादजीस दुखविले नाही. मात्र असफउद्दौल्याकडून कडा, कुरा व प्रयाग हे महाल घेवून बातशहाजादास खर्चासाठी लावून देण्याचे ठरविले आणि दिल्लीचा मनसुबा आरंभिला[1]. वॉरन हेस्टिंग्जच्या ह्या कृत्यामुळे खुद्द पाटीलबावांची इंग्रजांच्या कावेबाजपणा-बद्दल खात्री झाली. इंग्रजांचे राजकारण बातशहाशी झाल्यास चांगले नाही व पुढे पेच फार आहेत यास्तव त्यांचा (इंग्रजांचा) शिरकाव न होता आपले (मराठ्यांचे) हाताखाली दिल्ली घालावी, पाटीलबावांनी बंदोबस्त करावा[2], अशी नाना फडणिसांची आज्ञा. यावेळी डिबॉईन हा लष्करी अधिकारी गोहद राण्यापाशी होता. महादजीने त्यास ज्या दिवशी गोहद राणा शरण गेला त्याच दिवशी आपल्या नोकरीत घेतले. पुढील महात म्हणजे २७ मार्चमध्ये हेस्टींग्ज कलकत्याहून लखनौस आला[3]. त्याने मेजर ब्राऊन नांवाच्या इंग्रज वकिलास दिल्लीस बादशहाच्या भेटीस पाठविले होते. ब्राऊन येऊन एक महिना झाला तरी बादशहाने त्याची भेट घेतली नाही. पुढे ५ फेब्रुवारी १७८४ रोजी त्याची भेट बादशहाने घेतली. इंग्रजांच्या ताब्यात बादशहाने जावे हे अफ्रासियाबखानास पसंत पडले नाही. त्याने विचार केला की, बादशहास काढून त्यास स्वारीवर घेऊन जावे. पण बादशहाचा स्वारीवर जाण्याचा किंवा इंग्रजांची ताबेदारी पत्करण्याचा विचार निश्चित होईना. इंग्रजांना बादशहाचा हा घोळ घालण्याचा स्वभाव माहीत होता.

---

१ म. शि. का. प. ले. ३११, ३१३, ३१६, ३१८, ३३५, ३३९.

२. तत्रैव, ले. २९७, ३११, ३१८.

३. वॉरन हेस्टींग्ज लखनौला दि. २७ मार्च १७८४ च्या सकाळी पोचला. फॉरेस्ट (फॉरेन डिपार्टमेन्ट), भा. ३, पृ. १६.

म्हणून त्यांनी बादशहाच्या नादास न लागता त्याचा मुलगा शहाजादा जवानबक्त यास आपल्या ताब्यात आणण्याचा व्यूह रचला. जवानबक्तास हेस्टिंग्जची आतून फूस मिळाल्यावर त्याने निवडक १०० गुजर घोडेस्वारानिशी दिल्लीतून रात्रीच पोबारा केला व तो आग्र्यास हेस्टिंग्जपाशी येऊन राहू लागला[१]. हेस्टिंग्जने त्यास इतमामाने ठेवून घेतले. इंग्रज वकील ब्राऊन हा बादशहाशी गोड गोड बोलून इंग्रजांची मदत घेण्यासाठी बादशहास सांगू लागला. हे महादजी बावांस समजताच त्यांनी अनूपगीर गोसाव्याचे विद्यमाने अफरासियाबखानास धीर दिला की, "हरतऱ्हा करून पातशहास हस्तगत करावे. (त्यास) सूत्रात ठेवावे. इंग्रज शिरू न पावत आणि तोरा (मोहरा) आपले हाती राहे ते करणे. बादशहा नच ऐके तर कैद करावा. परंतु इंग्रजांचे हातास जाऊ न द्यावे[२]." मोगल सरदार व गोसावी मंडळी ह्यांना हे राजकारण पसंत होते. गोसावी महादजीच्या तर्फे अफरासियाबशी संगनमत करीत होता[३]. त्यांनी बादशहाकडून इंग्रजास ताकीद देवविली की हेस्टिंग्जने दिल्लीस येऊ नये माघारा जावे[४]. बादशहा आपले मत अहदखानाच्या नादी लागून बदलतो, आपले पुरे ऐकत नाही, हे अफरासियाबखानास कळून आल्यावर त्याने अब्दुल अहदखानास कैद करून त्याला अलिगडच्या किल्ल्यात ठेविले. त्यामुळे बादशहास अफरासियाबखानाच्या तंत्राने चालणे भाग पडले. बादशहा दिल्लीहून आग्र्यास पाटीलबावांच्या भेटीस येण्यास तयार झाला. जवानबक्त इंग्रजांच्या आश्रयास गेल्यामुळे तो इंग्रजांच्या मदतीने गादी बळकावील अशी भीती बादशहास वाटून इंग्रजांची मसलत हाणून पाडण्यासाठी बादशहाने पाटीलबावांस भेटीसाठी आग्र्यास बोलविले.

बादशहास ताब्यात घेऊन दिल्लीचे राजकारण आपण करावयाचे त्यास शीख, रोहिले व रजपूत यांचा बंदोबस्त केला पाहिजे. ह्या करिता फौजेची व पैक्याची अनुकूलता हवी होती. परंतु शिंद्यांच्या फौजेचे पगार थकलेले. बारमाही पैशाची ओढगस्त. ही वस्तुस्थिती शिंद्यांनी नाना फडणविसास पत्र लिहून दृष्टोत्पत्तीस आणिली, "पातशहाचे राजकारण करा म्हणोन लिहितात तर पैक्यावेगळे ते राजकारण कसे होते? आम्ही मसलतीमुळे किती पेचात आलो? कर्ज देखील मिळेना येथवर दशा आमची बादशहास खर्चास रुपया पाहिजे. सध्या फौज तिकडे जावी ती कोणती पाठवावी? स्वारी हिंदुस्थानची! फौज आम्हाबरोबर, सरकारची पथके तरी बरोबर असावी? त्यापैकीं राजेश्री शिवाजी विठ्ठल व बळवंतराव धोंडदेव व पवारापैकी निम्मे मात्र आहेत. अशी दशा आमचे हिंदुस्तानचे स्वारीची[५]. तसेच मामलेदारीचे रीतीबद्दल पाटिलबावांनी सुचविले की, परगणे हमीरपूर

१. PRMH; I, p. 16.

२. म. शि. का. प. ले. ३११.

३. H. P. M. S. 311.

४. जेम्स ब्राऊनचे गव्हर्नर जनरल यास पत्र "ब्राऊन," पृ. ९५.

५. सं. देवास इ. सा. ले. १८५.

बद्दल पैका मिळत नाही. पवाराचे जप्तीबद्दल मनस्वी खर्च लिहून, सरकारचा बुंदेले रुपया देत नाहीत. घटाई करून स्वस्थ आहेत. अशा चाली यांच्या असता सरकारातूनही तगादा होत नाही. आम्ही पाच वर्षे मेहनत केली ते पेचात येऊन कर्जभरी झालो. पुढे ताकद राहिली नाही. पैका नसल्यामुळे माघारी जावे तर इंग्रज बादशहास मिळवून घेतील अगर शहाजाद्यास तख्तनशीन करून बादशहास ज्ञानमठी बसवतील. इंग्रजांचा बंदोबस्त दिल्लीत झाला मग सारेच खुष्कीवाले पेचात येतील. यामुळे आम्ही माघारे जाऊ शकत नाही. पैका नाही म्हणून लाचार सरकारातून पैशाची मदत जाली तरच आमचा पाय येथे टिकून राहील." यावरून महादजीबावांच्या आर्थिक परिस्थितीचा बोध होतो.

ज्याच्या हातात बादशहा तो हिंदच्या सार्वभौम सत्तेचा मालक हे महादजीबावांस ठावूक होते. म्हणून पैशांची अडचण असताही त्यांनी सन १७८४ च्या उन्हाळ्यात गोहद प्रकरणातून मुक्त झाल्यावर दिल्लीचे प्रकरण हाती घेतले व नाना फडणिसास लिहिले की बातशहास पैशाची अडचण, इंग्रज पैका कबूल करून आपले लगामी लावून घेणार म्हणून वजिराकडे पातशहानी आग्र्यास यावे व आम्ही इकडून जावे हे संधान लाविले. त्याप्रमाणे बातशहासुद्धा दिल्लीचे मंडळ आग्र्यास येणार तेव्हा तेथे जाऊन बंदोबस्त करून आपल्या मनोदयानुरुप राजकारण राखले पाहिजे. या गोष्टीस पैक्याची अनुकूलता असावी. बातशहा व आम्ही एक झाल्यावर इंग्रज बातशहाजाद्यास पाठवून देतात किंवा काय विचार करतात तो समजेल. बातशहा आपले हाती असल्यास चिंता नाही. पैक्याची तरतूद होऊन आल्यास सर्व गोष्टी घडतील[1].

## दिल्लीचे प्रकरण हाती घेण्यासाठी केलेले उद्योग :

बादशहाची व्यवस्था लावणे म्हणजे बादशाही कारभार स्वतःच्या अखत्यारात घेऊन बादशहास दरमहास खर्चास देऊन पोसणे. इतकेच नव्हे तर बादशहाचे जे मांडलीक असतील त्यांजकडून खंडणी वसूल करणे. ही कामे महादजी बावांस करावयाची होती. शिवाय उज्जैनपासून दिल्लीपर्यंतचा सर्व मुलूख आपल्या अखत्यारात असावयास हवा हेही पाटीलबावा जाणत होते. चंबळपावेतो महादजीचा मुलूख बसलाच होता. पलिकडील भरतपूर जाट त्यांचे लगामी होता. आग्र्यास अंमल होणे इष्ट होते. पण त्या ठिकाणी त्यांचा कट्टर दुष्मन महमद हमदानी किल्लेदार म्हणून बसला होता. त्यास दूर करणे अत्यावश्यक होते. आग्र्यास पुरवठा यमुनेपलिकडील अंतर्वेदीतून होई. तेव्हा आग्रा आणि अंतर्वेदी ह्या दोन्ही ठिकाणी आपला अंमल होण्यासाठी आग्र्याचे बंदोबस्तास बाळोबा पागनीस यास व अंतर्वेदी जिंकून घेण्यास रायाजी पाटील यास फर्माविले आणि दिल्लीच्या बंदोबस्तास अंबाजी इंगळे यास रवाना केले. रायाजी पाटिलाने अंतर्वेदीतील मुख्य ठाणे जे अलिगड ते

१. महादजी शिंदे यांची कागदपत्रे, ले. २९७, पृ. ३९१-९२.

जिंकून घेतले आणि रोहिल्यांचा बंदोबस्त केला. शिखांचा सरदार मोहरसिंग ह्यास आणून त्याच्या मार्फत दिल्लीच्या उत्तरेकडील प्रांताचा बंदोबस्त चालविला. कारण शीख, रजपूत, रोहिले वगैरे सर्वांचा बंदोबस्त केल्याशिवाय बादशहाची कोणतीही व्यवस्था सुरळीत चालली नसती.

वर सांगितल्याप्रमाणे शिंद्यांनी दिल्लीचे राजकारण अंगावर घेण्याचे ठरविले[1] आणि त्याकरिता अफरासियाबखानाशी अनुसंधान चालू ठेविले. बादशहासही शहाजादा इंग्रजांकडे लखनौस गेला हे जड वाटले. सबब इंग्रजांची मसलत हाणून पाडण्यासाठी बादशहाने शिंद्यास भेटीसाठी आग्र्यास बोलाविले. वर ठरल्याप्रमाणे बादशहा, अफरासियाबखान वगैरे आग्र्यास येण्यास निघाले. पाटीलबावा व अफरासियाबखान यांच्या भेटी फत्तेपूर सिक्रीजवळ दिनांक २४ ऑक्टोबर १७८४ रोजी झाल्या. बादशाही कारभारासंबंधी पुढील धोरण काय असावे याविषयी उभयतानी खलबत केले. ही बातमी शिंद्यांचा दुश्मन जो हमदानी त्यास समजल्यावर त्याने इतर मोगल सरदारांच्या सहाय्याने अफरासिबखानाचा काटा काढण्याचे ठरविले. मिर्झा शफीचा भाऊ जैनुल आबादीखान राजश्री पाटीलबावांजवळ सहा महिने येऊन राहिला होता. मातबर आल्याचे चालविले पाहिजे म्हणून बावा खर्चास देऊन त्याचे चालवीत असता, हमदानीचे मतात मिळाला. हमदानी, जैनुल आबदीखान व मोगल या सर्वांचा मनसबा ठरला जे,आफरासियाबखान दक्षणियास मिळाला. पाटीलबावांचे सल्लेनें चालतो, बादशाही दौलत दक्षण्यांचे घरांत घालतो, त्यास जैनुल आबदीखानाने मारावा, म्हणजे पाटिलबावा सहजच राहिले. "बादशाही बंदोबस्त करण्याचा विचार, तरी अमीर उलअमराई झैनुलआबदीखानास द्यावी व नांवाचा धनी त्यास करावा कारभारांत मुखत्यार आपण होऊन काय चालवावे" असा मनसुबा हमदानी याने केला[1]. तो ठरल्यावर झैनुलआबदीखानाने आपल्या घरचा मोगल बारगीर बरोबर घेतला आणि दोघे अफरासियाबखानाचे डेऱ्यास दिनांक ३ नोव्हेंबर १७८४ रोजी सकाळी गेले. बारगिराने खानास एकटा पाहून झडप घातली. गला धरून कटयार कंधावर चालवून वरून भार घालून दाबला, तो स्तनापावेतो आला, अर्धमेला जाला, पडला. इतक्यात आसपासच्या लोकांनी येऊन बारगिरास ठार केले. या गडबडीत जैनुल आबादीखान परत शिंद्यांकडे गेला आणि त्यांना सांगू लागला की, "मी जवळ होतो, तो बारगीरही माझाच, मजला कोणी बदनाम करतील, तुफान घेतील, यास्तव आपणाकडे सांगावयास आलो." परंतु पाटीलबावा या लबाडीने फसले नाहीत. त्यांनी जैनुलआबदीखानास धरून कैदेत ठेविले[1]. आपले लोक अफरासियाबखानाच्या छावणीस पाठवून खऱ्या हकिगतीचा छडा लाविला व अफरासियाबच्या लोकास धीर दिला. अफरासियाब मारला गेल्यावर त्याचे प्रेत पुरण्यासाठी न्यावयाची तयारी झाली. पण त्याच्या लष्करातील

१. CPC VI, ले. १४९४, जैनुल आबादीखानानेच अफरासियाबखानाचा खून केल्याचे चौकशीअंती नक्की झाल्यावर शिंद्यांनी त्यास साखळदंड घालण्यास फर्माविले.

पठाण व रांगडे यांनी आपल्या पगाराची थकबाकी मिळण्यासाठी गलबला चालविला आणि प्रेत उठविण्यास मना केली. तेव्हा शिंद्यांनी मध्ये पडून बातशहास सांगून तुमचा पगार देववीन असे सांगून खातरजमा केली व प्रसंग निभावला.

त्याच रात्री शिंद्यांनी आपल्या कारभारी मंडळाची सल्ला घेऊन हमदानीचे पारिपत्य लागलीच करणे इष्ट असे ठरविले. कारण वेळ गमाविल्यास हमदानी बादशाही फौजेत फितुर करून सर्व मुसलमानास आपल्याविरुद्ध उठवील ही भीती महादजी बावांस होती[१]. म्हणून त्यांनी हमदानीचे पारिपत्य करण्यास अंबाजी इंगळे व रायाजी पाटील यांस पाठविले[२]. स्वतः गोसावीचा तोफखाना बरोबर घेऊन गेले. अफरासियाबखानाची फौज बरोबर होतीच. हमदानी भरतपुराअलिकडे तीन कोसावर होता. त्यास सर्वांनी मिळून वेढा घातला[३]. तोफांची मारगिरी केली तेव्हा त्याच्याकडून निरोप आला की, "बादशाहीचा बंदोबस्त तुम्ही करणार आम्ही तुमचे शरीक करून भांडावे, मरावे कशाला?" दुसरे दिवशी हमदानी अंबुजीकडे पैगाम लावून वचन प्रमाण देऊन इंगळयाच्या गोटात उतरला[४]. अशा रीतीने मराठ्यांच्या स्वाधीन झाला तेव्हा त्याची पलटणे होती त्यास कुंभेर पार करून दिले. बादशहा अफरासियाबखानाच्या खुनानंतर अगदीच निराधार झाला. ज्याच्यावर विश्वास ठेवता येईल असा एकही मुसलमान उमराव त्याजपाशी राहिला नाही. तो ह्यावेळी आग्र्यास होता[५]. त्यास आणावयास खंडेराव हरीस पाठविले. खंडेराव हरी बादशहासह फत्तेपूरसमीप दाखल झाले. पाटीलबावांनी आपला भरतपुरनजीकचा तळ हालवून बादशहाचे लष्करासमीप अर्ध्या कोसावर येऊन मुक्काम केला[६]. बादशहाने दिनांक १३ नोव्हेंबर १७८४ रोजी आपला मुलगा मिर्झा अकबरशहा यास सामोरे पाठविले. शिंद्यांनी त्यास आपल्या डेऱ्यात नेवून बसविल्यानंतर बादशहाच्या भेटीस स्वतः पाटीलबावा शहाजाद्यासमागमे गेले[७]. मुलाजमत झाली. मोहोरा नजर केल्या. बादशहाने पाटीलबावांचे पाठीवर बहुत ममता पुरस्सर हात ठेवून आज्ञा केली की "सलतनतीचा बंदोबस्त करा"[८]. पाटील बावांनी उत्तर केले की, "कांही पदाखेरीज सलतनतीचा बंदोबस्त कसा होतो"? तेव्हा बातशहाने विसाजी कृष्णाच्या वेळची आठवण देऊन तुम्ही पुन्हा आपल्या संरक्षणाची हयगय कराल अशी भीति प्रदर्शित केली. तेव्हा शिंदे म्हणाले,

१. ऐतिहासिक स्फुट लेख, भा. २, पृ. १०१.
२. तत्रैव भाग २, पृ १०२.
३. कित्ता, पृ २७०.
४. म. शि. का. प. ले. ६०६, पृ. ८८५.
५. ब्राऊन, ले. ११४, महाराष्ट्र बुलेटीन १, पृ. ४३
६. "ब्राऊन" पृ. २७०.
७. ब्राऊन, पृ. २२३, ऐतिहासिक स्फुट लेख, भा. २, पृ. १०४-५.
८. सं. दे. इ. सा. ले. १८७.

"विनापद दिल्याखेरीज चौघावर दबाव पडून सलतनतीचा बंदोबस्तही होणार नाही". तेव्हा बादशहानें उत्तर केले की "श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे नांवे वकील मुतलखी व मीर बक्षीगिरी ही दोन्ही पदे देऊन त्यांची नायबत आम्ही तुम्हास देतो". पाटील बावांचे यावर म्हणणे पडले की, "आम्ही श्रीमंतास कळवितो" पण ह्या प्रकारे कालहरण होऊन शत्रू बळावतील हे दोघांनीही लक्षात घेऊन श्रीमंताना वस्त्रे देण्याचा व शिद्यांना नायबती देण्याचा समारंभ तावडतोब उरकण्यात आला[१]. अशा रीतीने पूर्वी कधी न मिळालेला अधिकार मराठ्यास मिळाला. महादजीबावांस मुख्य कारभारी नेमिले.

ह्या समारंभाचे वर्णन पाटीलबावांनी स्वत: श्रीमंतास दिनांक ८ डिसेंबर १७८४ चे पत्र लिहून केले आहे ते अभ्यासूंनी जरूर वाचावे. पाटीलबावा ह्या पत्राच्या शेवटी लिहितात, "बादशाही बंदोबस्तास फौजही तशीच पाहिजे. फौजेचे व बादशहाच्या खर्चाविशी तजवीज करणार स्वामी समर्थ आहेत[२]".

**इंग्रजांची अवस्था :**

बादशहा मराठ्यांच्या ताब्यात आल्यावर इंग्रजांची प्रतिक्रिया काय झाली हे पाहणे जरुर आहे. बादशहाने आपले संरक्षण पत्करल्यास इंग्रज त्यास तीन लक्ष रुपये महिना देण्यास तयार होते[३]. पण बादशहाने मराठ्यांचे संरक्षण स्वीकारले तेव्हा मराठ्यांनी बादशाही बंदोबस्तास हात घातला. बादशहाकडून पदे घेतली हे इंग्रजास दु:सह झाले. त्यांनी अफरासियाबखानाचा दिवाण नारायणदास याचे कानी लागून त्यास रुपये देऊ करून मराठ्यास आपटी द्यावी व आपण बादशाही कारभारात शिरावे असा उद्योग आरंभिला. हे इंग्रजांचे बिंग नारायणदासाने सदाशिव दिनकरास सांगून फोडिले म्हणून मराठ्यास इंग्रज मात्रागमनी वाटू लागले[४].

**बादशाही कारभार :**

महादजी बावांना बादशहानी मीर बक्षी हा हुद्दा दिला व सर्व बातशाही फौज शिद्यांच्या ताब्यात दिली[५]. शिवाय बादशहांनी दिल्ली व आग्रा हे दोन प्रांत शिद्यांच्या ताब्यात दिले. शिद्यांनी पुढे हे दोन्ही प्रांत मराठी राज्यास जोडले. ही दोन स्थळे ताब्यात येण्यास सन १७८६ च्या जानेवारीपासून तो मार्चपर्यंतचा काळ लोटला. या दोन प्रांतांच्या उत्पन्नातून शिद्यांनी बादशाही फौजेचा

१. म. शि. का. प. ले. ३४२, ३४३, ४००;
दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे (इतिहास संग्रह), भा. १, ले. १२०, ले. १३२.

२. म. शि. का. प. ले. ३४२.

३. म. शि. ह्यांची कागदपत्रे, ले. ३४३, पृ. ४६१-६२.

४. वकील-इ-मुतालिक हा अधिकार या पूर्वीच्या मोगल बादशहाच्या कारकीर्दीत फक्त तिघांनाच लाभला होता.

५. म. शि. का. प. ले. ३४४, पृ. ४६२.

खर्च भागवावा असा करार ठरला. शिंद्यांनी बादशहास दरमहा दोन लक्ष रुपये खाजगी खर्चासाठी द्यावे, शिंद्यांनी बंडाचा बीमोड करून बादशाही राज्याचा बंदोबस्त करावा आणि बादशहास द्यावयाच्या रकमेत त्या मानाने शिंद्यांनी वाढ करावी असा शिंदे आणि बादशहा यांमध्ये करार ठरला.

अकबरकाली, शहाजहान बादशहाच्या वेळी आणि पहिल्या बहादूरशहाचे काळी बादशहाने महादजीस आपला रिजंट नेमून वकील-इ-मुतालिक किताब दिल्यावर शिंदे बादशहाच्या दरबारातून आपल्या छावणीस आले. तेव्हा सर्व सरदारांनी दुतर्फा राहून त्यांचा जयजयकार केला आणि त्यांना नजराणे अर्पण केले.

**शिंद्यांची कामगिरी :**

पाटीलबावा बादशाही कारभारात गुंत्यामध्ये निमग्न झाले. नित्यशः बादशहाकडे जाणे. डेऱ्यास आले तरी बरोबर बादशाही मंडळी मातब्बर नित्य येत असे. रात्रंदिवस कारभार व खलबताखाली दिवसरात्र जाऊ लागले. काही वेळा शहाजादा जवानबख्त याच्या आगमनाचा विषय चर्चेस आला आणि सर्वात महत्त्वाचा आणि सतत भेडसावणारा प्रश्न म्हणजे बादशहास दरमहास ठरल्याप्रमाणे खर्चास देणे व जवळजवळ वीस हजार बादशाही फौजेस तनखा देण्यास पैका आणणे हा होता.[1]

बादशहाच्या राजपुत मांडलिकांनी आपआपल्या खंडण्या दिल्यास बादशाही खर्चास तो पैसा पुरा पडेल हा विचार बादशहा व महादजीबावा यांनी एक विचारे करून राजपूत राजा जयपूरकर याजकडे बऱ्याच वर्षाची थकलेली खंडणीची बाकी वसूल करण्याचे ठरविले. मांडलिकी मुलखाशिवाय बादशहाचा खालसा मुलूख पुष्कळ होता. त्यापैकी शिखांनी पश्चिम सरहद्द, लाहोर, काश्मीर वगैरे मुलूख दाबला होता. इटाव्यापासून पलिकडे बंगालपावेतो इंग्रज होते. रोहिलखंड असफउद्दौल्याकडे होते. अंतर्वेदीतील मुलूख जाबिताखानाकडे होता. तेव्हा मांडलिकांकडून खंडणी वसूल करण्यापूर्वी बादशाही मुलुखात बादशहाचा अंमल बसविणे पाटीलबावांस क्रमप्राप्त होते.

अंतर्वेदीत अंमल बसविण्यासाठी आपला सरदार अंबाजी इंगळे व सरकारचे सरजामी कृष्णराव पवार यांची योजना केली[2]. ह्या मराठा फौजेने अंतर्वेदीतील बहुतेक सर्व ठाणी ताब्यात घेऊन मुख्य ठाणे जे अलिगड, त्यास वेढा दिला. हा वेढा जवळजवळ ८-९ महिने चालला, शेवटी मराठ्यांनी दिनांक २० नोव्हेंबर १७८५ रोजी अलिगड जिंकले व अंतर्वेदीत अंमल बसविला.[3]

---

१. कित्ता, पृ. ३६९.

२. स. दे. इ. सा. ले. १८८, म. शि. का. प. ले. ४०६-७, ४११.

३. सरकार, फॉल, भा. ३, पृ. ३००-३०५

**शिखांचा बंदोबस्त :**

पाटीलबावांस वकील-इ-मुतालिकी मिळाली हे शीख सरदारास आवडले नाही. ते जमा होऊन दिल्लीवर चाल करून आले. त्यास अंबुजी इंगळे कूच करून पुढे गेले. तेव्हा दोघाही शीख सरदारांनी सलूखाची बोलणी लाविली आणि बोलू लागले की, पाटीलबावांनी भेटावे. सांगतील ती चाकरी करू.[1] त्याप्रमाणे सोनपत पानिपतापलिकडे शीख होते ते येऊन महादजीबावांस भेटले. बादशाही मुलखात रखी घेत होते, ती सोडविली. पुढे त्यांनी रुजू रहावे. फौज आपणास लागेल ती त्यांची आणवावी. त्यांनी फौज घेऊन यावे असे सांगितले, चाकरी करावी त्यास पोटास द्यावे. असा करार झाला. अशा रीतीने शिखांचा बंदोबस्त झाला.[2]

बादशाही मुलखात अंमल बसविणे व रजपूत राजांकडून बादशहास याव्याच्या ठरलेल्या खंडण्या वसूल करणे ह्या गोष्टी पाटीलबावांस साध्य करावयाच्या होत्या.

**रयतेची स्थिती :**

बादशाही खर्चास जहागीर पुरत नव्हती व वसूलही येत नव्हता. कारण जहागिरीच्या वसुलांच्या बेरजा बादशहानी कमाल आकाराच्या धरिल्या. तो आकार पडताळून पहाता हिशेबात कोठे दिसेना. आधी चार वर्षे अनावृष्टि झाली. त्यात रयत अगदी मेली. गुरे ढोरे मेली. किंचित माणसे राहिली, ती पोटास न मिळता मेहनत काय करतील ?[3] अनावृष्टीमुळे रयत झाडून येथवर मेली की, एक एक गांव निर्माणसी झाला. एके घरची माणसे दहावीस जी असतील ती झाडून घरात मेली. प्रेते उचलावयास कोणी राहिले नाही. हाडांचे सापळे घरात तसेच पडून राहिले. ही गति चमेलपासून सरहद्द, लाहोर, काश्मीरपर्यंत पश्चिमेस झाली. पूर्वेस लखनौ-पावेतो किंबहुना पुढेही असे लोक फार मेले. जे लोक वाचले ते अधीर होऊन, लवकर देशांतरास निघून गेले. पूर्वेस व दक्षिणेस लाखो माणूस गेले. मारवाडची हीच दशा ! माळवा, नेमाड, बऱ्हाणपूर ही टाकून पुढे हजारो हजारोंच्या झुंडी एकामागे एक जात होत्या[4] अशी कठीण परिस्थिती निर्माण झाली होती. यातून लावणी कोणी करावयाची व वसूल काय घ्यावयाचा हा पेच महादजीबावांस पडला.

वरील परिस्थिती बादशहाच्या नजरेस यावी व रजपूत राजांकडून खंडणी वसूल करावी म्हणून महादजी बावांनी बादशहासह स्वारीवर जाण्याचे ठरविले. रावराजा प्रतापसिंह अलवारकर, रणजितसिंग जाट व प्रतापसिंग जयपुरकर वगैरे राजपुतांकडील खंडणी वसुलीचे काम हाती घेणे क्रमप्राप्त होते.

---

१. म. शि. का. प. ले. ३७३.

२. कित्ता, ले. ३८१, पृ. ५३८.

३. कित्ता, ले. ३८१, पृ. ५३८.

४. कित्ता, ले. ६०७, पृ. ८८९-९०.

महादजीबावांच्या अडचणी वाढतच होत्या. महादजीबावांनी बादशहास बरोबर घेऊन आपल्या लवाजम्यानिशी दिनांक ३० नोव्हेंबर १७८४ रोजी दिल्ली सोडली. बरोबर इंग्रज वकील अँन्डरसन व ब्राऊन हे होते. उद्देश जयपूर राजावर चालून जाऊन वसूल करण्याचा. दिनांक १ डिसेंबर रोजी पिंगोऱ्याजवळ मुक्काम केला व दिनांक ३ डिसेंबर रोजी हेलेना येथे मुक्काम केला. या दोन्ही ठिकाणी बादशहाने महादजी बावांस मोगल साम्राज्याचे मीर बक्षी व सर्वाधिकारी नेमिले.[1] मराठ्यांना एवढे वैभव प्राप्त झालेले पाहून त्यांच्या शत्रूंचे घसे कोरडे पडले. हेलेना हे जयपूरचे मांडलीक लोकेंद्रसिंग यांचे, ते तीन दिवसात पडले. त्या अगोदर रणजित-सिंग जाट व प्रतापसिंग नरुका ह्यांनी महादजीबावांकडे येऊन आपल्यावर असलेली खंडणीची बाकी चुकती केली होती. दिनांक ११ डिसेंबरला बादशाही फौज माहेवाला आली आणि आठ दिवसात त्या लहानग्या किल्ल्यातील शिबंदी शरण आली. याच सुमारास जयपूरचे वकील महादजीबावांच्या भेटीस आले. आपल्याकडील बादशाही खंडणीचे हिशेब पटवून दिले. जयपूरकरांच्या खंडणीचा फडशा पडल्याबर शिंदे यांनी बादशहासह आपला मोर्चा दिनांक २८ डिसेंबरला डीगकडे वळविला आणि दिनांक ३ जानेवारी १७८५ रोजी डीग किल्ल्याच्या समोर आपले तंबू ठोकून सैन्याचा तळ दिला. इथेच दोन महिने राज्यातील कामाचा गुंता उरकण्यासाठी मुक्काम वाढवावा लागला.

महादजीबावास बादशहाने दोन फर्माने देऊन मीर बक्षी आणि मुख्य सेनापती बनविले. ह्या मीर बक्षीच्या हाती दिल्ली व आग्रा ही जी राज्याची दोन मुख्य ठाणी होती तेथील तिजोरी आणि महसुलासंबंधीचे रेकॉर्ड हवी होती. पण प्रत्यक्षात ही दोन्ही स्थळे महादजीबावांच्या पूर्वीचे जे मीरबक्षी त्यांच्या नातेवाईकांनी बळकाविली होती. आपल्या हाती अधिकार आल्यावर तो स्थळे ताब्यांत येतील अशी जी महादजी बावांची भाऊक कल्पना होती ती फोल ठरली. ह्या बाबतीत बळ वापरल्याशिवाय हे राजकारण तडीस जावयाचे नाही हे पाटीलबावांच्या मनाने निश्चित केले.

सन १७८४ च्या अखेरीस व पाटीलबावांस ऐंशी लाख रुपयांचे कर्ज होते. त्यांनी इंग्रजांशी दिलेला लढा, तसेच माळव्यातील आणि हिंदुस्थानातील बंदोबस्तासाठी त्या ठिकाणच्या किल्ल्यास घातलेले वेढे ह्यामुळे हा कर्जाचा बोजा झाला. त्यांची स्वतःची कवाईती फौज तीस हजाराची, त्या कवाइती लष्कराचा खर्च दरमहा सात लाख रुपये होता. शिवाय अफ्रासियाब व हिंमतबहाद्दर ह्या दोघांच्या फौजांचा दरमहाचा खर्च तीन हजार रुपये होता. वरील दहा लाखाच्या खर्चात बादशहाच्या तैनातीच्या खर्चाची १ लाख ३० हजाराची भर पडली. मिळून दर महाचा सुमारे १२ लाख रुपये खर्च भागविण्यासाठी महादजी बावास तो मिळविण्यासाठी उपाययोजना करणे

१. दिल्ली येथील रा. भा. १, ले १३३.

भाग होते. बादशहाचा मीर बक्षी आणि पंतप्रधान या दोन्ही नात्यांनी महादजीबावांच्या ताब्यात राज्याची तिजोरी, तीत होणारा मांडलिकांच्या खंडणीचा भरणा आणि राज्याच्या मालकीच्या प्रदेशातून महसूल वसुली ही असायला हवी होती.

**डीग व आग्रा किल्ले हस्तगत :**

वरील पैसा मिळविण्यासाठी डीग व आग्रा हे किल्ले ताब्यात घेणे आवश्यक होते. ह्या किल्ल्यात अब्दुल अहद, मिर्झा नजफ, लतफतअल्ली, मिर्झा शफी यांनी जो अलोट पैसा मिळविला होता तो अफ्रासियाबखानाकडे त्यांच्या पश्चात आला तो होता. म्हणून पाटीलबावांनी बादशहासह दिल्लीहून स्वारीस निघून आग्रा व डीगचे किल्ले घेण्याचे ठरविले. डीग किल्ला अफ्रासियाबच्या नातेवाइकांच्या ताब्यात होता. त्याजवर देवजी पाटलास रवाना केले. तेव्हा रायाजीस त्या किल्ल्याचा ताबा १६ जानेवारी १७८५ त मिळाला[१].

आग्र्याचा किल्ला घेण्यासाठी रायाजी पाटलाची रवानगी झाली. आग्र्याचा किल्लेदार सुजाद्दीनखान किल्ला खाली करून देईना. तेव्हा रायाजीने किल्ल्यास मोर्चे लाविले. महादजीबावाही मदतीस येऊन मोर्चे लाविले. मोर्चानी काम भागेना तेव्हा पाटीलबावांनी किल्ल्याचे कोतवालास वश करून किल्ल्यात आपली फौज घुसविली. किल्लेदारास कैद केले व किल्ला हस्तगत केला. हा किल्ला अफ्रासियाबच्या दोन नंबरच्या बायकोचा बाप सुजाद्दीनखान ह्याच्या ताब्यात होता. माया पुंजीही अद्याप होती. ती सर्व पाटीलबावांच्या हाती लागली.

**रामगड ताब्यात :**

दुसरा किल्ला अंतर्वेदीतील रामगड. त्याचे नांव अफ्रासियाबने अलिगड असे ठेविले होते. त्यातही द्रव्य भरपूर होते. त्या ठिकाणी मयतखानाचा भाऊ जहांगीरखान रखवालीस होता. त्याने अफ्रासियाबखानाचा अल्पवयी मुलगा महादजीचे हवाली करून अलीगडही खाली करून देण्याचा देखावा (जुलै १७८५)[२] केला. पण औधच्या नबाबाची त्यास आतून फूस असल्यामुळे त्याने आपला लढा तसाच चालू ठेविला. पावसाळा उलटून जाऊन हिवाळा सुरू झाला तरी किल्ला मराठ्यांचे स्वाधीन होईना, तेव्हा महादजीबावांनी दिल्लीहून किल्ल्याचे समोर बादशाहास आणण्याचे ठरविले आणि त्याप्रमाणे आपला मुक्काम बादशहासह ऑक्टोबर १७ ला मथुरेस केला. जहांगिरखानास आता नव्या दमाच्या मराठी फौजेपुढे टिकाव धरणे शक्य नव्हते. त्याने लचमनरावामार्फत बोलणी लावून २० नोव्हेंबरला शिर्यांच्या

१. दि. रा. भा. १, ले. १२७, आर्काइवज बुलेटीन २, इब्रतनामा, भा. २, ९६.

२. अलीगडचा वेढा, दिल्लीराजकारणे भा. १, ले १४०.

ताब्यात किल्ला दिला.[१] महादजीबावांस फक्त ४० हजार रुपये जहांगिर-शहाकडे मिळाले.[२]

अफ्रासियाबखानापाशी त्या मागील चार वर्षींनी कमविलेला पैसा व जड-जवाहीर असून ते आपल्या हाती जाहांगिरखानाकडून लागू नये याचा शिंद्यास राग आला. त्यानी जहांगिरखान व अफ्रासियाबखानाची विधवा बायको यांस पकडून आपल्या छावणीत आणविले. त्यांचा शोध घेतला,तेव्हा त्याजपाशी जवाहीर आणि काही गुप्त पत्रव्यवहार सांपडला. त्यात नारायणदास व हिंमतबहाद्दर गोसावी यांची जहांगिरखानास "तू अलीगड शिंद्यांच्या स्वाधीन न करता शक्यतो लढव" अशा मजकुराची पत्रे सांपडली. तेव्हा नारायण-दासास त्याच्या कुटुंबियांसह पकडून त्याजवळील चीजवस्तु जप्त करविली.

**शिखांशी तडजोड, १७८५ :**

आग्रा ताब्यात घेण्याचा शिंद्यांचा उद्योग चालू असतानाच दिल्ली व त्या आसपासच्या मुलखाच्या संरक्षणाची योजना पाटीलबावांच्या मनात घोळत होती. दिनांक १९ जानेवारी १७८५ रोजी पाटीलबावांनी आपला सरदार आबाजी इंगळे यांस दिल्लीच्या बंदोबस्तास अखत्यार नेमिले. नजफकुलीखान हा दिल्लीचा सुभेदार होता, त्याने अंबाजी इंगळेच्या ताब्यात सुभेदारी दिली. (११ फेब्रुवारी १७८५) तसेच जकातीचे अधिकारही अंबाजीस दिले. ह्या वेळी कुंजपुऱ्यापासून पश्चिम सरहद्द, लाहोर, काश्मीर, शिखांनी दाबून महालो-महाली खंडण्या (रखी) घेणे सुरू केले होते. अंबाजीने प्रथम दिल्लीच्या आसपासचा मुलूख लुटणारे गुजर यांचा त्यांची राहती गांवेच्या गांवे जाळून निःपात केली. तदनंतर शिखांच्या पारिपत्यास जाण्यासाठी दिल्लीच्या उत्तरेस १३ मैलावरील बख्तवारपूर येथे छावणी केली. पानिपतचे नऊ शीख सरदार ह्या ठिकाणी इंगळे यांच्या भेटीस येऊन त्यांनी समझोत्यासाठी बोलणी लाविली (२७ मार्च) ; त्यात असे ठरले की, शीख सरदार दुलचासिंग व मोहनसिंग ह्या दोघांनी महादजीबावांस भेटून करार पक्का करावा. महादजीबावांस शीख सरदार भेटले. त्याजशी करार केला की, शिखांनी बादशाही मुलखात लुटालूट करू नये. त्यांनी आपला अंमल बादशाही मुलुखातून उठवावा. जयपूर राजाच्या मुलुखातून जी जहागीर त्यांना महादजी-बावा देतील ती घेऊन त्याजवर गुजराण करावी आणि बादशहास युद्धाच्या वेळी ५,००० हजार घोडेस्वारांसह सामील होऊन मदत करावी[३]. ही व्यवस्था मथुरेस महादजीबावांची छावणी होती तिथे पार पडली (१० एप्रिल १७८५). शीख सरदार कांही दिवस बावांबरोबर राहिले आणि मग १० जूनला त्यांना बावांनी निरोप दिला.[४]

---

१. पू. रे. कॉं. भा. १, ले. १२–१९.

२. इब्रतनामा भा. २, पृ. १५१-१५४.

३. दिल्ली रा. भा. १, ले. १११, १३४, १३५.

४. पू. रे. कॉं. भा. १, ले. १४, १५.

**राघवगडच्या खिचीवर चढाई :**

अहिरांची राजधानी सिरोंज तिथपासून नैऋत्येस चाळीस मैलावर राघवगड नावाचे संस्थान अकबर बादशहाने खिचीच्या चौहानाकरिता उभारले. पुढील शंभर वर्षात ह्या पराक्रमी घराण्याने आपल्या राज्याचा विस्तार केला. मराठे माळव्यात फिरू लागल्यावर ह्या संस्थानिकांचा संबंध मराठयांशी आला. मराठयांना खंडणी देऊन खिचीवाल्याने आपले संरक्षण केले. तो आपणास राणा म्हणू लागला. आपल्या खंडणीच्या ऐवजाऐवजी होळकरास त्याने छाब्रा आणि गुजर ही दोन ठाणी दिली होती. पण १७८४ मध्ये खिची राजाने ही दोन्ही ठाणी आपणास परत मिळावी, आपण त्यावद्दल खंडणीचा पैसा देण्यास तयार आहोत अशी मागणी केली. अहिल्याबाई होळकर ह्यावेळी होळकरांच्या राज्याची व्यवस्था पहात होती. त्यांनी राजास सांगणे पाठविले की, मागील खंडणीची बाकी चुकती करा मगच परगणे आपल्या ताब्यात देण्याविषयी बोलणे होईल. खिची राजाने हे न ऐकता बळजबरीने वरील दोन्ही परगण्यांचा ताबा मिळविला. इतकेच नव्हे तर मार्च १७८५ त मराठयांच्या ताब्यातील गुगर छब्रा प्रांत आपल्या ताब्यात आणिला. त्याजवर त्याच्या पारिपत्यास महादजीबावांनी अंबुजी इंगळे व खंडोजी इंगळे, हमदानी, जयपुराकडील फौज मिळून एकूण चाळीस हजार फौज खिचीच्या पारिपत्यास पाठविली. गुर्गुर छबाडे खिच्यांपासून पुन्हा जिंकून घेतले. खिची पळून राघवगडास गेला. आपली फौज त्याजमागे खिचीवाडयात आली. खिच्यांच्या गढया, किल्ल्यास मोर्चे लावून सोडवून प्रांत अगदी घेतला[1] (ऑगस्ट १७८५). राघवगडास मोर्चे लाविले. पण राघवगडवाल्याने बरेच महिने दाद दिली नाही. पण नंतर रदबदली करू लागला, त्यास जीवदान देऊन धरून ग्वाल्हेर किल्ल्यास पाठविला. फेब्रुवारी १७८६ त खिची राज्य खालसा केले.

**उमरावगीर व हिंमतबहाद्दर गोसावी :**

महादजीबावांच्या स्नेही वर्गात यावेळी गोसावी हिंमतबहाद्दर अनूपगीर हा मुख्य असून तोच आरंभापासून महादजीबावांचा जम बसवीत होता. महादजीबावांनी त्यास बुंदेलखंडातील पुष्कळसे परगणे देऊन खूष ठेविले होते. याचा मोठा भाऊ उमरावगीर. हे दोघे बंधू राजेन्द्रगीर जो गाजीउद्दीन व सफदरजंग यांच्या दिल्ली येथील लढाईत मेला. त्याच्या मुलांनी गोसावीनी औरंगजेबाच्या कारकीर्दीत जुलूम झाल्यामुळे क्षात्रवृत्ती स्वीकारली. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर गोसावी मंडळीनी आपली लढाऊ पथके तयार केली व केव्हा मोंगलांशी तर कधी मराठयांशी लढाईत भाग घेऊ लागले. प्रथम हे दोन्ही बंधू शुजाउद्दौल्याकडे नोकरीस राहिले. शुजाउद्दौल्याने अनुपगीर यास आपला सेनापती नेमिले. दोघेही गोसावी सरदार शुजाच्या बाजूने पानिपती मराठयांशी लढले. पण मराठयांशी त्यांचा मोठा स्नेहभाव होता.

१. म. शि. यांची कागदपत्रे, ले. ४१२.

दिल्लीच्या राजकारणात या गोसावी बंधूनी मोठी कामगिरी बजावली होती. म्हणून बादशहाने अमीर उमराव यास हिंमतबहाद्दर हा किताब दिला. महादजीने दिल्लीच्या बादशहास ताब्यात घेण्याच्या वेळी अनूपगीर गोसाव्याने बादशहातर्फे महादजीशी संधान बांधून मोगलाकडील सर्व बातमी तो महादजी-बावांस सांगू लागला. महादजीबावा दोन वर्षे त्याच्या मदतीने चालले कारण बादशाही उमरावांच्या अनेक अतस्थ भानगडी व द्रव्याचे ठेवे त्यास माहीत होते. त्या माहितीचा उपयोग करून घेतल्यावर हा गोसावी आपल्या विरुद्ध फितुरी करतो असे महादजींच्या नजरेस आले. तेव्हा हळूहळू गोसावी बंधू महादजींच्या मर्जीतून उतरले. त्यांना महादजीनी झांशी प्रांतात जहागीर दिली होती, ती जप्त करण्यासाठी महादजीनी आपला सरदार केसोपंत यास त्याजवर पाठविला असता त्यास उमरावगीरने दगाबाजी करून मारले. तेव्हा त्याचे पारिपत्य करण्यासाठी महादजी शिंद्यांनी देवजी गवळी या सरदारास एप्रिल १७८६ त रवाना केले. गोसावी बंधूंचा पाडाव होऊन त्यांची सर्व चीजवस्त जप्त करण्यात आली तेव्हा ते पळून अयोध्येच्या नबाबाचे आश्रयास गेले.

कॉर्नवालीस हा ह्यावेळी गव्हर्नर जनरल होता. त्यास गोसाव्यांनी अयोध्येच्या नबाबाकडे आश्रय घेतला, हे कळल्यावर त्याने नबाबास तंबी देऊन गोसाव्यास आश्रय देऊ नका असे सांगितले.

महादजींनी बादशहाचे आसन सुरक्षित राखून त्याच्याकरिता खंडण्या वसूल करणे व बादशाही अंमल चालणारा मुलूख संपादन करणे ही दोन उद्दिष्टे साध्य करण्यासाठी आपला तळ मथुरेस दिला. या ठिकाणी राहून त्यांनी अनेक स्वाऱ्या केल्या. माळवा-बुंदेलखंड येथे महादजीबावांचा मुलूख होता. त्याची सुरक्षितता राखणे हेही काम महादजीबावा मथुरेस राहून पाहू लागले. आग्रा, दिल्लीच्या बादशहाचे स्थळ दिल्लीप्रमाणे ते बादशहाच्या ताब्यात राहिले पाहिजे, दुसऱ्याच्या अंमलाखाली जाता कामा नये याची काळजी महादजीनी घेतली होती.

**राजपूत संस्थानिकांशी संघर्ष- –जयपूर, जोधपूर हमदानी यांची महादजींविरुद्ध एकजूट :**

शिंद्यांना बादशाही चालविण्याचे सर्वाधिकार मिळाल्याने राजपूत राजांस-सुद्धा वैषम्य वाटले. राजपूत राजे बादशहाचे मांडलीक होते. त्याजकडून बादशहास खंडणी मिळत असे. तसेच त्यांना मराठ्यांना चौथाई वसुली द्यावी लागे. बादशहाची खंडणी व मराठ्यांची चौथाईची थकबाकी वसूल करण्यासाठी पाटीलबावांनी खुशालीराम बेहरा यास रवाना केले. त्याने जयपुरास जाऊन राणा प्रतापसिंगाची भेट घेतली आणि महादजींना हुंड्या व जवाहीर पाठवून ठरविलेल्या ६० लक्ष रुपयांपैकी सन १७८६ च्या मे महिन्यात फक्त ५ लक्ष रुपयांचा भरणा केला[१]. पुढे पावसाळा आल्यामुळे

१. म. शि. का. प. ले. ४७६.

बादशहा दिनांक २२ जून १७८६ रोजी दिल्लीस रवाना झाला. महादजीबावा सैन्यासह मथुरा वृंदावनास छावणीस परत आले व तेथे त्यांनी पाच महिने घालविले.

जयपूरच्या राण्यास पैशाकरिता तगादा लावण्यासाठी व कबूल केलेले ६० लक्ष रुपये खंडणी मिळविण्यासाठी रायाजी पाटील यास महादजी बावांनी जयपुराकडे ठेविले होते. मराठ्यांचा हा तगादा जयपूर राण्यास त्रासदायक वाटणे सहाजिकच होते. त्याने मराठ्यांचा नक्षा उतरवून त्यांना उत्तर हिंदुस्थानातून घालवून देण्यासाठी मसलत केली. ह्या मसलतीत त्याने जोधपुर राणा बिजेसिंग यास सामील करून घेतले. लखनौ येथे ब्रिटिशांशी संधान बांधिले. पण त्यावेळच्या गव्हर्नर जनरल कॉर्नवालीस यास हिंदी संस्थानिकांच्या भांडणात पडावयाचे नसल्यामुळे त्याने आपला नकार कळविला. जयपूर-जोधपूरकरांनी उदेपूरच्या राण्यासही आपल्या बाजूस वळविले. आपल्या विरुद्ध राजपूत राजे एक झाल्याचे समजताच महादजींनी राजपुतान्यावर चालून जाण्याचे ठरविले. मदतीसाठी खंडेराव हरीस बुंदेलखंडातून व अंबाजी इंगळे यांस सतलज खोऱ्यातून परत बोलाविले. बादशहाचा राज्यारोहणाचा दिवस दिनांक १० मार्च १७८७ रोजी डीग येथे साजरा केला व दिनांक १६ मार्च रोजी डीग सोडून महादजी स्वतः जयपुरावर चालून गेले. हेतु हा की, रजपुतांवर मराठ्यांचा वचक कायमचा बसवावा म्हणजे इतर शत्रू देखील वळावणार नाहीत. मराठे फौजानी जयपूर राज्यातील गढ्या घेण्यास सन १७८७ च्या जून महिन्यात सुरवात केली. तेव्हा जयपूरच्या राजाने जोधपूरचे राठोड व सेनापती भिमसिंग यांच्या हाताखाली फौज जमा केली. तसेच सर्व कछवा जहागिरदारास इंग्रजांची मदत मराठ्यांविरुद्ध आपणास मिळते आहे असे खोटे सांगून त्यांना मराठ्यांविरुद्ध उठविले. स्वतः मात्र स्वसंरक्षणार्थ किल्ल्यात जाऊन राहिला[१]. जयपूरकरांचा दिवाण दौलतराम हळ्दा याने महादजींबरोबर पहिल्याने शत्रुत्व करणारा व नंतर मैत्री संपादून महादजींच्या सेवेत मोगल सेनेसह असणाऱ्या महंमद बेग हमदानीस फितूर केले. महादजीबावांची मोगल सेना फितूर केली. त्याप्रमाणे दिनांक ६ मे १७८७ रोजी मोगली सैन्याचे अधिकारी झुलफिकार अलीखान व मनसुर अलीखान तसेच २५ मे रोजी मुख्य सेनापती महमदबेग हमदानी हे मराठ्यांचे पारिपत्य करण्यासाठी जयपूरच्या राण्यास मिळाले[२].

जयपूर, जोधपूरकरांची सैन्ये व त्यात महमदबेग हमदानीच्या सैन्याची भर मिळून एकदंर जमाव ५० हजारांचा झाला. त्यांच्याजवळ ६० तोफा होत्या. मराठ्यांचे सैन्य या जमावावर चालून गेले. मराठे व रजपूत यांची लढाई दिनांक २८ जुले १७८७ रोजी झाली. ही लढाई जयपूर शहराच्या आग्नेयीस ३० मैलांवर लालसोट म्हणून गांव आहे तेथून १४ मैल अंतरावर

---

१. सरकार, एफ. एम. इ. व्हॉ. ३, पृ. ३५१.

२. कित्ता, पृ. ३५९-६०.

तुंगा आणि विदाखा या दोन गांवांच्या मध्यंतरी व तुंगाच्या आग्नेयीस दोन मैलावर असलेल्या मैदानात झाली. दोन प्रहरपर्यंत तोफांची मारगिरी झाली. नंतर मराठी सैन्यांतील घोडेस्वार चालून गेले तेव्हा राजपूत सैन्याचा गोल होता तो फुटून त्याचे दोन तुकडे झाले. मराठ्यांनी यावेळी गर्दी करून शत्रू सैन्यास दोन कोसपर्यंत मारीत नेले. एका बाजूस पाटीलबावांचा सरदार राणेखानभाई व जयपुरचा राणा हमदानी यांची लढाई जुंपली. मराठ्यांनी तोफांची मारगिरी केली. त्यात हमदानी तोफेचा गोळा लागून ठार झाला. मराठा फौजेने राण्याचा व हमदानीच्या फौजेचा पाडाव केला व त्यांना आपल्या गोटात घालविले. या लढाईत राठोडांचा व जयपूरवाल्यांचा १,००० मुडदा रणांगणात राहिला. शिवाय २,००० रजपूत जखमी झाले[१]. यानंतर तिसरे दिवशी ३० जुलै १७८७ रोजी महादजीकडील मोगली पलटणीनी दंगा केला. तेव्हा महादजींनी सर्व मराठे सरदारास एकत्र बोलावून खलबत केले. तेव्हा शिवाजीपंत विंचूरकर पाटीलबावास एकांती बोलले की, "समय पानिपतसारखा प्राप्त झाला. आता परीक्षा पहावयाची बाकी नाही. चार शेराची धारण, बाहेरुन रसद येत नाही. शिलेदार उपासाने मेले. घोडी मेली. वैरणीचा दुष्काळ. फौज राहिली त्यात सामर्थ्य नाही. लढाई कशाचे बळावर घ्यावी? चार दिवस येथून निघावे, पुढे पाहून घेऊ[२]." ह्या सल्ल्याप्रमाणे महादजीनी दिनांक १ ऑगस्ट १७८७ रोजी फौजांना माघारे फिरवून कूच करून डीग गावापर्यंत आणिले.

### मोगल, रोहिले व रजपूत यांचा मराठ्यांना विरोध :

मराठे डिगेस परत गेले हे कळतांच राजपुतानी माळवा-मेवाडातील मराठ्यांची ठाणी वळकावून प्रांतात उपद्रव सुरू केला. मोगल बादशहाजवळ बंदोबस्तास पलटणे होती त्यांनी तलबेकरिता दंगा केला. नजीबखान रोहिल्याचा नातू गुलाम कादर याने अंतरवेदीतील मराठ्यांचा अंमल उठविला. त्याने बादशहाचा कारभारी खोजा मनसूर अली नाजर यांस फितवून आपल्या बाजूस वळविले. मनसूर अलीच्या बोलावण्यावरून गुलाम कादर दिल्लीस दिनांक ५ सप्टेंबर १७८७ रोजी गेला. बरोबर दोन हजार रोहिले होते. त्यांच्या मदतीने दिल्लीत प्रवेश करून दिल्ली शहरावर ताबा मिळविला[३]. गुलाम कादरपुढे आपला टिकाव लागणे शक्य नाही हे ओळखून बादशहाचे बंदोबस्तास असलेले लाडोजी देशमुख व शहा निजामउद्दीन यांनी सन १७८७ च्या नोव्हेंबर महिन्यात दिल्लीहून पलायन केले.

शिंद्यांनी अलवारच्या रावराजाच्या मुलखात व जयपूरकरांच्या मुलखात सप्टेंबर १७८७ त फौज पाठविली. जयपुरकरांनी शिंद्यास उघड विरोध करण्याचे टाळून शिंद्यांच्या ताब्यातील आग्रा किल्ल्यावर महमद बेग हमदानीचा

१. म. शि. का. प. ले. ५००, ५०३.

२. सरकार, एफ. एम. इ. व्हॉ. ३, पृ. ३६७.

३. कित्ती, पृ. ४३४.

पुतण्या इस्माईल बेग यास फौज व तोफा देऊन पाठविले. त्याने शिंद्यांचा किल्लेदार मुसा लुस्तुनो यास फितुर केले, तेव्हा ह्या फितुराने मराठे फौजेवर छऱ्यांचे गोळे मारून इस्माईल बेग यास शहरात घेतले. या ठिकाणी इस्माईल बेग यास पुष्कळ द्रव्य मिळाले[१].

अशा रीतीने उत्तर हिंदुस्तानात मराठ्यांवर चोहो बाजूनी संकट परंपरा कोसळली[२]. या बिकट परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी शिंद्यांनी दक्षिणेतून पैसा व फौज पाठविण्यासाठी नाना फडणिसास लिहिले. नानांनी शिंद्यांकडे पाच लाख रुपये रवाना केले. व मदतीसाठी तुकोजी होळकर व अलिबहाद्दर यांना दिनांक ८ सप्टेंबर १७८७ रोजी दहा-बारा हजार फौजेनिशी रवाना केले. पण हे सैन्य एक वर्षाच्या विलंबाने शिंद्यास जाऊन मिळाले. दरम्यान गुलाम कादरचे पारिपत्य करण्यासाठी बादशहाने शाहजादा जवानबख्त यास दिनांक ८ डिसेंबर १७८७ रोजी दिल्लीस बोलावून घेतले. पण शहाजाद्याने बादशहाचे न ऐकता तो मोगल पक्षास सामील होऊन मराठ्यांचे पारिपत्य करण्यास तयार झाला. बादशहा एकाकी पडला. त्याचे अंगी दिल्ली कारभार जातीनिशी रेटण्याची कुवत नसल्यामुळे तो या फितुरास सामील झाला आणि शहाजादा जवानबख्त व गुलाम कादर यांना फौजेसुद्धा इस्माईल बेगचे मदतीकरिता आग्र्यास रवाना केले. अशा प्रकारे जयपूर-जोधपूरचे राजपूत व मोगल, सर्व उत्तर हिंदुस्थानी मराठ्यांविरुद्ध एक झाले. जोधपूरकरांनी अफगाणच्या तैमूरशहाकडे आपला वकील पाठवून त्यास हिंदुस्तानवर स्वारी करण्यासाठी बोलाविले. इंग्रज व पंजाबचे शीख यांनाही त्यांनी मराठ्यांविरुद्ध उठविण्याचा प्रयत्न केला. अशा प्रकारे मराठे बिकट परिस्थितीत होते. तेव्हा शिंद्यांनी इस्माईल बेगपासून आग्रा शहर परत मिळविण्याचे ठरविले. इस्माईल बेगची छावणी शिकंदऱ्यास होती तिकडे कूच केले. मराठ्यांची व इस्माईल बेगची लढाई होऊन त्याने मराठ्यास चंबळ पलिकडे रेटीत नेले. वस्तुत: आग्र्यास छावणीस गेला.

मराठ्यांनी डिसेंबर १७८७ पासून चार महिने ग्वाल्हेर प्रांती घालविले. त्यामुळे इस्माईल बेगने आग्रा येथील मोर्चाचा बंदोबस्त करून, फौजा, तोफखाना व पलटणेसुद्धा चमेल उत्तर तिरी येऊन दाखल झाला. त्यास गुलाम कादर येऊन मिळाला. तेव्हा त्याच्या पारिपत्यासाठी महादजीनी फौज रवाना केली. मराठी फौजेच्या कुमकेस भरतपुरच्या जाटाने आपल्याकडील दहा हजार फौज व दोन पलटणे पाठविली. फौज आग्र्याकडे कूच करून जात असता गुलाम कादर व इस्माईल बेग त्यांच्यावर चालून गेले. दोन्ही पक्षाकडील सैन्यात २१-४-१७८८ रोजी किरोली येथे लढाई झाली. या लढाईत दोन्हीकडील बरीच हानी झाली[३].

---

१. तत्रैव, पृ. ४०८.

२. म. शि. का. प. ले. ५०२, ५०६, ५०८, ५११ ते ५१३.

३. तत्रैव, ले. ५२०.

त्यानंतर मराठे व जाट भरतपुरास गेले. इस्माईल बेगने भरतपुरास वेढा दिला. दिनांक १ मे १७८८ रोजी मराठे व जाट यांची इस्माईल बेगबरोबर भरतपूरच्या ईशान्येस दोन मैलावर लढाई झाली. पण ती अनिर्णीत राहिली. पुढे इस्माईल बेग व गुलाम कादर यांनी भरतपूर सोडून कुंभेरीस वेढा दिला. तो किल्ला आपल्या ताब्यात घेतला. नंतर ते तिथून डीगला गेले. पण डीगच्या किल्ल्यातून त्याजवर मारा झाल्यामुळे ते १८ मे १७८८ रोजी पळून गेले. मराठे व जाट यांनी या दोघांचा फत्तेपूर शिक्रीपर्यंत पाठलाग केला. पुढे दिनांक २५ मे १७८८ रोजी गुलाम कादर व इस्माईल बेग यांनी आग्र्याबाहेर सैन्याचा तळ दिला. तळावरून आग्र्यास मोर्चे बसविले व तोफांची मारगिरी करु लागले. तेव्हा मराठा फौजेने त्यांची रसद बंद केली. इस्माईल बेगचे मथुरा-वृंदावनचे ठाणे जिंकले आणि यमुना नदीपार जाऊन गुलाम कादरचे मोटमहाबन येथील ठाणे व तोफा काबीज करून, पलटण मारून काढिले. याच वेळी गुलाम कादरचे मुलुखात शिखांनी दंगा मांडला होता. यामुळे गुलाम कादरला दोन आघाडीवर लढणे प्राप्त झाले. ह्या परिस्थितीस घाबरून गुलाम कादर दिनांक १५ जून १७८८ रोजी इस्माईल बेगला सोडून फौजेसुद्धा स्वतःचे मुलुखाचे बंदोबस्तासाठी यमुनापार गेला[१].

इस्माईल बेग एकाकी पडलेला पाहून मराठ्यांनी आपली फौज एकत्र जमवून १८ जून १७८८ रोजी इस्माईल बेगशी लढाई केली. मराठ्यांबरोबर डी बॉईनची कवाईती पलटणे होती. त्यांनी शत्रूची पलटणे कापून काढिली. इस्माईलखान शिकस्त खाऊन २५ स्वारानिशी यमुनापार गुलाम कादरकडे गेला. परंतु गुलाम कादरने इस्माईल बेग यास सांगितले की तुम्ही सोय पडेल तिकडे जाणे. म्हणून तो लखनौकडे गेला[२].

या लढाईमुळे आग्र्याचा शह सुटला आणि मथुरेपर्यंतचा प्रदेश मराठ्यांना मोकळा झाला.

**गुलाम कादरचा लाल किल्ल्यात धिंगाणा :**

१८ जूनच्या बागडेहराजवळील आपल्या विजयानंतर महादजी शिंदे यांनी मथुरेस जाऊन दिनांक ४ जुलै रोजी तेथे मुक्काम केला. येथे रणजीतसिंग जाट आपल्या सैन्यासह येऊन महादजीस मिळाला. महादजीबावांची बाजू त्यामुळे बळकट झाली.

असहाय्य झालेल्या महादजीनी पुणे दरबाराकडे मदतीची याचना केली. नाना फडणिसास पत्रे लिहून उत्तरेतील मराठी सत्ता दृढ करण्यासाठी पैसा व फौजेची किती आवश्यकता आहे हे विस्तृतपणे सांगितले. दिल्लीची बादशाही आणि उत्तर हिंदचे राजकारण हातचे जाण्याने गेल्या पन्नास साठ वर्षांतील

१. तत्रैव, ले. ५२२, ५२५.
२. कित्ता, ले. ५२५, ५२७.

मराठेशाहीचा सगळा उद्योगच निष्फळ होणार होता. मराठ्यांचा सगळाच दरारा संपणार होता. हे नाना फडणीस याने ओळखून महादजीच्या मदतीस तुकोजी होळकर व मस्तानीचा नातू अलिबहाद्दर ह्या दोघांना फौजांसह रवाना केले. पैशांचीही तरतूद केली. परंतु हे सरदार वेळेवर येऊन पोचले नाहीत. त्यांनी वाटेत एक वर्ष काढले. तुकोजी होळकर राजपुतान्यात शिरून त्याजपासून खंडण्या गोळा करण्याचे काम करू लागला. त्याचा त्रास महादजीस होऊ लागला. अलिबहादूर खुद्द पेशवे घराण्यातील होता. त्याचा उपयोग उत्तरेतील नबाबी राजकारण संभाळण्यास आपल्याला होईल असे महादजीस वाटत होते. पण तो लढाईच्या कामात कमकुवत आढळला. तुकोजी तर अगदी कर्तव्यशून्य, अतिशय हेकेखोर आणि भलताच भांडखोर होता. महादजींच्या प्रत्येक व्यवहारात तो कारण नसता ढवळाढवळ करीत असे. तशी नाना फडणिसाची त्यास फूसही होती. कारण महादजींचा उत्कर्ष नानास सहन होत नव्हता. म्हणून त्यांचे पाय ओढण्यासाठी तुकोजी व अलिबहादर ही दोन लोढणी महादजींच्या गळ्यात नानाने बांधली होती. यामुळे नाना आणि महादजी यामधील मतभेद आणि परस्परांविषयीचे संशय उगाचच वाढत गेले. अशा परिस्थितीतून महादजीस मार्ग काढावयाचा होता. हे दोघे सरदार उत्तरेस रवाना झाले. नोव्हेंबर १७८८ त अलिबहादर आणि एप्रिल १७८९ त तुकोजी होळकर महादजीस मथुरा येथे जाऊन मिळाले.

दरम्यान महादजीनी जून-जुलै १७८८ पर्यंत माळव्यातील आणि राजस्थानातील परिस्थिती बरीच आटोक्यात आणली. पुन्हा ठिकठिकाणी मराठ्यांचे अधिकारी वसुलीची आणि बंदोबस्ताची कामे करू लागले. याच काळात गुलाम कादर यास मन्सुर अली नाझी नावाचा झनानखान्याच्या मुख्याधिकाऱ्यांनी फूस देऊन किल्ल्यात घेतले. गुलाम कादरने दिल्ली राजधानीचा बंदोबस्त करून बादशाहीचा बंदोबस्त केला व बादशहास कैद केले. त्याने तमाम दौलत, जडजवाहीर, नाणे, रोकडसुद्धा घेतले. त्याने द्रव्य प्राप्तीसाठी बादशहाचे जनान्याचा झाडा घेऊन बेगमास मार दिला. या रोहिल्याने जनानखान्यातील कित्येक बेगमांवर जुलूम केला. काही बेगमा स्वतःचे ठिकाण जे गोसगड येथे पाठविल्या. दिल्लीच्या बादशाहीच्या पाचशे वर्षाच्या कारकीर्दीत गुलाम कादरने बादशाहीची जी बेअब्रू केली तशी कोणीच केली नव्हती[1]. गुलाम कादर व इस्माईल बेग दिनांक २९ जुलै १७८८ रोजी दिल्लीचे किल्ल्यात शिरले. त्यानंतर २ ऑक्टोबरपावेतो ते किल्ल्यातच होते. या दोन महिन्याचे अवधीत गुलाम कादरने शहा अलम बादशहास कैद करून पूर्वीचा मोगल बादशहा अहमदशहा याचा मुलगा महमदशहा यास तक्तावर बसविले व त्याजकडून १० लाख रुपये घेण्याचा करार केला[2].

---

१. शि. शां. रा. ज. ले. १४४, १४७, १५०.

२. म. शि. का. प. ले. ५३०.

गुलाम कादरने नवीन बादशहाचे सहाय्याने जनानखाना व राजपुत्रांचे महाल लुटले. एके दिवशी शहाजाद्यांना व दासींना आपल्या समोर उभे करून गावयास व नाचावयास लाविले, तसेच बादशहास दिवाणी इ-खासात ओढून आणून चाबकाने मारिले[१]. इतकेही करून द्रव्य मिळेना म्हणून बादशहास पुरलेल्या द्रव्याचा ठावठिकाणा विचारला,तेव्हा बादशहाने आपल्याला असे द्रव्य माहीत नाही असे उत्तर करताच तक्तावर हुक्का ओढीत बसलेल्या गुलाम कादरने एकदम उडी टाकून बादशहा शहा अलम यास खाली पाडले व त्याचे उरावर बसून पेषकबजाने बादशहाचे दोन्ही डोळे फोडले. शहरात सतत लुटालूट चालू ठेविली. इस्माईल बेग यास गुलाम कादरचे हे वर्तन मुळीच आवडले नाही. अशा वाईट कृत्यात आपण सामील असल्याने आपल्यावरही केव्हातरी गदा येईल म्हणून तो घाबरून गेला आणि सरळ महादजी शिंद्यास येऊन मिळाला[२]. महादजींनी काळजीपूर्वक योजना आखून ऑक्टोबर १७८८ त आपला सरदार राणेखान यास फौज व तोफा देऊन दिल्लीचा कबजा घेण्यास रवाना केले. तसेच गुलाम कादरचे अंतर्वेदीतील मुलुखात मराठी फौज पाठविली. अंतर्वेदीतील या मराठे फौजेने सन १७८८ च्या ऑक्टोबरात रोहिल्यांची ठाणी उठवून मराठ्यांचा अंमल पूर्ववत स्थापिला. मराठ्यांची फौज आपल्यावर चालून येत आहे असे पाहून गुलाम कादरखान दिल्ली सोडून आपल्या मुलुखाचे रक्षण करण्यासाठी निघून गेला. पुढे दिनांक ११ ऑक्टोबर १७८८ रोजी मराठी फौजेने दिल्लीच्या किल्ल्यात प्रवेश केला. त्यानंतर २२ ऑक्टोबर रोजी मराठे सरदार अंध बादशहा शहाअली यास नजर शिष्टाचार करून भेटले.

गुलाम कादरला पकडून आणण्याच्या कामगिरीवर राणेखान फौजेसह गेला होता. त्यास घाबरून त्याने मिरज किल्ल्याचा आश्रय घेतला. त्याने तिथे राहून मराठ्यांशी दोन महिने झुंज दिली. दिनांक १७ डिसेंबर १७८८ रोजी किल्ल्याचे बाहेर येऊन मराठ्यांशी लढाई केली. मराठ्यांनी कापाकापी सुरू केल्यावर गुलाम कादरने पळ काढला. त्याचा पाठलाग करून त्यास दिनांक १९ डिसेंबर १७८८ रोजी पकडले व पाटील बावांकडे रवाना केले. महादजींनी त्यास कैदेत ठेवून दिनांक ३ मार्च १७८९ रोजी ठार मारिले[३] व बादशहा शहा अलम यास पुन्हा तक्तावर बसविले. या थोर कामगिरीबद्दल शहा अलम बादशहाने खूष होऊन महादजी शिंदे यांना अलिजा बहाद्दर हा किताब दिला. मथुरा, वृन्दावन ही स्थळे मराठ्यांस पुन्हा मिळाली. महादजींच्या इच्छेप्रमाणे बादशहाने आपल्या मुलुखात गोवधबंदीचे फर्मान काढिले.

१. म. शि. का. प. ले. ५३२, ५३७, ५३८.

२. कित्ता, ले. ५३८.

३. कित्ता, ले. ५५०, ५५२.

**रजपुतांचा पाडाव :**

गुलाम कादरचा निकाल लावल्यावर महादजींनी रजपूत व इस्माईल बेग यांचा पाडाव करण्याचे ठरविले. महादजी व तुकोजी होळकर यामधील वैमनस्याचा फायदा घेण्याचे ठरवून होळकरास आपल्या बाजूस वळविले. होळकराने राजपूत संस्थानिकांची एकजूट बांधण्याचा व्यूह रचला. त्यास इस्माईल बेगही सामील झाला. त्यांचा पराजय करण्यासाठी पाटीलबावांनी मराठी फौज रवाना केली. त्यांनी दिनांक २० जून १७९० रोजी शत्रूचे फौजेवर मारगिरी केली. तेव्हा इस्माईल बेग, जयपूरवाले व राठोड यांचा मराठी फौजेने पाठलाग केला. शत्रूकडील लोकांची कत्तल करून शत्रूचा तोफखाना हस्तगत करून उधळून लावला[1].

त्यानंतर रजपुतांचा कायमचा निकाल लावण्यासाठी महादजीची स्वारी दिनांक २८ ऑगस्ट १७९० रोजी डेरेदाखल झाली. जयपूर व मारवाड या दोन संस्थानावर जाण्याच्या रोखे निघाली. तारीख ११ सप्टेंबर १७९० रोजी राठोडांशी मातबर लढाई झाली. लढाईचे समयी मराठे फौज राठोडवर चालून गेली. राठोडानी फार प्रतिकार केला. पण मराठ्यांच्या चढाईपुढे त्यांचा टिकाव न लागता राठोडाचे फौजेचा बीमोड होऊन राठोड पळून गेले. मराठ्यास यश प्राप्ती झाली.

त्यानंतर अजमीरपावेतो जाण्याचा विचार करून महादजींची स्वारी मारवाडात दाखल झाली. इतक्यात् जोधपूरचा राणा विजेसिंग याने आपला वकील महादजीकडे सलुखाचे बोलणे करण्यास पाठविला. तेव्हा सलुखाचे बोलणे होऊन दिनांक ६ जानेवारी १७९१ रोजी तह कायम झाला. ह्या तहान्वये जोधपूरचा राणा विजेसिंग याने मराठ्यास ६० लक्ष रुपये द्यावे असे ठरले. त्याशिवाय सांबर निम्मा अंमल, दोन लक्षाचे दोन महाल व अजमीर किल्ला द्यावा असा ठराव झाला[2].

• • •

---

१. म. शि. का. प. ले. ५७४, ५७५, शि. शा. राज. ले. २३८.

२. तत्रैव, ले. ५८६, ५८७, ५९२.

## महादजी शिंदे यांच्या उत्तरेतील कामगिरीचा शेवट
## (इ. स. १७८९ ते १७९१)

### कालसूची

| | |
|---|---|
| १७८८, नोव्हेंबर ६ . . | अलिबहाद्दर मथुरेस दाखल. |
| १७८९, फेब्रुवारी १४ . | महादजी शिंदे व अलिबहाद्दर यांची मथुरेस भेट. |
| १७८९, एप्रिल . . . | तुकोजी होळकर मथुरेस महादजी शिंद्यांकडे पोचतात. |
| १७८९, जुलै . . . | महादजी शिंदे एकाएकी आजारी पडतात. |
| १७९०, फेब्रुवारी . . | जयपुरकरांकडून खंडणी मिळण्यासंबंधी महादजी शिंदे ठराव करतात. |
| १७९०, जून २० . . | इस्माइल बेग व मराठे यांची लढाई |
| १७९०, ऑगस्ट १५. . | अजमेरच्या किल्ल्यास मराठ्यांचे मोर्चे. |
| १७९०, ऑगस्ट २८ . . | रजपुतांचा निकाल लावण्यासाठीं महादजी शिंदे डेरेदाखल होतात. |
| १७९०, सप्टेंबर ४ . . | नजफ कुलीखानाचा मृत्यू. |
| १७९०, सप्टेंबर ८ . . | मराठी फौजा जुना नदी पार करतात. |
| १७९०, नोव्हेंबर २५. . | अलवारचा प्रतापसिंग माचेडीकर यांचा मृत्यू. |
| १७९१, जानेवारी ६ . . | मारवाडचा वकील तहाकरिता महादजी शिंद्यांकडे येतो. |
| १७९१, सप्टेंबर ५ . . | महादजी शिंदे व चितोडच्या राण्याचा चितोडजवळ मुक्काम. |
| १७९१, नोव्हेंबर १७. . | चितोडगड महादजी शिंद्यांचे हवाली. |
| १७९१, डिसेंबर २२ . . | राणे खानकाई याचा मृत्यू. |
| १७९२, जानेवारी ५ . . | राणा व भीमसिंग यांचा निरोप घेऊन महादजी उज्जैनच्या रोखें दक्षिणेकडे निघतात. |
| १७९२, फेब्रुवारी १२ . | मोती बेगमबरोबर डी बॉयनचा विवाह. |
| १७९२, एप्रिल . . . | इस्माईल बेग मराठ्यांच्या हाती सापडतो. |
| १७९४ . . . . | अहल्याबाई होळकर यांचा मृत्यू. |
| १७९९ . . . . | इस्माईल बेगचा मृत्यू. |
| १८०२, ऑगस्ट २८ . . | कलिंजरच्या लढाईत अली बहाद्दर मारला जातो. |

# १९

## महादजी शिंदे यांच्या उत्तरेतील कामगिरीचा शेवट

(इ. स. १७८९ ते १७९१)

**महादजी शिंदे यास इंग्रजांकडून रोखठोक उत्तर :**

गुलाम कादरचा बंदोबस्त करून त्यास मार्च १७८९ मध्ये ठार मारून बादशहास महादजीनी पुन्हा दिल्ली तख्तावर नेऊन बसविले.[१] महादजींचे हे यश इंग्रजांच्या डोळ्यात सलले. कंपनीच्या अनेक जबाबदार अधिकाऱ्यांना वॉरन हेस्टिग्जचे शिंद्यांशी मैत्री ठेवण्याचे धोरण आवडत नव्हते. ब्राऊन, मॅलेट, कर्कपॅट्रीक, जेम्स अन्डरसन ही मंडळी शिंद्यांच्या वाढत्या सत्तेचा द्वेष करीत होती. महादजीनी तरी उगाच का घाबरावयाचे? महादजीनी गव्हर्नर जनरल मॅकफरसन यास पत्र लिहून बादशहाकडून इंग्रजांनी बंगालची दिवाणी मिळविली व त्या वेळेपासून त्या प्रांताची बादशहास येणे असलेली खंडणी मागितली. तसेच इंग्रजांच्या वहिवाटीस असलेल्या सुरत आदि जागांचीही खंडणी मागितली. ह्याच वेळी नागपूरकर भोसल्यांनी आपण बंगाल नबाबाचे सक्सेसर असून आपणा तिघास जानोजी, मुधोजी व रघोजी यांना इंग्रजांकडून बंगालची चौथाई मिळणे आहे ती त्यांनी द्यावी अशी मागणी वरील तिघांनी केल्यावर भोसल्यांशी मैत्री राखणे योग्य असल्याचे समजून वॉरन हेस्टिंग्जने त्यांना उत्तर देण्याची चालढकल केली. महादजीनी दिल्लीस आपले आसन इ. स. १७७४ ते १७८९ या काळात स्थिर केल्यावर त्याकडून बंगालची खंडणी इंग्रजांकडून मिळविण्यासाठी बादशहा व भोसले या दोघांकडून स्मरण-पत्रे येऊ लागली. इतकेच नव्हे तर निजामाने आपला खास दूत महादजींकडे पाठवून त्यास सांगितले की, उत्तर सरकार प्रांत इंग्रजांनी बळकावला, त्याबद्दलची खंडणी त्याजकडून येणे बाकी आहे ती महादजीने मिळवून द्यावी. महादजीस हे ठावूक होते की, इंग्रज कोणत्याही प्रकारच्या खंडणीच्या मागणीस भीक घालणार नाहीत. तरी पण निजाम, बादशहा व भोसले यांजकडून आलेल्या मागण्या महादजीनी कलकत्त्यास गव्हर्नर जनरलकडे पाठवून दिल्या आणि त्याचा पाठपुरावा न करता महादजीबावा त्या बाबतीत स्तब्ध राहिले. महादजीबावांनी उत्तरेस मराठ्यांचे बस्तान बसविण्यासाठी नाना फडणिसांकडे पैसा व सैन्य ह्यांची मदत मागितली. दिल्लीची बादशाही महादजीनी आपल्या ताब्यात ठेविली होती. उत्तरेत मराठ्यांचा दरारा बसविला होता.

---

१. म. शि. का. प. ले. ५५०—५५२, ५५५.

महादजींना मदत न केल्याने गेल्या पन्नास-साठ वर्षातील मराठेशाहीचा सगळा उद्योगच निष्फळ होणार होता. त्या बाजूने होणारी प्राप्तीही बंद होणार होती. मराठ्यांचा सगळाच दरारा संपणार होता. हे सगळे नाना फडणिसांना समजत होते म्हणूनच त्यानी महादजीस मदत देण्याची योजना आखली. वास्तविक ही वेळ अशी होती की, जेव्हा खुद्द पेशव्यांनी व नाना फडणीस या दोघांनी उत्तरेकडे जावयास हरकत नव्हती. पण नाना फडणिसानी तुकोजी होळकर व मस्तानीचा नातू अलिबहाद्दर ह्यांना महादजीच्या मदतीस पाठविले. अलिबहाद्दरची रवानगी केल्याचे नाना फडणीसानी महादजीस लिहीले कादरला जीवे मारल्यानंतर अलिबहाद्दरास महादजी बावांनी मथुरेस बोलावून घेतले. दिनांक १४ फेब्रुवारी १७८९ रोजी दोघांच्या भेटी झाल्या. त्यात अलिबहाद्दरने पाटीलबावांकडून खर्चाची मागणी केली. पाटीलबावांचा इरादा अलिबहाद्दरकडे उत्तरेतील उद्योग सोपवून आपण पुण्यास जावे. अलिबहाद्दरने नानांच्या सल्ल्यानुसार महादजीची मसलत नाकारली. नानाने आपल्या तर्फेच्या तुकोजी होळकर, अलिबहाद्दर आदि सर्व सरदारांस महादजीशी विरोधाने वागावयास मुद्दाम शिकविले होते. तशा प्रकारची पत्रे अलिबहाद्दर व तुकोजीना लिहिलेली आढळतात. यावरून नानांच्या राजनीतीचा बोध होतो. महादजीबावा जर सर्व कारभाराची मुखत्यारी सांभाळणार, तर सर्वांनी त्याचे हुकूम बिनतक्रार पाळावयास हवे होते. नानांनी महादजीस पाठिंबा द्यावयास हवा होता. पण नानांनी त्यास पूर्ण पाठिंबा देण्याऐवजी आतून त्याचे पाय ओढण्याचा अश्लाघ्य प्रयत्न चालविला होता. हे पाहून उद्वेग वाटतो असे सरदेसाई म्हणतात तेच खरे.[1]

महादजींची पैशाची ओढाताण चालूच होती. त्यामुळे त्यांच्या फौजेची स्थिती निकृष्ट झाली होती. त्यांच्या फौजेत दंगे चालू होते. फौजांच्या देण्यामुळे लाचारी पत्करावी लागे. अशा स्थितीत नानांनी महादजीस त्यांच्या मदतीस पाठविलेल्या सैन्याचा खर्च देण्यास लिहिले. आपल्या मनाविरुद्ध सैन्याचा खर्च द्यावा लागतो हें पाहून महादजीनी उलट लिहिले की, मी जर खर्च द्यावयाचा तर त्याच पैशातून इथेच सैन्य उभे केले असते. ज्या अर्थी पुण्याहून कुमक रवाना होते आहे त्या अर्थी पुणे दरबारने त्या सैन्याचा खर्च सोसला पाहिजे. नानांनी अलिबहाद्दर यास निरोप देताना सांगितले होते की, महादजीबरोबरचा कार्यभाग संपल्यावर त्यांनी बुंदेलखंडात जाऊन मराठ्यांचा अंमल बसवावा. अलिबहाद्दर पुण्याहून तुकोजी होळकरांबरोबर निघाला. त्यांच्याबरोबर फौजा देण्यात आल्या आणि खर्चास पाच ते दहा लाख रुपये खर्चाची तरतुदही करण्यात आली. अलिबहाद्दर ६ नोव्हेंबर १७८८ रोजी मथुरेस येऊन दाखल झाले. त्यावेळी पाटीलबावा ३ कोस सामोरे जाऊन भेटले, मेजवानी दिली, नंतर जरीपटका व नौबत बरोबर देऊन दिल्लीचे रोखावर रवानगी करविली. याचे कारण अलिबहाद्दर खुद्द पेशवे घराण्यातले होते आणि शिवाय मुसलमान असल्याने त्यांचा उत्तरेतील

१. मराठी रियासत, उ. वि. भा. २, पृ. १८४.

नवाबी राजकारण सांभाळण्याच्या दृष्टीने फार उपयोग होईल असा महादजींचा कयास होता. पण कित्येक वर्षे उत्तरेत राहिल्यामुळे महादजीबावा कंटाळले होते. इतक्यात एप्रिल १७८९ अखेर तुकोजी होळकर मथुरेस पाटीलबावांजवळ येऊन पोचले. वाटेत रजपुतानी त्यास त्रास दिला आणि साफ कळविले की, "जयपुरकर व जोधपुरकर यास टाकून दिल्लीचा बंदोबस्त करू म्हणाल तर घडणार नाही". भेट झाल्यावर तुकोजीरावानी महादजीकडे मिळविलेल्या मुलखाची अर्धी वाटणी मागितली. हे तुकोजी बोलल्यावर महादजींनी झालेल्या खर्चाचा अर्धा वाटा उचला असे सांगितले. त्यावर तुकोजी बोलले "तुमचा आमचा भाऊपणा. एक भाऊ घरी असतो, एक कमाई करतो, परंतु वाटचास उभयता बरोबर" अशा रीतीने तुकोजीने उद्योग करण्यापूर्वी मुलखाच्या वाटणीचा प्रश्न काढून महादजीच्या उद्योगात खीळ घालण्याचे सूत्र चालू ठेवले. महादजीस वाटत होते की, अलिबहाद्दर व तुकोजी ह्या दोघांनी आपल्या हुकुमाने चालावे. वास्तविक नानाने ह्या सर्व सरदारास तसे वागण्याची ताकीद द्यावयास हवी होती पण तुकोजीने नानांच्या फूस लावणीने उत्तरेत येताक्षणीच राजपुतांकडे कारस्थाने चालवून महादजींनी आवळीत आणलेला त्याजवरील दाब ढिला केला आणि कोणत्याही उद्योगापूर्वी मुलखाच्या वाटणीचा प्रश्न काढून तो अडून बसला. वाटणीच्या या प्रश्नात अलिबहाद्दराचेही अंग होते. या कारणानी नवीन तक्रारी उपस्थित होत असताच हिंमतबहाद्दर गोसाव्याचे प्रकरण उद्‌भवले. ते महादजीबावांस दीड वर्ष पुरले.

### महादजीबावांच्या आजारपणामुळे राजकारण थंड होते :

जुलै १७८९ मध्ये महादजीबावा एकाएकी आजारी पडले. जबरदस्त दुखणे येऊन केवळ पुनर्जन्म जाहला. आरोग्याविषयी प्रयत्नही फार केला, अति अशक्त झाले. प्रकृतीला गुण पडेना तेव्हा थोर थोर ज्योतिषी मंडळींच्या विचारात आले की, हा शरीररोग नव्हे, कोणी प्रयोगादिक केले आहे. बारकाईने शोध घेतला, गोष्ट प्रसिद्धीस आली की, जयपुरवाल्याने व येथे हिंमतबहाद्दर गोसावी आला आहे त्याने बावास समाधान नसावयाकरिता अनुष्ठानास ब्राह्मण घालून हा प्रयोग केला. गोसावी बधू हे दोन्ही दगडांवर पाय ठेवणारे व उगवत्या सूर्यास नमस्कार करणारे होते. ज्याची चाकरी करतील त्याजशी विश्वासघाताने दगाबाजी करण्यास ते प्रसिद्ध होते. अगोदर ते अयोध्येच्या नवाबाकडे चाकरीस होते. नंतर त्यानी बादशहाची नोकरी केली. तदनंतर बादशहास सोडून ते महादजीबावांचे सहाय्यक सेवक बनले. कारण महादजीबावा बादशाही तख्तावर व राज्यावर हुकुमत चालवित होते. महादजीबावांना त्यांच्या विश्वासघातकी स्वभावाची कल्पना होती. महादजीबावांविरुद्ध रजपुतांना अंतस्थ सामील होऊन त्यांना महादजीबावांविरुद्ध उठाव करण्यास उत्तेजन देत होते. कदाचित राजपूत राजेरजवाड्यांकडून त्याने महादजीबावांविरुद्ध करणी करण्यासाठी लाचही घेतली असेल. चौकशीत कळून आले की, गोसाव्यांचे अलिबहाद्दराशी आतून सूत असून

गोसाव्यांनी असा बनाव घडवून आणला होता की, महादजीबावा आजारी पडून दक्षिणेत गेले म्हणजे वकील मुतालिकी पद अलिबहाद्दरास मिळेल. महादजीबावा व तुकोजी होळकर या दोघांमधील भांडणाचा फायदा गोसावी बंधूनी घ्यावयाचे ठरवून बावांना नाहीसे करण्याचे ठरविले. पाटीलबावा १७८९ च्या पावसाळ्यात आजारी पडले, ते कोणीतरी चेटूक केल्यामुळे असा समज कारभाऱ्यांचा होऊन करणी करणाऱ्याचा शोध सुरू झाला. त्यास वृंदावनास एक नागरीण बायको प्रयोग करीत होती तीस धरून आणिली. तिला मारहाण केली तेव्हा तिनें गुलजार खोजा दिम्मत हिंमतबहाद्दर याचे नांव घेतले. हे कळताच महादजीच्या माणसानी हिंमतबहाद्दरला पकडून ते महादजीबावांसमोर त्यास उभे करण्यास नेत असता त्यानें झुकांडी दिली आणि तो अलिबहाद्दरच्या छावणीत जाऊन पेशव्यांच्या निशाणाखाली लपला. अलिबहाद्दरला गोसाव्यास पाटीलबावांच्या स्वाधीन करण्यास सांगण्यात आले. त्यास अलिबहाद्दरनें नकार देऊन पुण्यास नानाकडे विचारणा केली. नाना फडणिसानें पहिल्यांदा अलिबहाद्दरची बाजू घेतली होती. पण महादजी-बावानी दक्षिणेत येण्याचा हेका धरल्याबरोबर अलिबहाद्दरास व तुकोजीस महादजींच्या आज्ञेत वर्तून कामगिरी करावी असे लिहून पाठविले. त्यानंतर बराच पत्रव्यवहार होऊन महादजीबावानी अलिबहाद्दरावर विश्वासून गोसावीस बुंदेलखंडात रवाना करण्याची परवानगी दिली.

हा एकंदर दीड वर्षाचा घोळ केवळ नाना फडणिसांच्या महादजीबावांस अंतस्थ खटपटीने दाबात ठेवण्याच्या युक्तिमुळे झाला. त्यामुळे मराठी राज्याचे हितसंबंध धोक्यात आले. महादजी आपणास डोईजड होऊ नये म्हणून त्याजबरोबर पाठविलेल्या सरदारांना त्याजशी फटकून वागण्यास सांगावयाचे, त्यांनी पुण्याहून उत्तर आल्याशिवाय महादजीबावांचे ऐकावयाचे नाही. त्यामुळे मराठ्यांच्या राज्यकारभारात भयंकर अव्यवस्था प्राप्त झाली. त्याला कारण भलेबुद्धीचे सागर, स्वार्थी व आपमतलबी नाना फडणीस होय असे म्हणावे लागते. उत्तर हिंदुस्थानात समस्त कारभाराची जबाबदारी महादजी शिंद्यांवर सोपवून त्यास पूर्ण पाठिंबा न देता राज्यकारभाराची सूत्रे हालविणाऱ्या नानासारख्या व्यक्ति जेव्हा दुटप्पी धोरणाने, व्यक्ति स्वार्थानें वागून राज्याची हानी करतात तेव्हा त्यास राजद्रोहीच म्हणावयास हवे. ह्या एक वर्षाच्या घोळात असे उघडकीस आले की, अलिबहाद्दरानें गोसाव्याचे हातून इस्माईल बेग व जयपुरवाले व बिजेसिंग राठोड वगैरेकडे मनस्वी राज-कारणे करविली. पाटीलबावांची फौज राजपुतांवर स्वारीस जाण्यास निघाली, तेव्हा अलिबहाद्दरास त्यांनी बहुत प्रकारें सांगितले की, श्रीमंताचे आज्ञेचे व शपथेचे स्मरण असावे, तुम्ही गोसाव्याशी मसलती करता, येणेकरून राज्यास अपाय आहे. गोसाव्यास अरुणास पाठवावे, फौजेची रवानगी राजपुतांवर करावी. तेव्हा अलिबहाद्दराने दोन महिन्यानी राजपुतांवरील मोहिमेस फौज रवाना केली आणि आतून लोकास ताकीद दिली की, प्रसंग पडल्यास हत्यार धरू नये. या अपराधाबद्दल नाना फडणिसांनी अलिबहाद्दरास शिक्षा

करावयास पाहिजे होती असे रियासतकार सरदेसाई म्हणतात तेच खरे.[1] रियासतकारांनी नाना फडणिसाच्या देशबुडव्या राजकारणाचे त्यावेळचे कागदपत्र वाचून मन उद्विग्न होते असे लिहिले आहे.

नानाने मुत्सद्यास शोभेल असे न वागता क्षुद्र, आपमतलबी, कपटी, सामान्य माणसासारखे वागून उत्तरेतील मराठ्यांच्या उद्योगास खीळ घातली. त्यामुळे तिकडील राजकारणे पुरी करण्यास महादजीबावांस आणखी दोन वर्षे घालवावी लागली. महादजीबावांकडे उत्तरेतील राजकारणाची अबाधित सूत्रे दिली असती आणि त्याजबरोबर कामगिरीवर असणाऱ्या अलिबहाद्दर, तुकोजी होळकर या सरदारांनी महादजीच्याच आज्ञेत वागा अशा आज्ञा सरकारातून दिल्या असत्या तर उत्तरेत मराठी सत्ता निर्वेध करून महादजी टिपूवरील स्वारीत मराठ्यांच्या मदतीस आले असते आणि ह्या सत्तेच्या राजकारणात टिपूच्या पराभवानंतर इंग्रजांचे पारडे जड झाले नसते. मराठी दौलतीचे दुर्दैव की, त्याची सूत्रे अशा आणिबाणीच्या वेळी एका क्षुद्र मनाच्या भिक्षुकाच्या हाती असावी.

अलिबहाद्दराचे व पाटीलबावांचे पटेना म्हणून अलिबहाद्दर बुंदेलखंडात जावयास निघाला. त्याजजवळ पैसे नव्हते. ऑक्टोबर १७९० ते मे १७९१ पर्यंत त्याने खंडणी जमविण्यासाठी राजपुतान्यात भटकंती केली पण यश आले नाही. शेवटी तुकोजीबावानी त्यास स्वतःच्या पतीवर साडेतीन लाख रुपये उसने दिले. तेव्हा स्वारी बुंदेलखंडास गेली. तिथे त्याने गोसाव्यांच्या मदतीने बुंदेले राजाकडून थकबाकी वसूल करण्याचा प्रयत्न केला. त्यात त्यास यश आले नाही. गोविंदपंत बुंदेले यांचे वंशज व महादजीच्या माणसांनीही त्यास बुंदेलखंडात जम बसवू दिला नाही. अनेक वर्षांच्या झटापटीनंतर त्याने बांदा हे लहानसे राज्य स्वतःकरिता निर्माण केले. कालिंजरला वेढा घातल्यावर त्याच लढाईत तो २८ ऑगस्ट १८०२ ला मारला गेला. १८५७ पर्यंत त्याचे वंशज बांद्याला राज्य करीत होते. १८५७ च्या उठावात त्यांनी भाग घेतला म्हणून इंग्रजांनी बांदा खालसा केले.

महादजी आणि तुकोजी होळकर या दोन सरदारांनी उत्तरेत पराक्रम गाजवून राज्यवृद्धी करावयाची, त्यापैकी महादजीनी पराक्रम करून राजपुतास काबूत ठेविले. तुकोजीरावांनी महादजींशी असहकार करून, फटकून वागून स्वाऱ्या केल्या. त्यात त्यास यश न येता कर्ज झाले. ते निवारण्यासाठी ते अहल्याबाईकडे सारखे पैसे मागत असत. अहल्याबाई राज्यकारभारात निपुण होती. तुकोजीच्या खर्चिक व्यवहारास तिने कधीच साथ दिली नाही. त्यामुळे तुकोजी व अहल्याबाई ह्यांचे कधीच पटले नाही. तुकोजी व्यसनाधीन होता. त्याचा कारभारीही अप्पलपोटचा व भानगडी नारो गणेश होता. होळकर घराण्यातील भांडणे मिटविण्याचा प्रयत्न नाना फडणीसांनी तुकोजी

---

१. मराठी रियासत, उत्तर विभाग, भा. २, पृ. २०३.

होळकरांस सत्ता देऊन केला पण अहल्याबाईनी त्यास नापसंती दर्शविली. तुकोजी होळकर एक वर्षानंतर मथुरेस महादजीबावांकडे आले आणि त्यांनी वाटणीविषयी बोलणे लाविले. खर्चाचा विचार मनात न आणता वाटणी दिली व जास्ती मुलूख दिला तरी समाधान नाही. मारवाडचे स्वारीस कबूल करून आले नाहीत. काशीबा व बापू होळकर मोहिमेवर होते त्यास माघारे बोलावून घेतले. मारवाडचांच्या फौजेस रसद पोचवू लागले. अशा प्रकारची मनस्वी राज्यविघातक कृत्ये तुकोजीराव करीत होते. अशामुळे तुकोजी मागे पडले. अहल्याबाई राज्य राखून होत्या. त्या १७९४ मध्ये निवर्तल्यावर होळकर राज्यास उतरती कळा लागली.

## उत्तर हिंदच्या कारभाराचा समारोप

(सन १७९०–९२)

**रजपुतांचा पाडाव :**

सन १७८९ च्या जुलैत महादजीस आजार जडला व गोसावी प्रकरण उत्पन्न झाले. ते निभावण्यात उत्तरेकडील मराठ्यांची शक्ति खर्ची पडली. त्यावेळी महादजीबावांस अलिबहाद्दर व तुकोजी होळकर हे आतून विरोध करीत होते. तर शत्रू म्हणून जयपूर, जोधपूर येथील राजे व इस्माईल बेग हे तिघे विरोध करणारे उरले होते. सन १७९० त स्वतःच्या हिंमतीवर महादजीबावानी एकेका प्रकरणाचा ताबडतोब निकाल लावला.

जयपूर राजपुताना पाटीलबावांचा दाब जाचक झाल्यामुळे ते देखील मराठ्यांचे वर्चस्व झुगारून देण्याचा प्रयत्न करीत होते. तेव्हा पाटीलबावा व तुकोजीराव यांच्यामधील वैमनस्याचा फायदा घेऊन राजपुतांनी मराठ्यात फंदफितुरी निर्माण करण्याचा कट केला. "महादजीच्या लष्करात बजाज (कापडाचे व्यापारी) व सराफ जयपूर मारवाडकडील होते. त्याशी संधान करून पाटीलबावांस दगा करावयाच्या सुत्रावर मारेकरी पाठविले. त्यामध्ये मोरामल म्हणून गोहदच्या राण्याकडील चाकर सामील असलेला आढळला. त्यास पकडून कैदेत ठेविले". तदुत्तर महादजीनी प्रथम जयपुराकडून दरसाल १५ लक्ष खंडणीचा ठराव करून घेतला (फेब्रुवारी १७९०).[1]

अलिबहाद्दर व तुकोजी होळकर जयपूर हद्दीत मोहिमेवर असताच महादजी-बावानी जयपूर प्रकरण संपविले, तसेच दुराणी तैमूरशहाशी बोलणी करून त्यांचा स्नेह जोडला, तेणेकरून अफगाणांची धास्ती नाहीशी झाली. त्यामुळे राजपुतांचा आधार तुटला. तेव्हा जयपुरवाले व मारवाडचे राठोड यांनी तुकोजी होळकरास असे वचन दिले की, "आम्ही सारे एकत्र होऊन तुम्हास (तुकोजीरावांस) हिंदुस्थानचे मालक करतो. शिंदे यासी तुम्ही आम्ही

१. म. रि. उत्तर विभाग, भा. २, पृ. २३३

मिळून काढून देऊ".[1] अशा प्रकारे राजपुतांनी तुकोजी होळकरास पाटीलबावांच्या कार्यात अडथळे निर्माण करण्यास प्रोत्साहन दिले. राजपुतांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तुकोजीरावांनी राजपुतांशी सलुखाची बोलणी केली आणि उदेपूर, कोटा, जयपूर आणि मारवाड या रजपूत संस्थानांची एकजूट करण्याचा व्यूह रचला. पाटीलबावांनी राजपुतांचा व तुकोजीचा हा डाव ओळखला; राजपुतांचा पाडाव करण्याचे ठरविले. पण राजपुताना पाटीलबावांच्या विरुद्ध एकत्र करण्याचे काम इस्माईल बेग हा हरामखोर करीत होता. त्याचे आणि जयपुरवाले व राठोड यांचे सूत्र फार जुने होते, तेव्हा इस्माईल बेगचे पारिपत्य करणे पाटीलबावांस जरूर होते.[2] पाटीलबावांनी ही कामगिरी तुकोजी होळकरवर सोपविली.

तुकोजी होळकराने मुनीमकशर येथील इस्माईल बेगचे ठाणे उडवून आपले ठाणे बसविले. पाटीलबावांकडे इस्माईल बेगने याबावतीत तक्रार केली. पाटीलबावांचे ठाणे सोडण्याचे सांगणे तुकोजीरावानी ऐकले नाही तेव्हा इस्माईल बेगने स्वत: होळकराचा अंमल उठविला. त्यावर आनंदून जाऊन जयपूरकर व जोधपूरकर यांनी इस्माईल बेगचा वस्त्रे पाठवून सन्मान केला. जयपुरकरांना इस्माईल बेगच्या वर्तनाचा जाव पाटीलबावांनी विचारला असता त्याने उद्धट उत्तर देऊन जयपूर व जोधपूर राजांशी आपला सलूख झाल्याचे सांगितले व महादजींशी बिर्जेसिंगाच्या मदतीने लढण्याची सिद्धता केली. हे बावास कळताच त्यांनी इस्माईल बेगच्या पारिपत्यास फौज कंपू रवाना केले. इस्माईल बेग, जयपूर व जोधपूर राजे एकत्र होऊन जयपूरचे उत्तरेस ५० मैल पाटणचे मुक्कामी डोंगराचा आश्रय धरून राहिले. तेथे जयपुरचे उत्तरेस बार्नोल व पाटणचे दरम्यान ही मोहीम झाली. मराठ्यांनी डोंगराचे आत जाऊन दिनांक २० जून १७९० रोजी शत्रूचे फौजेवर मारगिरी केली, तेव्हा इस्माईल बेग मराठी फौजेवर चालून आला. त्याची व मराठे फौजेची लढाई सुरू झाली. महादजीच्या बाजूने डि बॉयनने शत्रू सैन्यावर तोफांचा मार बेतऱ्हा केला आणि मराठे फौजेनेही दम एकदाच करून चहूकडून शत्रूशी लढाई करून शत्रूस उधळून लावले. तोफखाना हस्तगत केला व शत्रू सैन्याचा धुव्वा उडवून विजयश्री मिळविली.[3]

यानंतर पाटीलबावांनी रजपुतांचा कायम निकाल लावण्याचे ठरविले. त्याप्रमाणे बावांची खासा स्वारी दिनांक २८ ऑगस्ट १७९० रोजी डेरेदाखल झाली. गोपाळराव रघुनाथ, जिवबा बक्षी, काशीराव होळकर वगैरेंनी जयपूरचा रोख सोडून जोधपूरच्या मुलखांत रूपनगर, पर्वतसर, सांबर वगैरे ठाणी घेऊन अंमल कायम केला. अजमेरीस कूच करून शहर घेऊन किल्ल्यास

१. म. शि. का. प. ले. ५४५.

२. कित्ता, ले. ५४३, ५४६, ५४७, ५५६, ऐ. टि. भा. १, ले. ३.

३. कित्ता, ले. ५७४, ५७५, शि. शा. राज ले. २३८.
सं. दे. इ. सा. ले. २४५, २६१, २६२; सं. दे. प. ६, इ. पृ. २७४.

मोर्चे लाविले (१५ ऑगस्ट). विजयसिंगाने गावोगाव तपासणी करून १४–६० वर्षे वयाचे सर्व पुरुष लढाईसाठी जमा करून आणिले. दिनांक ८ सप्टेंबर रोजी मराठी फौजा जुनी नदी उतरून शत्रूस हैराण करू लागल्या. डी बॉयनने तोफांची सरबत्ती सुरू केली. त्यामुळे सैन्यात गोंधळ उडाला. चार हजार राठोडानी थेट तोफांवर चालून घेतले. पण तोफांमुळे पुढे एकही जिवंत राहिला नाही. दोन प्रहरापूर्वीच राजपुतांचा पराभव होऊन ते पळून गेले. मारवाडयांचा मोड होऊन पाटीलबावांस यश आले. मारवाडयांचा वकील बुधसिंग पाटीलबावाकडे अजमेरीस येऊन दिनांक ६ जानेवारी १७९१ रोजी तहाचा ठराव झाला तो असा,—

(१) चालू साली हप्तेबंदीने ४० लक्ष व पुढील सालापासून दरसाल ५ लक्ष याप्रमाणे ६० लक्षाचा भरणा करावा ;

(२) सांबर निम्मे, गोधा व आणखी एक असे तीन महाल कायम द्यावे ;

(३) अजमेरचा किल्ला पूर्वीचे सरंजामासह व हल्ली राजाने नवीन गांव लावून दिले त्या सुद्धा हवाली करावा.

अजमेरबरोबर पुष्कर तीर्थसुद्धा महादजीबावांच्या ताब्यात आले. तेथे त्यांनी लाखो रुपये धर्म करून मोठे देवालय बांधिले. जिंकलेल्या मुलखाचा कारभार लखबादादाकडे सोपविला.

जोधपूरप्रमाणे जयपूरचा मामलाही सन १७९० अखेर उरकला. प्रतापसिंगाने पूर्वीच्या मागणीप्रमाणे खंडणी कबूल करून आपला बचाव केला. विजयसिंगाने पुढे महादजीबावांविरुद्ध हालचाल केली नाही. अलवारचा प्रतापसिंग माचेडीकर दिनांक २५ नोव्हेंबर १७९० रोजी मरण पावला. हा बावांचा दोस्त होता. म्हणून त्याचा मुलगा बखावरसिंगास बावानी समाधानाची पत्रे व सरफराजीची वस्त्रे पाठविली. अलवारचा प्रांत हा खरा जयपूरकरांचा प्रांत. तो पुन्हा जयपूरकरानी हस्तगत करू नये अशी तजवीज महादजीबावानी करून ठेविली. अलवार, धोलपूर व थोडे बहुत भरतपूर ही राज्ये महादजीबावांच्या कर्तृत्वाने आकार घेती झाली. हे इतिहासास विसरता येणार नाही.

महादजी राजपुतांशी लढाया व जाबसाल करण्यात गुंतले असता अलिबहाद्दरचे प्रकरण विकोपास जाऊन शेवटी उभयतांचा शेवटचा रामराम झाल्याशिवाय सन १७९१ च्या आरंभी अलिबहाद्दर बुंदेलखंडात निघून गेला. परमेश्वरी संकेत परस्परांचे मुखावलोकन होऊ नये असा होता. कारण महादजीबावा दक्षिणेत येऊन पुढे दोन वर्षांनी मरण पावले.

**चितोड काबीज, राजपूत युद्धाचा उपसंहार (सन १७९१ अखेर) :**

उदेपूरच्या मुलुखात बहुशः होळकरांनी अंमल बसविला होता. उदेपूर राजा भिमसिंगाने पाटीलबावांचे व होळकरांचे महालात उपद्रव करून तमाम अंमल उठविला आणि आपली ठाणी बसविली. उदेपूरचा राणा लहान

मूल; पटाईत कारभारी यांनी आपल्या हाती पडल्या त्या जागा दाबून वसले. भिमसिंग कारभारी चितोड किल्ला वगैरे जागा दाबून बसला. सरकारचे मामलतीचा पैका येईना. चितोडनजीक ६ कोसावर मुक्काम करून चितोड-करांकडे खंडणी मागितली, चितोडकरांनी साफ उत्तर केले की, "आम्हापाशी दारुगोळी आहे. प्रांतातील पैसा तुम्ही घेतला. आता मेहेरबानी राखून आल्या मार्गी जावे". तेव्हा साम व दंड दोन्ही प्रकार सरदारांमार्फत पाठवून राणाजीस आपले भेटीस आणिले. दिनांक ५ सप्टेंबर १७९१ रोजी भेटी होऊन चितोडजवळ येऊन दोघांनी मुक्काम केला. बावा दोन कोस सामोरे जाऊन भेटले. चितोडचा मुलूख बावांनी घेतला. फक्त किल्ला राहिला. त्यास जावसाल जमेना तेव्हा चितोडनजीक दोन कोस जाऊन बावानी चितोड-गडास मोर्चे लाविले (ऑक्टोबर). १७ नोव्हेंबर[1] रोजी चितोडगड शिंद्याचे हवाली झाला. त्यावर राणाजीचा बंदोबस्त करून दिला. अंबूजी इंगळ्याबरोबर दहा हजार फौज व समरुची पलटणे चार अशी जमात देऊन मामल्याचा पैसा वसूल करावा असे सांगून राणा व भिमसिंग यांचा निरोप दिनांक ५ जानेवारी १७९२ रोजी घेऊन उज्जैनचे रोखे दक्षिणेस जावयास निघाले.

**इस्माईल बेगची वासलात (डिसेंबर १७९१–एप्रिल १७९२) :**

गुलाम कादर प्रमाणेच इस्माईल बेगने महादजीबावांचा पिच्छा पुरविला. त्याला ह्यावेळी कोणीच वाली नव्हता. तसेच त्यास सामोपचाराने वागवून उद्योगास लावण्यांची महादजीने पराकाष्ठा केली. त्यात त्यास यश आले नाही म्हणून त्याने भटकंती पत्करली. त्याचप्रमाणे दुसरा सरदार नजफकुली-खान अंग लपवून दूरदूर रहात होता. दोघांचा काटा परस्पर निघावा या उद्देशाने बावांनी त्याजवर इस्माईल बेगला रवाना केले. दोघांच्या लढाया झाल्या. पण महादजीबावांचा हेतू सफल झाला नाही. नजफकुली कनोडघीत असता ४ सप्टेंबर १७९० रोजी मृत्यू पावला. त्यानंतर इस्माईलने कनोड घेऊन तो बिजेसिंगास मिळाला. बिजेसिंगाचा मराठ्यांनी पराभव करून त्याजशी तह केल्यावर बिजेसिंगास सोडून इस्माईल बेग गुजरातेत गेला. गायकवाड फौजेने त्याचा पाठलाग केल्यावर तो पुन्हा नजफकुली खानाची बायको कनोडला होती तिच्या आश्रयास गेला. खंडेराव हरीस हे समजताच त्याने मथुरेहून तोफा आणून कनोडवर डागल्या. कनोड पडले. इस्माईल बेग एप्रिल १७९२ रोजी मराठ्यांच्या हाती सांपडला. नजफ कुलीखानाच्या बायकोची एक कन्या मोती बेगम हिच्याशी डी बॉयनने दिनांक १२ फेब्रुवारी १७९२ रोजी लग्न केले होते. तिच्यामार्फत डी बॉयनची हमी पैदा करून त्याने आपला जीव वाचविला. तदनंतर कुटुंबासहित आग्र्याचे किल्ल्यात ठेवण्याचा विचार पाटीलबावांचे मर्जीने ठरला. दरमहा सहाशे रुपये खर्चाची नेमणूक करून दिली. आग्र्यात आठ वर्षे कैद भोगून हा इस्माईल बेग शेवटचा मुत्सद्दी व शिपाई सन १७९९ त मरण पावला. गुलाम कादर व

१. पी. आर. सी. व्हॉ. १, ले. २७१, २७५.

इस्माईल बेग यांचे निकाल लागले तेव्हाच महादजीबावांचे चित्त स्वस्थ झाले व उत्तरेतील कारभार निर्वेध झाला.

महादजीबावांचा परम सहाय्यक व निकट दोस्त राणे खानकाईबावांचा चितोडगडाजवळ मुक्काम असताच दिनांक २२ डिसेंबर १७९१ रोजी मृत्यू पावला. पाटीलबावा बहुत श्रमी झाले. तो बावांचा जिगर दोस्त होता. नाना फडणीससुद्धा महादजीबावांना वळविण्याकरिता राणेखानभाईकडे वशिला लावीत. त्याच्या पश्चात त्याचा मुलगा हसनखान यानेही लढवय्या म्हणून नांव गाजविले. याचे घराणे शिंदेशाहीत १९४७ पर्यन्त सरदारीत होते.

• • •

## मराठेशाहीतील स्वास्थ्याचा अंतर्गत शांतता व राज्य वृद्धीचा काळ

### कालसूची

| | |
|---|---|
| १७८२, मे १७ . . . | हैदरास पिटाळून लावण्याबद्दल महादजी शिंद्यांकडे इंग्रजांचा तगादा. |
| १७८२, जुलै १२ . . | सर आयरकूट हैदरास तहाच्या अटी कळवितो. |
| १७८२, डिसेंबर . . | हैदराचा मृत्यू. |
| १७८४ . . . . | चार्लस् मॅलेटची इंग्रज वकील म्हणून पुण्यास नेमणूक. |
| १७८४, मार्च . . . | टिपू व इंग्रज यांचा तह. |
| १७८४, मे १६ . . . | नाना फडणीसची टिपूविरुद्ध बोलणे करण्यासाठी निजाम अलीशी भेट. |
| १७८५, जानेवारी २७ . | महादजी शिंद्यांकडे जाण्यासाठी मॅलेट पुणे सोडतो. |
| १७८५, मार्च १. . . | वॉरन हेस्टिंग्ज कारभार सोडतो. |
| १७८५, मे २० . . . | महादजी मथुरा येथील छावणीत त्यांना भेटतो. |
| १७८५, जून . . . | मॅलेट महादजी शिंदे यांची छावणी सोडतो. |
| १७८५, सप्टेंबर. . . | कित्तूर व नरगुंदच्या राजावर टिपूचा हल्ला, बायका-मुलांना कैद व त्यांची श्रीरंगपट्टणास रवानगी. |
| १७८५, ऑक्टोबर १८ . | मॅलेटचे कलकत्त्यास आगमन. |
| १७८५, नोव्हेंबर १३. . | मॅलेटचे समुद्रमार्गे कलकत्त्याहून मुंबईकडे प्रयाण. |
| १७८६, जानेवारी १७ . | मॅलेटचे मुंबईस आगमन. |
| १७८६, फेब्रुवारी १५ . | यादगीर येथे नाना फडणीस निजाम अलीची भेट घेतो. |
| १७८६, मार्च ३. . . | मॅलेट पुण्यास आपल्या पदाची सूत्रे हाती घेतो. |
| १७८६, मे २१ . . . | टिपूचा बदामीचा किल्ला मराठे सर करतात. |
| १७८६, ऑक्टोबर २. . | टिपूचा सावनूरवर जोराचा आकस्मिक हल्ला. |
| १७८६, ऑक्टोबर १० . | टिपू सावनूर सर करतो. |
| १७८७, मार्च . . . | गजेंद्रगडचा तह. |
| १७८७, जून ८ . . . | टिपूच्या ताब्यांतील गजेंद्रगडचा किल्ला मराठे जिंकतात. |
| १७८७, ऑक्टोबर . . | महादजीबावांकडे इंग्रज वकील म्हणून कर्कपॅट्रिकची नेमणूक. |
| १७८७, ऑक्टोबर २० . | मेजर विल्यम पामरची रेसिडेंट म्हणून महादजी बावांकडे नेमणूक. |



दुसऱ्या माधवराव पेशव्यांचा दरबार

# २०

# मराठेशाहीतील स्वास्थ्याचा अंतर्गत शांतता व राज्य वृद्धीचा काळ

## (१७८४–१७९२)

**सालबाईच्या तहानंतर मराठी राज्याची स्थिती — इंग्रजांचा वाढता जोर — इंग्रजांची राजकारणे — टिपू, रोहिले, काशीचा राजा — अयोध्येच्या बेगमा — नंदकुमार — नंदकुमार सूड — इंग्लंडमध्ये हेस्टिंजची चौकशी व सुटका — इंग्रज-मराठे-म्हैसुरकर आणि निजाम-महादजीचा हैदरास दम**

### मराठी राज्याची स्थिती (इ. स. १७८४) :

पहिल्या इंग्रज-मराठे युद्धाची समाप्ती झाली तेव्हा सवाई माधवराव पेशवे फक्त दहा वर्षांचे होते. राज्य व्यवहाराचे शिक्षण त्यांना नाना फडणीसांकडून मिळत होते. नानांचा करडा स्वभाव होता. तसेच सत्तालोभ आणि धनलोभासाठी वाटेल ती कारस्थाने करण्याची नानांची तयारी असे. मराठ्यांच्या सत्तेच्या मध्यवर्ती स्थानाची सर्व सूत्रे आपल्या हाती राहिली पाहिजेत हे सूत्र ठेवून नाना सवाई माधवरावास शिक्षण देत होते. सवाई माधवरावास महादजीसारख्या दिगंत, शौर्यशील, राजकारणपटू आणि उमद्या स्वभावाच्या राजकारणपटूकडून शिक्षण मिळावयास हवे होते. पण पेशव्यांच्या दुर्दैवाने तसे झाले नाही. नानानी पेशव्यास शिकवून तयार करण्याची जबाबदारी स्वत:वर घेतली. त्यामुळे नानातील उणीवामुळे त्यांचे शिक्षण पाहिजे तेवढे विशाल झाले नाही. नाना फडणीसांनी त्यांना स्वतंत्रपणे काही करूच दिले नाही. कारभाराची सूत्रे आपल्या हाती ठेवून खलवते, स्वाऱ्या, समारंभ, नित्य नैमित्तिक वगैरे सर्व व्यवहार नाना फडणीस स्वत:च करीत असत. स्वत:च्या मुखत्यारीने त्यांनी हे व्यवहार पेशव्यास करावयास लावले नाहीत व तसे शिक्षणही दिले नाही.

सालबाईच्या तहाने इंग्रज-मराठे युद्ध संपुष्टात आले. ह्या तहातील गुणदोष त्यातील कलमे पहाता सहज लक्षात येण्यासारखे आहेत. सालबाईच्या तहाने मराठ्यांना थोडी उसंत मिळाली आणि राघोबादादा हाती आले; ह्या दोन गोष्टी हिताच्या झाल्या. पण इंग्रज-मराठे युद्ध लवकर संपुष्टात यायला मराठ्यांचे बाजूने हैदराने इंग्रजांविरुद्ध केलेला जोरदार उठाव हे होय. असे असता हैदरास सोडून मराठ्यांनी इग्रजांशी परस्पर तह केला. हैदराने पेशव्यांशी इंग्रजांविरुद्ध लढण्यासाठी जो करार केला त्यात असे स्पष्ट कलम होते की, शांततेचा तह एकमेकांच्या विचाराशिवाय कोणाही एका सत्ताधीशाने करावयाचा नाही. मराठ्यांचा संग्राम इंग्रजांशी चालू असता हैदराने जर

कर्नाटकात इंग्रजांविरुद्ध उठाव केला नसता तर इंग्रजांनी मराठ्यांना ज्या अटी कबूल केल्या त्या केल्याच नसत्या. पण मराठ्यांनी इंग्रजांशी महादजींच्या मध्यस्थीने जो सालबाई येथे तह केला त्यावेळी हैदराचा विचार तर घेतला नाहीच उलट तहात "पेशव्याने हैदरास त्यानें घेतलेला इंग्रजांचा मुलख परत देण्यास भाग पाडावे" असे हैदराविरुद्ध कलम घालण्यास मान्यता दिली. मराठ्यांच्या ह्या कुटील राजनीतीचा हैदरास राग येणे स्वाभाविक होते. सालबाईचा तह झाल्यावर तहाप्रमाणे इंग्रज मराठ्यांना हैदरास कर्नाटकातून घालवून देण्यासाठी आपल्या मदतीस बोलावू लागले महादजी शिंदे यानी केलेल्या तहात नाना फडणीसाना काडीमात्र रस वाटला नाही. नानांनी ह्या तहावर शिक्कामोर्तब करण्यास जेवढा वेळ काढता येईल तेवढा काढला. तह झाल्याबरोबर कर्नाटकामधील इंग्रज सेनानी सर आयर कूट याने १२ जुलै १७८२ रोजी हैदरास पत्र लिहून तहाच्या अटी कळविल्या आणि ह्या अटीत नमुद केल्याप्रमाणे इंग्रजांचा जिकलेला मुलूख परत करण्यास सांगितले. हैदराने त्यावर एकतर्फी तह होत नाही असे शांतपणे सांगून तहाची प्रत मागितली. ती मिळाल्यावर उत्तर दिले की, "गेल्या दोन वर्षांत जो मुलूख मी मिळविला तो तुम्हाला किंवा दुसऱ्या कोणास खूष करण्यासाठी देऊन टाकण्यास घेतलेला नाही. धैर्य असेल तर तुम्ही तुमच्या मराठे व निजाम मित्रासह मुलूख घेण्यासाठी याल तर खरे, मग बघा तुम्हाला काय मिळते ते. मुलखाचे काय करावे या संबंधी तुमचा विचार मी घेणार नाही. तुम्हाला ह्या मुलखातील उत्पन्नाची एक पै ही मिळत नव्हती आणि यापुढेही ती मिळणार नाही हे मी पाहीन."[1]

तहावर १७ मे १७८२ रोजी सह्या होताच इंग्रजांनी महादजीबाबांकडे हैदरास कर्नाटकातून पिटाळून लावण्यासाठी सतत टुमणे लावले. महादजींनी नाना फडणीसाना इंग्रजांच्या मदतीस सैन्य पाठविण्यास सांगितले. यामुळे पुणे दरबार व नाना फडणीस यांची स्थिती मोठी चमत्कारिक झाली.[2] डिसेंबर १७८२ त हैदर मरण पावला. इ. स. १७८३ हे सबंध वर्ष हैदराचा मुलगा टिपू ह्याने इंग्रजास दमवून सोडले. मद्रास व बंगाल येथील इंग्रजांनी एकमेकांस साह्य न करता ते एकमेकांच्या विरुद्ध वाटेल त्या आगळिका करू लागले.

वॉरन हेस्टिंग्जने टिपू विरुद्धचे युद्ध जोमाने चालविण्याचा निर्धार केला असता मद्रासचा गव्हर्नर लॉर्ड मॅकरटने याने टिपूबरोबर तह करण्यासाठी बोलणी सुरू केली.[3] त्यामुळे टिपूस जोर चढून त्याने मे १७८३ ते जानेवारी १७८४ ह्या काळात मंगलोरच्या वेढ्यात इंग्रजांना दे माय धरणी ठाय केले. ब्रिटीशांनी शरणागती पत्करून त्यांना साखळदंडाने श्रीरंगपट्टणला कैदी

---

१. फॉरिस्ट, इम्पिरीयल सिलेक्शनस्, भा. ३, पृ ८८५—८९४.

२. न्यु-हि. ऑफ धी मराठाझ, भा. ३, पृ. १७४.

३. हसनखान एस्., हिस्टरी ऑफ टिपू सुलतान, पृ. ६२-६३.

म्हणून टिपूने पाठविले. मद्रास गव्हर्नर मॅकरटने याने गव्हर्नर जनरलच्या परवानगीची वाट न पहाता त्याने आपले कमिशनर्स टिपूकडे तहाची याचना करण्यासाठी पाठविले. त्यांना टिपून काही काळ तिष्ठत ठेविले. मार्च १७८४ मध्ये टिपूने इंग्रजांना अपमानास्पद असा तह केला.[१] तहाची बोलणी करण्यास आलेल्या इंग्रज वकिलांच्या उतरण्याच्या जागी टिपूने फाशी देण्याचे खांब मुद्दाम उभे करून ठेवले. त्या वकिलांना त्याने डोक्यावरच्या हॅटस् हातात उलटचा धरून तहाची भीक मागत दोन तास उभे करून ठेविले. पुणे व निजामाकडील वकिलांनाही त्याने अपमानास्पद वागणूक दिली. बादशहा ईश्वराची सावट जो टिपू त्याने शेवटी एकदाची तहास मान्यता दिली. टिपूच्या ताब्यात असलेल्या इंग्रज कैद्यांचेही त्याने अमानुष असे हाल केले होते. ह्या मंगलोरच्या तहाने कायमची शांतता निर्माण होणे शक्यच नव्हते. टिपू व इंग्रज एकमेकांवर भयंकर चिडलेले होते आणि योग्य संधी मिळताच क्षणाचाही विलंब न लावता पुन्हा एकमेकांविरुद्ध लढाईला उभे रहाणार होते.[२]

टिपू बापासारखाच शूर, निधडचा छातीचा होता. पण बापाचे शहाणपण व विवेक त्याजपाशी नव्हते. मराठचांनी केलेल्या विश्वासघातामुळे टिपू चिडून जाणे स्वाभाविक होते पण संतापाच्या भरात त्याने मराठ्यांवर व हिंदुंवर जी जुलूम जबरदस्ती केली ती एका जबाबदार सत्ताधिशाला शोभणारी नव्हती.

मंगलोरच्या वेढचात इंग्रज सांपडले असता इकडे महादजी शिंदे व नाना इंग्रजांना मदत पाठविण्याच्या विषयावर वर्दळीवर आले होते. टिपूला विरोध करण्यासाठी नानानी एक मराठा तुकडी हरिपंत फडके यांच्याबरोबर कर्नाटकात रवाना केली होती. ती अर्ध्या वाटेवर जाते तोच टिपूने तहास मान्यता दिली. त्यामुळे इंग्रजांनी मराठ्यांस न विचारता टिपूशी तह केला ह्याचा नानांना राग आला.[३] हेस्टिंग्ज १७८५ मध्ये स्वदेशास परत गेला. त्याच्या जागी गव्हर्नर जनरल म्हणून कॉर्नवालीस आला तेव्हा इंग्रजांच्या परिस्थितीत सुधारणा होऊ लागली. त्याने इंग्रजांनी मिळविलेल्या मुलुखात एकसुत्रीपणा निर्माण केला.

निजाम अल्लीने सुद्धा इंग्रज-मराठे युद्धाचा फायदा घेतला होता व मराठ्यांचा काही मुलूख दाबला होता. तो परत देण्यासाठी नानाने निजामास तगादा लावला. इतक्यात मंगलोरच्या तहाने उन्मत्त झालेला टिपू सैतानी उद्योग करू लागला. हिंदुंना बळजबरीने पकडून त्यांना मुसलमान धर्माची दिक्षा देण्याचा उद्योग त्याने सुरू केला. एकदा एका दिवसात पन्नास हजार हिंदुंना बाटविले. अनेक स्त्रियांची अब्रू घेतली. त्यातून नरगुंदचे संस्थानिक भावे यांच्या घराण्यातील स्त्रियाही सुटू शकल्या नाहीत. यानंतर मराठ्यांच्या

---

१. हसनखान एम्., ए हिस्टरी ऑफ टिपू सुलतान, पृ, ७६.

२. कित्ता, पृ. ८०.

कित्ता, पृ. ९१.

रायचुर दुआबातील मुलुखात शिरून तो उध्वस्त करू लागला. नानांनी हरिपंत फडके यांना फौज देऊन टिपूचे पारिपत्य करण्यास पाठविले होते. हरिपंत फडके यांच्या मदतीस तुकोजी होळकरांची रवानगी नानांनी केली. टिपूच्या विरुद्ध निजामअल्लीची मदत घेण्याचे ठरवून नानांनी ह्या संबंधी बोलणी करण्यासाठी निजामअल्लीची १६ मे १७८४ रोजी भेट घेतली.[१] यानंतर दोघा मुत्सद्यांच्या बऱ्याच गांठी भेटी झाल्या. निजामअल्लीने मराठ्यांची दोन वर्षाची चौथाईची बाकी देण्याचे कबूल केले व पावसाळा संपल्यावर आपण टिपूवर स्वारी करण्यासाठी मदतीस येतो असे वचन दिले.[२]

मराठे-निजामाचा आपल्या विरुद्धचा कट टिपूस समजताच त्याचा रागाने तिळपापड झाला. त्यानेही लढाईची तयारी करून निजामअल्लीस सांगून पाठविले की विजापूर आपल्या ताब्यात दे व मांडलिकी पत्करून दरसालची खंडणी दे. ह्या मागण्या करून न थांबता तो कृष्णेच्या दक्षिणेकडील निजामाच्या मुलुखावर तुटून पडला. मराठ्यांच्या धारवाड किल्ल्यावरही हल्ला चढविला. कित्तूर व नरगुंदच्या राजांवर विशेषेकरून टिपूचा दात होता. दोन्ही संस्थानावर हल्ला करून राजघराण्यातील बायका मुलांना कैद करून बेड्या घालून श्रीरंगपट्टणास पाठवून दिले (सप्टेंबर १७८५). दोन्ही शहरातील व्यापारी व सधन लोकांना लुटून त्यांना साध्या वस्त्रानिशी सोडले. टिपूने लिंगायतांनासुद्धा मुसलमान धर्माची दिक्षा दिली. बाटवाबाटीचा आपला आवडता पेशा जोरात चालण्यासाठी त्याने तरूण मुसलमान मुलांची फौज तयार केली व त्यांना तो हिंदु तरूण बायका पुरवू लागला. ही दुष्कृत्ये १७८५ च्या पावसाळ्यात घडली. पुण्यास नानांकडे ह्या धर्मच्छळाच्या वातम्या येऊ लागल्या तेव्हा नानांनी तुकोजी होळकर व नागपुरकर भोसले यांना टिपूवर रवाना केले आणि निजामअल्लीस मदतीस बोलाविले. १५ फेब्रुवारी १७८६ ला नानांनी निजामअलीची यादगीर येथे भेट घेतली.[३]

टिपूच्या आणि मराठ्यांच्या फौजा एकमेकांवर कोसळू लागल्या. मराठ्यांनी अनेक ठिकाणी माघार घेतली. परंतु २१ मे १७८६ रोजी मराठ्यांनी टिपूचा बदामीचा किल्ला काबीज करून त्याच्यावर चांगलीच कुरघोडी केली. ह्या प्रसंगी स्वतः नाना फडणीस मोहिमेत हजर होते. परंतु ह्याच स्वारीच्या सुमारास तुकोजी होळकर यांनी कित्तूर बेळगांवच्या बाजूने मुसंडी मारून मराठ्यांच्या मुलुखातूनच वसुली केली. तुकोजीच्या ह्या आडदांडपणामुळे मराठ्यांचे राजकारण दिवसेंदिवस बिघडू लागले. सावनुर येथे टिपूच्या फौजेने हरिपंत फडके व तुकोजी होळकर यांस माघार घ्यावयास लावली. यावेळी इंग्रजही तटस्थ राहिले होते. मध्यंतरी टिपूकडून मार खाऊन बंगलोरच्या तहाने त्यांचीही स्थिती चमत्कारीक झाली होती. एकंदरीत

१. ऐ. ले. सं. भा. ८, पृ. ३८५४.
२. कित्ता, पृ. ३८५७-५८.
३. कित्ता, पृ. ३९९६-९७.

इ. स. १७८७ चे दोन महिने गेले तरी कोणत्याच बाजूला निर्णायक विजयाची आशा वाटेना. नाना बदामीहून पुण्यास परत आले.[१] मराठी फौजा गजेन्द्रगडाहून किल्ल्याचे रोखे जाऊन त्यांनी तो किल्ला ८ जून १७८७ ला जिंकून घेतला. ह्याची भरपाई करण्यासाठी टिपूने निजामाच्या अदोनी किल्ल्यावर धडक दिली व तो किल्ला जिंकून घेतला. ह्या युद्धक्षेत्रात मराठ्यांचे सरदार हरीपंत व पटवर्धन होते. टिपूने त्यांना असा मार दिला की स्वतःच्या बचावाकरिता त्यांना तुंगभद्रा नदीच्या पैलतीरी जावे लागले.[२]

टिपूने मराठ्यांचा दोस्त सावनुरकर नबाब यावर हल्ला चढविला. सावनुरकरांच्या बचावास मराठ्यांना जाणे भाग पडले. तुकोजी होळकर, बेहेरे, पटवर्धन आदि सर्व मराठे सरदार सावनुरच्या युद्धात सामील झाले. टिपूही मोठ्या तयारीनिशी त्या सावनुरच्या मैदानात लढाईसाठी उभा ठाकला. टिपूजवळ कवाइती फौज होती. तसेच सुसज्ज तोफखानाही होता. मराठे सुमारे ७५ हजार सैन्य घेऊन एकत्र होते. युद्धास तोंड लागले तेव्हा मराठ्यांनी आपली जुनी गनिमी काव्याची युद्धपद्धती अंगिकारली. टिपूच्या तोफखान्यापुढे मराठ्यांचा निभाव लागेना. २ ऑक्टोबर १७८६ रोजी टिपूच्या आकस्मिक हल्ल्यामुळे हरिपंत फडके यांना पळता भुई थोडी झाली. टिपूचे लढाईचे डावपेच, त्याने अकस्मात बदलले. परिस्थितीजन्य पवित्रे, शत्रूचा उणेपणा लक्षात घेऊन मर्मी हल्ला करणे या गोष्टीमुळे विजयश्री टिपूने खेचून घेतली. एका बाजूस तहाच्या वाटाघाटीसाठी बोलणी लावावयाची, याचबरोबर रणांगण पेटतेच ठेवावयाचे, मराठ्यांकडील होळकरादी सरदारांशी गुप्त संधान बांधून त्यांना फोडावयाचे अशा प्रकारच्या भल्या बुऱ्या मार्गाने टिपूची सरशी होऊन त्याने १० ऑक्टोबर १७८६ रोजी सावनूर सर केले. गजेंद्रगडला लढाई चालूच होती. हरिपंत फडके यांना मराठ्यांच्या सैन्यात बेदिली दिसू लागली. म्हणून त्याने नानांस कर्नाटकात बोलाविले. पण युद्ध-आघाडीवर येणे नानांस पसंत नव्हते. त्यामुळे त्याने पुणे सोडण्यास नकार दिला. होळकर टिपूस आतून सामील होता त्यामुळे मराठे एकदिलाने व एकजुटीने टिपूशी युद्ध खेळत नव्हते. हे पुणे दरबारलाही कळून चुकले. तेव्हा मराठ्यांनी टिपूशी समेटाची बोलणी सुरू केली. मार्च १७८७ मध्ये तह घडून आला तो गजेंद्रगडचा तह म्हणून प्रसिद्ध आहे.[३] त्यातील अटी अशा : (१) टिपूकडून येणे असलेली पांच वर्षाची खंडणी रु. ६५ लाख होती ती ४८ लाखावर तुटली. पैकी ३२ लाख टिपूने ताबडतोब द्यावेत, १६ लाख सहा महिन्यांत द्यावेत. (२) बदामी, कित्तूर, नरगुंद ही टिपूने जिंकून घेतलेली ठाणी मराठ्यास द्यावी. अदोनी निजामअल्लीस द्यावे. (३) सावनूरच्या नबाबास मराठ्यांच्या संरक्षणाखाली परत देण्यात

१. पी. आर्सी. भा. २, ले. ५.

२. खरे, ऐ. ले. सं. भा. ८, पृ. ३९९९.

३. कित्ता, नं. ३०८३.

यावे. (४) एकमेकांचे कैदी परत करणे. तहाप्रमाणे टिपूने बरेचसे कैदी परत केले. ३२ लाख रुपये भरले. काळोपंत पेठे श्रीरंगपट्टणच्या तुरुंगात मरण पावला. मराठ्यांचा या युद्धाने विशेष फायदा झाला नाही. त्यांच्या राज्याची सीमा त्यावेळी तुंगभद्रा नदीस भिडली. पण ही स्थिती १७५६ पूर्वीची होती. मराठ्यांच्या फौजा ह्या तहानंतर परत फिरल्या.[१] तथापि ह्या तहाने युद्ध संपल्यासारखे नव्हते.

मराठ्यांचा टिपूशी पुन्हा संघर्ष झाला. तो गजेंद्रगडच्या तहानंतर चार वर्षांनी. मधल्या काळात हेस्टिंग्जच्या जागी कॉर्नवालीस गव्हर्नर जनरल म्हणून हिंदुस्तानात आला. त्याने इ. स. १७८६ ते इ. स. १७९३ एवढा काळ ह्या पदावर राहून हिंदुस्तानात इंग्रजांच्या दृष्टीने फार महत्त्वाची राजकारणे साधली. परिस्थितीचा नीट अभ्यास करून चारी बाजूंनी सर्व तपशीलांचा विचार करून सावकाशपणे, संथपणे पण पक्की पावले टाकणाऱ्या ह्या मुत्सद्याने इ. स. १७८८ च्या अखेरीपर्यंत कोणत्याही मोठ्या राजकीय उलाढाली केल्या नाहीत. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धात ह्या मुत्सद्याचा पराभव झाला होता. तो धुवून काढण्यासाठी त्याला काही कर्तृत्व हिंदुस्तानात दाखवावयाचे होते. कॉर्नवालिसने आल्याबरोबर कंपनीचा अंतर्गत कारभार सुधारण्याच्या दृष्टीने तडाख्याने अनेक उपाययोजना केल्या. हिंदुस्तानच्या राजकारणात आपल्याला टिपू आणि मराठे दोघेही जबरदस्त शत्रू आहेत हे ओळखले आणि एकंदर घडामोडीचे नीट निरीक्षण करून पुणे दरबारशी स्नेह करून आधी टिपूचा बंदोबस्त करावयाचा असे धोरण त्याने आखले.[२]

याच वेळी टिपू सुलतानाने फ्रेंचांशी संगनमत केल्यामुळे इंग्रजांना टिपू मोठा शत्रू वाटणे सहाजिक होते. मराठे, इंग्रज व टिपू या तीन सत्ता हिंदुस्तानात शिरजोर होत्या. पैकी इंग्रजांना टिपूने मंगलोर येथे केलेल्या अपमानाचे शल्य बोचत होते व इंग्रज टिपूला बुडविण्यासाठी शिस्तबद्ध पावले टाकीत होते. दरम्यान निजाम, इंग्रजानी मराठ्यांविरुद्ध आपणास मदत करावी असे त्याच्यामागे टुमणे लावीत होता. पण निजामासारख्या दुर्बल आणि बेभरवशाच्या सत्ताधिशाच्या नादी लागून कॉर्नवालीस पेशवे दरबारशी शत्रुत्व ओढवून घेईल हे शक्यच नव्हते. टिपूने फ्रेंचांशी जे मैत्रीचे राजकारण चालविले होते, ते तर कॉर्नवालिसला फारच धोक्याचे वाटत होते. तेव्हा प्रथम टिपूचा बंदोबस्त करावयाचा असे पक्के ठरवून पुण्यास मॅलेट व हैदराबादेस केनवे ह्या दोन वकिलांमार्फत इंग्रज, मराठे व निजाम ह्या तिघांची टिपूविरुद्ध आघाडी उभी करण्याचा उद्योग आरंभिला. हा उद्योग सिद्धीस जाऊन जुलै १७९० पर्यंत इंग्रज, मराठे आणि निजाम ह्या तिघांतर्फेही सह्या होऊन संयुक्त आघाडीचे राजकारण पक्के झाले.[२]

---

१. हिस्टरी ऑफ टिपू सुलतान, पृ. ११८.

२. पी. आर. सी. व्हॉ. ३, ले. ७,

**टिपूची माहिती :**

इंग्रज, मराठे, निजाम या त्रिवर्गाबरोबर झालेल्या लढाईचे वर्णनाअगोदर ह्यावेळी टिपूची स्थिती काय होती हे पहावयाचे. इ. स. १७९० मध्ये टिपू ३७ वर्षाचा होता. १७५३ मध्ये तो देवनहल्ली येथे जन्मला. आईचे नांव फकरुन्निसा होते. बालपणी त्यास त्याच्या बापाने चांगले शिक्षण दिले होते. लेखन, वाचन, हिशेब तसेच लढाईचे शिक्षणात तो चांगला तरबेज झाला होता. बापापेक्षा धैर्य व क्रौर्य यात कांकणभर जास्त होता. मुसलमान धर्माबद्दल व आपल्या शौर्याबद्दल त्यास फाजील घमेंड होती. मुसलमान धर्माची वृद्धी तलवारीच्या बळावर करण्याचे त्याने ठरवून मलबारमध्ये हजारो हिंदुंना मुसलमान धर्माची दिक्षा दिली. तो आपल्याला महंमदाचा प्रेषीत समजत असे. इ. स. १७८६ मध्ये त्याने आपण बादशहा झाल्याचे जाहीर करून आपल्या राज्यात सर्व मशिदीत फतवा पढण्यास लाविले. इंग्रजांचा तो फारच द्वेष करीत होता. इंग्रजांना हिंदुस्तानातून हाकलून लावणे आपले परमकर्तव्य असे तो मानीत होता. हे इप्सीत साध्य होण्यासाठी त्याने हरतऱ्हेने लढाईची तयारी केली. त्याकरिता बंगलोर शहर सोडले. ४ ऑगस्ट १७८८ रोजी त्याने आपले हस्तक म्हणून दोन युरोपियनांकडे पत्र देऊन फ्रेंच बादशहाकडे पाठविले. पत्रात फ्रेंचांनी हिंदुस्तानवर हल्ला करावा व इंग्रजांना हिंदुस्तानातून घालवून द्यावे असे लिहिले होते.[१]

**कॉर्नवालीसने केलेली तयारी :**

टिपूचे इंग्रजांविरुद्धचे उद्योग कॉर्नवालीस डोळ्यात तेल घालून पहात होता. मद्रास इंग्रजांची स्थिती दयनीय होती हे त्याच्या लक्षात आले. गव्हर्नर कॅम्पबेल आजारी पडून १७८९ च्या फेब्रुवारीमध्ये स्वदेशास परतला. हॉलंड नावाचा इंग्रज गृहस्थ गव्हर्नर झाला. त्याने टिपूविरुद्ध युद्धाच्या हालचाली करण्यास कॉर्नवालीसला साफ नकार दिला. तेव्हा हॉलंडला निवृत्त व्हावे लागले. त्याजागी गव्हर्नर म्हणून मुंबईहून सर विल्यम मेडोज या शूर योद्धयाची नेमणूक झाली. हैदराकडून मद्रासवरील १७८० च्या हल्ल्यात त्याने मार खाल्ला होता. सूडाच्या भावनेने त्याचे हृदय पेटत होते. लढाई-शिवाय शासकीय गोष्टींचा बंदोबस्त करण्यात तो कुचकामी होता. मलबार किनाऱ्यावर मुंबईहून आलेले सैन्य मे १७९० त उतरले. त्याच वेळी मेडोजने पूर्वेकडून पश्चिमेकडे चाल केली. टिपूने मेडोजला गाठून त्यास मद्रासला माघार घेण्यास भाग पाडले. इतर ठिकाणीही टिपू इंग्रजास नरम करीत होता. कॉर्नवालीसला हा पराभव समजताच त्याने स्वतः लढाईचे सेनापतीत्व पत्करून तो १२ डिसेंबर १७९० ला मद्रासला आला.[२] इ. स. १७९१ जानेवारीत त्याने लढाईची सूत्रे हाती घेतली.[३]

---

१. हसनखान, हिस्टरी ऑफ टिपू सुलतान, पृ. १८४.

२. पी. आर्. सी. व्हॉ. ३, ले. १६९, १७०.

३. तत्रैव, ले. १९३, १९४.

**मराठ्यांच्या हालचाली :**

१ जून १७९० ला त्रिवर्गाचा तह झाल्यावर परशुरामभाऊ पटवर्धन यांनी मुंबईचा इंग्रज सेनापती लिटल याच्या मदतीने महाराष्ट्राजवळील टिपूच्या मुलखावर हल्ला चढविला व ते उध्वस्त केले. परशुरामभाऊने ६ एप्रिल १७९१ रोजी धारवाड घेतले परंतु तो कॉर्नवालीसच्या मदतीस बंगलोरपर्यंत जाऊ शकला नाही. मध्यंतरीच्या काळात टिपू आपल्या पुण्याच्या वकिलामार्फत मराठ्यांशी मैत्रीची बोलणी लावून आघाडीच्या राजकारणात गोंधळ निर्माण करीत होता. त्यामुळे हरिपंतासारखे सरदारही काही काळ निष्क्रियच रहात होते. हरिपंताच्या आणि निजामाच्या फौजा एकत्र होत्या. त्यामुळेच, त्यांच्याकडून काही काम होत नव्हते. कारण निजामाचे सैन्य म्हणजे मदत तर नाहीच पण अडचणच जास्त, अशी अवस्था होती.

कॉर्नवालीसने स्वत: रणावर धाव घेतली. मेडोज या सेनाधिकाऱ्यास बरोबर घेऊन त्याने बंगलोरवर हल्ला केला आणि दिनांक २१ मार्च रोजी ते ताब्यात घेतले. तदनंतर श्रीरंगपट्टणवर हल्ला करून ते टिपूच्या राजधानीचे शहर ताब्यात घेण्यासाठी तो त्वरेने निघाला. श्रीरंगपटण पडल्यावर युद्ध समाप्त झाले असते. निजामअलीचे सैन्य त्याचा मुलगा पोलादजंग व मिनिस्टर मुशिर उल्मुल्क व मीर आलम यांच्या अधिपत्याखाली होते. हे सैन्य १३ एप्रिल १७९१ ला कॉर्नवालीसला येऊन मिळाले. हरिपंत फडके पुण्याहून १७९१ च्या आरंभी टिपूवरील स्वारीकरिता सैन्यासह निघाले. बरोबर नाना आणि मॅलेट होते. नाना काही काळानंतर परत पुण्यास आले. हरिपंतानी वाटेत रायचूरच्या पूर्वेस ५० मैलांवर पानगळ येथे दिनांक ४ एप्रिल १७९१ रोजी मुक्काम करून तेथे निजामअल्लीची भेट घेतली. · हरिपंत व परशुराम भाऊ यांनी कर्नाळ, अदवानी, अनंतपुर, रायदुर्ग, सिरे व बल्लूर या परगण्यांतून दिनांक २५ मे पर्यंत खंडणी वसूल केली. या मुदतीत कॉर्नवालीसने श्रीरंगपट्टणच्या दिशेने मुसंडी मारून अरिकेरा येथे त्याची टिपूशी दिनांक १४ मे रोजी गाठ पडून मोठी लढाई झाली. टिपूने कॉर्नवालीसच्या सैन्याची कोंडी केल्यामुळे त्याच्या सैन्याला अन्न मिळेनासे झाले. वहातुकीचे बैल भुकेने जर्जर होऊन मरायला टेकले, तेव्हा कॉर्नवालीसने परत फिरण्याचा विचार करून दिनांक २६ मे पासून तो माघारी फिरला. दिनांक २९ मे रोजी मराठी सैन्य कॉर्नवालीस व निजामाच्या सैन्यास मोती तलावानजीक भेटले[१] तेथे सर्वांचा मुक्काम ५ जूनपर्यंत होता. आतापर्यन्त इंग्रज सैन्याची अन्ना-अभावी अतिशय हलाखीची स्थिती झाली होती. मराठ्यांकडून त्यांना अन्नसामुग्री मिळाली आणि ते वाचले. ह्याच ठिकाणी हरिपंताची पैशाची नड लक्षात घेऊन कॉर्नवालीसने त्याला १२ लाख रुपये कर्ज दिले. मोती-तलावाच्या या मेळाव्यात इंग्रज आणि निजाम यांनी बंगलोरला राहावे आणि पावसाळा संपल्यावर पुनः सर्वांनी पोक्त तयारीने पट्टणावर चालून जावे असा

१. ऐ. ले. सं. भा. ९, ले. ३३४६.

विचार ठरला. दिनांक ६ जून रोजी कूच करून लष्करे आपआपल्या सोईप्रमाणे छावणी करून राहिली. इंग्रजांकडून कर्ज मिळाल्यावर हरिपंतानी परगणे नागमंगळ, हुळीदुर्ग, मागडी या ठिकाणी मुक्काम करीत बंगलोर प्रांती दिनांक ४ जुलै १७९१ रोजी इंग्रजांच्या नजीक येऊन मुक्काम केला. दिनांक ७ जुलै रोजी कॉर्नवालीसने आपल्या सर्व फौजेची कवाइती शिस्त हरिपंत व परशुराम भाऊ यांस दाखविली. परशुरामभाऊंना टिपूवर सूड घ्यावयाचा होता तेव्हा त्यांनी टिपूने गिळंकृत केलेले प्रांत मिळविण्याचा सपाटा सुरू केला. ऑक्टोबरमध्ये चित्रदुर्ग, हसन, बेळुर, होळी हुन्नर, तुमकूर, शिमोगा इत्यादि स्थळांवर हल्ला करून भाऊच्या सैन्याने अनर्थ उडवून दिला. रघुनाथराव पटवर्धनानी टिपूवरील राग शृंगेरी मठावर हल्ला करून काढला. वास्तविक ह्या हिंदू मठावर मराठ्यांनी हल्ला करावयास नको होता. परशुरामभाऊंनी आपल्याबरोबर असावे असा आग्रह कॉर्नवालीसचा होता. पण परशुरामभाऊ मठ विध्वंसनाच्या उद्योगात मग्न राहिले. कॉर्नवालीसने पुण्यास तक्रार केल्यावर व पुणे दरबारकडून कडक हुकूम लिहून आल्यावरच भाऊ कॉर्नवालीसला जाऊन मिळाले[1].

हरीपंत फडके डिसेंबरअखेर बेंगलूरच्या परिसरात खंडणी वसूल करीत राहिले.

### टिपू शुद्धीवर येतो :

इ. स. १७९२ उजाडेपर्यंत दोस्त सैन्याने टिपूच्या प्रांतात धुमाकूळ घालून बहुतेक मुलूख उजाड केल्यामुळे त्याची तेधा उडाली होती. तथापि तो हिंमतीचा सेनानी होता. तो सर्व आघाड्यावर निर्धाराने लढत होता. राज्यकारभारातल्या चुका त्याला उमगत होत्या. धर्मांधतेने आपण हिंदु प्रजेवर जे अत्याचार केले त्यामुळ आपण रयतेची सहानुभूती गमाविली ह्याची जाणीव त्यास झाली असावी म्हणून या सुमारास हैदराने सुरू केलेले आणि अर्धे राहिलेले कांचीच्या गोपुराचे काम त्याने पुरे करावयास घेतले. हिंदुंच्या मिरवणुकीत सामील होऊन तो स्वतः अग्रभागी राहू लागला. त्याने अनुष्टाने सुरू करून ४० हजार ब्राह्मणास दक्षिणा वाटली[2].

### श्रीरंगपट्टणची मोहीम :

पावसाळा संपताच इंग्रजानी लगेच बंगलोरहून टिपूवर मोहीम सुरू केली. दिनांक ५ फेब्रुवारी १७९२ रोजी श्रीरंगपट्टणास वेढा घालण्याची संयुक्त आघाडीच्या फौजांची तयारी झाली. हरिपंताने त्या दिवशी श्रीरंगपट्टण परगण्यात फौजेसह येऊन मुक्काम केला[3]. पुढे इंग्रज व मागे नवाबाच्या फौजेचा मुक्काम श्रीरंगपट्टणापासून तीन कोसावर होता. कॉर्नवालीस एकदम

१. हसनखान, हिस्टरी ऑफ टिपू सुलतान, पृ. २१८-१९.

२. म. रि. उत्तर, वि. २, पृ. ३०९.

३. तत्रैव, ले. ३४०६.

चढाई करून श्रीरंगपट्टण जिंकावे आणि टिपूस साफ बुडवावे असा विचार करून आघाडीस राहून जोरदार हल्ले चढवत होता. टिपूकडील हजारो सैनिक मरत होते. पण त्यानेही निकराची लढत दिली. हे हरिपंतांसही मान्य करावे लागले. टिपूने पाच-सातशे गोऱ्यांना कंठस्नान घालून इंग्रजांच्या फौजेतील हजार दीड हजार एतद्देशीय शिपाईही मारले. पराक्रमाची शर्थ करूनही इंग्रजांस श्रीरंगपट्टण जिकता येईना तेव्हा तिन्ही सैन्यांनी श्रीरंगपट्टणास वेढा घालून तोफांचा मारा केला. दोन दिवस लढाई झाल्यावर टिपूने ११ फेब्रुवारी रोजी इंग्रजांकडे वकील पाठवून तहाची बोलणी केली. २९ फेब्रुवारीपर्यन्त वाटाघाटी होऊन विशेष ओढून न धरता तह ठरला[१].

### मराठ्यांचे युद्धातील धोरण :

मराठ्यांनी ह्या युद्धात आपले युद्ध कौशल्य दाखविले तरीही ते हात राखून लढत होते. कॉर्नवालिसच्या लक्षात हे आले ह्याचे कारण पुणे दरबारने इंग्रजांशी हातमिळवणी केली होती खरी पण ती मनापासूनची नव्हती. नाना फडणीस व महादजी शिंदे या दोघांनाही ही दोस्ती मनापासून नको होती. नाना आणि पुण्याचा इंग्रज वकील मॅलेट यांच्यातील भांडण तर इतके विकोपास गेले होते की नानानी मॅलेटची तावडतोब बदली करण्यास कॉर्नवालिसला कळविले होते. खुद्द रणक्षेत्रावर धुमश्चक्रीतही टिपूचे वकील परशुरामभाऊ आणि हरीपंत यांना भेटत होते. मराठा सेनानींना पुणे दरबारच्याच सूचनानुसार लढावयाचे होते. टिपू साफ बुडाला तर इंग्रज बळावतील. तेव्हा इंग्रजांना शह रहावा असा नानाचा हिशेब होता. त्याचे हे सूत्र ध्यानात ठेवून रणमैदानावर मराठे सेनानी वागत होते. हे चाणाक्ष इंग्रजांच्या लक्षात आल्यावर आपण टिपूशी एकटयानेच लढून विजयी होऊ याची त्याना खात्री वाटेना. दुसऱ्या बाजूने टिपूही खूप दमला होता. तेव्हा दोन्ही पक्षांना तह करणे सोईचे वाटून मार्चमध्ये करारमदार झाले.

### इंग्रजांचा युद्ध तहकुबीचा हेतू :

टिपूस कायमचा बुडवावा हा इंग्रजांचा हेतू होता. पण इंग्लंडच्या डायरेक्टरांकडून कॉर्नवालीसला निराळ्याच सूचना मिळाल्या होत्या. ह्या वेळी इंग्लंडात हेस्टिंग्जवर फिर्याद होऊन इंग्लंडचे वातावरण तप्त झाले होते. चीनच्या व्यापारात जो पैसा गुंतावयास हवा होता तो कॉर्नवालीसने ह्या टिपूवरील युद्धांत खर्च केला होता. हे कंपनीच्या डायरेक्टरना न आवडून त्यानी हे खर्चिक युद्ध लवकर थांबवण्याचा तगादा कॉर्नवालीसला लावला. म्हणून कॉर्नवालीसला टिपूशी तडजोड करावी लागली.

यावेळी महादजी शिंदे रजपुतांशी लढण्यात गुंतले होते. त्यांनी गव्हर्नर जनरलला लिहून कळविले की, अलाहाबाद येथील दोन इंग्रजी पलटणांची मदत

१. ऐ ले सं भा ९, ले. ३४२२.

आपल्यास दिल्यास आपण हे युद्ध संपवून इंग्रजांच्या मदतीस येऊ. गव्हर्नर जनरलने त्यास नकार दिला.

**श्रीरंगपट्टणचा तह :**

या तहात टिपूने आपले अर्ध्ये राज्य आणि तीन कोट रुपये खंडणी इंग्रज, मराठे आणि निजाम ह्यांस देण्याचे मान्य केले. ह्या शर्ती पुऱ्या व्हाव्यात म्हणून टिपूचे दहा व आठ वर्षाचे दोन मुलगे ओलीस म्हणून कॉर्नवालीसच्या ताब्यात राहावयाचे असे ठरले. त्याप्रमाणे हे दोन मुलगे गव्हर्नर जनरलच्या स्वाधीन झाले. मे महिन्याच्या अखेरीस टिपूने जेव्हा पूर्ण रक्कम भरली त्यावेळी ह्या मुलांस सोडण्यात आले. टिपूकडून मिळालेला मुलूख तिन्ही दोस्तांनी समजुतदारपणे वाटून घेतला.

**मराठ्यांचे यशापयश :**

हा तह झाल्यावर त्रिवर्गांनी शिवगंगेपर्यन्त बरोबर जावे असे ठरले. श्रीरंगपट्टणाहून निघण्यापूर्वी टिपूने हरिपंताची भेट चार घटका एकांतात घेतली. भेटीत हरीपंतास सुनावले की, "तुम्हाला तुमचा खरा शत्रू कोण हे समजत नाही. मी तुमचा वैरी नव्हे. तुम्हाला उद्या धूळ चारणार आहेत ते हे इंग्रज, हे पक्के लक्षात ठेवा[१]".

टिपूची ही भविष्यवाणी खरी ठरली. टिपूचा पराभव झाला पण टिपू नाहीसा झाला नाही. त्याला आपले दोस्त फ्रेंच युरोपात यावेळी काय करत होते हे समजले नाही. त्याची अशी इच्छा होती की, फ्रेंचांनी हिंदुस्तानात येऊन इंग्रजांना हाकलून लावावे. कॉर्नवालिसला वाटत होते की, टिपूचा शेवट व्हावयासच हवा. कॉर्नवालिसशी हरिपंत फडके यांचे हितगुज होते. मराठ्यांच्या ह्या सेनानीबद्दल कॉर्नवालिसला अतीव प्रेम व आदर होता. त्याने हरिपंतास मेजवानी व मिष्ठान्न भोजन दिले होते. त्या प्रसंगी निजामाकडील मुशीर उल्मुल्क हजर होता. कॉर्नवालिसचे निजामाच्या सैन्यासंबंधीचे मत चांगले नव्हते. "हे सैन्य आळशी व वेळकाढू, कोणत्याही चालत्या सैन्याची रसद संपवून त्याच्या चालीत विघ्न आणणारे असे आहे" असे त्याचे मत होते.

कॅप्टन लिटीलच्या हाताखालील मुंबई रेजिमेन्ट परशुरामभाऊ पटवर्धनांबरोबर पुण्यास आले. ह्यावेळी महादजी शिंदे उत्तरेतून पुण्यास आले होते. पेशवाईच्या कारभारात लक्ष घालून कारभार आपल्या ताब्यात घेण्याचा त्यांचा इरादा असल्याचा संशय नानांना आला. त्यास शह देण्यासाठी नानांनी आपल्या मदतीस वरील इंग्रज रेजिमेन्ट पुण्यास ठेवण्याची विनंती कॉर्नवालीस यास केली होती. त्यास कॉर्नवालिसने नापसंती दर्शविली. हरिपंत कॉर्नवालिसबरोबर दहा महिने दक्षिणेत होते. कॉर्नवालिसच्या नीटनेटक्या वागणुकीचा, सभ्यतेचा, सुशील स्वभावाचा ठसा हरिपंतावर उठला होता.

१. Sardesai, N. H. M. III, p. 192.

हरिपंत व कॉर्नवालिसमधील दोस्तीचे संबंध पाहून मुशीर उल्मुल्कच्या पोटात गोळा आला. आपला धनी निजाम याचे मराठ्यांपासून संरक्षण करण्यासाठी त्याने इंग्रजांची मदत मागितली. कॉर्नवालिसने शेजाऱ्यांच्या भांडणात आपणास पडावयाचे नाही या सबबी पुढे करून ती फेटाळून लावली. हरिपंत आणि मुशिर उल्मुल्क हे बंगलोरहून एकत्र निघाले. रायपूरपर्यन्त आल्यावर हरिपंत पुण्याकडे निघाले. मुशिर उल्मुल्क हैदराबादेकडे गेला. ह्या टिपूवरील लढाईत मराठ्यांकडील गोविंदराव काळे, चिंतोपंत देशमुख, त्रिंबकराव परचुरे आदि राजकारणी नानांच्या विश्वासातील होते. त्यांना ह्यावेळी मिळालेल्या अनुभवाचा उपयोग पुढील काळात राज्याच्या अनेक उलाढालीत भाग घेऊन करता आला.

इ. स. १७९० च्या जूनमध्ये जेव्हा दोस्तीचा तह मराठे व इंग्रज यामध्ये झाला त्यावेळी दोन्ही सत्ता समतोल होत्या. टिपूचा पराभव झाल्यावर १७९२ मध्ये इंग्रजांचे पारडे जड झाले.

**नानांच्या मुत्सद्देगिरीचे अपयश :**

नाना फडणीस मराठी राज्याचा कारभार पुण्यास लहान पेशव्यातर्फे पहात होते. महादजी शिंदे हे मुत्सद्दी असून तलवार बहाद्दर होते. महादजींनी नाना फडणिसांच्या संमतीने उत्तर हिंदुस्तानात जाऊन मोगल अमीरांना नरम करून बादशाहीचा ताबा घेतला. सालबाईचा पुणे दरबार व इंग्रजांमधील तह महादजी शिंद्यांच्या मध्यस्तीने झाला त्यावेळेपासून डेविड अन्डरसन हा इंग्रज वकील महादजी शिंद्यांच्या छावणीत राहू लागला.[1] इंग्रजांची मराठ्यांच्या दरबारातील कामे ह्या वकिलामार्फत म्हणजे महादजीमार्फत होऊ लागली. नाना फडणिसाना स्वत: मराठी राज्याचा कारभारी असूनही ह्यामुळे दुय्यम स्थान वास्तवात प्राप्त झाले. ते शल्य नानांना बोचू लागले. बादशाही कारभार महादजी दिल्लीस राहून पाहू लागताच इंग्रजांनाही महादजीच्या वाढत्या सत्तेचा धाक वाटू लागला. हिंदुस्तानातील निरनिराळ्या सत्ताधिशांकडे असलेले इंग्रज वकील महादजींच्या दिल्ली दरबारी वाढलेल्या प्रस्थाचा धसका घेऊन त्यापासून वाढत्या इंग्रजी सत्तेस धोका असल्याचे बोलू लागले. महादजींचा नक्षा उतरावा असे त्यांनाही वाटू लागले. इतक्यात नाना फडणिसांनी त्यांनाही संधी आणून दिली. नानांना महादजींच्या छावणीतील इंग्रज वकिलातर्फे पुणे दरबारने इंग्रजांशी पत्रव्यवहार करणे न आवडून पुण्यास स्वतंत्र इंग्रज वकील असावा अशी मागणी मुंबईच्या गव्हर्नरकडे केली. इग्रज गव्हर्नरने व कलकत्याचा त्यावेळचा गव्हर्नर जनरल मॅकफरसन ह्याने ही मागणी तावडतोब उचलून धरली. त्यामुळे महादजीच्या वाढत्या सत्तेस आळा बसणार होता. इंग्रज वकील म्हणून चार्लस मॅलेटची नेमणूक पुण्यास झाल्याचे १७८४ च्या अखेरीस जाहीर झाले. चार्लस मॅलेटला इंग्रज-मराठे संबंधाचे सूक्ष्म ज्ञान होते. १७५२ मध्ये जन्मलेला हा इंग्रज मुंबईस १७७० मध्ये कंपनीच्या नोकरीत रायटर म्हणून लागला. इ.स.१७७५ त

१. महादजी शिंद्यांचे व डेविड अन्डरसनचे संबंध चांगले होते; हे दोघेही एकमेकांचे हित पहात असत P. R. C. Vol. I, p. VII; M. A. B. D. A. 1, p. 2.

त्याची बदली कंपनीच्या कंबायत येथील वकिलातीत झाली. तिथे त्याने इग्रजांच्या आश्रयास आलेल्या रघुनाथराव पेशव्यास मदत केली आणि रघुनाथरावाशी इंग्रजांचा करार घडवून आणला. त्यामुळे पहिल्या मराठे-इंग्रज युद्धास सुरुवात झाली. मॅलेटने फार्शी आणि हिंदुस्तानी भाषांवर प्रभुत्व मिळविले होते. मॅलेट पुण्यास रेसिडेन्ट म्हणून दहा वर्षे होता. ह्या कालावधीत मराठ्यांकडील गुप्त बातम्या त्यास मिळाल्याच पण त्याचा उपयोग त्याने मराठी सत्ता कमकुवत होऊन इंग्रजी सत्ता वाढविण्याकडे केला. पुण्याचा रेसिडेन्ट हा कलकत्त्याच्या गव्हर्नर जनरलचा प्रतिनिधी म्हणून त्याच्या हुकुमात वागणे त्यास क्रमप्राप्त तेव्हा नेमणूक झाल्यावर गव्हर्नर जनरल कडून आज्ञा व कामासंबंधीच्या सूचना मिळविण्यासाठी त्यास कलकत्त्यास पाठविण्यात आले. तसेच आतापर्यन्तचा शिरस्ता जो की मराठी दरबारांशी इग्रजांचे कोणतेही काम असल्यास ते महादजी शिंद्यामार्फत करावयाचे, त्यास अनुसरून मॅलेटच्या नेमणुकीस महादजी शिंद्यांची औपचारिक अनुमती मिळवावयाची, त्याकरिताही मॅलेटला शिंदे यांना भेटून त्यांची ह्या नेमणुकीस संमती घेण्यास सांगण्यात आले. मॅलेटच्या पुण्यास झालेल्या नेमणुकीने मराठी राज्यात एका वेळी दोन इंग्रज वकील झाले. महादजी बावांना हे नानांचे करणे अर्थातच आवडले नाही.

मॅलेटने महादजी शिंद्याकडे जाण्यासाठी दिनांक २७ जानेवारी १७८५ रोजी पुणे सोडले. उज्जैन, ग्वाल्हेर, आग्रा करीत तो मथुरेस महादजींच्या छावणीत मे महात उतरला. छावणीतील इंग्रज वकील जेम्स अन्डरसन याने त्याला महादजींसमोर २० मे रोजी नेले. ओळख झाली. महादजीबावानी मॅलेटला त्याच्या नवीन नमणुकीबाबत एका शब्दानेही विचारले नाही. तो महादजीबावांच्या छावणीत तदनंतर एक महिना होता. त्या मुदतीत त्याची कसली चौकशीसुद्धा केली नाही किंवा त्यास रहा-जा असेही म्हणाले नाहीत. मॅलेटने आपल्या ह्या मुक्कामात बादशहाची भेट घेतली आणि महादजीची औपचारिक आज्ञा न मिळविता मॅलेटने छावणी सोडली. मॅलेटची नेमणूक पुणे दरबारी होत आहे हे समजताच महादजीबावांनी नानास हे धोक्याचे करणे आहे. इंग्रज सत्तेशी व्हावयाचे मराठ्यांचे कोणतेही व्यवहार पहाण्यास व हाताळण्यास आपण समर्थ असता पुण्यास स्वतंत्र रेसिडेन्ट काय कामाचा? त्यामुळे आपल्या एकत्रितपणास तडा जाईल असे लिहिले होते[1]. महादजी-बावांचा आपल्या नेमणुकीस विरोध असण्याच्या कारणाबद्दल मॅलेटने २३मे रोजी गव्हर्नर जनरल मॅकफरसनला मथुरेहून लिहीले होते. त्यात त्याने महादजीची वाढती महत्वाकांक्षा इंग्रज हितास बाधक, अतएव धोक्याची आहे, त्याचा नक्षा उतरवलाच पाहिजे. तसे नसल्यास इंग्रजांचे दोस्त अवधचे वझीर व कर्नाटकचे नबाब यांच्या सुरक्षिततेस धोका उत्पन्न होण्याचा संभव आहे. सध्या महादजी पैशाच्या विवंचनेत आहे. बादशहाचा वजीर म्हणून तो आपली सत्ता वाढविण्यास कमी करणार नाही,तसे झाल्यास हिंदुस्तानातील इंग्रज हितसंबंधास

१. सरदेसाई, एन्. एच्. एम् ३, पृ. १९७.

बाधा येईल. वरील प्रमाणे इतर इंग्रज रेसिडेंटांचे त्यावेळच्या परिस्थितीसंबंधी मत होते. इंग्रज लोक किती घातकी आहेत हे महादजीबावानी नानांच्या लक्षात आणून देण्याकरिता लिहिले होते की "मी बादशाही कारभार हाती घेऊन दिल्लीची मजल साधली. बादशहा काबूत येऊन मला वजिर मरातब हा मोठा हुद्दा दिल्ली दरबारी मिळाला, हे पाहून इंग्रजांस वाईट वाटले. यामुळे इंग्रजांचा बंदोबस्त दिल्लीत होणे असंभवनीय झाले. त्यांचा नक्षा उतरला. ब्रिटीश वकील ब्राऊन नंतर दिल्लीतील लहान मोठ्या अमीर उमरावास लाच देऊन मला दिल्लीतून काढून लावण्यासाठी प्रयत्नशील आहे असे हे इंग्रज दुष्ट, कावेबाज आहेत हे लक्षात असू द्यावे[1]".

अर्थात आपमतलबी नानांचे या योगे मत बदलले नाही. त्यांनी मराठी राज्याच्या नफा-नुकसानीचा विचार न करता स्वतःच्या प्रभुत्वाचा विचार केला व ते प्रभुत्व अबाधित रहावे, महादजीबावांनी वरचढ होऊ नये म्हणून त्यांनी मॅलेटची नेमणूक रेसिडेंट म्हणून करून घेतली. अशा प्रकारे मराठी राज्यात एकाच वेळी दोन वकील–एक पुण्यास व दुसरा महादजींच्या छावणीत– असा देखावा निर्माण झाला. महादजीबावांच्या छावणीतील वकिलास महादजीबावांचे लढाईचे आराखडे, धोरणे व गुप्त खलवते यासंबंधीची माहिती मिळत नसे. या उलट पुण्यातील मॅलेटला नानाच्या कारभारी मंडळीपैकी कोणी शिकल्यासही कळत असे[2].

जून १७८५ मध्ये मॅलेटने महादजीबावांची छावणी सोडली आणि तो आग्रा, कानपूर, बनारस या मार्गे कलकत्यास १८ ऑक्टोबरला पोचला. त्याने गव्हर्नर जनरल मॅकफरसनकडून आपल्या नेमणुकीचे पत्र ७ नोव्हेंबरला स्विकारले. १३ नोव्हेंबरला त्याने कलकत्ता सोडून समुद्रमार्गे प्रवास करून तो मुंबईस १७ जानेवारी १७८६ रोजी आला. पुण्यास त्याने आपल्या कार्यालयात दिनांक ३ मार्च रोजी प्रवेश केला. तो रेसिडेन्ट म्हणून पुण्यास ११ वर्षे राहिला. दिनांक २२ फेब्रुवारी १७९७ रोजी त्याने पुणे सोडले. त्या अगोदर एक वर्ष त्याने दुसरा बाजीराव पेशवा झाल्याचे पाहिले होते.

मॅलेटच्या अगोदर तीन वर्षे मॉटगने नावाचा फ्रेंचांचा वकील पुण्यास होता. त्यास काढून टाकण्याची खटपट मॅलेटने केली[3].

मॅलेटजवळ फार्सी पंडीत नुरुद्दीन हुसेनखान होता. त्यास त्याने आपला सहाय्यक नेमले. पेशव्यांकडील रेसिडेंटमधील कारभार निपटण्यास पेशव्यांचा माणूस म्हणून बहिरो रघुनाथ मेहेंदळे याची नेमणूक झाली. मॅलेट शाही इतमामाने रहात होता. इंग्रजी राज्यास शोभेल व भूषणावह होईल अशा डामडौलात व मिजाशीत तो रहात असे. आपल्याला फ्रेंच वकिलापेक्षा

---

१. सरदेसाई, एन्. एच्. एम्. ३, पृ. १९८.

२. कित्ता.

३. ऐतिहासिक पत्रव्यवहार, ले. २२३.

चांगली इतमामाची वागणूक पेशवे दरबारी मिळावी अशी त्याची धारणा होती. मॅलेटजवळ एक हजार लोक होते. त्यापैकी २०० लष्करी ड्युटीवर, १०० वैयक्तिक नोकर, ४२५ महार रक्षक असून त्याने एक मुसलमान रक्षा ठेविली होती. मुळासंगमावर त्यास नानानी जागा दिली. त्या ठिकाणीं दरबारी थाटाच्या पाश्चिमात्य झोकाच्या रेसिडेन्सी इमारती त्याने बांधल्या होत्या. ह्या इमारती दिनांक ५ नोव्हेंबर १८१७ त दुसरा बाजीरावाच्या सैन्यने भस्मसात केल्या.

मॅलेट सवाई माधवरावाबरोबर फिरायला जात असे, खात पीत असे. दोघे शिकारीस जात, एकमेकांकडे मेजवान्या घेत असत. सणासमारंभात एकमेकांना देणग्या देत असत. मॅलेटने एकदा पेशव्याच्या डोकीवरून एक हजार रुपये ओतले ते वेचण्यासाठी पेशव्यांच्या नोकरांनी झुंबड उडविली. मॅलेट माधवरावाबरोबर खडर्याच्या लढाईत होता. त्याने खडर्याच्या लढाईचा महत्त्वाचा वृत्तांत लिहून ठेविला आहे.

गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टींग्ज याने १ मार्च १७८५ रोजी कारभार सोडला. त्यावेळी महादजीबावांकडे इंग्रज वकील जेम्स अन्डरसन होता. तो ऑक्टोबर १७८७ मध्ये जाऊन त्या जागी कर्कपॅट्रीकची नेमणूक झाली होती. कॉर्नवालिसने टिपूशी लढाई करण्यासाठी महादजीबावांची मदत रेसिडेन्टतर्फे विचारली. त्यावेळी महादजी बावांकडे इंग्रज वकिल कर्कपॅट्रीक होता. त्यास गव्हर्नर जनरलचे महादजीबावांशी चाललेले सलगीचे धोरण न आवडून त्याचा राग आला व त्याने रेसिडेंट पदाचा राजीनामा स्विकारला. त्यानंतर कॉर्नवालिसने त्याचे जागेवर मेजर विल्यम पामर याची रेसिडेंट म्हणून नेमणूक केली. दिनांक २० ऑक्टोबर १७८७ रोजी पामरने रेसिडेन्टच्या कारभारास सुरवात केली. तो महादजींच्या मृत्युपर्यंत (१७९४) त्या जागी होता.



## पुण्यातील घटना, महादजी व सवाई माधवरावांचा मृत्यू

### कालसूची

| | |
|---|---|
| १७५५ ते १७६३, . . | निजामाचा दिवाण रुक्नुद्दौला याचे मराठ्यांशीं सलोख्याचे धोरण. |
| १७६४, फेब्रुवारी १८ . | बाळाजी नारायण केतकर यास थोरले माधवराव पेशवे पुण्याचे कोतवाल नेमतात. |
| १७७४, एप्रिल १८ . . | सवाई माधवरावांचा जन्म. |
| १७७७, फेब्रुवारी ८ . . | कोतवाल पदावर नाना फडणीस घाशीरामाची नेमणूक करतात. |
| १७८०, एप्रिल ४ . . | महादजी शिंद्यांची बडोद्याच्या आसमंतात जनरल गोडार्डशी टक्कर. |
| १७८०, जून . . . | महादजी शिंदे तुकोजीरावांसह माळव्यात येतात. |
| १७८४ . . . . | रघुनाथराव पेशवे यांचा मृत्यू. |
| १७८६, मार्च ८. . | मॅलेटने पत्रातून केलेले सवाई माधवरावांचे वर्णन. |
| १७८८ . . . . | सवाई माधवराव नाशकास गोपिकाबाईंच्या भेटीस जातात. |
| १७९१, जुलै ११ . . | रघुनाथपंत सचिव यांचा मृत्यू. |
| १७९१, ऑगस्ट ३१ . . | घाशीराम कोतवालाचा अंत. |
| १७९१ . . . . | टिपूवरील मोहिमेत सवाई माधवरावांनी सामील व्हावे असा इंग्रज वकिलाचा आग्रह. |
| १७९२, जानेवारी ५ . | उदेपूरचा राणा महादजी शिंद्यास भेटतो. |
| १७९२, फेब्रुवारी . .. | महादजीबावा दक्षिणेत येण्यासाठी गोदावरीवर येतात. |
| १७९२, मार्च . . . | महादजी शिंदे यांचा तुळजापूर येथे मुक्काम. |
| १७९२, जून १२ . . | महादजी शिंदे यांचा पुण्याच्या आसमंतात मुक्काम. |
| १७९२ . . . . | महादजीबावा उत्तरेतून पुण्यास येताना विचाराचे नवे वारे आणतात. |



मराठा साम्राज्य
(इ.स. १७९५)
काबूल
पेशावर
लाहोर
सतलजनदी
मुलतान
सिंधुनदी
बहावलपूर
पानिपत
बिकानेर
दिल्ली
मथुरा
रजपुत
जयपूर
आग्रा
जेसलमेर
अजमेर
ग्वाल्हेर
जोधपूर
चितोडगढ
चंबळनदी
शिंदे
अलाहाबाद
लखनौ
गंगानदी
बनारस
पाटणा
उदयपूर
होळकर
इंदूर
नर्मदा नदी
कलकत्ता
गायकवाड
बडोदा
भोसले
तापीनदी
नागपूर
महानदी
कटक
गोदावरीनदी
पैणगंगानदी
उदगीर
पुणें
भीमानदी
निझाम
सातारा
हैद्राबाद
कोल्हापूर
कृष्णानदी
मच्छलीपट्टम
तुंगभद्रानदी
मद्रास
श्रीरंगपट्टम
कावेरीनदी



सवाई माधवराव व नाना फडणीस

# २१

## पुण्यातील घटना, महादजी व सवाई माधवरावांचा मृत्यू
## (१७९२–१७९५)

शिंद्यांचा दक्षिणेत येण्याचा हेतू — २२ जून १७९२ चा पुणे दरबार — पुण्याच्या कारभारी मंडळास शिंद्यांचे साकडे — लाखेरीवर होळकरांचा पराभव — शिंद्यांचा पुण्यास विजय — सचिवास मिळालेली वाईट वागणूक — घाशीराम कोतवालचा दुःखदायक शेवट.

### महादजी शिंद्यांचा दक्षिणेत येण्याचा हेतू :

महादजीबावा सालबाईच्या इ. स. १७८२ च्या तहापूर्वी दोन वर्षे उत्तर हिंदुस्थानात गेले. ४ एप्रिल १७८० त महादजी बडोद्याच्या आसमंतात राहून जनरल गोडार्डशी टक्कर देत होते. गुजरातमध्ये आणखी दोन महिने राहिल्यावर ते तुकोजीरावांसह जून १७८० मध्ये माळव्यात आले. त्यावेळे-पासून ते १७९२ जानेवारीपर्यन्त महादजी शिंदे उत्तरेत होते. ५ जानेवारी १७९२ रोजी उदेपूरच्या राण्याने महादजीबावांची भेट घेतली. महादजी बावांनी दक्षिणेस जाण्यास समारंभपूर्वक निरोप दिला.

### महादजीच्या कर्तृत्वाचे फलित :

नाना फडणिसांनी पेशव्यांच्या नावे दिलेल्या हुकुमान्वये महादजी शिंदे उत्तर हिंदुस्थानात गेले. बादशहाकडून सर्वाधिकार स्विकारून आपल्या तंत्राने राजकारण बांधू लागले. महादजींचा लौकिक होऊ लागला. ते नाना फडणिसास न खपून महादजीबावांच्या कामात कशी खीळ पडेल, हे नाना फडणीस पाहू लागले. वास्तविक मराठेशाहीचे सर्वाधिकारी नानाच होते. नानांचा व महादजींचा स्नेह होता. दक्षिणेत येण्यासाठी महादजी नानांची परवानगी मागत होते. अशा रीतीने नानास वडिलकीचा मान महादजी देत होते. नानांनी राष्ट्रीय बाणा बाळगून उत्तरेतील राजकारण शिंद्यांवर सोपवावयास हवे होते. त्यांच्या मदतीस पाठविलेले तुकोजी व अलिबहादूर यांना अंतस्थ रीतीने महादजीचे हुकूम मानू नका; माझेकडे लिहून पाठविल्यावर पुण्याहून तुम्हास जे लिहून येईल त्याप्रमाणे वागा असे दोघा सरदारास सांगावयास नको होते. त्यांच्या ह्या वागण्यात क्षुद्र वृत्ती दिसते. हे राष्ट्रपुरुषाचे वागणे नव्हे. म्हणून लेखणी बहाद्दरांनी नानास केवढेही मोठे केले तरी नानात शिवाजी, बाजीराव किंबहुना नानासाहेब पेशवे यांच्या राष्ट्रीय विचारसरणीचा लवलेशही दिसत नाही. इ. स. १७८९-९० च्या

मानाने महादजीबावानी वकील-ई-मुतालिक ह्या नात्याने इंग्रजांकडे बंगालच्या दिवाणीचे पैसे मागितले. इंग्रजांनी ही मागणी धुडकावून लावली. महादजीबावास इंग्रजांचा एवढा राग आला की, त्यांनी इंग्रजांविरुद्ध सार्वत्रिक उठाव करण्याचे राजकारण बांधले. नानानी जर उत्तरेत त्यांच्या मदतीस दोन सरदार त्यांचे ऐकणारे पाठविले असते तर उत्तरेतील कामगिरी राजपुतांना काबूत आणणे व इस्माईल बेगचा बंदोबस्त करणे ह्या गोष्टी त्यांनी २-४ वर्षांत उरकल्या असत्या. पण नानांना इतिहास माहित असूनही त्यावर त्यांच्या स्वार्थाने कुरघोडी केली. खरा शत्रू इंग्रज आहे, टिपू नव्हे हे टिपूने फडकेकडून सांगूनही नानानी इंग्रजांचा पाडाव करण्यासाठी काहीच हालचाल केली नव्हती. ते राष्ट्रपुरुष असते तर त्यांनी राष्ट्राचा विचार केला असता. मराठ्यांची सत्ता म्हणजे एतद्देशियांची, आपल्या राष्ट्राची सत्ता. ती अबाधित राखण्यासाठी शत्रूस शिरजोर होऊ न देणे, हे राष्ट्रपुरुषाचे काम नानांनी केले नाही. महादजी पराक्रमी होते. उत्तरेत पेशव्यांच्या नांवेच ते मराठी सत्तेचा विस्तार करीत होते. नानांच्या क्षुद्र राजकारणास कंटाळून उत्तरेतील कामगिरी अलिबहादूरवर सोपवून आपणास दक्षिणेत पेशव्यांचे चरणापाशी येण्याचे हुकूम द्यावे असे महादजी सन १७९० पासून नानांना विनवित होते. पण उत्तरेतून महादजीबावा दक्षिणेत पुण्यास आल्यास ह्या पराक्रमी व मुत्सद्दी वीरांचे पेशवे ऐकतील आणि आपले कारभारी पद महादजींना मिळेल ह्या स्वार्थी धास्तीने नाना फडणिसांनी महादजींना उत्तरेत दोन न ऐकणारे सरदार पाठवून गुंतवून ठेविले. महादजीबावांच्या हे लक्षात आले. तरी त्यांनी आपले राष्ट्रासंबंधीचे कर्तव्य केले. मराठी सत्ता दृढ करण्यासाठी त्यांनी अफगाण बादशहा व शीख यांजशी समझोता करून सतलज नदी ही आपल्या राज्याची महादजीनी सरहद्द ठरविली.

महादजीबावांनी हिंदुस्थानच्या राजकारणाचा विचार करताना अफगाणच्या हद्दीपर्यन्त ते बंगालच्या टोकापर्यन्तच्या सर्व भूभागांचा विचार केलेला होता असे दिसते. त्यांनी अफगाण,शीख व मराठे या त्रिवर्गाचा एक समझोता घडवून आणला होता. सतलजपर्यन्त मराठ्यांची सत्ता चालावी, सतलजपासून लाहोरपर्यन्त शिखांचा अधिकार मान्य करावा आणि लाहोरपासून अटकेपर्यन्त अफगाणांची हुकमत चालावी असे अफगाण बादशहा तिमूरशहा यानी महादजीबावांपाशी मान्य केले होते. अफगाण व मराठे यांनी एकमेकांस संकटकाळी मदत करावी. अफगाण बादशहानी महादजीबावांस त्यांच्या गरजेच्या वेळी दहा हजार घोडेस्वार पाठवून मदत करावी. ह्या अटी प्रत्यक्षात आणण्याची पाळी आली नाही. पण महादजी शिंद्यांनी जे धोरण पत्करले होते ते नवीन होते. पेशव्यांच्या वाढत्या वजनाचे ते द्योतक होते.[1]

१. सं. मजुमदार, दि मराठा सुप्रिमसी, पृ. ४०५-४०६.

महादजी शिंदे यांनी इंग्रजांना ओळखले होते. इंग्रजांचे कावे व धोरण १७६५ पासून इंग्रजांशी मल्हाररावांचा पहिला सामना झाला तेव्हापासून महादजीबावा ओळखून होते. मागेपुढे आपला प्राणांतिक सामना इंग्रजांशीच होणार याबद्दल कोणासही संशय उरला नव्हता, म्हणून महादजींनी गनिमी काव्याची लढण्याची पद्धत सोडून कवाइती फौज तयार केली. डी बॉयन-सारख्या कसलेल्या सर्वोत्तम सेनानीकडे त्याचे अधिपत्य दिले. ह्या कवाइती फौजेच्या जोरावर महादजींनी उत्तर हिंदुस्थानात आपला अंमल बसविला. पण नाना फडणिसांनी त्यांच्या पाठीमागे ज्या कलागती लावल्या होत्या त्यामुळे त्यांचा जीव हैराण झाला होता. पुण्याचा कारभार स्वतः करावयाचा किंवा त्याची नवीन घडी बसवावयाची हा महादजीबावांचा पुण्यास येण्याचा मुख्य हेतू होता. इंग्रजांचे पारडे आता जड होत चालले. नानासुद्धा त्यांच्या कक्षेत गेले; त्यांच्या ह्या चढाईस प्रतिकार करावा, त्यांचा डाव हाणून पाडावा हा इरादा सारखा मनांत बाळगून शिंदे नर्मदा उतरले. शिंद्यांबरोबर त्यांची फौज होती. फेब्रुवारी १७९२ त बावा गोदावरीवर आले. १७९२ मार्चला ते तुळजापूरला आले. ते तेथे कुलस्वामिनी अंबाबाईचे दर्शन घेत मे महा-पर्यन्त तेथेच राहिले.[१]

महादजीबावांचे दक्षिणेत येणे आणि ब्रिटीशांनी टिपूबरोबरचे युद्ध, तह करून समाप्तीस आणणे ह्या दोन्ही गोष्टी एकाच वेळी घडल्या. टिपूबरोबर तह केल्याने इंग्रजी सत्तेचे पारडे जड झाले होते. उत्तरेत नर्मदेपासून सतलज-पर्यन्त महादजीबावांनी मराठी सत्ता प्रस्थापित केली होती. पण दक्षिणेत व कर्नाटकांत इंग्रजी सत्तेने डोके वर काढले होते. हिंदुपदपातशाही स्थापन करण्याचे थोरले शिवाजी महाराजांचे धोरण बाजीराव पेशव्यांनी उचलून धरले होते. बाजीरावांचे शिष्योत्तम शिंदे–होळकर यांनी दिल्ली पातशाही मराठ्यांच्या अंकित राहण्यासाठी १७७२ त प्रयत्न केले. महादजीबावांनी बादशहास इ. स. १७८४ त ताब्यात घेऊन शिवाजी महाराजांची इच्छा अंशतः पुरी केली. उत्तरेत मराठ्यांना शत्रू राहिला नाही. पण दक्षिणेत मात्र इंग्रजांनी आपली सत्ता दृढ केली. आतापर्यन्त हिंदुस्थानावर उत्तरेकडून मुसलमान, मोगल स्वाऱ्या करून आले,त्यांना उत्तरेतील राजपुतांनी तोंड दिले. पाचशे वर्षे ते त्याजबरोबर झगडले. पण त्यांच्या अंतःस्थ कलहाने त्यांना पराभव पत्करावा लागला. मोगल हिंदुस्थानात स्थायिक झाले. येथील भूमिपुत्र म्हणून वावरू लागले. इंग्रज सातासमुद्रापलीकडून आलेले. त्यांना ह्या भूमीवर राज्य करण्याची हाव होती. हे महादजी व नाना यांनी जाणले होते. इंग्रजांनी टिपूचा पाडाव केल्यावर मात्र नाना फडणीस व शिंदे यांना इंग्रजांचा हिंदुस्थान बळकावण्याचा अंतस्थ हेतू कळून चुकला. हे इंग्रजांचे संकट निवारून त्यांना हाकलून देऊन त्यांच्या मगरमिठीतून मराठी राज्य कसे वाचवावयाचे हा प्रश्न महादजींना भेडसावत होता व त्यासाठी पेशवे,

१. ऐ. ले. सं. भा. ९, ले. ३४२४-२५, पृ. ४५७३.

पुणे दरबार, पुण्यातील मराठे मुत्सद्दी याजशी बोलणी करून त्यांची एकजूट करून त्यांना इंग्रजांचा धोका टाळण्यासाठी इंग्रजांविरुद्ध लढाईस उद्युक्त करणे हा हेतू महादजीबावांचा दक्षिणेत येण्याचा होता.[1]

महादजीबावा दक्षिणेत आल्यावर त्यांच्या हेतूचा विपर्यास करणाऱ्या अनेक बातम्या पुण्याच्या राजधानीत उठल्या. कोणी म्हणत की, उत्तर हिंदुस्थान आपल्या सत्तेखाली आणिल्यावर शिंदे पुण्याचा कारभार आपल्या हाती घेण्याच्या विचाराने येत आहेत. कोणी म्हणत बादशहाने त्यांना पुण्याचा कारभार आपल्या नावे चालविण्यासाठी पाठविले आहे. तर बहुतेकांच्या मते शिंद्यांनी आपल्याकरिता उत्तरेत राज्य संपादन केले. दक्षिणेत त्यांना येण्याचे कारण नाही. लोक त्यावेळी हे विसरले की, प्रत्येक मराठे सरदार पुण्यास पेशव्यांकडे दरवर्षी येऊन आपल्या कामगिरीचा पाढा वाचत असत; नव्हे ते आपले एक कर्तव्य समजत असत. महादजी शिंदे बारा वर्षे पुण्यास आले नाहीत. त्यांनी आपल्या धन्याकडे येऊन आपल्या पराक्रमाचा व विजयाचा वृत्तांत, त्यातील अडचणींचा तपशील देणे व पुढील धोरण समजावून घेणे हे त्यांचे कर्तव्य बजावण्यासाठी ते दक्षिणेत आले होते.

महादजींच्या दक्षिणेतील आगमनामुळे स्वत: नाना फडणीस अस्वस्थ झालेले होते. पुणे दरबारातील इतर मराठे सरदारही घाबरले होते. अशा भीतियुक्त वातावरणात महादजी शिंदे १२ जून १७९२ रोजी पुण्याच्या आसमंतात आले.[2] ते राजधानीकडे येताना सर्व प्रकारची सावधगिरी बाळगून येत होते. पुण्यास निघण्यापूर्वी त्यांनी आपला विश्वासू बाळाराव गोविंद यास पुण्यास रवाना केले होते. त्याने पुण्यातील लोकांच्या घबराटाविषयी व निरनिराळ्या वावड्याविषयी महादजींना टोक्यास फेब्रुवारी १७९२ त भेटून कळविले होते. तेव्हा भितीचे निराकरण करता यावे म्हणून शिंद्यांनी आपल्याबरोबरील अर्धी बटालियन बऱ्हाणपुराहून परत पाठविली. टोक्यास आल्यावर ते बीडला आपल्या गुरुचे दर्शन घेण्यास गेले. तिथून ते तुळजापुरास आपली कुलदेवता अंबाबाईच्या दर्शनास गेले.

**महादजीबावांनी दक्षिणेत निघण्यापूर्वी उत्तर हिंदुस्तानातील कारभाराची लावलेली व्यवस्था :**

दक्षिणेत निघण्यापूर्वी महादजी शिंद्यांनी उत्तरेतील कारभार गोपाळराव भाऊच्या हवाली केला. गोपाळराव भाऊ-आबाजी रघुनाथ चिटणिसाचा भाऊ, याच्या मदतीस आणखी पुष्कळ सरदार ठेविले होते. जीवबा बक्षीच्या ताब्यात सर्व फौजेची व्यवस्था दिली. अंबाजी इंगळे यास ग्वाल्हेरास ठेविले. आपल्यास मुलगा झाल्यास तो राज्याचा वारस होईल या हेतूने त्यांनी तुळजापुरास एक लग्न केले. तेथून ते आपल्या पूर्वजांच्या

---

१. म. रि. उत्तर विभाग, भा. ३, पृ ३६७.

२. चंद्र. द. ले. ९८, नाना फडणवीस शकावली, पृ. १७०.

गांवी जामगावास गेले. अशा रीतीने त्यांनी चार महिने पुण्यापासून दूरच्या वातावरणात घालविले. या चार महिन्यात महादजीनी अनेक थोरामोठ्या माणसांच्या गाठीभेटी घेतल्या, त्यांचे संशय दूर केले.

महादजींनी उत्तर हिंदुस्थानचा बंदोबस्त केल्यामुळे टिपू व निजामअल्लीना महादजींबद्दल आपुलकी वाटू लागली. इंग्रजांनी बादशहाचा अपमान करून बंगालची खंडणी देण्याचे बंद केले होते, सिराजउद्दौला, मीरकासीम, मीरजाफर, शुजाउदौला, नजीबखान, चेतसिंग रोहिला, अयोध्येच्या बेगमा ह्यांना आपल्या कुटील राजकारणाने तेजोहीन केले होते. त्यांचे स्वातंत्र्य हिरावून घेऊन त्यांच्याकडून अतोनात रकमा उकळून त्यांना कर्जात लोटले होते. असा हा शत्रू आपले रेसिडेंट हिंदी सत्ताधिशांकडे ठेवून मराठ्यांच्या सत्तेचे अपहरण करण्यासाठी तयारी करीत होता. त्यास प्रतिकार करण्याची कामगिरी आपण पुणे दरबारी मुत्सद्यास समजाऊन देऊन करावी. त्याकरिता दक्षिणेतील मराठे सरदारांची मदत मिळवावी ह्या हेतूने महादजीनी पुण्यास पाऊल टाकले. ब्रिटीश रेसिडेंटनीसुद्धा महादजींच्या आगमनाच्या हेतूबद्दलच्या अफवात आणखी भर घातली. महादजी शिंदे हे पुण्याची पेशवाई बळकावण्यासाठी येत आहेत. तसे झाले तर दिल्लीपासून पुण्यापर्यंत महादजींची एकतंत्री सत्ता निर्माण होईल. ते एक इंग्रजांच्या वाढत्या सत्तेस आव्हानच ठरेल. तेव्हा महादजींच्या दक्षिणेत होणाऱ्या आगमनाची गंभीर दखल ब्रिटीश रेसिडेंटनी एकमेकास पत्रे पाठवून घेतली.[1]

महादजींना हे सर्व ठावूक होते. त्यांनी पुण्यास येण्याची कारणे जाहीर केली ती अशी : (१) पेशव्यांच्या हुकुमाने आपण उत्तरेत इ. स. १७७७ पासून अनेक लढाया मारल्या, त्याकरिता करोडो रुपये खर्च झाला, तो पुणे दरबारकडून आपणास मिळावयाचा आहे ; (२) दिल्ली ताब्यात घेतल्याने आपणास अमाप पैसा मिळाला तो आपण हडपला, पुण्यास पेशव्यास काहीच दिले नाही असा लोकभ्रम आहे, तो कसा खोटा आहे, हे पटवून देण्याची हमी त्यानी स्वीकारली ; (३) आपले अलिबहाद्दर व होळकर यांजबरोबरच्या कलागतीचा निकाल पेशव्यांनी लावून मला न्याय द्यावा.[2]

वरील प्रकारची आपल्या येण्याची कारणे त्यांनी जाहीर केली पण ह्याचा निर्णय आपल्यासारख्या दरबारकडून लवकरात लवकर लागावा म्हणून कोणाला न दुखवता व दुसऱ्या कोणाच्या लक्षात न येता व्हावा हा हेतू महादजीबावांचा होता. तो त्यांनी मोठ्या हिकमतीने वागून तडीस नेला. नाना फडणिसांनी मात्र शिंद्यांचा हेतू ओळखला नव्हता. त्यांना वाटले की, शिंद्यांच्या आगमनाने आपसात लढाई होईल व त्यास आपणास तोंड द्यावे लागेल. म्हणून नानांनी शिंदे दक्षिणेत येत आहेत हे समजल्यावर कॉर्नवालिसला

---

१. मजुमदार सं. दी मराठा सुप्रिमसी, पृ. ४०८.

२. म. रि. उ. वि. २, पृ. ३९१.

३. पू. रे. कॉ. व्हॉ. २, ले. १७०, १७६, १८२, १८५, २०६, २२३.

विनंती करून मुंबई रेजिमेन्ट जे म्हैसुरच्या टिपूवरील मोहिमेतून परतत होते त्यांच्या मदतीची मागणी केली. शिंद्यांचा पराभव करण्यासाठी ही मागणी होती. कॉर्नवालिसने हे लक्षात घेऊन ही मदत नाकारली. टिपूच्या विरुद्ध मराठ्यांनी इंग्रजास मदत करावयास नको होती, ती केली गेली, ही मोठी चूक होय. ही चूक सुधारण्याचे मराठ्यांच्या हाती आहे. त्यांनी टिपूशी चांगले जवळीकचे संबंध ठेवावयास हवेत असे महादजींनी पुणे दरबारला सांगितले.[1] महादजींची अंतिम इच्छा अशी होती की, सर्व एतद्देशीय सत्ताधिशांनी एक होऊन इंग्रजांचा पराभव करावा. महादजीनंतर आलेला त्यांचा वारस दौलतराव याचीही हीच इच्छा होती. पण ह्या दोघांच्या इच्छा ही स्वप्नेच राहिली. त्याला दृष्य स्वरुप कधीच आले नाही.

पुणे दरबारातील मुत्सद्यांना महादजींच्या इंग्रजांविरुद्ध उठाव करण्याच्या कल्पनेचा गंधही नव्हता. त्यांना इंग्रज आपला शत्रू असे न वाटता त्याच्या जागी महादजी आपले शत्रू आहेत असे भासत होते.

नाना फडणिसांनी तर स्वतःच्या स्वार्थापलिकडे शिंद्यांच्या आगमनाकडे बऱ्या हेतूने पाहिले नव्हते. शिंदे दक्षिणेत आपले कारभारीपद हिसकावून घेण्यासाठी आले आहेत असा विचार मॅलेट या रेसिडेंटने नानांना भरवून दिला; तेव्हा ते शिंद्यांचा द्वेष करू लागले. नानांनी शिंद्याच्या वाईट हेतूबद्दल नागपूर व हैद्राबाद दरबारांत कळविले म्हणून शिंद्यांना इंग्रजांविरुद्ध फळी उभारण्यास नाना, नागपूर, हैद्राबादकर निजाम यापैकी कोणाकडूनही प्रोत्साहन मिळाले नाही. मॅलेटने मात्र इंग्रजांना कळविले की, ह्यावेळी मराठ्यांशी झगडा करणे व्यर्थ होय.

### २२ जून १७९२ चा पेशव्यांचा दरबार :

महादजीबावांनी आपल्या आगमनानंतरचे चार महिने पुण्यात घालविल्यावर त्यांनी पेशव्यांना भेटण्याचा दिवस ठरविला. पुण्याजवळील वानवडी गावी त्यांनी आपला तळ दिला होता. १३ जूनच्या सायंकाळी श्रीमंत पेशवे स्वतः आपल्या पराक्रमी सरदाराचे स्वागत करण्यासाठी गणेश खिंडीपावेतो सामोरे गेले. दोघांच्या भेटी गणेश खिंडीच्याजवळ सर्व प्रकारच्या डामडौलात झाल्या. पेशव्यांनी महादजीबावांस स्वतः पांच वर्षाचे असता तळेगांवला ब्रिटीशांकडून पराभवाची मानवंदना स्वीकारताना पाहिले होते. तदनंतर वरील दिवशी म्हणजे पेशव्यांच्या वयाच्या १८ व्या वर्षी दोघांची भेट होत होती. तोपर्यन्त पेशव्यांना आपल्या मुत्सद्दी आणि पराक्रमी सरदाराकडून विविध प्रकारच्या भेटी येत होत्या. त्यांच्या पराक्रमाच्या गोष्टी कानावर येत होत्या. तुकोजी होळकर, अलिबहाद्दर आदि सरदारांना पेशव्यांनी अनेक वेळा पाहिले होते. त्यांच्या भेटी झाल्या होत्या पण महादजीबावांना तरुण पेशव्यांनी पहिल्यांदाच पाहिले. पहिल्या भेटीत बावानी आपले मस्तक आपले धनी पेशवे यांच्या चरणावर ठेविले. पेशव्यांनी लागलीच त्यांना उठवून आलिंगन दिले. प्रेमभराने सद्गदित होऊन पेशव्यांनी

१. Roberts, History of British India, p. 240.

आपल्या गळ्यातील मोत्यांची कंठी काढून ती आपल्या नतमस्तक झालेल्या शूरवीराच्या गळ्यात घातली. दुसऱ्या दिवशी दिनांक १४ रोजी महादजीबावा पेशव्यांच्या प्रासादात आले आणि त्यांनी आपण आणलेली मोर्चेल व मीरबक्षीगिरीचा बहुमान स्वीकारण्यासाठी समारंभ भरविण्याची परवानगी मागितली. नाना फडणिसासुद्धा महादजीबावा भेटले. समारंभास परवानगी देण्यात आली. दिनांक २१ जूनला दरबार भरला. महादजीबावांनी अनवाणी राहून भर दरबारात पेशव्यांचे जोडे आपल्या पूर्वजांनी जसे छातीशी धरले होते तसे धरले. नवीन जोडे पेशव्यास पेश केले. स्वतः धन्याच्या आसनाखाली अदबीने उभे राहिले. राजाधिराज महाराज शिंदिया उत्तर हिंदुस्थानचा मालक, अनेक लढाया जिंकणारा लढवय्या, आपल्या धन्यापुढे लीनतेने उभा राहिला. हे मनोहारी दृष्य पाहून पेशव्यांना आपल्या लाडक्या सरदाराच्या आपल्यावरील भक्तिची खात्री पटली.[1] दुसऱ्या दिवशी दिल्ली बादशहाकडून आणलेल्या मोर्चेल भर दरबारात समारंभपूर्वक महादजीनी पेशव्यांस अर्पण केल्या. त्या बरोबर वस्त्रे, जवाहीर, तलवार, घोडा, नालकी, कळस असलेला हौदा, दोन आडव्या दंडावर ठेवलेली पालखी, दोन मोर्चेले व दोन चांदीच्या करंड्यात झाकलेली फर्माने पेशव्यांना पेश करण्यात आली. सर्व मानकऱ्यांनी पेशव्यांना ह्यावेळी नजराणा दिला. पेशवे निहायत खुष होऊन त्यांनी महादजीबावांस नौबत, स्वतः पेहनलेली वस्त्रे, तलवार, घोडा, हत्ती, सील, कलमदान, नालकी आणि दोन मोर्चेले दिली. उत्सवाचा हा क्षण बंदुकांचे आवाज काढून साजरा करण्यात आला. दरबार संपल्यावर शिंदेबावा आपल्या तंबूत गेले. ह्या दोन दिवसांच्या समारंभात नाना फडणीस आणि त्यांच्या पक्षांतील सरदारांनी भाग घेतल्याचे दिसते.[2]

महादजीबावांनी दिलेली हौद्याची अंबारी पेशव्यांनी महादजीबावांच्या आग्रहाखातर एकदाच वापरली. मग दरवर्षी फक्त दसऱ्यास वापर करु लागले. त्या वेळपासून पेशवे आणि शिंदे एकमेकांना वारंवार भेटून एकमेकांकडे जेवण समारंभास एकमेकांना बोलावू लागले. ९ ऑगस्ट १७९२ ला शिंदेबावानी पेशव्यांना आपल्या डेऱ्यात खाना दिला आणि कृष्णाष्टमी जन्म समारंभास दोन वर्षी प्रत्येकी १२ ऑगस्ट १७९२ व ३० ऑगस्ट १७९३ या दिवशी पेशवे महादजीबावांच्या निमंत्रणावरुन हजर राहिले होते.[3]

**पुणे दरबारातील कारभाऱ्यांचे महादजीबावांविषयी मत कलुषित होते :**

पेशव्यांच्या आणि महादजीबावांच्या गाठी भेटी वारंवार होऊ लागल्या. महादजीबावांनी उत्तरेतील आपण केलेला व्यवहार पेशव्यांना समजावून दिला. कारभाऱ्यांनासुद्धा बावांनी आपलेकडील हिशेब दाखविले. परशुरामभाऊ

१. पू. रे. कॉ. व्हॉ. २, ले. १४०.
२. ऐतिहासिक टिपणे, भा. १; ले. ९; बैजाबाई चरित्र, पृ. ११.
३. ऐ. ले. सं. भा. ९, पृ. ४६५२–५८.

पटवर्धन, हरिपंत फडके, नाना फडणीस व स्वत: बावा एकत्र बसू लागले. हिशेबाचा प्रश्न निघाला त्यावेळी बावांनी उत्तरेतील खर्चाचे सात कोटी रुपये पुणे दरबारने द्यावे, नानांचे चुलत बंधू मोरोबा १७७८ पासून कैदेत खितपत पडले होते त्यांची सुटका करावी. नानांना बावांच्या ह्या मागण्या ऐकून कसेसेच झाले. त्यांनी कारभारातून काढता पाय घेण्याचे ठरवून कारभार सोडून काशीस जाण्याचे बोलू लागले. परशुरामभाऊही नानांच्या पावलावर पाऊल ठेवून काशीस जाण्याचे बोलू लागले. हरिपंत व महादजी यांचे सूत जमले. पाटीलबावा कारभाऱ्यास दूर करून आपण पेशवाईचा कारभार हाती घेणार, अशी भीती नाना व त्यांच्या पाठीराख्यास वाटू लागली. ते बावांचा द्वेष करू लागले. इतकेच नव्हे तर पाटिलबावांचा नक्षा उतरविण्यासाठी सैन्य जमवू लागले. पाटीलबावांचे बोलणे खरे की खोटे, योग्य की अयोग्य याचा विचार कोणीच करेना. एकच विचार प्राधान्येकरून सर्वांच्या मनात घर धरून होता. तो म्हणजे नानांचा अधिकार जाऊन महादजी पेशवाईचे कारभारी होणार. इतक्यात निजामअली स्वत: पुण्यावर चाल करून येत असल्याची बातमी पेशवे दरबारात आली, तेव्हा जो तो खिन्नतेने एकमेकांकडे पाहू लागला. त्यावेळी महादजीबावांनी पेशव्यांना आश्वासन दिले की, निजामअली येऊ द्या तर खरे, त्याचे पारिपत्य आपण एकट्याने करू! हे ऐकून पेशव्यांना व इतरांना हायसे वाटले आणि महादजीबावांबद्दलच्या मनातील शंका-कुशंकास तिलांजली मिळाली.[1]

महादजीबावांची आणि हरीपंत फडक्यांची बोलणी कैक दिवस चालली. महादजीबावांनी आपल्या खर्चाची मागणी पेशव्यांकडे केली तर उलट दहा वर्षांचे हिशेब नानाने मागून त्याजकडे ६ कोटी येणे काढिले. बावांचे म्हणणे मला कोटी रुपयांचे कर्ज झाले ते पुणे दरबारने द्यावे. होळकर माझ्या-सारखाच पेशव्यांचा नोकर, तो उत्तरेत जाऊन माझा मुलुख मारतो. त्यास पेशवे अडवू शकत नाहीत. कारण त्यास सांगूनही तो पेशव्याचे ऐकत नाही तर त्याच्यावर सैन्य पाठवून त्यास धरून आणला पाहिजे. शिक्षा व्हावयास हवी. त्याला सरदारकीतून मुक्त करावे. हरिपंतानी बावांची समजूत घालण्याचा खूप प्रयत्न केला पण शेवटी बावांनी होळकरास शिक्षा करण्याचे ठरविले आणि तशा प्रकारच्या आज्ञा आपल्या उत्तरेतील सैन्यास पाठविल्या. बावांच्या सैन्याने होळकरांचा नक्षा दिनांक १ जून १७९३ रोजी उतरवला तो भाग असा—

### होळकरांचा लाखेरी येथील उच्छेद (१ जून १७९३) :

महादजीबावांनी दक्षिणेत निघण्यापूर्वी उत्तर हिंदुस्तानातील सर्व कारभार गोपाळराव भाऊच्या हवाली केला. त्याच्या मदतीस आणखी पुष्कळ मराठे सरदार ठेविले होते. जिवबा बक्षीच्या ताब्यात सर्व फौजेची व्यवस्था असून कवायती कंपूवर सर्व सत्ता डी बॉयन या फ्रेंच सेनापतीची असून त्याजवर हुकमत

---

१. ऐ. ले. सं. भा. ९, पृ. ४६४२.

गोपाळराव भाऊची होती. अप्पा खंडेरावाकडे दिल्लीची व बादशहाची व्यवस्था सांगितलेली होती. महादजीबावा दक्षिणेत गेल्याचे पाहून तुकोजी होळकर व त्यांचे मुलगे मल्हारराव व यशवंतराव यास शिंद्यांच्या फौजेचा खरपूस समाचार घ्यावा असे वाटत असे. त्यासाठी अहिल्याबाईकडून त्यांनी संमती व फौज उभारण्यासाठी पैसाही उभारला होता. होळकर आपल्याला सडकणार ही बातमी शिंद्यांचा सर्वाधिकारी गोपाळराव भाऊस लागली. तेव्हा त्यानेही होळकराची रग जिरवण्याचा निश्चय केला. होळकरने डयूड्रनेक हा कुशल सेनानी आपल्या फौजेस तयार करण्यासाठी ठेविला होता. दोन्ही बाजूंचे पायदळ व तोफखाना लढाईस सिद्ध झाली. होळकरी फौज तीस हजार लाखेरीच्या खिंडीत असता डी बायनने त्याजवर चाल केली, तोफा पुढे घातल्या,पायदळ चालून गेले. डयुड्रनेकने त्यांना अडविण्याची शिकस्त केली; पण व्यर्थ. डि बॉयनने खिंड कबजात घेऊन होळकरांच्या ३८ तोफांचा पाडाव केला. ह्या प्रसंगात डी बॉयन व मल्हारराव होळकर जखमी झाले. पण लढाई शिंद्याच्या फौजेने जिंकली.[1] लढाईत यश मिळाल्याबद्दल शिंद्यांच्या फौजेने मोठा विजयोत्सव केला. लढाईची व विजयाची वार्ता महादजी-बावांस पुण्यास कळताच ह्या आपसातील संग्रामाने त्यास पराकाष्ठेचे दुःख झाले. पण ह्या लढाईमुळे होळकरांचे पितळ उघडे पडले. होळकरांना शिंद्यांकडून जो मार मिळाला तशाच प्रकारचा मार शिंद्यांकडून आपल्याला मिळेल अशी धास्ती पुण्यातील सरदार, मुत्सद्दी मंडळीस वाटू लागली. नाना व हरिपंत यांनी महादजीबावांशी मिळते जुळते घेण्याचे ठरविले. लाखेरची बातमी पेशव्यास समजताच त्यांनी स्वतः पुढाकार घेऊन नाना आणि महादजींची समजूत घालण्याचा व समझोता करण्याचा प्रयत्न केला. महादजीबावांनी पुण्याच्या कारभारातील उणिवा दाखविल्या होत्या त्या कबूल करून त्या दुरुस्त करण्याचे काम नानांनी कबूल केले. जुलै १७९३ त पेशव्यांनी नाना व महादजींना बोलावून तुम्ही माझे डावे व उजवे असे दोन हात आहात तेव्हा दोन्ही हातांनी एकोप्याने काम करावयास हवे असे सांगितले. दोघाही मुत्सद्यांनी पेशव्यांच्या समक्ष व हरीपंतांच्या समवेत हे कबूल केले. महादजीनी पेशवे दरबारास आपला पाठिंबा व्यक्त केला. महादजींनी उत्तर हिंदुस्तानात जो मुलूख मिळविला होता तो त्याजकडे रहावा. त्यांनी ५ कोटी रुपये सैन्य खर्चाचे मागितले होते तेही देण्याचे नानांनी कबूल केले. उत्तर हिंदुस्तानच्या व्यवस्थेकरिता पेशव्यांकडून सैन्य हवे असल्यास तेही देण्याचे कबूल केले. हिंमत-बहाद्दरची व्यवस्था शिंदे यांनी आपल्या मनाप्रमाणे करावी असे ठरले. जुन्या घराण्याचा अभिमान महादजीबावांस होता. तसा नानांना नव्हता. सातारचे छत्रपती, पंत सचीव ह्यांना नाना फडणिसाकडून वाईट वागणूक मिळत होती. महादजीबावांनी ही दोन्ही प्रकरणे पेशव्यांचे नजरेस आणली. छत्रपतींना फिरण्याची परवानगी देण्यात आली.

१. म. रि. उत्तर वि. २, पृ. ३८९.
२. ऐ. ले. सं. भा. ९, पृ. ४६०५.

**शंकराजीपंत सचिवाचा होत असलेला छळ बंद केला :**

पुण्यास महादजी शिंदे आल्यावर ते नाडलेल्या लोकांच्या तक्रारी निवारण करू लागले. अशीच तक्रार पंत सचिवांची होती. रघुनाथ शंकराजी सचिव यांची व नाना फडणिसांची काही तेढ होती. पंतांकडे पूर्वीपासून मुलूख होता. त्याचा कारभार ते वेगळा करीत. रघुनाथपंत ११ जुलै १७९१ रोजी वारले आणि मुलगा शंकराजीकडे सूत्रे आली. तेव्हा नानानी त्यांचे पहिले कारभारी दूर करून बाजी मोरेश्वर म्हणून आपले तर्फेने कारभारी नेमून दिले. हे बाजी मोरेश्वर शंकराजीच्या सावत्र आईच्या विश्वासातील होते. सावत्र आई व बाजी मोरेश्वर एका पक्षाचे तर शंकराजी व त्याच्या तीन बायका दुसऱ्या पक्षाच्या. त्यांना मोरेश्वर प्रत्येक गोष्टीत विरोध करून धारेवर धरू लागला. त्यांना देवपूजा करण्यासही त्यानं मनाई केली. हा मनःस्ताप असह्य होऊन त्यांनी हे प्रकरण पुणे दरबारात दाद मागण्यासाठी नेले. हरिपंत फडके यांनी तपास करून नानांना कळविले की, बाजी मोरेश्वरास कारभारातून काढा. त्यावर नानांनी हरिपंतास सांगितले की,तुम्ही या बाबतीत जबरदस्ती करू नये. बाजी मोरेश्वर करतो तेच बरोबर आहे. बाजी मोरेश्वर व शंकराजीची सावत्र आई यांनी नाना फडणिसाच्या अंतस्थ मदतीने सचिवांचा किल्ला हस्तगत केला व शंकराजी मंद बुद्धीचा वेडसर आहे असे जाहीर केले. रामनवमीच्या उत्सवात कुलदैवत रामचंद्रजीच्या दर्शनाकरिता शंकराजी जेजुरीस गेले होते (२५ मार्च १७९३). या ठिकाणी रामचंद्रजीच्या सोन्याच्या मूर्तीवरून भांडण निघाले. कारभारी बाजीने रामचंद्रजीच्या मूर्तीची पूजा करण्यास शंकराजीस मना केली. शंकराजीने बळेच मूर्तीची पूजा करू नये म्हणून बाजीने एक सन्याची तुकडी पाठविली. शंकराजी मूर्तीची पूजा करण्यात मग्न असता बाजीच्या शस्त्रधारी लोकांनी त्यावर हल्ला केला; तेव्हा हल्ल्यात तो व त्याची बायको, सखारामबापूची मुलगी, ही दोघे जखमी झाली व सात लोक मारले गेले. ह्या कलहाची बातमी महादजीबावांस वानवडीस कळली.[1] शंकराजीतर्फे महादजीबावांस हा तंटा मिटविण्याची व सचिवास न्याय देण्याची विनंती करण्यात आली. महादजीबावा हे ऐकून पेशव्यांकडे गेले व त्यांनी ह्या झालेल्या प्रकरणी पेशव्यांनी तपास करून सचिवास न्याय देण्याची विनती केली.[2] पेशव्यांनी तावडतोब चौकशी बसविली. महादजीबावांनी जेजुरीस माणसे पाठवून सचिवांना वानवडीस आपल्याकडे ठेवून घेतले. चौकशीत असे उघडकीस आले, की सचिवावर विषप्रयोग करण्याचा कट शिजत होता. नानांना ह्याचा जाब देणे भाग होते. महादजींनी बाजी मोरेश्वरला कारभारावरून दूर करण्यास नानांना सांगितले त्यांनी न ऐकल्यास पेशव्यांनी हुकूम करावे व नानांचा उघड उघड लाचखाऊपणा बाहेर काढावा असे महादजी पेशव्यास म्हणाले; तेव्हा चौकशी प्रकरणात बाजी मोरेश्वर व त्याचे साथी यांना सडकून शिक्षा झाल्या.

१. ऐ. ले. सं. भा. ९, ले. ३५०६.

२. कित्ता.

तेवढ्या वेळेपुरता या प्रकरणाचा परिणाम नाना फडणीसवर होऊन त्यांनी हरिपंतामार्फत शिंद्यांची समजूत घालून प्रकरणे मिटविली. याप्रमाणे पाटीलबावांचे वर्चस्व नानांना असह्य झाले. महादजींनी दाखविलेले कारभारातील दोष दुरुस्त करण्याची दिशा कारभाऱ्यांनी घेतली नाही.[1] नानांना बडोदे व सावन्तवाडी प्रकरण न्यायानें मिटविण्याचा तगादा पाटील-बावांनी लावला होता. पण ज्या नानांनी आपल्या बुद्धीच्या चातुर्याने वीस वर्षे सर्व सरदारांना दावणीस लावून मराठी राज्याची उत्तम घडी बसविली होती त्या नानांना उतार वयात वैयक्तिक स्वार्थ व आसक्ती सुटून त्यांनी सर्व प्रकरणे भिजत ठेवून पेशव्यांच्या चांगल्या कारभाराचे बारा वाजविले.[2]

## घाशीराम कोतवालाचा निर्घृण अंत :

मराठ्यांच्या राज्यकारभारात खेड्याची प्रशासन व्यवस्था ग्रामपंचायतीकडे होती. माधवराव पेशव्यांचे काळी पुण्याचे महत्त्व जास्त वाढले तेव्हा ह्या शहराच्या बंदोबस्तासाठी स्वतंत्र कोतवाल म्हणजे पोलीस अधिकारी नेमण्यात आला. बाळाजी नारायण केतकर यास माधवरावांनी दिनांक १८ फेब्रुवारी १७६४ रोजी शहराच्या व्यवस्थेच्या कामावर नेमून काम बाळाजी जनार्दन फडणीस (नाना) सांगतील तसे करीत जाणे असा हुकूम दिला.

कोतवालाकडे बंदोबस्ताशिवाय शहरातील लहान गुन्हे, चोऱ्या, व्यभिचार, मद्यपान, जुगार वगैरेसारखे गुन्हे, बाजाराची व्यवस्था, वजनमापे, वाद्ये, वेश्या, हजाम वगैरेंची देखरेख, शहर स्वच्छता, रस्ते, इमारती, पाहुण्यांचा सत्कार, दानधर्म, दस्तऐवजाची नोंदणी अशी कितीतरी कामे नाना फडणिसांच्या कारभारात कोतवालाकडे आली. त्यामुळे कोतवाल म्हणजे शहरातला मुख्य व महत्त्वाचा अंमलदार बनला. बाळाजी नारायण केतकरानंतर, बाबूराव राम, जनार्दन हरि, धोंडो बाबाजी व आनंदराव काशी असे कोतवाल झाले. त्यानंतर घाशीराम कोतवालाची कोतवाल पदावर नेमणूक दिनांक ८ फेब्रुवारी १७७७ रोजी नानांनी केली. त्याचा निर्घृण अंत ३१ ऑगस्ट १७९१ त झाला. घाशीराम सुस्वरुप, बुद्धीमान व भाषणात साखर पेरणारा व मन आकर्षण करून घेणारा होता. नाना त्याचा उपयोग फितुराच्या, राघोबा दादाच्या व ठिकठिकाणच्या बऱ्यावाईट बातम्या गुप्त रीतीने आणण्याच्या कामी करू लागले. किंबहुना अशा बातम्यांवरच त्याचा मुख्य कारभार पंधरा वर्षे राहिला. ह्या मुदतीत त्याच्या हातून कित्येक अन्याय झाले. तरी शहरात त्याने पुष्कळ सुधारणा करून व्यवस्था राखली यात संशय नाही. त्याच्या गुप्त हेरांकडून मिळणाऱ्या बातम्यावरून नानांनी फंद फितुरी दाबात ठेविली होती. याबद्दल नाना त्यास बक्षिसे देऊन वारंवार प्रशंसा करीत असे. घाशीरामाने निर्दयपणे पुण्याचा कारभार केला म्हणून घाशीरामी कारभार असे बदनाम कारभारास नाव पुढे प्राप्त झाले.

---

१. ऐ. ले. सं. भा. २, ले. ३६३२.

२. म. रि. उ. वि. भा. २, पृ. ४०२—४.

घाशीरामाच्या कारकीर्दीत २५ तेलंगी ब्राह्मण पुण्यास आले होते ते आपल्या देशास जाण्यास निघाले असता त्यास घाशीरामाच्या शिपायानी पकडून आणून भवानी पेठेतील चावडीत खणाचे भुयार होते तेथे कोंडले. त्यात वारा जाण्यास जागा नव्हती. सबब, कोंडमारा होऊन एकवीस आसामी मृत्यू पावले.[१] नानाजी फाकडे याच्या निदर्शनास ही गोष्ट आल्यावर त्यानी पेशव्यांच्या कानी ही हकिगत घातली. कोंडून ब्राह्मणास मृत्यू आला हे सबंध पुण्यात समजल्यावर सर्व ब्रह्मवृंद पेशव्यांच्या वाड्यासमोर जमला आणि त्यांनी घाशीरामास हत्तीच्या पायी देऊन ठार करावे अशी मागणी केली. घाशीरामाने सांगितले की, हे लोक शहरात चोरी करत, असत त्यांना धरून आणून ठेविले असता त्यांनी अफू खाऊन प्राण दिला. त्यांना मूठमाती देण्याची परवानगी नानांनी दिली व अय्याशास्त्रीजींनी चौकशी केली, त्यांत घाशीराम दोषी ठरले. त्याच्या मुसक्या बांधून गारद्यांचे पहाऱ्यात ठेविला. त्यास हत्तीचे पायी देण्याचा आग्रह समस्त ब्राह्मणांनी धरला, तेव्हा हत्तीवर त्यास बांधले, शहरातून फिरतेवेळेस ब्राह्मणांनी दगड मारिले. तेणेकरून त्याचे डोके फुटले, तरी ब्राह्मण वृंद शांत होईना. शेवटी दुसऱ्या दिवशी ३१ ऑगस्ट १७९१ रोजी त्यास उंटावर उलटे बसवून गारपिरावर नेऊन सोडिला. ब्राह्मणांनी त्यास धोंडे घालून मारिला अद्यापि शरीर कोतवालाचे पडले आहे, नदीत टाकिले नाही असे मिरजकरांच्या वकीलाचे पत्र आहे[२]. कोतवालाच्या दिवाणास बेड्या घातल्या. कोतवालाच्या घरची जप्ती करून दोघा लेकास बेड्या घातल्या. अशा रीतीने घाशीराम कोतवाल प्रकरणाचा शेवट झाला.

### महादजीबावांचा मृत्यू :

एप्रिल १७९३ मध्ये नाना फडणीस व महादजी शिंदे यांचा समेट झाला.[३] १ जून १७९३ ला बावांच्या सैन्याने होळकर सैन्याचा सपशेल पराभव लाखेरी येथे केल्यावर पुणे दरबारने बावांच्या सर्व मागण्या मान्य केल्या. त्यानंतर महादजीबावांस ताप ज्वर येऊ लागला. आठ दिवस सारखा ज्वर येतो हे कळल्यावर खुद्द पेशवे एक वेळ समाचारास गेले होते. नानाही जाऊन आले. हरीपंत तात्या तर एक दोन दिवसाआड नेहमी जात होते. यापुढे महादजीबावा जवळ जवळ आठ महिने थोडे थोडे आजारीच होते असे म्हणावे लागते.[४]

फेब्रुवारी १७९४ त महादजीबावांची भयंकर शीतज्वराची भावना झाली. पांच सात रोज यातच गेले, नंतर कफ झाला. वैद्य आणून औषधे चालू केली पण लागू होईना, चढ होत चालला. बोलणे राहिले. बुधवार त्रयोदशीस सायंकाळी नाना समाचारास आले. बोलणे झाले नाही. तसेच श्रीमंतांकडे

१. ऐ. ले. सं. भा. ९, ले. ३३७३, पृ. ४५३६.
२. कित्ता, ले. ३३७४, पृ. ४५३९.
३. कित्ता, पृ. ४७५७, ४७५९.
४. तत्रैव, ले. ३५१४.



घाशीराम कोतवालाचा वाडा

जाऊन वर्तमान सांगितले, पेशवे महाराजांजवळ येऊन उभे राहिले. चिंता वाटली. सुवर्णतुला करण्याची सूचना केली. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सुवर्णतुला केली. बोलले नाहीत. दुखणे वाढत जाऊन काल जाहला. (१२ फेब्रुवारी १७९४).[१]

मृत्युसमयी महादजींचे वय ६७ वर्षांचे होते. ते वानवडीस निवर्तले. त्या ठिकाणी दौलतराव शिंदे यांनी त्यांची छत्री बांधली. तिच्या खर्चास पेशवे यांनी ५ सप्टेंबर १७९५ रोजी १ चाहूर जमीन छत्रीचे लगत देवविली. ही छत्री पुढे माधवराव शिंद्यानी वाढवून टोलेजंग केली. पुण्याच्या ऐतिहासिक स्मारकात त्याची गणना होते.

महादजीबावांनी आपल्याला पुत्र संतान व्हावे म्हणून नऊ लग्ने केली पण त्यांना पुत्र लाभ झाला नाही. मृत्यूपूर्वी काही महिने अगोदर त्यानी आपल्या चुलत भावाचा १४ वर्षाचा मुलगा दौलतराव यास दत्तक घेतले. दौलतरावाचा जन्म १७८० चा असून त्याच वर्षी त्याचा समकालीन रणजीतसिंग जन्मला.

दौलतरावांचे दत्तविधान यथाविधी झाले नव्हते असे दिसते. बावा मरण पावल्यावर तेरावे दिवशी त्याचे दत्तविधान करून पेशव्यांनी त्यास शिंद्याचे दौलतीवर स्थापन केले. (१० मे १७९४).

**स्वभाव व योग्यता :**

महादजीबावा जसे शूर रणवीर तसेच प्रेमळ भगवंत भक्त होते. ते पुष्कळ वेळ भजनात घालवीत. स्वतः भक्तिपर पदे रचून ते म्हणत असत. साधुसंतावर त्यांची अपरपार श्रद्धा होती. हिंदु मुसलमान असा भेद नव्हता. बीड येथे रहाणारा मनसुरशहा नांवाचा एक साधू बावांचा गुरु होता. महादजींच्या अंगी कोणताही दुराचार असल्याचा उल्लेख नाही. नैतिक गलिच्छतेचे माहेरघर जे उत्तर हिंदुस्थान, त्या ठिकाणी उणेपुरे आयुष्य खर्च करूनही धन, सत्ता, लौकिक व ऐश्वर्य यांच्या परमावधीस पोचूनही बावा अंतर्बाह्य वर्तनाने सर्वथा निर्मळ राहिले. कारभाऱ्यास छळले नाही किंवा नाना फडणिसांसारखा पैसा उकळला नाही. शत्रूनाही त्यांनी आदराने व औदार्याने वागविले. सर्व जातीचे गुणी लोक पदरी नांदवून त्यांजकडून राज्याची कामे करून घेतली. कोंकणस्थ ब्राह्मण, देशस्थ ब्राह्मण, सारस्वत, मराठे, मुसलमान, डि बॉयनसारखे परदेशस्थ सेनानायक अशा सर्व नानाविध पुरुषांचे प्रेम व आदर ह्या पुरुषोत्तमाने अर्धशतकापर्यन्त संपादन केले. शिवाजी महाराजांनतर महाराज नावास शोभणारा अखिल मराठेशाहीत हा एकच पुरुष झाला असे सरदेसाई म्हणतात ते खरे आहे.[२]

---

१. तत्रैव, पृ. ४७६७, ४७६९.

२. सरदेसाई, मराठी रियासत, उत्तर विभाग २, पृ. ४३४.

महादजींच्या कारकीर्दीत सर्व व्यवहार कागदावर होत होता. त्यावेळचे पत्रलेखक नारो शंकर, सदाशिव दिनकर, बाळाजी जनार्दन प्रामुख्याने पत्र-व्यवहार करीत असलेले दिसतात. नाना फडणीस व महादजी हे दोघेही काम करून घेणारे मुत्सद्दी होते. महादजीबावांनी सहजासहजी नोकर बदलले नाहीत पण महादजीबावांशी संभाषण करणे हे हेस्टिंग्जसारख्यास जड जात होते.

महादजीबावांची पेशव्यांकडे अनन्यसाधारण निष्ठा होती. पेशव्यांशी नम्रभाव धरण्यात त्यास कमीपणा वाटला नाही. आम्हास द्रव्यसंचय व लौकिक श्रीमंतांचे कृपेकरून झाला. 'आमचे जन्माचे सार्थक श्रीमंताचे कृपेकरून झाले. जे करणे ते श्रीमंताची सेवा करावी या बुद्धीनेंच करतो' असे महादजीचे उद्‌गार आहेत.

नाना फडणीस वयाने त्यांच्यापेक्षा १५ वर्षे लहान तरीपण ते पेशव्यांचे कारभारी म्हणून त्यांजबरोबर बैठकीवर बसण्याचा सुद्धा संकोच करीत असत.

महादजीबावांबद्दल इतिहासकार जदुनाथ सरकार म्हणतात "दिल्ली सलतनतवर मराठ्यांची सत्ता प्रस्थापित करून पानिपतच्या पराभवाचा डाग धुवून काढण्याचे काम एकट्या महादजीबावांनीच केले. त्यांना पुण दरबारकडून मदत मिळाली नाहीच. उलट विरोधच झाला. नाना फडणिसांनी जर खुल्या मनाने मदत केली असती तर जानेवारी १७८९ मध्ये महादजीबावांनी जी मराठी सत्ता उत्तर हिंदुस्थानावर प्रस्थापित केली होती ती चार वर्षे अगोदर झाली असती. हिंदुपदपातशाहीचे मराठ्यांचे स्वप्न खरे करून दाखविण्यात एकुलते एक महादजी शिंदे दिसतात" त्यांच्या मरणोत्तर, इतिहासकार मॅलिसिन म्हणतो, "महादजीबावांच्या मृत्यूने मराठ्यांनी आपला अतिशूर लढवय्या आणि दूरदर्शी मुत्सद्दी गमावला. त्यांच्या जीवनात त्यांना दोन उद्देश प्रिय होते, एक राज्य स्थापिणे. दुसरे साम्राज्याकरिता इंग्रजांशी लढत देणे. ह्या दोन्ही गोष्टीत ते यशस्वी झाले. जे राज्य स्थापिले ते आतापर्यन्त (मॅलिसनच्या काळापर्यन्त) राहिले. त्यांच्या तालमीत तयार झालेले सैन्य त्याच्या पश्चात आठ वर्षांनी लेक व वेलस्ली यांनी पराभूत केले. ह्याचे कारण महादजीबावांचे त्यांना मार्गदर्शन होऊ शकले नाही. ते जर जिवंत राहिले असते तर एकाच झेंड्याखाली टिपू सुलतानाची फ्रेंच सैन्य तुकडी, घोडेस्वार, निजामाचे सैन्य, रजपुतांचे सैन्य, सर्व एकत्र आणले असते तसेच नागपूर, बडोदे, पुणे, इंदूर या मराठी सरदारांच्या राजधान्यातून सैन्य एकत्र आणले असते; अशा रीतीने सर्व सैन्यानिशी इंग्रजांशी झुंज दिली असती व त्याचा निकाल कदाचित निराळा लागला असता".[१]

महादजींची महाराष्ट्रात जामगांवी जहागिरी होती. तिथे त्यांनी कोट बांधला होता. अधूनमधून तिथे जाऊन रहाण्याची त्यांना हुक्की येई. त्यांचे

१. मॉलिसन, धी नेटिव्ह स्टेटस् ऑफ इन्डिया, पृ. १४५.

पदरी शेकडो एतद्देशीय लष्करी अधिकारी होते; शिवाय २०० युरोपियन सैन्याधिकारी होते. सैन्याच्या तोफा, शस्त्रास्त्रे, सर्व लवाजमा आधुनिक पाश्चिमात्य पद्धतीने सजविलेला असे.

महादजीबावांकडे खालील मुलूख होता :—

| | |
|---|---|
| गोहदच्या राण्याकडून .. .. .. | ३२ लाख |
| मिर्झाशिफीखानकडून .. .. .. | ३३ लाख |
| अफ्रासियाबखानकडून .. .. .. | ४० लाख |
| जहांगिरखान वगैरेकडून .. .. .. | ४ लाख |
| नारायणदासकडून .. .. .. | ३ लाख |
| महमदबेग हमदानीकडून .. .. .. | ६ लाख |
| रणजितसिंग जाटातर्फे शिखांकडून .. .. | १२ लाख |
| जयानगरच्या राण्याकडून .. .. .. | ८५ लाख |
| पतियाळा प्रशासनाकडून .. .. .. | ६ लाख |
| बादशहाची जमीन .. .. .. | ३ लाख |
| दतिया आणि भदावरकडून .. .. .. | ८ लाख |
| प्रतापसिंग मचेडीकरकडून .. .. .. | ४ लाख |
| गुलाम कादीरखानकडून .. .. .. | ६० लाख |
| एकंदर रुपये .. | २९६ लाख |

रुपये २ कोटी ९६ लाख एकंदर.

वरील रकमांच्या ऐवजाशिवाय २ कोटी ८५ लक्ष उत्पन्नाचा मुलूख त्यांनी मिळविलेला होता.

| | |
|---|---|
| बादशहाकडील मुलूख, नजफखान आणि गुलाम कादीर यांच्या मुलुखासह | २ कोटी २५ लाख |
| गोहदच्या घराण्याकडील मुलूख .. .. | ० .. ४२ लाख |
| भदावर, कचवाघर व भांडर .. .. | ० .. १८ लाख |
| एकंदर रुपये .. | २ कोटी ८५ लक्ष.[1] |

महादजींना सर्व मराठे एकत्र आणून इंग्रजांशी झुंज द्यावयाची होती. पण इंग्रजांनी पुणे दरबारापासून महादजींना दूर करण्याचे तंत्र योजिले होते.

१. पारसनीस, बैजाबाईचे चरित्र, पृ. १३.

यावेळी महादजीबावांनी पूर्वीची गनिमी पद्धत सोडून कवाइती पलटणे तयार केली. डी बॉयनला नोकरीत घेऊन कवाइती सैन्याच्या बळावर त्यांनी उत्तर हिंदुस्थान आपल्या ताब्यात ठेविला होता.

## पेशवा सवाई माधवराव

### पेशव्यांचे बालपण व शिक्षण :

सवाई माधवराव पेशवे यांचा जन्म १८ एप्रिल १७७४ चा. त्यांचे वडील नारायणराव पेशवे यांचा खून होऊन बापाच्या मृत्यूनंतर जन्मलेले हे बाळ. लहान पेशवे हे मराठी राष्ट्राचे आशेचे केन्द्रस्थान होते. त्यांना चुलते माधवराव पेशवे यांचे अवतार असे मानले जाई. बापाच्या पश्चात जन्मलेल्या ह्या बाळाला मातृसुखही फार काळ लाभले नाही. तो तीन वर्षाचा असतानाच आई गेली. त्यामुळे त्याचे खेळणे व लडिवाळ रागावणे, रुसणे, सगळे दासदासी व नोकराणी यांच्या सहवासात गेले. नानानी त्याच्यापुढे सर्व प्रकारची सुखे दत्त म्हणून उभी केली. काही कमतरता भासू दिली नाही. त्यावेळच्या रीतीप्रमाणे त्याचे शरीर पुष्ट होण्यासाठी शेळीचे दूध मोठ्या प्रयासाने मिळवून त्याचा रतीब लावला. सध्याचे शास्त्रोक्त शिक्षण देण्याची पद्धत त्यावेळी अवगत नव्हती. त्यावेळच्या रिवाजाप्रमाणे पेशव्यांच्या शिक्षणाच्या बाबतीत भयंकर हेळसांड झाली. जादूटोणा आणि शुभशकून यातच त्याचे जीवन गुरफटून ठेवण्यात आले. शनिवार वाड्यातील भट-भिक्षूक, नोकरांच्या बायका, दासदासी यांनी त्यास खेळवला, वाढवला आणि शिकविलाही. नाना फडणिसानी ह्या पेशव्याच्या शिक्षणाची व्यवस्था तत्कालिन पद्धतीप्रमाणे उत्तम ठेविली होती. आपल्या परवानगीशिवाय पेशव्यांच्या बाबतीत काही घडू नये अशी चोख व्यवस्था नानानी केली होती. पेशव्यास आवश्यक तेवढे लेखन-वाचनाचे आणि लष्करी शिक्षणाचे धडे त्याला पाचव्या वर्षापासून मिळू लागले होते. नानाच्या स्वभावाचे दोन मुख्य गुण—एक संशयखोर वृत्ती आणि दुसरा भित्रेपणा. ह्याचा प्रभाव पेशव्यांवर पडत होता. मॅलेट पुण्यास आल्यावर तो ८ मार्च १७८६ च्या पत्रात किशोर पेशव्याविषयी लिहितो, "पेशवा माधवराव सवाई हा अकरा वर्षाचा आहे. त्याच्या सवयी त्याच्या वयाला शोभून दिसत नाहीत, त्याचा चेहरा जरी उमदा किंवा जबरदस्त आकर्षक असला तरी त्याच्या वयाला शोभेल असा शहाण्यासारखा दिसतो."[१] लिहिणे-वाचणे शिकत असताच त्यास मोडी वळणदार अक्षर काढण्याची सवय लागली होती. तोंडपाठ करणे व हिशेब लिहिणे हे शिक्षण त्यास मिळाले होते. त्याने हाती लिहिलेली पत्रे उपलब्ध आहेत. घोड्यावर बसून रपेट करणे, शिकार करणे, कुस्ती, तीरबाजीचे खेळ खेळणे हे शहराच्या ठराविक मर्यादेपर्यन्त करण्याची खास परवानगी देण्यात आली होती. त्यास वयाच्या चौदाव्या वर्षी शिकारीचा

---

१. पू. रे. कॉ. मा. २, पृ. ३, ४.



सवाई माधवराव, नाना फडणीस व महादजी शिंदे

विलक्षण नाद लागला होता. त्यास तमाशा पहाण्याचे वेड होते.[1] त्यात तो फार रंगून जात होता. त्यास बाहेरच्या मोठ्या जगात व वातावरणात वावरण्याची संधी नाना फडणिसांनी न दिल्यामुळे लोकास अभद्र बोलणे, थोरामोठ्यास शिविगाळ करणे, वाड्यांत येणाऱ्या भट-भिक्षुकाच्या अंगावर धावून जाणे, इंग्रजांचे पोषाख चढवून त्यांच्या चेष्टा करणे––अशा कित्येक व्रात्यपणाच्या गोष्टी पेशवा करीत असे. त्याचा प्रवास पुण्यापासून १०० मैलांचे बाहेर कधी झालाच नाही. त्याने नाशिक, वाई व सातारा एवढ्याच जागास भेट दिली होती. मराठ्यांच्या दक्षिणेत व उत्तरेत सारख्या लढाया होत होत्या त्यापैकी एकाही स्वारीसोबत त्यास पाठविले नव्हते. इंग्रज वकिलाने सवाई माधवरावांना टिपूवरील १७९१ च्या मोहिमेसोबत पाठविण्याचा आग्रह धरला होता. पण हेकेखोर नानांनी त्याचे ऐकले नाही[2] किंवा त्याला पाश्चात्त्य संस्कृतीचा विकास होत असलेले मुंबई शहर हेही दाखविले नव्हते. नेमबाजीची हौस असलेल्या ह्या पेशव्यास स्वाऱ्या-मोहिमांचे जीवन चांगले रुचले असते व ते उपयुक्तही ठरले असते पण पेशव्यास जे रुचेल, मानवेल व मराठी राज्यास उपकारक होईल असे जीवन नानानी पेशव्यास मिळू दिले नाही. त्याच्याभोवती संशय आणि भीति यांचे कुंपण निर्माण केले. पेशवा आपल्या हातात कायम राहील आणि त्याचा पालक म्हणून आजन्म आपण सर्वाधिकारी म्हणून राहू अशी इच्छा ठेवून नाना वागत होते. स्वातंत्र्य आणि धाडशीपणा ह्या विरुद्ध नानानी पेशव्यास वागणूक दिली. महादजी शिंदे, हरिपंत फडके, परशुराम भाऊ पटवर्धन आदि मंडळींचा संबंध इंग्रजांशी आला होता. त्यांचे रीतीरिवाज व त्यांचा जीवनक्रम त्यांनी पाहून त्याजशी ह्या सरदारांची ओळख पण झाली होती. ह्याचा फायदा सवाई माधवरावास त्यावरील बंधनामुळे मिळू शकला नाही. फक्त पुणे रेसिडेन्सी-मधील जीवन त्याला पहावयास मिळाले होते.[3]

राजघराण्यापैकी झांशीचे रघुनाथ हरि नेवालकर किंवा तंजावरचे राजे सरफोजी यांच्यासारखेच आधुनिक युरोपियन शिक्षणाचा आस्वाद ह्या तरुण पेशव्यास घेता आला असता. विशेषतः लालसोटचा विजय झाल्यावर पेशव्यांना महादजीबावांकडे उत्तर हिंदुस्थानात जाऊन रहाता आले असते. त्यावेळी सर्वसाधारण हिंदुस्थानचे स्वामित्व इंग्रजांकडे जाणार अशी भीती व्यक्त केली जात होती. नाना फडणिसांनी ह्याची दखल घेऊन युरोपियन पद्धतीचा अभ्यास करून व त्यांच्या यशाची गुरुकिल्ली शोधण्याचा प्रयत्न करावयास हवा होता. इ. स. १७९२ मध्ये महादजीबावा पुण्यास नवे वारे घेऊन आले. त्यावेळी पेशवे १८ वर्षांचे होते. पेशव्यांना महादजीबावात एक नवी दृष्टी, नवे तेज, विचारांची नवी दिशा सापडली. त्यांना महादजी-बावांच्या सहवासात एक नवे चैतन्य दिसले. पेशवे बावांच्या सहवासाने

---

१. सरदेसाई, न्यू हिस्टरी ऑफ द मराठाज, भा. ३, पृ. २८२.

२. तत्रैव, पृ. २८२.

३. म. रि. ड. वि. २, पृ. ४९२.

भारावून गेले. दोघे एके ठिकाणी जेवू लागले, शिकारीस जाऊ लागले, अनेक विषयांवर चर्चा करू लागले. महादजीबावांच्या मनमोकळ्या स्वभावाचे पेशव्यांना कौतुक वाटू लागले. महादजीबावांबद्दल त्यांना आपुलकी, मनात नितांत आदर वाटू लागला होता. याउलट गेले पाव शतक पेशवे नानांनी निर्माण केलेल्या भीतीयुक्त आणि संशयी वातावरणात वावरत होते. महादजी पुण्यात आल्यापासून कुढलेले वातावरण बदलून नवीन जोषाचे उन्मेषकारी वातावरण पेशव्यास लाभू लागले. पेशव्यांनी आपली जबाबदारी ओळखली आणि ते मालकासारखे वागू लागले. पेशव्यांसारखे वागू लागले.[1]

आतापर्यन्त नानांनी पेशव्यास निजामाची भेट घेऊ दिली नव्हती. टिपू सुलतान, राजपूत राजे यांच्या भेटीपासून नानानी पेशव्यास दूर ठेवले होते, वंचित केले होते. त्या अगोदरचे पेशवे हिंदुस्थानातील राजेरजवाड्यांच्या मुलाखती स्वतः घेत असत व त्यांजशी प्रत्यक्ष बोलून व्यवहार करीत असत. पण अशा प्रकारची संधी नानानी ह्या पेशव्यास कधीच दिली नाही. पेशव्यांना कोणी भेटावयाचे व बोलावयाचे हे नाना ठरवून त्याची यादी नाना तयार करीत असत. त्या ठरविलेल्या व्यक्तिशिवाय दुसऱ्या कोणासही पेशव्यांना भेटता येत नसे. पेशवे कधी कधी आपल्या आजी गोपिकाबाई ह्यांच्या भेटीस नाशिकास जात असत. ह्या पलिकडे त्यांना अन्य कोणास भेटता येत नसे. इ. स. १७८८ त पेशवे एकदा नाशिकला गेले असता गोपिकाबाईना पेशव्यातील वैगुण्य लक्षात आले आणि त्यांनी नाना व हरीपंत ह्या दोघांचे लक्ष त्याकडे वेधले. " पेशव्यांच्या भोवती सदा सर्वकाळ क्षुद्र माणसे, कारकून आणि नोकर यांचा गराडा असतो; ते लोक पेशव्यांस स्वतंत्रपणे कोणास भेटावयास देत नाहीत. त्यामुळे त्याला अनुभव व शहाणपणा कसा येणार "? धार्मिक विधी, अंधश्रद्धा आणि खोटचा करण्या ह्यावर ह्या तरुण पेशव्यांचे सबंध मन गुंतले होते. सबंध वेळ गणपती उत्सव व तत्सम सत्रात, श्रावणमास दक्षिणा, दररोजच्या प्रार्थना व इतर धार्मिक कृत्ये यात जात असे. साहसाची व पराक्रमाची नैसर्गिक आवड या होतकरू पेशव्यास पर्वतीखालील मैदानावर हरणाच्या पाठीमागे पळून किंवा घोड्यांचे व जनावरांचे लुटुपुटूचे खेळ खेळून भागवावी लागली. पेशव्यांच्या शिकारी खेळासाठी अनेक हरिणे उघड्या जागेत पाळून ठेविली होती.[2]

**श्रावण मासाचा रमणा :**

सवाई माधवरावांच्या वेळेस दानधर्माची व श्रावणमासाची दक्षिणा बरीच वाढली. देशाच्या सर्व भागातून विद्वान लोक दक्षिणेसाठी पुण्यास मोसमावर जमा होत. त्यांची पुण्यास परिक्षा होई व त्यांच्या योग्यतेनुसार दक्षिणेचा आकडा ठरविला जाई. सर्वात मोठा आकडा एक हजाराचा असे. अशा थोर विद्वानांची दक्षिणा शनिवार वाड्यात देत आणि सरसकट इतर सर्वांना

---

१. खरे, ऐ. ले. सं. भा. ९, ले. ३४२७; स. मा. रोज. २७०, २७२.

२. मराठी रियासत, उत्तर वि. २, पृ. ६०६.

रमण्यात पर्वतीच्या खाली जावे लागे. रमण्याची व्यवस्था ठेवण्याचे काम दगदगीचे व बिकट असून, पोलीस फौज वगैरेंच्या मदतीने तडीस जाई. हा एक वार्षिक मेळावा असून प्रेक्षकांची सुद्धा अतोनात गर्दी होई. पेशवे, नाना फडणीस, अय्याशास्त्री वगैरे प्रमुख मंडळी प्रत्येक दरवाजावर बसत. पुण्यास सरासरी ४० हजार ब्राह्मण भिक्षार्थ जमत.

तत्कालीन समजुतीस अनुसरून नाना फडणिसांची भावना विशेष धार्मिक होती. म्हणून सवाई माधवरावांची तीर्थयात्रा, ग्रहणदाने वगैरे गोष्टी त्यांनी त्याजकडून बिनचूक करविल्या. इ. स. १७९१ च्या रमण्यात ९९ हजार रुपये लागले. त्याशिवाय वाड्यातील दक्षिणा वेगळी.[1]

**पुण्याच्या जीवनावर ब्रिटिशांचे सांवट :**

रॉबर्ट क्लाईव्ह व वॉरन हेस्टिंग्ज ह्या ब्रिटीश योद्धयांनी हिंदुस्तानात इंग्रजी सत्तेचा पाया घातला. हिंदुस्तान जिंकण्याचे त्यांचे धोरण कॉर्नवालीसने सराईत मुत्सद्देगिरी दाखवून चालू ठेविले. त्याच्याच कारकीर्दीत ब्रिटीश वकिलाती प्रमुख हिंदी राजेरजवाड्यांच्या दरबारी सुरु झाल्या. त्याचा फायदा वेलस्ली बंधूंनी इंग्रजांची पकड एतद्देशीय संस्थानिकांवर पद्धतशीरपणे घट्ट करण्यात घेतला. मॅलेट रेसिडेन्ट म्हणून पुण्यास बारा वर्षे राहिला होता. ह्या त्याच्या वास्तव्यात त्याने आपल्या रेसिडेन्सीची छाप पुण्यावर ठेविली. खेळांचे विलोभनीय वर्णन, गाणेबजावणे, नाच, कुस्ती खेळ, घोड्यावरून दौड, थोरामोठ्यांच्या भेटी ते घेत असत.[2]

**मराठे-निजाम झगड्याचे स्वरूप :**

मराठे-निजाम झगडा चिरकालिन होता. महाराष्ट्रात मराठे व निजाम असे दोन मालक एकत्र रहाणे शक्य नव्हते. शाहु महाराजांची भावना मुसलमानास दुखविण्याची नसल्यामुळे त्यांच्या हयातीत निजामास नाहीसा करणे शक्य झाले नाही. नानासाहेब पेशव्यानी राजकारणे व लढाया करून त्यास बहुतेक संपुष्टात आणिले होते. माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत निजामानं डोके वर काढले नाही. निजामाने मराठ्यांस चौथाई, सरदेशमुखी, खंडणी देण्याचे वारंवार कबूल केले होते. तरी वास्तवात मराठ्यांस पैसा दिला नाही. नाना फडणीसांच्या हातात मराठ्यांचा कारभार आल्यावर त्यांनी निजामाकडून चौथाईच्या थकबाकीची मागणी केली. इ. स. १७६३ ते १७७५ पर्यन्त रुक्नुद्दौला हा हैदराबादचा दिवाण होता. मराठ्यांशी त्याने शेवटपर्यन्त समेटाचे धोरण ठेविले होते. मराठे-इंग्रज लढाई संपून सालबाईचा तह १७८२ त झाल्यावर रघुनाथराव पेशवे स. १७८४ त निवर्तल्यावर नाना फडणिसांनी निजामावरील चौथाईची कोट्यावधी रुपयाची थकबाकी काढली. नाना फडणीस आपली चौथाईच्या थकबाकीची मागणी करीत

---

१. ऐ. टि. ३, ३०, खरे, भा. ९, ले. ३३६६-६७, ३३७०.

२. म. रियासत, उत्तर वि. ३, पृ. ४९३-४९४, पारसनीस, पूना इन बाय गॉन डेज, पृ. १२८-१३९.

होता आणि निजामअल्ली त्या देण्यास अनेक सबबी सांगून पुढे ढकलीत होता. हे नानांचे मागणे आणि निजाम अल्लीच्या हुलकावण्या इ. स. १७९२ पर्यन्त चालल्या. ह्या वर्षी महादजी शिंदे पुण्यास कवाइती फौजेसह उत्तरेतून आले. त्याबरोबर मराठ्यांचा दरारा वाढला आणि त्यांच्या शत्रूची भीतीने गाळण उडाली. शिंद्यांच्या बळावर नानांनी निजामाकडे थकबाकीची मागणी केली. ह्यावेळी निजामाचा दिवाण मशिर उल्मुल्क होता. ४० वर्षापूर्वी हा गृहस्थ पर्शियामधून येऊन ह्याने निजामाकडे नोकरी पत्करली होती. ह्यालाच मराठ्यांनी आपली थकबाकी न मिळण्याचे कारण ठरविले होते. तो सलाबतजंगाकडे प्रथम नोकरीस राहिला. पण कालांतराने त्याने सलाबतजंगाचा काटा काढण्यास निजामअल्लीस मदत केली आणि ह्या कामगिरीमुळे तो निजामअल्लीच्या खास विश्वासातील झाला. पुणे व हैदराबाद येथील ह्या दोन कारभाऱ्यांचा झगडा लढाईस कारणीभूत झाला. खर्ड्यांच्या अगोदर नाना व मुशीर यांच्यामध्ये वैराची चुरस लागली होती. इंग्रजांची दोस्ती संपादून मुशीरला मराठ्यांचे राज्य नष्ट करावयाचे होते.[१]

• • •

१. पूना रेसिडेन्सी कॉ. व्हॉ. ४, प्रस्तावना, पृ. १० व ११.

पेशवाईचा प्रदोष काल

## कालसूची

| | |
|---|---|
| १७९२ . . . . | मराठे व निजाम टिपू विरुद्ध इंग्रजांस मिळतात. |
| १७९३ . . . . | नाना फडणीस निजामाकडे चौथाई थकबाकीची मागणी करतात. |
| १७९३, मार्च २७ . . | रघुजी आंग्रे मृत्यू. |
| १७९५, मार्च ११ . . | निजाम–मराठे यामधील खर्ड्यांची लढाई. |
| १७९५, मार्च १३ . . | निजामअली पराभव पावून शरणागती पत्करतो. |
| १७९५, ऑक्टोबर २७ . | सवाई माधवरावांचा मृत्यू. |
| १७९५ . . . . | साध्वी अहिल्याबाई होळकर यांचे देहावसान. |
| १७९५ . . . . | नाना फडणीस निजामावरील स्वारीसाठी मराठे सरदारांस बोलावितात. |
| १७९६, फेब्रुवारी २५ . | दु. बाजीराव आणि त्यांचे बंधु पुण्यास येतात. |
| १७९६, मार्च २१ . . | नाना फडणीस पुणे सोडून महाडास जातात |
| १७९६, मार्च २४ . . | दौलतराव शिंदे पुण्यास येतात. |
| १७९६, नोव्हेंबर १२. . | नाना फडणीस पुण्यास येऊन दाखल. |
| १७९६, डिसेंबर ५ . . | दु. बाजीरावांस पेशवाईची वस्त्रें मिळतात. |
| १७९७, ऑगस्ट १५ . . | तुकोजीराव होळकर पुण्यास निवर्तले. |
| १७९७, सप्टेंबर १४ . . | दौलतराव शिंदे मल्हारराव होळकरांच्या दोन भावांस हुसकून लावतात. |
| १७९७ अखेर . . . | मराठ्यांच्या कैदेतील अझीझ ऊल उमरा यांची सुटका होऊन तो हैदराबादेस जातो. |
| १७९७, डिसेंबर ३१ . . | नाना फडणीस यांस बाजीराव पेशवे अटक करतात. |
| १७९८, फेब्रुवारी . . | सर्जेराव घाटगे यांच्या मुलीशी दौलतरावांचा विवाह. |
| १७९८, मार्च १५ . . | निजामाच्या पलटणी सज्ज ठेवणारा रेमंड याचा मृत्यू. |
| १७९८, जुलै . . . | बाजीराव नाना फडणीसांची कैदेतून मुक्तता करतात. |
| १८००, जानेवारी ३१ . | यशवंतराव होळकर यांची भोसल्यांच्या कैदेतून सुटका आनंदराव पवारांकडे स्वार घेऊन चाकरीस. |
| १८००, मार्च १३ . . | नाना फडणीस मृत्यू. |
| १८००, जून ३० . . | धोंडजी वाघ धोंडोपंत गोखले यांस ठार मारतो. |
| १८००, सप्टेंबर १० . . | धोंडजी वाघाशी लढाई होऊन तो ठार होतो. |

| | |
|---|---|
| १८००, ऑक्टोबर १२ . | निजामाने इंग्रजांशी तैनाती फौजेचा तह करून मांडलिकत्व पत्करले. |
| १८०१, एप्रिल १६ . . | बाजीराव पेशवे यांनी विठोजी होळकर यांस हत्तीच्या पायी देऊन ठार मारले. |
| १८०१, जून . . . . | शिंदे–होळकरांचा खरा सामना सुरू होतो. |
| १८०१ . . . . . | पेशवे सर्व मराठे सरदारास एकत्र आणण्याचा प्रयत्न करतात. |
| १८०२ . . . . . | तापी नदीवर यशवंतरावांच्या सैन्याचा तळ. |
| १८०२, ऑक्टोबर १५ . | होळकर शिंद्यांच्या फौजेचा हडपसर येथे पराभव करतात. |
| १८०२, ऑक्टोबर ३० . | बाजीराव मदतीसाठी महाडहून स्वदस्तूरचे पत्र इंग्रजांस लिहितात. |

# २२

## पेशवाईचा प्रदोष काल

(सन १७९५—१८०२)

**मराठ मंडळाचा अस्त :**

महादजी शिंद्यांनी मराठ्यांच्या पराक्रमाचा व्याप आणि दरारा उत्तर भारतांत उत्पन्न करून मराठ्यांच्या पानिपतपूर्व वैभवाहूनही सत्ता व वैभव वाढविले. पानिपत अपयशाचा डाग धुवून काढला. बादशाही ताब्यांत ठेविली, ते महादजी शिंदे १७९४ च्या फेब्रुवारीत पुण्याजवळील वानवडी या गावी निवर्तले. त्याच वर्षी महादजी मागून दक्षिणेस हैदर टिपूच्या लढायांत शौर्य गाजवून प्रख्यात झालेले हरिपंत फडके मृत्यू पावले. महादजी बावांच्या मृत्यूमुळे मराठेशाहीची जबरदस्त हानी झाली. त्यांच्या पश्चात मराठ्यांच्या उत्तरेतील राजकारणात मोठी पोकळी निर्माण होऊन इंग्रजांनी धूर्तपणे सत्ता विस्तारास सुरुवात केली.

**खडर्याच्या लढाईत निजामाचा पराभव (मार्च १७९५) :**

थोरले माधवराव पेशवे यांनी निजामाशी राक्षस भुवनाच्या लढाईनंतर इ. स. १७६२ मध्ये सलोख्याचा तह केला होता. तो उभयतांनी सालबाई तहानंतर (१७८३) सुद्धा पाळला. त्याला कारण म्हणजे दोघांनाही त्रास देणारा प्रबळ शत्रू हैदर अल्ली हा होय. इंग्रजांनी टिपू विरुद्ध सूत्रे हालवू लागताच मराठे व निजाम हे इंग्रजांना इ. स. १७९२ त मिळाले. टिपू विरुद्ध कॉर्नवालीसला मदत करताना मराठ्यांचे आपल्यावरील वर्चस्व कमी व्हावे हा निजामाचा एक अंतर्गत हेतु होता. इंग्रजांचे सहकार्य मिळत असल्यामुळे निजामाने पेशव्यांशी बेपर्वाईने वागणे सुरु केले. त्यांतच नाना फडणीसानी इ. स. १७९३ मध्ये चौथाई थकबाकीची मागणी केली असता निजामाचा दिवाण मुशीरुलमुल्क याने ती फेटाळली. तेव्हा नाना फडणीसानी निजामास शस्त्र बळाने शरण आणण्याचे ठरविले. इकडे निजामानेही लढाईची जय्यत तयारी केली. त्याने इंग्रज गव्हर्नर जनरल सर जॉन शोअर याची मदत मागितली. पण त्याने तटस्थतेचे धोरण स्वीकारून ती नाकारली[1].

इ. स. १७९५ मध्ये नाना फडणीसानी तुकोजी होळकर, परशुरामभाऊ पटवर्धन, रघुजी भोसले या मातबर मराठे सरदारांस सरकार स्वारीच्या

---

१. मॅलेटचा रिपोर्ट, पूना रे कॉं. भा. ४, प. क्र. २०२

मदतीस बोलाविले. ह्या सर्व सरदारांनी पेशवे सवाई माधवराव यांजबरोबर लढाईसाठी कूच केले. निजामही तयारी करून बिदरहून पुण्याच्या रोखाने निघाला. मराठवाड्यांत खर्डा या गावी दिनांक ११ मार्च १७९५ रोजी दोन्ही कडील सैन्याची गांठ पडून लढाई जुंपली. तीत शिंद्यांच्या फौजेतील जिवबा दादा यांनी तोफांची भारी मारगिरी केल्यामुळे निजामअलीचा पराभव होऊन त्याने १३ मार्चला शरणागती पत्करली. तेव्हा तह झाला त्यांत मुख्य प्रधान मशीरुन्मुल्क हा मराठ्यांच्या कैदेत आला. दक्षिणेत गोवधबंदी करण्यास निजामाने मान्यता दिली. उदगीरच्या तहाप्रमाणे ठरलेला प्रदेश मराठ्यांना देण्याचे निजामाने कबूल केले. त्यात सध्याचा मराठवाडा जवळ जवळ सगळाच समाविष्ट झाला होता[१].

खडर्याच्या नेत्रदीपक विजयाचा हर्ष सवाई माधवरावाच्या आकस्मिक मृत्युमुळे (२७ ऑक्टोबर १७९५) मावळला. सवाई माधवरावाचा मृत्यू म्हणजे महाराष्ट्रावर झालेला प्रचंड आघात होय. त्या नंतरच्या गोंधळांत नाना फडणीसानां आपली जागा टिकविण्यासाठी मुशीरुल्मुल्काला सोडून द्यावे लागले. खडर्याच्या लढाईनंतरच्या तहाने घेतलेला मुलुख निजामास परत द्यावा लागला. अशा रीतीने मराठवाडा पुन्हा निजामाच्या अधिपत्याखाली गेला[२].

इ. स. १८०० मध्ये १२ ऑक्टोबर रोजी निजामाने इंग्रजाशी तैनाती फौजेचा तह करून त्यांचे मांडलिकत्व पत्करले. यानंतर निजामाचे घराणे इंग्रजांचे मांडलिक म्हणून इ. स. १९४७ पर्यन्त शिल्लक राहिले.

### दुसऱ्या बाजीरावांची निवड :

इ. स. १७९५ नंतर महाराष्ट्रातील कर्ती माणसे दिवंगत झाली. इ. स. १७९५ त साध्वी अहल्याबाई होळकर या देवलोकी गेल्या. तुकोजी होळकरांचे देहावसान झाले. दक्षिणेतल्या लष्करी प्रमुखातले हरिपंत फडके निवर्तले. परशुरामभाऊ पटवर्धन सवाई माधवरावांच्या मरणानंतर उठलेल्या धामधुमीमध्ये तुरुंगात पडले. त्यांची १७९९ मध्ये सुटका झाल्यावर रणांगणावरच मृत्यूने त्यांना गांठले. अशा रीतीने कर्त्या माणसांचा शेवट झाल्यावर सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर पेशवे पदावर हक्क सांगणारे तीन वारस होते. रघुनाथरावानी बाजीरावाच्या जन्मापूर्वी दत्तक घेतलेले अमृतराव, बाजीराव व त्यांचे धाकटे बंधू चिमणाजी. अमृतराव हे दत्तक पुत्र असल्यामुळे आणि बाजीराव दुर्व्यसनी असल्यामुळे चिमणाजीलाच पेशवाईची वस्त्रे द्यावीत असे शिंदे होळकरांचे मत होते. नाना फडणीसांच्या मते हे तिघेही नालायक असल्यामुळे सवाई माधवरावाच्या पत्नीस यशोदाबाईस भट घराण्यातील एखाद्या मुलास दत्तक घेण्यास लावावे व त्याच्या नांवे राज्य कारभार करावा.

---

१. ऐति. पत्रव्यवहार क्र. १४, पृ. २९०
२. सरदेसाई, न्यू. हिस्टरी ऑफ द मराठाज भा. ३, पृ. ३०१.

त्याप्रमाणे नाना फडणीसानी कोकणांतून भट घराण्याशी संबंधित असलेल्या मुलाना पाचारणही केले. दरम्यान जुन्नरला असलेल्या दुसऱ्या बाजीरावानी दौलतराव शिंदे व पुण्याचा इंग्रज वकील यांजशी संपर्क साधून पेशवे पद मिळण्यासाठी खटपट सुरु केली. इंग्रज वकीलाने ग. ज. च्या धोरणानुसार या भानगडीत पडावयाचे नाही असे ठरविले. परंतु शिंद्यांनी बाजीरावांकडे एक कोटी रुपयांची मागणी करून त्यांना मदत करण्याचे कबूल केले. नाना फडणीसांस ही गोष्ट समजताच त्यानीं परशुरामभाऊ पटवर्धनना जुन्नरला पाठवून दुसऱ्या बाजीरावाची मुक्तता केली[1], आणि त्यांना पुण्यास बोलविले. पुण्याला बाजीराव येताच नाना फडणीसानी त्यांचा पेशवे पदावरील अधिकार मान्य केला[2].

### नानांचे महाडहून कारस्थान (मार्च ते नोव्हेंबर १७९६) :

दौलतराव शिंद्यास नानांचे हे कृत्य समजताच त्याच्यावर हल्ला करण्याचे त्यानं ठरविले. नानांना याचा सुगावा लागताच दिनांक २१ मार्च १७९६ रोजी नाना फडणीस पुणे सोडून महाडला गेले. दिनांक २४ रोजी दौलतराव पुण्यास आले व त्यानी बाजीरावांकडे एक कोट रुपयांची मागणी केली. तेव्हा बाजीराव पैसे देण्याची टाळाटाळ करू लागले. हें पाहून शिंद्यांनी चिमाजीना पेशवे पद मिळवून देण्याचे ठरविले. त्यासाठी परशुरामभाऊ पटवर्धनांना आपल्या गोटात सामील करून घेऊन बाजीरावांस कैद करून[3] चिमाजी पेशवा झाल्याचे जाहीर केले[4].

चिमणाजीस पेशवा केल्यावर शिंदे त्यांजकडे एक कोट रुपये मागू लागले पण एवढी मोठी रक्कम देणार कुठून हा प्रश्न चिमणाजी व परशुरामभाऊ पटवर्धन यांना भेडसाऊ लागला[5]. त्यामुळे चिमणाजी व शिंदे यामध्ये संघर्ष सुरु झाला. ही संधी साधून दुसऱ्या बाजीरावानी महाडला पळून गेलेल्या नाना फडणीसाना आपल्या बाजूस वळवून घेतले, म्हणून नाना फडणीसानी बाजीरावांसच पेशवा करावयाचे कारस्थान महाडहून रचिले. तुकोजी होळकर, नागपूरकर भोसले, कोल्हापूरकर, टिपू सुलतान, मुंबईकरइंग्रज यांजशी संधान बांधून त्यांना बाजीरावाच्या पेशवे पदास अनुकूलता दर्शविण्यासाठी निरनिराळी बक्षिसे आणि आमिषे दाखविली[6].

नानांनी केलेल्या या कारस्थानामुळे दौलतराव शिंदे अस्वस्थ झाले. नानांस हे समजताच त्यांनी शिंद्यास कळविले की "या सगळ्या कलहास बाळोबा तात्या पागनीस हा कारभारी जबाबदार आहे तेव्हा त्याला कामावरून दूर

१. ऐ. ले. सं. भा. ९, ले. ३६७१.

२. कित्ता, ले. ३६९८.

३. कित्ता, ले. ३७८१, ३७८४; पृ. ४९५९—६२.

४ कित्ता, ले. ३७९४ दि २६ मे स. १७९६ दिवशीं चिमाजी अप्पास पेशवाईची वस्त्रें मिळाली.

५. कित्ता, ले. ३८०९, पृ. ४९७८-७९.

६. कित्ता, ले. ३८५६, पृ. ५०२१.

करून कैद करावे. बाजीरावांस पेशवा म्हणून मान्यता द्यावी. त्याच्या मोबदल्यांत शिंद्यांस अहमदनगरचा किल्ला, १० लाखांची जहागीर आणि इतर सवलती मिळतील. शिंद्याना बाजीराव व चिमणाजी दोघेही सारखेच वाटत होते म्हणून त्यांनी नाना फडणीसांच्या म्हणण्यास रुकार देऊन, बाळकोबा तात्यास अचानकपणे कैदेत टांकले. स्वतः नाना फडणीस १२ नोव्हेंबर १७९६ ला पुण्यास येऊन दाखल झाले. दिनांक ५ डिसेंबर रोजी बाजीरावांस पेशवाईची वस्त्रे मिळाली[१].

**नाना फडणीस अटकेत (इ. स. १७९७) :**

जरी नानांच्या सहाय्याने बाजीरावांस पेशवे पद मिळाले, तरी नानांवर सूड घेण्यासाठी बाजीरावांची धडपड चालू होती. त्याकरिता बाजीरावांनी दौलतराव शिंदे याजबरोबर गुप्त तह केला. व पुण्यासच रहाण्यासाठी त्यांस आग्रहाने सांगितले. दौलतरावानी बाजीराव व नाना यांच्यामधील परस्पर-द्वेषाचा फायदा घेऊन दोघांकडूनही द्रव्य उपटण्याचा प्रयत्न सुरु केला. नानाकडून जवळ जवळ ५० लाख रुपये दौलतरावानी मिळविले. आपल्या प्रचंड सेनादलाचा खर्च भागविण्यासाठी शिंद्यांस अधिक पैशांची गरज होती त्यासाठी बाजीरावांकडे दोन कोट रुपयाची मागणी दौलतरावानी केली. बाजीराव व नाना या दोघांनाही शिंद्याच्या अद्ययावत सेनेची संरक्षणासाठी गरज भासत होती. इ. स. १७९७ च्या ऑगस्ट महिन्यांत तुकोजी होळकरांचा मृत्यू होऊन नानांचा एक आधार नष्ट झाला होता. होळकरांचा वारस म्हणून तुकोजींचे मोठे चिरंजीव काशीराव यांजकडे होळकराची गादी आली होती. परंतु त्यांचे तीन भाऊ मल्हारराव, विठोजी आणि यशवंतराव यांनी नाना फडणीसांची मदत घेऊन बंड करण्याचा प्रयत्न केला होता. तेव्हा दौलतराव शिंदे यांनी काशीरावांस मदत करून मल्हाररावांस ठार मारविले व इतर दोन भावांना हुसकावून लावलें (१४ सप्टेंबर १७९७). या घटनेमुळेही नाना व दौलतराव यांमधील वितुष्ट वाढले. बाजीरावानी या परिस्थितीचा फायदा घेऊन दौलतरावांस नाना फडणीसांना कैद करण्यास सांगितले आणि त्या मोबदल्यात मोठी रक्कम देण्याचे आश्वासन दिले. दौलतरावानी मेजवानीच्या निमित्ताने नाना फडणीसांस बोलावून ३१ डिसेंबर १७९७ रोजी त्यांस अटक केली[२].

नानांना कैद केल्यानंतर राजकारणांत यत्किंचितही रस नसलेल्या बाजीरावानी रयतेकडून पैसे उकळण्यास सुरुवात केली. नाना फडणीसांचे चहाते पुण्यातील रास्ते, गोखले आदि सावकारांना राखेचे तोबरे देऊन त्यांजकडून पैसे उकळले. दौलतरावांचा कारभारी सर्जेराव घाटगे यानीं नानाच्या वाड्यांत बसून पुण्याच्या व्यापाऱ्यांना लुटण्यास सुरूवात केली. यावेळी दौलतरावांचे सर्जेराव घाटगे यांच्या मुलीशी फेब्रुवारी १७९८ त मोठ्या

१. ऐ. ले. सं. ले. ३८८९, पृ. ५०७२.

२. खरे, खं. १०, पृ. ५३०३.

थाटाने विवाह झाला. दौलतराव शिंदेच्या जाचास बाजीराव कंटाळले होते त्यांच्या जाचांतून मुक्त करून घेण्यासाठी त्यानी शिंद्यास उत्तर हिंदुस्तानात जाण्याची सूचना केली. पण त्यांची ही सूचना हास्यास्पद ठरली. बाजीरावानी रयतेकडून पैसा उकळण्यासाठी ज्या अनेक क्लृप्त्या योजिल्या त्यापैकी "संतोषपट्टी" नांवाचा रयतेवर बसविलेला नवा कर होय. ह्या करामुळे लोकांत असंतोष वाढला. बाजीरावांचे लोकांकडून पैसे उकळणे, मेजवान्या, तमाशे, नाचगाणी वगैरे कार्यक्रमांत दंग होऊन रमणे, राज्यकारभारात विशेष लक्ष न घालणे हा बाजीरावांचा नित्याचा कार्यक्रम इंग्रज पहात होता. बाजीरावाचे नानाशी किंवा शिंद्याशी पटणार नाही असे इंग्रजांनी ताडले होते. मराठी साम्राज्याचा मुलकी व लष्करी कारभार सांभाळण्याची त्याची ताकद नव्हती हे इंग्रज जाणून होता. इतक्यात दौलतराव शिंदे यांजवर कुभांड आले. महादजी शिंद्याच्या विधवा स्त्रियांना दौलतरावानी, शिंदे दौलतीचे कुल मुखत्यार होताना अनेक आश्वासने दिली होती. परंतु दौलतरावांस सत्ता प्राप्त झाल्यावर ती त्यानी पुरी केली नाहीत. त्यामुळे शिंदे बाया चवताळल्या आणि त्यांनी पुण्यात येऊन दौलतरावांविरुद्ध बंड पुकारले. त्याचा परिणाम दौलतरावांच्या लष्करांत दोन तट पडण्यांत झाला. हा पेच सोडविण्यासाठी दौलतरावांस नाना फडणीसांची मदत घ्यावी लागेल असे वाटून त्यांनी बाजीरावांना नानाची मुक्तता करण्यास सांगितले. (जुलै १७९८) यावेळी हिंदी राजकारणात इंग्रजांचे चढाईचे धोरण नेटाने तडीस नेणाऱ्या वेलस्लीची भारताचा गव्हर्नर जनरल म्हणून नियुक्ती झाली (१७ मे १७९८). ह्यावेळी त्यांचे धोरण फ्रेंचाच्या सत्तेचे हिंदुस्तानातून कायम उच्चाटण करणे व इंग्रजी सत्तेची वाढ करणे हे होते.

पामर हा इंग्रज रेसिडेंट होता. त्याच्या मार्फत वेलस्लीने पेशव्याशी बोलणे लाविले. दौलतरावांच्या जाचातून मुक्त होण्यासाठी आमच्या मदतीचा स्विकार करा असा आग्रह त्याने पेशव्यास केला. इंग्रज किती प्रामाणिक आहे हे बाजीरावास पटवून देण्यासाठी राघोबादादाकडून जप्त करून घेतलेले जड जवाहीर इंग्रजानी बाजीरावांस परत केले[1]. त्यामुळे बाजीराव इंग्रजांकडे झुकू लागला. इंग्रजांच्या दोन पलटणी पेशव्यांच्या मदतीसाठी मुंबईस सुसज्ज असाव्यात. जरूर लागेल तेव्हा त्या पुण्यास याव्यात. पेशव्यानी ह्या दोन पलटणींचा खर्च चालवावा असा कराराही झाला. हा करार नाना कारभारावर असता बाजीरावानी नानांना दाद लागू न देता गुप्तपणे केला होता. पण नानांना याची कुणकुण लागताच यांतील धोका त्यांच्या लक्षांत आला. त्यानी इंग्रजांचे दोन लाख रुपये चुकते करून ती पलटणें रद्द करण्यास पेशव्यास भाग पाडले.

निजामाच्या पदरी १४ हजार लोंकांची कवाईती पलटणी सज्ज ठेवणारा रेमंड १५ मार्च १७९८ मध्ये निवर्तला. खडर्याच्या लढाईपासून मराठ्यांच्या

१ खरे, खं. १०, पृ. ५३६४.

कैदेत असलेला अझीझ अुल अुमरा १७९७ च्या अखेरीस सुटून हैदराबादेस आला. ह्या दोन्ही गोष्टी निजामकडील फ्रेंचाचे वजन नाहिसे करून निजामास आपली तैनाती फौज स्विकारणें भाग पाडण्यास इंग्रजांच्या पथ्यावर पडल्या. यावेळी निजामाच्या दरबारी ब्रिटीश रेसिडेंट कर्नल कर्क पॅट्रीक होता. त्यास वेलस्लीने लिहून कळविले की निजाम इंग्रजी तैनाती फौजेचा स्वीकार करण्यास तयार असल्यास विचारून पहावे[१]. कर्क पॅट्रीक याच्या खटपटीस यश येऊन निजामाने इंग्रजांच्या तैनाती फौजेचा स्विकार करून त्याप्रमाणे १ सप्टेंबर १७९८ रोजी तह केला. त्यांतील मुख्य कलम असे होते की मराठ्यांनी निजामास त्रास दिल्यास किंवा खंडणी मागितल्यामुळे भांडण निर्माण झाल्यास ते ब्रिटीशांनी मध्यस्ती करून मिटवावे[२].

## टिपू-इंग्रज युद्धांत भाग घेण्यास नकार :

निजाम इंग्रजांच्या हातातील बाहुले बनल्यानंतर इंग्रजांनी आपले लक्ष टिपू सुलतानाचा नाश करण्याकडे केंद्रीत केले. वेलस्लीनें रेसिडेंट पामर मार्फत टिपूचा नाश करण्याच्या आपल्या व्युहांत मराठ्यांची मदत मिळण्यासाठी खटपट चालविली. पूर्वी टिपू विरुद्ध इंग्रज मराठ्यांनी संयुक्त कृती केलेलीच होती. आणि वेळ प्रसंगी पुढेही तशीच करावयाची असे त्यांच्यात करार मदारही होते. त्या आधारावर इंग्रजानी पेशव्यांकडे मदत मागितली. मदत मागण्यांत वेलस्लीचा एक हेतू असा होता की ह्यामुळे मराठे टिपूच्या सहाय्यार्थ जाणार नाहीत. बरे शिंदे यांनी टिपूस मदत केल्यास शिंद्याच्या उत्तरेकडील राज्यावर इंग्रज हल्ला करणार अशी बातमी शिंद्यास लागली होती[३]. टिपूला इंग्रजांचे दुष्ट हेतू ठाऊक होते म्हणून त्यालाही पेशव्यांची मदत हवी होती. ह्यावर दोन्ही दरबारचा पत्रव्यवहार अगदी गुप्तपणे चालू होता. पेशव्याशी ह्या बाबतीत प्रत्यक्ष बोलणी करण्यासाठी टिपूने आपली माणसे पुणे दरबारला पाठविली होती[४]. नाना फडणीसांचा विचार इंग्रजांस टिपू विरुद्ध मदत करण्याचा होता. इंग्रजांच्या मदतीस परशुराम भाऊ बरोबर म्हैसूरास सैन्य रवाना करा असे नाना पेशव्यांस सूचवित होता. मात्र पेशवे व शिंदे टिपूस सहाय्य करण्याच्या मताचे होते. इतकेच नव्हे तर इंग्रजांचा दोस्त निजाम याजवर जर हल्ला केला तर इंग्रजांना निजामाचा बचाव करणे भाग पडेल व त्यामुळे इंग्रजांच्या टिपूवरील मोहीमेस खो बसेल असे पेशवे व शिंदे यांचे म्हणणे[५]. पेशव्यानी इंग्रजांस मदत करू नये म्हणून टिपूने पेशव्यांस १३ लाख रुपये दिले[६]. अशा रीतीने पेशवे, इंग्रज-टिपू युद्धांत गप्प बसले.

---

१ पी. आर. सी. ६, जुलै ८, १७९८, पृ. १९७.

२ ब्रीग्ज, निजाम धफर्स्ट, ७८.

३ मिल, व्हा. ६, पृ. ६८, पी. आरसी. व्हा. ६, ऑगस्ट २५, १७९८, पृ. २२०.

४ पी. आरसी. व्हा. ६, पत्र. दि. १२ एप्रिल १७९९, पृ. ३९३.

५ किता २२ एप्रिल १७९९, पृ. ४०३.

६ थॉरटन, व्हा. ५, पृ. ६५.

टिपूवरील इंग्रजांची मोहीम अपेक्षेपेक्षा लवकर संपली. युद्धास तोंड फेब्रुवारी १७९९ मध्ये लागले. श्रीरंगपट्टणचा पाडाव होऊन टिपूस ठार मारल्यानंतर मे १७९९ च्या सुरुवातीस लढाईचा शेवट इंग्रजांस विजय मिळण्यांत झाला. टिपूचा पाडाव झाल्यानंतर इंग्रजांनी टिपूचे राज्य खालसा केले. आणि म्हैसूरचा पूर्वीचा राजा ओडियार यास लोकांना खूष करण्यासाठी लहानसा प्रदेश त्याच्या ताब्यात देऊन म्हैसूरच्या गादीवर बसविले. लढाईनंतर इंग्रजांनी पेशव्यांस टिपूच्या राज्याचा कांही भाग देऊ केला आणि बजावले की, ह्यापुढे म्हैसूरमध्ये चौथाई वसूल करण्याचा तुमचा हक्क संपलेला आहे. (२) निजामाशी पेशव्यांचे संघर्ष येतील त्यांत इंग्रजांची मध्यस्थी मान्य करावी ; (३) फ्रेंचांना पेशव्यांनी आश्रय देऊ नये. त्यांच्या विरुद्धच्या मोहीमेत पेशव्यांनी इंग्रजांस सहाय्य केले पाहिजे. शिवाय पेशव्याने आपल्या संरक्षणासाठी इंग्रजी फौज ठेवावी.[१] अशा अटींचा खलिता पुणे दरबाराकडे इंग्रजांनी पाठवून दिला. हा खलिता नानानी फेटाळून लावला. त्याप्रमाणे पेशवे दरबारकडून या सर्व अटी अमान्य असल्याचे इंग्रजांस कळविण्यांत आले.[२]

पेशव्यांनी आपणास टिपूच्या विरुद्ध मदत केली नाही. याचा राग इंग्रजांस आलाच. टिपूचे राज्य खालसा केल्यावर त्यातील बराचसा सुपीक प्रदेश कंपनीच्या अंमलाखाली आला त्यामुळे इंग्रजांना लढाया करण्यास पैसा मिळू लागला. त्याच्या जोरावर त्यांनी निजामाशी तैनाती फौजेचा तह करून त्याच्या संरक्षणाची हमी घेतली (१८००) पेशव्यांस निजामाचे हे कृत्य आवडले नाही. इंग्रजाचे अंकीत निजाम झाल्यामुळे मराठेशाहीस इंग्रजांचा धोका वाढला.

**नाना फडणीस मृत्यू :**

या सुमारास नाना फडणीस आजारी पडून ते १३ मार्च १८०० रोजी निवर्तले.

शेवटच्या पांच वर्षात (१७९५-१८००) नानानी स्वत:चे आसन टिकविण्यासाठी पराकाष्टेचे प्रयत्न केले. मराठी राज्याचा गाडा व्यवस्थित चालविण्यासाठी नानांजवळ योजना नव्हती. स्वत:चे कारभारीपद टिकून रहाण्यासाठी नानानी बरीच धडपड केली. ती स्वार्थासाठी केलेली धडपड केविलवाणी वाटते.

नाना मृत्यूपूर्वी साधारण वर्षभर आजारी होते, कान दुखत होता. तसेच बारीक ताप येऊन अशक्तपणा वाढला होता. नाना वारल्यावर त्यांची प्रेतयात्रा निघण्यास नानाचे शरीररक्षक जे गारदी होते त्यांनी विरोध केला.

---

१ वैद्य, पेशवा बाजीराव दु. अँन्ड डाऊन फॉल ऑफ मराठा पॉवर, पृ. १२७.

२ कित्ता, पृ. १२८.

त्यांनी आपल्या पगाराची थकबाकी मागितली ती दिल्याशिवाय प्रेत हालवू देणार नाही असे सांगितले.[१] बाजीराव पेशव्यानी अरबांच्या पगाराची थकबाकी दिल्यावर प्रेतयात्रा निघाली. नाना वारल्यावर ब्रिटीश कॅप्टन बाऊनर याने भेट दिली व तो उद्गारला, "नाना बरोबर ब्राम्हण राज्य गेले, पुणे पडले."[२] इंग्रज रेसिडेंट पामरनेग ज. ला लिहून कळविले की, "नाना बरोबर मराठी राज्याचे शहाणपण व संयम गेला."

नाना फडणीस मुत्सद्दी होते असे तत्कालीन इंग्रज लेखक म्हणतात. पण त्यानी आपले मुत्सद्दीपण स्वत:चे अधिकारपद टिकविण्यासाठी धसास लावले. सबंध हिंदुस्थानचे राजकारण दिल्लीचा बादशहा मराठ्याच्या ताब्यांत ठेवून चालवावयाचे हे सूत्र त्यानी डोळ्याआड केले. दिल्ली सत्ता-केंद्र आपल्या ताब्यांत ठेवण्यासाठी त्यांजवळ कोणतीही योजना नव्हती, नव्हे त्याबद्दल त्यानी व्यक्त केलेले विचार अद्याप तरी वाचनात नाहीत.

मराठी सत्ता हिंदुस्थानात टिकविण्यासाठी इंग्रजी सत्तेच्या वाढीस आळा घालावयास हवा हे नानाना कळत होते पण त्या दिशेने त्यानी योजनाबद्ध प्रयत्न केल्याचे दिसत नाही. अशा वेळी शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले आदि सर्व सरदारांची एकजूट बनविण्याचे कार्य महत्त्वाचे होते. ते कार्य नानासारख्या मध्यवर्ती सत्तेच्या नियंत्रकाने हाती घेतले असते तर त्यांस खात्रीने यश आले असते. नानाचा वचक व दरारा सर्व सरदारांस वाटत होता. त्याचा उपयोग मराठ्यांचे राज्य टिकविण्याकडे नानानी करावयास हवा होता. त्यावेळच्या मराठी मुत्सद्यांनी मराठी दौलत राखण्याचे मनसुबे न राखता आपआपल्या दौलतीची जपणूक कशी होईल एवढेच पाहिले. नाना त्यास अपवाद ठरले नाहीत. त्यांनी एनकेन प्रकारे स्वत:चे कारभारीपद टिकविण्याचा अट्टहास शेवटपर्यन्त कायम ठेवला. इंग्रज शत्रूस नामोहरम करून मराठी राज्य टिकवावयाचे असे राजकारण नाना किंवा तत्कालीन मराठी मुत्सद्दी मनात धरून वागले असे दिसत नाही. नाना फडणीसांच्या मृत्यूनंतर हिंदी राजकारण वेगाने बदलू लागले. मराठी राज्याच्या दुर्दैवाने ह्या पांच वर्षाच्या काळांत महादजी शिंदे, हरीपंत फडके, अहिल्याबाई, पेशवे सवाई माधवराव, तुकाजी होळकर, जिवबा बक्षी, बाळोबा तात्या, परशुराम-भाऊ पटवर्धन अशी कर्तीमाणसे निधन पावली. आणि मराठी दौलतीचा गाडा दौलतराव शिंदे व दुसरा बाजीराव अशा दोन नालायक व कर्तृत्वशून्य व्यक्तींच्या हाती आला. दुसऱ्या बाजूस त्याच वेळी ब्रिटीशांकडे एकाहून एक असे हुशार मुत्सद्दी रणयोद्धे हिंदुस्थानांत एकतंत्री इंग्रज सत्ता स्थापण्यासाठी पुढे सरसावले. तिथे वेलस्ली, मेटकॅफ, कर्क पॅट्रीक, क्लोज, एलफिन्स्टन,

---

१ वा. वा. खरे, नाना फडणवीसांचें चरित्र (३ री आवृत्ती) पृ. २६२.

१३ मार्च १८०० या दिवशीं मध्य रात्रीस नानांचें देहावसान झाले ह्याच तारखेच्या ऐ. ले. संग्रहांतील पत्रांतील मजकूर "शव गंगेवर न्यावयाची सिद्धता जाली. तों अरबानी आपले फडशाकरीता अडथळा घातला नंतर रा. दुल्लभदास यांनी हवाला घेतला, तेव्हां शव बाहेर जाऊं दिलें.

कित्ता पृ., २६३.

माल्कम, जेनकीन्स, मन्रो ह्या इंग्रजी मुत्सद्यांनी अठराव्या शतकाच्या अखेरीस शौर्य व बुद्धी पणास लावून हिंदुस्थानात इंग्रजी राज्य वाढविले.

**धोंडजी वाघाचे बंड :**

नाना फडणीस निवर्तल्यावर मराठी राज्याच्या दुर्दशेस गती आली. इंग्रज ग. ज. रिचर्ड वेलस्ली ह्याला मराठ्यांनी टिपूला बुडविण्यात इंग्रजांस मदत केली नाही ह्याचे वाईट वाटले पण बाजीरावास आपल्याकडे आणावयाचे हे लक्ष्यात ठेवून तो पुढील उद्योगास लागला. टिपूकडून जिंकलेल्या म्हैसूर प्रदेशाचा कारभार ग. ज. ने आपला भाऊ ऑर्थर वेलस्लीकडे सोपविला. ऑर्थर वेलस्लीस दुय्यम सहाय्यक म्हणून बॅरीक्लोज, जॉन माल्कम असे दोन अधिकारी दिले. म्हैसूर प्रदेशात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करीत असता ऑर्थर वेलस्लीस धोंडजी वाघ नांवाने प्रसिद्ध असलेल्या पुंडाचा बिमोड करण्याची कामगिरी करावी लागली.[1] ही कामगिरी त्याने मराठी सरदार पटवर्धन यांच्या सहाय्याने केली. त्यामुळे ऑर्थर वेलस्लीस मराठी मुलूखाची व स्वभावाची माहिती झाली. इ. स. १८०० च्या सुमारास पूर्वी टिपूच्या नोकरीत असणाऱ्या धोंडजी वाघाने कर्नाटक प्रांतात सैन्य जमवून पुंडावा घालण्यास सुरूवात केली. ठिकठिकाणी छापे घालून तो वसूल गोळा करू लागला. धोंडजीचा उपद्रव नुकताच ताब्यांत आलेल्या टिपूच्या मुलखास व तुंगभद्रेकाठीच्या मराठी मुलखास होऊ लागला.[2] त्याचा बंदोबस्त करण्याचे ऑर्थर वेलस्लीने ठरविले. व त्यावर हल्ला केला.[3] तेव्हा तो तुंगभद्रेच्या उत्तरेकडील मराठी मुलखांत पळून गेला. हा मुलूख पटवर्धन व कोल्हापूरकर यांच्या ताब्यात होता. धोंडजीचा धुमाकूळ सारखा वाढत राहिला. त्याने मराठ्यांचा धारवाड किल्ला जिंकून घेतला. तेव्हा त्याचा बंदोबस्त करण्यासाठी वेलस्लीने पटवर्धनांशी ठराव करून दोन्ही सैन्ये त्याचा पाठलाग करू लागली. दरम्यान धोंडजी वाघाने कितूरजवळ मराठे सरदार धोंडोपंत गोखले यास गाठून त्याजवर आकस्मिक हल्ला करून त्यास ठार मारिले. (३० जून १८०० इ.) तेव्हा वेलस्ली व मराठी सैन्य तुंगभद्रेच्या दोन्ही तिरांकडील प्रदेशांत धोंडजी वाघाच्या दिशेने चाल करून गेले. १० सप्टेंबर १८०० रोजी धोंडजी वाघाशी लढाई होऊन त्याला त्याच्या ६०० साथीदारांसह कंठस्नान घातले.[4] धोंडजी वाघास मारल्यावर वेलस्ली कांहीं काळ मराठी मुलखांत रेंगाळत राहिला. त्याचवेळी त्याची पटवर्धनांशी जास्त मैत्री झाली. मराठी राज्यातील बारीक सारीक हकिगती वेलस्लीस पटवर्धनांकडून कळल्या. बाजीरावांना पुढे ताब्यात घेणे इंग्रजांस त्यामुळें सोपे गेले. निजामाशी तैनाती फौजेचा तह करून निजामास आपल्या अंकीत केल्यावर इंग्रजांनी पेशव्यांस आपल्या तैनाती फौजेचा स्वीकार करण्यासाठी

---

१ सिक्रेट अन्ड पॉलिटीकल डिपा. डायरी नं. ८५, पृ. ६५६१-६५७५.

२ कित्ता, डायरी नं. ९२, पृ. २८४५-२८४७.

३ कित्ता डायरी नं. ९९, पृ. ५५५०-५५५५.

४ कित्ता, डायरी नं. १००, पृ. ६२१९-६२२२.

प्रयत्न सुरू केले. असे प्रयत्न करून पेशव्यानी इंग्रजांचे स्वामीत्व कबूल न केल्यास पेशवे निजामाकडे खंडणी मागण्याचा संभव होता व तसे केल्यास मराठ्यांशी निजामातर्फे आपणास लढावे लागेल ही भीती इग्रजांस वाटत होती. म्हणून ग. ज. वेलस्लीने पुण्याचा रेसिडेंट यास पेशव्यानी इंग्रजी फौज स्वत:च्या संरक्षणाकरीता ठेवण्यासाठी त्याचे मन वळवावे असे सांगितले. पामरने या बाबतीत पेशव्याना इंग्रजांशी मैत्रीचा तह करण्याचे मान्य करावे म्हणून गळ घातली. यांत तो अयशस्वी ठरला.[1] म्हणून त्याची रेसिडेंट पदावरून उचलबांगडी करून त्या जागी सर बॅरी क्लोझ नावाच्या हुशार व तरुण माणसाची नेमणूक केली. सर बॅरी क्लोज रेसिडेंट म्हणून १८०१ च्या अखेरीस पुण्यास हजर झाला.

इ. स. १८०० मध्ये नाना फडणीस मरण पावला. तेव्हा पेशव्याने अमृतरावास आपला कारभारी नेमले. निजामाच्या दरबारी दोन तट होते. निजामाने इंग्रजांशी मैत्रीचा तह करून आपले स्वातंत्र्य गमावले हे न आवडणारा गट होता. त्याच्याशी सधान बांधून पेशव्याने निजामाचा मुलगा फरिदुनझा याला आपल्या मदतीने इंग्रजांविरुद्ध उठाव करण्यास गुप्तपणे सुचविले. पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही.

इकडे पुण्यात बाजीरावाबरोबर दौलतराव शिंदे, सर्जेराव घाटगे व अमृतराव अशी चौकडी होती. ही चारही कर्ती माणसे नालायक होती. ह्यांच्या मनात राज्याचे व प्रजेचे हीत पहाण्याचे नव्हते. राज्य सुखोपभोगासाठी आहे व प्रजा लुटण्यासाठी आहे असेच जणू काय त्याना वाटत होते. दौलतराव शिंदे भली मोठी फौज घेऊन बाजीरावाच्या सहाय्यार्थ पुण्यास होता. त्या फौजेचा खर्च बाजीरावाकडून भागेना म्हणून पुण्यांतील व आसपासच्या भागातील श्रीमंताना पकडून त्यांजकडून पैसे उकळणे सुरू केले. सर्जेराव घाटगे यानेही तोच मार्ग पत्करला. नाना फडणीस निवर्तल्यावर बाजीरावाने अमृतरावाच्या सहाय्याने नानाच्या मर्जीतील कित्येक लोकांस पकडून त्यांना जबर शिक्षा देऊन त्यांजकडून लक्षावधी रुपये उकळले.[1] एकट्या सर्जेरावाने अशाच धाक-दपटशाहीने सुमारे एक कोटी रुपये वर्षभरात मिळवले. रय्यतेवर तर अनन्वीत जुलूम होऊ लागले. पैसा व बायकांची अब्रू यांचे रक्षण होणे शक्य नाही हे रय्यतेस कळून चुकले. पैशाची मागणी केली असता ती पुरी न केल्यास घरावर धाड घालणे, सरंजाम जप्त करणे, लूटमार करणे, सुंदर बायका ओलीस ठेवणे असे प्रकार पुण्यांत सर्रास होऊ लागले. अप्पा बळवंत मेहेंदळे ह्यानी आपल्या घरावर पेशव्याची धाड येणार हे कळताच आत्महत्या करून सुटका करून घेतली. अमृतराव कारभारी होऊनही सर्जेराव घाटगेच्या भीतीनें स्वत:साठी सात लक्षांचा सरंजाम घेऊन भिवंडीस जाऊन राहिले. बाजीराव यावेळी बाळोजी कुजर,

१ सरदेसाई, न्यु हिस्टरी, भा. ३, पृ. ३५६.

२ पेशव्यांची बखर (५वी आवृत्ती १९२३) पृ. २२३.

अंताजी माणकेश्वर यांच्या सल्ल्याने वागत होते. त्यांनीही सरदारांस छळण्यास कमी केले नाही. पेशव्यानी परशुरामपंत प्रतिनिधीस चोपून काढले, काशिराव होळकरांचा सरंजाम जप्त केला, माधवराव रास्त्यांस कैद केले आणि पटवर्धनांसही तोच रस्ता दाखविला.[1] पोर्तुगिजांचा पुण्यातील वकील विठ्ठलराव गोरक्षवालावलीकर दिनांक १६ एप्रिल १८०० च्या पत्रांत लिहितो, "ह्या दरबारामध्ये पैशांची पुष्कळच टंचाई आहे. मराठ्यांचे सरदार एकमेकाशी विरोधाने वागतात. त्या सर्वांनी हे प्रदेश लुटून फस्त केले आहेत. ते पेशव्यांची सत्ता मानीत असले तरी त्याची आज्ञा ते वाटल्यास पाळतात. पगार मिळत नसल्यामुळे ह्या सरकारचे व शिंद्याचे अधिकारी तक्रार करीत आहेत. ह्या गोष्टीस फक्त शिंद्यांची तीन पथके अपवाद आहेत. येथील इंग्रजांचा वकील पुष्कळ खर्च करतो व पेशव्यास मोठमोठे नजराणे देतो. सामान्यतः येथील सर्व लोक म्हणतात की, लवकरच इंग्रज हा सर्व प्रदेश हस्तगत करणार."[2]

अशा प्रकारची पुण्याची स्थिती असताही इंग्रजाविरुद्ध निजामास उठविण्या-साठी पेशव्यांनी आपला हस्तक सदाशिव मणकेश्वर यांस निजामाकडील राजा रघुत्तमराव यांच्या भेटीस पाठविला. मुलूख देण्याचे आमीष निजामअलीस दाखविले. फ्रेंचाना सुद्धा इंग्रजांविरुद्ध उठविले पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही कारण पेशव्यांचे हे प्रयत्न इंग्रजाना समजत होते व त्यांत मोडता आणण्याचे उपक्रम इंग्रज यशस्वीपणे करीत. इ. स. १८०१ मध्ये पेशव्यानी सर्व मराठे सरदारांस एकत्र आणण्याचा प्रयत्न केला. मराठा मंडळ एकत्र आणण्यासाठी व हे प्रयत्न रेसिडेंट पामरला कळू नये म्हणून पेशव्यानी ही मराठमंडळाची बैठक गोदातीरी बोलाविली. स्वतःची फौज उभारण्याचेही त्यानी ठरविले होते. पण त्यात पेशव्यांस यश मिळाले नाही. ह्या नंतरही पेशव्यानी आपली मदत स्वीकारून शिंद्याच्या जोखडातून व हलाखीच्या स्थितीतून मुक्त व्हावे असा तगादा इंग्रज रेसिडेंटने लाविला होता. पण पेशव्यानी ह्या ना त्या कारणाने रेसिडेंटचे ऐकले नाही.[3]

सन १८०१ च्या शेवटी पेशवे व इतर सरदार यांमधील भांडणे विकोपास गेली. त्याचा शेवट बाजीराव पेशवे इंग्रजांकडे वसईस १८०२ च्या अखेरीस जाऊन स्वराज्याचे दान इंग्रजांच्या हाती देण्यात झाला त्याची हकीगत सांगा-वयास हवी ती अशी.

### यशवंतराव होळकराचा उदय :

दिनांक १५ ऑगस्ट १७९७ रोजी तुकोजीराव होळकर पुण्यास निवर्तले. त्यांचा मुलगा काशीराव होळकराच्या गादीचा मालक झाला. दौलतराव

१ चोकशी, हिस्टरी ऑफ ब्रिटीश डिप्लोमसी एट ध कोर्ट ऑफ ध पेशवाझ, पृ. २७९.

२ पिसुर्लेकर, पोर्तुगिज-मराठे संबंध पृ. ३०९.

३ सरदेसाई, न्यु हिस्टरी, भा. ३, पृ. ३५६.

शिंद्याचे मनांत काशीरावास आपले हाताशी धरण्याचा विचार होता हें समजताच काशीरावाचे तिघे बंधू मल्हारराव, विठ्ठलराव व यशवंतराव यांनी फौज जमवून काशीरावाचा गोट सोडून स्वतंत्रपणे रहाणे केले. व संधी मिळताच काशीरावास कैद करावे किंवा शिंद्याचे मुलखांत दंगा करावा असा विचार केला. शिंद्यास ही बातमी लागताच त्याच्या पलटणांनी मल्हार-रावावर हल्ला करून त्यास ठार मारले.[1] मल्हाररावाचे पश्चात विठोजी व यशवंतराव होळकर हे दोघे बंधू एकदम बाहेर पडले. या दोघांचा उद्देश सर्वस्व पणास लावून होळकर शाहीचे वजन जे शिंद्याने नष्ट केले, ते पुनः प्रस्थापित करावे असा होता. विठोजी होळकर पंढरपुरच्या बाजूस येऊन अमृतराव पेशव्याच्या पक्षांत सामील झाले. त्यानी सैन्य जमवून पेशव्यांच्या मुलखात जाळपोळ व. लुटालूट केली. रय्यतेस नागविले. देवाचे दागिने लुटले. तेव्हा पेशव्यानी सेनापती बापू गोखले यांस विठोजीचा बंदोबस्त करण्यास सांगितले. बापू गोखले यानी विठोजीस कैद करून पुण्यास पाठविले. बाजीराव पेशव्यांनी त्यांस दिनांक १६ एप्रिल १८०१ रोजी हत्तीच्या पायी देऊन ठार मारले.[२] मल्हाररावाच्या मृत्यूनंतर यशवंतराव पुण्याहून निसटले व जेजुरीस आले. जेजुरीचा खंडोबा हे त्यांचे कुलदैवत व त्यास नमस्कार करून भटकत भटकत नागपूर भोसल्यांकड ते आले. त्यांस दौलतरावाच्या सांगण्यावरून भोसल्यानी कैदेत टाकले. ते भोसल्यांच्या कैदेतून दिनांक ३१ जानेवारी १८०० रोजी सुटून धारच्या आनंदराव पवारांपाशी ३०० स्वारा-निशी चाकरीस राहिले. पवारांचा दिवाण रंगराव ओढेकर दौलतरावाचे पक्षात होता. त्याने यशवंतरावाचा जम बसू दिला नाही. म्हणून यशवंतराव पवाराकडून निसटले. आणि तापी नर्मदेकांठच्या निबिड अरण्यांत भटकत त्यांनी भिल्ल सैन्य जमा केले. ह्याच वेळी त्यांस अति विश्वासू असा लाला भवानी शंकर हा साथी मिळाला. यावेळी त्यानी मीरखान पठाण व जुने सरदार यांस सामील करून घेऊन माळव्यांत लुटालूट करण्यास सुरुवात केली.[३] यावेळी बाजीरावानी होळकरांचा सर्व सरंजाम जप्त करवला. तेव्हा यशवंतरावांस राग येऊन त्यानी शिंद्याच्या माळव्यातील मुलखावर हल्ला चढविला. त्यानी विठोजीच्या मृत्यूचा जाब पेशव्यास विचारण्याचे ठरविले. तसेच काशीरावाविरुद्ध युद्ध जाहीर करून काशीरावापाशी असलेल्या मल्हार-रावाचा मुलगा खंडेराव यास होळकर गादीचा वारस म्हणून जाहीर केले. शिंद्याच्या मुलखावर सारखे हल्ले करू लागल्यावर दौलतरावानी पुण्यातून आपले सैन्यासह उत्तरेकडे कूच केले. यशवंतरावाकडून शिंद्याचा मुलूख जिंकून घेऊन त्यास पराभूत करणे हा उद्देश दौलतरावाचा होता. दौलतराव उत्तरेकडे आपल्यावर चालून येत आहे हे समजताच यशवंतरावांस आणखी बळ चढले. तेही सर्व तयारीनिशी दौलतरावांच्या सैन्याबरोबर दोन हात

१ पुना रेसि कॉ., व्हा. ६, पृ. ४५-४६.

२ कित्ता, ले. ४०५, खरे, ऐ. ले. सं. भा. १३, पृ. ६०२७.

३ मालकम् सरजॉन, मेमोआयर ऑफ सेन्ट्रल इन्डीया (१८८०) खं. १, पृ. १६६.

करण्यास निघाले. सन १८०१ च्या जून पासून शिंदे होळकरांचा खरा सामना नर्मदेवर सुरू झाला. त्यात सर्व मुलूख बेचीराख झाला. दौलतरावानी आपल्या मदतीस आपला सासरा सर्जेराव घाटगे यास पुण्याहून बोलविले. ऑक्टोबरमध्ये सर्जेराव नर्मदेवर शिंद्यास भेटले. तदनंतर लढा होऊन शिंद्यानी होळकराकडून इंदूर आणि उज्जैन जिंकून घेतली. यशवंतराव गप्प न बसता त्यानी शिंद्याच्या फौजेवर दिनांक ३० ऑक्टोबरला जोरात हल्ला करून घाटगे व दौलतराव यांचा पूर्ण पराभव केला. गेलेला मुलूख मिळविला.[१] पेशव्यांनी दोघाही सरदारांस सलोख्याने वागा म्हणून निरोप पाठविला. यशवंतरावाचा जय झाल्यामुळे त्याचे वजन मराठ मंडळात वाढले. त्याभोवती जीवास जीव देणारे शामराव महाडिक, फत्तेसिंग माने, जिवाजी यशवंत, अमीरखान आणि पराशर दादाजी अशी माणसे जमा झाली. यशवंतरावानी आपल्या पराक्रमाने शिंद्याना व बाजीरावास कांपरे भरविले. यशवंतरावानी फत्तेसिंग माने, शाहमदखान वगैरे सरदारांबरोबर फौज देऊन पुण्याचे रोखे पाठविले. त्या सरदारांनी खानदेश, गंगथडी, सोलापूर, मिरज, कृष्णाकांठ वगैरे प्रदेशात लुटालुट व जाळपोळ करून मुलूख उध्वस्त केला. त्यानी नगर, नाशिक प्रांत जाळून लुटून फस्त केले.[२] १८०२ मध्ये तापी नदीवर तळ ठेवून यशवंतरावांनी बाजीरावाशी बोलणी लाविली की, आपला पुतण्या खंडेराव यास दौलतरावाचे कैदेतून सोडवून आपल्याकडे द्यावा तसेच आपला व शिंद्याचा समेट करून द्यावा सर्व सरंजामाची नीट व्यवस्था बांधून द्या. बाजीरावाना ह्यापैकी कांहीच करण्याची हिंमत नव्हती. बाजीरावाचा कारभारी बाळोजी कुंजर यानीं होळकरांशी तेढ धरून प्रकरण समेटावर येऊ दिले नाही. बाजीरावाना दौलतरावांस जवळ केल्याबद्दल व होळकरांच्या सरजामाची घालमेल केल्याबद्दल यशवंतराव आपला सूड उगवणार हे समजून चुकले. एवढ्यात ज्या खंडेरावाची मागणी यशवंतराव करत होते त्यांस सर्जेराव घाटगे यानी त्यांच्या आईसह अशिरगड किल्ल्यांत मोठ्या बंदोवस्तात ठेविले. बाजीरावानीं शिंद्यास फौजेसह पुण्यास येण्यास निरोपावर निरोप पाठविले. होळकरांचा सरंजाम जप्त केल्याचे फर्मान काढले. बाजीराव शिंद्याच्या फौजेचे पुण्यात आगमन होण्याची आतुरतेने वाट पाहू लागले. त्याकरिता यशवंतराव होळकरांशी बोलणी लावून वेळ काढूपणा करू लागले. दरम्यान शिंद्याची फौज पुण्याच्या दिशेने चालून येऊ लागली. तेव्हा यशवंतरावांच्या फौजेशी तोंड लागून शिंद्याच्या फौजेस हडपसरला दिनांक २५ ऑक्टोबर १८०२ रोजी पराभव पत्करावा लागला.[३] होळकरानी पेशव्यांस धनी मानून तुमची व शिंद्याकडील माणसे सलुखासाठी पाठवा अशी विनंती केली. चार दिवस सतत विनंती केली. शेवटी यशवंतरावांस आपण तोंड देऊ शकणार नाही आणि दौलतरावाचा उपयोग नाही हे लक्षात आल्यामुळे

१ सर जदुनाथ सरकार, फॉल ऑफ द मोंगल एम्पायर, व्हा. ४, पृ. १८३-८४.

२ ऐतिहासिक लेख संग्रह व्हा. १४, पृ. ७४०९.

३ कित्ता, पृ. ७४३३-३५.

बाजीराव पुणे सोडून इंग्रजांकडे पळून जाऊ लागले. आपल्या पळण्याच्या मार्गावर महाडास असतानाच यशवंतराव होळकरानी "तुम्ही इंग्रजाकडे जाऊ नका, परत या, मी तुमच्या रक्षणाची हमी घेतो" असा निरोप पाठविला होता. पण स्वतः सुद्धा कोणावरही विश्वास न ठेवणाऱ्या बाजीरावानी, "मला तुमचीही मदत नको आणि शिंद्याचीही नको, माझे दोस्त इंग्रज आहेत" असा यशवंतरावांस उलट निरोप पाठविला. महाडहून दिनांक ३० ऑक्टोबर १८०२ रोजी मुंबईस गव्हर्नरकडे स्वदस्तुरचे पत्र पाठविले व राजकारण केले[1]. मुंबई वसईचा मार्ग धरला. आलेल्या संकटाचे निवारण करण्यासाठी स्वतःचे जिवाचे संरक्षणासाठी बाजीराव पेशवे इंग्रजांचे स्वाधीन झाले व त्यांनी इंग्रजांबरोबर वसईचा तह केला (३१ डिसेंबर १८०२)[2]. बाजीरावानी संकटात येऊन इंग्रजांची मदत घ्यावी असा प्रयत्न गेली चार वर्षे इंग्रज करीत होते. त्यांच्या प्रयत्नास यश आले.

---

१ पूना रेसि. कॉरस्पॉन्डन्स, भा. १० . ३७.

२ कित्ता, पृ. ५६ ६३.

## पेशवा स्वातंत्र्य गमावतो

### कालसूची

| | |
|---|---|
| १८०२, ऑक्टोबर २७ . | पुणे सोडून बाजीराव रायगडाकडे कूच करतात. |
| १८०२, नोव्हेंबर १२ . | अमृतराव पुण्यास येतात. |
| १८०२, नोव्हेंबर १८. . | होळकरांचा विश्वासू सरदार पराशर दादाजीचा मृत्यू. |
| १८०२, डिसेंबर १८ . . | बाजीरावांची इंग्रजांशी तहाच्या वाटाघाटीस सुरुवात. |
| १८०२, डिसेंबर ३१ . . | बाजीराव इंग्रजांशी वसईचा तह करतात. |
| १८०३, जानेवारी . . | पुणे दरबार, होळकर व अमृतराव पेशवे यांच्या पुढारीपणाने सर्व मराठे सरदारांची जूट बांधतो. |
| १८०३, फेब्रुवारी . . | शिंद्यांचा मुक्काम बऱ्हाणपुरला |
| १८०३, मार्च . . . | हैदराबादच्या तैनाती फौजेचा मुख्य स्टीव्हेनसन याचा वरोडा येथे लष्करासह मुक्काम. |
| १८०३, मार्च १२ . . | जनरल वेलस्ली पुण्यास येण्यासाठी तुंगभद्रा नदी सैन्यासह ओलांडतो. |
| १८०३, मार्च . . . | होळकर पुणे सोडतात. |
| १८०३, एप्रिल १९ . . | अमृतराव विनायकरावांसह पुण्याहून निघतात. |
| १८०३, एप्रिल २० . . | वेलस्लीचे पुण्यास ससैन्य आगमन. |
| १८०३, मे १३ . . . | कर्नल क्लोजचे पुण्यास आगमन. |
| १८०३, मे १३ . . . | इंग्रजांनी पुण्यास जाहीर दरबार भरवून बाजीराव यांस पेशवेपदावर बसविले. |
| १८०३, जून ४ . . . | नागपूरकर भोसले व शिंदे यांची बोधवाड गावी भेट. |
| १८०३, जून . . . | होळकर खानदेशी येतात. |
| १८०३, ऑगस्ट . . | इंग्रज वकील कर्नल कॉलीन्स शिंद्यांच्या लष्करातून कूच करतो. |

# २३

## पेशवा स्वातंत्र्य गमावतो

### (१८०२-१८०३)

हडपसर येथील दिवाळी दिवशीच्या लढाईत पेशव्यांचे सैन्य व शिंद्यांचे कवाइती सैन्य यांचा दारुण पराभव यशवंतराव होळकर यांनी केला. कवाइती पलटणांचा मोठा भ्रम लोकांस वाटत होता तो यशवंतरावानी या लढाईत साफ नाहीसा केला. होळकर पुण्याकडे चालून येऊ लागताच बाजीरावानी कोकणात पळून जाण्याची तयारी केली होती. सल्लागारांच्या आग्रहावरुन ते भीतभीतच होळकरांचा पाडाव होईल या आशेने लढाईचे दिवसापर्यन्त पुण्यात राहिले. हडपसरच्या लढाईनंतर साडेसहा महिने बाजीराव पुण्याच्या बाहेर वसईस इग्रजांच्या आश्रयास यशवंतरावाच्या हाती सापडू नये म्हणून राहिले. यशवंतरावानी बाजीरावांस पुण्यास परत आणण्यासाठी अनेक प्रयत्न केले. एकावेळी बाजीरावानीही पुण्यास परत येण्याचे योजिले होते. पण त्यांचे कारभारी बाळोजी कुंजर व निबाजी भास्कर या दोघांनी बाजीरावाचे कांही चालू दिले नाही. यशवंतरावानी बाजीरावांस सहजासहजी पकडून पुण्यास आणले असते पण धन्याशी दांडगाई किंवा बेइमानी करावयाची नाही या होळकरांच्या उच्च भावनेचा फायदा बाजीरावांनी घेतला. बाजीराव ज्या दिवशी पुण्याहून पळाले त्या दिवशी त्यांची उपासमार होऊ नये म्हणून यशवंतरावानी त्याजकडे एक गाडा अन्न पाठविले. दिनांक २७ ऑक्टोबर १८०२ ला मध्यरात्री बाजीरावानी आपल्या साथीदारांसह घाट उतरुन रायगडाकडे कूच केले. त्यानी एक महिना महाड नजीकच्या बिरवाडीत इंग्रजांशी तहाची बोलणी करण्यात घालविला. बिरवाडीहून आपले दोन वकील नारोपंत व बापूजीराव यांस मुंबईस गव्हर्नर डंकनकडे बोलण्याकरिता पाठविले. त्याजबरोबर स्वदस्तूरचे दिनांक ३० ऑक्टोबर १८०२ चे[१] पत्र दिले होते त्यातील आशय असा :

"आमचा चाकर होळकर व दुसरे कित्येक इसम आमचे विरुद्ध उठून बंडखोरी केली. त्यामुळे आम्हास पुणे सोडून महाडास येणे भाग पडले. त्यांनी आम्हास गाठून भलताच प्रकार करू नये म्हणून आपला आश्रय करण्याचा इरादा. आम्ही आपणास असे कळवितो की, या बंडखोरांपैकी

१ पू. रे. कॉ. नं. १०, पृ. ३१-३२.

कोणी आम्हास आपल्या ताब्यात मागतील तर, तुम्ही ते बिलकूल मान्य करू नये. किंवा तुम्ही आम्हास तुमच्याकडून निघून जाण्यास सांगू नये. किंवा आमचे मनात निघून जाण्याचे आल्यास त्यास तुम्ही अटकाव करु नये. या अटी तुम्हास मान्य असतील तर तुम्ही आमचे खर्चाची तजवीज करावी म्हणजे आम्ही तुमच्या आश्रयास येऊन राहतो. तुमचे उत्तर आल्यावर आम्ही येथून निघण्याचे करू. मात्र या अडचणीच्या प्रसंगातून निभावून जाण्यासाठी तुम्ही आपली मोठी लढाऊ जहाजे भरपूर दारुगोळा देऊन महाडचे बंदरात पाठवावी. त्यांजबरोबर एक सज्जन व शूर इंग्रज गृहस्थ आमच्या मर्जीनुसार वागेल असा पाठवावा. जास्त खुलासा हे पत्र घेऊन येणार नारो गोविंद आवटी हे करतील. याचेच बरोबर महाडास गलबते[1] पाठवावी म्हणजे जरुर पडल्यास आम्ही त्याचा उपयोग करून आपल्याकडे निघून येंऊ."

गव्हर्नरने या पत्रावर जॉन मालकम याच्या अधिकाऱ्याचा सल्ला घेतला व त्याच्या लेखी सल्ल्यानुसार पेशव्यांशी त्याने पुढील वाटाघाटी केल्या. दरम्यान बाजीरावाकडे होळकराने आपला खास वकील भास्करराव महाडास पाठवून विनंती केली की आपण निर्धास्तपणे पुण्यास यावे, परंतु हा विचार पेशव्यांस पटला नाही[2]. उलट आपल्याला होळकर पकडतील या भीतीने बाजीरावानी आपल्या बरोबरचा लवाजमा पुण्यास परत पाठविला आणि स्वतः सुवर्णदुर्गास गेले. तिथेही पठाण निकड करून येतात असे कळताच बायकामुले सुवर्णदुर्गावर ठेवून दोघे बंधू जहाजांत बसून रेवदंड्यास गेले. रेवदंड्याहून मुंबईस जाऊन तेथे मेजवानी घेऊन वसईस आले. तेथे यावेळी पुण्याचा रेसिडेंट क. क्लोज याने त्यांची गाठ घेतली. आणि मार्गशीर्ष वद्य ९, श. १७२४ दिनांक १८ डिसेंबर १८०२ च्या मुहूर्तावर बाजीरावानी तहाची वाटाघाट सुरु केली[3]. ती १०-१२ दिवस क्लोजचे मार्फत गव्हर्नरांशी चालली आणि इंग्रजांची फौज मदतीस घेण्याचा तह त्या सालच्या शेवटच्या दिवशी बाजीरावानी पुरा करून दिला[4].

बाजीराव इंग्रजांकडे का गेले हे समजून घेणे जरूर आहे. रियासतकार सरदेसाई म्हणतात "यशवंतराव व अमृतराव आपणास निर्माल्यवत करून जबरदस्तीने पाहिजे तसा कारभार चालवतील अशी बाजीरावास मोठी भीती वाटत होती. स्वतःची नालायकी ओळखणारे त्याचे मन त्यास सारखे खात होते. शेवटी इंग्रजांकडे गेला तेव्हा सुद्धा त्यास अशी आशा वाटत होती की एकदा हा प्रसंग निभावला म्हणजे कोणत्यातरी क्लृप्तीने आपण इंग्रजांचे कचाटयातून पार पडू. बाळोजी कुंजराच्या सल्ल्यानुसार बाजीरावानी

१. खरे. इ, स. भा. १४ पृ. ७६४०.

२. सिक्रेट ॲन्ड पॉलिटीकल डायरी (मुं.) नं. १३४, डिसें. २३, १८०२, पृ. ५७.

३. तत्रैव.

४. तत्रैव, डायरी १३५, जाने. २१, १८०३, पृ. ३६९.

वसईचा तह पुरा केला. तह पुरा झाल्यावर ह्या तहाचे घातकी परिणामाची जाग बाळोजी कुंजर यास आली पण आता फार उशीर झाला होता[१].

दरम्यान यशवंतराव होळकरानी आपला मुक्काम वानवडी येथील शिंद्यांच्या वाड्यात ठेवून पुण्याच्या बंदोबस्तास आपले सरदार पाठविले. शिंद्यांचे लोकांस पळून जाता येऊ नये म्हणून पुण्याची नाकेबंदी केली. मोरोबादादा, नाना फडणीस, फडके बंधू यांच्या मंडळींची कैदेतून सुटका केली. अमृतरावास पुण्यास घेऊन येण्यास माणसे पाठविली[२]. यावेळी होळकरांच्या विश्वासातील व सर्वांचा आवडता सरदार पराशर दादाजी दिनांक १८ नोव्हेंबरला निवर्तला. हा वकिलीच्या कामास लायक व सूज्ञ होता. तो वकिली करण्यांत चतुर होता.

पुण्यास सर्वांना असा प्रश्न भेडसावत होता की बाजीराव-इंग्रज संभाव्य युतिपासून मराठी राज्याचे संरक्षण कसे करावयाचे? अमृतरावांस पेशवा बनवून होळकराच्या नेतृत्वाखाली पुण्यास सर्व सरदारांनी ह्या कार्यासाटी एकत्र येण्याचे ठरविले. ह्या बनावात गायकवाड सामील झाले नाहीत. कारण २९ जुलै १९०२ च्या स्वतंत्र तहाने गायकवाडांनी इंग्रजांशी दोस्तीचा तह करून त्यांच्या तैनाती फौजेचा स्विकार केला होता.

पुण्याचा इंग्रज रेसिडेंट कर्नल क्लोज सरळ भला माणूस होता. त्याजवर लॉर्ड वेलस्लीचे दडपण नसते तर ऑर्थर वेलस्लीच्या सहाय्याने त्याने शिंदे-होळकरांची समजूत घालून पुण्यास पेशवाईची वस्त्रे घेतलेल्या अमृतरावांस संरक्षण देऊन मराठी राज्यातील घटकांची समजूत घातली असती. पण बाजीरावानी संकटात येऊन आपल्याकडे धाव घ्यावी असे वेलस्लीचे गेले चार वर्षे प्रयत्न सुरू होते. त्या प्रयत्नास बाजीरावानी इंग्रजांकडे मदत मागून यश आणिले. इंग्रजांनी बाजीरावांशी अशा कुशलतेने तैनाती फौजेचा तह करावयाचा की, जेणेकरून तो सर्व तऱ्हेने बांधला जाईल. असे करताना इंग्रजांनी त्यास रुष्ट किंवा नाराज न करता त्याच्या कलाने सर्व गोष्टी घ्यावयास हव्या असे जनरल मालकमने आपले मत गव्हर्नर डंकनला लेखी लिहून दिले. इंग्रज मुत्सद्यांनी त्याप्रमाणे आपली पावले टाकण्यास सुरवात केली.

बाजीराव महाडकडे गेल्यावर त्याचा भाऊ अमृतराव यांनी त्यास परत येण्यासाठी पत्रे व निरोप वारंवार पाठविले आणि भावी अनर्थाची सूचना दिली. बाजीरावानी उलट त्यांस आपल्याकडे बोलविले.

बाजीरावांचा हा डाव ओळखून अमृतराव त्यांचे भेटीस गेले नाहीत. बाजीरावांस खुद्द दौलतरावानी पत्र पाठवून "तुम्ही भिऊ नका, थोडे दिवस निभावून न्या की मी येऊन पोचतो आणि यशवंतरावांचा बंदोबस्त करतो" असे सांगितले होते[३]. त्याचे मते इंग्रजांचे कबजात बाजीरावाने जाण्यापेक्षा

---

१. सरदेसाई, रियासत, उत्तर वि. भा. ३, पृ. २१९.

२. ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, भा. २, नं. १५, पृ. ९३; खरे, भा. १४, पृ. ७५७८.

३. ऐ. ले. सं. भा. १४, पृ. ७६०२.

यशवंतरावाचे कबजांत जाणे तितके वाईट नाही. अनेक अडचणीमुळे दौलतरावांस पुण्यास येता आले नाही.

दिनांक १२ नोव्हेंबर रोजी अमृतराव पुण्यास आले आणि त्यानी होळकरांच्या तंत्राने कारभार हातात घेतला[१]. पुण्यातील जाणत्या मुत्सद्दी मंडळींचा यशवंतरावांनी कारभारी मंडळात समावेश केला. हे कारभारी मंडळ अमृतराव, होळकर, भोसले, पटवर्धन आणि शिंदे यांचे असावे असे ठरले व त्यास शिंद्याने आपला होकारही कळविला होता. इंग्रजांना दूर ठेवण्याचा हा एकमेव मार्ग होता. म्हणून शिंद्यानी हे कारभारी मंडळ स्थापण्यास आपली संमती दिली होती. अमृतरावांचा मुलगा विनायकराव ह्यास यशोदाबाईच्या मांडीवर देऊन त्यास पेशवे पदाची वस्त्रे द्यावी असा विचार ठरला[२]. त्याप्रमाणे विनायकरावाच्या नांवे साताऱ्याहून पेशवाईची वस्त्रे होळकरांनी डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात आणविली. ह्यावेळी बाजीराव वसईत राहून इंग्रजांशी तहाच्या वाटाघाटी करत होते. यावेळी सर्जेराव घाटगे यांनी घात केला. त्यांनी होळकरांचा पराभव करण्यासाठी बेगम समरुची मदत घेतली. बाजीरावांस महाडलाच राहाण्यास निरोप पाठविला. हे घडत असताच बाजीराव डिसेंबरच्या सुरवातीस सर्व मराठे सरदार नको नको म्हणत असता इंग्रजांच्या आश्रयास गेले. राजकारणाने निराळें वळण घेतले. आतापर्यन्त शिंदे-होळकरांचा झगडा चालू होता. इंग्रजांनी बाजीरावास आश्रय दिल्यामुळे यापुढील भांडण हे मराठे व इंग्रज यांचे असा देखावा निर्माण झाला. बाजीरावानी इंग्रजांबरोबर तह करु नये म्हणून होळकरांनी शिकस्त केली. स्वतः येऊन बाजीरावास भेटून त्याचे मन वळविण्याचे योजिले. पण बाजीरावांनी होळकरांस भेटून घेण्यास नकार दिला. दौलतराव शिंदे व नागपूरकर भोसले यांच्या भेटीस येण्यास त्यानी तयारी दर्शविली. अशा वेळी अमृतराव होळकर यांनी जो विचार बाजीरावाकडे पाठविला होता त्यास बगल देण्यासाठी कर्नल क्लोज यानी बाजीरावांस धमकावले. त्याचा इष्ट परिणाम होऊन इंग्रजांच्या मर्जीप्रमाणे पुण्यास व्यवस्था करण्याचे ठरवून बाजीरावानी इंग्रजांशी वसई येथे तह केला. (३१ डिसेंबर १८०२)[३].

### वसईचा तह व नंतर :

तहाच्या वाटाघाटी करताना बाजीरावांचे तीन सहाय्यक होते. एक रघुनाथराव चिनापट्टणकर इंग्रजांच्या संगतीत मद्रास येथे वाढलेला व इंग्रजांस दैवत मानणारा. दुसरा बळवंतराव नागनाथ व तिसरा खंडेराव नीळकंठ रास्ते हा बाजीरावांचे तैनातीस होता.[४]

---

१. ऐ. ले. सं. भा. १४, ले. नं. ६४९१.

२. पूना रे. कॉ. भा. १०, पृ. १८४३.

३. कित्ता, पृ. ६९-७०.

४. कित्ता, ले. ४०.

तहाची एकंदर सतरा कलमे. त्यातील मुख्य कलमांचा मतलब असा : (१) एकाचे शत्रु मित्र तेच दुसऱ्याचे शत्रु मित्र मानणे; (२) इंग्रजांनी पेशवाई मुलखाचे संरक्षण करण्याची हमी घ्यावी; (३) त्यासाठी सहा पलटणे, तोफा व युद्धोपयोगी सामान पेशव्यांच्या मुलखात कायम ठेवण्याची इंग्रजांस परवानगी असावी; (४) ह्या पलटणींच्या खर्चासाठी सव्वीस लक्ष नक्त उत्पन्नाचा मुलूख इंग्रजांस कायम देणे; (५) इंग्रजांशी विघाड करणाऱ्या फ्रेंच आदि दुसऱ्या टोपीकरास पेशव्याने आश्रय देऊ नये; (६) निजाम वगैरे हर कोणाशी बाजीरावाचा तंटा असल्यास त्याचा निकाल इंग्रज बहादुर करतील तो पेशव्याने मान्य करणे; (७) गायकवाड व इंग्रज यांच्यात झालेल्या दोस्तीच्या करारास पेशव्याने मान्यता द्यावी. पेशवे व गायकवाड यांच्यात जो कांही तंटा असेल त्याचा निकाल इंग्रज देतील तो पेशव्यांनी मान्य करावा; (८) कारणपरत्वे सहापेक्षा जास्त पलटणे इंग्रजांनी बाजीरावास व बाजीरावाने इंग्रजांस आपली फौज देऊन एकमेकांचे सहाय्यक करणे; (९) बाजीरावाने सुरत शहर इंग्रजांस द्यावे; (१०) इंग्रज व पेशवे ह्यांनी एकमेकांस आगावू कळविल्याशिवाय परदरबारशी कोणतेही राजकीय व्यवहार करु नयेत[१].

वरीलप्रमाणे बाजीराव व इंग्रज यात तह घडून आला ही बातमी वसईहून पुण्यास लगेच पोचली. पुण्यास दिनांक २ जानेवारी १८०३ रोजी अमृतराव, होळकर व त्याचा दिवाण गणपतराव, मीरखान, बाबा फडके, मोरोबा फडणीस, वगैरे मंडळी एकत्र जमून पुढील विचार करू लागली. बाजीरावांनी राज्य बुडविले व इंग्रज घरात घातला,[२] त्यास काढून लावावयाचे तर शिंदे, नागपूरकर भोसले या सर्वांनी एकजुटीने वागून इंग्रजांशी मुकाबला करावयास हवा हा विचार सर्वत्रांस पसंत पडला पण हे शिंदे उत्तरेत, होळकर दक्षिणेत, नागपूरकर भोसले नागपुरात, अशी स्थिती असल्यामुळे ते एकत्र येऊन, त्यांची एकजूट होऊन इंग्रजांविरुद्ध आघाडी बनवून ती प्रत्यक्षात घडवून आणणे हा एकच मार्ग सर्व मराठ्यांना सुचत होता. त्याप्रमाणे मराठे सरदारांकडून हालचाली होऊ लागल्या. त्याची सर्व हकिगत इंग्रजांस कळत होती म्हणून इंग्रज सावध राहून त्याने हा बनाव होऊ न देण्याच्या क्लृप्त्या शोधून काढिल्या व ते त्यांत यशस्वी झाले. जानेवारी १८०३ पासून पुणे दरबारने होळकर व अमृतराव पेशवे यांच्या पुढारीपणाने सर्व मराठा मंडळाची जूट बनवून मराठी राज्य सावरण्याचे ठरविले. यशवंतराव होळकर यांस अमृतरावांनी पुण्यास बोलाविले होते. त्याबद्दल त्यास एक कोट रुपये देऊ केले होते.

अमृतराव पुण्यास १२ नोव्हेंबर रोजी आले व होळकरांच्या तंत्राने कारभार पाहू लागले. पूर्वीच्या कारभारातील मंडळींना अर्धचंद्र देऊन त्यांना तुरुंगात टाकले. नवीन कारभाऱ्यांच्या व होळकरांच्या शनिवारवाड्यात दररोज बैठकी होत व त्यात नाना प्रकारच्या चर्चाही होत असत. मुख्य चर्चा होळकरांच्या मागणीप्रमाणे त्यांना पैसे कसे परत करावयाचे याची होत असे.

---

१. पूना रे. कॉ. भा. १०, ले. ४१.

२. कित्ता, ले. ४१.

मी, "शिंद्याचा पराभव करून तुम्हास पेशवाईवर बसविले आता माझे मागणी-प्रमाणे एक कोट रुपये द्या" असा तगादा होळकरांनी अमृतरावांस लावला. कारभाऱ्यांनी यावर उपाय म्हणून पुणे शहरात लोकांवर पट्टया बसवून पंचवीस लाख रुपये गोळा करण्याचे ठरविले. त्याकरिता पुढील चार महिनें पुण्यात लोकांमध्ये हाहाःकार उडाला[१]. पैसे मिळविण्यासाठी अमृतरावांच्या माण-सानी, पठाणानी पुणेकरांच्या घरास खणत्या लावल्या, लोकांस मारहाण केली. बायकांचे अंगावरील दागिने, घरातील भांडी असे असेल ते विकून मार खावून लोकांनी होळकर व अमृतराव यांना पैसे दिले; अशा रीतीने चार महिन्यात ५० लाख रुपये उभे झाले. आता बाकी पन्नास लाख उभे करण्यासाठी होळकरांनी आपला सरदार माने यास प्रतिनिधीकडे पाठविला. पैशाकरिता लोकाचा छळ होळकरानीच केला असे नाही तर अमृतराव पेशव्यानीही केला[२].

इंग्रजांनी पेशव्यांशी वसईस तह केल्यावर जानेवारी १८०३ पासून पेशव्यांस पुण्यास नेवून पेशवेपद देणे हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या तयारीस ते लागले. होळकर व होळकरांचा हस्तक माने यांच्या तसेच हंगामी पेशवा अमृतराव यांच्या अंदाधुंदीच्या चाळ्यांना पायबंद घालण्याचे ठरविले[३].

कर्नल क्लोज त्यावेळी पुण्यास इंग्रजांचा रेसिडेंट होता. त्याने वसईहून यशवंतराव होळकरांस लिहून कळविले की, "बाजीरावानी आमच्याशी रीतसर करार करून आमची लष्करी मदत स्वीकारली आहे. हा करार पाळणे आमचे कर्तव्य आहे तेव्हा तुम्ही पुणे सोडून आपले हद्दीत निघून जावे. असे तुम्ही कराल तर इंग्रज सरकार बाजीरावाशी तुमची गोडी करून देईल आणि उभयतांमध्ये जो करार ठरेल त्यास बाजीरावाकडून व्यत्यय न येण्याची खबरदारी गव्हर्नर जनरल घेतील. तरी इंग्रज सरकारशी तुमचा स्नेह आहे. तो कायम ठेवून आपली फौज घेऊन तुम्ही तावडतोब पुण्यातून निघून जावे. तुम्ही पुण्यात राहिल्यास तुमचा आमचा बिघाड होण्याचा प्रसंग येईल याचा नीट विचार करून काय करणे ते करावे[४].

यावेळी होळकर आणि अमृतराव यांनी पुण्याची सत्ता आपल्या ताब्यात राखण्याचा प्रयत्न केला. इंग्रजांच्या पत्रास उत्तर देऊन त्यानी असे कळविले की तुम्ही बाजीरावाशी केलेला करार आम्ही मानण्यास तयार आहोत. बाजीरावास पेशवे पद देण्यास आमची कबुली आहे मात्र पेशवाईचा कारभार आमच्या तंत्राने हाकण्यास देण्यात यावा;[५] हे ब्रिटीशांना पटण्यासारखे नव्हते.

इंग्रजांविरुद्ध आपली जूट घडवून आणण्याचे प्रयत्नात निजामास मिळवून घेण्यासाठी बाबा फडके या आपल्या वकिलास अमृतरावाने हैदराबादेस

१. खरे, खं. १४, डिसे. ३०, १८०२, पृ. ७६२४, जाने. १८०३ पृ. ७६९६.

२. पेशवाईची अखेर, पृ. १११-१२.

३. खरे, खं. १४, पृ. ७६४८-४९.

४. चोकशी, एच्. बी. डी. पृ. ३०८, पू. रे. कॉ. व्हॉ. ७, १९ फेब्रु. १८०३, पृ. ४४.

५. कित्ता, व्हॉ, ७, मार्च १८०३, पृ. ४८.

पाठविले[1]. पटवर्धन, रास्ते, विंचुरकर एकत्र होऊन धारवाडाकडे इंग्रज येत आहेत त्यांचा बंदोबस्त करावा असे कळविले. पण ह्यातून कांहीच निष्पन्न झाले नाही. राज्यात माजलेली बेबंदशाही चालूच राहिली. तिचा फायदा इंग्रजांनी उचलण्याचे ठरविले. गव्हर्नर जनरलने मुंबईचे गव्हर्नर जोनाथन् डंकन व मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड क्लाईव्ह ह्यांना आपल्या योजनेत सामील होण्यास हुकुम दिला. मार्च १८०३ मध्ये हैद्राबादच्या तैनाती फौजेचा मुख्य "स्टीव्हनसन" याने परिंडा येथे लष्करी तळ दिला. ही पेशव्यांच्या राज्याची व पूर्वकडील सीमा. कर्नाटकात जनरल वेलस्लीजवळ १,७०० घोडेस्वार व ८०० पायदळ सैन्य होते. त्याला पुण्याच्या रोखाने कूच करण्याची आज्ञा दिल्या.[2] त्याने त्याप्रमाणे सैन्यासह हरिहर सोडले आणि १२ मार्च १८०३ रोजी तुंगभद्रा नदी ओलांडली.[3] जनरल वेलस्लीने मराठ्यांच्या मुलुखात प्रवेश केल्यावर सर्वसामान्य मराठ्यांसाठी एक जाहीरनामा काढला. त्या जाहीरनाम्यामध्ये आपल्या इच्छा, आपले सद्‌हेतु कोणते आहेत आणि पेशव्यांचे मित्र म्हणून आपण त्याला त्यांच्या गादीवर बसण्याकरिता पुण्यास राखावे, हे सांगितले.

वेलस्लीने मराठी हद्दीत पाय ठेवताच सर्व महाराष्ट्रभर जाहीरनामा फिरविला की, "आम्ही पेशवे सरकारचे दोस्त या नात्याने पेशव्यांच्या आमंत्रणावरुन पुण्याकडे येत आहो. आम्हाला कोणाचेही शत्रुत्व करावयाचे नाही, किंवा कोणाचेही नुकसान करावयाचे नाही आमच्या लष्कराला दाणावैरण लागेल तो आम्ही विकत घेऊ आणि त्यांची किंमत रोखीने देऊ. आम्हास सर्वांची मैत्री पाहिजे. कोणालाही आमच्याकडून इजा पोहचणार नाही. सर्वांनी आपापल्या घरी स्वस्थ आनंदाने रहावे." दक्षिणेतील सरदार व पेशवे यांचे वितुष्ट वाढले होते. इग्रजांची मदत घेऊन पेशवे आपले सरंजाम जप्त करतील असे त्यांना भय वाटत असे. ही त्यांची भीती वेलस्लीने त्यांना अभय देऊन घालविली. त्यापैकी काही आनंदाने इंग्रजांस मदत करण्यास तयार झाले[4]. शिंदे, होळकर, यांची इग्रजांविरुद्ध एकजूट जमली नाही. तसेच इतर सरदार पटवर्धन, भोसले वगैरेपैकी अमृतराव व होळकर यांना साद देण्यास पुढे झाले नाहीत. अशा प्रकारची पुण्याची स्थिती होती. इंग्रजांच्या खलित्याप्रमाणे होळकर व अमृतराव यांना ठरल्याप्रमाणे शिस्तशीर माघार घेणेही जमले नाही. ब्रिटीश सैन्य पेशव्यास घेऊन पुण्याकडे निघाल्याचे कळताच अमृतराव काही काळ पुण्यासच रेंगाळत राहिले. पण होळकरानी पुणे सोडून मार्चच्या मध्यावर ते औरंगाबाद येथे गेले. तेथून बीड, पैठण, जालनापूर, यामार्गे सैन्यासह लुटालूट करत पैसे जमवीत जून १८०३ मध्ये खानदेशी आले[5]. ब्रिटीशांची फौज पेशवे बाजीराव यास पुण्याजवळ घेऊन येताच अमृतराव, विनायकरावांसह १९ एप्रिल १८०३ ला पुण्याहून निघाले.

१. कित्ता, पृ. १६९, खरे, १४, पृ. ७६६३.
२. खरे, खं. १४, पृ. ७६६१.
३. पुणे गॅझेटिअर, भा. २, पृ. २८३.
४. खरे, भा. १४, पृ. ७६७१, मार्च २८, १८०३.
५. तत्रैव, पृ. ७६६४, ७६६५.

बरोबर फौजबद सरदार हरिपंत भावे होते. त्यांनी रात्री चाकणला मुक्काम केला. बरोबर पेशवेपदी तीन महिने असतांना लुटलेली संपत्ती, हत्ती, उंट यांजवर घालून घेतली होती. तिथून ते नासिकला आले. नासिकला धमाल उडवून नासिकचा अंमल श्री राजश्री रावसाहेब यांनी बसविलेल्या क्षेत्रात "कारभार भावे करतात घरे खणतात कांही जाळली. ब्राह्मण व ब्राह्मणी स्त्रियांचे प्रेत जाहले अनर्थात बाकी राहिली नाही. ईश्वरे नेत्र झाकले तेव्हा यत्न कोणाचाच दिसत नाही[१]." याप्रमाणे अमृतरावांनी कहर उडवून दिला. इकडे पुण्यास २० एप्रिल १८०३ रोजी इंग्रजांकडील कर्नल वेलस्ली आले. त्यांना कोणाकडूनही फारसा विरोध झाला नाही. पेशव्यांसह कर्नल क्लोज १३ मे १८०३ रोजी पुण्यास आला. कर्नल वेलस्ली यांस बहुत सन्मानाने सामोरा गेला. १३ मे रोजी जाहीर दरबार भरवून "हिज हायनेस बाजीराव पंडित प्रधान बहादूर" यांनी पेशवाईची अधिकारसूत्रे पुन्हा हाती घेतल्याचे जाहीर करण्यात आले. हा प्रसंग इंग्रजांनी समारंभपूर्वक गाजावाजा करत भपकेबाज थाटामाटात घडवून आणला[२].

इंग्रज पेशवाईत घुसला हे शिंदे, होळकर, भोसले ह्यांना आवडले नाही. फेब्रुवारी १८०३ मध्ये शिंद्यांचा मुक्काम बऱ्हाणपुरला असता पेशव्यांचे हस्तक बाळोजी कुंजर हे शिंद्यांस भेटले व त्यानी पेशव्यांना कोणत्या परिस्थितीत इंग्रजांच्या आश्रयास जावे लागले यासंबंधीचे सविस्तर निवेदन असलेले पत्र दिले. शिंदेसुद्धा कूच करत पुण्याच्या दिशेने निघाले. वाटेत शिंद्यांच्या गोटात इंग्रजांना घालविण्याची खलबते चालली होती. शेवटी त्यांचा असा विचार ठरला की, सर्वांची एकजूट करून इंग्रजांस घालवावे. ह्या विचारास नागपूरकर भोसल्यांनी चांगली साथ दिली. आणि पुढील पाउले उचलण्यासाठी ते दोघे सरदार बोधवाड गांवी मलकापूरजवळ ४ जून १८०३ ला एकमेकास भेटले[३]. भोसले आणि शिंदे यांचा मुक्काम जुलैमध्ये फरदापूर येथे पडला. त्यावेळी होळकर खानदेशात सुरतानपुरला होते. शिंद्यांनी होळकरांशी समेट करण्याच्या हेतूने सर्व मागण्या मान्य केल्या. आपल्याकडील होळकरांचे सगळे नातेवाईक त्याने यशवंतरावाच्या हवाली केले. उत्तर हिंदुस्थानात होळकरांचा जो मुलूख शिंद्यानी आपल्या ताब्यांत घेतला होता तोही यशवंतरावांच्या स्वाधीन केला[४]. अशा रीतीने शिंद्यांनी यशवंतरावांशी दिलजमाई करण्यासाठी पावले उचलली. यशवंतरावही शिंद्यांना भेटण्यासाठी आपला मुक्काम हालवून शिंद्यांच्या दिशेने दोन मुक्काम पुढे आले. पण शिंदे-होळकर यांची एकी होऊ न देण्याचे नियतीने ठरविलेले होते असे दिसते. कारण ह्या एकीच्या आड अमृतरावास शिंद्यानी लिहिलेले पत्र आले.

१. पेशवाईची अखेर, पृ. ११५; खरे, भा. १४, ९ सप्टें, १८०३ पृ. ७८७०.
२. मार्टीन डिसपॅचेस, व्हॉ. ३ ,पृ. १३६; सि. पॉ. डायरी नं. १४३, मे १८०३, पृ. ३३६४.
३. रियासत, उत्तर विभाग, भा. ३ पृ. २३६.
४. सरदेसाई, एन्. एच्. ए म.भा. ३, पृ. ४०५.

शिंद्यानी अमृतराव पेशव्यास असे लिहिले होते की, तूर्त इंग्रजांचा निकाल लागेपर्यन्त होळकरांच्या मागण्या मान्य करा. एकदा इंग्रजांचा पराभव झाल्यावर होळकराचा निःपात करता येईल अशा आशयाचे शिंद्याने अमृतरावास लिहिलेले पत्र कर्नल वेलस्लीने हरकाऱ्याकडून मिळविले[१] आणि ते होळकराकडे पाठवून दिले. होळकरांच्या हाती हे शिंद्याच्या विश्वासघातकीपणाचे पत्र मिळताच होळकर रागाने लालबुंद झाले. आपल्याला नाहीसे करण्याचा हा कट आहे हे त्यानी हेरले आणि भोसले व शिंदे यांच्या मदतीस न जाता होळकर माळव्यात गेले आणि शिंद्यांच्या मुलखांत धुमाकूळ घालू लागले.

इंग्रजांनी मराठ्यांशी केलेला सालबाईचा तह शिंद्यांच्या मध्यस्थीने केला होता. शिंद्यांचे म्हणणे असे होते की, इंग्रजांनी पेशव्यांशी वसईचा तह करण्याअगोदर आपल्याला विचारायला हवे होते.[२] पेशव्यांनी इंग्रजांशी वसईचा तह करून मराठ्यांचे स्वातंत्र्य घालविले तेव्हा इंग्रजांस धडा शिकविणे इष्ट. कारण ह्या तहाने इंग्रजांनी मराठ्यांच्या स्वातंत्र्यावरच घाला घातला होता. उलट इंग्रजांस हा तह करतांना शिंदे व मराठे सरदार यांना असे वाटणार याची जाणीव होती. म्हणून त्यांनी मराठे सरदारांना एकमेकांपासून फोडण्याचा व्यूह रचला होता. तसेच शिंद्यांकडील सरदारांत फितुरी करणे, शिंद्यांचे फौजेतील युरोपियन सेनाधिकारी होते त्यांजला फितविणे असे प्रकार चालविले होते. शिवाय कोणत्याही क्षणी युद्धास तोंड लागल्यास आपण कमी पडू नये म्हणून इंग्रजांनी जय्यत तयारी केली होती.[३]

गव्हर्नर जनरल वेलस्लीने आपला भाऊ जनरल वेलस्ली यास शिंदे याचा तोफखाना धुळीस मिळवून शिंद्यांची सत्ता खिळखिळी करण्याचा प्रयत्न करा असे पत्र लिहिले होते. पुण्यास कर्नल क्लोज व वेलस्ली होते त्यांना सहाय्य करण्यास बाजीरावास सांगितले. गव्हर्नर जनरलने जनरल वेलस्लीस कर्नाटकातील जहागिरदार, होळकर, अमृतराव इत्यादिकाशी पाहिजे ते करार करण्याचा संपूर्ण अधिकार दिला. मराठ्यांकडील युरोपियन व एतद्देशीय अंमलदार व त्यांचे लोक यांस फितवून निकामी करण्याचे कामगिरीवर मेजर फ्रिथ नांवाचा मुख्य अंमलदार गव्हर्नर जनरलने नेमला.

तीन महिन्याचे आत मराठे सरदारांची नोकरी सोडून जे कोणी लोक, मग ते इंग्रज, फ्रेंच किंवा हिंदी कोणीही असोत, इंग्रजांच्या पक्षाकडे येऊन मिळतील त्यांस सत्कारपूर्वक नोकरीत घेऊन पूर्वीप्रमाणे चालविले जाईल. याचे उलट जे कोणी इंग्रजांवर शस्त्र उचलतील त्यास पुढे इंग्रजांचा आश्रय कधीही मिळणार नाही.[४]

---

१. होळकर शाहीचा इतिहास, भा. २, पृ. १०२, १०३.

२. चोकशी, हिस्टरी ऑफ ब्रिटीश डिप्लोमसी, पृ. ३२५.

३. मार्टीन, डिसपॅचेस, व्हॉ. ३, पृ. ६०१, डिसें. १८०३.

४. सिक्रेट अँन्ड पॉलिटीकल डायरी नं १४९, ऑगस्ट २९,१८१३, पृ. ६५८२ व ६५८७.

# इंग्रजांचे शिंदे–भोसल्यांशी युद्ध

(इ. स. १८०३, ऑगस्ट ते १८०४ जुलै अखेर).

## कालसूची

| | |
|---|---|
| १८०३, ऑगस्ट ७ . . | जनरल लेकचे शिंद्यांच्या मुलुखावर आक्रमण. |
| १८०३, ऑगस्ट ७ . . | गव्हर्नर जनरलचे जनरल स्टुअर्टला जनरल वेलस्लीस मदत देण्याचे हुकूम. |
| १८०३, ऑगस्ट ८ . . | अहमदनगरचा किल्ला काबीज करण्याचा वेलस्लीचा बनाव. |
| १८०३, ऑगस्ट १२ . . | वेलस्ली अहमदनगरचा किल्ला जिंकतो. |
| १८०३, ऑगस्ट २९ . . | जनरल वेलस्ली औरंगाबादेस दाखल. |
| १८०३, सप्टेंबर ३ . . | जनरल पेरॉन फितूर होऊन इंग्रजास मिळतो. |
| १८०३, सप्टेंबर ४ . . | शिंदे-भोसले यांचा मुक्काम पैठणजवळ. |
| १८०३, सप्टेंबर ५ . . | अलिगड इंग्रजांचे ताब्यात. |
| १८०३, सप्टेंबर १४ . . | ब्रिटीश फौज यमुना उतरून दिल्लीत येते. |
| १८०३, सप्टेंबर १६ . . | जनरल लेक बादशहाची भेट घेतो. |
| १८०३, सप्टेंबर २१ . . | वेलस्ली व स्टीव्हेनसन यानी मराठयांशी लढाई देण्याचे ठरविले. |
| १८०३, सप्टेंबर २१ . . | भोकर्दन आणि जाफराबाद यांचे दरम्यान मराठा सैन्याचा तळ. |
| १८०३, सप्टेंबर २४ . . | जनरल लेक आग्र्यास जाण्यास निघतो. |
| १८०३, ऑक्टोबर ४. . | शिंद्यांकडील सर्व फ्रेंच अधिकारी इंग्रजांस मिळतात. |
| १८०३, ऑक्टोबर १५ . | इंग्रजानी बऱ्हाणपूर शहर ताब्यात घेतले. |
| १८०३, ऑक्टोबर १७ . | पर्यंत आग्रा, मथुरा जनरल लेकच्या ताब्यात येतात. |
| १८०३, ऑक्टोबर २१ . | अशीरगड किल्ला इंग्रजांच्या ताब्यात. |
| १८०३, नोव्हेंबर १ . . | लासवाडीची शिंदे फौज व जनरल लेक यामधील लढाई, शिंद्याचा पराभव. |
| १८०३, डिसेंबर २३. . | भोसले इंग्रजांशी देवगावचा तह करतात. |
| १८०३, डिसेंबर २५. . | गाविलगड इंग्रज हस्तगत करतात. |

## २४

## इंग्रजांचे शिंदे–भोसल्यांशी युद्ध

### (इ. स. १८०३, ऑगस्ट ते १८०४, जुलै अखेर)

वसईचा तह होताच त्या तहाला मान्यता देण्याविषयी इंग्रजांनी शिंदे व भोसले यांच्या दरबारांत तडजोडीचे बोलणे चालू ठेवले होते आणि ते अद्यापही तसेच नेटाने चालू होते. वसईच्या तहासंबंधी मराठे सरदारांनी आक्षेप घेतले त्याचे तात्पर्य असे :

इंग्रजांशी श्रीमंतांनी तह केला, त्याच्या नकला आम्हास मिळाल्याशिवाय त्या तहाला पेशव्यांची मान्यता आहे असे म्हणता येणार नाही. सालबाईच्या तहात ठरल्याप्रमाणे शिंद्यांच्या मध्यस्थीने हा तह करावयास हवा होता. इंग्रजांनी तसे केले नाही. या तहाने मराठे राज्याच्या अस्तित्वावर गदा येत असल्यामुळे शिंदे, होळकर, भोसले अशासारख्या बरोबरीच्या सरदारांच्या संमतीशिवाय असला तह ठरविण्याचा पेशव्यांना अधिकारच नाहीं. तहाची कलमवार चर्चा इंग्रजांशी होऊन तह सर्व बाजूनी कायदेशीर ठरेपर्यन्त इंग्रजांनी मराठी राज्यात शिरू नये. मराठ्यांचा या आक्षेपावर इंग्रजांनी उत्तरें दिली ती अशी :

(१) मराठा सरदारांना तहाच्या नकला देण्याची व्यवस्था इंग्रजांनी तावडतोब केली ;

(२) सालबाईच्या तहानंतर पुढे चार वर्षांनी महादजी शिंद्यांच्या संमतीने पुणे दरबारी स्वतंत्र इंग्रज वकील राहू लागल्यामुळे त्या तारखेपासून शिंद्यांची मध्यस्ती रद्द समजली पाहिजे ;

(३) पेशवे सर्वाधिकारी आहेत. त्यांना सोयीसाठी नवी वहिवाट पाडण्याचा किंवा जुनी वहिवाट मोडण्याचा पूर्ण अधिकार आहे.

आमच्या मैत्रीपासून मराठी राज्याचा नाश होणार असे मराठे मानतात ; परंतु ती त्यांची चूक आहे. राज्यात अव्यवस्था व बंडाळी माजली आहे. ती मोडून शांतता व सुव्यवस्था निर्माण करावी एवढाच आमचा उद्देश आहे. आम्ही मराठा राज्याचे खरेखुरे मित्र आहोत. मराठ्यांशी तहाच्या कलमाची चर्चा करण्याचा मुद्दा आपणास पसंत आहे असे सांगून तहाच्या कलमांची पुन्हा चर्चा करण्याची त्यांनी तयारी दर्शविली. तेव्हा वाटाघाटीसाठी मराठा

सरदारांनी फौजेची जय्यत तयारी का चालविली आहे ? असे विचारून इंग्रज म्हणाला की, हा वाद वाटाघाटीने मिटविण्याची मराठ्यांची खरोखरच इच्छा असेल तर शिंद्यांनी उज्जैन येथे व भोसल्यांनी नागपुरास परत जावे आणि आम्हीही आपल्या हद्दीत परत जातो. पण मराठे सरदार परत जाणार नाहीत तर त्यांचा हेतू शत्रुत्वाचा आहे असे समजून आम्ही ताबडतोब युद्धास सुरुवात करू. इंग्रजांशी बोलण्याची ही वाटाघाट मराठे सरदारांनी बाह्यत: चालू ठेवली होती परंतु आतून मात्र इंग्रजांशी लढाईच करावी असा त्यांचा ठाम निश्चय ठरला होता. त्यावेळी रघोजी भोसले याने पटवर्धनांस लिहिताना हिंदू धर्म रक्षावा, स्वराज्य रहावे हे चित्तात धरून राजश्री दौलतराव शिंदे यासुद्धा या मसलतीस प्रवृत्त झालो ? तुम्ही आम्हांस येऊन मिळावे, होळकरांनी इंग्रजांशी युद्ध सुरू केले त्यावेळी प्रतिनिधीस पत्र पाठविले व सांगितले की, ज्यांत हिंदू धर्माची कायमी व परिणामास नीट ते करावे. यावरून त्यावेळच्या मराठ्यांस स्वराज्याबरोबर आपला हिंदू धर्मही बुडणार असे वाटू लागले. इंग्रजांनी सांगितल्याप्रमाणे मराठे सरदारांनी आपआपल्या ठिकाणी परत जावयाचे साफ नाकारले. दिनांक ३ ऑगस्ट १८०३ रोजी इंग्रज वकील कर्नल कॉलीन्स हा शिंद्यांच्या लष्करातून कूच करून परत चालला आणि इंग्रजाचे शिंदे-भोसले यांच्याशी जाहीरपणे युद्ध सुरू झाले.

**शिंद्यांशी इंग्रजांचे युद्ध :**

इंग्रजांनी आपल्याला मराठ्यांशी युद्ध करावे लागणार हे गृहीत धरूनच जोराची तयारी चालविली होती. दक्षिणेत जनरल वेलस्लीच्या हाताखाली ३६ हजार सैन्य होते. जनरल वेलस्लीला दक्षिणेतील फौजांचा सरसेनापती म्हणून जाहीर केले होते. कृष्णा-तुंगभद्रा दुआबात जनरल स्टुअर्ट आपल्या ८,००० सैन्यासह युद्धाच्या तयारीने तळ देऊन होता. आजुबाजूचे पाळेगार, बंडखोर, यांना ताब्यात ठेऊन जनरल वेलस्लीला लागेल त्यावेळी मदत करण्याचे त्यास हुकूम दिले होते. ७ ऑगस्ट १८०३ रोजी जनरल वेलस्ली बरोबर ९ हजार सैन्य घेऊन आणि कर्नल स्टीव्हेन्सन ह्याचे ८ हजार सैनिक ही दोन्ही सैन्ये अहमदनगरच्या किल्याजवळ येऊन थडकली. निजामाचे १५ हजार सैन्य, अप्पा देसाई निपाणकर यांजकडील ८ हजार सैन्य आणि बापू गोखले यांनी जनरल वेलस्लीला मदत करावयाची असे हुकूम गव्हर्नर जनरलने दिले होते. सुरतजवळ कॅप्टन मरे आपल्या ८ हजार सैन्यानिशी दक्षिणेत निघण्याच्या तयारीत होता. जनरल लेकला उत्तरेतील सैन्याचे अधिपत्य देऊन कानपूर व लखनौ येथील सैन्यास शिंद्यांवर हल्ला करण्यासाठी ठेवले होते. शिंदे दक्षिणेत पुण्याच्या दिशेने येत होते, त्यास अडवून धरण्यासाठी त्यांच्या ताब्यातील अहमदनगरचा किल्ला काबिज करण्याचा बनाव वेलस्लीने घडवून आणला.[१] (८ ऑगस्ट १८०३).

---

१ सर जॉन मालकम, भाग १, पृ. २३१.

**अहमदनगर किल्ला :**

अहमदनगरचा किल्ला धनधान्य व साहित्याने भरलेला व मजबूत असा शिंद्यांच्या ताब्यात होता. तेथे अरबांचा बंदोबस्तही चांगला होता. हा किल्ला आपल्या ताब्यात घेतला तर पुणे, हैद्राबाद, बऱ्हाणपूर एवढ्या टापूवर तिथून नजर ठेवता येईल असे जनरल वेलस्लीस वाटून त्याने हा किल्ला हस्तगत करण्याचे ठरविले. हा किल्ला फारच मजबूत होता. हल्ला करून जिंकून घेणे दुरापास्त होते. तेव्हा वेलस्लीने फितुरी केली. किल्यावरील गोरे अंमलदार आरंभीच फितूर होऊन इंग्रजाकडे गेले. त्याचबरोबर देशी शिपाई व गोलंदाजही गेले. किल्लेदार मल्हारराव कुळकर्णी श्रीगोंदेकर याने कौल घेऊन किल्ला इंग्रजांचे स्वाधीन केला (१२ ऑगस्ट १८०३). इंग्रजांनी किल्ला हस्तगत केल्यावर सभोवतालचा प्रदेश हस्तगत करून तेथील वसुलाची व्यवस्था लावली. त्यासाठी जनरल वेलस्लीने एक इंग्रज कलेक्टर नेमला.

नगर हस्तगत झाल्यापासून जनरल वेलस्ली गर्वाने चढून २९ ऑगस्ट १८०३ रोजी गोखलेसुद्धा औरंगाबादेस दाखल झाले. तेव्हा तिकडून, शिंदे, भोसले पेंढारी कंपूसुद्धा वदनापूरचा घाट चढून औरंगाबादेपासून सहा कोसावर मुक्काम केला. शहराचे शहावर कंपू व पेंढारी ठेवून उभयता सरदार पन्नास हजार फौजेनिशी पैठणावर दाखल झाले. वेलस्ली सर्द होऊन विचारांत पडले आहेत. त्रिवर्ग सरदार सामन्यास येणार तेव्हा रगडा झगडा आहे. तारीख ४ सप्टेंबर रोजी शिंदे-भोसल्यांचा मुक्काम पैठणजवळ आला. गंगा उतरून पुण्यास दसऱ्यास जावे असा बेत आहे. गंगेवरून खंडोपंतास बोलणे करण्याकरता पुण्यास रवाना केले. बोलण्यातील भाव असा की, "इंग्रजांस निरोप द्यावा म्हणजे सारे सरदारांचा समेट होईल, नाही तर मराठे हाती लागत नाहीत. श्रीमंतास बहुत विचार पडला आहे. वेलस्लीची फौज पुढे गेली होती त्यांची आघाडी पिछाडी मारून बहुत उपद्रव केला".

जनरल वेलस्ली गोदावरीचे उत्तर काठाने मराठ्यांचे मागे गेला. मराठ्यांनी २१ सप्टेंबर १८०३ रोजी भोकर्दन व जाफराबाद याचे दरम्यान तळ दिला. स्टिव्हन्सनने शिंद्यांचे जालना शहर ताब्यात घेतले. तारीख २१ रोजी स्टिव्हन्सन व वेलस्ली यांची बदनापुरास भेट होऊन त्यांनी दोन टोळ्यांनी मराठ्यांस गाठून लढाई देण्याचा कार्यक्रम ठरविला व त्याप्रमाणे एकदम हल्ला करून असईकडे मोर्चा फिरविला. मराठी लष्कराच्या युक्त्या आपण हल्ला न करता इंग्रजांच्या फौजेस चुकविण्याच्याच दिसत होत्या. "दौलतराव शिंदे यांची तयारी नव्हती, बेफाम होते. तोफेचे बैल चारणीस होते. ते आले नाहीत व पलटणातही काही फितुरी होती. तेव्हा ८०-९० तोफ राहिली,"[१] युरोपियन ऑफिसरही शिंद्यांस सोडून इंग्रजांकडे निघून गेले (३ सप्टेंबर १८०३). प्रथम मराठ्यांच्या तोफखान्याने इंग्रज तोफखान्यावर

---

१ खरे, खं. १४, ३ नोव्हें. १८०३, पृ. ७९०८.

जोराचा मारा करून त्यांच्या तोफा बद पाडल्या, तोफाचे बैल मरून पडले. मराठ्यांचा तोफावरील मारा एवढा जबरदस्त होता की त्यांची वाखाणणी जनरल वेलस्लीने केली आहे[1]. तोफा बंद पडल्यावर दौलतराव शिंद्याने इंग्रजी लष्करावर आपल्या स्वारांचा हल्ला केला. त्यामुळे मराठ्यांच्या तोफा बंद पडल्या. कारण तोफा चालू ठेवल्यास आपलेही लष्कर मरेल ही भीती होती. शिंद्यांनी हल्ला केला. त्यावेळी रघुजी भोसले लढाईच्या जागेवरून स्वतः निघून गेला होता. तो स्वतः हजर नसल्यामुळे त्याच्या लष्कराचा जोर कमी पडला. मराठी सैन्याचा मोड झाला. लढाई थांबली. इंग्रजांना मराठ्यांच्या १०० तोफा मिळाल्या. त्याच्यापैकी ७० तोफा उत्कृष्ट असे वेलस्ली म्हणतो[2]. हा जय इंग्रजांना बराच महाग पडला. इंग्रजांच्या लष्करा पैकी $\frac{1}{3}$ सैन्य मारले गेले अगर जखमी झाले. परंतु त्यांना जय मिळाल्यामुळे त्यांचे पुढील काम सोपे झाले.

रघुजी भोसले जसे लढाईच्या सुरवातीसच काही कारण नसता पलायन करून निघून गेले तसेच लढाईस तोंड लागल्यानंतर दौलतराव शिंद्यांनीही त्यांचाच कित्ता गिरविला. ह्या भ्याडपणामुळे फौजेचा हुरुप जाऊन अपयश पदरात आले. ह्या लढाईनंतर शिंद्यांचें मुख्य सैन्य खानदेशातून कासारबारीच्या घाटाने पुण्याकडे रोख धरून निघाले. कॅप्टन स्टिव्हेन्सन याने दिनांक १५-१०-१८०३ रोजी बऱ्हाणपूर शहर फितुरी करून ताब्यात घेतले. २१-१० रोजी शिंद्यांचे ताब्यातील अशीरगडचा बळकट किल्ला फितुरीने ताब्यात घेतला. ही दोन ठिकाणे इंग्रजांच्या ताब्यात आल्यामुळे जणू शिंद्यांचे इंग्रजांनी उत्तरेकडील द्वार अडविले. लगेच इंग्रजांनी सर्व खानदेशभर आपला अंमल बसवून निजामाचा सैन्यातील अधिकारी प्रांतभर नेमून तेथील वसूल घेणे सुरू केले. जनरल वेलस्लीने त्याचप्रमाणे अहमदनगर व औरंगाबादचे आसपासची शिंद्यांची सर्व ठाणी हस्तगत करून तेथे आपला अंमल सुरू केला. असईच्या लढाईने दौलतराव शिंद्यांच्या तोफखाना पलटणीचा एवढा नाश झाला की जनरल वेलस्लीच्या व त्यावेळच्या युद्धधुरीण इंग्रज सेनानींच्या मते शिंद्यांना ही पलटण पुन्हा उभी करता येणे दुरापास्त होते.[3] बऱ्हाणपुर व अशीरगड ही ठिकाणे इंग्रजांचे हातात गेल्याचे समजल्यापासून भोसल्यास मोठीच धास्ती वाटू लागली आणि जनरल वेलस्लीस अडविण्याचे सोडून ते केवळ आपल्या राज्याच्या बचावासाठी परत गेले.

उत्तरेत जनरल लेकने कानपूरपासून शिंद्यांच्या मुलुखावर आक्रमण केले (७ ऑगस्ट १८०३). मोहिमेत अलीगड, दिल्ली, आग्रा ही ठिकाणे त्याने काबिज केली. शिंद्यांकडील जनरल पेरॉन ह्याने फितुर होऊन आपल्या पलटणांसह तो इंग्रजांस मिळाला (३ सप्टेंबर १८०३). त्यामुळे सहा महिनेपर्यन्त शत्रुच्या

१. गरवूड डिसपॅचेस, सप्टेंबर २४, १८०३, पृ. ८६.

२. कित्ता, ऑक्टोबर १३, १८०३, पृ. ९७.

३. मार्टीन, डिसपॅचीस, व्हॉ. ३, २४ ऑक्टोबर. १८०३, पृ. २१६.

त्रासास दाद न देणारा असा अलिगडचा अजिंक्य किल्ला विनासायास इंग्रजांच्या हातात आला. (२५ सप्टेंबर १८०३)[१].

**आग्रा व लासवाडी :**

अलिगडचा किल्ला जनरल लेकने ५-९-१८०३ रोजी ताब्यात घेतल्यावर दिनांक ७ सप्टेंबर रोजी जनरल लेकने दिल्लीच्या रोखाने प्रस्थान केले. दिल्लीत यमुनेच्या काठी शिंद्यांच्या फौजेशी जनरल लेकची खडाजंगी लढाई झाली, त्यात सुमारे तीन हजार लोक मारले गेले. जनरल लेकने यमुनेच्या काठी तळ दिला. त्या अगोदर बादशहाने इंग्रज छत्राखाली येण्याचे कबूल केले होते. यासंबंधीचा गुप्त संदेश गव्हर्नर जनरलने जनरल लेक यास कळविला होता. त्यानुसार दिनांक १४ सप्टेंबर १८०३ रोजी ब्रिटीश फौज यमुना उतरून दिल्लीत आली. शिंद्यांकडील फ्रेंच अंमलदार लढाईचे कैदी म्हणून जनरल लेकच्या स्वाधीन झाले. दिनांक १६ सप्टेंबर रोजी जनरल लेकने बादशहाची भेट घेतली. ऑक्टरलोनी या आपल्या सेनापतीस दिल्लीच्या बंदोबस्तास ठेऊन जनरल लेक २४ सप्टेंबरला आग्र्यावर जाण्यास निघाला. मथुरा, आग्रा हे दोन्ही किल्ले १७ ऑक्टोबरपर्यंत जनरल लेकच्या ताब्यात आले. किल्ल्यातील सर्व सामान दारुगोळा, तोफा, हत्याराचा कारखाना व प्रचंड द्रव्यसंचय जनरल लेकच्या हाती आले[२]. त्यानंतर जनरल लेकने भरतपुरपासून १२ कोसांवरील लासवाडी येथे शिंद्यांच्या फौजेवर कडाडून हल्ला चढविला (१ नोव्हेंबर १८०३). तुंबळ रणकंदन झाले. ह्यात शिंद्याच्या समग्र फौजेचा संहार होऊन यमुना काठाचा संपूर्ण प्रदेश इंग्रजांचे कबजांत आला. लासवाडीच्या पराभवाने शिंद्यांच्या उत्तरेतील सत्तेचा पायाच उखडला गेला. तथापि दक्षिणेत आडगावला एक लढाई झाली. जनरल वेलस्लीने भोसले व शिंदे यांच्या फौजांमध्ये खुबीने फूट पाडून यांच्यावर एकदम हल्ला चढविला व अल्पावकाशातच त्यांजवर संपूर्ण विजय संपादन केला. आडगावच्या लढाईनंतर जनरल वेलस्लीने लगेच गाविलगडावर चाल केली. गाविलगडावर स्टिव्हन्सन यास रवाना केले. त्याने किल्ल्यावर तोफांचा मारा करून किल्ला २५ डिसेंबर रोजी हस्तगत केला. ह्या पूर्वीच भोसल्यानी इंग्रजांशी तह करून युद्धातून आपली सुटका करून घेतली होती[३]. गाविलगडचा वेढा चालू असता रघुजी भोसल्यांचे वकील वेलस्लीकडे जाऊन त्यांनी तहाचे बोलणे लावले. यावेळी जनरल वेलस्ली नागपूरवर हल्ला करण्याच्या इराद्याने चालला होता. तेव्हा पुढील संकट टाळण्यासाठी रघुजीने २३ डिसेंबर रोजी इंग्रजांच्या सर्व अटींना मान्यता लिहून कळविली[४]. त्याप्रमाणे देवगाव येथे डिसेंबर १८०३ मध्ये तह उरकून टाकण्यात आला[५]. त्याची कलमे

१. कित्ता, पृ. २८४.
२. मराठी रियासत उ. वि. ३, पृ. २७५ .
३. अॅचिसन, ट्रिटीज, एंगेजमेंट अन्ड सनद, भा. २, पृ. ५०९.
४. सरदेसाई, कित्ता, पृ. २८४.
५. एचिसन ट्रीटीझ अन्ड सनद, भा. २, पृ. ५०९.

अशी : (१) कटक परगणा व बाळासुरचें बंदर भोसल्यांनी इंग्रजांस द्यावे[१]; (२) पश्चिम वऱ्हाड निजामास द्यावा; (३) इंग्रजांनी हिंदुस्थानातील सर्व सत्ताशी केलेले तह मान्य करावेत; (४) इंग्रजाविरुद्धच्या जुटीत भोसल्यानी सामील होऊ नये आणि (५) इंग्रजांच्या युरोपीय शत्रूस नोकरीस ठेवू नये. ह्या अटी रघूजीनी मान्य करून तहावर सह्या केल्या.

वर सांगितले आहे की, इंग्रजांनी लासवाडीच्या लढाईत शिंद्यांचा पराभव केला. ह्या पराभवाचे मुख्य कारण शिंद्यांकडील लष्करी अधिकारी पेरॉन याची फितुरी. ह्या अधिकाऱ्याने इंग्रजांशी सूत जमविल्यामुळे इंग्रजाना शिंद्यांची ठाणी सरकरणे सोप गेले. शिंद्यांचा लासवाडीस गव्हर्नर लेकने पराभव केला तो झाल्यावर त्याने तावडतोब शिंद्यांच्या सर्व मांडलिकांशी स्वतंत्र तह करून त्यांना इंग्रजांच्या अधिपत्याखाली आणले. इंग्रजांच्या अटी मान्य करून शिंद्याना तह करावा लागला, त्यास सुरजी-अंजनगावचा तह असे म्हणतात. ह्या तहाच्या अटी अशा : (१) गंगा-यमुना यामधील दुआबाचा प्रदेश, जयपूर, जोधपूरचे प्रदेश, यमुनाकाठचा सर्व मुलूख, गोहदचा उत्तरेकडील प्रदेश, भडोच वगैरे उत्तरेतील मुलूख, अहमदनगरचा किल्ला आणि अजिठ्यापासून दक्षिणेपर्यंतचा प्रदेश शिंद्यांनी इंग्रजास द्यावा, (२) दिल्लीच्या बादशहावरील आपला तावा इंग्रजांनी सोडावा, (३) पेशवे, गायकवाड, निजाम व इंग्रजांच्या अधिपत्याखाली आलेले इतर सर्व सत्ताधीश ह्याबाबतचे सर्व हक्क व दावे शिंद्यांनी सोडून द्यावे, (४) इंग्रजांच्या फरेंच आदि करून युरोपीय शत्रूस शिंद्यांनी आपल्या राज्यात ठेवू नये आणि ह्या सगळ्याच्या बदल्यात (५) इंग्रजानी शिंद्यांचे रक्षण करावे. ह्या सर्व अटी दौलतराव शिंदे यांनी मान्य केल्या व तहावर सही केली ह्यामुळे स्वतंत्र शिंदेशाही संपुष्टात आली.

शिंद्यांचा बीमोड केल्यावर इंग्रज होळकरांकडे वळले. साहसी, युद्धनिपुण व महत्त्वाकांक्षी यशवंतराव होळकरांस शक्य तेवढा कमजोर करावा असे गव्हर्नर जनरलास वाटू लागले.[२] इंग्रजानी यशवंतरावाशी सख्य राखून पाठिंबाही दिला होता. परंतु लागलीच त्याना यशवंतरावानें खरा हक्कदार काशीराव याची दौलत बळकावली असल्याची जाणीव झाली.[३] इ. स. १८०४ मध्ये होळकरावर जेव्हा इंग्रजाविरुद्ध लढाईचा प्रसंग ठाकला तेव्हा त्याने प्रशंसनीय शौर्याने व चिवटपणाने त्यास तोंड दिले. एवढेच नसून सिंदिया व अन्य मराठ्यांस आपल्या-बरोबर इंग्रजाविरुद्ध लढण्यासाठी संघटीत करण्याचा प्रयत्न केला.[४] यास फार उशीर झाला होता. इंग्रजाविरुद्ध लढ्यात त्याचा चिवटपणा, शौर्य, मुत्सद्देगिरी प्रकट झाली परंतु त्यामुळे मराठ्यांचा हेतु साध्य झाला नाही, त्याचा शिंद्याविषयी द्वेष व राजकीय अज्ञानामुळे त्यांचे सहकार्याविना लष्करी स्थिती व राजकीय परिस्थिती बदलण्याची संधी कायमची दुरावली गेली.

१. हे ओरिसातील प्रदेश इ. स. १७५२ पासुन नागपूरकर भोसल्यांच्या ताब्यात होत.
२. सरदेसाई, म. रि. उत्तर विभाग-३ पृ. २९८–९९.
३. कित्ता.
४. खरे, भा १४ पृ. ७९८९.

मराठ्यांच्या या सर्व उणीवा जरी मान्य केल्या तरी यांच्या नाशास शिंद्यांकडील युरोपियन अधिकाऱ्यांची फितुरी जास्त कारणीभूत ठरली असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. शिंद्यांचा तोफखाना व पायदळ अगदी कार्यक्षम होते असे वेलस्लीनें मान्य केले आहे. त्याने आपला भाऊ हेन्री वेलस्ली यास लिहीले की शिंद्यांचे पायदळ टिपूपेक्षा भक्कम होते, तोफखाना फारच उत्तम होता. त्याचप्रमाणे त्याचा शस्त्रसंभार इतका चांगला व विपुल होता व तो इंग्रजांचे तोडीचा होता.[१] शिंद्यांच्या लष्कराची शिस्त, घडण व शस्त्रास्त्रे याची जनरल लेकने प्रशंसा केलेली आहे. तो गव्हर्नर जनरलला लिहितो की "त्यांचे लष्करात आमच्यापेक्षा चांगली भरती केलेली आहे. कोणत्याही खर्चात काटकसर केलेली नाही. त्यांचेकडे एका बंदुकीस तिपटीएवढे मनुष्यबळ आहे. आमच्याकडे असलेल्या बैलापेक्षा त्यांच्याकडील बैलांची संख्या अधिक असून ते श्रेष्ठ दर्जाचे आहेत. तसेच तो कबूल करतो की लासवाडीच्या युद्धात शिंद्यांच्या शिपायानी फारच मर्दुमकी गाजविली. त्याच्या लष्कराचे नेतृत्व जर फ्रेंच अधिकाऱ्यांकडे असते तर लासवाडीच्या लढाईचा निकाल वेगळा लागला असता.[२] मोठ्या प्रमाणावर फितुरी झाली. इतकेच नव्हे तर ती एवढ्या वेगानं झाली की ४ ऑक्टोबर १८०३ नंतर एकही फ्रेंच अधिकारी शिंद्यांच्या पदरी राहिला नाही.[3] एवढ्या मोठ्या प्रमाणात झालेल्या फितुरीने पायदळाची स्थिती नेतृत्वहीन व गोंधळलेली झाली[४]. या फितुरीमुळे मराठा लष्कराचे नितीधैर्य फार खच्ची झाले. परिणामी शिंद्यांचे मजबूत व शस्त्रयुक्त किल्ले इंग्रजांना घेण्यास कित्येक महिने लागले ते काही दिवसात पडले व त्यातील काही बंदुकीचा आवाज न करता मिळाले[५]. गव्हर्नर जनरलचे पेरॉनच्या फितुरीबाबत असे मत बनले की त्यानें युद्धातून निवृत्ती पत्करल्याने इंग्रजांच्या शस्त्रास विजय मिळणे शक्य झाले व त्यांची हिंदुस्थानातील सत्ता दृढ झाली. हा मिळालेला विजय इंग्रजांचे अपेक्षेबाहेर होता[६].

हे युद्ध इंग्रजाना खरोखर फायदेशीर ठरले. दौलतरावाची शक्ती व साधनसामुग्री कमी झाली. फ्रेंचांचा तर एवढा बीमोड झाला की त्याना परत डोके वर काढता येणे अशक्य झालेच व पेरॉनकडे असलेला सर्व मुलुख दोआबसह इंग्रजांनी आपल्या मुलुखास जोडला. मोगल सम्राट शाह आलमसुद्धा इंग्रजांचे नियंत्रणाखाली आला. यमुना तीरावरील लहान लहान राज्ये इंग्रजांचे वर्चस्वाखाली आली. गोहाद येथे ठेवलेल्या तैनाती फौजेमुळे वायव्य सरहद्दीचे शत्रूपासून रक्षण करण्यास मोलाची मदत झाली. भडोच घेतल्याने शिंद्यांचा

१ Basu RCP 463, quoting the Governor Generals despatch, October, 3, 1803

२. मार्टिन डिसपॅचेस, भा. ३ पृ. ४४५.

३. कित्ता, पृ. ३९०.

४. मॅलिसन, धी डिसायसिव्ह बॅटल्स, पृ. २६४.

५. खरे भा. १४ पृ. ७८२८,

६. Basu RCP P. 497

समुद्राशी असलेला संपर्क तुटला गेला तर गुजरात व कटकमधील प्रदेश घेतल्याने इंग्रजांचे महसुलात लक्षणीय वाढ झाली[१].

शिंदे व भोसल्याविरुद्ध इंग्रजाचे अविश्रांत युद्धामुळे पेशव्यांची स्थिती फार विकट झाली. त्यानी इंग्रजांचे पुण्यावरील लक्ष टाळण्यासाठी अमृतरावा-तर्फे तह केला. मात्र हा तह लवकरात लवकर मोडता येईल असा निर्णयही पक्का केला. म्हणूनच त्याने तहावरील शाई वाळण्यापूर्वीच बाळाजी कुंजर, नारायणराव वैद्य व निंबाजी भास्कर याना वरील तहाची माहिती देण्याकरिता शिंदे व भोसले यांचे दरबारी पाठविले. प्रत्यक्षात त्यानी पुण्यास यावे असा हेतू होता. [२]त्याने पुण्याला येताक्षणी वरील दोघाना पुण्यास येण्याबाबत पत्रे रवाना केली.[३] शिंदे, भोसले यांच्या संयुक्त प्रयत्नाने इंग्रजाना पुण्यापासून दूर हाकलण्यास फार मदत होईल असे त्यास वाटत होते.

होळकरांच्या भीतीमुळे पेशव्याना इंग्रजांशी तह करणे भाग पडले. या तहातील अटीप्रमाणे इंग्रजांना पेशव्यांच्या प्रदेशाचे रक्षण करण्याचे हक्क प्राप्त झाले. तसेच बंडखोराना जेरीस आणण्याचे अधिकार मिळाले. खरे पाहाता इंग्रजांचा धोका होळकरामुळे उत्पन्न झाला. पेशव्याला इंग्रजांबद्दल एवढा अविश्वास होता की त्याचे पाठिराखे व मित्र यांचे विरुद्ध शस्त्र परजण्यास स्वप्नातही वेळ घालवला नसता. त्यानी होळकर, जो पेशव्यांच्या अधिकारास आव्हान देतो, त्यास मोकाट सोडून निजाम, पेशवे व शिंद्यांच्या प्रदेशाची लूट करावयास लावले.[४] इंग्रजानी तहाची कलमे मोडल्याचे पाहून पेशव्यास मोठा धक्का बसला.

इंग्रजांचे होळकर व अमृतराव याजबरोबरचे संबंध वरील तहास बाध आणणारा दुसरा धक्कादायक अनुभव होय. १८०२ मध्ये मराठ्यांवर कोसळलेल्या अरिष्टाचे हे दोन्ही सरदार जनक ठरून पेशव्यांचे शत्रू ठरले. त्यांनी पेशव्याविरुद्ध कट करून त्यांचेवर शस्त्रे परजली. बंडखोराना शिक्षा करण्या-ऐवजी इंग्रजानी पेशव्यांच्या नकळत त्यांचेशी सूत जमविले. त्यानी होळकराचे मन वळवून अमृतरावास पेशव्यातर्फे ८ लाखांची जहागीर देऊन वश करून घेतले. सहाजिकच इंग्रजांचा कल पेशव्यांच्या शत्रूशी सलोखा राखणे तर मित्रांना चिरडून टाकण्याकडे होता असे दिसून येते. इंग्रजानी जेव्हा पेशव्यांकडे अमृतरावास द्यावयाच्या ८ लाखाच्या जामिनासाठी काही मुलखावरील हक्क सोडण्यास सांगितले त्यावेळी पेशव्याना आलेल्या भयंकर संकटाची कल्पना येते. सहाजिकच अगदी सुरवातीपासून इंग्रजांचे धोरण त्यांच्यामध्ये शत्रुत्व व तेढ वाढण्यास कारणीभूत ठरले.[५]

---

१. Mill, Vol. VI, P. 315.

२. पेशवाईची अखेर, पृ. १२१.

३. Mill, VI, P. 298.

४. Basu, Rise of Cristian Power in India, P. 412.

५. Gurwood Despatch, sept. 28 1803, P. 91.

इंग्रजांनी तहाच्या अटी स्वतः धुडकावल्या, इतकेच नव्हे तर पेशव्यांशी वैर पत्करून तहाच्या शर्तीप्रमाणे त्यानी इंग्रजास १०,००० सैन्य पुरवावे या मागणीचा आग्रह धरला[१]. पेशव्यांचे आर्थिक व लष्करी दुरवस्थेमुळे त्याना ही मागणी मान्य करणे अशक्यच होते. इंग्रजांच्या दबावामुळे पेशव्यानी वेलस्लीस पुण्यामध्ये साथ दिलेल्या पटवर्धन, विंचूरकर व रास्ते याना सैन्य भरतीचे आदेश दिले व मराठा सरदाराना गुप्त पत्रे पाठवून इंग्रजांचे बाजूने युद्धात सामील होऊ नये असेही कळविले[२]. पेशवे आप्पासाहेब पटवर्धनास सांगतात की त्यानी तहावर नाखुशीने सही केली. खरे तर त्याना इंग्रजांचे जोखड शिंदे व भोसले यांचे मदतीने झुगारून द्यावयाचे होते. म्हणून कोणत्याही परिस्थितीत पटवर्धनानी इंग्रजास मदत करू नये[३].

पेशव्यांनी युद्धामध्ये इंग्रजास सहाय्य केले नाहीच उलट मराठा सरदारांना हर प्रकारे मदत करून इंग्रजांचा मार्ग शक्य तेवढा कठीण करण्याचे जोरदार प्रयत्न केले[४]. तो त्यांचेशी संपर्क साधून इंग्रजाविरुद्ध त्याना उत्तेजन देत होता[५] व त्याने इग्रजांची रसद पूर्णपणे थांबवली[५]. परिणामी युद्धाचे प्रारंभी सैन्यासाठी दाणागोटा मिळविणे फार कठीण गेले. वेलस्ली कळवितो की देशात धान्य भरपूर आहे. इंग्रज त्याची किंमत मोजूनही लोक धान्य विक्रीस काढत नाहीत, यामागे पेशवे सरकारचा हात असल्याचा त्यास दाट संशय येतो. त्याची अशी तक्रार होती की इंग्रजांच्या मागण्यासंबंधात पेशव्यांचे कारभारी आश्वासनाची खैरात करतात परंतु त्याची पूर्तता क्वचितच करत असत[६].

लष्करी व राजकीय दृष्टचा या काळात पेशव्यांची अशी स्थिती होती की, इंग्रजाना थोडासुद्धा विरोध दर्शविणे अशक्य होते. त्यांच्या असहायतेमुळे राग व द्वेष भावना बळावून हृदय फुटून निघाले तरीही त्याला बाहेरून मित्रत्व, प्रेमळपणा व कृतज्ञता यांचा देखावा करून त्याच्या शक्तीने जेवढा इंग्रजांना विरोध करता येईल तेवढा भल्याबुऱ्या मार्गाने करणे एवढाच पर्याय त्याच्याकडे शिल्लक होता[७].

अशा तऱ्हेने अगदी सुरवातीपासून पेशव्यानी सदिच्छा व जिव्हाळ्याचा देखावा केल्याने त्याच्या वृतीचा खराखुरा अंदाज जनरल वेलस्लीस लागला नाही. मे १८०३ मध्ये पेशव्यास पुनर्स्थापित केल्यावर वेलस्लीस त्याची चपलता व सामर्थ्य दिसून आलेच; त्याचबरोबर तो आपले नुकसान सोसून तहाच्या शर्तीचे पालनही करीत नव्हता. जूनच्या प्रारंभी जेव्हा त्याने शिंदे व भोसले यांचे-

१. खरे, भा. १४, पृ. ७६७९.
२. चोकसी, हिस्टरी ऑफ ब्रिटीश डिप्लोमसी, पृ. ३२६.
३. खरे, कित्ता, पृ. ७६८२.
४. Kaye, Vol I p, 227,
५. कित्ता.
६. खरे, भा. १४, पृ. ७६७०.
७. कित्ता, पृ. ७६७८.

विरुद्ध स्वारी करण्यासाठी पुणे सोडले तेव्हा त्यास पेशव्यांचे सहाय्य मिळाले नाही. पेशवे त्याचेशी मुद्दाम वैर धरून आहेत असे वाटले नाही. परंतु ८ जूनपर्यन्त त्यास पेशवे खरेच असमर्थ असल्याचा त्याचा संशय दुरावला कारण मराठा सैन्यास कोणीतरी इंग्रजास मदत करण्यापासून परावृत्त करीत असल्याचे कटू सत्य उघडकीस आले. तद्नंतर त्याला दाणागोटा मिळविण्याच्या कामी फार कष्ट पडायला लागले तेव्हा तो म्हणतो शत्रु प्रदेशात त्याची स्थिती फारच वाईट होती. पेशवे इंग्रजांचे दोस्तीबाबत उदासीन असल्याने त्यांच्या सैन्याच्या धान्य पुरवठयात व्यत्यय निर्माण करतात असे अनुमान त्याने काढले. पेशवा अशा प्रकारे कारभार हाकतो की त्याला आपल्यापेक्षा शत्रूपक्षाकडील दरबारात काय घडामोडी चालल्या आहेत याची अधिक माहिती असते अशी वेलस्लीची जोरदार तक्रार होती. याकरिता त्याने कर्नल क्लोजला पेशव्यांचे सचिव व इतर कारभाऱ्यांना लाच देण्यास फर्माविले[१]. पेशव्यांचे वैरभाव वृत्तीवर टीका करताना वेलस्ली क्लोजला म्हणतो की त्याने कंपनीबरोबर केलेल्या तहाचे विरुद्ध वर्तन करण्यापेक्षा त्याने केलेल्या वृत्तीने आमचे नुकसान झाले[२].

● ● ●

१. Gurwood Despatch, October 23, 1803, P. 99.

२. कित्ता, ९ नोव्हें. १८०३.

# होळकरांशी इंग्रजांची झोंबाझोंबी

## कालसूची

| | |
|---|---|
| १७९७, सप्टेंबर १४ . . | मल्हारराव होळकर, शिंदे सरदार, मुजफरखान यांजकडून मारले जातात. |
| १८०३, डिसेंबर अखेर . | होळकर जयपुरावर गेले. |
| १८०४, फेब्रुवारी २७ . | शिंदे यांजबरोबर इंग्रजांचा तैनाती फौजेचा तह. |
| १८०४, मे . . . | होळकरांचे इंग्रजांशी युद्ध सुरू. |
| १८०४, जुलै ७ . . | यशवंतरावांची मंदसोर येथे इंग्रजी पलटणांवर चाल. |
| १८०४, ऑगस्ट २४ . . | होळकरांच्या फौजेची इंग्रजांशी बनारस नदीवर गाठ. |
| १८०४, ऑक्टोबर ८ . . | यशवंतराव दिल्लीच्या तटबंदीखाली. |
| १८०४, ऑक्टोबर १४ . | यशवंतराव सर्व फौजेनिशी दिल्लीवर हल्ला चढवितात. |
| १८०४, ऑक्टोबर . . नोव्हेंबर . . . . | यशवंतरावांची दुआबात स्वारी. |
| १८०४, नोव्हेंबर १ . . | जनरल लेक फौजेसह यशवंतराव होळकरांच्या पाठीशी दुआबात. |
| १८०४, नोव्हेंबर १३ . . | डिग किल्ल्यावर इंग्रज फौज चालून जाते |
| १८०४, नोव्हेंबर १६ . . | जनरल लेक फरूकाबाद शहरांत पोचतो. |
| १८०४, डिसेंबर १३ . . | पासून इंग्रजांचे डिग किल्ल्यावर सारखे हल्ले |
| १८०४, डिसेंबर २४ . . | डिग किल्ला इंग्रज जिंकून घेतात |
| १८०५, जानेवारी ७ . . | इंग्रजांशी जाट राजाची लढाई. |
| १८०५, फेब्रुवारी १४ . | यशवंतराव रोहिलखंडात घुसतात. |
| १८०५, एप्रिल १० . . | जाटराजाचा इंग्रजाशी समेट. |
| १८०५, एप्रिल . . | यशवंतराव व शिंदे यांची संबळगडावर भेट. |
| १८०५, मे . . . | यशवंतराव संबळगड सोडून पुष्कर, अजमेर येथे येतात. |
| १८०५, ऑगस्ट २५ . . | यशवंतराव रेवाडीहून राजस्थानात निघतात. |
| १८०५, ऑक्टोबर . . | जनरल लेक मथुरेहून यशवंतरावांच्या पाठीवर जाण्यास निघतो. |
| १८०५, नोव्हेंबर १३ . . | यशवंतराव फौजेसह सतलज नदी उतरतात. |
| १८०५, डिसेंबर २४ . . | यशवंतराव होळकर इंग्रजांशी तह करतात. |
| १८०६, जून . . . | यशवंतरावांचे शिखांशी समेटाचे बोलणे चालू. |
| १८०६, अखेर . . . | जयपूर जोधपूरकरांचे युद्ध जुंपले असता त्यांत यशवंतराव समेट घडवून आणतात. |

| | |
|---|---|
| १८०७ . . . | यशवंतराव तोफा ओतविण्याचा कारखाना सुरू करतात. |
| १८०७, फेब्रुवारी १४ . | खंडेराव होळकरांचे देहावसान. |
| १८०७, एप्रिल-मे . . | यशवंतराव होळकर कोटयाच्या भागात. |
| १८०७, जुलै ६ . . . | यशवंतराव माजपूर येथे फौजेची समजाविशी करतात. |
| १८०७, ऑगस्ट १५ . | यशवंतराव तोफांच्या साच्याकरिता पांच खंडी मेण मागवितात. |
| १८०८, एप्रिल . . | काशीराव होळकर, त्यांची पत्नी लक्ष्मीबाई व खंडेराव यांच्या छत्री बांधण्याचा हुकूम. |
| १८०८, ऑक्टोबर ८ . . | देवाची आरती करत असता यशवंतरावांची प्रकृती बेसावध झाली. |
| १८०९ अखेरीस . . | यशवंतरावांचे दुखणे वाढते. |
| १८१० सुरवातीस . . | धर्माकुंवरच्या शिरजोराने यशवंतरावांवर दुर्धर प्रसंग. |
| १८११, ऑक्टोबर २७ . | भोजपुरा येथे यशवंतरावांचे प्राणोत्क्रमण. |

## २५

## होळकरांशी इंग्रजांची झोंबाझोंबी

मराठी साम्राज्याचे घटक शिंदे व नागपूरकर भोसले हे इंग्रजांशी लढत असता यशवंतराव होळकर आपल्या राज्यात जाऊन राहिले. इंग्रजांनी दोन्ही मराठे सरदारांचा पराभव करून आपणास हव्या तशा अटींचा तह त्यांजकडून करून घेतला. हे युद्ध चालू असेपर्यन्त इंग्रज होळकरांच्या वाटेस गेले नाहीत. दिनांक २७ फेब्रुवारी १८०४ ला शिंद्यांबरोबर इग्रजांचा तैनाती फौजेचा तह झाला आणि जनरल. वेलस्ली होळकरांच्या हालचालीकडे जास्त लक्ष पुरवू लागला. होळकर डिसेंबर १८०३ च्या अखेरीस जयपुरावर गेले. जयपूरच्या राजाने यापूर्वीच इंग्रजांचा आश्रय केला होता. तरी होळकरांचा तेथून वार्षिक वर्गणी गोळा करण्याचा हक्क होताच तो होळकरांनी बजावला. त्याच सुमारास होळकरांनी नागपूरकर भोसले याजकडे इंग्रजांविरुद्ध संधान बांधण्यासाठी वकील पाठविला. अजमीरचे सुमारास जाऊन जोधपूरकरांचे संधान पक्के करून इंग्रजांविरुद्ध लढण्यासाठी जोधपूरकरांची फौज आपल्या फौजेत सामील करून घेतली. होळकरांच्या ह्या हालचाली जनरल लेकने टिपून गव्हर्नर जनरलला कळविल्या व मार्गदर्शनाची इच्छा दर्शविली. गव्हर्नर जनरलकडून लिहून आले की, "यशवंतरावास तुम्ही एकदा निक्षून कळवा की, तुमच्या वाटेस जाण्याची आमची इच्छा नाही. मात्र तुम्ही आमची अगर आमच्याशी तहाने बद्ध झालेल्या रजवाडयांची कुरापत काढल्यास ती आम्ही सहन करणार नाही." त्याप्रमाणे लेकने दिनांक २९ जानेवारी १८०४ रोजी एक पत्र यशवंतरावास लिहिले व त्यास कळविले की, तुम्हास आमचेशी सलूख राखावयाचा असेल तर युद्धाची तयारी न करता आपला वकील आमचेकडे पाठवा.[१]

होळकरांचा कारभारी विठ्ठल महादेवही अशा समेटास अनुकूल होता. होळकरानी इंग्रजांच्या वरील पत्रास उत्तर देऊन समेटाच्या बोलण्यासाठी आपले दोन वकील लॉर्ड लेककडे पाठविले. त्याच सुमारास होळकरांनी इंग्रजांविरुद्ध उठाव करण्याची पत्रे राजेरजवाडयांस लिहिली, ती इंग्रजांचे हाती लागली. त्यावरून होळकरांचे अंतरंग इंग्रजांस समजले. होळकरांच्या वकिलानी समेटासाठी इंग्रजांस मागण्या कळविल्या त्या अशा : (१) रजवाडयांकडून

१. म. रि., उत्तर विभाग, भा. ३, पृ. २९७-९८.

चौथाई वसूल करण्याचा चालत आलेला आपला हक्क इंग्रजानी मान्य करावा ; (२) दुआबांत बारा परगणे, बुंदेलखंडात एक परगणा, तसेच इटावा आणि हर्याना हे परगणे आमचे आहेत ते आमच्याकडे चालवावेत ; (३) शिंद्यांशी ज्या अटीवर तह झाला आहे, तशाच अटींवर आमच्याशी तह करावा. ह्या अटी लेकने धुडकावल्या आणि इंग्रजांस मान्य होतील अशाच अटींवर आमच्याशी तह करावा असे कळविले. होळकरांस राग येऊन त्यानी धमकावणीवजा पत्र इंग्रजास लिहिले "आमच्या फौजा समुद्राच्या लाटांसारख्या संबंध देश व्यापतील आणि शेकडो मैलांच्या दौडी मारून अल्पावकाशात दूरदूरचे प्रदेश जाळून लुटून टाकतील, तुम्हांस एका क्षणाची विश्रांती मी घेऊ देणार नाही.' या दांडगाईच्या उत्तराने इंग्रजांना होळकरांशी युद्ध अपरिहार्य वाटले. "लेकने युद्धाची तयारी चालविली. होळकरांनी जय्यत तयारी करून ते शिंद्यांच्या मुलखांत लुटालूट करण्यास गेले तसेच शिंद्यांकडे ब-हाणपूरला वकील पाठवून विनंती केली की, इंग्रजांचा पाडाव करण्यासाठी तुम्ही आम्हास सामील व्हावे." शिंद्यांचा वकील, होळकरांनी शिंद्याच्या मुलखात धुमाकूळ घालणे सोडून द्यावे हे सांगण्यासाठी होळकरांकडे आला. त्यास होळकरांनी सांगितले की, शिंद्यांचे नुकसान करण्याचा माझा इरादा नाही, इंग्रजांचा पाडाव करणे हाच मुख्य हेतू आहे. त्याप्रमाणे यशवंतरावानी जयपूरकरांकडून पंचवीस लाख रुपये खंडणी वसूल करून सव्वा लाख फौजेसह कोटचास दाखल झाले. मारवाडात आपली फौज ठेविली. मीरखान पठाणास वीस हजार फौज देऊन अजमेर प्रांती ठेविला. होळकरांकडे शिंद्यांकडील कमी केलेली फौज चाकरीस राहिली हे लक्षात घेऊन जनरल लेकने होळकरांशी दिनांक १६ एप्रिल १८०४ रोजी युद्ध पुकारले. तेव्हा दौलतराव शिंदे ब-हाणपुरास होते त्यांस इग्रजांनी अभय दिले. इंग्रजांनी होळकरांशी युद्ध पुकारल्यावर होळकरांच्या सेवेत जे व्हिकटर्स, डॉड व ऱ्यान असे तीन युरोपियन अंमलदार होते त्यानी इंग्रजी जाहिरनाम्याचा फायदा घेऊन इंग्रजांशी लढण्याचे नाकारले, तेव्हा यशवंतरावाने त्यांचा शिरच्छेद करून त्यांची डोकी कापून लोकांस दहशत बसविण्याकरिता ती भाल्यावरून फिरविली. शिवाय यापूर्वीच दिल्लीच्या बादशहाकडे संधान बांधून त्यांजकडून "महाराजाधिराज, राजराजेश्वर आणि अलिजाबहाद्दर" अशी पदवी मिळविली. त्यावरून बादशहाचा कबजा होळकर घेणार अशी इंग्रजांस भीति पडली. इंग्रजांनी होळकरांच्या गादीवर यशवंतरावांचा हक्क नाही असे त्यांस कळविल्यावर अतिशय चिडून जाऊन ते उघडपणे इंग्रजांविरुद्ध लहान मोठचा राजांस उठवू लागले. बुंदेले, जाट, शीख इत्यादिकांस त्यानी उठावणीची पत्रे लिहिली, काबूलच्या दुराणी शहासही अशीच पत्रे लिहून त्यास पंजाबवर स्वारी करण्याची फूस दिली. यामुळे इंग्रजांचे होळकरांशी युद्ध मे १८०४ मध्ये सुरू झाले.

१ वेलस्ली डिसपॅचेस, व्हॉ. ४, पृ. ५-५२, १०७.

पहिल्याच पावसाळ्यांत मुकुंदरा खिंडीत कर्नल मॉन्सनला यशवंतरावांनी कोंडून धरिले. यशवंतरावांच्या गनिमी युद्ध काव्यापुढे मॉन्सनने हात टेकले. होळकरांनी मॉन्सनचा दोन महिने आग्र्यापावेतो पाठलाग केला, त्यास क्षणाचीही फुरसद मिळू दिली नाही. ह्या संबंधींचे वर्णन होळकर कैफियतीत दिलेले व्यवस्थित व मार्मिक आहे, ते असे, "यशवंतराव होळकर सडी स्वारी ज्येष्ठ अखेर मंदसोरास आले. तेथे एक महिना मुक्काम केला. इंग्रजांची पलटणें कोटेवाल्याची फौज व बापू सिंदे बरोबर घेऊन मुकुंदऱ्याचे मार्गानें उतरून रामपुरा व हिंगलगडाखाली वगैरे जप्ती बसवून गरोठेनजीक आले. हे वर्तमान मंदसोर मुक्कामी यशवंतरावास समजतांच तेथे लोकांची दीलभरी करून ज्येष्ठ वद्य ३० च्या दिवशी (७ जुलै १८०४) पलटणावर चाल केली. अंतूरचे घाटे चर्मण्वती उतरून सडा घोडा राऊत ऐंशीं हजार हलवून अग्नीचा कल्लोळ असा येऊन गरोठेहून दोन कोसांवर मुक्काम केला. लढाई फार मातब्बर झाली. फिरंगी हरुन मुकुंदऱ्याचे मार्गे निघाला. कोटेवाल्याची माणसें फार करून कामास येऊन सरदार धरला. एक फिरंगी खासा (Lucan) मुकत्यार हत्तीवर मारला. वरकड, तोफा, डेरे जेथील तेथे टाकून सडे जीव घेऊन निघाले. कोटेवाल्यांनी फिरंग्यांस नावा देऊन नदीपार करून दिली. तो मागाहून यशवंतरावाची सडी स्वारी कोटचास दाखल झाली. फिरंग्यांस सामील झाल्यामुळे कोटेवाल्यांवर त्यांचा दांत. तो अन्याय तूर्त पदरी घालून कांही पैका घेऊन चर्मण्वती उतरले. तों बाजीराव बापूजी इंद्रगडीं होते. लाखेरीचे डोंगराचे माहितगार. त्यांनी भिल्ल जमा करून जागजागी नाकीं बांधून फौज फार करून लुटली. टोप्या, अंगरखे व बंदुका गाडचावर घालून आणले. पुढे फिरंग्यांशी गांठ बनास नदीवर श्रावण वद्य ४ स (तारीख २४ ऑगस्ट १८०४) घालून तेथेही झटपट बरीच केली. माणसें किती मारिली, किती नदीत उडचा टाकून गेले, त्यांजवर घोडे पाण्यांत घालून मारिले. त्या लढाईत सरशी फिरंग्यांचीच होती. इकडील कंपूचा मालक माकणसिंग मारला जाऊन तोफा त्यांनी घेतल्या होत्या. परंतु, महाराज (यशवंतराव) भाग्यवान. जातीनें तोफेवर येऊन आपण तोफा चालवून शेंकडो माणसें मारली. याप्रमाणे लढाई फत्ते करून पिच्छावर चालले. नदीस पाणी यामुळे तोफखाना उतरूं पावला नाहीं. सडा घोडा उतरून कंपू मागे टाकले. तोफा पलटणास सावरून फावतां किल्ले खुशालगडात शिरले. त्यांचे मुकाबल्यास होळकराकडील चिमणाजी कृष्ण यांचें पथक होते. त्यावर ताशेरा देऊन बाहेर पडले ते आग्र्याचे मार्गे गेले. महाराजांची स्वारी श्रावण वद्य ९ स फत्तेपुर शिक्रीस दाखल झाली."[१]

### यशवंतरावांची दुआबात स्वारी (ऑक्टोबर-नोव्हेंबर १८०४) :

फत्तेपुराहून कूच करून यशवंतराव मथुरेस गेले. तेथे इंग्रजांचा सरंजाम होता, तो निघून परत आग्र्यास आला व मथुरेस पोंचल्यावर महाराज

१ म. रि., उत्तर वि. ३, पृ. ३१२, होळकर कैफियत.

दिनांक ८ ऑक्टोबरला दिल्लीच्या तटबंदीखाली आले. यावेळी दिल्लीचा नामधारी बादशहा इंग्रजांचे अंकित होता. बादशहाच्या नावाचे बळ आपल्या सत्तेस जोडणे हा हेतू होता. "आपण बादशहाचे सेवक" अशा अर्थाचा नवा शिक्का यशवंतरावानी पाडला व उपयोगात आणला तो बादशहासंबंधीचा लोकादर आपल्याकडे वळावा या हेतूचा होता. दिल्लीत इंग्रजांची फौज थोडी असल्याने, दिल्ली काबीज करून बादशहास ताब्यात घेता आल्यास इंग्रजांवर कडी होईल, अशी महाराजांना आशा वाटत होती. परंतु, दिल्लीचा पाडाव करावयास यशवंतरावांना पुरेशी सवड मिळाली नाही. दिल्लीवर यशवंतरावानीं बरेच लहान मोठे हल्ले करून पाहिले. दिनांक १४ ऑक्टोबरला सर्व फौजेनिशी मोठा हल्ला चढविला. हे सारे हल्ले वाया गेले आणि नवे हल्ले करावे तर इंग्रज सेनापती लांब लांब मजला मारून दिल्ली-नजीक आल्याची खबर यशवंतरावांच्या कानी आली. तेव्हा त्यांनी दिल्लीचा नाद सोडला. ते यमुना ओलांडून दुआबांत घुसले.

दुआब हा समृद्ध प्रदेश. तो लुटला जाऊ नये म्हणून सेनापती लेक दिनांक १ नोव्हेंबरला अतिशय लगबगीने मोठी फौज घेऊन यशवंतरावांच्या पाठलागास निघाला. यशवंतरावांनी दिनांक १८ ऑक्टोबरनंतर दिल्ली सोडली. त्याच दिवशी लेक तेथे पोचला. बारा तेरा दिवस तो दिल्लीस राहिला. यशवंतरावानी दुआबांत चाल करून फरुक्काबाद शहरास ते भिडले, अशा प्रकारची संशयातीत बातमी लेकला लागताच जनरल लेकने दिल्ली सोडली आणि लांब मजला करीत तो सदर शहरी दिनांक १६ नोव्हेंबरला आला. १७ च्या पहाटेस त्याने महाराजांच्या तळावर हल्ला केला. यशवंतराव सावध होते ते अत्यंत चपळतेने निसटले. महाराज सहीसलामत निघून गेले याचे जनरल लेकला अतिशय वाईट वाटले.

यशवंतराव मॉन्सनचे लचके तोडत असताना त्यानी भरतपूरच्या राजाशी स्नेह केला. भरतपूर जाट राण्याने महाराजांस इंग्रजांविरुद्ध सहाय्य देऊ केले म्हणून महाराजानी दिल्लीस जाताना आपली फार मोठी फौज भरतपूर राज्यातील डीगच्या किल्ल्याच्या आश्रयास ठेविली होती. मॉन्सनला हे दिल्लीस असता समजले तेव्हा ह्या फौजेचा नाश करण्यासाठी इंग्रज फौज दिनांक १३ नोव्हेंबर रोजी डीगवर चालून गेली व जोराचा हल्ला करून मॉन्सनने किल्ल्याबाहेरील महाराजांची फौज बुडविली. पण तटबंदीच्या आत दुसरी फौज होती व तिच्या तटबंदीचा घेर काबीज केल्याशिवाय डीगच्या लढाईचा निकाल लागणारा नव्हता. यासाठी इंग्रजांनी तट फोडणाऱ्या मोठ्या तोफा आग्र्‍यानहू आणविल्या आणि १३ डिसेंबरपासून दहा बारा दिवस तटावरील वेगवेगळ्या भागांवर सारखे हल्ले चढविले तेव्हा डिसेंबर २४ रोजी रात्री किल्ला इंग्रजांचे हाती पडला. दिनांक २५ रोजी पहातात तो किल्ला रिकामा. २५ वी तारीख उजाडण्यापूर्वीच किल्ल्यांतील सर्वजण शत्रूला कळू न देतां किल्ल्याबाहेर निघून गेले होते.

उत्तरेत यशवंतरावांशी युद्ध सुरू होताच होळकरांचा दक्षिणेतील सगळा मुलूख इंग्रजानें दाबला. महाराजांनी त्याची पर्वा न करता ते तळहाती शिर घेऊन स्वराज्यासाठी, स्वधर्मासाठी इंग्रजांसारख्या बलाढ्य शत्रूशी एकाकी लढत होते.

लढाई चालू असता यशवंतरावांशी समेट करावा म्हणून शिंद्यांतर्फे व इतर मुत्सद्यांतर्फे इंग्रजांनी प्रयत्न केले, पण ते निष्फळ ठरले.

डीग हे ठिकाण इंग्रजांनी जिंकल्यावर यशवंतरावांचे व भरतपूरच्या राजाचे संयुक्त सैन्य भरतपूर किल्ल्याच्या आश्रयास गेले. भरतपूरच्या जाट राजास यशवंतरावांच्या शौर्य, साहसाचे कौतुक वाटत होते व या वीराच्या शौर्य, साहसास प्रोत्साहन देणे योग्य असें वाटून त्यानें यशवंतरावांस द्रव्याची व सैन्याची मदत केली. तेव्हा यशवंतरावांचा पराभव करून भरतपूरच्या राजाच्या डोळ्यांत अंजन घालण्यासाठी इंग्रज सैन्य भरतपुरावर चालून गेले (७ जानेवारी १८०५).

भरतपूरचा किल्ला हे एक विशाल बांधकाम आहे. हा किल्ला भरतपूर शहरापासून वेगळा नाही. सारे शहर हे सभोवतालच्या तटामुळे किल्ला बनले आहे. तट अतिशय रुंद व उंच आहे. त्याच्या भोवती चांगला खोल आणि रुंद खंदक असल्यामुळे तो अजिंक्यच समजला जाई. किल्ल्याची भिंत चिखलाने उभारली असून ती भिजवली की, तोफेचे गोळे तिच्यात रुतून बसत.

सन १८०५ च्या जानेवारी फेब्रुवारीत एकंदर चार वेळा नवे नवे डावपेच अंमलात आणून इंग्रजांनी भरतपूरच्या किल्ल्यावर निकराचे हल्ले चढविले. दोन महिने किल्ला यशस्वी लढविल्यावर भरतपूरच्या राजाने इंग्रजांच्या दबावामुळे कच खाल्ली व त्याने यशवंतरावांना सोडचिठ्ठी दिली. ह्या दोन महिन्यात यशवंतराव किल्ल्याबाहेर राहून किल्ल्यास वेढा घालणाऱ्या इंग्रज सैनिकांवर हल्ले करून त्यांना हैराण करीत होते. किल्ल्याची लढाई संपता संपता एकदा यशवंतरावांच्या तळावर लेकने छापा घातला. यशवंतराव तेथून गेले व लढाईचे प्रकरण आटोपले.

होळकरांचा सरदार मीरखान भरतपूरला होता, तो दुआबात घुसला. दुआब प्रदेश इंग्रजांच्या ताब्यात होता. १४ फेब्रुवारी १८०५ ला तो रोहिलखंडात घुसला. १६ फेब्रुवारीस त्याने मुरादाबाद गाठले. तेथील कलेक्टराशी लढाई देऊन इंग्रज सैन्याच्या पाठलागामुळे तो आपल्या घोडदलासह शेरकोट व अफझलगड ह्या दोन ठाण्यामध्ये आला. दिनांक १० मार्च रोजी तो अमरोहा येथे होता. दिनांक २० मार्च १८०५ रोजी मीरखान यमुना उतरून भरतपुराकडे निघाला व भरतपूरच्या छावणीत दाखल झाला.

जाटांशी इंग्रजांचा समेटाचा तह झाला (१० एप्रिल १८०५), त्याची कलमे अशी– (१) जाटाने इंग्रजांस युद्ध खर्चाबद्दल २० लाख रुपये हप्त्याने द्यावे आणि (२) जाटाकडे पूर्वी मुलूख होता तो सर्व इंग्रजांनी त्याजकडे

कायम ठेवावा. जाटाने ही कलमे आनंदाने कबूल केली. इंग्रजांनी मात्र प्रचंड खर्च व वाताहत झालेली निमूटपणे सहन करून व थोडी बहुत अब्रु बचावून अडचणीत सापडलेला हात तूर्तास मोकळा करून घेतला. जाटावरील हा द्वेष त्यांनी पुढे वीस वर्षांनी कसा उगवून घेतला हे इतिहास जाणतो. अशा प्रकारे जाट स्वस्थ बसल्यावर होळकर उघडा पडला. त्याच्याकडे इंग्रजांनी काही महिने बिलकूल लक्ष दिले नाही. मध्यंतरी लॉर्ड वेल्स्लीच्या हातचा कारभार जाऊन कॉर्नवॉलिस अधिकारावर आल्यानें पूर्वीचे सगळेच धोरण फिरले.

## होळकरांचे युध्दांत शिंद्यांची कुचंबणा :

भरतपूरची लढाई थांबल्यावर अलिजा बहाद्दर, दौलतराव शिंदे हे मोठी फौज घेऊन भरतपूरला जाण्यास निघाले, हेतू इंग्रज व होळकर यांचा समेट घडवून आणावयाचा होता. फौजेसह शिंद्यांनी भरतपूरला जाऊ नये असे इंग्रज बजावत .असताही त्याची पत्रास न बाळगता यशवंतरावांची चंबळ नदीच्या काठी संबळगडावर सन १८०५ च्या एप्रिल महिन्यामध्ये भेट घेतली. आगत स्वागताचा प्रास्ताविक समारंभ उरकून नंतर दोन दिवस समेटाचे बोलणे चालून पुढील कलमे ठरली— (१) दोघांनी (शिंदे होळकरांनी) पेशव्यांना आपले स्वामी समजून त्यांची आज्ञा पाळावी. त्या योगाने पेशव्यांची तहापूर्वीची प्रतिष्ठा व सत्ता स्थापन होईल; (२) एखादे नवे काम करावयाचे मनात आणल्यास आधी एकमेकांची सल्लामसलत घेऊन नंतर दोघानी एकोप्याने ते काम करावे; (३) पेशव्यांच्या सरदारांच्या जमिनी देशात अनेक ठिकाणी आहेत. अशा सरदारांचे दोघांनी नुकसान करू नये किंवा त्यावर जुलूम करू नये. उलट त्यांच्या वाटेस जर कोणी जाईल तर त्याविरुद्ध दोघानी मदत करावी आणि पाठबळ पुरवावे; (४) पेशव्यांची नोकरी सोडणाऱ्या सरदाराला आश्रय किंवा उत्तेजन देऊ नये, (५) एका राज्यातील सरदाराना दुसऱ्या राज्यातील प्रदेशातून जाण्याचे कारण पडल्यास त्यानी त्या प्रदेशाच्या सरंक्षणाची जास्तीत जास्त काळजी घ्यावी; (६) दोन्ही राज्यांपैकी एका राज्यावर कोणा तिसऱ्याने चढाई केल्यास दोघांनी एकोप्याने वागावे; (७) जयपूर, जोधपूरची खंडणी जोडीने करावी आणि त्या खंडणीची दोघात समान वाटणी व्हावी; (८) आपले पूर्वज ज्या नीतीनियमानी मैत्री संभाळीत होते तेच नीतीनियम आताही पाळले जावेत; (९) एका राज्यातील जमीनदार दुसऱ्या राज्यांत पळून गेल्यास त्या राज्याने आश्रय देऊ नये; (१०) एखाद्याने नवा मुलूख जिंकल्यास त्या मुलखाची सारख्या प्रमाणात दोघांमध्ये वाटणी करण्यात यावी; (११) एकाच्या सरदाराने दुसऱ्याच्या राज्यातला पैसा उकळल्यास ती रक्कम ज्याची त्याच्या हिशोबी जमा करण्यात यावी. हा समेट कागदावर राहिला, अंमलात आला नाही. तरी पण होळकरांना सरदार अंबूजी इंगळे यांजकडून ५० लाख रुपये दंड म्हणून वसूल करण्याची संधी दौलतरावानी दिली. इंगळे १८०४ मध्ये इंग्रजांस फितूर झाल्याबद्दल त्याजवर दौलतरावाचा रोष होता. पण इंगळे मातबर सरदार, त्याला शिक्षा एकट्याकडून होणे धाष्टर्याचें अस दौलतरावांस वाटल म्हणून

शिंदे होळकरांचा समेट झाल्यावर दोघांनाही पैशांची अडचण होती ती श्रीमंत सरदार अंबूजी इंगळे यांजकडून भागेल असे वाटल्यावरून होळकरांनी शिंद्यांच्या अनुमतीनें अंबूजी इंगळे यांस कैद केले. दोन तीन दिवस कैदेत ठेविल्यावर इंगळे यांनी होळकरांस ५० लाख रुपये दंड दिला व सुटका करून घेतली. होळकरांनी ह्यातील किंचित द्रव्य दौलतरावांस देऊन बाकी रक्कम पुढील युद्धाचे खर्चास आपल्याकडे ठेविली.

**होळकरांचा उठाव :**

मे १८०५ त समेटाची जागा संवळगड सोडून यशवतराव मेवाड, मारवाड, दिल्ली, अशा ठिकाणी फिरत राहिले. पुष्कर, अजमेर हे त्यांचें या दिवसांत एक प्रकारे मुख्य ठाणे होते. येथे येऊन यशवंतराव इंग्रजांच्या लष्करी हालचालींच्या बातम्या काढीत होते. इंग्रजानाही भरतपूरच्या लढाईनंतर आपल्या फौजेची जुळवाजुळव करण्यास सवड हवी होती. पण त्यांना यशवंतरावांचा पिच्छा सोडावयाचा नव्हता. यशवंतराव त्यांचा सदर हेतू ओळखून होते. पंजाब हा त्यानी दौडीचा प्रदेश ठरवून पंजाबातील शीख व त्यांच्या पलिकडील अफगाण यांच्याशी त्यांचा पत्रव्यवहार सुरु होता. दिनांक २५ ऑगस्ट १८०५ रोजी यशवंतराव राजस्थानच्या बाजूस, दिल्लीच्या अलिकडे असलेल्या रेवाडी नांवाच्या गांवाहून निघाले. मीरखान तीन चार दिवस मागे राहिला होता. शिद्यांना सामील करून घ्यावे या उद्देशाने तो रेवाडीहून हालला नाही. यशवंतरावानी शिखांशी संधान बांधून त्यांना अनुकूल करून घेतले होते. त्यांचे फ्रेंच व पोर्तुगिज गोवेकर यांची मदत मिळविण्याचे प्रयत्न चालले होते.

**यशवंतरावांच्या पंजाबातील हालचाली :**

शिखांशी सख्य जोडण्याचा प्रयत्न महाराजांनी भरतपूर सोडल्यानंतर चालविला होता. सप्टेंबर महिन्यात होळकरानी सुमारे १२ हजार देशी स्वार, पन्नास तोफा व थोडे पायदळ बरोबर घेऊन पंजाबकडे कूच केले. शेखावरीतून माचेडीकरांचा मुलुख ओलांडून कित्येक संस्थानिकांस सामील करून घेऊन यशवंतराव पतियाळा येथे गेला. मागून जनरल लेकने रेवाडी व नार्नाळ येथे आपली ठाणी बसवून यशवंतरावांचा पाठलाग चालविला. ऑक्टोबरात ज. लेक मथुरेहून पुढे निघाला. होळकरांनी रणजितसिंग शिखास सामील होण्याविषयी कळविले पण त्याने साफ जवाब न देता चाल-ढकल चालविली. पंजाबात पोचल्यावर महाराजांच्या हालचाली अशा : "पतियाळेकर राजे आदिकरून शिखांच्या भेटी जाहल्या. मसलतीस अनुकूल; परंतु त्यांचे घरात राणी कुबेर एक होऊन कलह पडला, त्यांची समजूती करावी यानिमित्त आठ पंधरा दिवस मुक्कामही करून राहिलो. दोहीकडून ताला न पडे, असे पाहून दोहीकडेही एकेकास ठेवून लाहोरवाल्यांची संधाने आली व शहाकडीलही (काबूलचा अमीर) पत्रें आली. त्याजला सामील करून घेऊन पुन्हा माघारें शत्रूच्या मुकाबल्यास जावे, या विचारे पतियाळ्याहून कूच

करून छ. १ रमजानीस (१३ नोव्हेंबर १८०५) सतलज नदी उत्तर तीरास फौज कंपूसहित आलो. तेथून शहाकडील पत्रें आली की, अटक नदीचा पूल तयार होऊन दोन तीन दस्ते (पथके) पार उतरले. आणखीही उतारा चाललाच आहे. दरोबस्त फौजेसुद्धा सत्वरच येऊन पोहोचेल; या भावी लिहिल्यावरून नदीतीराहून पुढे अमृतसर लाहोरच्या जिल्ह्यात येऊन पोहोचलो. लाहोरवाले राजश्री रणजितसिंग आदिकरून दरोबस्त शीख सामील झाले, इत:पर थोडक्याच दिवसांत आवध्यास एकत्र करून श्रीलक्ष्मीकांताचे कृपे (नें) शत्रूचा पराभव करून इंद्रप्रस्थ श्री मथुरा ह्या जिल्ह्यांत येऊन पोहचतो. पतियाळा नरेशांकडून द्रव्य मिळेना म्हणून होळकरांनी त्यांच्या प्रदेशांत लूटालूट सुरु केली. शीख समाज व त्यांचे धर्मगुरु होळकरांना अनुकूल होते, पण राजे, जहागिरदार इत्यादि पुढारी मात्र होळकरांनी पंजाबांतून जावे असे इच्छिणारे होते. ह्या सूत्रास अनुसरून रणजितसिंगाने यशवंतरावांचा व इंग्रजांचा समेट घडवून आणण्यासाठी मध्यस्ती केली. त्यांत त्यास यश आले. डिसेंबर १८०५ च्या शेवटी तहाच्या वाटाघाटी झाल्या. होळकरांची समजूत घालून युद्ध संपवावे असा लेकला गव्हर्नर जनरल चा हुकूम होता. त्यामुळे तह होण्यास विलंब लागला नाही. व्यास नदीच्या काठी राजपूर घाट येथे दिनांक २४ डिसेंबर १८०५ रोजी तह कायम झाला.

**होळकर-इंग्रज तहनामा :** तहनामा सरकार कंपनी इंग्रज बहादर यांचे सरदारासी महाराजांचे मवसुफ यासी कित्येक प्रकारे जुदाई झाली होती. सांप्रत उभयपक्षी दोस्ती मुकरर जहाली. त्यास गव्हर्नर सर जॉर्ज हलरो वार्लो बारोनेट साहेब बहादूर यांजकडील मुखत्यार लॉर्ड लिक साहेब बहादूर त्याजकडील मुखत्यार कर्नल जॉन मालकम साहेब बहादूर यांचे विद्यमाने व महाराजे यशवंतराव होळकर यांजकडील सेख हबीबुल्ला व बालाराम शेट यांचे विद्यमाने करार ठरला. करारनामेचीं कलमें ठरली ती बी तपसील :–

(१) कलम पहिले— सरकार कंपनी इंग्रेज बहादुर याजकडील सरकार करार करितात की काहराजे यशवंतराव होळकर यांसी लढाई मोकुफ जाहली. पुढें माहराजे मोसूफ करार करितात की सरकार कंपनी इंग्रेज बहादूर यासी व त्याचे इलाखेदारासी व दोस्तासी कोणे प्रकारे शत्रुत्वाची मसलत करणार नाहीं व ज्यामध्ये त्यांचे नुकसान ते करणार नाही.

(२) कलम दुसरें— माहराजे यशवंतराव होळकर करार करतात की, रामपुरा व टोंक व बुंदी व लाखेरी व समधी, मालोगांव व दतिया वगैरे मुलूख बुंदीचे पाहडाचे उत्तरेस आहे तो आजपर्यंत सरकार दौलतमदार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे इलाख्यांत कायम आहे त्या मुलकाचा दावा करणार नाही व आस्ता धरणार नाही.

(३) कलम तिसरे— सरकार कंपनी इंग्रेज बहादूर यांचे सरदार करार करीत आहेत की, होळकरांचे खानदानचा कदिम तालुका व मुलुख माळव्यात व दुसरे राजे मेवाड व मारवाड व हाडोती व चंबल नदीचे दक्षणेस राजे आहेत त्यांचे मुलुखात, त्यांस उपद्रव देणार नाही व अम्मल

१. प्रा. फाटक, यशवंतराव होळकर, पृ. १०८.

दखल करणार नाही, आणखी करार करीत आहेत की होळकरांचे तालुक्यांचा मुलुख तापी नदीचे दक्षिणेस व दक्षिण प्रांती आहे तो अद्याप सरकार कंपनी इंग्रेज बाहदूर याजकडील सरदारांचे हस्तगत आहे. तो महाराज यशवंतराव होळकर यांचे सरकारात माघारा द्यावा. मगर चांदवडचा किल्ला व परगणा अंबाड व सेवगांव व गंगा गोदावरीचे दक्षिणेकडील गावही मकाने मात्र सरकार कंपनी इंग्रेज बहादूर यांचे स्वाधीन राहतील. परंतु होळकरांच्या खानदानाचे थोरपणावर नजर देऊन करार केला जातो. माहाराजे यशवंतराव होळकर यांजकडून दोस्ती कायम राहील व कोणे एक प्रकारे सरकार कंपनी इंग्रेज बाहदूर व त्यांजकडील इलाखेदार व दोस्त यांचे तालुक्यांत उपद्रव न लागल्यास मुलूख मजकूरही दिढा वर्षांनी माहराजे यशवंतराव होळकर यांचे स्वाधीन केला जाईल.

(४) कलम चवथे— माहराजे यशवंतराव होळकर करार करितात की, परगणें कोंच बुदेलखडाचा जिल्हा आम्ही सोडला. याचा दावा करणार नाही. परंतु सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे सरदार करार करितात की, महाराजे मवसूफ यांजकडील दोस्तीची मजबुती यथास्थित राहिल्यास ज्याप्रमाणे, बाळाबाईस जहागीर दिल्ली आहे त्याप्रमाणे कोंच महाराजे मौसुफ यांची कन्या भीमाबाई यांस दोन वर्षानंतर कंपनी सरकारातून जाहगीर दिला जाईल.

(५) कलम पाचवे— महाराजे यशवंतराव होळकर करार करितात कीं, सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचा मुलूख व यांचे सरदारांनी घेतलेला मुलूख व त्यांचे इलाखेदार व दोस्त यांचे तालुकियासी कोणेविसी दावा करणार नाही.

(६) कलम साहवे— महाराजे यशवंतराव होळकर करार करितात की, सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचे रजाबंदीशिवाय कधीही कोणेयेक फिरंगी यांचे मुलुखातील माणूस नोकर ठेवणार नाही.

(७) कलम सातवे— माहाराजे यशवंतराव होळकर करार करितात की, सर्जेराव घाटगे यानी लबाडी करून मुलखाची खराबी केली त्याहीमध्ये सरकार कंपनी इंग्रज बहादूर यासी लबाड्या बहुत अयोग्य केल्या याजकरितां सरकार दौलतमदार कंपनी इंग्रेज बहादूर यांचे सरदारांनी त्या बदजाताचे लबाडीचा उस्तहारनामा लिहून पाठविला यास्तव सर्जेराव मजकूर याजला आपले इलाख्याचे मुलखाचे मसलतीत घेणार नाही व चाकरीस ठेवणार नाही.

(८) कलम आठवे— सरकार दौलतमदार कंपनी इंग्रज बाहदूर यांजकडील सरदार करार करितात की, महाराजे यशवंतराव होळकर सलाह मुकरर करून तहनामे दुरुस्त जाहल्यावर आपले तालुक्याकडे कूच करून जातील. त्यांस आम्हांकडून कोणही मुजाहिम होणार नाही. कोणे गोष्टीविषयी अडथळा होणार नाही व त्यांचे कोणत्याही कामात

दखल करणार नाही. परंतु यास शर्थ की त्यांनी आपला तहनामा दुरस्त होताच पटियाले व खटल वगैरे तालुके सरकार व जयपूरचे राजे डावे हाताकडे टाकून दरकूच आपले तालुक्यात जावे. मार्गामधी सरकार वगैरे मुलुख लागल्यास रयतीस कोणेविशी उपद्रव होऊ न पावे, आपले फौजेपासून त्याची रखवाली करावी.

(९) येणेप्रमाणें तहनामा नौ कलमाचा छ २ शवाल तारीख २४ डिसेंबर १८०५ इ. स. १२२० हिजरी, बियास नदीचे तीरी, रायपूराचे घाटावर, उभयपक्षी मसलितीने लिहिण्यात आला. महाराजे यशवंतरव होळकर यांचे मुखत्यार सेख हबिबुल्ला व बाळाराम सेठ यांचे मोहर दस्तकानिशी लिहून जनरल लार्ड लीक साहेब बहादूर यांचे हवाला केला व एक करणेल मालकम साहेब बाहदूर यांचे दस्तखतीनिशी लिहून होळकरां-कडील मुखत्यारास दिला[१].

अशा रीतीने वेलस्लीने चढाईनें सुरु केलेल्या युद्धाचा तात्पुरता शेवट झाला. टिपू, निजाम व मराठे ही तीनच प्रकरणे वेलस्लीच्या कारभारात मुख्य होती. त्यापैकी टिपूचे राज्य इंग्रजांनी जिंकून तेथील प्रांताची व्यवस्था पूर्णपणे नीट ठेविली. म्हणूनच पुढील युद्धात इंग्रजांस पैशाचा व फौजेचा उत्कृष्ठ पुरवठा झाला. म्हैसुरातील डाव जसा आपण लवकर जिंकला तसाच मराठ्यांनाही बोलबोल म्हणतां जिंकू अशी वेलस्लीची अपेक्षा होती ती सर्वथैव विफल ठरली. इंग्रजांशी तह झाल्यावर यशवंतरावांनी सन १८०६ च्या जून मध्यें शिद्यांशी समेटाचे बोलणेजे पूर्वी चालू होते तसेच चालू टेविले. पण शिद्यानीं आपल्या वर्तनाने सलगीचे वर्तन यशवंतरावांशी ठेवावयचे नाही, असा निश्चय केला. तेव्हा जुलैच्या प्रारंभी यशवंतराव पुष्कर तीर्थावर गेले. १८०७ च्या एप्रिल मे-महांत ते कोटयाच्या भागात होते. तेथून १८०७ जुलै रोजी स्वराज्यांत मानपुऱ्यास राहिले. तेथें आल्यावर अडीच महिने पावेतो मुक्काम गावात होता. फौज वगैरे कारखाना बाहेर होता. २१ ऑक्टोबर १८०७ ला गांव सोडून यशवंतरावांनी अर्ध्या कोसाची मजल मारली व तेथेच महिनाभर राहिले. दरम्यान इंग्रजांशी झालेल्या समेटाच्या तहाप्रमाणे महाराजांना इंग्रजांनी लढाई चालू असता दाबलेला मुलूख परत मिळाला. शिद्यांकडील मुलूख परत मिळण्यास शिद्यांच्या अधिकाऱ्यांशी कटकटी कराव्या लागल्या. १८०७ च्या जून-जुलैत होळकरांचा दक्षिणेकडील मुलूख तहनाम्याप्रमाणे होळकरांच्या कबजांत यावयाचा तर त्याला पेशवे अडथळा करीत होते. लढाईमुळे राज्याची विसकटलेली घडी नीट बसविण्यास व राज्याचा गाडा नीट चालविण्यासाठी होळकरांनी ह्या दोन वर्षात बरीच मेहनत घेतली होती.

तसेच इग्रजांशीं आपले पुनरपी युद्ध होणार ह्या भावनेने होळकरांनीं भानपुऱ्यास तोफा ओतविण्याचा कारखाना वेगाने चालू केला. इंग्रजांचे खरे

---

१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, भाग २ रा, सं. बावा. ठाकूर. पृ. ५४, ५६; प्रा. फाटक, यशवंतराव होळकर, पृ. ११२–११४; अचिसन ट्रिटीज, भा. ७ पृ. २६–२८.

बळ तोफा असून त्यांच्याशी यशस्वी सामना करावयाचा तर त्यांच्यासारखेच उत्तम कार्यक्षम तोफांचे प्रचंड बळ आपल्यापाशी पाहिजे, या भावनेने महाराज तोफा ओतण्यामागे लागले होते. तोफांचा कारखाना इ. स. १८०७ त वेगाने चालू केला. १८०७च्या ऑगस्ट १५ ला त्यांनी तोफांच्या साच्याकरिता पाच खंडी मेण मागविले. तोफांबद्दलची त्यांनी पत्रांत कळविलेली हकीगत अशी "भानपुरियास आल्यावर नवीन तोफा जिनसीच्या पंचवीस व पलटणीच्या शंभर यकूण पंचवीस तोफा तयार झाल्या" इतक्या वेगाने हे तोफा तयार करण्याचे काम चालू झाले होते. पूर्वीचे सैन्यांतील कंपू मोडून निवडक माणसे छाटून बारा पलटणे नवीन भरली. तोफांचा कारखाना आटोपल्यावर महाराज महालाचे हिशेब पाहू लागले.

**खंडेराव, काशीराव व यशवंतराव होळकर मृत्यू :**

यशवंतराव होळकरांनी आपल्या पराक्रमाने होळकरांच्या दौलतीची मालकी सिद्ध केली. राजे रजवाडे व इंग्रज यांजकडील सर्व करार त्यांच्याच नावे झाले. शिक्क्यांत पूर्वी खंडेरावाचे नांव होते. हा खंडेराव तुकोजी होळकरांचा पुत्र मल्हारराव याचा मुलगा. तुकोजीस चार मुलगे, तीन बायकांपासून झालेले होते. काशीराव व मल्हारराव हे दोघे औरसपुत्र. दुसरे दोघे अनौरस पुत्र वडील विठोजी व धाकटा यशवंतराव. तुकोजीने मरणापूर्वी काशीरावास. दौलतीची मालकी दिली होती व बाकीच्या तिघांनी त्याच्या विचारात राहून राज्य चालवावे असे सांगितले होते. तुकोजी मेल्यावर होळकरांच्या दौलतीसाठी ह्या बंधूत भांडणे सुरू झाली. त्यात मल्हारराव हुशार लढवय्या होता. त्याचा काटा काढण्यासाठी काशीरावाने शिंद्यास फितविले. शिंद्यांचें सैन्य मल्हाररावास धरण्यास गेले असता झटापटीत मल्हारावाची गर्दन शिंदे सरदार मुजफरखान याने छाटिली (१४-९-१७९७). तेव्हा मल्हाररवाचे गरोदर बायकोस पुण्यात केशव गणेश कुंटे यांनी आश्रय दिला. तिथेच ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्याचे नाव खंडेराव. सन १८०६ च्या अखेरीस जयपूर व जोधपूरकर यांचे युद्ध जुंपले. जोधपुरकरांनी युद्धारंभी यशवंतरावांचे कुटुंबास आश्रय दिला होता. हा उपकार स्मरून त्या दोघांचा समेट करून दिला आणि खंडेराव व कुटुंब यांस घेऊन यशवंतराव आपल्या मुलुखांत परत येऊ लागले. अजमीर-जवळ किशनगड परगण्यात कूच होत असता हरमाडचाचे मुक्कामास आले; तेथे खंडेरावाचे प्रकृतीस महामारीची विकृती झाली. दिनांक १४ फेब्रुवारी १८०७ रोजी देहावसान झाले. तेव्हा तेथे काही दिवस मुक्काम करून यशवंतराव कोटयाचे सुमारे चर्मण्वती उतरून पाटणास मुक्कामास आले. तेथून फौजेची समजाविशी करून दिनांक ६ जुलै १८०७ रोजी भानपूर येथे आले.

बंधू काशीरावास यशवंतरावाने उत्तर खानदेशात बिजागड येथे पाठविले होते. त्यास सोडवून गादीवर आणण्याच्या हेतूने काहीनी बंडावा केला. त्याचे पारिपत्य करण्यासाठी यशवंतरावांनी आपल्याकडील भली मोठी फौज भानपुऱ्याहून बिजागडास पाठविली. तिने बंडखोरांचा पाडाव केला

पण त्या झटपटीत काशीराव मारला गेला. काशीराव, त्याची पत्नी लक्ष्मीबाई व खंडेराव या तिघांची छत्री महाराजांनी स. १८०८ च्या एप्रिलमध्ये उभारण्याचा हुकूम दिला. इंग्रजांशी तह केल्यावर यशवंतरावानी स्वस्थ न बसता मराठी राज्य पूर्व स्थितीस आणण्याचे आटोकाट प्रयत्न केले. भानपुऱ्यास तोफा ओतविण्याचा कारखाना काढला. महालांचे हिशेब नीट लाविले. ह्या दोन्ही कामात निमग्न असता त्यांना चित्त भ्रम झाला. ग्वाल्हेरचे गोसावी महिपत बावा ढोली बाबा भानपुऱ्यास आले असता त्यांचे ठायी आस्था बसून उपदेश घेतला. त्यांनी ब्राह्मण भोजन, मंत्र जप करण्यास सांगितले. त्याप्रमाणे क्रम चालला. त्या दिवशी दिनांक ८-१०-१८०८ च्या रात्री देवाची आरती करीत असता प्रकृती बेसावध झाली. दंगा करु लागले. दोघा चौघांनी धरून वाडयात नेले. माघ मासी भानपुऱ्याहून रामपुऱ्यास आले. स. १८०९ अखेरीस यशवंतरावांचे दुखणे वाढू लागले. स. १८१० च्या सुरवातीस धर्मा कुंवरच्या शिरजोरीनें यशवंतरावांवर दुर्धर प्रसंग आला होता. तें प्रकरण मीरखान गफूरखान या सरदाराने मिटविले व त्याने आपली माणसे कारभारात घुसवून जोर जुलुम करून राज्याची घडी विसकटून टाकली. महाराजांचे दुखणे वाढतच होते. औषधोपचार, गंडेंदोरें आदि दैवी उपाय चालू होते, तरीही दुखण्याला उतार पडला नाही. वायुचा प्रकोप होऊन, अंग उडू लागले. दिनांक २७ ऑक्टोबर १८११ रोजी सकाळी भानपुरा येथे प्राणोत्क्रमण झाले.

यशवंतरावांच्या मृत्यूनंतर त्यांचे चिरंजीव मल्हारराव यांस होळकरशाहीचा अधिकार मिळाला; त्यांचे आड कोणीही आले नाही.

**यशवंतरावांची योग्यता :**

बाजीराव पेशवे गादीवर आल्यावर दोन वर्षांनी मराठेशाहीवर पारतंत्र्याच्या भीषण छाया पसरल्या. वसईच्या तहाने पेशवे स्वातंत्र्य गमावून बसले. हे स्वातंत्र्य पुन्हा मिळवावे त्यासाठी इंग्रजांना मराठेशाहीच्या कारभारापासून दूर ठेवावे, या काहीशा अशक्यप्राय कार्याला अत्यंत ईर्षेने डोक्यावर घेऊन या करिता एकटे यशवंतराव त्या कालात झटले म्हणून ते स्वातंत्र्यवीर. स्वातंत्र्य रक्षणासाठी "न भूतो न भविष्यति" असा महान प्रयत्न त्यांनी एकटयाने केला. शिंदे, भोसले, हरले, बाजीराव साहेब पळाले, तेव्हा गेलेल्या मराठेशाहीचे अखेरचे स्वातंत्र्य टिकविण्याचा प्रयत्न यशवंतरावानी एकाकी केला म्हणून ते शेवटचे स्वातंत्र्य वीर म्हणून इतिहासात अजरामर झाले. यशवंतरावांच्या हयातीत त्यांचा लौकिक इतका वाढला होता, कीं हैदराबादकर निजाम अल्लीच्या बेगमेने राजा महिपतराम यास मुद्दाम यशवंतरावांकड पाठवून आपल्या दरबारातील वजिराची बंडाळी मोडण्यासाठी त्यास फौज घेऊन मदतीस बोलाविले. पण त्यास वेड लागल्याने ती गोष्ट सिद्धीस गेली नाही.[१]

१. म. रि., भा. ३, खं. ३, पृ. ३५७.

● ● ●

## गेलेली सत्ता मिळविण्याची बाजीरावांची धडपड

### कालसूची

| | |
|---|---|
| १८०३ . . | सावंतवाडीकर खेमसावतांचा मृत्यू. |
| १८०४, ऑगस्ट ९ . | अमृतरावास इंग्रज दर महाची पेन्शन देतात. |
| १८०५ . . | इंग्रजांनी किन्नूरकरांचा नक्षा उतरविला. |
| १८०६ . . | कोल्हापूरकर सावंतवाडीकरांचा पराभव करतात. |
| १८०७ . . | निपाणकरांचे व कोल्हापूरकरांचे संबंध बिघडतात. |
| १८०८, फेब्रुवारी . | ताई तेलिणीचे बंड मोडून काढण्याकरिता सेनापती गोखले वासोटा किल्ल्याभोवती मोर्चेबंदी करतात. |
| १८०८, फेब्रुवारी ४ . | निपाणीकर कोल्हापूरकरांच्या फौजेचा पराभव करतात. |
| १८०८, जून . | निपाणीकर कोल्हापूरकरांच्या मुलीशी लग्न करतात. |
| १८०८, ऑगस्ट . | वासोटा किल्ला गोखले काबीज करतात. |
| १८०९, जुलै . | रेसिडेंट क्लोजची पुण्याहून हैदराबादेच्या रेसिडेंट पदावर नेमणूक. |
| १८१०, एप्रिल . | एल्फिन्स्टनची पुण्याचा रेसिडेंट म्हणून नेमणूक होते |
| १८१० . . | सरदार बाबा फडके यांचा वसई किल्यात कैदेत मृत्यू. |
| १८११ . . | पेशवे पंतांची कैदेतून सुटका करतात. |
| १८१२, ऑक्टोबर १ . | कोल्हापूरकर इंग्रजांशी तैनाती फौजेचा तह करून मांडलिक बनतात. |
| १८१३, जुलै ११ . | फोर्ड नावाच्या इंग्रज अधिकाऱ्यास बाजीराव आपल्या सेवेत ठेवून घेतात. |
| १८४८ . . | पंतांचा मृत्यू. |

२६

## गेलेली सत्ता मिळविण्याची बाजीरावांची धडपड

शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले यांच्या पराभवामुळे बाजीरावास आश्चर्याचा धक्का बसला आणि त्यांचे नीतिधैर्य संपले. इंग्रजांचे जू झुगारून देण्यास कोणी प्रबळ सहाय्यकर्ता नाही याची त्यास खात्री पटली. तरीसुद्धा त्याने आपल्याजवळील साधनसंपदा एकत्रित करून त्याच्या सहाय्याने सर्व शक्तिनिशी शक्य असेल त्या मार्गाने ब्रिटिशांना विरोध करण्याचे त्यानी ठरविले.

बाजीरावांची राजकीय सत्ता, इंग्रजांच्या कृपेमुळे बाजीराव पुण्यास पेशवा म्हणून स्थानापन्न झाल्यानंतर स्थिरावली. मराठी राज्यात शांतता नांदू लागली असा यामुळे आभास निर्माण झाला. पेशव्यांना हे ठाऊक होते की खरी सत्ता सुख शांतीने राबविण्यास मराठे सरदारांमध्ये एकोपा व्हावयास हवा, तसेच आर्थिक सुबत्ताहि लाभावयास हवी, तरच लष्करी सामर्थ्य वाढविता येते.

तथापि, १८०३ नंतर मराठी राज्याची स्थिति दयनीय होती. पेशव्यांची सत्ता, वेलस्ली म्हणतो त्याप्रमाणे नावालाच होती. राजधानीपासून ५ मैलांच्या पुढे पेशव्यांच्या सत्तेचे नांव नव्हते.

ज्या कारकुनावर किंवा अंमलदारावर विश्वासून त्याजवर जिल्ह्याचा कारभार सोपविल असा एकही विश्वासू माणूस त्यांच्या नोकरीत नव्हता. इंग्रजांनी त्याना पेशवाईवर आणून बसविल्यावर बाजीरावांची सत्ता खिळखिळी करण्याच्या हेतूने ते अंतःस्थ कारवाया करू लागले. मंत्री व पेशव्यांचे जबाबदार अधिकारी यांना त्यांनी लाच देऊन आपल्या बाजूचे करून घेतले. त्यामुळे पेशव्यांच्या दरबारांतील सर्व बातम्या इंग्रजांना कळू लागल्या. पेशव्याना आपल्या नोकरीतील अविश्वासू, घातकी व फितूर नोकर कोण आहेत याचा सुगावा लागला होता. अशा फितूर नोकरांना नोकरीतून काढून टाकण्याचे बाजीरावानी ठरविले. पण त्यांत त्यास यश आले नाही. बयाजी नाईक हा पेशव्यांकडून इंग्रजांकडे गेलेला मराठा वकील. पण तो इंग्रजांस फितूर आहे, हे कळल्यावर बाजीरावानी त्यास नोकरीतून कमी केले, पण इंग्रजांनीं ह्या इसमास नोकरीस ठेवण्यास बाजीरावास भाग पाडले[1].

१. PRC Vol. VII, Jan. 29, 1805, p. 186.

ब्रिटिशांच्या गुलामगिरीचा फास बाजीरावाच्या गळ्याभोवती आवळला जात होता. ही गोष्ट बाजूला ठेवली तरी होळकर आणि पठाण यांचे मुलुखातील दंगेधोपे, तसेच, १८०३ सालचा दुष्काळ यामुळे पेशवा जेरीस आला. त्याने लोकांचे दुःख निवारण करण्यासाठी आयात धान्यावरील कर माफ केले आणि तशाच प्रकारच्या इतर सवलती दिल्या. तथापी होळकर ट्रेझरीमधील सर्व पैका व चीजवस्तु, घोडे, हत्ती, तोफा इत्यादि आपल्याबरोबर घेऊन गेला. लोक, बॅन्कर्स, धंदेवाईक, दुकानदार, ब्राह्मण आदि जे पळून गेले होते, ते सर्व पुण्यास येऊ लागले.[१]

सर्वत्र गोंधळ व बजबजपुरी माजली होती. ग्रामसेवक अमलदारांचे ऐकेनासे झाले आणि सरदेशमुखांच्या सत्तेस कोणी जुमानीनात.

पेशवे नांवाचे मुख्य होते. त्यांजकडे लष्करी सामर्थ्य नव्हते तसेच आर्थिक बळही नव्हते. ह्या त्यांच्या कमकुवतपणाचा फायदा घेऊन अनेक मराठे सरदार महाराष्ट्रांत पेशव्यांच्या राज्यांत धुमाकूळ घालीत होते. होळकरांना पुण्यास आणण्यात अमृतराव पेशवे, मोरोबादादा फडणवीस व बाबा फडके हे तिघे पुढारी होते. त्यापैकी फडणवीस व अमृतराव इंग्रजांस सामील झाले. त्यांना इंग्रजांनी दरमहाची नेमणूक वसली (पेन्शन) दिली[२] (९ ऑगस्ट १८०४). बाबा फडके इंग्रजांस सामील झाले नाहीत. शेवटपर्यन्त ते इंग्रजांशी लढत राहिले. इंग्रजांच्या अफाट शक्ति सामर्थ्यापुढे त्यांचा निभाव लागला नाही म्हणून ते श्वशूर मिरजकर यांच्या आश्रयास गेले. इंग्रजांनी त्यांना पेशव्यांच्या स्वाधीन करण्याचा तगादा लावल्यामुळे त्यांना पेशव्यांच्या स्वाधीन करण्यात आले. पेशव्यांनी त्यास कैद करून वसईच्या किल्यावर ठेविले तिथे ते १८१० च्या सुमारास कैदेत मृत्यू पावले.

मराठी राज्यात शांतता प्रस्थापित करण्याचा इंग्रजांचा उद्योग चालू असता मराठी राज्याचे खावंद पेशवे यांचा कारभार पूर्णपणे मनमानी आणि अव्यवस्थित चालू होता. त्यांच्या वागणुकीला कोणतेही ताळतंत्र नव्हते. पोरकट देणग्या, हेकट वागणूक, आचरट धर्मभोळेपणा आणि नायकिणी व त्यांचे साजिंदे यांचा दौलतजादा या श्रीमतांच्या खाजगी वर्तनाच्या चतुःसीमाच होत.[३]

**माने प्रतिनिधी प्रकरण :** फत्तेसिंग माने नावाचा होळकराचा शूर सरदार होता. होळकराने फत्तेसिंगास कर्नाटक प्रांतावर पंधरा लक्ष रुपयांच्या वराता दिल्या. माने द्रव्य वसुलीसाठी फौजेसह रहिमतपुरला आला. तेथून त्याने पंतांकडे दहा लक्ष खंडणीची मागणी केली. पंतांची आई एवढी रक्कम कबूल करण्यास घोळ घालू लागली तेव्हा मान्याच्या सरदारानी कऱ्हाड प्रांतातील लोकांच्या घरास खणत्या लावून लोकापासून हजारो रुपये उकळले. इतक्यात

---

१. साने, पेशव्यांची बखर, पृ. २१०.

२. ऐ. ले. सं. भा. १५, पृ. ८०५६.

३ कित्ता, पृ. ६८९६.

पंत होळकराचा सरदार हरिपंत भावे याच्या तावडीतून निसटून पुण्याहून सातारा प्रांती आले. पंत सातारा प्रांती आल्यावर म्हसवडचा सुभानजी माने, मल्हारजी वोडके, सरनोबत, अरब व पठाण जमातदार पंतांभोवती गोळा झाले. हे सर्व मिळून प्रांतांत लुटालूट करू लागले.

मान्याच्या बंडाचा बीमोड सांगलीकर व पंतांकडील फडणीस यांनी केला. तदनंतर ह्या दोघांनी खुद्द पंतांचा बंदोबस्त करण्याचे काम हाती घेतले. पंतांच्या फौजेच्या लहान लहान टोळ्या प्रांतभर पसरल्या होत्या, त्यांचा प्रथम नाश करण्यात आला. तरी पंतांनी आपला बंडावा चालूच ठेविला. त्याचा बंदोबस्त करण्याचे काम बाजीराव पेशव्यानी सेनापती गोखले यांजवर सोपविले. त्याप्रमाणे गोखले यानी पंतांचा पराभव करून त्यांस व त्यांच्या बायका-मुलास कैद केले आणि पंतांचा मुलूख खालसा केला व ते कर्नाटकांत आपल्या प्रांताचा बंदोबस्त करण्यास गेले.

**ताई तेलिणीचे बंड :**

गोखले दूर गेलेले पाहून पंतांच्यातर्फे सातारा प्रांती दुसरे एक मोठे बंड उभे राहिले. हे ताई तेलिणीचे बंड होय. ही पंतांची अंगवस्त्र. या बाईला पुढारी बनवून वासोटा किल्याच्या गडकऱ्यानी बंडाचे निशाण उभारले. या बंडवाल्यांनी जयगड, मोरगिरी, कमळगड, मकरंदगड, वगैरे किल्ले काबीज केले आणि मोठा जमाव करून भोवतालच्या मुलुखात लुटालूट सुरू केली. या दंग्याचे वर्तमान ऐकून गोखले घाईघाईने परत सातारा प्रांती आले. अनेक ठिकाणी बंडखोरांच्या जमावाचा बीमोड करीत गोखले वासोटयाच्या पायथ्याशी आले तेव्हा किल्यातील गडकऱ्यांनी गोखल्यांशी तहाचे बोलणे लाविले. गडकऱ्यांची मुख्य अट पंतांची सुटका करावी व त्यांचा मुलूख त्यांना परत देण्यात यावा. यावर २-३ महिने वाटाघाटी चालल्या. गडकरी आपल्या अटीत फेरफार करण्यास बिलकूल कबूल नव्हते. पेशवे पंतांची सुटका करण्यास कबूल झाले नाहीत, तेव्हा मोर्चेबंदी करून किल्ला काबीज करावा असे गोखल्यांनी ठरवून फेब्रुवारी १८०८ त किल्याभोवती मोर्चेबंदी केली. गोखल्यांजवळ तोफा व दारूगोळा यांचा भरपूर साठा नव्हता म्हणून काम रेंगाळत चालले. पावसाळा नजीक आला तेव्हा ते लष्करात छप्परबंदी करू लागले. तेव्हा गडकऱ्यानी तहाचे बोलणे करून जून महिन्यात किल्ला गोखल्यांचे स्वाधीन केला. गडकरी आपले सामान घेऊन सुरक्षितपणे खाली उतरले. कोंकणात पंतांचा महिपतगड म्हणून एक डोंगरी किल्ला होता तोही गोखल्यांनी स. १८०८ च्या ऑगस्ट महिन्यात काबीज केला. इ. स. १८११ साली पेशव्यांनी पंतांची कैदेतून सुटका केली व त्यांच्या खाजगी खर्चासाठी थोडेसे उत्पन्नही तोडून दिले. प्रतिनिधी घराण्याच्या जहागिरीपैकी जो थोडासा मुलूख त्यावेळी पेशव्यानी पंतांच्या ताब्यांत दिला त्याचेच पुढे इंग्रजी अमदानींत औंध संस्थान बनले. पंत पुष्कळ वर्षे जगले व पाऊणशे वर्षांचे होऊन इ. स. १८४८ साली मृत्यू पावले.

**पटवर्धन सरदारांची दैना–कर्नाटकांत पाळेगारांचे दंगे :**

इ. स. १७६३-६४ साली पटवर्धनांस जहागिर मिळाली तेव्हा मिरज, तासगाव आणि कुरुंदवाड अशी पटवर्धनांची तीन ठाणी होती. प्रथम प्रथम पटवर्धनांत विलक्षण एकोपा होता. पण कालांतराने त्यांच्यात भांडणे सुरू झाली. मिरज घराण्यात गंगाधरराव गोविंद आणि चिंतामणराव पांडुरंग या चुलत्या-पुतण्यात झालेले भांडण सांगली आणि मिरज असे दोन भाग करून मिटविण्यात आले. पुढे तासगाव व जमखंडीकर घराण्यात वाटण्या झाल्या. ह्या सर्वांस पेशव्यांनी मान्यता दिली. ही पटवर्धन मंडळी फौज बाळगून पेशव्यांनी सोपविलेल्या मोठमोठ्या कामगिऱ्या पार पाडीत.

दक्षिणेतील वर उल्लेखिलेले सरदार हे सरंजामी सरदार होते. त्यांनी सैन्य बाळगून पेशव्यांची चाकरी करावयाची असा शिरस्ता होता.[१] ते वंशपरंपरेने सरंजामदार नव्हते. एका जहागिरदाराची बदली दुसऱ्या जहागिरीवर होत असे. इंग्रजांशी तह केल्याने पेशवे परावलंबी बनले. पेशव्यांची सत्ता कमकुवत झाल्याचे ह्या जहागिरदारांच्या ध्यानात आल्यावर ते आपले सैन्य स्वतःच्या फायद्याशिवाय कोठेही पाठविण्याचे टाळू लागले.[२] पुणे दरबाराकडून आलेले हुकूम ते मानीनासे झाले. एकमेकांच्या कुरापती काढून ते आपसात लढू लागले. त्यामुळे सर्वत्र अराजक माजले. लोकांच्या दैनंदिन जीवनातील आपत्तीत त्यामुळे आणखीन भर पडली व त्यांना जीवन असह्य होऊ लागले. कर्नाटकात लहान मोठ्या सर्वच देसायांनी बंडे करून मुलूख उद्ध्वस्त केला होता. जांबोटकर, पाच्छापूरकर, काकतीकर अनगोळकर या देसायांचे दंगे पेट तालुक्यांत चालू होते. कित्तूरकर, सरलष्कर आणि डंबलचा भीमराव मुंढरगी आणि तोतया वाघ यांचे दंगे नवलगुंद व जालेहाळ तालुक्यात चालू होते.[३] रास्ते आणि सांगलीकर या बंडखोर पाळेगारांच्या बंदोबस्तास कर्नाटकात होते. त्यांनी ह्या पाळेगारांचा ठिकठिकाणी पाडाव करून त्यांजकडून मोठमोठ्या खंडण्या वसूल केल्या. सांगलीकरांच्या या कर्नाटकातील स्वारीने त्यातील मराठी अंमलाचा दरारा पुन्हा प्रस्थापित झाला.

सन १८०५ अखेर इंग्रजाशी चाललेली शिंदे, नागपूरकर भोसले व होळकर यांची युद्धे पुरी होऊन इंग्रज व मराठे दोघेही काही काळ शांततेत घालवू लागले. वसईत तहनामा झाल्यावर राज्याचा बंदोबस्त कंपनी सरकारचे दोस्तीमुळे बंडावा वगैरे मोडून मुलूख आबाद झाला. सालोसाल वसुलाची पैदास वाढत गेली. सारे सरदार हुकमत मानू लागले. त्यावरून श्रीमंतांची मर्जी सुप्रसन्न होती. सदाशिव माणकेश्वराने रेसिडेंटाशी रहस्य ठेवून श्रीमंतांचे हित साधले. "क्लोज पुण्यास रेसिडेन्सीवर असेपर्यन्त हा प्रकार चालला. तो

१. PRC, Vol. VII, July 8, 1804, p. 128.
२. Ibid, Vol. XII, Oct. 26, 1811, p. 98.
३. ऐ. ले. सं., भा. १५, पृ. ८०४६.

स. १८०९ च्या जुलै महिन्यात पुणे सोडून हैदराबादेस गेला तेव्हा त्या जागी हेन्री रसेलची हंगामी नेमणूक झाली. दुसऱ्या वर्षी म्हणजे स. १८१० साली एल्फिन्स्टनची नेमणूक पुण्याचे रेसिडेन्सीवर होऊन तो १८१० च्या उन्हाळचात पुण्यास दाखल झाला.

याच वेळी बाजीरावाची मर्जी त्रिंबकजी डेंगळे याजवर बसून त्याने त्यास कारभारात घेतले. सदाशिव माणकेश्वर पेशव्यांच्या मर्जीतून उतरला.

बाजीरावास ह्यावेळी इंग्रजी फौजेच्या सहाय्याने सरदारांचे सरंजाम खालसा करून आपले उत्पन्न वाढवावे असे वाटू लागले. तेव्हा त्याने पटवर्धन, रास्ते, निपाणकर यांचे सरंजाम खालसा करून आपले उत्पन्न वाढविण्याचा बेत केला. तसेच कोल्हापूरकर छत्रपती आणि सावंतवाडीकर यांजवरही बाजीराव आपले अधिराज्य सांगू लागले. तेव्हा ह्या मंडळीनी त्याजविरुद्ध रेसिडेंटकडे कागाळचा नेल्या.

कोल्हापूरकर छत्रपतींनी पेशवे व पटवर्धन यांचे मुलुखात छापे घालण्याचा जणू शिरस्ता ठेविला. १८०३ मध्ये कोल्हापूरकरांनी सात हजार माणसांसह पटवर्धनांचे मिरज लुटले, अष्टा काबीज केले. घोरपडचांच्या कापशी-सभोवतीचा प्रदेश उध्वस्त केला आणि गोकाकवरून कर्नाटकात उतरले. तेथे काही स्वार्थी पाळेगारांच्या सहाय्याने मनोलीस वेढा दिला. मनोलीचे संरक्षण करण्यासाठी पटवर्धन पुढे धावले. तेव्हा कोल्हापूरकर व पटवर्धन यात युद्ध जुंपले. ते जून १८०४ पर्यन्त चालले. त्यात राजाकडील सरदार शहाजी पांढरे आणि त्याचे शेकडो सैनिक मारले गेले. राजाचा पराभव झाला. पटवर्धनांनी आपले अष्टा जिकून घेतले. ह्या वेळी इंग्रजांचे युद्ध शिंदे व भोसले यांजबरोबर चालू होते. म्हणून, गव्हर्नर जनरल वेलस्लीने राजास युद्ध थांबविण्यास सांगितले. त्याचा इष्ट तो परिणाम होऊन युध्द थांबले. कोल्हापूरकर छत्रपतींनी सावंतवाडीकर खेमसावंत इ.स. १८०३ मध्ये निवर्तल्या-वर त्यांजमध्ये गादीच्या वारसाचे तंटे सुरू झाले असतां त्याचा फायदा घेऊन सावंतवाडीकरांच्या मुलुखावर हल्ले चढविले. इ. स. १८०६ त कोल्हापूरकरांनी सावंतवाडीकरांचा पराभव केला. तेव्हा वाडीची राणी लक्ष्मीबाई हिने मदतीकरिता पेशव्यांस विनंती केली. पेशवे यांनी निपाणीकर देसाई यांना सावंतवाडीकरांच्या मदतीस पाठवून त्यांना चिकोडी आणि मनोली हे दोन्ही परगणे जिंकून घेण्यास सांगितले. ह्यामुळे निपाणीकर देसाई व कोल्हापूरकरांचे भांडण स. १८१६ पर्यन्त चालले.

कित्तूरकर देसाई हे खरे पेशव्यांचे मांडलीक. पण पेशवाईस लागलेल्या ग्रहणाचा फायदा घेऊन कित्तूरकरांनी स्वतः स्वतंत्र होऊन आजूबाजूच्या मुलुखात पाय पसरले. ब्रिटिशांची मर्जी राखण्याकरिता या देसाईनी ब्रिटिशांची फौज धारवाड, हुबळी, मिरज या मार्गे पुण्यास जात असता तीस अतिशय मदत केली[१]

१. ऐ. ले. सं., भा. १५, पृ. ८०५४.

पण स. १८०५ मध्ये इंग्रजांनी कित्तूरकरांचा नक्षा उतरविला. सोलापूरच्या किल्यात नानांच्या वेळेचे मुत्सद्दी व सावकार यांनी आपआपल्या इस्टेटी ठेविल्या होत्या हे बाजीरावास ठावूक होते. तेव्हा ती मालमत्ता जप्त करावी म्हणून पेशव्यांनी तेथील किल्लेदार रामचंद्र शिवाजी यांच्या सैन्यात फितूर करून त्या विरुद्ध बंड करावयास लावले. रामचंद्रपंतास कैद केले व सर्व चिजवस्तूंची जप्ती करविली.[1]

गोखले व निपाणीकर आप्पा देसाई ह्या दोघां सरदारांस दुसरे बाजीराव पेशवे यांनी सरंजाम दिले होते. रामचंद्रपंत अमात्याचा पराभव केल्यावर इ. स. १८०६ मध्ये गोखल्यांनी पंतांचा १८ लाख वार्षिक उत्पन्नाचा मुलूख आपल्या ताब्यात घेतला तो पेशव्यांनी वारंवार हुकूम सोडले असता परत दिलाच नाही.[2]

अप्पा देसाई निपाणीकर यांना दुसऱ्या बाजीरावांनी १० लाख उत्पन्नाचा सरंजाम १८०३ मध्ये दिला व त्यास सरलष्कर नेमिले. १९ व्या शतकाच्या सुरवातीपासून निपाणीकर कोल्हापूरकरांबरोबर सतत लढाई देत होते. त्यांनी-सुद्धा कांही मुलूख संपादिला होता.[3]

माधवराव रास्ते यांचे पूर्वज पेशव्यांचे सावकार. माधवराव रास्त्यांस दुसरे बाजीराव यांस पेशवे पद मिळण्यापूर्वी ११ लाख रुपये उत्पन्नाची जहागीर पेशवे दरबारातून दिलेली होती. नाना फडणिसांचे माधवराव हे सहाय्यकर्ते, म्हणून बाजीराव पेशवे यांनी त्यांना कैद केले. त्यांचा सरंजाम जप्त करण्याचे प्रयत्न झाले. पण होळकर पुण्यावर चालून येताच रास्त्यांची मदत मिळावी म्हणून त्यांचा जमीनजुमला त्यांजकडे राहू दिला. तरी पण रास्ते यांचा पेशव्यांसंबधीचा कलुषितपणा नाहीसा झाला नाही. त्यांनी पेशव्यांस मदत तर केली नाहीच उलट त्यांनी इंग्रजांची दोस्ती संपादन केली.[4]

सर्व दक्षिणी जहागिरदारांत पटवर्धन बलाढ्य होते. कर्नाटक व दक्षिण महाराष्ट्र या प्रदेशात पटवर्धनांकडे ३० लाख वार्षिक उत्पन्नाचा मुलूख होता. सांगलीकर पटवर्धनांकडे जो मुलूख सरंजामास होता त्या ऐवजी त्यांनी २,००० घोडेस्वार बाळगावयास हवे होते पण प्रत्यक्षांत ५०० शे घोडेस्वार बाळगून वर उलट पेशव्यांचा अतीव द्वेष ते करीत होते.[5] सर्व पटवर्धनात सांगलीचे चिंतामणराव पटवर्धन हे पराक्रमी, महत्त्वाकांक्षी, कधी एका जागी न बसणारे पेशव्यांचा सतत अतीव द्वेष करणारे होते. त्यांनी पंतप्रतिनिधीस

१. कित्ता, पृ. ८०५५.
२. पी. आर. सी., व्हॉ. १२, जून १६, १८११, पृ. २५.
३. कित्ता.
४. कित्ता, व्हॉ. ७, ११ जुलै १८०४, पृ. १२३.
५. कित्ता, व्हॉ १२, १ डिसें. १८०९, पृ. ४४१-४२.

पेशव्यांविरुद्ध मदत केली होती.[1] इ. स. १८०५ मध्ये त्यांनी कांही फौज जमा करून पेशव्यांच्या मुलुखात धुमाकूळ घातला होता. सावनूर व कित्तूरकरांच्या मुलुखावर छापे घालून अप्पा देसाई आणि बापू गोखले यांच्या मुलुखात शिरून लुटालुट केली. कर्नाटकातील पेशव्यांच्या मुलुखावर हल्ले चढवून त्यातील पाळेगारांकडून खंडण्या वसूल केल्या. पटवर्धनांच्या ह्या उपद्व्यापास इंग्रजांनी मुलुखगिरी स्वाऱ्या असे नांव देऊन त्या वेळीच बंद करावयास हव्यात अशा प्रकारचे पत्र गव्हर्नर जनरलला रेसिडेंटनी कलकत्त्यास पाठविले.[2]

शिंदे व भोसले यांजबरोबर इंग्रजांचे युद्ध चालू असता दक्षिणी सरंजामदारांच्या आपसात व पेशव्यांच्या मुलुखात लढाया दक्षिण महाराष्ट्रात व कर्नाटकात चालूच होत्या. सरंजामदारांच्या ह्या आपसातील मारामाऱ्यांमुळे म्हैसूरच्या रेसिडेंटला आपल्या सरहद्दीवर शांतता राखणे कठीण होऊ लागले. हे जहागिरदार एवढे उन्मत्त बनले की त्यानी पुणे दरबारची सत्ता झुगारून देऊन पुणे दरबारास कोणत्याही प्रकारची मदत देण्याचे ते उघडपणे नाकारू लागले.[3] यामुळे पेशवे दरबारास ह्या बंडखोरांस वठणीवर आणण्यासाठी फौजा ठेवाव्या लागल्या.

इंग्रजांची तैनाती फौज बाजीरावाचे साह्यास नसती तर दक्षिणच्या सरदारांनी बाजीराव पेशव्यांस कैदसुद्धा केले असते. यावेळी रेसिडेंट एल्फिन्स्टनने मोठ्या धूर्तपणे पावले टाकली. दक्षिणी सरदारांचे सरंजाम जप्त करून त्यांस चिरडण्यासाठी बाजीराव तैनाती फौजेची कुमक मागत होता. पण दक्षिणी सरदार एल्फिन्स्टनच्या बाजूचे होते. ह्या पिढीजात सरदारांना नाहीसे करणे इंग्रजास योग्य वाटले नाही. तसेच त्यांना बाजीरावापासून फोडून स्वतंत्र करणे हेही गैरच वाटले. तेव्हा दक्षिणेतील सरदार व पेशवा बाजीराव यांचा सलूख घडवून आणावा ह्यासाठी त्याने एक तडजोडीचा मसुदा तयार केला व अप्रत्यक्षरीत्या इंग्रज सरकारचे वजन वाढविले. बाजीरावाशी व दक्षिणी सरदारांशी पुष्कळ काळ वाटाघाटी केल्यावर पेशव्यांस व जहागिरदारांस मान्य होईल अशी खालील यादी तयार केली :—

(१) जहागिरदारांवरील पेशव्यानी पूर्वीचे द्वेष सोडून द्यावे;

(२) पूर्वीच्या सनदांस व रिवाजास सोडून नवीन मागण्या पेशव्याने त्यांजकडे इंग्रजांच्या परवानगीशिवाय करू नयेत;

(३) तैनात जाबत्यात ठरल्याप्रमाणे जहागिरदारांनी फौजा बाळगून पेशव्यांची नोकरी करावी;

(४) इंग्रजांचे परवानगीशिवाय त्यांचे सरंजाम जप्त करू नयेत;

(५) भेटीच्या व अन्य प्रसंगी पेशव्यांनी त्यांचा योग्य सन्मान ठेवावा;

---

१. ऐ. ले. सं. १५, ले. ८०२६.

२. पी. आर. सी., व्हॉ. ७, जून ९, १८०५, पृ. २४७.

(६) सनदेबाहेर जे प्रदेश सरदारांच्या ताब्यात असतील ते त्यानी सोडून पेशव्यांचे हवाली करावे;

(७) उभयतांमध्ये तक्रार उपस्थित झाल्यास जो निवाडा इंग्रज करतील तो उभयतांनी मान्य करावा;

(८) जहागिरदारांशी कोणताही करार परभारे करण्यास इंग्रज सरकार मुखत्यार आहे. हा मसुदा घेऊन एल्फिन्स्टन बाजीरावास आषाढ मासी पंढरपुरास भेटला. बरोबर पटवर्धन आदि जहागिरदार मंडळी होती. पंढरपूर क्षेत्री वरील करार एल्फिन्स्टनने बाजीरावाकडून पुरा करून घेतला.[1] ह्या करारानंतर दक्षिण सरदारांनी जो पेशव्यांचा मुलूख बळकावला होता तो त्यांस परत देण्यास इंग्रजांनी भाग पाडले. बाजीरावास मात्र आपली दक्षिण जहागिरदारांवरील सत्ता इंग्रजानी काढून घेतली यामुळे इंग्रजाबद्दल द्वेष वाटू लागला आणि आपले बळ वाढवण्याच्या मागे तो लागला.

**कोल्हापुरकरांच्या सत्तेवर नियंत्रण :**

सिधोजीराव निंबाळकर देसाई उर्फ आप्पासाहेब निपाणकर यांचे आणि कोल्हापूर राज्याचे संबंध १८०७ साली अधिकच बिघडले. सावंतवाडीच्या लक्ष्मीबाई भोसले यांनी छत्रपतींच्या विरुद्ध आप्पासाहेब निपाणकराकडे मदत मागितली. निपाणकर हे पेशव्यांचे जहागिरदार. तेव्हा पेशव्यांचा रुकार त्यांनी मिळविला आणि कोल्हापूरवर प्रचंड फौज घेऊन स. १८०७ च्या मे मध्ये स्वारी केली. हे युद्ध पुढे सहा महिने चालले. ४ फेब्रुवारी १८०८ रोजी कोल्हापूरच्या फौजेवर जोराचा हल्ला करून महाराजांच्या फौजेची दाणादाण उडविली. कोल्हापूरकरांचा दारुण पराभव झाला. सिधोजीराव निंबाळकरांचा जय झाला. त्यांनी चिकोडी, मनोली हे तालुके आपल्या ताब्यात घेतले आणि महाराजांच्या मुलीशी जून १८०८ मध्ये लग्न केले.

एवढे करूनही निपाणकर स्वस्थ बसले नाहीत. रत्नाकरपंत राजाज्ञा यांची सेवानिवृत्ती व तदनंतर सेनापती प्रीतीराव घोरपडे यांचे देहावसान हे पाहून निपाणीकरांनी पुन्हा कोल्हापूर राज्यास उपद्रव देण्याचा कार्यक्रम पूर्ववत चालू केला. त्यांच्याजवळ फार मोठी फौज होती. पेशव्यांची आतून फूस आणि इंग्रजांची तटस्थता यामुळे निपाणीकरांचे अधिकच फावले. त्यांनी कोल्हापूरवर मोहीम काढली. सिधोजीराव निंबाळकर, निपाणीकर यांचा पराभव करणे बरेच अवघड होते. त्यांचा उपद्रव तर थांबेना. अशा स्थितीत करवीरकरांनी आपले पुण्यातील वकील स्वरुपजी क्षीरसागर यांना ह्या कामी इंग्रजांची मदत मिळण्याची खपटप करावी असे सुचविले. त्याप्रमाणे एल्फिन्स्टनकडे वकिलाने मदतीची याचना केली. इंग्रजाने करवीरकरांच्या

१. पी. आर. सी. व्हॉ. १२, ८ जुलै १८१२, पृ. १८८-१८९; जुलै १९, १८१२, पृ. १२३; म. रि. उत्तर विभाग, भा. ३, पृ. ३७२.

राजकारणात शिरकाव करण्यासाठी चांगली संधी असल्याचे हेरले. वसईच्या तहानंतर पश्चिम किनाऱ्यावर एक सिंधुदुर्ग सोडला तर इंग्रजांची सत्ता अबाधित होती. तेवढा एक सिंधुदुर्ग आपल्या हाती आल्यावर भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील सर्व सत्ता आपल्या हाती येईल हे इग्रजांस ठावूक होते. करवीरकरांची अडचण ओळखून एल्फिन्स्टनने सिधोजीरावांचा बंदोबस्त करण्याअगोदर कोल्हापूरकरांनी इंग्रजांशी तह करावा असे सुचविले. दोन्ही बाजूनी तहाच्या अटी एकमेकांकडे सादर करण्यात आल्या. निपाणीकर व पेशवे ह्या तहाच्याविरुद्ध होते. पेशवे करवीरकरांस कळवीत की, रेसिडेंटचे म्हणणे बिलकूल ऐकू नये व त्यांना मालवणचा किल्ला देऊ नये. त्याच वेळी रेसिडेंटला कळवीत की, करवीरचे राज्य पेशव्यांच्या मुलुखातील असल्यामुळे कंपनी सरकारला त्याच्याशी स्वतंत्र तह करता येणार नाही. पण पेशव्यांचे म्हणणे मानून न घेता इंग्रजांनी आपल्या मतलबाकरिता दिनांक १ ऑक्टोबर १८१२ रोजी कोल्हापूरकरांशी तह केला[१]. या तहाची कलमे खालीलप्रमाणे :—

(१) चिकोडी व मनोळी या दोन्ही महालांवरील हक्क छत्रपतीनी सोडून द्यावेत आणि ते पेशव्यांच्या ताब्यात देण्यात यावेत;

(२) मालवणचे बंदर आणि त्याच्या परिसरांतील सिंधुदुर्ग, राजकोट, पद्मगड आणि सर्जेकोट ही सर्व ठिकाणे इंग्रजांना देण्यात यावीत;

(३) महाराज छत्रपतींनी कोठेही आरमार अथवा लढाऊ जहाज ठेवू नये;

(४) इंग्रज सरकारचा सल्ला घेतल्याशिवाय छत्रपतींनी कोणत्याही परकी सत्तेशी लढाई करू नये. असा काही प्रसंग उद्भवला तर प्रथम इंग्रजांकडे ते प्रकरण सोपवावे आणि त्यांनी त्याची तड लावावी. ह्या करारावर दिनांक ८ ऑक्टोबर १८१२ रोजी सह्या होऊन करवीरकर मांडलीक बनले.

**पेशवा इंग्रज सेनापती नेमतो :**

बाजीरावास जहागिरदारांचे भय वाटत होते पण ते बुडत नाहीत असे दिसले तेव्हा स्वसंरक्षणाकरिता इंग्रज अंमलदार ठेवून त्याजकडून नवीन फौज तयार करून घ्यावी असा विचार त्यांच्या मनात आला. तेव्हा वरकरणी पेंढाऱ्यापासून रक्षण करण्यासाठी आपणास अशी फौज तयार करावयाची आहे असे इंग्रजांस लिहून कळविले व इंग्रजांकडे नवी फौज ठेवण्याची त्याने घाई केली. इंग्रज अंमलदाराच्या हाताखाली नवी फौज पेशवा तयार करणार ही कल्पना इंग्रजांनाही मानवली. इंग्रजांनी पेशव्यांस तशी परवानगी दिल्यावर कॅप्टन फोर्ड नांवाच्या इंग्रज अंमलदारास ११ जुलै १८१३ पासून नोकरीस ठेविले आणि त्याचे अधिपत्याखाली नवी पलटणे तयार करविली. ह्या सर्वांस पगार दरमहा,

१. मेजर ग्रॅहॅम, स्टॅटिस्टिकल रिपोर्ट ऑफ कोल्हापूर, पृ. ५६७

इंग्रजी रीतीप्रमाणे, तिजोरीतून रोकड देण्याचे ठरले. एल्फिन्स्टन म्हणतो की "बाजीरावाने पलटणे तयार करावी हा आमचा फार हेतू होता, तो सिद्धीस गेला. त्यांचा पगार वगैरे खर्च उदारपणाने, सरळ हाताने आणि शहाणपणाने ठरला आहे" ह्या पलटणात मराठे थोडेच होते. बाकी सारे लोक कंपनीच्या मुलुखातील व हिंदुस्तानातील भरले होते. पेशवे सरकार इंग्रज सरकारशी स्नेहाने वागेल तोपर्यन्त त्यांची चाकरी आम्ही इमाने-इतबारे करू अशी त्या लोकानी आपण होऊन शपथ घेतली होती.

स्वसंरक्षणार्थ एक पलटण तयार करविल्यावर बाजीरावास आपण निर्भय असे वाटू लागले. आपली शक्ती उत्तरोत्तर वाढत जाऊन आपण बलाढ्य होऊ असेही त्यांस वाटले असावे पण हे मनचे मांडे होते. त्याला पलटणे हवी होती ती इग्रजांशी लढाई करण्यासाठी. त्याचे प्रत्यंतर बाजीराव पंढरपुरी गेले असता त्यांनी तिथे ब्रह्महत्या घडवून आणली ह्या घटनेत दिसून येते. पंढरपूर येथे जहागिरदार व पेशवे यांजमध्ये इंग्रजांच्या मध्यस्थीने करार झाला. त्यानंतर मुलुखात शांतता नांदावयास हवी होती. पण तसे काही घडले नाही. रास्त्यांना पेशव्यांनी अनेकदा हुकूम करूनही आपले बारगीर घेऊन पेशव्यांच्या सेवेस ते आले नाहीत[1]. अप्पा देसाई निपाणकरांचे वर्तन उद्वेगजनक राहिले. त्याने कराराप्रमाणे भोजे व यशकुंभा ही गावे पेशव्यांकडे परत केली नाहीच पण मंत्री आणि एल्फिन्स्टन यांजकडील बातमी गोळा करण्यास आलेल्या जासुदानांही त्याने हाकलून लावले. आपल्या जहागिरीतील प्रजाजनांशी तो इतक्या निष्ठूरतेने व क्रूरतेने वागला की काही लोक त्याच्या पाशवी कृत्यांनी मेलेसुद्धा. पटवर्धनांच्या जहागिरीतून त्याने रु. ३,६००० चा वसूल गोळा केला होता तोही देण्याचे नाकारले. प्रतिनिधींच्या जहागिरीतील पाच वर्षांचे उत्पन्न गोखले यांनी लाटले. त्यांनी प्रतिनिधींचा पराभव केला. म्हणून त्यास १६ लाख बक्षिसी दिली होती व त्यास लागेल तेवढे घोडेस्वार नोकरीस ठेवण्याची परवानगी दिली होती. पण ज्यावेळी त्याजवळील घोडेस्वारांची मोजणी केली त्यावेळी त्यांच्या सांगीच्या एक-तृतियांश संख्यासुद्धा भरली नाही. अशाच प्रकारच्या तक्रारी बाकीच्या सरंजामदारांच्या बाबतीत होत्या. खुद्द पटवर्धनांच्या बाबतीतसुद्धा असाच प्रकार होता. "पटवर्धनांस लष्करी नोकरीकरिता मुलूख सरंजामास लावून दिला. त्यावर ते अनेक वर्षे चरले आणि त्याच्या मोबदल्यात आमची चाकरी न करता भरपूर शिव्या दिल्या" असे पेशवे वारंवार म्हणत असत. "चोहोंकडे दंगे आहेत, उभे रहावयास ठिकाणा राहिला नाही. इकडील प्रांतात रीत राहिली नाही" अशा प्रकारचे चित्र त्यावेळच्या महाराष्ट्राचे होते. रास्ते, गोखले हे दोन्ही सरदार उन्मत्त झाले असून ते आपले ऐकत नाहीत असे पाहून बाजीराव पेशव्यांनी त्यांची जहागिर जप्त करण्याचा आपला मानस इंग्रजांकडे बोलून दाखविला. एल्फिन्स्टनने ह्या बाबतीत त्यास सबूरीचा सल्ला दिला. अशा तऱ्हेने एल्फिन्स्टन आणि बाजीराव पेशवे यांजमधील तेढ वाढत चालली.

---

१. पूना रे. कॉ. व्हा. १२, जांने. ६, १८१२, पृ. २९२.

गुजरातेतील मांडवी संस्थान पेशव्यांचे मांडलिक होते. वसईच्या तहाच्या वेळी पेशव्यांनी मांडवीबावत रु. ६५ हजार खंडणी इंग्रजांना देण्याचे कबूल केले होते, सर्व संस्थान नव्हे. इंग्रजांनी मांडवीवर आपला तावा मिळवून तेथे आपली वकिलात बसविली. इंग्रजांना गुजरातवर लक्ष ठेवण्याकरिता मांडवी आपल्या ताब्यात हवी होती, म्हणून बाजीराव पेशव्यांस बाजूस ठेवून बाजीरावाच्या विरोधास न जुमानता मांडवीस आपली रेसिडेन्सी बसविली. पेशव्यांशी इंग्रजांची कुरबूर खालील तीन कारणांमुळे जास्त वाढली :

(१) झाशी, काल्पी व सागर या जहागिरदांकडून पेशव्यांस खंडणी यावयाची होती ती व हिंदुस्थांतील इतर ठिकाणचा वसूल करण्यास बुंदेलखंडांत एक सर सुभा नेमण्याचा विचार बाजीरावांनी इंग्रजांस बोलून दाखविला. तेव्हा वसईच्या तहाकडे बोट दाखवून इंग्रजांनी ह्या स्वतंत्र नेमणुकीस व इतर राजे रजवाड्यांशी पेशव्यांनी अशा प्रकारे वागण्यास नकार दिला[१].

(२) वसई तहानंतर इंग्रजांच्या सहाय्याने बाजीरावास पेशवाई प्राप्त झाल्यावर त्यांनी निजामाच्या राज्यावरील आपला चौथाई हक्काचा वसूल निजामकडून येणे आहे हे इंग्रजांच्या निदर्शनास आणिले. इंग्रजांनी चौथाई वसुलीचे पेशव्यांचे हक्क मान्य केले पण पेशवे जेव्हा निजामाचे अदोनी आणि बेदर या प्रांतातून चौथ वसूल सैन्य पाठवून गोळा करण्याच्या गोष्टी बोलू लागले तेव्हा इंग्रजांनी ह्या गोष्टीस साफ नकार दिला[२]. (३) गायकवाडांकडे पेशव्यांचे खूप येणे होते, ते वसूल करावे म्हणून पेशव्यांनी गायकवाडांशी बोलणी करण्यास आपली माणसे पाठविण्याचा विचार व्यक्त केला. स. १८०२ नंतर गायकवाडीत इग्रजांशिवाय पान हालत नव्हते. इंग्रजांनी गायकवाड-पेशवे तंटा मिटविण्याचे आपल्यावर घेतले. बाजीराव पेशवे यांनी त्या बाबतीत स्वस्थ असावे असा सल्ला दिला.

पेशव्यांचा अहमदनगर किल्ला इंग्रजांच्या ताब्यात असून त्यात इंग्रजी सैन्य होते. हा किल्ला खाली करून आपणास द्यावा अशी मागणी बाजीरावानी केली असता तीस इग्रजांनी इ. स. १८१३ मध्ये नकार दिला[३]. अशा रीतीने बाजीरावांनी राज्याच्या बळकटीकरिता, स्थिरतेकरिता, राज्याच्या मालकीचा वसूल मिळून राज्याची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी सुचविलेले उपाय इंग्रजांनी हाणून पाडले. सर्व बाजूनी आपली मुस्कटदाबी होत असलेली पाहून बाजीराव चडफडले. ह्यातून मार्ग काढण्यासाठी सर्व मराठे सरदारांची एकी घडवून आणावी आणि एका शक्तीनिशी इंग्रजांशी मुकाबला करावा हा हेतू मनात आणून बाजीरावांनी शिंदे-होळकरांचे आपसातील वैमनस्य नाहीसे करून त्यांचे सहाय्य आपल्या कार्यास मिळविण्यासाठी आपला वकील बाळाजी

---

१. पी. आर. सी. व्हॉ. ७, ६ मे १८०८, पृ. ३४७.

२. कित्ता, ३० मे, १८१०, पृ. ४६५.

३. कित्ता, व्हॉ. १२, ५ नोव्हेंबर, १८१३, पृ. ३००.

कुंजर यांस शिंदे होळकरांकडे वसईच्या तहानंतर पाठविले होते[१]. बाळाजी हिंदुस्थानात ४ वर्षे राहिला व इ. स. १८०७ मध्ये बरोबर शिंद्यांचे पत्र घेऊन परतला. शिंदे यांनी आपण पेशव्यांचे नोकर असून इंग्रजांस घालविण्याच्या कामात बाजीरावास इमाने इतबारे मदत करू असे कळविले होते. हे पत्र इंग्रजांच्या हाती मिळाले[२].

बाजीरावानी सातारचे छत्रपतीशी चांगले संबध राखण्याच्या उद्देशाने त्यांचा तनखा दरसाल रु. १०,००० केला. ह्यांत पेशव्यांकडून वेळोवेळी भेटीच्या वेळी नजराणा म्हणून देण्यात येणाऱ्या रकमेचा समावेश नव्हता तसेच छत्रपतींना आदराची व वडीलकीची वागणूक देण्यात येऊ लागली[३].

भिल्ल आदि रानटी लोकांच्या धाडीपासून रयतेचा बचाव करावा म्हणून नारसिंह खंडेराव व मनोहरगीर गोसावी ह्या दोन सरदारांकडे त्यांच्या बंदोबस्ताचे काम सोपविले. देवगड, विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, रायगड, वसई, शिवनेर, माहुली, त्रिंबक आदि किल्लेदारांना पत्रे पाठवून किल्ल्यात धान्याचा व शस्त्रास्त्रांचा साठा करण्यास फर्माविले.

स. १८०३ पासून ते १८०४ पर्यन्त ह्या ना त्या कारणाने पेशव्यानी आपले लष्कर वाढविले. शेवटी इंग्रजांनी त्यांस इग्रज पलटण ठेवण्यास सांगितले. ते पटून बाजीरावांनी दोन इंग्रज बटालियन आपल्या सेवेत ठेविली[४]. हे वर सांगितले आहे.

शिंदे व भोसले यांचेशी इंग्रजांचे युद्ध झाल्यानंतर पेंढारी पेशव्यांच्या मुलुखावर हल्ले करू लागले. तेव्हा त्यांच्या मुख्यास जहागिर देऊन त्यास गप्प करावे असे पेशव्यांस वाटून त्यानी तशी परवानगी इंग्रजांकडे मागितली. पण इंग्रजांनी पेंढारी पेशवे युती आपणास भारी पडेल हे लक्षात घेऊन परवानगी नाकारली. तरीही पेशव्यांनी गुपचूपपणे बाळोजी कुंजरामार्फत पेंढाऱ्यांचा पुढारी चितू याजकडून इंग्रजांविरुद्ध सहाय्य करण्याचे आश्वासन मिळविले[५].

● ● ●

१. कित्ता, व्हॉ. ११, दि. ५ मार्च १८०७, पृ. ३१९.

२. कित्ता, व्हॉ. ७, ५ मे १८०७, पृ. ३०३

३. कित्ता, ३० जून ,१८१०, पृ. ४७५.

४. कित्ता, १४ जुलै, १८१२, पृ. १८४.

५. पी. सी. गुप्ता, पृ. १६०; म. रि.उत्तर विभाग, ३, पृ. ३७७.

# इंग्रजांचा गायकवाडींत शिरकाव

## कालसूची

| | |
|---|---|
| १८००, सप्टेंबर . . | गोविंदराव गायकवाडांचा मृत्यू. |
| १८०२, मार्च ३ . . | कर्नल वॉकर फौजेसह बडोद्यास दाखल. |
| १८०२, जून ३ . . | आनंदराव गायकवाड इंग्रजास चिखली व सुरत अठ्ठाविशी हे प्रांत इनाम देतात. |
| १८०२, जून ६ . . | गायकवाडांशी इंग्रजांचा तह. |
| १८०३ . . . . | कर्नल वॉकरचे कामगार गायकवाडीत दाखल. |
| १८०३ . . . . | कॅप्टन सेटन 'टरनेट' नावाचे जहाज घेऊन द्वारकेस येतो. |
| १८०५ . . . . | कर्नल वॉकर यास काठेवाडीतील राजे-रजवाड्यांकडून मुलुखगिरीचा बंदोबस्त करण्यासंबंधी पत्र. |
| १८०६, नोव्हेंबर १८ . . | बाबाजीना गायकवाडीकडून खाजगी दरकाच्या कामाची सनद. |
| १८०७, फेब्रुवारी ७ . . | सेनापती बाबाजीस गव्हर्नर डंकनचे पत्र. |
| १८०७, ऑगस्ट . . | कर्नल वॉकर व सेनापती बाबाजी आपआपल्या फौजेनिशी काठेवाडात दाखल. |
| १७०७, ऑगस्ट . . | कर्नल वॉकरचा फौजेसह मोरवीतील मुट्ठ गावी मुक्काम. |

## २७

## इंग्रजांचा गायकवाडीत शिरकाव

दमाजी गायकवाडापासून गुजरातेत गायकवाड सर्व सत्ताधीश म्हणून वावरत होते. फत्तेसिंगबाबा निवर्तल्यावर सेना सरखासखेलीची वस्त्रे गोविंदराव यास दिली.

गोविंदराव महाराज पुण्यास असता त्यास ज्या सरदार मंडळीनी सहाय्य केले, त्यात रावजी पुण्याहून निघाला आणि बडोद्यास आला[1]. गोविंदरायाना इ. स. १७९३ त गादी प्राप्त होताच त्यानी रावजीच्या उपकाराबद्दल आपली दिवाणगिरी त्यास दिली. त्याचा भाऊ बाबाजी यास आपल्या सैन्याचे आधिपत्य दिले. गोविंदराव बहुधा रावजीच्या विचाराने चालत. बाजीराव पेशव्यांनी दरसाल ५ लक्ष रु. घेण्याच्या कराराने अहमदाबादची वहिवाट गायकवाडांस दिली.

### कर्ज व बहादरी यांचे बीजारोपण :

गोविंदराव गादीवर बसल्यानंतर पुणे दरबारातून त्यांना आठ लक्षांची सूट मिळाली होती, तरी त्यांना नजराण्याबद्दल व कर्जाबद्दल रु. ७८,३३,२१२ द्यावे लागून शिवाय रु. ३९,८२,७८९ बाकी राहिले होते[2]. या कर्जाच्या फेडीसाठी गोविंदरावानी सावकार लोकांचे कर्ज काढले होते. कर्जाचा मोबदला म्हणून सावकारांकडे संस्थानचे बहुतेक महाल गहाण लावून दिले होते. पण ज्यांच्याकडे गहाण किंवा इजाऱ्याने महाल लावून दिले होते तेच त्याचे मालक झाले होते. न्याय-मनसुबा सर्व त्यांच्या हातात होता. जरी राज्याची सर्व सूत्रे सरदारांच्या हाती होती तरी तिजोरीत पैसा नसल्यामुळे ती सत्ता त्यांच्या हातात फार काळ टिकली नाही. ज्याच्याजवळ सैन्याला देण्याला पैसा होता त्या व्यापारी लोकांच्या हातांत ती सत्ता गेली. हे व्यापारी लोक अरब शिबंदी या भाडोत्री फौजेस पैसा देत. त्यामुळे ही अरब फौज या व्यापाऱ्यांच्या हुकमतीखाली होती.

### आनंदरावास गादी प्राप्त :

तारीख २० सप्टेंबर १८०० ला गोविंदराव महाराज वारले तेव्हा दिवाण रावजी आप्पाजी यानी आनंदरावास गादीवर बसवून राज्यकारभार सुरू केला.

---

१ पू. रे. कॉ. व्हॉ., २, ले. २१५.

२ इलियद, रुलर्स ऑफ बरोडा, पृ. ५८.

**अरबांचा दंगा :**

यावेळी खजिन्यात अरबांचे पगार देण्यास पैसा नसल्यामुळे त्या अरब फौजेपासून रावजीस व आनंदराव महाराज याना फार त्रास होऊ लागला. एकदा तर रावजीवर व आनंदराव महाराजांवर कैद होण्याचा प्रसंग आला होता, कारण या समयी लष्करातील लोकांचे पगार बरेच चढले होते. या सबबीचा लाभ घेऊन कान्होजीने अरब लोकांत फितूर करविला. त्यांनी बडोद्याचे दरवाजे बंद करविले व शहरात तुफान चालविले[१]. बाबाजीने ही स्थिती पाहून मीर कमालुद्दीन यास मध्यस्थी घालून, सामळ बेचर व मंगळ पारख यांची अरबांस बहादरी (हवाला) देववून कित्येकांचे पगार चुकते करून हा दंगा शांत करविला.

**पुणे दरबारकडून मदतीचा नकार :**

अरबांच्या ह्या अत्याचाराशिवाय शिंदे व होळकर यांजकडून बडोद्यास त्रास पोचत होता[२]. कच्छ, जामनगर वगैरे राज्यांनी काठेवाडात बंडाळी चालविली होती ती मिटविणे हे व त्याशिवाय वरप्रमाणे बडोद्याची स्थिती या वेळी फारच बिघडलेली असल्याने दिवाण रावजी याने पेशवे सरकारकडे गायकवाडांच्या संरक्षणासाठी मदत मागितली. परंतु ती देण्याचे त्या सरकारात कोणत्याहि प्रकारचे सामर्थ्य त्यावेळी नव्हते. पेशवे सरकारने रावजीस स्पष्ट कळविले की, "इकडे बखेडा चालू आहे तेव्हा गायकवाडास मदत कशी देता येईल? याचा विचार करून तुम्हास वाटेल त्या रीतीने तुमचा बंदोबस्त तुम्ही करून घ्या. इकडून मदत मिळू शकणार नाही[३]".

**गायकवाडांस इंग्रजी मदत :**

पेशवे सरकारकडून हा जवाब मिळाल्यामुळे रावजीचा निरुपाय झाला. इतक्यात मल्हाररावाने इंग्रज सरकारजवळ मदत मागितल्याचे रावजीस समजले. मल्हाररावाने इंग्रज सरकारजवळ मदत मागितली व मदतीदाखल इंग्रजांस चौऱ्यांशी परगणा व सुरतचा चौथ देण्याचे कबूल केले. चिखली परगणा देऊ केला "गव्हर्नर डंकनने रावजीची विनंती मान्य केली. रावजीच्या मदतीकरिता कर्नल अलेक्झांडर वॉकर याच्याबरोबर थोडेसे लष्कर देऊन त्यास बडोद्यास पाठविले[४]. अशा रीतीने गायकवाड राजघराण्यातील तंटा तुटण्याकरिता परकीयाकडे आपोआप गेला. तारीख ३ मार्च १८०२ ला कर्नल वॉकर फौजेसह बडोद्यास आला. त्याचे बडोद्यास स्वागत करण्यात आले. या फौजेच्या मदतीने गायकवाड सरकारने मल्हाररावाचे बंड मोडून काढले.

---

१ SPDD 117 of 1801, pp. 6990—98.

२ कित्ता, No 125 of 1802, pp, 4455—78.

३ का. प्र. ३. सा. अंक ९, पृ. ६४.

४ ब रा ऐ वें खं. ४, ले. २५.

### इंग्रजांस इनाम :

यावर आनंदराव खूष झाले. त्यांनी इंग्रजास तारीख ३ जून १८०२ च्या सनदेनें[1] चिखली व सुरत अठाविशी हे प्रांत डंकनच्या नांवे इनाम दिले. मदतीस आलेल्या फौजेचा खर्चहि देण्याचे कबूल केले.

### इंग्रजांशी संरक्षणाचा तह :

शेवटी बडोदे राज्याचे संरक्षण व्हावे या उद्देशाने दिवाण रावजी व सेनापति बाबाजी यानी ईस्ट इंडिया कंपनीचे मुख्य प्रतिनिधी जॉनथन डंकन यांचेशी इ. स. १८०२ मध्ये एक तह केला. गायकवाड सरकारच्या शत्रूंच्या पारिपत्या-साठी अथवा बडोदे राज्याच्या संरक्षणासाठी कंपनीने दोन हजार फौज, शिवाय, तोफखाना कायमचा ठेवावा. तसेच या सबसिडिअरी अर्थात तैनाती फौजेच्या खर्चास धोलका परगण्याचा व मल्हाररावाच्या ताब्यात नसलेल्या नडियाद तालुक्याचा वसूल इंग्रजांस मिळावा असे ठरले. तसेच, दोन्ही राज्यात एकमेकांचे वकील नेमावे अशा प्रकारचा करार तारीख ६ जून रोजी झाला. ईस्ट इंडिया कंपनीस आनंदराव महाराजांनी लिहून दिलेल्या कराराखाली कर्नल अलेक्झांडर वॉकर यानेही कंपनी सरकारतर्फे असा शेरा मारला की, "जोपर्यन्त गायकवाड सरकारचे व कंपनीचे राज्य कायम राहील तोपर्यंन्त यांच्या संरक्षणाचे जोखीम आमच्या कंपनीने अंगावर घेतले आहे हे मी पूर्ण आश्वासन देतो".

कंपनीने जो पूर्वोक्त करार केला तो गायकवाड सरकारनेंहि कबूल केला. या कलमात कंपनीने दिवाण रावजी व त्यांचे सर्व आप्तेष्ट यांचे संरक्षण करण्यासंबंधीचे कलम घातले[2].

### वसईच्या तहाने इग्रजांस गुजरातचा मुलुख मिळतो :

पण हा तारीख ६ जूनचा करार कोर्ट ऑफ डायरेक्टरने मान्य केला नाही. हा तह १७८२ च्या सालबाईच्या तहाच्या अगदी विरुद्ध आहे असे मत त्यानी दिले. मात्र गायकवाडांनी जो मुलूख या करारान्वये देऊ केला होता तो त्यांचा त्यास परत द्यावा, अशा प्रकारचा इंग्रजी खलिता प्रसिद्ध झाला नाही. इतक्यात यशवंतराव होळकरांच्या पुण्यातील तुफानी धुमाकुळामुळे पेशवा बाजीराव पळून इंग्रजांच्या आश्रयास गेला. त्याने आपणास पेशवाई इंग्रजानी मिळवून द्यावी म्हणून डिसेंबर १८०२ मध्यें वसई येथे तह केला. त्या तहाच्या कलमात गायकवाडांशी झालेल्या तहाचा निर्देश करून इंग्रजानी त्या तहास मंजुरी दिली. १८०२ च्या वसई तहाने पेशव्याने मराठ्यांच्या स्वातंत्र्याचे दान इंग्रजांच्या हातावर ठेवले. सुरतवरील मराठ्यांचा मालकी हक्क इंग्रजांस बहाल केला त्यामुळे सुरत जिल्हा पूर्णपणे इंग्रजी अमलाखाली आला.

---

१. किता, ले. ३२.

२. SPDD No. 129 of 1802, pp. 6081—86,

तैनाती फौजेच्या खर्चाकरिता त्याने गुजरातेतील पेशवाई अंमलाखालील रु. १२,२८,००० वसुलाचा मुलूख इंग्रजांस तोडून दिला. बडोदे व पुणे दरबाराच्या वादात इंग्रजांची मध्यस्थी मान्य केली. गायकवाडांस या तैनाती फौजेच्या खर्चाबद्दल रु. ७,८०,००० (सात लक्ष ऐंशी हजार) एवढ्या उत्पन्नाचा मुलूख इंग्रजांस तोडून द्यावा लागला. अशा रीतीनें इंग्रज गुजरातेत व गायकवाडीत घुसले[1].

काठेवाडात बाबाजीच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यात त्याने गायकवाड सरकारतर्फे जी कामगिरी बजाविली ती फारच मोठी होती. बाबाजीची काठेवाडातील पहिली स्वारी[2] इ. स. १८०३-१८०४, दुसरी इ. स. १८०५-१८०६ मध्ये व तिसरी इ. स. १८०७-१८०८ मध्ये पुरी झाली. या तिन्ही स्वाऱ्यात त्याने गायकवाड सरकारची सत्ता काठेवाडात व महीकाठ्यात मजबूत बसविली. "रासमाळा" नांवाच्या ग्रंथात फोर्बसने भाट-चारण लोकांच्या कवनांमधून बाबाजीच्या काठेवाडातील मुलुखगिरीच्या स्वाऱ्यांचे वर्णन केले आहे.

बाबाजीने पोरबंदर, चुडासमा वगैरे राज्ये काबीज करून, काठेवाडातील एकंदर चार हजार राज्यावर गायकवाड सरकारची खंडणी बसविली. कोणीही त्याच्यासमोर उभा रहात नसे. सर्व सौराष्ट्र प्रांत जिंकून त्याने सिहोरवर स्वारी केली[3]. बाबाजीने काठेवाडी मुलुखगिरी करून एकंदर रक्कम रु. ६७,६७,२८८ आणली. त्याने सरकारी चाकरी एकनिष्ठेने केली. कडी व काठेवाड प्रांती स्वारी करून बंदोबस्त चांगला केला म्हणून सरकारातून त्यास तारीख १८ नोव्हेंबर १८०६ रोजी खासगी दरकाच्या कामाची सनद मिळाली[4].

**संरक्षण व कायमच्या खंडणीचा बंदोबस्त :**

गुजरात काठेवाडातील पेशवे भागाचा वसूल गायकवाड करीत होते, पण १७९८ ते १८०२ पर्यन्त जवळजवळ चार वर्षे या वसुलापैकी कांहीच वसूल झाला नव्हता म्हणून एकंदर बाकी सुमारे ५० लाख तुंबली होती.

१८०२ मध्ये गायकवाडीत इंग्रजांचा शिरकाव झाल्यानंतर बाबाजीने व रावजीने काठेवाडच्या मुलुखगिरी स्वारीकरिता इंग्रज सैनिकांच्या दोन तुकड्यांची मदत मागितली होती. कर्नल वॉकरने गायकवाडांची मागणी वरिष्ठ सरकारास कळविली. तेव्हा गव्हर्नर डंकनने १,८०० सैनिक पाठविण्याकरिता सुप्रिम सरकारची परवानगी मागितली. पण शिंद्यांबरोबरच्या झटापटीत इंग्रजांना सगळी शक्ती एकवटावी लागल्यामुळे काठेवाडात सैनिकी

१ खोबरेकर, गुजरातेतील मराठी राजवट, पृ. १०४.

२ कित्ता, पृ. १४२ Elliot, Rulers of Baroda, pp. 123-124.

३ Forbes, Part II, pp. 110-111.

४ बडोदे, रेकॉर्ड फे. नं. ४, द. नं. ३९६, पु. ७, नि. २१; खोबरेकर, गुजरातेतील मराठी राजवट, पृ. १४२.

मदत पाठविण्याचा विचार झाला नाही. बाबाजी मात्र या मदतीची वाट न पाहता काठेवाड मुलुखगिरीवर गेला. शिंद्यांबरोबर तह झाल्यावर १८०४ मध्ये डंकनने ऑर्थर वेलस्लीला बाबाजीच्या काठेवाड कामगिरीबद्दल कळविले[1].

**इंग्रजांचा काठवाडात शिरण्याचा हेतू :**

तत्पूर्वी १ एप्रिल १८०३ ला गव्हर्नर डंकनने वडोदा रेसिडेंट कर्नल वॉकरला कळविले की, सैन्य पाठवून वसुली करण्यापेक्षा एखादी दुसरी जादा सोईची योजना अंमलात आल्यास पहा. त्याचा विचार असा की पेशवा व गायकवाड यांची सैन्ये दरवर्षी काठेवाडात दौडविण्यापेक्षा एखादी कायम वसुलाची पद्धती अमलात आल्यास चांगले.

ही गोष्ट कर्नल वॉकरने गायकवाड सरदारांच्या कानावर घातली, तेव्हा रावजी आप्पाजीस प्रथमतः ही योजना पसंत पडली नाही. बाबाजीस मल्हारराव गायकवाडाचा व मुकुंदरावाचा बंदोबस्त करण्याकरिता इंग्रजांच्या तैनाती फौजेचा वापर करावयाचा होता. रावजींचे व बाबाजीचे म्हणणे पडले की, काठेवाडातील तालुकदार तलवार दाखविल्यावर खंडणी देण्यात भूषण मानतात तेव्हा सैन्य पाठविल्याशिवाय ते खंडणी देणार कसे[2]? तरी पण कर्नल वॉकरने काठेवाडात आपल्यातर्फे आपला प्रतिनिधी म्हणून मौलवी महमद अली याची रवानगी केली. त्याजबरोबर तालुकदारास देण्याकरिता पत्रे दिली[2].

१८०३ मध्ये कॅप्टन सेटन हा टरनेट नांवाचे लढाऊ जहाज घेऊन द्वारकेस आला आणि तेथील मुख्यांकडून त्यानी चांचेगिरी करून जी ब्रिटिश जहाजे लुटली होती त्यांजबद्दल भरपाई मागू लागला.

ह्या वेळपर्यन्त इंग्रजांस काठेवाडची पूर्ण माहिती नव्हती[3]. ती व्हावी, काठेवाड जमल्यास आपल्या छत्राखाली यावा ही मनिषा इंग्रजांची. त्यास अनुसरून कर्नल वॉकरने बाबाजीबरोबर काठेवाडात रवाना केलेला आपला हस्तक मौलवी महमद अली याने काठेवाडातील तालुकदारास भेटून त्यांच्या इंग्रजांविषयीच्या मताचा कानोसा घेतला. भेटीत त्यास असे समजले की, काही तालुकदार भावनगरकर, जुनागडकर आणि गायकवाड यांच्या मुलुखगिरीमुळे त्रस्त झाले असून ते इंग्रजांच्या संरक्षणाखाली येण्यास तयार आहेत. तेव्हा त्याने तशा आशयाचे विनंती अर्ज लाला, शार्दूल, ज्योता, दोसा, देवा, जेता, सुरती, उन्नाडा, फलारिया आणि असे कित्येक तालुकदार यांजकडून लिहवून घेतले आणि बडोद्यास कर्नल वॉकरकडे पाठवून दिले[3].

१. Wallace, the Gaikwar and his relations with the British Government, pp. 87-88.

२. कित्ता.

३. BGS, XXXVII, Walkar, Report, p. 40.

कर्नल वॉकरला हे विनंती अर्ज म्हणजे यक्षिणीची कांडीच सापडली असे वाटू लागले. "भावनगरकर व जुनागडकर हे आमच्यावर वारंवार स्वाऱ्या करतात, आमचा मुलूख वैराण करतात, त्यांजपासून आम्हांस कंपनी सरकार-कडून संरक्षण मिळाल्यास आम्ही आमच्या राज्याचा काही मुलूख संरक्षण खर्चाकरिता तोडून देण्यास तयार आहोत". अशा आशयाची अनेक पत्रे कर्नल वॉकरच्या हातात आली[१]. त्याचीच "री" आणखी काही संस्थानिकानी ओढली आणि सरकारच्या संरक्षणाची मागणी केली[२].

कर्नल वॉकरने काठेवाडातील संस्थानाना अभय देण्याची आपली योजना आखली आणि ती मंजुरीकरिता सुप्रिम कोर्टाकडे रवाना केली. त्या योजनेत त्याने तीन हेतु प्रतिपादिले होते :

(१) मुलुखगिरीच्या नावाखाली गायकवाडी सरकारला त्या प्रांतातून खंडणी मिळविण्याकरिता सैनिकी मदत;

(२) इंग्रजी कारभारविषयक खाते त्या प्रांती उघडणे;

(३) ज्या राजेरजवाड्यांनी इंग्रजांच्या मदतीची मागणी केली होती त्याना स्वतःच्या छत्राखाली घेऊन संरक्षण देणे[३].

तसेच, ही योजना अमलात आल्यास, इंग्रजांचे काठेवाडातील खालील हितसंबंध रक्षिले जाण्याची शक्यताहि त्याने प्रतिपादिली होती[४].

(१) बावाजीला मदत पाठविण्याने त्या सरदारांजवळ वाढलेले अमर्याद सैन्यबळ कमी होईल;

(२) मुलुखगिरी-वसुलाचा विनियोग योग्य कारणाकरिताच होतो हे पहाणे सोपे जाईल;

(३) आपणाला मिळावयाच्या पैशाच्या वराता या मुलुखगिरी-वसुलावर मिळविता येतील;

(४) वाटल्यास, काठेवाडात आपणास काही मुलूखही घेता येईल तसेच पोरबंदरसारखे बंदर आपल्या ताब्यात आणता येईल. असे झाले तर पोरबंदरवाल्यानी पर्शियन प्रतिनिधीचे जहाज ज्यांच्यासमोर फुटले असता त्यातील माल लंपास केला, त्याचा सूड घेता येईल. तसेच फ्रान्स व पोर्तुगीज या तद्देशीय सत्ताधीशाना अरबी समुद्रापासून दूर ठेवणे येथील बंदर ताब्यात असल्यास सोपे जाईल;

(५) गायकवाड व पेशवे यांच्या हितसंबंधास बाध न आणता मुलुखगिरी पद्धतीत सुधारणा करता येईल;

(६) बाजूच्या कच्छचा मुलूख इंग्रजांना घेणे सोईस्कर होईल.

---

१. कित्ता, पृ. ४.४२.

२. Gaikwads of Baroda. Vol. VII p. 508.

३. कित्ता, पृ. ६१०.

४. Wallace, pp. 93-94. खोबरेकर, गु. म. रा. पृ. १४६.

बोर्ड ऑफ डायरेक्टर्सकडून वॉकरच्या योजनेस मान्यता आल्याशिवाय त्यास काठेवाडातील राजेरजवाडयानी केलेल्या विनंती अर्जास उत्तर देता येईना. त्याने या तालुकदारास आपल्या भेटीस बडोद्यास बोलाविले. विनंती अर्जाबद्दल त्यास कळून चुकले की जोडिया बंदर, मोरवी, चितळ, जेतपूर आणि कंडोळा आदि संस्थाने इंग्रज सरकारच्या आश्रयाची अपेक्षा करतात व असे अभय मिळाल्यास ते कंपनी सरकारला काही मुलुख तोडून देण्यास तयार आहेत[१].

१८०५ मध्ये खुद्द कर्नल वॉकरला काठेवाडातील बहुतेक राजेरजवाडयाकडून मध्यस्थीने मुलुखगिरीचा बंदोबस्त करण्यासबंधींची पत्रे आली[२].

याच सुमारास पुन्हा बाबाजीनेहि इंग्रज सैन्याच्या मदतीची मागणी केली आणि काठेवाड बंदोबस्ताकरिता कायम योजना आखण्यास विनविले[३].

काठेवाडात बाबाजीच्या ज्या तीन स्वाऱ्या झाल्या, त्यात त्याने खंडणीची रक्कम रु. ५१,०३,९८३ वसूल केली.

या तीन स्वाऱ्यात त्याने सहा वर्षाची चढलेली खंडणी वसूल केली. म्हणजे दरसाल सरासरीन रु. ८,५०,४९३ रुपयांची खंडणी गायकवाड सरकारास सार्वभौमत्वाच्या हक्काबद्दल त्याने मिळवून दिली.

गुजरातेत मराठयांची जी राज्यसत्ता चालू होती ती परगणे इजाऱ्याने देऊन अथवा गहाण ठेवून पैसे एकत्र करणे ह्यापेक्षा जास्त वाढलेली होती असे आढळून येत नाही.

बाबाजीने गायकवाड सरकारची सत्ता वाढवून त्यांचे वर्चस्व काठेवाडात चिरकाल कायम रहावे व त्यांच्या आश्रयास आलेल्या राजांचे अथवा त्यानी पराक्रमाने जिंकलेल्या राज्यांचे कायमचे हित व्हावे याकरिता कायमचा बंदोबस्त करण्याचा विचार ठरविला व त्या कामास त्याने महाराजा आनंदराव गायकवाड यांचेकडून राजाज्ञा मिळविली[४].

काठेवाडातील खंडणीचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी बाबाजी व कर्नल वॉकर यानी फौजेसह इ. स. १८०७ च्या ऑगस्ट महिन्यात मोरवीच्या ताब्यातील गूटू गावाजवळ मुक्काम केला[५]. काठेवाडातील एकोणतीस संस्थानास बाबाजीने व कर्नल वॉकर याने आपल्या उद्देशाची पत्रे पाठवून त्यास कायमचा बंदोबस्त करून घेण्यासाठी आपआपले वकील गुटू मुक्कामी पाठविण्याविषयी सूचना दिली.

या आवाहनपत्रात असा आशय दर्शविला होता की, "दरसाल गायकवाड सरकारची फौज काठेवाडात येऊन खंडणी वसूल करते. त्यामुळे प्रजेला

१. Gaikwads, Vol. VII, pp 510-11.

२. कित्ता, P. 517.

३. कित्ता, P. 515.

४. खोबरेकर, मराठी राजवट पृ. १४८.

५. GBB P. 322.

व काठेवाडातील राज्याना फारच नुकसान व त्रास भोगावा लागतो. काठेवाडातील सर्व राज्य-मंडळापासून खंडणी घेण्याचा गायकवाड सरकारांचा हक्क निर्विवाद शाबित झालेला आहे त्यामुळे आता तो आकडा कायम होण्याची खास जरुर आहे. ह्या समयी तो नक्की न केला तर फौजेस येण्याची जरुर पडेल व त्यामुळ काठेवाडातील राज्यकर्त्यांस फारच त्रास व नुकसान सहन करण्याचा प्रसंग येईल. तुम्ही या समयी आपला पक्का बंदोबस्त करून न घ्याल तर तुम्हास त्याचे फळ मिळणार नाही. गायकवाड सरकारच्या व त्यांच्या मदतीस आलेल्या कंपनीच्या फौजेशी सामना करण्यास तुम्ही तयार होता, हे कोणत्याहि बाजूने चांगले नाही. अशा लढाईचा परिणाम दंड व लढाईचा खर्च देण्याचे रुपाने नेहमी तुम्हांस भोगावा लागतो. या कारणाने तुम्ही आपले मुखत्यार वकील आमचे मुक्कामावर जरुर पाठवावे[१]. ही सूचना झालावाड प्रांतातील ९ राज्यांना, गोहिलवाड प्रांतातील ४ व हालार प्रांतातील १६ मिळून २९ राज्यकर्त्यांस दिली होती. लिंबडी, वढवाण, धांगध्रा, सायला, चुडा, मुळी, सुदामडा, धांधलपूर, वांकानेर, भावनगर, वळा, लाठी, देवाणी, मोरबी, वाळंभा, माळिया, धोळ, नवानगर, पोरबंदर, बेटवा, जुनागड, गोंडळ, जेतपूर, राजकोट, कोडा, सरधार, राजपुरा आणि जसदण या २९ राज्यांना ही सूचना दिली होती.

या सूचनेचा कांही राज्यांनी चांगला स्वीकार केला व कांही राज्यकर्त्यांनी तर हे सूचनापत्र विचारातच घेतले नाही. ज्या राज्यांकडून योग्य प्रतिनिधी येतील, त्यांचा मात्र बंदोबस्त करावा व जे न येतील त्यांच्या संबंधाने पाठीमागून योग्य तो विचार करिता येईल, असे बाबाजीने ठरविले होते. पूर्वोक्त पत्रांचा जबाब कित्येक राज्यांकडून अनुकूल आला, व कित्येकांनी तर जुन्या तक्रारी उपस्थित करण्याचा व आमची गेलेली गावे परत द्याल, तर कायमचा बंदोबस्त करण्यास आम्ही तयार आहोत असे कळविले[२].

या महत्त्वाच्या कामास सुरवात करण्यापूर्वी मुंबईचा गव्हर्नर जोनाथन डंकन याने दिनांक ७ फब्रुवारी १८०७ च्या पत्राने बाबाजीस कळविले होते की "हल्ली ईश्वर कृपेने बंदोबस्तास प्रारंभ झाला त्याविषयी तुम्हास इकडील हीच सल्ला आहे कीं, रेसिडेंटच्या अनुमतीने व तुम्ही आपल्या अक्कलहुशारीने श्रमात कमी न होता, योग्य रीतीने बंदोबस्त अंमलात आणावे. दिवाण सिताराम रावजी यास राज्यकारभाराच्या मोठ्या कामात चांगली मदत द्यावी".

काठेवाडात हे कायमचा बंदोबस्त करण्याचे काम सुरु झाल्यानंतर आनंदराव महाराजांनी बाबाजीस राज्यकारभारातील महत्त्वाच्या कामाकरिता बडोद्यास बोलावून घेतले. त्यामुळे त्यास ते काम अपूर्ण स्थितीत ठेवून बडोद्यास परत जावे लागले. तथापि, त्याने आपला कारभारी विठ्ठलराव देवजी यास पुढे कशा रीतीने अंमलात आणावयाचे त्याची धोरणे ठरवून दिली व नंतर तो

१. कित्ता.

२. खोबरेकर, मराठी राजवट पृ. १५०.

बडोद्यास गेला. बाबाजीने मुत्सद्दीपणाचे शिक्षण विठ्ठलरावास दिलेले असल्याने व वेळोवेळी बाबाजी बडोद्याहून योग्य हुकूम देत गेल्यामुळे विठ्ठलराव देवजी हा या समयी चांगला लौकिकास चढला. तसेच त्याने कर्नल वॉकरचीही चांगली प्रीती मिळविली[1]. कर्नल वॉकर याने तारीख १० सप्टेंबर सन १८०७ चे पत्र बाबाजीस पाठविले. त्यात तो विठ्ठलराव देवजीसंबधी लिहितो की, "आजम विठ्ठलराव देवाजी यांची नित्यसर भेट होत असते. त्याच्या अति-सहवासाने मशारनिल्हेविषयी दिवसेंदिवस विशेष खात्री होते. बाबाजीसाहेब आपण दिवाणजीविषयी आम्हास सांगितले होते त्या अन्वये मशारनिल्हेची स्थिती, रीती व सर्व गोष्टी वाकवगारी व पोक्त अक्कल व कामकाजात फार हुशार हे सर्व समक्ष झाल्याचे दृष्टीस आले. त्या अर्थे जादा काय लिहावे. मोठी सूट देण्याचा प्रसंग आम्हास (बाबाजी व आम्ही) आला. कंपनी व गायकवाड सरकार यानी परस्परात भांडून मृत्युपंथास जाणाऱ्या राज्याचा ह्या उत्कृष्ट प्रकाराने खरोखर बचाव केला आहे. ही सुधारणा गायकवाड सरकारच्या उदार मतांच्या अधिकाऱ्याच्या महत प्रयासामुळे झाली आहे."

काठेवाडात गायकवाड सरकारचे जे हक्क आहेत ते यापुढे केवळ लष्कराच्या बळावरच अव्याहत चालणारे नाहीत. ते हक्क शांततेने व स्वसंतोषाने देण्याचे त्या राजमंडळाने आता आम्हापुढे लेखांच्या द्वारे कबूल केले आहे. त्यांचे परस्परात जे लेख झाले आहेत ते प्रतिज्ञापूर्वक असल्याने, सुधारणेच्या शिखरास जाऊन पोचलेल्या राज्याच्या दृढ संबंधाप्रमाणे त्या करारांची ग्रंथी आता खात्रीने मजबूत होईल. हे करार दीर्घ काळपर्यन्त अबाधित रहावेत व गायकवाड सरकारची सर्वतोपरी सत्ता निरंतर कायम रहावी की ज्यावर काठेवाडातील भावी लाभांचा खरा आधार अवलंबून राहिला आहे. त्याच्या संरक्षणासाठी गायकवाडी फौजेचा व कंपनीच्या फौजेच्या मुक्काम काठेवाडात ठेवण्याची खास जरुर आहे[2].

पेशव्यांच्या गुजराततेतील भागाचा मक्ता गायकवाडांकडे असल्यामुळे खंडणीही गायकवाडच वसूल करीत असत. त्यामुळे एकंदर गुजरात प्रांतावर या वेळी गायकवाडांचे पूर्ण वर्चस्व होते.

मुलुखगिरी पद्धत रयतेस दुःखकारक असून, कोणत्याहि पक्षास ती सुखकारक नाही, असे कंपनी सरकारास पहिल्यापासून वाटत होते. आनंदराव मल्हाररावांशी त्यांचा तह झाल्यानंतर, पुढे लवकरच इ. स. १८०३ साली गायकवाडी राज्याची व्यवस्था सुधारण्याच्या उद्देशाने व देशाची स्थिती समजून घेण्यासाठी कर्नल वॉकर याने आपले कामगार पाठविले होते. संस्थानिकांची खंडणी ठरवून देऊन, तेवढीच त्यांजकडून वसूल करून घेतली असता, सालोसाल पेशवे व गायकवाड यांच्या मुलुखगिरीच्या स्वाऱ्यांनी त्यांचे जे नुकसान व्हावयाचे ते बंद होईल. हा फायदा त्या संस्थानिकांस दाखवून, खंडणीचा बंदोबस्त

१. BGS XXXVII, p. 50.

२. खोबरेकर, गुजराततेतील मराठी राजवट, पृ. १५४.

करण्यास त्यांची कबुली मिळवावी असा या सालच्या एप्रिल महिन्यात मुंबईच्या गव्हर्नरने वॉकर यास हुकूम पाठविला[१].

याप्रमाणे इ. स. १८०७ साली ऑगस्ट महिन्यात कर्नल वॉकर व बाबाजी हे काठेवाडात आपापल्या फौजेसह आले व सर्व रजवाड्यांची जमाबंदी व आजपर्यन्त भरलेली खंडणी पाहून, त्याप्रमाणे पुढे देण्याच्या खंडणीची रक्कम सर्वांच्या सल्ल्याने व कबुलीने मुक्रर केली. या व्यवस्थेस काठेवाडातील काही राजे लोक नाकबूल होते. परंतु इंग्रज व गायकवाडी फौजेच्या दाबाने खंडणीची रक्कम कबूल केली[२].

ही व्यवस्था ठरविण्यापासून कंपनी सरकारने आपले अनेक फायदे पाहिले होते. काठेवाडात गायकवाडांचा अंमल सार्वभौम राजासारखा होता. तो या व्यवस्थेमुळे कमी झाला. हा परिणाम लक्षांत आणूनच रावजी अप्पाजीनी या व्यवस्थेस प्रथम आपली नाकबुली दर्शविली असावी. पोरबंदर, ओखामंडळ वगैरे ठिकाणचे लोकांना इंग्रज व्यापाऱ्यांच्या गलबतांस त्रास पोचत होता, तो कमी करून पोरबंदर आपल्या स्वाधीन करून घ्यावे असाहि त्यांचा उद्देश होता. या समयी फ्रेंच सरकारचे प्राबल्य वाढले होते व पोरबंदरचा राजा फ्रान्सचे सरकारशी दळणवळण ठेवितो असे या वेळी आढळून आले होते. सबब या सर्व काठेवाड प्रांतात एक तरी बंदर आपल्या सत्तेचे असावे असे त्यांस (कंपनीस) वाटत होते. काठेवाडात आपले वजन वाढविण्याच्या उद्देशाने गायकवाड सरकारास फायदा दाखवून त्यांनी ही व्यवस्था करविली[३].

• • •

---

१. खोबरेकर, मराठी राजवट, पृ. १५५.
२. कित्ता, पृ. १५६.
३. कित्ता, पृ. १५६-५७.

# पेशवे–गायकवाड तंटा मिटविण्यासाठी इंग्रजांची मध्यस्थी

## कालसूची

| | |
|---|---|
| १७९३ . . . . | पेशव्यांनी गोविंदराव गायकवाडास एक लाख रुपये उसने दिले. |
| १७९७ . . . . | पेशवे दरबारने गायकवाडांकडे देण्याची रक्कम मागितली. |
| १७९८ . . . . | गायकवाड व पेशवे यांजमधील देण्या-घेण्याचा आर्थिक व्यवहार पुरा होतो. |
| १८०२ . . . . | इंग्रज गायकवाडास कडीच्या मल्हारराव गायकवाडांचा बंदोबस्त करण्यास मदत करतात. |
| १८०२, ११ जुलै . . . | कर्नल वॉकर पहिला इंग्रज रेसिडेंट म्हणून बडोद्यात हजर. |
| १८०३, जुलै . . . | गायकवाडांकडून इंग्रज सैन्याच्या खर्चाकरिता विजापूर महालजहागिर मिळतो. |
| १८०४ . . . . | पेशवे गायकवाडास देण्याची नवी रक्कम ठरवून देतात. |
| १८०४, २ ऑक्टोबर. . | पेशवे गायकवाडास अहमदाबादचा इजारा देतात. |
| १८०४, १ डिसेंबर . . | गायकवाडी सैन्य रामपुऱ्यास येऊन त्यांनी पगार न मिळाल्या-मुळे पुढे चालण्यास नकार दिला. |
| १८०५, जानेवारी . . | काकाजीच्या सैन्याची विरुद्ध हालचाल. |
| १८०५, फेब्रुवारी . . | नडियादच्या बाजूस कोळयांचा उठाव. |
| १८०५, मार्च . . | गायकवाडी सैन्य महिकाठा मुलुखगिरीसाठी रवाना. |
| १८०५, २१ एप्रिल . . | गायकवाड आणि ब्रिटीश यांजमध्ये तह. |
| १८०६, ३ एप्रिल . . | गोविंदराव गायकवाडांची सुवर्णतुला होऊन सर्व सोने ब्राम्हणास वाटले. |
| १८०७, जून . . . | कर्नल वॉकर शिबंदीची सुधारणा करतात. |
| १८०८, २८ डिसेंबर. . | इंग्रज अहमदबाद, पटण आदी किल्यांची मागणी गायकवाडां-पाशी करतात. |
| १८०८, १२ जुलै . . | गायकवाड आणि इंग्रज यामध्ये तह होऊन गायकवाडांनी आणखी परगणे इंग्रजास दिले. |
| १८०९ . . . . | सिताराम दिवाण यांजकडील ३ पागा काढून घेण्यात येतात. |
| १८१०, २८ नोव्हेंबर . | बाबाजी अप्पाजीचा मृत्यू. |

| | |
|---|---|
| १८११ . . . . . | गायकवाडांकडे पेशव्यांकडून देण्याची मागणी. |
| १८११ . . . . . | गायकवाडांच्या खलित्यास पेशव्यांकडून उत्तर. |
| १८१२, फेब्रुवारी . . | गायकवाड सरकारचे सर्व कर्ज इंग्रजांनी फेडून टाकले. |
| १८१२ . . . . . | कान्होजी गायकवाडाचे बंड. |
| १८१३ . . . . . | गंगाधरशास्त्रीस गायकवाडीतील मुतालीकी दिली. |
| १८१४ . . . . . | मागील ठरावाप्रमाणे दहा वर्षांची पेशवे-गायकवाड ठरावाची मुदत समाप्त. |

---

# २८

## पेशवे–गायकवाड तंटा मिटविण्यासाठी इंग्रजांची मध्यस्थी

### गायकवाडीत इंग्रजांचा पक्का पाय :

इ. स. १८०२ मध्ये इग्रजांनी गायकवाडांस कडीच्या मल्हाररावाचा बंदोबस्त करण्यास मदत केली. त्याच वर्षी त्यांनी अरब लोकांस गायकवाडीतून काढून लाविले. यास्तव दोन हजार ब्रिटिश सैन्य व युरोपियन तोफखाना गायकवाडांनी तैनातीत ठेवून त्यांचा खर्च द्यावा असे ठरले. या ठरावात ठरलेल्या शर्तीवर ६ जून १८०२ चा तहनामा करण्यात आला. या तहाच्या शर्तीत खालील कलम घालण्यात आले. "पुढेहि कोणी आम्हावर बदनजर धरील तर आम्ही चाहतो की, कंपनी इंग्रज बहादूर यांनी त्यास नशीहत करून आमचा बचाव करावा. व आमचे वाकडे प्रसंगात कोणास लेख करून दिला असेल तो रद्द असे, त्या लेखास कोणी मान्य करू नये व मेजर वॉकर आमचे बऱ्याचे जे काम करतील त्या कामास सर्वांनी मदत असावे[१]". या तहाने इंग्रजास अमर्याद अधिकार प्राप्त झाले. त्यामुळे गायकवाडी राज्यकारभारात त्यांना त्यांच्या मनात येईल त्याप्रमाणे ढवळाढवळ करावयाची संधि मिळाली. त्यांनी बडोद्याचे दिवाणाचे प्रत्येक कामावर बारकाईने नजर ठेविली. त्या कामा-करिता गव्हर्नर डंकनने नेमलेला मेजर वॉकर हा बडोद्यास पहिला रेसिडेंड म्हणून तारीख ११ जुलै रोजी हजर झाला. त्याने बडोद्यास इंग्रज सरकारचा बावटा रोविला. येणेप्रमाणे बडोद्याचे राज्यात इंग्रज वकिलाची स्थापना झाली[२]. त्यांना जुलै १८०३ ला गायकवाडाकडून इंग्रज सैन्याच्या खर्चाकरिता विजापूर महाल जहागीर म्हणून मिळाला. तो त्यांनी बळवंतराव कासी नांवाच्या इसमास दर साली रु. १,३०,००१ मक्त्याने लावून दिला[३].

### पेशवा व इंग्रज :

३१ डिसेंबर १८०२ मध्ये पेशव्यांचा व इंग्रजांचा वसई मुक्कामी जो तह होऊन तत्संबंधी कौल करार झाले, त्यांत पेशवे सरकारने इंग्रज दोस्ताला घोघो, राजपूर, चूडा आणि सुरत, चिखली चौऱ्यांयशी वगैरे परगण्यांमध्ये जे आपले हक्क होते ते सर्व लिहून दिले[४]. आणि गायकवाड व इंग्रज मित्र

---

१ बडोदे सरकार, तहनामे करार, पृ. १५-१६.

२, ३ बराऐवें, खं ४, ले. ७६.

४ एस्पीडीडी नं. १४८, पृ. ६०६८—७०.

यांच्यामध्ये जे कौल करार झाले होते ते सर्व मंजूर करून त्याशिवाय आणखीन असे लिहून दिले की, आमच्यामध्ये व गायकवाडामध्ये देण्याघेण्याचे संबंधाचा जो वाद आहे त्याबद्दलची लवादगिरी इंग्रजांनी करावी व ते जो न्याय देतील तो आम्हांस कबूल आहे[१].

**वसईच्या तहानंतरची स्थिती :**

वसईच्या तहानंतर शिंदे व इंग्रजांचे युद्ध सुरु झाले. युद्धतहकुबीनंतर भडोच व पावागडवरील हक्क शिंद्यास सोडून द्यावे लागले[२] आणि डिसेंबर १८०३ मध्ये शिंद्यांशी सलोख्याचा ठराव झाला.

या युद्धांत गायकवाडाकडील तैनाती फौज शिंद्यांविरुद्ध लढत होती. सीमेपलीकडे-हद्दीपलीकडे नेलेल्या सैन्याचा खर्च मुंबई सरकारने करावयाचा या तत्त्वाप्रमाणे गायकवाडी तैनाती फौजेचा खर्च इंग्रज सरकारने सोसला.

**होळकर व इंग्रज :**

तदनंतर होळकर व इंग्रज यांमध्ये लढाया झाल्या त्या १८०६ पर्यन्त निरनिराळ्या वेळी व निरनिराळ्या ठिकाणी अटीतटीचे सामन या दोघांच्या सैन्यात झाले. या मुदतीत गुजरातवर होळकरांची धाड येईल की काय असे सारखे वाटत होते. पण इंग्रजांनी वेळीच घेतलेल्या सावधगिरीमुळे बडोद्या-मध्ये एका सावकाराच्या चाळ्यांनी होऊ घातलेल्या गुप्त कटाचा बंदोबस्त तावडतोब झाला[३].

**इंग्रजांशी चालू असलेल्या युध्दांत मराठ्यांनी घेतलेला भाग :**

कर्नल मुरे ब्रिटिश सेनेचा मुख्याधिपति होता. मेजर वॉकरने कर्नल मुरेला गायकवाडी फौजेची मदत घेण्यास सांगितले. कर्नल मुरने मेजर वॉकरच्या इच्छेस मोठ्या मुष्किलीने होकार दिला. इकडे कर्नल वॉकरने मोठ्या परिश्रमाने गायकवाड सेनाधिकारी सखाराम दिवाणजी आदींना आपल्या सैन्यासह इंग्रजांना साहाय्य करण्यास सांगितले. तेहि अगदी असहायतेने कबूल झाले. कारण त्या युद्धात भाग घेतल्यानंतर त्याचा फायदा काय होणार होता किंवा त्यांच्या सैन्याच्या पगाराची थकबाकी कोणी द्यावयाची याबद्दल अनिश्चितता होती. हे कोणीहि कबूल केले नव्हते. त्याप्रमाणे गोपाळ गोविंद-गायकवाडी फौजेचे एक अधिकारी यांनी पुढे युद्धात भाग घेण्यास नकार दिला. काकाजीने मुरे यास कान्होजीस पकडण्यास मदत न करता तोही मोडासाची मुलुखगिरी करण्याकरिता अकस्मात् निघाला. सखाराम दिवाणजीने सांगितले की, आपण निघण्यास तयार आहोत पण सैण्याची कूच

१ पू. रे. कॉ. व्हॉ. १०, पृ. २६३, कलम १४.
२ सिक्रेट अन्ड पॉलिटीकल डायरी, नं. १४८, पृ. ६०७८-७९.
३ गॅझेटीअर्स बडोदे, भा. ७, पृ. २१२.

त्यांच्या मर्जीविरुद्ध करण्यास असमर्थ आहोत. अशा स्थितीत साधारणत: गायकवाडाकडील ८५० घोडेस्वार त्यांना नियमित पगार देण्याच्या बोलीने इंग्रजांच्या साहाय्यास गेले[१]. १ डिसेंबर १८०४ मध्ये जेव्हा हे सैन्य रामपुऱ्याजवळ आले, तेव्हा त्यांना त्यांचा पगार न मिळाल्याची सबब सांगून त्याने पुढे चालण्यास नकार दिला. ही अडचण निवारली, सैन्याचा पगार दिला[२], परंतु जानेवारी १८०५ मध्ये काकाजीच्या हाताखालील याच सैन्याने अशी काही विरुद्ध हालचाल केली आणि दोहादवरून ते पेटलादला गेले. या सैन्यांच्या हालचालीने रेसीडेंट काळजीत पडला. कारण या वेळी बडोद्यामध्ये सैन्य बिलकूल नव्हते आणि हेच जर हालचाल करून आले तर? असा किंतु त्यांच्या मनात उभा राहिला. परंतु या सैन्याच्या वर्तणुकीमुळे दिवाण सिताराम अस्वस्थ झाला. त्याने हे सैन्य महीकाठयाच्या मुलुखगिरीवर रवाना केले (मार्च १८०५). खरे म्हाता या सैन्याची थकबाकी नव्हती पण हा नुसता धुमाकूळ चालू होता व यास सीताराम कारणीभूत आहे, कारण तो सखाराम व काकाजीच्या विचाराने चालतो, हे क. वॉकरने जाणले आणि बाबाजीच्या मुलुखगिरीनंतर सर्व सैन्यास रजा देण्याचे ठरविले आणि सीतारामलाहि अर्धचंद्र देण्याचे निश्चित केले.

**अहमदाबादचा इजारा :**

२ ऑक्टोबर १८०४ मध्ये पेशव्यांनी गायकवाडास अहमदाबादचा इजारा वार्षिक रु. ४ लाखांच्या करारान १० वर्षांच्या बोलीने दिला. त्याची वहिवाट भगवंतराव गायकवाडास सांगितली.

१ फेब्रुवारी १८०५ मध्ये सुमारे एक हजार कोळी आणि ७,००० घोडेस्वारांनी नडियादच्या बाजूस उठाव केला. पण कर्नल वेडिंग्टनच्या हाताखालील लहानशा तुकडीन त्यांचा खरपूस समाचार घेतला[३].

२. गायकवाड व ब्रिटिश यांजमध्ये २१ एप्रिल १८०५ ला डेफिटिनिव्ह तह[४] झाला. तहात १८०२ पासून वेळोवेळी जे तह व करार झाले त्यांची सर्व कलमे एकत्र आणली.

३. तैनाती फौज ३,००० नी वाढविली आणि इंग्रजी तोफखान्याची एक तुकडी ठेवून दिली.

४. वरील फौज व तोफखाना इंग्रजांस वाटेल अशा अत्यंत गरजेच्या वेळी उपयोगी आणावयाचा व त्यापैकी एका बटालियनने काठेवाडला ब्रिटिशांच्या म्हणण्याप्रमाणे जावयाचे.

---

१ सि. अँन्ड पॉ. डा. १९८, पृ. २६३३-३४.

२ कित्ता, १६२, पृ. ८०६०—८०.

३ कित्ता, १७९, पृ. ९५७—६३.

४ बडोदें सरकार, तहनामे करार, पृ. ३९—६४.

५. वरील फौजेच्या खर्चाकरिता ११,७०,००० उत्पन्नाचा मुलूख गायकवाडानी तोडून द्यावयाचा. पूर्वी दिलेली ठिकाणें चोरसी, चिखली, सुरत, चौथ आणि खेड ही हिशेबात धरावयाची नाहीत.

७. गायकवाडानी कंपनी सरकारास ४१,५८,७३२ रु. ची रसद दिली.

९. गायकवाडानी कोणताहि युरोपियन, अमेरिकन किंवा कंपनी सरकारचा रहिवाशी इंग्रजांच्या संमतीशिवाय नोकरीस ठेवावयाचा नाही. आणि गायकवाडाचा नोकर ब्रिटिशांनी ठेवावयाचा नाही.

१०. संस्थानचे परराष्ट्रीय धोरण कंपनी सरकारने चालवावयाचे.

११. गायकवाडाने आपले पेशव्याबरोबरचे सर्व तंटे तडजोडीकरिता इंग्रजांकडे सोपवावे.

१६. दोन्ही राज्यांतील चोर व हराम यांना आसरा देऊ नये.

**तोडून दिलेले परगणे**[1] :

| | | | |
|---|---|---|---|
| | | | रुपये |
| धोलका | .. .. | ४ लाख | |
| नडियाद | .. .. | २ लाख | २५ हजार |
| विजापूर | .. .. | १ लाख | ३० हजार |
| मातर | .. .. | १ लाख | ३० हजार |
| मोबा | .. .. | १ लाख | १० हजार |
| कडी | .. .. | ० लाख | २५ हजार |
| किम कथोदरची जकात | .. .. | ० लाख | ५० हजार |
| | एकूण .. | १० लाख | ७० हजार |

आणि बाकीच्या १ लाखाकरिता काटेवाडवर वराता दिल्या.

**गायकवाड व इंग्रज यांचे म्हणणें :**

मागून असे दिसून आले कीं, दुमाला व इनाम गावामुळे वरील परगण्यांचा वसूल १० लाख ७० हजार भरणार नाही. तसेंच १ लाखाच्या वराता काठेवाडवर दिलेल्या. मुलूख नव्हे. पण गायकवाडानी सांगितले की, पुढील सालातील उत्पन्ने जास्त होतील. त्याला प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे धोलका परगणा. मुंबई सरकारने गायकवाडास एवढेच कळविले की प्रत्येक परगण्याचा वसूल मागील तीन सालाच्या सरासरीवर आकारला आहे. १२ जुलै १८०८ ला

१ बडोदे सरकार, तहनामें करार, पृ. ३९—६४;
पुना रे. कॉ. व्हॉ. १०, पृ. २६३, कलम १४.

(गायकवाड व इंग्रज यांमध्ये) असे ठरले की, तोडून दिलेला मुलुख रु. १,७६,१६८ वसूल देत नाही[1] म्हणून आणखी पुढील परगणे द्यावेत :—

| | रुपये |
|---|---|
| भावनगरचा घासदाणा .. .. .. | ७४,५०० |
| नडियादवर वराता .. .. .. | ५०,००० |
| सोसरा, सादरा, मरबीज .. .. .. | १,४५० |
| हैदराबाद .. .. .. .. | १,००० |
| धोलकामधील गायकवाड ताब्यातील गावे .. | १५,००० |
| मोढेरा .. .. .. .. | ९०० |
| मातर .. .. .. .. | ९,२५० |
| विजापूर .. .. .. .. | ६,७०२ |
| रंगारघाट .. .. .. .. | ३,७५० |
| सेला .. .. .. .. | ९५० |
| मोढेरामधील गाव .. .. .. | ११,८६० |
| एकंदर रक्कम .. | १,७६,१६८ |

फत्तेसिंग गायकवाडाला होळकरांच्या पठाणांकडून सोडवून आणिल्याचे मागील प्रकरणी सांगितले आहेच. यास त्याचे वडील गोविंदराव गायकवाड यांनी जेजुरीच्या खंडोबाच्या सेवेस सोडला होता. देवाच्या सेवेतून मुक्त करण्यास त्याची सुवर्णतुला वहावयास हवी. ती ३ एप्रिल १८०६ मध्ये केली आणि सर्व सोने ब्राह्मणांस वांटले. तदनंतर त्याचे लग्न केले[2] या दोन्ही कार्यांना खर्च आला. त्यावेळी राज्य कर्जात असल्यामुळे जास्तच कर्ज झाले.

फत्तेसिंगास आणण्याचे कारण दिवाणाच्या हातातील सत्ता कमी करणे हे होय[3]. दिवाण सुधारणा घडवून आणण्याच्या आड येत होता. कारण त्याची सारी भिस्त सरदार सैन्याधिकारी यांजवरच होती आणि करनॅक व वॉकरला तर हीच शक्ति कमी करावयाची होती. १८०७ च्या प्रारंभी दिवाण सिताराम बाबाजीस तो आदल्या वर्षी काठेवाडमध्ये वढवाणला वेढा घालून बसला असता भेटला आणि त्यास बडोद्यास जाऊन आपल्या बाजूने बोलण्यास सांगू लागला. बाबाजीने कबूल केले. पण सिताराम आपल्या चुलत्याच्या

१ गायकवाडस् ऑफ बरोडा भा. ७, पृ. १८१-८२.

२ ब. रा ऐ वें खं. ४, ले. ९६, १००.

३ सिक्रे. अॅन्ड, पॉलि., डायरी नं. २०५, पृ. ३८९९—३९०९.

वाढत्या पराक्रमामुळे त्यांचा द्वेश करू लागला. तसेच कंपनी सरकारला व महाराजांस न विचारता त्याने खूप पैसा खर्च केला. काकाजीने आपल्या मुलाच्या सैन्याच्या पागा वाढविल्या. मुंबई सरकारला याचा राग आला. त्यांनी बाबाजीस बडोद्यास आणन जे कौन्सिल नेमले त्यांत फत्तेसिंग व बाबाजीस जागा दिल्या, अधिकार[१] दिले. बाबाजीस "खाजगीवाले" हा किताब दिला व त्याबद्दल आणि पागेच्या खर्चास मिळून १२,२९०१ रु. वार्षिक तनखा ठरविला आणि कारभारात काही अधिकार दिले.

१८०७ जूनपर्यन्त शिबंदीची सुधारणा[२] केल्यानंतर मेजर वॉकरने बडोद्याच्या देखरेखीकरिता कॅ. करनॅकला ठेविले व स्वतः काठेवाडात गेला. त्याने जातांना सर्वाधिकार बाबाजीस दिले होते[३]. हिशेब-पद्धतीत सुधारणा, लायक व नवीन कमविसदारांच्या नेमणुका, पूर्वी झालेल्या पैशांच्या अफरा-तफरीबद्दल जामीन घेणे, त्या अफरातफरींची न्यायालयीन चौकशी करणे, फौजेची संख्या कमी करणें, शक्य असेल तिथें जाहगिरी खालसा करणें, जहागिरदारांना पेन्शनी देणे, जहागिरदारांची एक यादी तयार करणे, वजिफदारांकडून बाकी वसूल करणे, मक्तापद्धती नाहीशी करणे, असामदारांना काढून टाकणे किंवा त्यांजकडून काम करून घेणे आणि शेवटी प्रत्येक महाला वा आकार ठरविण, इतकी कामे बाबाजींस सांगितली[४] होती. बाबाजीने यांतील बहुतेक सुधारणा घडवून आणल्या. सांगायचेच तर पागेदार व शिलेदार यांजवरील खर्च अर्ध्यावर आणला आणि महाल मजकुराची वहिवाट पूर्वीपेक्षां चांगल्या तऱ्हेनें होऊ लागली.

कर्नल वॉकर बडोद्यास आला आणि त्याने वरील सुधारणा करण्याचा सपाटा सुरू केला त्यामुळे दिवाण सितारामची तळपायाची आग होऊ लागली. इतक्यात त्याचा हफीज गुलाम हुसेन नावाच्या उपद्व्याप्याबरोबर असलेला पत्रव्यवहार सापडला[५]. त्यात गुजरातेतून ब्रिटिश सत्ता नाहीशी करण्या-संबंधीचे कागदपत्र होते. सितारामला यासंबंधीचा जाब विचारला असता तो १८०२ च्या १० व्या कलमावर बोट ठेवू लागला[६]. त्याचा काही उपयोग न होता. त्याप्रमाणे संरक्षण इंग्रज सरकारकडून मिळणार नाही, असे त्यास सांगितले.

२८ डिसेंबर १८०८ सितारामच्या ताब्यात असलेले पट्टण, गल्हा हे महाल, सांखेडा, पट्टण व अहमदाबाद हे किल्ले यांची मागणी ब्रिटिशांनी केली. तसेच, बाबाजीसहि त्याच्या ताब्यातील विसनगर व वीरा हे किल्ले सोडण्यास सांगितले.

---

१ ब. राऐवे, खं. ४, ले. ९६; १००.

२ सिक्रेट ॲन्ड पॉ. डा, २०६, पृ. ४१८८—४२०३.

३ कित्ता, २०९, पृ. ५१९९—५२०६.

४ कित्ता, २११, पृ. ६०१७—६०२२.

५ गायकवाडस ऑफ बरोडा, व्हा. ७, पृ. ६४७, ६५३, ६५७.

६ कित्ता, पृ. ६४२-४३.

A-137—38-B.

ही सर्व व्यवस्था नवीन सुधारणाचे एक अंगच होय. पण सितारामने आपणास सरकारांतून १६ लाख रु. मिळाल्यानंतरच वरील हुकूम मानिला. खरे पहाता सरकारचा बोजा त्याजवर होता. पण त्याने अगदी जे शांतपणाने सांगितले की, झालेल्या गोष्टी पुन्हा भरून येत नाहीत तेच खरे[1]. नंतर सितारामने किल्ले व महाल ताब्यात दिले. १८०९ मध्ये सितारामच्या ३ पागा त्याजवळून काढून घेतल्या, कारण त्यांना महीकांठयाच्या मुलुखगिरीस जाण्यास तो हुकूम देईना. तसेच त्याजजवळील पांचशे घोडेस्वारहि कमी केले. अशा रीतीने गायकवाडाचा फौजेचा खर्च कमी करण्याकडे रेसिडेंटने आपले सर्व लक्ष वेधले होतें.

**इंग्रज व गायकवाड :**

बाबाजी अप्पाजी २८ नोव्हेंबर १८१० मध्ये निवर्तला. त्याच्या जागी त्याचा मुलगा विठ्ठलराव भाऊ याची नेमणूक[2] झाली. त्याने ती जागा दोन वर्षे भूषविली, पण त्याची कर्तबगारी कमी पडू लागल्यामुळे गंगाधरशास्त्री यास १८१३ मध्ये मुतालिकी दिली व त्यास सालीना ६० हजार रुपये तनखा ठरविला.

बाबाजीच्या निधनापर्यन्त विठ्ठलराव देवजी हा बाबाजी अप्पाजी सुभे याचे वतीने काठेवाडची वहिवाट करीत होता. कडीच्या मल्हाररावाचा बंदोबस्त करताना विठ्ठलराव देवजीने मोठा पराक्रम गाजविला होता. त्या सालापासून (सन १८१०) विठ्ठलरावासकाठेवाडचे सुभे कायम करून सालीना २,६४३ रुपये जिलिबीची नेमणूक करून दिली[3].

फेब्रुवारी १८१२ मध्ये गायकवाड सरकारने इंग्रजांचे सर्व कर्ज फेडून टाकले. त्यामुळे गायकवाड सरकारची पूर्वीची आर्थिक हलाखी नाहीशी झाली. आणि आता सरकारला चांगले दिवस येतील असे वाटू लागले तोच अनपेक्षित घटना घडू लागल्या. त्या घटनांचे निवेदन करण्यापूर्वी इंग्रजांचे कर्ज गायकवाड सरकारने कसे निवारले हे थोडक्यात पाहू.

इंग्रजी पलटणीच्या खर्चाकरिता जो मुलूख गायकवाडांनी तोडून दिला होता त्याशिवाय त्या सैन्यावर होत असलेला नियमित खर्च, बंडखोर अरबांना पिटाळून लावतांना त्यांची चुकती केलेली बाकी, अहमदाबादच्या इजाऱ्यावर शिद्यांच्या हिश्श्याचे दिलेले देणे, फत्तेसिंगाकरिता खंडणी, सैन्याची थकबाकी, मल्हारराव व कान्होजी गायकवाड यांच्या खर्चास, वगैरे सर्व खर्चा बाबीकरिता म्हणून एकंदर रु. ६७,०८,०३४ इंग्रजांनी गायकवाडांना कर्ज दिले होते.

---

१ किता, पृ. ६७५.

२ किता, व्हा ८ पृ. १७६-७७.

३ बरोडा, फे. ४, द. ४०२, पु. ४, नि. १३.

या कर्जाची फेड लोन कर्जे[1] उभारून, पारखावर हवाला देऊन, प्रत्यही जामीन राहून[2] अशा निरनिराळ्या उपायांनी कंपनी सरकारने करावयास लावली. मुलकी राज्यव्यवस्थेचा खर्च २ लाख ७५ हजार होता तो ४ लक्षांवर आला[3]. गायकवाडांच्या कुटुंबियाकरिता ४ लाख २३ हजार रुपये खर्च, महसूल खर्च, धार्मिक खर्च वगैरे बाजूस ठेवले यामुळे १८१२ पर्यन्त आर्थिक घडी नीट बसली. पण ही आर्थिक घडी १८१२ पासून बिघडण्यास नवीनच कारणे उपस्थित झाली.

**बंडखोर कान्होजोचे उपद्व्याप :**

कान्होजीला तुरुंगात ठेवून त्याच्या खर्चास नेमणूक करून दिली होती हे मागेच सांगितले आहे. त्याला येण्यास बडोद्यास परवानगी दिली तेव्हा तो पादरा मुक्कामी राहू लागला. इ. स. १८१२ मध्ये ह्या बिलंदर महाभागाने स्वतःस गादी मिळविण्याचा शेवटचा प्रयत्न केला[4]. या उपद्व्यापात त्यास राणी तक्ताबाई सामील झाल्या. राज्यात बखेडा करून गुजरातेत गोंधळ माजवण्याच्या हेतूने नवानगरच्या जाम जसाजीने या चळवळीस उचलून धरले. तोच या चळवळीचे मूळ होता[5]. त्याचे इंग्रजांशी वाकडे होते. उठाव केल्याने इंग्रजांचे लक्ष बडोद्याहून दुसरीकडे वेधले जाईल हा त्याचा हेतु होता. म्हणून त्याने कान्होजीस सैन्य आणि पैसा देण्याचे कबूल केले आणि जर यश आले तर विजापूर परगणा बक्षीस देण्याचे आश्वासन दिले. कंपनी सरकारबरोबर समझोता केल्यावर त्याने कान्होजीचा नाद सोडला. सितारामला या कटाची माहिती होती, पण यापासून फलनिष्पत्ति काही होणार नाही हे त्यास माहीत होते म्हणून त्याने त्यात भाग घेतला नाही.

मीरखान व पठाणाची मदत आणि माळवा व गुजरातेतील त्याचे सैन्य हे नवानगरच्या पैशातून घ्यावयाचे, लुनावळकर रामदिन पठाण, धारचा महमद अबूद, गुजरातेतील कोळी हे उठावास तयार झाले नाहीत. परंतु जमादार उमर याने आपल्या एक हजार अरब सहकाऱ्यांनिशी मदतीचे आश्वासन दिले. तसेच अबदुल रहिमान यानेहि त्यांना मदतीचे अश्वासन दिले[6]. पादऱ्याला कान्होजीबरोबर १२५ घोडे व १५० सैनिक तयार होते आणि तो नवानगरच्या कुमकेची वाट पहात होता. रेसिडेंट या वेळी काठेवाडला होता. आणि राजधानीत तर सैन्य नव्हते. कोळ्यांनी मंत्र्याच्या घरावर हल्ले करावयाचे, अरबांनी रेसिडेन्सि आणि शास्त्रीच्या घरावर रोख धरावयाचा, तक्ताबाईने विकेट दरवाजा उघडावयाचा आणि कान्होजी व त्याचे सहकारी यांना आंत

१ बडोदें गव्हर्नमेंट यादी व्हा. ७ पृ. १३०-१३१.

२ कित्ता, पृ. १४६—१५४.

३ कित्ता, पृ. १८७—१९०.

४ गायकवाडस् ऑफ बरोडा व्हा. ८, पृ. ९४, ९६.

५ कित्ता पृ. १००-१०१.

६ इलियट, रूलर्स ऑफ बरोडा, पृ. १०८.

घ्यावयाचे. पण हळू हळू सर्व कट उघडकीस आला. आणि हा कट उघडण्याच्या पूर्वीच कॅप्टन बालंटाईनने आपल्या लहान तुकडीच्या साहाय्याने पाद्रचाला वेढा दिला आणि कान्होजीला पकडले[१]. तद्नंतर कान्होजीला सुरतेस रवाना केले. सुरतेहून मुंबईस आणि शेवटी मद्रासला त्याला कायमचे ठेवले[२]. राणी तक्ताबाईवर सुद्धा नजर ठेवली. आणि काही वेळा तर तिला तुरुंगातच ठेवली होती. शास्त्रीने या बाबतीत पुढाकार घेतल्यामुळे शास्त्रीचा काटा काढण्याचे तिने ठरविले, सितारामला सुद्धा हेच हवे होते. त्याने शास्त्री-विरुद्धच्या कारवायात भाग घेतला. आणि यासाठी पुणे दरबारशी संधान बांधिले.

**पेशवे गायकवाड :**

वसईच्या तहाने बाजीराव पेशव्यांची आपल्या सरदारांवरील सत्ता नाहीशी झाली हे त्यास उमगल्यावर तो चडफडू लागला. तहात जखडल्यामुळे मांडलिक गायकवाडांशी पत्रव्यवहार करावयाचा तो इंग्रजांतर्फे करावा लागावा याचे त्यास फार वैषम्य वाटू लागले. तहाने कशी विचित्र परिस्थिती निर्माण केली पहा. पेशवे दरबारचे मांडलिक गायकवाड, ठरलेली वार्षिक खंडणी देत होते. पेशवा गायकवाडांची फौज पूर्वीप्रमाणे मदतीस बोलावू शकत नव्हता. गादीवर बसतांना अजूनहि नजराणा दिला जाई, पण त्याची रक्कम आपल्या मनाप्रमाणे पेशव्यांनी ठरविणे बंद पडले. गादीवर कोणी बसावे हा प्रश्नसुद्धा पुणे दरबारच्या कक्षेतून निसटला. नाहीसे झालेले हे सर्व अधिकार मिळविण्याची दोन साधने पेशव्यांजवळ होती. अहमदाबादचा इजारा १८१४ मध्ये संपत होता त्याचा मक्ता पुन्हा गायकवाडांस न देणे व अशा रीतीने त्यांशी भांडण उकरून काढणे. तसेच काठेवाडची खंडणीची कायम तरतूद होतांना पेशव्यांच्या काठेवाडातील हक्काची दखल इंग्रज व गायकवाड या दोघांनीहि घेतली नाही. याचा वचपाहि पेशव्यास काढावयाचा होता. दुसरे असे की, पेशव्यांना गायकवाडांकडून पूर्वी सांगितल्याप्रमाणे रक्कम येणे होती. या सर्वांचा बाऊ गायकवाडांना दाखवून त्यांना आपल्या कबजात घेण्याचे कार्य पेशव्यांस करावयाचे होते[३].

बडोदे सरकारात सुद्धा दोन पक्ष होते. एक पक्ष इंग्रजांचा पक्षपाती होता. त्याचे नेतृत्व गंगाधरशास्त्रींकडे होते. दुसऱ्या पक्षाचा ओढा पेशव्यांकडे होता. तो पक्ष इंग्रज बडोद्यात नको असे म्हणणारा होता. या पक्षाचे आधार राणी गहिनाबाई व पदच्युत दिवाण सिताराम हे होते. दरबारी राजकारणात या दोन्ही पक्षांची चुरस जसजशी वाढू लागली तसतसा आनंदराव गायकवाडाच्या मनाचा कल दुसऱ्या पक्षाच्या बाजूस झुकू लागला. त्यालाहि वाटू लागले की, इंग्रजांनी आपणास आपल्या हातचे बाहुले बनविले. फत्तेसिग

---

१ गायकवाड्स ऑफ बरोडा व्हा. ८, पृ. ९४—९६.

२ कित्ता, पृ. १३८-१४१

३ पूना रे. कॉ. व्हा. १२, पृ. २८२.

गायकवाडसुद्धा या कारभारी मंडळीच्या वागणुकीने थोडा श्रमी बनला व शास्त्रीपार्टीचे ऐकेनासा झाला. आणि कारभाराकडे दुर्लक्ष करून स्वतः ऐषआरामात राहू लागला. आणि राणी गहिनाबाईच्या सल्ल्याने वागू लागला. राणी तक्ताबाईचा अपमान शास्त्रीकडून झाला म्हणून ती सूडबुद्धीने इंग्रजांच्या व पर्यायाने शास्त्रीच्या विरुद्ध कारस्थान करण्यात भाग घेत होती. तर सितारामाला बाजीरावाकडून बडोद्याचे दिवाणपद मिळवावयाचे होते[१]. कारण बडोद्याचा दिवाण नेमण्याचा पूर्वीचा हक्क पेशव्यांस चालू असावा असा बाजीरावाचा दावा होता. सितारामाने याजकरिता आपली संधाने पुणे व मुंबई या दोन ठिकाणी ठेविली. पुण्यास बंधूजी गायकवाड व भगवंतराव, गोविंदरावाचा मुलगा या दोघास ठेविले[२]. मुंबईस हफीज महमद दाऊद व महिपतराव, गोविंदरावाचा मेहुणा यांच्याशी बडोद्याचे सावकार हरिभक्ती यांच्यातर्फे संधान बांधिले आणि त्याजवर मुंबईच्या सेक्रेटरएटमधील गुपिते आणण्याची कामगिरी सोपविली. बडोद्यामध्ये स्वतः सिताराम तक्ताबाईस वारंवार भेटत असे[३]. एकदा तर आनंदराव गायकवाडांनी या बंडखोरांना सामील होऊन पुण्यास जाण्याची तयारी करून ठेवली. हें ब्रिटिश रेसिडेंटच्या नजरेस फत्तेसिंगाने आणिल्यामुळे त्याने आनंदरावाच्या हालचालीचा योग्य तो बंदोबस्त केला. पुण्यातील रेसिडेंटचा कारकून खरशेटजी शेट यानेहि गायकवाडांविरुद्ध उपद्व्याप चालू केले होते. त्रिंबकजी डेंगळ्याचे नाव पुढे करून त्याने अहमदाबादचा इजारा स्वतःस मिळण्याची खटपट केली होती. यामुळे खरशेटजीचे भय शास्त्रीस वाटत होते. या सर्व भानगडी मिटविण्यास पुणे दरबारी गायकवाडांचा वकील पाठविण्यास जी कारणे घडली त्याचे मूळ पेशवे गायकवाडाचे आर्थिक संबंधात सापडते.

स. १८०० मध्ये पेशव्याने गायकवाडास गुजरातचे उत्पन्नाचा काही हिस्सा आणि काठेवाडांतून मिळणारी खंडणी मिळून प्रति वर्षी पांच लक्ष रुपये पांच वर्षेपर्यन्त देण्याचा ठराव केला होता. पुढे बाजीरावाने वसईच्या तहाने रायपूर, घोघो, धंधुका, खंबायत वगैरे मुलूख इंग्रजास दिल्यामुळे त्या मुलखाचे उत्पन्न वजा करून तेवढ्यापुरती नवी रक्कम इ. स. १८०४ मध्ये पेशव्याने गायकवाडास ठरवून दिली. परंतु त्यात काटकसरीने पांच लक्षांच्या ठिकाणी साडे चार लक्ष रुपये करून ते दहा वर्षेपर्यन्त प्रतिवर्षी देण्याचा पुनः नवीन ठराव केला. ह्या नवीन ठरावाप्रमाणे ती दहा वर्षाची मुदत १८१४ मध्ये पुरी व्हावयाची होती, पण. . .तत्पूर्वी पेशव्यांस गायकवाड इंग्रजांच्या सल्ल्याने वागतात हे पसंत पडले नाही. म्हणून गायकवाडांना जरब बसावी या इच्छेने पेशव्यांनी गायकवाडावर थकबाकी काढिली त्याचा आशय असा.

१७५२ च्या वाटणी तहाने गायकवाडांनी आपले सैन्य घेऊन पेशव्यांचे मदतीस जावे असे ठरले होते. दमाजी त्याप्रमाणे पानिपतवर गेला होता.

---

१ गेनसे-बानाजी, गायकवाडस ऑफ बरोडा, व्हॉ. ९, पृ. २८५.

२ कित्ता.

३ कित्ता, पृ. २८५.

इ. स. १७७९ च्या सुमारास फत्तेसिगाने सैन्य घेऊन पेशव्यांस मदत करणे या अटीऐवजी खंडणी म्हणून दरसाल रु. १४,५४,००० पेशव्यास देण्याचे कबूल केले, शिवाय प्रत्येक गायकवाड गादीवर बसत असतांना नजराणा दिला जात असे तो वेगळाच. याप्रमाणे गायकवाडचे पेशव्यांना देणे वाढत होते.

१७६९ ते १७९८ पर्यंत आर्थिक व्यवहार कसे होते ते पहा[1] :

शिरस्त्याप्रमाणे गायकवाडांनी पेशव्यांस द्यावयाची खंडणी
यांच्या वेळी

| | | | |
|---|---|---|---|
| दमाजी | .. | .. | २६,२५,००० |
| गोविंदराव | .. | .. | २३,३७,००० |
| फत्तेसिंग | .. | .. | ३८,८७,००२ |
| मानाजी | .. | .. | २३,३७,००० |
| गोविंदराव | .. | .. | ५४,५३,००० |
| | एकंदर | .. | १,६६,३९,००२ |

सैन्य घेऊन सेवा केली म्हणून सूट

| | | | |
|---|---|---|---|
| सयाजीराव | .. | .. | ६,७५,००० |
| फत्तेसिंग | .. | .. | ११,१२,५०० |
| मानाजी | .. | .. | १३,५०,००० |
| गोविंदराव | .. | .. | ४७,५०,००० |
| | एकंदर | .. | ७८,६२,५०० |

गादी नजराणा

| | | | |
|---|---|---|---|
| गोविंदरावकडून | .. | .. | १७,५०,००१ |
| फत्तेसिंग | .. | .. | ५,००,००० |
| मानाजी | .. | .. | ३३,१३,००१ |
| गोविंदराव | .. | .. | ५६,३८,००१ |
| | एकंदर | .. | १,१२,०१,००३ |

---

१. गायकवाडस् ऑफ बरोडा व्हा. ९, पृ. १३२-१३३ खोब्रेकर, गुजरातेतील मराठी राजवट पृ.१७०-७१.

| | |
|---|---|
| असेच | ४२,७४,४२९ |
| सावकारांना | १,५०,००० |
| बाबीकडील महालांपैकी | १,२५,००० |
| एकंदर रक्कम | |
| वजा जाता देणें[1] | ४,०२,५१,९३४ |
| खालील रकमा गायकवाडांकडून पेशव्यांस मिळाल्या— | |
| १७७० पूर्वी दमाजीकडून | ३६,९५,१३६ |
| | १०,५०,००० |
| १७७० च्या सुमारास | |
| गोविंदराव | १८,००,००० |
| १७७१ | २५,००,००० |
| १७७२ | १४,००,००० |
| १७७३ .. सयाजीराव | १४,८५,८८४ |
| १७७८ „ फत्तेसिंग | ६,००,००० |
| १७७९ „ „ | १०,५०,००० |
| १७८२ „ „ | ४,००,००१ |
| १७८८ „ | २८,७९,००० |
| १७९१ मानाजी | ५,००,००१ |
| १७९५.९८ गोविंदराव | ७८,३३,२१२ |
| शिवाय वेळोवेळी दिलेल्या इतर लहान रकमा मिळून एकंदर | |
| चुकती झालेली रक्कम | २,९६,९८,६४५ |
| खालील रकमा सूट म्हणून— | |
| फत्तेसिंग | ५,७०,५०० |
| गोविंदराव | ६०,००,००० |
| एकंदर | ६५,७०,५०० |
| एकंदर सूट व फेड मिळून रक्कम | ३,६२,६९,१४५ |
| बाकी | ३९,८२,७८९ |

१ पी. आर. सी. व्हॉ. १२, पृ. २८१.

गोविंदरावास गादीवर बसण्यास परवानगी देण्यासाठी पेशव्यानी एक कोटी वीस हजार रुपये मागितले. १७९७ मध्ये ही रक्कम मिळण्याकरिता तगादा लागला आणि गेल्या चार वर्षांची खंडणीची थकबाकी व पूर्वीचे देणे मिळून एकंदर रक्कम रु. १,७८,१६,००१ गायकवाडांकडून पेशव्याचे येणे राहिले. पैकी रु. ७८,३३,२१२ एवढी रक्कम फेड केली. फेडीत साठ लाखांची सूट. हे सर्व जमेस धरता एकंदर रक्कम रु. ३९,८२,७८९ एवढी गायकवाडांकडून पेशव्यांस येणे होती. देण्या-घेण्याचा हा आर्थिक हिशेब १७९८ मध्ये पुरा झाला व त्या वर्षापर्यंतची गायकवाडांकडे वरील रक्कम बाकी म्हणून राहिली.

पुढे लवकरच गोविंदराव दिवंगत झाले. त्यांच्यामागून आनंदराव तक्ताधीन झाले. पण आनंदरावाला सुखासुखी गादी मिळू द्यावयाची नसल्यामुळे कान्होजी व कडीचे मल्हारराव यांनी बखेडे सुरु केले. अरबांनी उठाव केला. हे सर्व शमण्याकरिता गायकवाडास इंग्रजांची मदत मागावी लागली इंग्रजांनी आपली फौज दिली. कडीच्या मल्हाररावाचा बंदोबस्त केला. कान्होजीस पळवून लाविले आणि अरबांना हुसकावून लावून अरबांच्या जागी आपली इंग्रजी फौज गायकवाडींत आणविली. या सर्व भानगडी मिटता मिटता १८०२ साल सुरु झाले. पेशव्यांशी इंग्रजांचे घनिष्ठ संबंध आले. यशवंतराव होळकरांच्या पुण्यातील आगमनामुळे पेशव्याने पुण्यातून पलायन केले. तो इंग्रजांच्या आश्रयास गेला. वसईस इंग्रजांकडे जाऊन त्याने तह केला. त्यांत गुजरातमधील काही महाल इंग्रजांस तोडून दिले. १८०४ च्या जानेवारीत इंग्रजांनी बाजीरावास पुण्यास पेशवाईवर आणून बसविल.

एक दोन वर्षे गेल्यानंतर बाजीरावास आपण इंग्रजांशी तह केल्याचा पश्चाताप वाटू लागला. इतकेच नव्हे तर गायकवाड आपल्या हातचे सुटले याबद्दल त्यास खंत वाटू लागली. तेव्हा गायकवाडावर नजराणा, खंडणी, सैन्य मदत वगैरेची एकंदर हिशेबाची थकबाकी काढली आणि आपणास आपले पैसे परत मिळण्याची मागणी केली.

१८११ मध्ये या मागणीची याद पुन्हा तयार केली. त्यांत पूर्वी दाखविलेल्या रु. ३९,८२,७९९ या बाकीत रकमा वाढविल्या. त्या अशा[१],

| | |
|---|---|
| दर वर्षीचा पेशवे सरकारास द्यावयाचा नजराणा व पूर्वी ठरल्याप्रमाणे तीन हजार स्वारांसह पेशव्यांबरोबर लढाईस जाणे किंवा ज्या वेळी या स्वारांची गरज नसेल त्या वेळी त्यांच्या खर्चाएवढी रक्कम पेशव्यांस देणे. मिळून दर वर्षाची रक्कम | (१४,५४,०००) |
| अशी रक्कम इ. स. १७९७ ते १८११ पर्यन्तची बाकी | २,०३,५६,००० |

१ कित्ता, पृ. २७९-२८०.

| | | |
|---|---|---|
| दमाजी गायकवाडाने नवीन बाबी महाल वहिवाटीस घेतांना उत्पन्न निम्मे सरकारांत भरीन असे कबूल केले होते, त्याप्रमाणे सरकारचा कारकून महालात सन १७७० मध्ये जाऊन त्याने उत्पन्नाचे दोन खर्डे तयार करून सरकारांत घ्यावयाचे महाल पूर्वी करारा-प्रमाणे दाखविले पण महाल सरकारांत आले नाहीत. | | |
| इ. स. १७७२ मध्ये १ लाख रुपये पेशव्यांस दिले, पण त्याचा तपशील नाही. वरीलप्रमाणे १७७६ मध्ये ५५ हजार रुपये पेशवे सरकारास द्यावयाचे असे ठरले. फत्तेसिंगराव गायकवाड बडोद्यास आल्या-वर त्यांच्या सल्ल्याने सर्व देण्याचा फडशा पडेल असेहि ठरले, पण १७७३ मध्ये या आश्वासनांपैकी कशाचीहि पूर्ति झाली नाही. म्हणून वरील कलमात नमूद केलेली रक्कम १७७० पासून १८११ पर्यंत म्हणजे सुमार ४२ वर्षांची बाकी राहिली. पैकी वर उल्लेखिलेले १ लाख रुपये वजा जाता १७७२ पासून देणे राहिलेली रक्कम रु. | .. | ४१,००,००० |
| १७९४ मध्ये गोविंदरावाने सेनाखासखेल पदाबद्दल पेशव्यांस नजराणा दिला होता, पण त्याच्या मुलाने तो दिला नव्हता. म्हणून नजराण्याची रक्कम. | येणे रु. | ५६,३८,००१ |
| | एकंदर येणे रु. | ३,४०,७६,७९० |

वर निर्देशिल्याप्रमाणे बाजीराव आनंदरावांच्या तक्ताधीन अधिकाराबद्दल व सेनाखासखेल या पदाबद्दल रु. ५६,३८,००१ मागू लागला. ही रक्कम आजपर्यंत गायकवाडांनी दिलेल्या सर्व रकमाहून मोठी होती[१]. शिवाय इतर किरकोळ मागण्या खालीलप्रमाणे केल्या.

गोविंदरावाने १७९२ मध्ये तीन हत्ती आणि पाच घोडे देऊ केले होते ते (पण हे १८०३ नंतर दिल्याचे गायकवाडांचे म्हणणे).

१७९३ मध्यें गोविंदरावास एक लाख रुपये उसने दिले. एक लाखाचे जवाहीर, बाळाजी नाईक भिडे नांवाच्या बँकरकडून[२] देविले. रु. ५०,१९,८८७.

---

१ कित्ता, पृ. २८१.

२ कित्ता खोबरेकर, गुजरातेतील मराठी राजवट, पृ. १७२.

रनिया गाव सावळी परगण्यातील सतरा वर्षे बळजबरीने गायकवाडांनी आपल्या ताब्यात ठेविला. त्याचा दर वर्षीचा वसूल रु. २० हजार आता द्यावे व ते गांव पेशव्यांच्या ताब्यात द्यावे[१].

फडणीस महादजी मल्हार दिवंगत झाला. त्याचा पुत्र विष्णु महादेव यांस फडणिशी मिळावी अशी पेशव्यांची इच्छा. तरी शिरस्त्याप्रमाणे पगार व कारकुनी त्यास मिळावी.

पुण्याच्या काही सावकरांचे गायकवाड देणे लागतात त्यास जामीन पेशवे आहेत. ते देणे गायकवाडांनी लवकर फेडावे.

पूर्वी ठराव की, गायकवाडांनी पेशव्यांस एक लाखाचे जवाहीर द्यावे (इतर पैशांच्या व्यवहाराव्यतिरिक्त) ते अद्याप मिळाले नाही तर आता द्यावे.

अशा प्रकारच्या बाजीरावांच्या मागण्या होत्या.

शेवटी गायकवाडांना या रकमातून सूट न देता पेशव्यांनी कळविले की होळकरांच्या दंग्यामुळे हिशेबाचे कागद नाहीसे झाले. जे सांपडले त्याजवरून हा वरील हिशेब देत आहोत. आणखीन कागद सापडल्यास आणखीन काही रक्कमा यात मिळविल्या जातील[२].

**गायकवाडांचे म्हणणे :**

वरील तक्रारीत बाजीरावांने गायकवाडांवर दहा लक्ष रुपये येणे काढले गायकवाडांचे म्हणणे असे होते की, बाजीरावांचे वडील राघोबा दादा यांचा पेशवाईचे गादीवर जेव्हा कोणी निभाव लागो देईना तेव्हा त्यांचा पक्ष धरून भांडण्यात गोविंदराव गायकवाडांचे हस्ते वडोद्यास खजिन्यावर फार कर्ज चढले. आनंदराव गायकवाडांची ही तक्रार ऐकिल्यावर बाजीराव म्हणाला की ती गोष्ट खरी असल्यास त्यासंबंधीने माझे वडिलाकरिता मी तुमच्याकडे निघणाऱ्या बाकीत सहा लक्षांची सूट घालतो, बाकीच्या चार लक्षांची भरती तुम्हांला केली पाहिजे[३].

परंतु गायकवाडांच्या हिशेबनिसांनी हिशेबाची यादी करून बाजीरावांवरच जास्त येणे दाखविले.

गायकवाडांनी आपल्या उत्तरादाखल पाठविलेल्या खलित्यात पेशव्यांना १७९८ पर्यन्त मिळावयाची रक्कम रु. ३९,८२,७८९ आणि १७९८ ते १८११ पर्यन्त नजराणा व सैन्याबद्दल द्यावयाची रक्कम रु. २,०३,५६,००० मिळून एकंदर द्यावयाची रक्कम रु. २,४३,३८,७८९ देणे आहे असे कबूल केले. त्यात त्यांनीं सूट मागितली नाही. पण उत्तराचा

१ गेनसे-बानाजी, गायकवाडस् ऑफ बरोडा, व्हॉ. ७, पृ. ३८६.

२ पी. आर. सी. व्हॉ. १२, पृ. २८२.

३ ब,रा,ऐवें, खं. ५, पृ. ७७६, क. ३४.

खलिता तयार करून त्यात पेशव्यांकडून गायकवाडांनी येणे असलेल्या रकमा खालीलप्रमाणे नमूद केल्या : पहिल्या पुरंदरच्या तहाने गायकवाडांना भडोच हातचे घालवावे लागले. भडोचवरील हक्क सोडतांना गायकवाडांना नुकसान-भरपाई काहीच मिळाली नाही. पुनःपुनः मागणी करूनहि त्याबद्दल नकारच देण्यात आला. गायकवाडावर अन्याय व्हावा याच इच्छेने पेशव्यांनी मुद्दाम भरपाई दिली नाही. एल्फिन्स्टनने भडोचचा वसूल अदाजे ६ लक्षांचा मानून गायकवाडाना त्याच्या दोन-तृतीयांश हिश्श्याचा अर्धावा मिळावा असे सांगितले. परंतु कॅ. करनॅक, या वेळचा वडोद्याचा रेसिडेंट होता. त्याने भडोचचा वसूल एकंदर रु. ८ ते ९ लाख आणि याच्या दोन तृतीयांश गायकवाडांचा हिस्सा असे सांगितले. ही वसुलाची रक्कम गायकवाडांनी भडोचवरचा ताबा सोडला तिथपासून मिळावयाची. तर तिचा एकंदर आंकडा रु. २१,६००,००० भरत होता.

असे ठरले होते की, जर गायकवाडाचे नातेवाईक वा अवलवित, यापैकी कोणी गायकवाडांचे विरुद्ध उठाव करील तर त्याला चेपून काढण्याकरिता पेशव्यांनी गायकवाडांस मदत करावी. असे असता पेशव्यांनी खालील प्रसंगी गायकवाडांस मदत केली नाही[१].

**कलम**—(१) गोविंदराव गायकवाडांच्या निधनानंतर कान्होजीने राज्यात गादीकरीता बंड पुकारले, तिजोरी जप्त केली. कान्होजीचे पारिपत्य करण्याकरिता सरकारचा पैसा खूप खर्च झाला. त्यावेळी त्याचा हिशेब सुमारे रु. २,१६,००,०००.

(२) १८०२ मध्ये कडीच्या मल्हारराव गायकवाडाने गायकवाडीविरुद्ध उठाव केला. सैन्य जमवून विसनगरचा किल्ला बळकावला. त्याच्या पारिपत्याकरिता गायकवाड सरकारला नवीन सैन्य-भरती करावी लागली· कंपनी सरकारची मदत घ्यावी लागली यामुळे खर्च झाला.

(३) १८०३ मध्ये अरबांनी उठाव केला. बीमोड करण्यासाठी गायकवाड सरकारला कंपनी सरकारची मदत घ्यावी लागली. सबंध राज्यात शांतता राखण्याकरिता अधिक सैन्य ठेवावे लागले यामुळे सरकारला फारच खर्च करावा लागला.

(४) १८०४ ते १८०६ या तीन वर्षात शिंदे, होळकर भोसले वगैरेंच्या धुमाकुळामुळे सरहद्दीवर जादा फौज ठेवावी लागली. याबद्दल दर वर्षाचा खर्च रु. ६,७५,००० एवढा येत असे यावरून तीन वर्षांचा खर्च रु. २०,२५,०००.

आबाजी शेलूकराने अहमदाबादेस आल्यावर गायकवाडीस जास्त त्रास देण्यास सुरुवात केली. त्याने सैन्य वाढविले आणि गायकवाडांची आगळीक करू लागला. पेशव्यांकडे तक्रार केली असता पेशव्यांनी त्याचा पाडाव करण्यास

१ पूना रे. कॉ., व्हॉ. १२, पृ. २७५—२९९, ले. ११८ सी.

सांगितले. त्याचा पाडाव होऊन आबादी होण्यास ८ महिने लागले. पाडाव करतांना काही मातबर लोक कामास आले. त्यांच्या कुटुंबियांना पोटगी देणे भाग पडले. हा खर्च व कारवाई खर्च मिळून एकंदर रु. ८०,००,०००

अशा प्रकारच्या खर्चाच्या रकमेची बेरीज रु. ३,०६,२५,०००.

गायकवाडांनी वरील बंडाळचा कंपनी सरकारच्या सहाय्याने मोडल्या. त्याकरिता कंपनी सरकारला दोन हजार बलाढ्य फौज मदतीस द्यावी लागली. त्या फौजेच्या खर्चाकरिता रु. १४,५०,०००, वसुलाच्या आकाराची जहागीर लावून देणे भाग पडले. ही व्यवस्था तशीच चालू राहिली. तरी गायकवाडीच्या सर्व अडचणी लक्षात घेऊन मागील थकबाकीस फाटा द्यावा. म्हणजे सरकारची समृद्धी होईल.

वराता दिलेला पैसाहि खर्ची घालावा.

आनंदरावांने सेनाखासखेलीच्या वस्त्रांबद्दल पेशव्यांस नजराणा द्यावयाची रक्कम रु. ५८,३८,००१, एवढी रक्कम गोविंदरावाने देण्याचे कबूल केले, कारण त्या वेळी राज्यात सुबत्ता व भरभराट होती. आनंदराव गादीवर आल्यानंतर राज्यांतर्गत कान्होजी, अरब व मल्हारराव यांनी केलेली बंडेच मोडण्यात किती तरी खर्च आला. सरकार पेचात आले या गोष्टींचा विचार होऊन सरकारने खिलातीच्या रकमेची मागणी सोडावी. सूट द्यावी.

बाबी महालाच्या वसुलाबद्दल रु. ४१,००,००० मागितले आहेत. त्याबद्दल सांगणे असे[1]—

१७६३ मध्ये छत्रपति रामराजे यांनी दमाजीराव गायकवाडांस सेनाखासखेल हा हुद्दा दिला व सेनाखासखेलीची वस्त्रे दिली. दमाजीबावाच्या पश्चात फत्तेसिग गायकवाडास सेनाखासखेली मिळाली. त्याबद्दल त्याने पेशव्यास १ लाख रुपये नजराणा व २५ हजार रुपये बाबी महालापैकी दिले. फत्तेसिगाच्या कारकीर्दीत पेशव्यांचे दोन-तीन वेळा हिशेब चुकते केले. त्याच्या मृत्यूनंतर मानाजीला खिलातचा मान मिळाला. त्याजपासूनही चापून पैसा वसूल केला. याच्या पश्चात तदनंतर गोविंदरावास खिलात व किताब दिले. याच्या कारकीर्दीत पेशवे गायकवाडांचे हिशेब चुकते झाले. बाकी काही राहिली नाही. तदनंतर १७७४ ते १८११ पर्यन्त बाबी महालासंबंधी त्यांनी कुठेहि असे ऐकले नाही की पेशव्यांस याचे पैसे देणे आहे. याउलट तो प्रांत रानटी लोकांनी भरलेला असल्यामुळे गायकवाडांनी तिथे सैन्य ठेविले. त्यामुळे पेशवे सरकारच्या सरहद्दीवरील मुलुखाचे रक्षण होऊ लागले. शिवाय हा मुलूख ताब्यात आणण्यास गायकवाड सरकारला सतत दोन वर्षे मेहनत करावी लागली. त्यामुळे लष्करावर जो खर्च झाला तो अद्याप भरून येत नाही असे गायकवाडांचे म्हणणे पडले. १८०० मध्ये जो पहिला पाच वर्षाचा पट्टा (करारनामा) झाला होता तो पुरा होण्यापूर्वीच पेशव्याने इंग्रजांशी तह

१ खोबरेकर, गुजरातेतील मराठी राजवट, पृ. १७५

करून पट्ट्यातील काही मुलूख पेशव्याने इंग्रजांस दिल्यामुळे करारांप्रमाणे भरती होण्यास तूट आली. या खलित्यास पेशव्यांकडून १८११ मध्ये उत्तर मिळाले[१]. त्यात त्यांनी गायकवाडांच्या प्रत्येक मुद्यास तपशीलवार उत्तर दिले आहे. नजराण्याची रक्कम रु. २,४३,३८,७८९ गायकवाडांकडून पेशव्यांस का मिळायला हवी याची सबळ कारणे देऊन भडोचबाबत येणे असलेल्या रकमेचा फोलपणा दाखवून दिला. तसेच कान्होजी, कडीचा मल्हारराव यांनी केलेली बंडे हे गायकवाडांच्या भाऊबंदकीचे बखेडे होते त्याबद्दलची फिर्याद पुण्यास आली नाही म्हणून त्यांचा बंदोबस्त पुणे दरबाराने केला नाही. त्यात दरबाराला दोष देणे चुकीचे असेहि नमूद केले. या उत्तरात एकंदर आठ कलमे असून त्यापैकी चार इंग्रज व पेशव्यांच्या तहामुळे उद्भवलेल्या प्रकरणी खर्ची घातली असून दुसऱ्या चारांचा तपशील गायकवाड सरकार व पेशवे यांच्या वाटाघाटीसंबंधी आहे. गायकवाडांच्या प्रत्येक मुद्यास तपशीलवार उत्तर दिलेले यात सापडते.

याप्रमाणे पेशवे व गायकवाड या दोन्ही पक्षांनी आपआपल्या कागदपत्रांवरून एकमेकांवर बाकी दाखविली त्यामुळे त्यांच्या देण्या-घेण्यासंबंधीचा निकाल होणे अशक्य झाले. कोणताहि पक्ष आपला हेका सोडण्यास तयार होईना. पेशव्यांनी दाखविलेली बाकी गायकवाडास पसंत नव्हती. गायकवाडांनी पेशव्यांवर दाखविलेली बाकी पेशव्यांस पसंत नव्हती. अशारीतीने तंटा अनिर्णित राहिला. तेव्हा दोन्ही पक्ष हा तंटा मिटविण्याकरिता इंग्रजांकडे धावले. उभय पक्षांची समजूत घालण्याचे काम १८०३ व १८०५ च्या तहाप्रमाणे इंग्रजांकडे आले होते त्याप्रमाणे इंग्रजांनी बापू मैराळ नावाच्या पोक्त व हिशेबी गृहस्थास पुण्यास पाठविले.

१ पूना रे. कॉ., व्हॉ. १२, पृ. २७५—२९९ सी.

# गंगाधरशास्त्र्यांचा खून व बाजीरावांची गळचेपी

## कालसूची

| | |
|---|---|
| १८१२, १४ सप्टेंबर . . | बापू मैराळ यांस पुण्यास पाठवून देण्यासाठी पेशव्यांचे गायकवाडास पत्र. |
| १८१३, १९ ऑक्टोबर . | गंगाधरशास्त्री पुण्यास जाण्यासाठी बडोदे सोडतात. |
| १८१३, नोव्हेंबर- . . डिसेंबर . . . | गंगाधरशास्त्रीचा मुंबईत मुक्काम. |
| १८१४, फेब्रुवारी . . | गंगाधरशास्त्री पुण्यास येतात. |
| १८१४, डिसेंबर . . | पेशव्यांनी गायकवाडांकडील अहमदाबादचा इजारा काढून घेऊन तो त्रिंबकजी डेंगळे यांस सांगितला. |
| १८१५, ८ फेब्रुवारी . . | शास्त्रीनी पेशव्यांचे कारभारी माणकेश्वर यांची भेट घेतली. |
| १८१५, २ एप्रिल . . | गंगाधरशास्त्री पेशव्यांची भेट घेतात. |
| १८१५, २० जुलै . . | गंगाधर शास्त्र्यांचा पंढरपुरास खून होतो. |

# २९

## गंगाधर शास्त्र्याचा खून व बाजीरावांची गळचेपी

**पुण्यांतील व्यवस्था :**

बापू मैराळ पुण्यास गेला त्या वेळी बाजीरावांच्या नालायकी अमलामुळे पेशवाई दरबारचा लौकिक आणि दरारा ही नाहीशी होत चालली होती. न्याय, नीती व खरे-खोटेपणा जाणणाऱ्यांचा अभाव होता. एखाद्या महत्त्वाच्या प्रकरणाचा योग्य रीतीने व निःपक्षपातीपणाने निकाल लावणारा असा त्या दरबारात एकही मुख्य नव्हता.

**मैराळचे पुण्यास आगमन—पुण्याची स्थिती :**

मैराळ हा स्वभावतः प्रामाणिक व शांत प्रकृतीचा मनुष्य. तो पेशवे दरबारची व्यवस्था बघून काहीएक उतावळी न करता तसाच स्वस्थ बसला. हे पाहून त्याचा खर्च जास्त होतो तेव्हा गंगाधरशास्त्री पटवर्धन हे तेथील माहितीचे, पेशव्यांच्या ज्ञातीचे, पूर्वपरिचित, दोन्ही सरकाराचे विश्वासू आणि आमच्या दौलतीची खैरखाई करून दौलतीचा फायदा करणारे म्हणून त्यास बापू मैराळच्या ऐवजी वकिलीस पाठविण्याविषयीं आनंदराव गायकवाडांचे रेसिडेंट जेम्स रिविट यास ता. १४ सप्टेंबर १८१२ ला पत्र गेले.[1] गंगाधर कृष्णशास्त्री पटवर्धन हा मेणवलीचा राहाणारा. याचा जन्म सन १७७५ चे सुमारास झाला. त्यास वयाचे ८ व्या वर्षी पुण्यास पेशव्याचे वाड्यात कारकुनीचे काम मिळाले. पुढं शास्त्रीने वाईस जाऊन वयाचे २० वर्षेपर्यन्त शास्त्राध्ययन केलें. पुढे बाळोजी कुंजरबरोबर राहून बाजीरावाची मर्जी संपादिली. हे पाहून नाना फडणवीस त्याचा द्वेष करू लागला. पुढे शास्त्र्यांचे वडिलांस नाना आपला सूड घेईल अशी धास्ती पडून तो कुटुंबासह बडोद्यास राहावयास गेला. रावजी अप्पाजीचा व शास्त्र्याचे वडिलांचा विशेष स्नेह होता. गायकवाडीतून पटवर्धनास १२०० रुपये वर्षासन करून देण्यात आले. रेसिडेंट वॉकरचा त्याजवर अत्यंत लोभ होता. त्याने आनंदरावास ता. १५-१२-१८०८ ला खास पत्र लिहून शास्त्री यांची त्याजकडं शिफारस केलेली आढळते. इंग्रजांस आत आणणारा मुख्य पुरूष दिवाण रावजी आप्पाजी त्याला शास्त्रीची मदत भरपूर होती.[2] १८०३

---

१ बडोदे फेरिस्त ४, द. ४०३, पु. ५, नि. १३; खोबरेकर, गुजरातेतील मराठी राजवट, पृ. १७७.

२ गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचें आत्मचरित्र, वैव ३, अं. १ पृ. १७–४१.

मध्ये शास्त्रीची नेमणूक रेसिडेन्सिशी गुप्त बोलणे करण्याच्या कामावर प्रथम झाली. तरी पण शास्त्रीस पुण्यास पाठविण्याच्या पूर्वतयारीस सबंध १८१३ साल गेले. तिथपर्यन्त मैराळ पुण्यातच राहिला. मिळून एकंदरीत बापू मराळला पुण्यात तीन वर्षे पेशव्यांनी राहवून घेतले (१८११-१८१३)[१].

## शास्त्रींचे पुण्यास प्रयाण :

मुम्बई सरकारच्या सांगण्यावरून शास्त्री पुण्यास जाण्यास निघाला. त्याने १९ ऑक्टोबर १८१३ रोजी बडोदे सोडले[२] व तो मुम्बईस आला. सबंध नोव्हेंबर व डिसेंबर हे दोन महिने त्याने मुम्बईत घालविले. तिथे त्या वेळच्या गव्हर्नरशी व मुख्य सचिव फॅन्सीस वॉर्डनशी त्याने पेशव्याशीं करावयाच्या बोलण्यासंबंधी वाटाघाटी केल्या. पुणे दरबारशी आपणास गायकवाडांची वकिली करावयाची आहे, हे लक्षात ठेवून या वकिली पेशात मुरलेल्या मुम्बईच्या इंग्रज अधिकाऱ्यांचा त्याने सल्ला घेतला. या दरम्यान इंग्रज सरकारचे मुम्बईचे मुख्य सचिव वॉर्डन यांनी त्या वेळचे पेशवे दरबारी वकील म्हणून असलेले प्रसिद्ध मुत्सद्दी एल्फिन्स्टन यांशी शास्त्रीविषयी चर्चा केली. एल्फिन्स्टनकडे शास्त्रीचे गुणानुवाद गायिले[३] व पुणे मुक्कामात शास्त्रीस एल्फिन्स्टनने संरक्षण द्यावे ही गव्हर्नरांची इच्छाहि निवेदिली[४]. शास्त्रींच्या मुम्बई वास्तव्यात बडोद्याचे रेसिडेंट करनॅक यांच्याशी शास्त्रींचा पत्रव्यवहार होता[५] पुणे येथील वास्तव्यात शास्त्रीस अंदाजे दर महा तीन हजार रूपय खर्च येईल तेव्हा या रकमेची मंजुरी मुम्बई सरकारकडे शास्त्रीने मागावी अशी सूचना करनॅकने शास्त्रीस केली[६]. पुढें करनॅकला शास्त्री मुम्बईत असता मुम्बई सरकारने बोलाविले[७]. करनॅक फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात मुम्बईस पोहचला. तेथे गव्हर्नर, रेसिडेंट करनॅक व शास्त्री या तिघांनी मिळून बडोदा प्रकरणी कामकाजाचे कागद तयार केले[८].

शास्त्री पेशव्यांना भेटण्यास पुण्यास येणार हे रेसिडेंट एल्फिन्स्टनला कळल्यापासून पुणे दरबारचे व खुद्द पेशव्यांचे शास्त्रीविषयी काय मत आहे हे अजमावण्याचा प्रयत्न एल्फिन्स्टनने केला. त्याकरिता त्याने पेशव्यांची मुलाखत ३ नोव्हेंबर रोजी घेतली[९]. या वेळी पेशव्याचा रुवाब फार मोठा होता. पेशवा मराठी राज्याचा धनी होता. तो अद्याप इंग्रजांच्या हातचे बाहुले बनला नव्हता. त्याच्या लहरीप्रमाणे आणि कार्यक्रमाप्रमाणे इतरांनी चालवायचे होते.

---

१ पुना. रे. कॉ., व्हॉ. १२, पृ. ३०६.

२ शास्त्री दप्तर, ले. ३३.

३–६ पू. ना. रे. कॉ., व्हॉ. १०, ले. १३०.

७–९ शास्त्री दप्तर, ले. ३८, ४०, ४७.

एल्फिन्स्टनने पुणे दरबारी मंडळीस गायकवाडीचे वकील म्हणून गंगाधर शास्त्री येणार असल्याचे सांगितले. पण दरबारी मंडळीवर याचा काहीच परिणाम झाला नाही. शास्त्री जातीने ब्राम्हण, दरबारी मंडळीचा जातभाई. पण तो इंग्रजांचा पक्षपाती म्हणून प्रसिद्ध असल्यामुळे पुण्यातील स्वराज्य कंपूस तो शत्रू असा भासू लागला. बडोद्यातील सिताराम व गहनाबाई यांचा राष्ट्रीय पक्ष शास्त्रींच्या विरुद्ध होता. त्यांनी पुण्यास संधान बांधले, एल्फिन्स्टनचा कारकून खुरशीद शेट वश केला. त्रिंबकजी डेंगळ्यास वश केले. खुद्द बाजीरावाच्या मनात शास्त्री स्वराज्य-विक्रेता आहे असे भरवले.[1]

अशा वातावरणात शास्त्री पुण्यास फेब्रुवारी १८१४ मध्ये आला.[2] सोबत श्रीमतास नजर द्यावयाची रुपये २०,१०० किंमतीची वस्त्रे होती.[3] पण पेशवे तिर्थाटनास गेलेले व कारभारी आजारी यामुळे शास्त्रीस एक महिना असाच घालवावा लागला.[4] तदनंतर मार्चच्या २२ तारखेस पेशव्यांच्या कारभाऱ्यांशी शास्त्री यांची मुलाखत झाली. मुलाखतीच्या वेळी शास्त्रींच्या विनंतीवरून रेसिडेंट एल्फिन्स्टन हजर होता.

रसेल साहेब, खुर्सदजी मोदी हा रेसिडेंटमधील कारकून हेहि हजर होते. नानाचे वाड्यांत दुसऱ्या मजल्याचे दिवाणखान्यात बैठक झाली होती. पुणे दरबारचे बाजूने सदाशिवपंत भाऊ यांनी शास्त्र्यांचे स्वागत केले. भेटीत शास्त्रींनी श्रीमंतांना रामराम सांगून पोषाख पाठविला असे बोलून सोबत आणलेले पोषाख भाऊच्या स्वाधीन केले. नंतर एकमेकांच्या बाजूचे क्षेम कुशल एकमेकांनी दिलखुलास बोलून दाखविले. आम्ही तुम्ही परकी नाही, एकच आहो, जावसालही शलगडतील, चिंता नाही, असे भाऊंचे बोलणे पडले. नंतर बोलण्याचा दिवस ठरला. अत्तर गुलाब भाऊने हाताने वांटले[5] आणि मंडळीस निरोप दिला. भेटीत खरे पाहता काहीच महत्त्वाचे बोलणे झाले नाही. बाजीराव यावेळी नाशिकच्या तीर्थयात्रेस गेला होता. तो रामनवमी करून यावयाचा होता. तोपर्यन्त शास्त्री कारभाऱ्याशी बोलणे करून वेळ निभावीत होते.

बाजीराव वैशाखात पुण्यास यावयाचा होता. तोपर्यन्त बापू मैराळ व शास्त्री सदाशिवपंत भाऊशी कामकाजाची बोलणी करीत होते.[6] अशा स्थितीत एप्रिल महिना गेला. मे महिन्यात पेशव्यांची स्वारी पुण्यास आली.[7] पण पेशवा शास्त्रीची भेट घेण्यास कांकू करू लागला. शास्त्री, आपल्या नोकराचा नोकर आज बरोबरीच्या नात्याने शत्रु सरकारचा वकील बनून आपल्याशी बोलणी करावयास येतो हेच मुळी पेशव्यांस मंजूर नव्हते.[8] त्याने शास्त्रीशी बोलणी करण्यास नकार दिला पण भेट मात्र घेतली. कार-भारी मंडळी गायकवाडांकडील येणे असलेल्या बाकीबद्दल घोळ घालू लागले.

---

१–४ पू ना. रे. कॉ. व्हा. १० ले. १२२ पृ. २९९—पृ. ३२२, ले. १३१, १३३.

५–७ ब. रा. ऐ. वे., खं. ५ ले. ४०, ५०, ५३.

८ पू ना. रे. कॉ. व्हा. ,१२, पृ. ३०८, ३२२.

अहमदाबादचा इजारा गायकवाडास पुन्हा मिळणार नाही हे पेशव्यांने स्पष्ट केले. याच्या मुळाशी रेसिडेन्सीतील कारकून खुर्सेदजी सेट मोदी यांचे अंग असावे असे एल्फिन्स्टन व शास्त्री यांस वाटू लागले. अहमदाबादचा इजारा आपणांस मिळावा, पेशव्यांनी तो विठ्ठल नरसिंगच्या नावे करावा आणि त्याने तो त्रिंबकजी डेंगळयाच्या नावे पेशव्याकडून घ्यावा असा शेटजीचा डाव होता.[१] शेटजीस त्रिंबकजी डेंगळ्यांची पुष्टि होती.

पेशवे सरकारच्या जावसालांचा उलगडा आणि अहमदाबादचा बंदोबस्त ही दोन्ही कामे होण्याकरिता शास्त्रींनी पेशव्यांच्या बहुतेक अटी मान्य केल्या पण त्याचा काही ऊपयोग झाला नाही. कारण याच वेळी सिताराम रावजी हा शास्त्रीविरूद्ध बडोद्याहून सूत्रे हलवीत होता. त्याने आपला विश्वासू गोविंदराव ऊर्फ गोविंद बंधूजी यास पुण्यास पाठविले. त्याने बडोद्याचे हरिभक्ति पारख यास वश करून त्याच्यातर्फे मुंबईस संधान बांधिले. या कटात त्रिंबकजी डेंगळेही सामील होता.

शास्त्री दुष्ट, विरूद्ध पक्षाची चाकरी करतो, त्यास दूर करून आपणास बडोद्याची दिवाणगिरी पेशव्यांनी द्यावी अशी खटपट रावजीची होती. त्याकरिता त्याने हफीज़ नावाच्या इसमाची कास धरिली. या हफीजने रावजीच्या दिवाणगिरीस मुम्बई गव्हर्नराची[२] मूक संमति मिळविली होती. तसेच पेशवे व गायकवाड यांचे दरबारी संबंधात जेणेकरून बिघाड होईल अशीं विघ्ने उभी केली.[३] त्याचा परिणाम म्हणून अहमदाबादचा (प्रांत झालावाड, काटेवाड व सोरठ येथील पेशवे अंमलाचा) इजारा गायकवाडकडून काढून घेण्यात आला आणि तो त्रिंबकजी डेंगळ्याकडे डिसेंबर १८१४ मध्ये सांगितला.[४]

तदनंतर ८ फेब्रुवारी १८१५ ला शास्त्रीने पेशव्यांचा कारभारी भाऊ माणकेश्वराची गाठ घेतली. काठेवाड-मामल्यासंबंधी सविस्तर बोलणे झाले ते एल्फिन्स्टनला कळविले[५]. या दरम्यान भगवंतराव गायकवाड (गायकवाडांतर्फे अहमदाबादचा इजारा करणारा) सितारामाच्या सांगण्यावरून पुण्यास आला[६]. बंधूजी पुण्यास होता. या दोघांनी त्रिंबकजीची भेट घेतली. भाऊची भेट घेतली. खलबते चालविली[७]. हे सर्व शास्त्री आपल्या उघडया डोळ्यांनी पहात होता. त्याने अखेरीस २ एप्रिल १८१५ मध्ये बाजीराव पेशव्याची भेट घेतली. सोबत बापू मैराळ, बाप्पाजी अर्काटकर व जीवनराव हे होते. पुण्यात तब्बल चौदा महिने थांबल्यानंतर शास्त्रीला ही पेशव्यांची भेट घडत होती. भेटीचा योग इतका उशीरा येण्याचे कारण कंपनी सरकारच्या प्रतिनिधीची भेटीच्या वेळी उपस्थिती हे होय. ते पेशव्यांस नको होते. कंपनीची दरम्यानगिरी असू नये असे पेशव्यांचे म्हणणे होते.[८]

---

१ पूना रे. कॉ व्हॉ. १२, पृ ३०८, ३२२.

२–८ शास्त्री दप्तर, ले. ५०, ५७, ५८, ५९, ७१, ७४, ७६, ७७, ब. रा. ऐ. बे. खं. ५, ले. ९२.

पेशवा आपल्या मधुर संभाषणाने मुख्य कामाचा उलगडा पुढे ढकलीत आहे असे एल्फिन्स्टनचे म्हणणे होते.[१] पण शास्त्रीस वाटत होते की, पेशव्यांशी चाललेली आपली बोलणी फलद्रूप होऊन आपण अखेरीस विजयी होऊ. म्हणून त्याकरिताहि पेशव्यांबरोबर नाशिकला जाण्यास रुकार दिला[२].

शास्त्री पेशव्यांबरोबर नाशिकास जाण्यास दुसरे कारण असे की, पेशव्याने आपली मेहुणी शास्त्रीच्या मुलास देण्याचे निश्चित केले. लग्नसंमारंभास सुरुवात झाली. या सर्व व्यवहारात त्रिंबकजी मध्यस्थ होता. पेशव्यांशी शास्त्रींची सोयरीक व्हावी असा मनसबा डेंगळ्याने घडवून आणलेला. पण कांही कारणावरून हे लग्न झाले नाही. शास्त्रीस विषाद वाटला. या नाशिकपर्यंतच्या प्रवासात त्रिंबकजी डेंगळे शास्त्रीचा खून करणार अशा वार्ता सर्वत्र पसरत होत्या. शास्त्रीने यावर विश्वास ठेविला नाही. नाशिकहून पेशवे पंढरपुरास यावयास निघाले. शास्त्रींना बरोबर घेतले. शास्त्रीने बापू मैराळला नाशिकासच रहावयास सांगितले, स्वतः पेशव्यांबरोबर शास्त्री पंढरपुरास आले[३]. सोबत त्रिंबकजी डेंगळे व बंधुजीहि होते. शास्त्रींना पांडुरंगाच्या आरतीस येण्यास विनंती झाली. शास्त्रीने स्वतःस बरे नसताहि त्याचा स्वीकार केला. शास्त्री पंढरीनाथाच्या देवळात गेले. आरती झाली. तेव्हा मुक्कामास येण्यास परतले. वाट बोळातून होती. सोबतच्या इसमांनी मुद्दाम बिनवस्तीची वाट या वेळी निवडली होती. रात्री साडे आठची वेळ. शास्त्री बोळात आले त्या वेळी त्यांच्यावर एकदम हल्ला झाला. ४-५ इसमांनी हल्ला करून शास्त्रीच्या देहाचे तुकडे तुकडे केले[४] (२० जुलै १८१५) ही बातमी बापू मैराळ यास दुसऱ्या दिवशी समजली. इंग्रज दोस्तांस समजली. जो तो त्रिंबकजी डेंगळ्याचा संशय घेऊ लागला. मुंबई सरकारची या बाबतची कारवाई सुरु झाली. कारण ते शास्त्रींच्या बऱ्यावाइटास जामीन होते. कलकत्ता ते मुंबई पत्रापत्री सुरु झाली. बडोद्यास रिपोर्ट गेला. तेव्हा फत्तसिंग हळहळला. त्याला मनातून शास्त्री नको होता. पण हे उघडकीस आल्यास इंग्रजांचा रोष पत्करावा लागतो म्हणून त्यान शास्त्रींच्या खुनाबाबत आश्चर्य व्यक्त केले आणि भरपाई म्हणून बडोद्याची मुतालिकी शास्त्रींचा मुलगा भिमाशंकर यास दिली. इंग्रज सरकारने पेशव्यांकडे शास्त्रींचा खुनी त्रिंबकजी डेंगळे याची मागणी केली. डेंगळ्यांस इंग्रजांचे स्वाधीन करण्यास बाजीराव तयार होईना. तेव्हा लढाईस तयार व्हावे, असा खलिता इंग्रजांकडून पेशवे दरबारी गेला. बाजीरावास पेच पडला. त्याने इंग्रजांस सुचविले की डेंगळ्यास तुमच्या स्वाधीन न करता मी त्यास वसंतगड किल्ल्यात कैदेत ठेवतो[५]. इंग्रज या सूचनेस कबूल होईना. त्यांनी पेशव्यांस पुण्यावर हल्ला करण्याची धमकी दिली[६]. या धमकीचा उपयोग होऊन त्रिंबकजी डेंगळ्यास स्वाधीन करण्यास पेशवा तयार झाला[७] व त्यास

१ शास्त्री दप्तर, ले. ७८.

२–७ पूना रे. कॉ. व्हा. १२, पृ. ३९४, पृ. ३९६, ले. १७८ पृ. ४१८-४१९, पृ. १३०, ले. १८३.

इग्रजांच्या स्वाधीन केले. स्वाधीन झाल्यावर त्यास वसई किल्ल्यात इंग्रजांनी कैदेत ठेविले[१]. इंग्रजांनी गायकवाड सरकारचे वकिलापासून पेशवे सरकारचे जावसालाविषयी सारे कागदपत्र मागून घेतले[२]. पेशव्यांचे म्हणण्याचे कागदहि घेतले. स्वतः एल्फिन्स्टनने हिशेब केला. तेव्हा त्यास पेशव्यांचा दावा ३ कोट, ६ लक्ष ,५४ हजार, ७९९ रु. इतकाच आहे असे दिसून आले. त्यातून कमी करावयाची रक्कम खालीलप्रमाणे—

| | | |
|---|---|---|
| रु. | २०,२५,००० | १८०१-१८०३ सालाबद्दल कमी. |
| | २,१६,००,००० | भडोचबाबत. |
| | २०,००,००० | अहमदाबादचे मसलतबाबत शेलूकर याचे वेळस. |
| रु. | २,५६,२५,००० | |

बाकी पेशव्यांचे गायकवाडोकडून देणे पन्नास लक्ष चौपन हजार सातशे नव्याण्णव रु. असे बडोद्याचे रेसिडेंट करनॅक यांनी कळविले[३]. इंग्रज सरकारने मध्यस्थी करून हे पेशवे-गायकवाडांमधील भांडण मिटविण्याचे ठरविले. त्यावरून एल्फिन्स्टनने पेशव्यांच्या दाव्यासंबंधीची एक भली मोठी यादी तयार केली. ती मुंबई सरकारला पाठविली. त्याचे उत्तर बडोद्याचे रेसिडेंट करनॅक याने ३८ कलमात तयार केले व ते मुंबईस रवाना केले[४]. हा सर्व पत्रव्यवहार वाचण्यालायक आहे. परकीय सत्ता लबाडगिरी कशी करते याचा उत्कृष्ठ नमुना इथे पहावयास सांपडतो. या रदबदलीत १८१६ साल गेले. इकडे दरम्यान इंग्रज व पेशव्यांच्या कटकटी वाढत होत्या. पेशवे पुण्यात सैन्य जमवू लागले. त्यास इंग्रज हरकत घेऊ लागले[५]. त्या बाबतीत पेशव्यास बाळोजी कुंजर फूस देऊ लागला[६]. इतक्यात त्रिंबकजी डेंगळ्याने वसईच्या किल्ल्यातून पलायन केले. इंग्रजांनी त्याला पकडून देण्यासाठी बाजीरावांस गळ घातली. आपल्या चलाखीने कंपनी सरकारचे समाधान होत नाही, आपल्यावर गव्हर्नर जनरलची इतराजी होणार असे बाजीरावास वाटू लागले. तो इंग्रजांचे समाधान कसे करावे या विवंचनेत पडला[७]. गव्हर्नर जनरलने मुंबई सरकारला पेशव्यां-विरुद्ध युद्ध पुकारण्यास हुकूम सोडला. गुजरात व कोंकण प्रांत ताबडतोब घ्यावे असा त्यात खुलासा केला[८]. त्यांनी धाकानेच पेशव्यांचे चार किल्ले घेतले[९]. या कृत्याने बाजीराव घाबरला. एक महिन्यात त्रिंबकजीस

१ कित्ता.

२–३ ब. रा. ऐ. वे. खं. ५, ले. १४३, पृ. ७७२, ले. १६४.

४–६ पूना रे. कॉ. व्हा., १२, पृ. ४५४, ले. १९८, ले. ३६, ले. ४३ ते ४५.

७. ब. रा. ऐ. वे., कित्ता.

८–९ पूना रे. कॉ. व्हॉ. १२, कित्ता.

तुमच्या स्वाधीन करतो असे तो इंग्रजांस सांगू लागला. इंग्रजांनी युद्धाची जय्यत तयारी केली.

शेवटीं बाजीरावाचा नाइलाज होऊन त्यानें त्रिंबकजीस पकडून देणाऱ्यांस बक्षीस दिलें जाईल, अशा प्रकारची जाहिरात राज्यांतील सर्व कमाविसदारांकडे रवाना केली[१].

कारण इंग्रजांनी युद्धाची तयारी केली. त्रिंबकजी डेंगळचास धरून आणण्यासाठी एलफिस्टनच्या सुचनेवरून बाजीरावाने बापू गोखल्यास त्यावर पाठविले. बापू गोखले हात हलवित परत आला आणि सांगू लागला की सर्व शांत आहे. डेंगळ्यांचा बंडावा वगैरे काही नाही. बाजीरावाची त्रिंबकजीस फूस असून त्यास पैसा व मदत बाजीरावच पुरवतो हे समजल्यावर १५ मार्च १८१७ रोजी एलफिस्टनने कर्नल स्मिथची फौज पुण्यास बोलाविली. निजामाकडील तैनाती फौजही बोलाविली. २१ मार्च रोजी गव्हर्नर जनरलला खलिता लिहून बाजीरावाशी सलोखा ठेवणे आता बिलकुल शक्य नाही असे कळविले व युद्ध पुकारण्याचे हुकुम मागविले. बाजीरावानेसुद्धा युद्धाची तयारी झपाट्याने चालविली होती. इंग्रजांच्या फौजांनी ८ मे १८१७ रोजी सकाळी पुण्यास वेढा घातला. हे कळताच बाजीरावाने इंग्रजाशी युद्ध पुकारण्याचा निश्चय केला. परंतु लागलीच इंग्रजांकडे शरणागतीची याचना केली व त्रिंबकजीस पकडून देण्याबद्दल २ लाखाचे बक्षिस व गाव इनाम देण्याचे जाहीरनामे लावले. त्यावरच काम निभावले नाही. एलफिस्टनने बाजीरावाची भेट घेऊन नवीन तहाच्या कलमाची वाटाघाट केली. हा तह गव्हर्नर जनरलच्या हुकुमावरून पेशव्यांवर लादला गेला. त्यातील मुख्य मतलब म्हणजे, महाराष्ट्राबाहेरील पेशव्यांचे ३४ लाख वसुलाचे सर्व प्रदेश इंग्रजांनी आपल्या कबजात घेतले आणि इतर मराठे सरदारांशी त्यांचा सबंध कायमचा तोडून लावला. तदनुसार बाजीरावाजवळ असलेले शिंदे, होळकर आदींचे वकिल पुण्यातून काढून बाहेर असलेले त्यांचे वकिल यास परत बोलवावे लागले. ह्या तहाची संपूर्ण कलमे पेशवाईची अखेर ह्या बखरीत पृ. १७६ ते १८६ वर दिली आहेत. शेवटी हो ना करता दिनांक १३ जून १८१७ रोजी पेशव्यांने ह्या तहावर मोठ्या नाखुशीने सही केली. नंतर तो गव्हर्नर जनरलकडे पाठविण्यात येऊन दिनांक ५ जुलै १८१७ रोजी मंजूर होऊन आला. ह्या तहाने बाजीरावाचे राज्य जाऊन तो एक लहानसा संस्थानिक बनला. इंग्रजांनी त्रिंबकजीवर फौजा रवाना केल्या होत्या. त्यांनी त्याचा चोहीकडून कोंडमारा करताच तो नर्मदा उतरून पावसाळ्यात चोळी महेश्वर येथे जाऊन राहिला.

---

१ ब. रा. ऐ. वे. खं ५, ले. १४३, पृ ७७२.

पेशवाईचा अस्त

## कालसूची

| | |
|---|---|
| १८१५, ऑक्टोबर | त्रिंबकजी डेंगळे इंग्रजांचे स्वाधीन. |
| १८१६, फेब्रुवारी | पेंढाऱ्यांची इंग्रजी मुलुखांत चढाई. |
| १८१६, १० मार्च | पेंढाऱ्यांची फौज माळव्यांतून निघून मच्छलीपट्टणला पोंचते. |
| १८१६, २७ एप्रिल | मुधोजी आप्पासाहेब तैनाती फौजेचा स्वीकार करतात |
| १८१६, १७ मे | पेंढारी नर्मदा उतरून नेमावर येथे येतात. |
| १८१६, २७ जून | मुधोजी आप्पासाहेबांचे नेलंगखेडीच्या बागेत वास्तव्य. |
| १८१६, १२ सप्टेंबर | त्रिंबकजी डेंगळेचे तुरुंगांतून पलायन. |
| १८१७, फेब्रुवारी | त्रिंबकजी नीरा नदीच्या काठी असल्याची एल्‌फिन्स्टन यास बातमी लागते. |
| १८१७, १ फेब्रुवारी | परसोजी भोसलेचा मृत्यू. |
| १८१७, १५ मार्च | कर्नल स्मिथ यास पुण्यावर चालून जाण्याचा एल्‌फिन्स्टनचा हुकूम |
| १८१७, १ एप्रिल | त्रिंबकजी डेंगळेचा पाठलाग करण्याबद्दल एल्‌फिन्स्टनचे बाजीरावास कडक पत्र. |
| १८१७, ६ एप्रिल | बाजीराव एल्‌फिन्स्टन यास भेटीस बोलवितात. |
| १८१७, २१ एप्रिल | आप्पासाहेब सेनासाहेब पदावर अधिष्ठित. |
| १८१७, ८ मे | इंग्रज फौजेचा पुण्यास वेढा. |
| १८१७, १६ मे | पेशव्यांचे राज्य जिंकण्याचा गव्हर्नर जनरलचा ठराव. |
| १८१७, २० मे | त्रिंबकजी डेंगळे यास पकडून देण्याबद्दल बाजीराव पेशवे इनाम जाहीर करतात. |
| १८१७, १ जून | एल्‌फिन्स्टनचा बाजीरावाबरोबर दुसरा तह. |
| १८१७, १३ जून | बाजीराव साहेब तहावर सही करतात. |
| १८१७, ९ ऑगस्ट | मालकम व बाजीराव साहेब यांची पुणे येथे भेट, |
| १८१७, १६ ऑक्टोबर | बाजीराव व एल्‌फिन्स्टन यांची भेट. |
| १८१७, १६ ऑक्टोबर | गव्हर्नर जनरल पेंढाऱ्यांवरील मोहिमेचे हुकूम देतो. |
| १८१७, १६ ऑक्टोबर | गव्हर्नर जनरलचा आग्रा येथे मुक्काम. |

| | | |
|---|---|---|
| १८१७, नोव्हेंबर | . | बुंदेलखंडाच्या बाजूकडील पेंढाऱ्यांच्या जमावावर इंग्रजांचा हल्ला. |
| १८१७, ५ नोव्हेंबर | . | बाजीरावांचा पुण्याच्या रेसिडेन्सीवर हल्ला. |
| १८१७, ५ नोव्हेंबर | . | शिंद्यांचा इंग्रजांशीं नवीन तह. |
| १८१७, ५ नोव्हेंबर | . | मराठा-इंग्रज युद्धास तोंड लागते. |
| १८१७, १६ नोव्हेंबर | . | बाजीराव पेशवे पुणें सोडतात. |
| १८१७, २९ नोव्हेंबर | . | इंग्रज फौजा बाजीरावावर चालून येतात. |
| १८१७, डिसेंबर | . | तुळसाबाईकडे मालकम तहाच्या अटी पाठवितो. |
| १८१७, १३ डिसेंबर | . | करीमखान व वसील महमद या पेंढाऱ्यांच्या पुढाऱ्यांचा शहाबाद येथे बीमोड. |
| १८१७, १४ डिसेंबर | . | बाजीराव पेशव्यांचा सिद्धटेक येथे मुक्काम. |
| १८१७, १४ डिसेंबर | . | इंग्रज होळकरांवर चालून जातात. |
| १८१७, १६ डिसेंबर | . | आप्पासाहेब फौजेस रजा देतात व त्यांचे वास्तव्य रेसिडेन्सित. |
| १८१७, १७ डिसेंबर | . | रामदीन आदि लष्करी अधिकाऱ्यांकडून गणपतराव तुळसाबाई यांना कैद |
| १८१७, २० डिसेंबर | . | तुळसाबाईचा खून. |
| १८१७, २१ डिसेंबर | . | मालकम व हिस्लॉप यांचा होळकरांच्या फौजेवर हल्ला. |
| १८१७, ३० डिसेंबर | . | त्रिंबकजी डेंगळेचा चाकण येथे मुक्काम. |
| १८१७, ३० डिसेंबर | . | इंग्रजांचे निशाण शनिवार वाड्यावर फडकते. |
| १८१७, ३१ डिसेंबर | . | त्रिंबकजी डेंगळे शिरुरहून निघतो. |
| १८१८, १ जानेवारी | . | कोरेगांवची लढाई व बाजीराव पेशव्यांचे पलायन. |
| १८१८, ६ जानेवारी | . | मंदसोरचा तह. |
| १८१८, ९ जानेवारी | . | आप्पासाहेब इंग्रजांच्या मागण्या कबूल करून राजवाड्यांत परततात. |
| १८१८, ३ फेब्रुवारी | . | पेंढाऱ्यांचा पुढारी नामदारखान कर्नल ॲडॅम यास शरण येतो. |
| १८१८, ११ फेब्रुवारी | . | एल्फिन्स्टन राजाच्यानावे बाजीराव बंड आहे असा जाहीरनामा काढतो. |
| १८१८, १५ फेब्रुवारी | . | पेंढाऱ्यांचा पुढारी करीमखान मालकमला शरण येतो. |
| १८१८, १९ फेब्रुवारी | . | बाजीराव पेशव्यांचा आष्टी येथे मुक्काम. |
| १८१८, २० फेब्रुवारी | . | आष्टीची लढाई. |
| १८१८, ४ मार्च. | . | एल्फिन्स्टन सातारा राजास आपल्या ताब्यांत घेतो. |
| १८१८, १६ मार्च | . | आप्पासाहेबांस इंग्रज फिरून रेसिडेन्सित आणतात. |
| १८१८, १९ एप्रिल | . | बाजीरावांचा शिवणी येथे पराभव. |

| | | |
|---|---|---|
| १८१८, ३ मे | . | आप्पासाहेब व त्यांच्या साथीदारांची रवानगी. अलाहाबादच्या किल्ल्यांत. |
| १८१८, १२ मे | . | आप्पासाहेबांचा रायचूर येथे मुक्काम. |
| १८१८, १३ मे | . | आप्पासाबांचे गौंडांच्या मुलुखांत पलायन. |
| १८१८, १६ मे | . | बाजीराव पेशवे आपले वकील मालकमकडे पाठवितो. |
| १८१८, १ जून | . | बाजीराव मालकम भेट. |
| १८१८, ३ जून . | . | बाजीराव मालकमच्या स्वाधीन. |
| १८१८, २६ जून | . | रघुजी बापूसाहेब यांचे दत्तविधान. |
| १८१८, १ ऑक्टोबर | . | रघुजी बापूसाहेब यांचा राज्यारोहण समारंभ. |
| १८१९, ९ एप्रिल | . | अशीरगडचा किल्ला इंग्रज सर करतात. |
| १८४०, १५ जुलै | . | आप्पासाहेबांचा जोधपूर येथे मृत्यू. |

---

# ३०

## पेशवाईचा अस्त

त्रिंबकजी डेंगळेचे तुरुंगांतून पलायन — इंग्रज बाजीरावावर नवीन तह लादतात — नागपूरचे अप्पासाहेब — पेंढारी यांचा उद्योग व निःपात — होळकरांच्या सत्तेचा नाश — इंग्रजांशी लढाईस सज्ज होण्याचा पेशव्यांचा जाहीरनामा — पेशव्यांचे पुण्यातून पलायन — इंग्रजांचा जाहीरनामा — बाजीरावाचे दैन्य — बाजीरावाची मालकमला शरणागती.

### ठाण्याचे तुरुंगांतून त्रिंबकजीचे आकस्मित पलायन :

त्रिंबकजी ऑक्टोबर १८१५ त इंग्रजांचे स्वाधीन झाल्यावर त्यास गव्हर्नर जनरलच्या हुकुमाप्रमाणे ठाण्याचे तुरुंगात बंदिस्त ठेवण्यात आले. त्यावर इंग्रज शिबंदीचा पहारा ठेविला. एल्फिन्स्टनने गव्हर्नर जनरलच्या हुकुमावरुन ही व्यवस्था केली खरी पण त्यास स्वतःस ती पसंत नव्हती. ठाणे हे पुणे व मुंबईस जवळ असल्यामुळे दळणवळण ठेवण्यास खूप मार्ग होते. त्याचा फायदा पेशव्याने घेतला. इंग्रजी शिबंदीमधील शिपायाच्या नोकरीत पुण्याहून आलेला माणूस घोडयाची निगा राखण्यासाठी घुसला. तो बाजीरावाने पाठविलेला होता. तो गाणी गायचा आणि त्या गाण्याचा अर्थ त्या इंग्रज सोजिरांस न कळता त्रिंबकजीस कळून एकमेकांचे सवाल जबाब होत असत. एक दिवस त्रिंबकजीच्या पलायनाची सिद्धता करुन तसा इशारा कवनाच्याद्वारे त्याने त्रिंबकजीस दिला. दिनांक १२ सप्टेंबर १८१६ रोजी त्रिंबकजीने तबेल्याच्या भिंतीस भोक पाडिले व तो बाहेर पडला आणि फरारी झाला [१]. त्रिंबकजीबरोबर तो मोतद्दारही होता. त्रिंबकजी प्रथम खानदेशात गेला व बागलाणकडील डोंगरात भिल्ल, रामोशी, मांग यांच्यात मिसळून राहू लागला. त्यानंतर कालांतराने त्रिंबकजीने सातान्याच्या बाजून बाजूच्या महादेव टेकडयात येऊन आपला मुक्काम ठोकला. ह्या त्याच्या हालचाली बाजीरावाच्या सल्ल्यावरून होत होत्या असा इंग्रजांस संशय होता [२]. ह्या दरम्यान बाजीराव रेसिडेंटबरोबर गोड बोलून त्याची मर्जी सांभाळू लागला. सन १८१७ च्या सुरुवातीस पेंढाऱ्यांचा उपद्रव जास्त वाढला. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी इंग्रजांनी जोराची तयारी करण्यास सुरुवात केली. ह्या बाबतीत बाजीरावानेही इंग्रज रेसिडेंटास दोन चार महत्वाच्या इंग्रजांच्या पथ्यावर

---

१ पी. आर. सी. भा. १२, पृ. ६८-७५, ले. १७ सप्टेंबर १८१६.

२ चोकसी, लास्ट फेज, पृ. ९३, १४९; गुप्ता, बाजीराव, पृ. १४९.

पडणाऱ्या अशा सूचना केल्या. त्यामुळे एल्फिन्स्टन खूष झाला आणि त्याने बाजीरावाच्या वर्तणुकीबद्दल चांगला रिपोर्ट केला. बाजीराव आपल्याशी गोड बोलून गुप्तपणे लढाईची तयारी करु लागला होता. याचा संशय पहिल्यांदा एल्फिन्स्टन यास आला नाही. १८१७ च्या फेब्रुवारीमध्ये एल्फिन्स्टन यास बातमी लागली की त्रिंबकजी नीरा नदीकाठीच्या भागात आहे. त्याचा पाठलाग करण्यास एल्फिन्स्टनने बाजीरावास सांगितले. बाजीरावाने सेनापती बापू गोखलेस त्रिंबकजीचा बंदोबस्त करण्यास सांगितले. गोखले नीरेहून परत आले आणि त्यांनी त्रिंबकजीच्या काहीच हालचाली नीरेच्या काठी नाहीत असे पेशव्यास सांगितले[१]. हे वृत्त एल्फिन्स्टनला कळविले गेले तेव्हा एल्फिन्स्टनने बाजीरावाची कपट नीती ओळखली आणि बाजीरावाची भेट घेऊन त्यास बजाऊन सांगितले की "त्रिंबकजीस आम्ही पकडू पण तुमची त्याजला आतून फूस आहे, ती बंद करा. तसेच तुम्ही फौजा जमवून जी लष्करी तयारी करीत आहात तीही लगेच बंद करा". त्यावर बाजीरावाने अत्यंत कांगावा केला. मी इंग्रज सरकारची मर्जी सांभाळण्यात इतका तत्पर असता मजवर हे नसते कुभांड रचण्यात येत आहे", अशी त्याने बतावणी केली पण त्याचा परिणाम एल्फिन्स्टनच्या मनावर न होता त्यान दिनांक १५ मार्च १८१७ रोजी कर्नल स्मिथला सैन्यासह पुण्यावर चालून जाण्यास सांगितल. तसेच गव्हर्नर जनरलला खलिता पाठवून बाजीरावाविरुद्ध उघडपणे युद्ध पुकारण्याची परवानगी मागितली.

**बाजीरावावर नवीन तह लादला :**

पेशव्याने सुद्धा इंग्रजांशी लढाई करण्याकरिता गुप्तपणे तयारी चालविली होती. त्याने आपल्याकडील जडजवाहर व खजिना रायगड किल्ल्यात सुरक्षिततेसाठी पाठवून दिला. दिनांक १ एप्रिल १८१७ रोजी एल्फिन्स्टनने बाजीरावास एक कडक पत्र लिहून कळविले की त्रिंबकजीचा पाठलाग जर झाला नाही तर इंग्रज सरकारला आपल्याशी जाहीररीत्या युद्ध पुकारावे लागेल व त्याच्या बऱ्या वाइटाचे धनी तुम्हीच व्हाल. दिनांक ६ एप्रिलला बाजीरावाने एल्फिन्स्टनला भेटीस बोलाविले व नेहमीच्या पद्धतीने त्याने लाचारी दाखवून लाघवी बोलून डेंगळेच्या बाबतीत आपण निरपराधी आहोत अशी बतावणी केली. एल्फिन्स्टनने त्यावर कठोरपणे सांगितले की एक महिन्याचे आत तुम्ही त्रिंबकजीस पकडून आणून आमचे स्वाधीन करा आणि तोपर्यन्त जामीन म्हणून तुमचे चार किल्ले रायगड, पुरंदर, सिंहगड व त्रिंबक आमचे ताब्यात द्या. या दरडावणीने बाजीराव अगदी घाबरून गेला. दिनांक ८ मे १८१७ रोजी सकाळी इंग्रज फौजानी एल्फिन्स्टनच्या हुकुमावरुन पुणे शहरास वेढा दिला[२]. हे कळताच बाजीरावाची बोबडी वळली. लगेच दहा वाजता त्याने किल्ल्याच्या सोडचिठ्या लिहून मुकाट्याने एल्फिन्स्टनकडे पाठवून

---

१ पी. आर. सी. भा. १३, पृ. ८२.

२ कित्ता पृ. १६५, १६६

दिल्या. तेवढ्याने हातघाईवर आलेले प्रकरण तात्पुरते मिटविले. बाजीरावाने त्रिंबकजीस पकडण्याचे काहीच केले नाही हे इंग्रजांनी त्याच्या वारंवार लक्षात आणून दिल्यावर दिनांक २० मे रोजी त्याने त्रिंबकजीस पकडून देण्याबद्दल दोन लाखांचे बक्षीस व इनाम गाव देण्याचे जाहीरनामे लावले. डेंगळेचा पत्ता ठावूक असून तो दाखवून न दिल्यास त्याचे पारिपत्य होईल असेंही जाहीरनाम्यांत देऊन डेंगळेच्या बारा साथीदारांची नांवेही दिली[1].

बाजीराव त्रिंबकजी डेंगळ्यास इंग्रजांचे स्वाधीन करण्यास अनमान करीत होता ह्याचे कारण ह्या वेळी त्याने बाळाजी कुंजरच्या पुढाकाराने सर्व मराठे सरदारांची एकजूट घडवून आणून इंग्रजांशी लढाई देण्याचे त्याचे मनात घाटत होते. पेशव्यांचे राज्य जिंकून त्यास नामशेष करण्याचा ठराव गव्हर्नर जनरलने दिनांक १६ मे १८१७ रोजी केला व तसे हुकूम ठिकठिकाणच्या आपल्या रेसिडेंटांस पाठविले[2]. त्या धोरणाने सर्व इंग्रजी फौजांची हालचाल सुरू झाली.

गव्हर्नर जनरलचा वरील ठराव मिळतांच एल्फिन्स्टनने गव्हर्नर जनरलच्या मंजुरीने आलेला नवीन तह त्यांतील अटींसह दिनांक १ जून १८१७ रोजी बाजीरावास दिला. तो स्विकारण्याची बाजीरावाने प्रथम कांकू केली. एल्फिन्स्टनने बाजीरावास निक्षून असे सांगितले की हा तह तुम्ही न स्विकारला तर आम्ही तुमच्याशी युद्ध करून तो स्विकारण्यास भाग पाडू. तेव्हां बाजीरावाने घाबरून केविलवाण्या स्थितीत नाईलाजाने ह्या तहावर दिनांक १३ जून १८१७ रोजी सह्या केल्या. ह्या तहाने त्रिंबकजी हा शास्त्रींचा खुनी असे बाजीरावास मान्य करावे लागले. इतर संस्थानिकांशी बाजीरावाचे संबंध तोडले. त्यांचे वकील ह्यानंतर आपआपल्या राज्यांत परत गेले. महाराष्ट्राबाहेरील सर्व मुलूख इंग्रजांचे ताब्यांत आला. बाजीराव एक सामान्य संस्थानिक राहिला. या तहाने एल्फिन्स्टनने नुसत्या दमाने बाजीरावास रेशमासारखा मऊ केला. पेशव्यांची सत्ता व वैभव नाहींसे करून तो राजदंड कंपनी सरकारने आपल्या हाती घेतला. पुण्याच्या तहावर सही करताना बाजीरावाचा संताप व उद्रेक अनावर झाला. हिंदुस्तानांतील पेंढाऱ्यांचा सुळसुळाट बंद करावा असा कंपनी सरकारने याच वेळी निश्चय केला. त्यासाठी हिंदी संस्थानिकांची मदत शिष्टाई करून घ्यावी असे ठरवून कंपनी सरकारने या शिष्टाईसाठी मालकम साहेबाची नेमणूक केली. मालकम नागपूरकर भोंसले व शिंदे यांच्या भेटी घेऊन पुण्यास आला आणि बाजीरावाची दिनांक ९ ऑगस्ट १८१७ रोजी भेट घेतली. मालकम पेशव्यास दोन दिवस भेटला. या भटीत बाजीरावाने एल्फिन्स्टनबद्दल बरीच तक्रार केली. मालकमने पेशव्यांकडून पेंढाऱ्यांच्या पारिपत्यासाठी मदतीचे आश्वासन मिळविले व तो परत गेला. आपण पूर्वीचे सर्वसत्ताधारी पेशवे नसून कंपनी सरकारच्या कृपाछत्राखाली वावरणारे सामान्य मांडलिक झालो आहोंत,

---

१ जॉन ब्रिग्ज् मेमायर्स, पृ. ४४-४५.

२ पे. आर. सी. व्हा. १३, ले. ४७.

तेव्हां ही स्थिती बदलली पाहिजे या करिता कंपनी सरकारशी समरांगणावर दोन हात केले पाहिजेत. हा एकच उपाय शिल्लक असल्यामुळे तो आता त्या तयारीस लागला. हे जाणून पेशव्याशी आपल्याला लवकरच युद्ध करावे लागेल, त्याचबरोंबर नागपूरकर भोंसले, पेंढारी आणि होळकर यांच्याशी युद्ध करून त्यांचे पारिपत्य करण्यासाठी इंग्रजांनें पावले उचलली.

**नागपूरकर भोंसलेचा पाडाव :**

इ. स. १८०३ मध्ये इंग्रजांकडून मार खाल्यापासून नागपूरकर रघूजी भोसले कोणाशीही कशाही प्रकारचे राजकीय संबंध न टेवता आपले नागपूर राज्य सांभाळीत होते. ब्रिटिशांनी त्यास तैनाती फौजेचा करार करण्यास बारंवार सांगितले पण त्याने त्या गोष्टीस ठामपणे नकार दिला. यशवंतराव होळकराने ज्यावेळी मदतीकरिता हांक दिली तेव्हांही तो गप्प बसला. मात्र त्याने दौलतराव शिंद्याशी मैत्रीचे सबंध राखिले होते. कॉर्नवॉलीस गव्हर्नर जनरल होऊन आल्यावर त्याने लॉर्ड वेलस्लीचे चढाईचे धोरण बदलून हिंदी सस्थानिकांच्या आपसांतील भांडणांत न पडण्याचे ठरविले. ह्या धोरणाचा फायदा शिंदे व नागपूरकर भोसले यांनी एक होऊन उठविला. भोपाळच्या नबाबाने होशंगाबाद आणि शिवनी हे दोन रघुजीचे जिल्हे जिंकून घेऊन ते आपल्या राज्यांत विलीन केले होते. नागपूरकर भोसले यांनी शिंद्यांच्या सहाय्याने भोपाळकरांवर इ. स. १८०७ मध्ये दबाव आणिला आणि ते दोन्ही जिल्हे परत मिळविले. भोपाळ नबाबाने इंग्रजांच्या सहाय्याने मराठ्यांकडील माळव्याचा प्रदेश लाटला हे मराठे सरदारांना सलत होते.

इ. स. १८०९ मध्ये होळकरांचा सरदार मीरखान याचे सहाय्याने भोपाळच्या नबाबाने रघूजीवर हल्ला करण्याचा धाक घातला. रघूजीन ह्या दोघांच्या आक्रमक चढाईस मोठ्या धैर्याने तोंड दिले आणि दोघांना माघार घेण्यास भाग पाडिले. ह्या प्रसगी गव्हर्नर जनरल लॉर्ड मिंटो याने कर्नल क्लोजच्या नेतृत्वाखाली ब्रिटीश फौज रघूजीच्या मदतीसाठी पाठवून दिली. हेतू हा की रघूजीने ही ब्रिटीश फौज आपल्या राज्याच्या सरक्षणासाठी कायम ठेवावी. ह्या कृत्याबद्दल रघूजीने इंग्रजांचे आभार न मानता उलट नापसंती व्यक्त केली. तदनंतर इ. स. १८१३ व १८१४ या वर्षी शिंदे व भोसले या दोघांनी मिळून भोपाळवर हल्ला केला. भोपाळचा नबाब वझीर मुहमदखानाने शौर्याची कमाल करून तो वेढा उठविण्यास भाग पाडले.

इ. स. १८१४ मध्ये इंग्रजांचे नेपाळशी युद्ध सुरू झाले. त्यावेळी सुरक्षितेचे उपाय म्हणून इंग्रजांनी सर्व हिंदी संस्थानिकांची मैत्री संपादण्याचे त्यांनी प्रयत्न केले. ह्याच धोरणानुसार त्यानी नेपाळच्या नरेशाशी मैत्रीचा तह केला (२९ ऑक्टोबर १८१४) व शिंद्यांच्या जोखडांतून त्याची मुक्तता केली. नेपाळचे युद्ध मार्च इ. स. १८१६ त संपले. ह्याच महिन्यांत दिनांक २२ मार्च रोजी रघुजीचा प्रतिकार नाहीसा होऊन इग्रजांस नागपूरमध्ये पाय रोवण्यास फावले[1].

---

१ पूना रेसि. कॉ. व्हा. ५ ले. २२७.

रघूजीस परसोजी भोसले नावाचा ३८ वर्षाचा मुलगा होता. त्यास संधी-वात होऊन अंधत्व आले होते. त्यामुळे राज्यकारभार पहाण्यास तो नालायक होता. रघूजीचा भाऊ व्यंकोजी मन्याबापू ह्याला मुधोजी तथा अप्पासाहेब नावाचा २० वर्षाचा मुलगा होता. आणि तो सर्वार्थाने राज्यकारभार चालविण्यास समर्थ होता. मयत रघूजीचे अप्पासाहेबावर प्रथम मुळीच प्रेम नव्हते. तथापी अंतसमयी त्यास बोलावून आणून सांगितले की, "बाळासाहेब निर्बुद्ध आहे. त्याचा संभाळ करा आणि घराण्याची अब्रू संभाळा".

रघूजी निवर्तल्यावर दरबारातील शिरजोर सरदारात फूट पडली. एक पक्ष मुधोजी अप्पासाहेबास गादीवर बसविण्यास अनुकूल होता तर दुसरा पक्ष त्याच्या विरुद्ध होता. ब्रिटीश रेसिडेंट जेंकीन्स स्वत: दरबारात हजर राहून सर्व घडामोडी बारकाव्याने लक्षपूर्वक पहात होता. त्याला दरबारातील दुहीचा फायदा घेऊन नागपूरकरांकडून तैनाती फौजेचा करार करून घ्यावयाचा होता. त्याने मुधोजी अप्पासाहेबाचे मन वळवून त्यास तैनाती फौजेचा करार करण्यास भाग पाडले. मुधोजी अप्पासाहेबाने अतिशय गुप्तरुपे दिनांक २७ मे १८१६ च्या रात्री तैनाती फौजेचा स्वीकार करण्याच्या करारावर सह्या केल्या[१]. मात्र इंग्रजांशी करार करण्याच्या विरुद्ध नागपूरकर भोसल्याचे दरबारी लोक होते. नागपूरकरांनी तैनाती फौजेचा स्वीकार केल्याचे गव्हर्नर जनरलने जाहीर केले. अप्पासाहेबाने धैर्य आणि धाडशी-पणा दाखवून हा तैनाती फौजेचा करार घडवून आणला म्हणून गव्हर्नर जनरलने अप्पासाहेबाचे अभिनंदन केले. तैनाती फौजेच्या पूर्तीसाठी कर्नल डोव्हरन आपली फौज घेऊन नागपूरांत हजर झाला. ह्या गोष्टीचा परसोजीची आई, त्याची बायको काशीबाई आणि बहुतेक सर्व दरबारी लोक यांनी धिक्कार केला. इंग्रज फौज नागपुरांत आल्यावद्दल सर्व लोकांस वैषम्य वाटले. इंग्रजांस घरात आणण्यापूर्वी त्याने आपणांस एका शब्दानेही विचारले नाही याचा त्यांस विशेष संताप आला. ह्या संतापाच्या लाटेमुळे अप्पासाहेबास नागपूरांत रहाणे धोक्याचे वाटून त्याने तैनाती फौजेच्या छावणीत तेलंगखेडीच्या बागेत जाऊन दिनांक २७ जून १८१६ रोजी वास्तव्य केले.

### परसोजीचा मृत्यु, अप्पासाहेबाची गादीवर स्थापना (फेब्रुवारी १८१७) :

अप्पासाहेब छावणीत रहाण्यास गेल्यावर त्याचे विरुद्ध जबरदस्त कारस्थान सुरू झाले. परसोजी जिवंत असेपर्यन्त आपल्या हाती पूर्ण सत्ता येणार नाही व आपल्या विरुद्धच्या कारस्थानांचा बीमोड करता येणार नाही हे लक्षांत घेऊन परसोजीस नाहीसा करण्याचा घाट त्याने रचिला. जानेवारी १८१७ च्या अखेरीस वैतागून अप्पासाहेब एकाएकी नागपूर सोडून चांद्यास गेला. मागे नागपूरचे वाड्यांत दिनांक १ फेब्रुवारी रोजी सकाळी परसोजी भोसले बिछान्यातच मरण पावलेला आढळला[२]. त्याचा मृत्यु कशामुळे झाला हे

---

१ आर. एम. सिन्हा, भोसलेज ऑफ नागपूर धि लास्ट फेज, पृ. २३.

२ कित्ता, पृ.२५.

कळेना तेंव्हा जेंकिन्सने खाजगी तपास केला. पण त्यास काही विशेष कारण आढळून आले नाही. परसोजीची धर्मपत्नी काशीबाई सती गेली. अप्पासाहेबाने पुण्यास पेशव्यांकडे सेनासाहेब पदाची वस्त्रे आणण्यासाठी माणसे पाठविली. पण ह्यावेळी बाजीरावाने इंग्रजांशी तह केल्यामुळे महाराष्ट्रा-बाहेरील संस्थानिकांशी त्याचे संबंध तुटले. पेशव्यांकडून वस्त्रे मिळणे बंद झाले तेव्हा अप्पासाहेबाने दिनांक २१ एप्रिल १८१७ रोजी समारंभ करून सेनासाहेब पदावर अधिष्टीत झाला[1].

बाजीराव समस्त मराठे सरदारांना एकत्र करून इग्रंजांशी लढाई करून त्यांना घालवून देण्याच्या तयारीस लागला आहे. त्यांत भोसल्यांनी सामील व्हावयास हवे अशा प्रकारचे निमंत्रण बाजीरावाकडून आल्यावर अप्पासाहे-बासही हे तैनाती फौजेचे जू झुगारून द्यावे असे वाटू लागले. त्यासाठी अत्यंत गुप्ततेने ठिकठिकाणच्या फौजा व सरदार त्याने आपल्या तर्फेचे केले. शिंदे, होळकर व पेशवे यांचे वकील नागपुरांत होते; त्यांची कारस्थाने अप्पासाहेबाशी उघड उघड चालू झाली. अप्पासाहेबाने पेशव्यांस इंग्रजांचे जू झुगारून देण्याच्या कामात मदत देण्याचे ठरविले व त्याप्रमाणे आश्वासनही दिले. इ. स. १८१७ च्या सप्टेंबरात त्याने पेशव्यांचा पुढारी चित्तू याच्याशी मैत्री करून खूप सैन्य भरती केली. बाजीरावाने दिनांक ५ नोव्हेंबर रोजी पुण्याच्या इंग्रज रेसिडेन्सीवर हल्ला केला हे कळताच अप्पासाहेबानेही नागपूर रेसी-डेन्सीवर हल्ला केला. बाजीरावाने सेनासाहेब सुभ्याची वस्त्रे अप्पासाहेबास पाठविली. ती त्याने रेसिडेंट नको म्हणत असता समारंभपूर्वक दिनांक २४ नोव्हेंबर रोजी स्विकारली[2]. हा समारंभ म्हणजे इंग्रजांना उघड उघड आव्हान होते. सिताबर्डी टेकडीच्या खाली रेसिडेन्सी होती. या टेकडीवर रेसिडेंटने आपली फौज जमविली. अप्पासाहेबाकडे १८ हजार फौज व २६ तोफा होत्या. त्यांत अरबांचे पथक होते. त्या पथकाने दिनांक २६ नोव्हेंबर रोजी सकाळी रेसिडेन्सीच्या फौजेवर हल्ला केला आणि सिताबर्डी टेकडी ताब्यात घेतली. इग्रजी फौजेने रेसीडेन्सीत आश्रय घेतला. इग्रजां-कडील घोडेस्वार पलटणीचा कॅप्टन फिट्जरल्ड आपल्या घोडस्वारांसह अरबांच्या अंगावर घुसला. त्याबरोबर अरब मागे सरले. तेव्हा त्यांजवर ह्या घोड-स्वारानी उतरून तोफा चालविल्या. काही वेळ असा होता की नेटाचा संग्राम झाल्यावर अप्पासाहेबाचे लोक कचरून चहूबाजूनी पळू लागले. दुपारनंतर इंग्रजांचा जय झाला. तेव्हा जेंकिन्सने राजास तहाच्या अटी स्विकारण्यास सांगितले. याच वेळी इग्रजांस सैन्याची मदत आली. जेंकिन्सने राजास खलिता पाठवून कळविले की, त्याने आपल्याकडील सैन्यास सोडचिठी द्यावी, तोफा इग्रजांच्या हवाली कराव्यात आणि स्वतः रेसीडेन्सीमध्ये येऊन रहावे. त्याप्रमाणे अप्पासाहेबाने स्वतःकडील सैन्यास अरबांचा पराभव झाल्यावर रजा दिली आणि दिनांक १६ डिसेंबर रोजी रेसीडेन्सीमध्ये येऊन राहू लागला.

---

१ कित्ता.

२ कित्ता, पृ. २७

दिनांक ३० डिसेंबर रोजी इंग्रजांनी आपले निशाण राजवाड्यावर लावले सर्व किल्यांवर त्यांनी आपल्या फौजा ठेऊन दिल्या आणि २४ लाख उत्पन्नाच मुलख फौजेच्या खर्चाकरिता आपल्या ताब्यात ठेऊन सिताबर्डीची टेकडी तटबंदी-करिता आपल्या ताब्यात ठेवली. नवीन तहाने इंग्रजांच्या मागण्या कबूल करून अप्पासाहेबाने दिनांक ९ जानेवारी १८१८ रोजी पुनः वाड्यात प्रवेश केला. परंतु ह्या मानी पुरुषास अपमानकारक तह स्विकारून आपण इंग्रजांचे मांडलीक बनल्याबद्दल अत्यंत दुःख व खंत वाटू लागली. इतक्यांत पेशव्यांनी पुण्यातून पळ काढला आणि अप्पासाहेबाकडे माणसे पाठवून आपणांस येऊन मिळावे असे कळविले. त्याप्रमाणे पेशवा नागपूरकडे आल्यावर त्यास जाऊन मिळावे हा बेत अप्पासाहेबाने गुप्तपणे केला. हे कारस्थान इंग्रजांस कळताच त्यास दिनांक १६ मार्च रोजी रेसीडेन्सीत आणिले[१]. त्यानंतर अप्पासाहेबावर चौकशी बसवून त्याने आपल्या पुतण्याचा खून केल्याचा आरोप ह्या चौकशीत सिद्ध झाला. गव्हर्नर जनरलने हुकूम केला की त्यास अलाहाबादच्या किल्यांत कैदेत ठेवावे. परसोजीची बायको दुर्गाबाई हिला रघूजीची कन्या बनूबाई गुजर हिचा बजाबा नावाचा १० वर्षाचा मुलगा दत्तक देऊन त्याचे नाव रघूजी बापूसाहेब असे ठेवले आणि दिनांक २६ जून १८१८ रोजी त्यास दत्तविधान करून विधी पूर्वक गादीवर बसविले. दसऱ्याच्या मूहूर्ताने दिनांक १ ऑक्टोबर १८१८ रोजी राज्यारोहण समारंभ करण्यात आला. नागपूरच्या सर्व राज्यांत नवीन ब्रिटीश अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आली व कारभार ब्रिटीश पद्धतीने सुरू करण्यात आला.

**अप्पासाहेबाचा वनवास, अखेर आणि योग्यता (दिनांक ३ मे १८१८ ते १७ जुलै १८४०) :**

दिनांक ३ मे रोजी अप्पासाहेब व त्याचे साथीदार यांना अलाहाबादच्या किल्यांत ठेवण्यासाठी इंग्रजी पलटणी चालू लागल्या. अप्पासाहेबास ही कैद जाचक वाटली. दिनांक १२ मे रोजी जबलपूरजवळील रायपूर गावी मुक्कामास थांबले असतांना पहाऱ्यावरील शिपायास अप्पासाहेबाने वश करून घेतले. दिनांक १३ मे रोजी पहाटेस पहाऱ्यावरील शिपायाने दुसऱ्या एका शिपायाचे संपूर्ण कपडे तंबुत आणून अप्पासाहेबास दिले. ते घालून तो चालू लागला आणि टप्प्याचे घोडे ठेविले होते त्यावरून फरारी झाला[२]. दिवस उगवल्यावर खरी बातमी बाहेर आली तेव्हा चहूकडे तपासासाठी फौजा रवाना करण्यात आल्या. अप्पासाहेबाने गोंडांच्या मुलुखात आश्रय घेतला. नेमाडातील महादेवाचे डोंगरातील चीनशहा नावाच्या गोंड राजाने त्यास आश्रय दिला. पावसाळ्यांत डोंगराळ प्रदेशांत शोध करणे मुष्कील होऊन बसले. दोन वर्षे इग्रजांनी मध्यप्रदेशचे रान धुंडले परंतु त्यांच्या हाती अप्पासाहेब लागला नाही. अप्पासाहेबास पेंढारी आणि पुण्याकडील सेवेतून कमी केलेली फौज येऊन मिळाली. त्यांनी गनिमी पद्धतीने लढून इंग्रजी फौजेस वारंवार

१ पूना रेसि. कॉ. व्हा. ५ ले. २३५.

२ कित्ता, ले. २३६.

चकविले. गोंड प्रदेशातून इंग्रजी फौज अप्पासाहेबावर चालून आल्यावर त्याने अशीरगड किल्याचा आश्रय घेतला. ह्या किल्याचा किल्लेदार शिद्यांतर्फे यशवंत लाड होता. त्यानें अप्पासाहेबास आश्रय दिला. इंग्रजांनी किल्यास वेढा घालून दिनांक ९ एप्रिल १८१९ रोजी किल्ला सर केला परंतु त्याअगोदरच अप्पासाहेब किल्यातून निसटला होता. अनेक वर्षे उत्तर हिंदुस्थानात तो भटकला पण त्याला कोणीही आश्रय दिला नाही. मात्र जोधपूरचा राजा मानसिंगानं त्याची सर्व प्रकारची हमी पत्करून त्यास आपल्या ताब्यात घेतला आणि त्याच्या इतमामाप्रमाणे त्याचा खर्च त्याने चालविला. तेव्हापासून अप्पासाहेबाचे वास्तव्य जोधपुरातच कायम झाले. दिनांक १५ जुलै १८४० रोजी हा शूर मराठा राजपुरुष वयाच्या ४४ व्या वर्षी मरण पावला[१].

**पेंढाऱ्यांचा उद्योग :**

पेंढाऱ्यांची उत्पत्ती मराठ्यांच्या आरंभापासूनची आहे. मुख्य लढाई संपल्यावर पराभूत शत्रूपक्षाची लूट करून त्याचा फन्ना उडविण्याच्या कामासाठी सर्व मराठे सरदार आपल्याबरोबर पेंढाऱ्यांची पथके नेहमीच बाळगीत असत. शिवाजी, संताजी घोरपडे यांच्या काळापासून ही पद्धत होती. ही फौज पगारी नव्हती. ती लुटीवर आपली गुजराण करीत असे. शत्रूच्या गोटाची लूटालूट व शत्रूपक्षाच्या मुलुखावर ताव मारून तो उद्ध्वस्त करून त्यांतून खंडणी व पैसा मिळविणे ही कामे पेंढाऱ्यांच्या फौजेची होती. औरंगजेबाच्या शेवटच्या कारकीर्दीपासून बाजारबुणगे फौजेची सुरुवात झाली. पहिल्या बाजीरावाचे सरदार शिंदे, होळकर, पवार व इतर यांनी आपल्या बरोबरही बाजारबुणगे फौज राखण्याचा शिरस्ता पाडला. ह्या फौजेचा सरदार कोणालाही आपला मुख्य मानत नसे. त्याच्या हाताखाली घोडदळ असे आणि घोडदळासह मोहिम करण्यात ते पटाईत होते. स्वतःच्या कर्तृत्वावर भिस्त ठेऊन स्वतःस सुचेल त्याप्रमाणे ते वागत असत. त्यांना कोणी धनी नव्हता. मराठी सत्ता जोपर्यन्त सुदृढ होती आणि त्यांचे सरदार समर्थपणे त्या सत्तेचे पोषण करीत होते तोपर्यन्त ही बाजारबुणगी फौज मराठे सरदारांच्या धाकात रहात होती. घोड्यावरून मोठ्या चपळतेने लांब लांब मजला मारण्यात ते निपुण होते आणि त्याचा उपयोग मराठे सरदार करून घेत असत. लॉर्ड वेलस्लीच्या वेळेपासून मराठ्यांची शिस्तबद्ध फौज प्रत्येक सरदाराचा पराभव झाल्यानंतर सरदारकडून कमी करण्यांत येऊ लागली. ही कमी केलेली फौज उदरनिर्वाहाचे दुसरे साधन नसल्यामुळे लहान लहान टोळ्या करून आपली शस्त्रे व घोडी बाळगून इंग्रजांनी जिंकलेल्या मुलखांत बंडावा करून त्यावर ताव मारू लागली. म्हणता म्हणता लॉर्ड बर्लो, लॉर्ड मिंटो यांच्या कारकिर्दीतील जैसे थे धोरणाचा फायदा घेऊन त्यांनी आपल्या जोरदार हालचाली सुरू केल्या. त्या एवढ्या होत्या की जणुकाही ब्रिटीशांच्या वाढत्या सत्तेला खीळ पडून त्यांना स्वतःचा उत्कर्ष साधण्याची परिस्थिती निर्माण झाली[२].

---

१ आर. एम. सिन्हा, किस्ता पृ. २९.

२ सरदेसाई, मराठी रियासत, उत्तर विभाग–३ पृ. ४२५.

सध्याच्या अस्थिर काळात पेशवे व त्यांचे माळवा व बुन्देलखंड येथील सरदार यांची सत्ता हळूहळू संपुष्टात येऊ लागल्यावर त्यांनी पेंढाऱ्यांना फूस देऊन त्यांना इंग्रजांनी जिकलेल्या मुलुखात धुमाकूळ घालण्यास उत्तेजन दिले. इ. स. १८१०-११ पासून पेंढाऱ्यांचे थवे इंग्रजी मुलखात उत्तरोत्तर अधिकच धुमाकूळ घालू लागले[१]. यासंबंधीचे वृत्तांत इंग्रज अधिकाऱ्यांनी इंग्लंडला पाठविले. त्यांच्या मुलुखात धुमाकूळ घालण्याच्या या उद्योगामुळे लोकांना जीवन असह्य झाले. लॉर्ड हेस्टींग्ज हिंदुस्थानात आल्यावर त्याचे लक्ष ह्या पेंढाऱ्यां-कडून होणाऱ्या उपद्रवाकडे वेधले गेले. त्याने लागलीच इंग्लंडच्या सरकार-कडून पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्याचे काम हाती घेण्याकरिता हुकूम मिळविले. पेंढाऱ्यांचे बंदोबस्ताचे काम इंग्रजांचे नेपाळशी युद्ध संपेपर्यन्त थांबले होते.

बहुसंख्य पेंढारी शिंदे व होळकर यांच्या पदरी होते. शिंदेशाही पेंढारी व होळकरशाही पेंढारी अशा नांवाने ते ओळखले जात असत. महादजी शिंदे यांनी आपल्या पदरच्या हीरु व बुराण या दोन पेंढारी सरदारांस नर्मदेच्या उत्तरेकडील विंध्यांद्रीतील कांहीं प्रदेश तोडून दिला. ते लांब लांब मजला करीत असल्यामुळें त्यांना पकडणे कठीण जाई. हीरु आणि बुराण इ. स. १८०० च्या सुमारास मरण पावले. हिरास दोस्त महमद व वजीर महमद असे दोन मुलगे होते. ते बापाच्या मृत्युनंतर पेंढाऱ्यांचे पुढारी म्हणून प्रसिद्ध पावले. परंतु त्याचे अगोदरच यशवंतराव होळकराच्या पदरचा करीमखान जास्त पुढे आला. यशवंतरावासारख्या धाडसी व कर्तबगार सरदाराचा आश्रय मिळाल्यामुळें त्याचा उत्कर्ष फार लौकर झाला. करीमखान यानें भोपाळच्या राज्यावर ताव मारण्यास सुरुवात केली. उत्तरेस चंबळच्या मुलुखापासून आग्नेयीस गोदावरीच्या मुखापर्यन्त जो विस्तृत प्रदेश आहे तो सर्व कैक वर्षे करीमखान व इतर पेंढारी सरदारांनी अगदी उध्वस्त करून टाकला. दौलतराव शिंदे यास त्याच्या वाढत्या सत्तेची दहशत पडून त्यानें इ. स. १८०६ त त्यास भेटीस बोलाऊन अचानकपणें कैद केले व पांच वर्षेपर्यन्त ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत ठेविलें. त्यामुळें दुसरे दोन पेंढारी सरदार दोस्त महमद आणि सीतू यांस पुढें येण्यास संधी मिळाली. नामदारखान म्हणून करीमखानाचा चेला होता. त्यानें शिंद्यांचें मुलुखांत धुमाकूळ मांडून आपल्या धन्याचा सूड उगविला. सन १८११ त शिंद्यांस दंड भरून आपली सुटका करून घेतली. या करीम-खानानें दुसरा पेंढारी सरदार सीतू याच्याशी संगनमत करून दोघांनी धुमाकूळ मांडला. या दोघांनी स. १८११ सालचा दसऱ्याचा समारंभ मोठ्या थाटानें साजरा केला. ह्या समारंभास २५,००० हून अधिक घोडेस्वारांचा ताफा उपस्थित होता. संबंध हिंदुस्थानभर छापा घालण्याची त्यांची योजना होती. त्याप्रमाणें त्यांनी कोणत्या तुकडीनें कोणत्या प्रदेशावर छापा घालावयाचा हेही ठरविले होते. पण सीतूस शिंद्यांनें आपल्या बाजूस वळविले आणि सीतूस बरोबर घेऊन शिंद्यांच्या फौजेने करीमखानवर चाल केली[२]. तेव्हां

१ कित्ता

२ सरदेसाई, न्यु. हि. म. भा. ३ पृ. ४७९.

त्याचा पाडाव होऊन तो पळून अमीरखानच्या आश्रयास गेला. होळकरांनी अमीरखानाकडून त्यास पुन्हा कैद करविले. तो सन १८१६ च्या अखेरपर्यन्त कैदेतच होता. ही संधी साधून सीतू आपल्या १५,००० फौजेसह नेमावरच्या उत्तरेस चहू बाजूस घाले घालू लागला. ह्या चारी पेंढारी सरदारांची एकंदर फौज ३३,००० होती. त्यांनी निजामाच्या मुलुखावर हल्ले चढविले. नेमावरची अवाढव्य बाजारपेठ लुटली आणि मौल्यवान जडजवाहीर व इतर चीजवस्तू लुटल्या. यशवंतराव होळकराकडे दुसरे दोन सरदार अमीरखान व शहामतखान होते. या दोन सरदारांच्या मदतीमुळे सन १८०२ मध्ये यशवंतरावास पेशव्यांचा पराभव करून त्यास पळवून लावणे शक्य झाले. अमीरखानच्या माणसांनी मंदसर येथील हिंदू व्यापाऱ्यांकडून जबरदस्तीने पैसे गोळा केले. अमीरखानजवळ जमाव चांगला ३०,००० होता. शहामतखान सन १८१४ च्या अखेरीस मरण पावला तेव्हा त्याच्या हाताखालील फौज अमीरखानाने आपल्या पदरी ठेविली. होळकरांच सर्व राज्य त्याच्याच तंत्राने चालले होते. सन १८१७ च्या डिसेंबरमध्ये होळकरांच्या फौजेवर चाल करण्यापूर्वी होळकरांनी अमीरखानास आपल्या बाजूस वळविले आणि त्याला टोंक्याची जहागिरी दिली. टोंक्याचे नबाब म्हणून १९४७ पर्यन्त ते राज्य करीत होते.

पेंढाऱ्यांनी इ. स. १८१६ च्या फेब्रुवारीमधे इंग्रजी मुलुखांत चढाई केली. माळव्यातील आपल्या मुख्य ठाण्याहून निघून मच्छलीपट्टण येथे ते १० मार्च १८१६ रोजी पोंचले. वाटेतील प्रदेशावर धाड घालून तो बेचिराख केला. त्यानंतर त्यांनी इंग्रजांच्या ताब्यांतील मद्रासच्या मुलुखांत प्रवेश केला. ते प्रत्येक दिवशी ४० मैलांच्या मजला करून कमीत कमी ५० गावे उजाड करीत असत. कडाप्पा लुटल्यावर त्यांच्या अंगावर चालून आलेल्या इंग्रजी फौजेस झुकांडी देण्याकरिता ते उत्तरेस वळले. त्यानंतर त्यांनी हैदराबाद व पुण्याजवळील प्रदेश उध्वस्त केला व ते १७ मे रोजी नर्मदा उतरून नेमावर या आपल्या मुख्य ठिकाणी आले. अशा रीतीने साडे तीन महिन्यांत त्यांनी इंग्रजी मुलुखांत धुमाकूळ घालून इंग्रजांना मोठी धास्ती उत्पन्न केली. इ. स. १८१५ व १६ या दोन वर्षात सबंध हिंदुस्तानांत त्यांनी दोनदा संचार करून मुलूख उध्वस्त केला. इंग्रजांना चौकशी करता असे कळले की मद्रास इलाख्यांत त्यांनी फक्त बारा दिवसच संचार केला. परंतु त्या थोडक्या काळांत १८२ लोकांचे खून केले, ५०० लोक जखमी झाले आणि ३५०० लोकांना निरनिराळ्या दुखापती केल्या. तसेच १०,००० वर लूट मिळविली. इंग्रजांच्या मुलुखांत धाडी घालून मुलूख उध्वस्त करण्याचे मुख्य कारण म्हणजे इंग्रजांनी त्यांचा बंदोबस्त करण्याच्या मोहिमेची तयारी चालविली होती ती बंद पडावी हे होते. त्याच वेळी बाळोजी कुंजर इंग्रजांच्या वाढत्या सत्तेस आळा घालण्यासाठी इंग्रजांस पेंढाऱ्यांनी सुरु केलेल्या उपद्रवास सहाय्य करण्यास मराठे सरदारांस सांगत होता[१].

---

१ कित्ता, पृ. ४८०–४८२.

अशा रीतीने नागपूरचे आप्पासाहेब, माळव्यांतील होळकर आणि पेंढारी एकत्र येऊन मराठ्यांचे घसरणीस लागलेले स्वातंत्र्य राखण्यासाठी एकाच वेळी उठाव करून इंग्रजांशी लढण्यास सज्ज झाले. म्हणून इंग्रजांची पेंढाऱ्यांवरील मोहीम आणि मराठ्यांशी शेवटचे युद्ध हे एकाच वेळी व एकाच उद्देशाने झाल्यामुळे ते एकमेकांस पूरक ठरले. इंग्रजांनी वरील दोन्ही गोष्टी कशा हाताळल्या व कसा विजय मिळविला हे सांगावयास पाहिजे.

**पेंढाऱ्यांचा नायनाट :**

गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्ज याने पेंढाऱ्यांचा कोंडमारा करून त्यांना बाहेर जाण्यास सवड ठेऊ नये अशी योजना आखली. त्यासाठी ठिकठिकाणच्या इंग्रजांच्या फौजांना पेंढाऱ्यांवरील मोहिमेत सामील होण्याचे हुकूम सोडले. तसेच असे जाहीर केले की पेंढाऱ्यांवरील या मोहिमेत हिंदुस्तानांतील सर्व लहान मोठ्या सत्ताधीशांनी इंग्रजांस सामील झालेच पाहिजे, मग ते सत्ताधीश इंग्रजांच्या तैनाती फौजा बाळगणारे असोत वा नसोत. जो कोणी या माहिमेंत सामील होणार नाही तो इंग्रजांचा शत्रू असे समजून त्याजवरसुद्धा युद्ध पुकारले जाईल. ही गोष्ट जाहीर करण्याचा हेतू असा की एतद्देशीय सत्ताधीशांचे सहाय्य मिळाले तर ते इंग्रजांस हवेच होते. पण त्यानी जाऊन निदान पेंढाऱ्यांस सामील होऊ नये एवढी खात्री पाहिजे होती. ठिकठिकाणच्या इंग्रज रेसिडेंटना आपआपल्या टापूतील एतद्देशीय संस्थानिकांकडून असे लेखी लिहून घेण्यास सांगितले की पेंढारी हे शांततेस धोकादायक आहेत, तेव्हां त्यांचा निःपात होणेच योग्य.

गव्हर्नर जनरल बर्लो आणि मिंटो यांचे तटस्थतेचे धोरण रद्द समजून सर्व एतद्देशीय संस्थानिकांनी इंग्रज सरकारशी पेंढाऱ्यांचा नायनाट करण्याकरिता नव्याने एकजूट करावी असे आवाहन केले. पेंढाऱ्यांचा उपद्रव नाहीसा करण्यासाठी प्रबळ उपाय योजना करण्याचे इंग्रजांनी वरीलप्रमाणे जाहीरनामा काढून योजिले. या मोहिमेची निश्चित योजना आंखण्यासाठी त्यांना एक वर्षापेक्षा अधिक कालावधी लागला. गव्हर्नर जनरलने या मोहिमेसाठी देशाचे दोन भाग पाडले. नर्मदा नदी मध्ये ठेऊन उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग पाडले. दिल्लीचा रेसिडेंट चार्लस मेटकाफ् याने उत्तरेतील संस्थानिकांस आपल्या ताब्यात ठेवणे आणि दक्षिणेकडील सस्थानिकांना ताब्यात ठेवण्यासाठी जॉन मालकम् यास नेमले. इ. स. १८१७ च्या पावसाळ्यात या दोन्ही इंग्रज मुत्सद्यांनी एकमेकांशी विचारविनिमय केला. मेटकाफ् याने कोटा, भोपाळ, बुंदी, उदेपूर, जोधपूर आणि जयपूर या संस्थानिकांशी खास तह केले व त्यांना पूर्ण मांडलिक बनविले.

जॉन मालकम्ने सुद्धा पुणे, नागपूर, हैद्राबाद ह्या ठिकाणी जाऊन भेटी दिल्या. मालकम् पेशवा व नागपूरकर भोंसले यांना आपल्या बाजूस ओढू शकला नाही. कारण हे दोघेही इंग्रजांना त्रास देत होते. मालकम्ने रेसिडेंट आणि कमांडंट

यांना सूचना देऊन युद्धाचे सर्व बेत समजाऊन देऊन राजकारणाच्या योजना समजून दिल्या. तदनंतर मालकम् व मेटकाफ् हे गव्हर्नर जनरलला भेटून पेंढाऱ्यांवरील मोहिमेची तयारी पूर्ण झाल्याचे सांगितले. मोहिमेस सुरुवात पावसाळा संपल्यानतर करण्याचे ठरविले.

तारीख १६ ऑक्टोबर रोजी गव्हर्नर जनरलने कानपूर सोडून पुढे यमुनेच्या कांठी आग्र्याच्या समोर मुक्काम केला[१]. इकडे बाजीरावाने यावेळी शिंदे, होळकर, भोंसले यांजकडे आपली संधाने विशेष जोराने करून सर्वांनी इंग्रजांचा बेत हाणून पाडण्याचा उद्योग केला. त्यावरून जिकडे तिकडे एकच दंगल सुरु झाली. आणि एतद्देशीय राजेरजवाड्यांत मोठी चलबिचल उडून गेली. शिंद्यांची मनःस्थिती द्विधा झाली. त्यांचा विचार मराठा मंडळाच्या विचाराने वागण्याचा होता. पण त्यास इंग्रज सैन्याने वेढल्यामुळे त्याचा नाइलाज होऊन त्याने दिनांक ५ नोव्हेंबर रोजी इंग्रजांशी नवीन तह केला. या तहाने पेंढाऱ्यांचे युद्धात "तुम्हांस मनापासून सहाय्य करू" असे शिंदे यांनी आपणास बांधून घेतले. बुंदेलखंडाच्या बाजूस जो पेंढाऱ्यांचा मुख्य जमाव होता त्याजवर सन १८१७ च्या नोव्हेंबरात चहू बाजूंनी इंग्रजांच्या फौजा चालून गेल्या. इंग्रजांनी आपले सैन्य दोन मोठ्या तुकड्यात विभागले. उत्तरेकडील तुकडीचे प्रभुत्व जनरल ऑक्टरलोनीकडे दिले. तो यमुनेवर ठाण मांडून बसला. दक्षिणेकडील सैन्याचा मुख्य हिस्लॉप होता. तो नर्मदेवर होता. मालकम् एकंदर धोरण पारखून जरुर त्या सूचना सर्वांना देत होता. वरील दोन्ही अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली लष्कराच्या लहान लहान तुकड्या मोक्याच्या जागी ठेविल्या होत्या. पेंढाऱ्यांकडे २३,००० सैन्य जमा झाले. त्यांचे नेतृत्व सीतू, करीमखान व वसील महमद या तिघांनी केले. मराठ्यांची मदत मिळविण्याचाही त्यांनी प्रयत्न केला. पुणे, नागपूर, आणि इंदूर या ठिकाणाहून त्याला प्रतिसाद मिळाला[२].

गव्हर्नर जनरलनी १६ ऑक्टोबर १८१७ रोजी पेंढाऱ्यांवरील मोहिमेचे हुकूम सोडले. इंग्रज सैन्य माळव्यांतील पेंढाऱ्यांवर चालून गेले. १३ डिसेंबर १८१७ रोजी करीमखान व वसील महमद या दोघांचा झालावारनजीक शहाबाद येथे पुरा बीमोड केला. ते उदेपूरच्या जंगलात पळून गेले. दडी मारलेल्या ठिकाणाहून त्यांना हुसकावून लावल्यावर ते नर्मदेच्या बाजूला पळून जात असता त्यांचा पाठलाग केला. या त्यांच्या पळापळीत त्यांच्या सैनिकांनी त्यांना सोडले. लागलीच शरण आल्यास गव्हर्नर जनरलने त्यांना माफी देण्याचे जाहीर केले. वसील महमद शिंद्यांच्या ताब्यांत जाऊन त्याने विष प्राशन केले. करीमखान मालकम्‌ला १५ फेब्रुवारी १८१८ रोजी शरण गेला. त्याला गोरखपूर येथे इंग्रजांनी लहानशी जहागीर दिली. पेंढाऱ्यांचा दुसरा पुढारी नामदारखान हा कर्नल ॲडॅम यास ३ फेब्रुवारी १८१८ रोजी भोपाळ-जवळील देवराजपूर येथे शरण गेला. पेंढाऱ्यांचा सर्वात बलाढ्य नायक

१ कित्ता, पृ. ४८२.

२ कित्ता, पृ. ४८२.

सीतू याचा सातत्याने पाठलाग करण्यात आला आणि त्याला अशीरगडजवळील जंगलात पिटाळून लावले. तेथे त्यास वाघाने फाडले. अशा रीतीने पेंढाऱ्यांचा त्रास संपुष्टात आणला[1].

**होळकर सत्तेचा नाश :**

पेंढाऱ्यांवर इंग्रजांनी मोहीम काढण्यासाठी योजनाबद्ध जय्यत तयारी केली ती केवळ ठिकठिकाणच्या मराठे सरदारांची सत्ता खिळखिळी करून त्यांना आपले मांडलिकत्व स्वीकारावयास लावून आपण सार्वभौम होण्यासाठी. ही योजना लांब पल्ल्याची होती आणि त्यांत पुणे, इंदूर, नागपूर, बडोदे, ग्वाल्हेर येथील सर्व मराठे सत्ताधीशांस एकएकटे गाठून त्यांचा पराभव करून त्यांना शरण आणावयाचे होते. यशवंतराव होळकरच्या मृत्युनंतर त्याची आवडती रक्षा तुळसाबाई हिने आपल्या सवतीचा चार वर्षांचा मुलगा मल्हारराव याची गादीवर स्थापना करून अमीरखानाच्या सहाय्याने काही वर्षे कारभार चालविला. तात्या जोग आणि गणपतराव ह्या दोन कारभाऱ्यांचा सल्लाही ती मानू लागली. तिची मोठी अडचण पैशाची होती आणि पैशाशिवाय लष्कर उभे करता येईना व लष्कराशिवाय राज्याच्या शत्रूचे पारिपत्य करता येईना. यातूनही दौलतराव शिंदे सगळीच होळकरशाही घशात घालण्याच्या उद्योगात होता. मल्हारराव आणि तुळसाबाई यांना नाहीसे करण्याचा त्याने प्रयत्न केला. तुळसाबाई शहाणी, देखणी, तडफदार व दुसऱ्यावर छाप बसविणारी अशी होती. तिचा दिवाण गणपतराव शौचे या सामान्य प्रतीच्या निर्बुद्ध माणसाशी अश्लाघ्य संबंध होता. यामुळे तिच्या कर्तबगारीस मोठे वैगुण्य प्राप्त झाले. पुण्यास बाजीरावाचा इंग्रजांशी जेव्हा बेबनाव झाला तेव्हा होळकरावरचा राग विसरुन त्यास सहाय्य करण्यासाठी आपली माणसे इंदुरास पाठविली. तुळसाबाईचा कल पेशव्यांच्या बाजूने होता. पण पेंढाऱ्यांवर इंग्रजांनी मोहीम पुकारली ही गोष्ट होळकरच्या लष्करास असह्य वाटू लागली. होळकराची फौज बिथरुन ती इंग्रजांवर चढाई करण्याच्या बेतात आहे असे वाटल्यावरून रेसिडेंट मेटकाफ् याने होळकर दरबारशी पत्रव्यवहार सुरू केला व नंतर बोलणेही सुरू केले. तेव्हा तुळसाबाई पेंचात सापडून तिने इंदूर सोडून मल्हाररावासह कोटयास जालिमसिहाच्या आश्रयास गेली. इंग्रजांनी तिच्या हालचालीवर नजर ठेवली. होळकर सैन्य दक्षिणेत जाणार नाही याबद्दलची खबरदारी घेतली. इ. स. १८१७ च्या डिसेंबरमध्ये मालकम्‌ने तुळसाबाईकडे शिंद्यांशी ज्या प्रकारचा तह केला त्या प्रकारच्या तहाच्या अटी पाठविल्या[1]. तुळसाबाईने इंग्रजांचे संरक्षण स्विकारावे असा तात्या जोग याने सल्ला दिला. परंतु सर्व सत्ता पठाण सरदारांच्या हाती होती. विशेषत: रोषन बेग हा कवायती रेजिमेंटचा मुख्य असून रामदीन ब्राह्मण भय्या हा त्यावेळच्या नावाजलेल्या निष्णात घोडदळाचा प्रमुख होता. या दोघांच्या हातात लष्करी सत्ता असल्यामुळे तुळसाबाईचे काही चालले नाही. बाजीरावाच्या सहाय्यास

१ किंता, पृ. ४८३.

१ सरदेसाई, न्यु. हि. भा. ३ पृ. ४८४.

रामदीन जाऊ लागला. त्यास फौजेसह बाजीरावाकडे जाऊ देणे हे धोक्याचे आहे, त्याचा प्रतिकार केला पाहिजे असे मनात आणून इंग्रज फौजेने दिनांक १४ डिसेंबर १८१७ रोजी होळकरांच्या फौजेवर चाल केली. तेव्हा होळकर सरदारांनी आपले वकील तहाच्या वाटाघाटीसाठी मालकम्‌कडे रवाना केले. आता तह पुरा झाला म्हणजे आपले काही चालणार नाही असे पाहून रामदीन, रोषनबेग, गफूरखान व सदुद्दीन या लष्करी अंमलदारांनी तारीख १७ डिसेंबर १८१७ रोजी गणपतराव व तुळसाबाई यांस कैद करून मालकम्‌बरोबर चाललेली वाटाघाट बंद पाडली. दरम्यान होळकरांचा मुख्य सहाय्यक अमीरखान याने इंग्रजांशी समझोता करून इंग्रजांकडून आपल्या सैन्याच्या पगाराच्या थकबाकीएवढे पैसे घेतले. त्यास कोटयाचा नबाब करून इंग्रजांनी होळकरां-पासून फोडले. तेव्हा होळकरांनी इंग्रजांचा आश्रय घेतल्यास आपल्या नोकऱ्या जाऊन नुकसान होईल असे लष्करी अंमलदारास वाटून त्यांनी इंग्रजांशी संग्राम करण्याचे ठरविले. त्यासाठी कैद केलेल्या मल्हाररावास तुळसाबाईपासून दूर केले व दिनांक २० डिसेंबर १८१७ रोजी उत्तर रात्री तुळसाबाईचा खून करून तिचे प्रेत क्षिप्रा नदीत फेकून दिले. यावेळी तिचे वय ३० वर्षांचे होते. इतक्यात २१ डिसेंबर १८१७ रोजी सकाळी क्षिप्रेच्या पूर्व तीरावरून मालकम् व हिस्लॉप यांनी नदी पार होऊन होळकराच्या छावणीवर हल्ला केला. इंग्रजांचे भारी नुकसान झाले, तथापि इंग्रजांचा जय झाला. बारा वर्षांचा मल्हारराव पळत असलेल्या होळकर सैनिकांस परत फिरण्याविषयी स्वतः हत्तीवर बसून लष्करात हिंडून सांगत होता. त्याचा चुलत भाऊ हरिराव होळकर हाही युद्धात ठासून उभा राहिला. पण काही लोक फितूर झाले तर काही लोक सामानसुमान टाकून पळून गेले. छावणीतील सामान व ६३ तोफा इंग्रजांचे हाती पडल्या. लढाई संपल्यानंतर अमीरखान आणि गफूरखान यांच्या मध्यस्तीने व तात्या जोगांच्या सहकार्याने दिनांक ६ जानेवारी १८१८ रोजी तह घडवून आणला. त्यास मंदसोरचा तह असे म्हणतात. या तहाने होळकरांचे राज्य संपुष्टात आले आणि राजपुतांवरील खंडणीचा त्यांचा हक्क बुडाला. एकंदर प्रकार मालकम्‌ने केवळ लष्करी धाक दाखवून मोठ्या युक्तीने सिद्धीस नेला. मालकम्‌च्या सल्ल्याने तात्या जोग यास कारभारी नेमण्यात आले. यशवंतरावाची मुलगी भीमाबाई हीस बुंदेलखंडात पूंच परगणा इंग्रजांनी जहागीर दिला. फक्त रामदीन हा बाणेदार लष्करी अधिकारी कोणाचेही न ऐकता आपला जमाव घेऊन दक्षिणेत बाजीरावाच्या मदतीस धावून गेला[1].

### पेशव्यांचे लढाईसाठी आवाहन :

बाजीरावाने दिनांक १३ जून १८१७ चा तह मोठ्या वैतागाने इंग्रजांच्या दडपणाखाली नाइलाजाने केला व तो पंढरपुरास गेला. तो जवळ जवळ तीन महिने बाहेर होता. आषाढी एकादशी करून पंढरपुराहून परस्पर तो माहुलीस गेला व अधिक श्रावण मासाची देवतार्चने करू लागला. इकडे

१ किंता, पृ. ४८५.

याच वेळी कलकत्याच्या गव्हर्नर जनरलने जॉर्ज मालकम् यास बाजीरावाच्या भेटीस मुद्दाम पाठविले. मालकम्च्या या भेटीत बाजीरावाने आपल्या नेहमीच्या गोड बोलण्यांनी आपण पूर्वीप्रमाणेच इंग्रजांशी प्रेमाने व सद्भावनेने वागत आहोत अशी मालकम्ची समजूत करून दिली. या बोलण्याचा परिणाम असा झाला की मालकम्ने पेशव्यांचे सिंहगड, पुरंदर व रायगड हे किल्ले जे थोड्या दिवसापूर्वी एल्फिन्स्टनच्या मागणीवरून इंग्रजांच्या हवाली केले होते ते त्यांस परत देवविले आणि पेंढाऱ्यांच्या बंडाळीच्या बंदोबस्तासाठी फौज जमा करण्याची परवानगी मालकम्ने बाजीरावास दिली[1].

### छत्रपतींशी पेशव्यांची भेट :

सातारचे छत्रपती प्रतापसिंह महाराज, त्यांचे दोघे भाऊ व मातुश्री माईसाहेब अशी सर्व मंडळी त्यावेळी सातारचे किल्यावर पेशवे यांचे निर्बंधाखाली राहत होती. महाराजांना बाजीराव पेशवे यांच्या सासुरवासात राहणे साहजिकच कष्टाचे वाटत होते. इंग्रजांचे वर्चस्व वाढत असल्याचे पाहून छत्रपतींनीही इंग्रजांच्या मदतीनेच या परिस्थितीतून मुक्त होण्याचा प्रयत्न सुरु केला. या प्रकरणात छत्रपतींना श्री रामदास स्वामींचे घराण्यातील श्रीस्वामी चाफळकर यांचीही सहानुभूती होती. सातारा किल्याहून पुणे रेसिडेन्सीत आपल्याविरुद्ध होत असलेल्या हालचालींचा सुगावा बाजीरावास लागला. त्यामुळे बाजीरावाचे मनात इंग्रजांविरुद्ध प्रारंभी तिटकारा व नंतर द्वेष निर्माण झाला. त्याला आपली स्थिती फार वाईट असल्याचे दिसू लागले. पेशवे पदावर आपण फक्त नामधारी असून राज्याधिकार अप्रत्यक्षपणे इंग्रज रेसिडेंटच्या हातात गेल्याची जाणीव त्याचे मनास सारखी बोचू लागली. ह्या गुंत्यातून पार पडण्यासाठी त्याने माहुलीस मुक्काम करून छत्रपतींची गाठ घेऊन इंग्रजांशी संधान जुळवण्याचा त्यांचा जो गुप्त प्रयत्न चालविला होता, त्यापासून त्यांना परावृत्त करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे बाजीरावाने महाराज, मातुश्री व त्यांचे दोघे भाऊ यांना किल्यावरून बोलावून घेऊन मोठ्या मर्यादेने त्यांची गाठ घेतली आणि त्यांचे मन आपल्याकडे ओढून घेण्याचा प्रयत्न केला आणि त्यांत त्याला थोडे बहुत यशही आले[2].

### इंग्रजांशी लढाई देण्यासाठी गुप्तपणे तयारी :

माहुलीस छत्रपती प्रतापसिंहाची व मालकम्ची भेट घेऊन सप्टेंबर अखेरीस बाजीराव पुण्यास परतला. मालकम्ने पेंढाऱ्यांशी लढाई देण्यासाठी पेशव्यास सैन्यभरती करण्यास अनुमती दिली होती. त्याचा फायदा घेऊन पुण्यास आल्यावर बाजीरावाने "नवे फौजेची कलमजारी केली. अवघे सरदार—रास्ते, अप्पा देसाई, पटवर्धन, पानसे, विंचूरकर वगैरे बोलावून त्यांना ममतेत घेऊन पुण्यास आणिले. दहा हजार अरब व तीन हजार नंगे गोसावी यांना चाकरीस

---

१ कित्ता.

२ डॉ. वैद्य, बाजीराव २रा पृ. २९१.

ठेवले. तोफखाना, नवीन बाण, दारुगोळा यांचा सरंजाम चालविला. फौजेचा भरणा सुमारे ५० हजार झाला "[१].

अशा रितीने सैन्याची जमवाजमव करीत असता शिंदे, होळकर, भोसले यांजकडे आपल्या मदतीस येण्यासाठी निकडीचे खलिते पाठविले. बाजीरावाने इंग्रजांशी लढाई देण्याच्या उद्देशाने सर्व जय्यत तयारी गुप्तपणे चालविली होती. रेसिडेंटच्या लोकांस फितूर करण्यासाठी त्याने खूप पैसा चारला होता. तरी त्याच्या हालचालींच्या सर्व बातम्या यशवंतराव घोरपडे व बाळाजीपंत नातू हे इंग्रज रेसिडेंटास रोज पुरवित असत. त्यामुळे एल्फिन्स्टन सावध होऊन त्याने मुंबईची युरोपियन पलटण, मद्रास नेटीव्ह इन्फन्ट्री व जनरल स्मिथच्या हाताखालील लष्कर पुण्यास बोलाविले. अशा रितीने दोन्ही बाजूने तयारी चालू असता बाजीरावाची व एल्फिन्स्टनची भेट तारीख १६ ऑक्टोबर १८१७ या दिवशी झाली. भेटीत बाजीरावाने एल्फिन्स्टन समोर अंतःकरण पिळवटून टाकणारे खालील उद्‌गार काढले "मी मूळ मंत्रावेगळा, तुमचे करन्यानी झालो. जो मी होतो तो आज नाही, तुम्ही कशास पुसता? तुमचे स्नेहाची जोड मात्र केली की जी कला अंगी होती ती दवडून बसलो"[२].

बाजीराव आता खडबडून जागा झाला. त्याने बापू गोखल्यास एक कोटी रुपये देऊन त्यास सर्व सत्ताधारी सेनापती नेमले. तुमच्याशिवाय मी दुसऱ्या कोणाचीही मसलत ऐकणार नाही असे स्वदस्तूरचा लेख लिहून त्यास दिला.

बाजीरावाने सल्लामसलतीसाठी विठ्ठलराव विंचूरकर, गोविंदराव काळे, बापू गोखले आदि सर्व सरदारांना आपल्या भेटीस बोलावले. विंचूरकर व गोविंदराव काळे यांनी व मोर दीक्षित यांनी असा सल्ला दिला की इंग्रजांशी बिघाड तूर्त करू नये. सरंजाम फौज थोडी, लढाई निभावणार नाही, हुजुरांत बळ वाढवावे. सर्व सरदार जवळ करावे, सलतनत कारखाने पुन्हा वाढवावेत, शेवटी खासा स्वारी व्हावी. तोपर्यंत इंग्रजांशी लढाई करू नये, ते श्रीमंतांची दौलत आपल्या हाती घेण्यास टपले आहेत.

**बापू गोखले यांचा सल्ला :**

"ही वेळ टळल्यावर केंव्हा कोणाचे चित्त फिरेल याचा भरवंसा नाही. तूर्त बिघाड केल्यावर सर्वही सरकार लक्ष धरतील, इंग्रजांचा पक्ष चालणार नाही" हे बापू गोखल्याचे म्हणणे पेशव्यास पटले. नबाबावर स्वारी करण्याचे निमित्त करून सर्व फौज गारपिरावर डेरेदाखल केल्या. बापू गोखलेस फौजेचे अधिपत्य दिले होतेच, त्यांस त्यांनी लढाईची आज्ञा दिली. व स्वतः पर्वतेश्वराच्या देवालयात जाऊन श्रींचे दर्शन घेऊन उत्तरेकडील बंगल्यावर बसले. बापू गोखलेने तोफखाना व पायदळ फौज घेऊन इंग्रजांवर चाल केली[३].

---

१ सरदेसाई, रियासत उत्तर-३ पृ. ४८२.

२ कित्ता, पृ. ४८३.

३ ग्रॅन्ट डफ, भा. २ पृ. ४७७.

**पुण्याची लढाई :**

तारीख ५ नोव्हेंबर १८१७ ला प्रत्यक्ष लढाईला तोंड लागले. सर्व मराठी फौज गणेशखिंडीवर जिथे इंग्रज उतरला होता तेथे गेली आणि त्यांनी त्यास वेढा दिला. मराठ्यांचे पायदळ, घोडेस्वार, तोफा वगैरे लष्कर गणेशखिंडीच्या डोंगरापासून तो संगमावरील रेसिडेन्सिपर्यन्तच्या अफाट मैदानात समुद्रासारखे पसरले. त्यावेळी एल्फिन्स्टन रेसिडेन्सीतून पळ काढण्यासाठी मेण्यात बसून चालला. एकटा असून त्यास कोणी अडविले नाही. इतकेच काय पण मराठ्यांचा सेनासागर भोवताली हेलकावत असतांना एल्फिन्स्टन बरोबर असलेल्या अवघ्या ५०० शे लोकांच्या जोरावर तो शिरसलामत इच्छित स्थळी जाऊ शकला. ह्याचे कारण इग्रजांनी पेशव्यांच्या सैन्यात फितूरी केली होती. त्या दुपारी ३-४ च्या सुमारास एल्फिन्स्टन कर्नल बरच्या छावणीत सुखरुप पोचला. लगेच उभयतांनी मराठ्यांशी सामना देण्याचे ठरविले व मराठ्यांवर चालून जाण्याचे ठरविले. कर्नल बरचे सैन्य खडकीस तयार होतेच. त्याच्या जोडीला आणखी इतर सैन्याची जय्यत तयारी करून कंपनी सरकारच्या लष्करी हालचालीस सुरुवात झाली. कर्नल बरच्या सैन्यास कॅ. फोर्ड याचे सैन्य मिळण्याचा रंग दिसताच पेशव्यांच्या घोडेस्वारांनी कर्नल बरच्या सैन्यास मध्येच कोंडण्याचा बेत केला. तोफखान्यानंही सरबत्ती सुरू केली[1]. पेशव्यांचा कारभारी मोर दीक्षित याने स्वतः मराठी फौजेच्या आघाडीवर राहून इंग्रजांच्या सैन्यावर चाल केली तेव्हा तो इंग्रजांच्या गोळ्यास बळी पडला; तसेच पेशव्याकडील पोर्तुगिज सेनापती डी. पिंटो ही दोन मोठाली माणसे कामास आली पण पेशव्यांच्या सैन्यानें हल्ला केल्यामुळे इंग्रजी सैन्याची एकजूट तुटून पडली व त्यांत अंतर पडले. बापू गोखल्याने त्यावर हल्ला करून दुभंगलेल्या इंग्रजी सैन्याची फळी फोडण्याचा प्रयत्न केला. लढाई हातघाईवर आली. इतक्यात बापू गोखल्याच्या घोड्यास जिव्हारी गोळी लागून तो निकामी झाला. यानंतर बाजीरावाकडून लढाई बंद ठेवण्याचा निरोप आल्यामुळे बापू गोखले शह सोडून माघारी आला. खडकीची लढाई अंधार पडल्यामुळे संपुष्टात आली. पेशव्यांचे सैन्य पुण्याकडे वळले. इंग्रजी सैन्यानें मराठी सैन्याचा पाठलाग न करता ते दापोडी व खडकी येथील आपल्या छावणीत गेले. तेव्हा या लढाईत कोणाचा जय झाला व कोणाचा पराजय झाला हे सांगता येत नाही[2].

**पेशव्यांचे वाड्यावर इंग्रजांचे निशाण :**

बाजीरावास इंग्रज संपूर्ण मोडावयाचा नव्हता. लढाईच्या धुमश्चक्रीत एल्फिन्स्टननें बाजीरावास तह करण्याचे आमिष दाखविले म्हणून बाजीरावाने बापू गोखल्यास लढाई बंद करण्याचा हुकुम दिला. एल्फिन्स्टनचा कालहरणाचा कावेबाजपणा बाजीरावाच्या लक्षात येऊन त्याने बापू गोखल्यास लढाई

---

१ प्रतुल गुप्ता, बाजीराव २रा, पृ. १८२-८३.

२ कित्ता, पृ. १८४.

बंद करण्याचा हुकुम दिला नसता तर मराठ्यांचा खडकीच्या लढाईत जय झाला असता. पण तसे होणे नव्हते.

तारीख ५ नोव्हेंबरपासून १७ नोव्हेंबरपर्यन्त इंग्रजांकडून कोणत्याही प्रकारची हालचाल झाली नाही. तसेच पेशव्यांच्या सैन्याने काही एक न केल्याने इंग्रजांना जो अवकाश सांपडला त्यावेळात त्यांनी आपल्या पलटणांची तयारी केली. घोडनदीहून जनरल स्मिथ हा सरदार आपली पलटणे घेऊन पुण्यावर चालून आला. बाजीरावही लढाईस सैन्यासह बाहेर पडला. तेव्हा कार्तिक शुद्ध तिसरे प्रहरी लढाईस प्रारंभ झाला. तेव्हा इंग्रज येरवड्याहून जाऊन तयार होऊन उभा राहिला. गोखले आपल्या सैन्यासह त्यावर चालून गेले. दिवे लागणीच्या संधीत लढाई सुरू झाली. इंग्रजांची तोफेची मारगिरी मोठी होऊ लागली. त्यासमयी रात्रीं दहा बारा घटका त्यावेळेस श्रीमंत (याणी) स्वारी तयार करून सगळा आपला आजबाब आटोपून दिव्याच्या घाटाचा रस्ता धरला. घाटात स्वारी गेली तेव्हा हजारो मशाली लाविल्या. असे पळाले. हे बापू गोखले यांनी पाहून तेही त्याच रस्त्याने चालले. सारी फौज उधळली. श्रीमंत पळतात हे पाहून इंग्रजांची पलटणे त्यांच्या पाठीमागे लागली.

बाजीराव पुणे सोडून पळाल्यावर इंग्रजांतर्फे बाळाजीपंत नातू २५ स्वारांसह रॉबिन्सन् बरोबर जाऊन शनिवारवाड्याचे दिल्ली दरवाज्यावर झेंडे लावून आले. तेव्हा पुढे शहराचा बंदोबस्त नातूसच सांगण्यात आला[२].

### पेशव्यांचे पलायन व कोरेगावची लढाई (दिनांक १६ नोव्हेंबर ते १ जानेवारी १८१८) :

पुणे इग्रजांनी हस्तगत केल्यावर युद्धाचा निकाल लागला. बाजीरावाचे राज्य संपले. पेशव्यांचा पाठलाग करून त्यास भुईसपाट करणे एवढेच आता बाकी राहिले होते. पळतांनाही बाजीरावाने आपल्या चंचल वृत्तीचे व भित्रेपणाचे प्रदर्शन नोव्हेंबर १८१७ ते मे १८१८ या कालावधीत केले. नागपूरकरांनी केलेला उठाव व महिदपूरचा होळकर सैन्याने केलेला उठाव ही पेशव्याने इग्रजांविरूद्ध चालविलेल्या मोहिमेस पाठिंब्यासाठीच होते. दिनांक १६ नोव्हेंबरच्या रात्री पेशवा पुणे सोडून निघाल्यावर तो दुसऱ्या दिवशी जेजुरीस मुक्कामाला आला. जेजुरीहून तो माहुलीस आला. तिथे त्यास बातमी लागली की साताराचे छत्रपती महाराज इंग्रजांशी मिलाफी झाले आहेत. छत्रपती इंग्रजांस मिळाले तर आपला कारभारच आटोपला हे लक्षांत येताच त्याचे धाबे दणाणले. तरी पण धीर न सोडता त्याने माहुलीला जाऊन सातारकर महाराजांची प्रत्यक्ष भेट घेतली व आजपर्यन्त केलेल्या अपराधांची सपशेल माफी मागितली. इंग्रजांशी शेवटचा संग्राम करण्याची आपली इच्छा असून या निर्वाणीच्या युद्ध प्रसंगी महाराजांनी निखालसपणे मदत करावी म्हणून त्याने परोपरीने विनंती केली. प्रतापसिंह महाराजांनी ही भेट कसे

२ कित्ता, पृ. १८६.

तरी मोघम बोलून वेळ मारून नेली. माहुलीसच अप्पासाहेब निपाणीकर एक हजार अरब सैन्यासह पेशव्यास येऊन मिळाला. वारंवार मुक्काम बदलून आपण कोणत्या दिशेने जातो याचा इंग्रजांस मागमूस लागू न देता बाजीरावाने झुकांड्यांची पद्धत स्विकारली. यामुळे इंग्रजांना त्यास शरण आणण्यात फार वेळ लागला. माहुलीहून नारो विष्णु आपटे यास पेशव्याने महाराजांना आपल्या सैन्यात आणण्यासाठी धाडिले. यावेळी नारो विष्णु यास महाराजांस व्यवस्थितपणे व काळजीपूर्वक आणण्यासाठी सक्त ताकीद दिली होती. माहुलीहून पेशवा मिरजेजवळ गेला. येथे तारीख २९ रोजी इंग्रज फौज दक्षिणेतून आपल्यावर चालून येत आहे असे समजले. तेव्हा बापू गोखलेस त्यांचे परिपत्य करण्यास सांगून स्वतः पंढरपूरच्या दिशेने त्याने माघार घेतली आणि सिद्धटेकच्या मुक्कामी तो तारीख १४ डिसेंबरला आला. तिथे छत्रपती प्रतापसिंह महाराज, त्यांची आई व त्यांचे दोघे भाऊ त्यांस सामिल झाले. बापू गोखले इग्रजांचे रोखावर होता. त्याने नीरा नदीवर जाऊन इंग्रजांस गाठले. तिथे मातबर लढाई झाली[1]. पुढे पेशवा पंढरपुराकडे गेल्यावर तिकडे इंग्रज फौजा वळल्या. पण बाजीराव नगरच्या बाजूस पीरगावाकडे गेला असे कळतांच इंग्रजी फौजा तिकडे गेल्या. बाजीराव तेथून संगमनेरला गेला, तिथून नाशिककडे जाण्यास निघाला. वाटेत त्रिंबकजी डेंगळे फौजेसह त्यास सामिल झाला व पुढे फुलगांव आपटीस त्याने मुक्काम केला. तारीख ३० डिसेंबर रोजी तो चाकण येथे येऊन पोचला. कॅप्टन स्टॉटन् थोडे इंग्रज सैन्य बरोबर घेऊन तारीख ३१ डिसेंबरला शिरूरहून निघाला आणि दुसऱ्या दिवशी सकाळी १० वाजता कोरेगांव येथे येऊन उतरला[2]. तेथील टेकड्यांवरून त्याला पेशव्यांची प्रचंड फौज समोर भीमा नदीच्या काठी दिसली. स्टॉटन्‌ची बातमी बापू गोखल्यास होतीच. गांवच्या तटबंदीत इंग्रज आश्रयार्थ गेले. त्याजवर मराठ्यांनी हल्ला चढविला. इंग्रजांनी लढण्याची शिकस्त केली. रात्री ९ वाजेपर्यन्त लढाई चालून पेशव्याचे सैन्य आपल्या छावणीकडे परत आले. इंग्रजांचे बरेच लोक मारले गेले पण, थोड्याच लोकांनीशी लढून आपला निभाव केल्याबद्दल कोरेगांव येथे इंग्रजांनी आपल्या स्मारकाचा स्तंभ उभारला आहे[3].

### गोपाळ अष्टीची लढाई (तारीख २० फेब्रुवारी १८१८) :

कोरेगांवच्या लढाईनंतर एल्फिन्स्टन स्वतः बाजीराव साताऱ्याकडे आहे असे समजून तिकडे गेला. तो पेशवा साताऱ्याचा बेत सोडून फलटणकडे वळला. एल्फिन्स्टन सातारा ताब्यात आणण्याकरिता गेला आणि जनरल स्मिथ बाजीरावाच्या पाठलागावर गेला. बाजीराव पारिंड्याच्या रोखे अष्टीजवळ मुक्कामास आला. तारीख १९ फेब्रुवारी रोजी तो अष्टीवर मुक्कामास आला असता दुसऱ्या दिवशी सकाळीच जनरल स्मिथची फौज त्याचे पाठलागावर

१ कित्ता, पृ. १९५.

२ कित्ता, पृ. १९६.

३ सरदेसाई, रियासत उ. वि. भा. ३ पृ. ४९५-९६.

दोन कोसाचे अंतर असलेल्या वेळापूर येथे आली. लवकर जेवण करून तो पळून गेला. जनरल स्मिथला बापू गोखले निधड्या छातीने सामोरा गेला. इंग्रजही चालून आले. गोखल्यांच्या सहाय्यास मुधोळकर, घोरपडे व बहिर्जी शितोळे इंग्रजांवर चालून गेले. त्याजबरोबर गोखलेही शिरून मारीत चालले. तेंव्हा इंग्रजांची पहिली तुकडी माघारी हटली. हे पाहून दुसऱ्या तुकडीने गोखल्यावर चाल केली. गोखले यास गोळी लागली. घोडा मोकळा झाला. गोखले गर्दीस मिसळून घोड्यांच्या टांचाखाली तुडविले गेले. हे वर्तमान ऐकून पेशव्यांस दुःख झाले. पेशवा पळून गेला. छत्रपती, मातुश्री आणि छत्रपतींचे दोघे बंधू सहवर्तमान जाग्यावर राहिले, ते इंग्रजांचे स्वाधीन झाले. आष्टीची लढाई तारीख २० फेब्रुवारीला झाली. पेशव्यांचे सर्व सामान लुटले गेले. इंग्रजांचेही पुष्कळ नुकसान झाले. गोखल्याच्या शवास त्यांनी इतमामाने अग्नी दिला[१].

जनरल स्मिथ बरोबर राजा होता. त्यास आपल्याकडे घ्यावे म्हणजे बाजीरावाचा पाठलाग करणे त्यास सोपे जाईल असे जनरल स्मिथने एल्फिन्स्टनला कळविले. एल्फिन्स्टन यावरून जनरल स्मिथला बेलसर येथे तारीख ४ मार्च १८१८ रोजी भेटला आणि त्याने प्रतापसिंहास आपल्या ताब्यात घेतले. त्याअगोदर राजाच्या नांवे दिनांक ११ फेब्रुवारी १८१८ चा एक जाहिरनामा काढून महाराष्ट्रांत सर्वत्र पसरविला. एल्फिन्स्टनने मोठ्या मुत्सद्देगिरीने हा जाहीरनामा महाराष्ट्रांत सर्वत्र पसरविला. जाहिरनाम्यांत बाजीराव बंड आहे त्यास आम्ही काढून टाकला आहे. त्याचे हुकुम कोणत्याहीं मामलेदाराने मानू नयेत. त्या जागी एल्फिन्स्टनला नेमले आहे. दोन महिन्यांचे आत बाजीरावास सोडून स्वस्थ बसतील त्यांस त्यांची वतनें पूर्ववत चालविली जातील. ह्या जाहिरनाम्यामुळे बाजीराव एकदम उघडा पडला.

जाहीरनाम्यांत नमूद केल्याप्रमाणे इंग्रजांनी राजा प्रतापसिंहास सातारचे सिंहासनावर बसविले आणि जाहीरनाम्यात जाहिर केल्याप्रमाणे एकेक गोष्टी पुऱ्या करण्याचा सपाटा चालविला. वतनदार जोडीदारांनी जाहिरनाम्यातील आश्वासनाचा आधार घेऊन बाजीरावास सोडले व ते आपल्या गांवी परतले. इंग्रजांची एक तुकडी बाजीरावाचा पाठलाग करण्याकरिता गेली. आणि जनरल प्रिट्झलेरच्या हाताखालील तुकडीने पेशव्यांचे सगळे किल्ले ताब्यांत घेतले[२].

बाजीरावाला आता महाराष्ट्रात राहून आपले उद्दिष्ट सफल होणार नाही असे वाटून त्याने दौलतराव शिंदे व नागपूरकर भोसले आपल्याला सहाय्य करतील ह्या आशेने उत्तरेकडे जाण्यास सुरुवात केली. परंतु ह्या दोघांकडून त्याची निराशा झाली. दौलतरावानेंच पेशव्यास आपल्या मदतीस या अशी हाक दिली. दोन बुडत चाललेल्या माणसांनी एकमेकांना मदतीस

१ किन्ता, पृ. ४९६-९७.

२ प्रतुल गुप्ता, तथैव, पृ. १९४.

बोलावण्यासारखे होते हे. बाजीराव गोदावरीच्या पैलतीरी जाऊन वऱ्हाडांत चांद्याकडे जाण्यास निघाला. त्याचे हे भटकणे योजनाबद्ध नव्हते. नागपूरकर अप्पासाहेब यांस पकडून दूर नेल्याची दुःखद बातमी त्यास समजली. तितक्यांत नागपूराहून कर्नल स्कॉट बाजीरावावर चालून आला. तेव्हा बाजीरावाने पुन्हा पळ काढला. पांढरकवडा व वणी यांच्या दरम्यान तो कित्येक दिवस घोटाळत राहिला. नंतर इंग्रजांस चुकवित बाजीराव आंवढ्या नागनाथाजवळ शिवणी येथे पोचला. तेथे त्याचे पाठलागावर धावून अॅडॅम्स आला. बाजीरावाची आणि अॅडॅम्सची बरीच झटापट होऊन बाजीराव त्यांतून घोड्यावर बसून निसटला (दिनांक १९ एप्रिल). शिवणी येथे पराभव झाल्यावर बाजीराव उत्तरेच्या दिशेने जाऊन तापी उतरून शिंद्याकडे जाण्याच्या खटपटीस लागला. दौलतराव शिंद्याने आपणांस येऊन मिळावे म्हणून बाजीरावाने अखेरपर्यन्त प्रयत्न चालविला होता. दौलतरावाचेही लक्ष बाजीरावाकडे होते. त्याने आपल्या ताब्यांतील आशीरगडचा किल्लेदार यशवंत लाड यास पत्रांत लिहले की "श्रीमत पेशव्यांकडून मागणी येईल ती पुरवित जावी". बाजीरावाने बोरीवरून उत्तरेस नर्मदेचा मार्ग धरल्याची बातमी डौव्हरन् याला कळली. बाजीराव उत्तरेकडे जातो ही बातमी ठिकठिकाणच्या इंग्रज अधिकाऱ्यांस पोचतांच तेही सर्वबाजूने त्यास घेरण्यास नर्मदेकडे धावून गेले. सर्व बाजूंनी इंग्रजांनी आपणांस घेरले अशी खात्री झाल्यावर बाजीरावाने आपले दोन वकील माल्कम कडे पाठविले (दिनांक १६ मे १८१८). ह्या वाटाघाटी पुढे पंधरा दिवस चालल्या. ठरल्याप्रमाणे दिनांक १ जून १८१८ रोजी सायंकाळी ५ वाजता बाजीराव माल्कमचे भेटीस गेला. बरोबर त्याचे सर्व कुटुंब व स्वार मिळून २,५०० लोक होते. माल्कमने बाजीरावास २४ तासांत इंग्रजांचे हवाली होण्यास सांगितले. तसेच त्यास उत्तरेस ब्रह्मावर्तास नेऊन ठेविले जाईल व सालिना ८ लक्ष रु. पेन्शनही दिले जाईल असे आश्वासन दिले. तेव्हा दिनांक ३ जून १८१८ रोजी पेशवा बाजीराव माल्कमच्या स्वाधीन झाला[२]. त्यास इंग्रजांनी ब्रह्मावर्तास नेऊन ठेविले हे पाहून सर्वांची खात्री झाली की मराठ्यांचे राज्य संपले.

---

२ किंत्ता, पृ. २०३; पुना रे. कॉं. भा. १३ ले. १३३.

## शेवटचा प्रवेश

# कालसूची

| | | |
|---|---|---|
| १७७७ | . | छत्रपती रामराजा यांचा मृत्यू. |
| १७९६, ऑगस्ट | . | चतुरसिंग भोसले व भवानजी शिर्के कोयना पार करतात. |
| १८०३, १० ऑगस्ट | . | चतुरसिंग भोसले यांच्या डेऱ्यांत दौलतराव शिंदे भेट घेतात |
| १८०८, ४ मे | . | राजा शाहू यांचा मृत्यू. |
| १८०९, जानेवारी | . | चतुरसिंग भोसले धार येथील बंडाळी मोडण्यासाठी जातात. |
| १८११, १० फेब्रुवारी | . | त्रिंबकजी डेंकळेकडे चतुरसिंग भोसले सहकाऱ्यांसह भोजनास येतात. |
| १८११, मे | . | चतुरसिंग भोसले यांस कैद व त्यांची रायगडावर रवानगी. |
| १८१७ | . | बाजीराव इंग्रजांशी युद्ध सुरू करतो. |
| १८१७, १५ मार्च | . | कर्नल स्मिथ सैन्यासह पुण्यावर चालून जातो. |
| १८१८, १९ फेब्रुवारी | . | प्रतापसिंग महाराजांस इंग्रज आपल्या छावणींत घेतात. |
| १८१८, एप्रिल | . | सिंहगड, पुरंदर, वासोटा व रायगड इंग्रज काबीज करतात. |
| १८१८, १५ एप्रिल | . | चतुरसिंग भोसलेचा कांगोरी किल्ल्यांवर मृत्यू. |
| १८१८, ७ मे | . | रायगड किल्ला प्रिटझरच्या स्वाधीन. |
| १८१९, १५ सप्टेंबर | . | सातारा गादीचे पुनरुत्थान, प्रतापसिंग महाराजांची गादीवर स्थापना. |
| १८१९, १५ सप्टेंबर | . | इंग्रजांचा प्रतापसिंह महाराजांशी तह, इंग्रज १४ पेटयांचे राज्य देतात. |
| १८१९, १ नोव्हेंबर | . | एल्फिन्स्टन मुंबईचा गव्हर्नर म्हणून सूत्रे घेतो. |
| १८२२ | . | ग्रँट डफची कंपनी सरकारच्या सेवेंतून निवृत्ती. |
| १८२६ | . | ग्रँट डफ मराठ्यांचा इतिहास प्रसिद्ध करतो |
| १८२८ | . | प्रतापसिंह महाराज सातारा येथे मालकम् पेठ वसवितात. |
| १८२९, १० ऑक्टोबर | . | त्रिंबकजी डेंगळेचा चुनार किल्ल्यांत कैदेंत मृत्यू. |
| १८३५, २९ डिसेंबर | . | इंग्लंडच्या सरकारकडून प्रतापसिंह महाराजांस पारितोषिक. |
| १८३९ | . | प्रतापसिंह महाराजांची पदच्युती. |
| १८३९, १८ नोव्हेंबर | . | आप्पासाहेब यांस इंग्रज गादीवर बसवितात. |
| १८४७, १४ ऑक्टोबर | . | प्रतापसिंह महाराजांचे काशी येथे निधन. |
| १८४८ | . | आप्पासाहेब निपुत्रिक निवर्तताल. |
| १८४९, १६ मे | . | इंग्रज सातारा राज्य खालसा करतात. |
| १८८५, २३ सप्टेंबर | . | ग्रँट डफचा मृत्यू |

## ३१

## शेवटचा प्रवेश

**चतुरसिंग भोसले आणि प्रतापसिंह यांचे संबंध :**

थोरले शाहू महाराज इ. स. १७४९ मध्ये निवर्तल्यावर राजसत्तेचे अधिकार कमी होऊन त्या अधिकारांचा वापर पेशवे करू लागले. देशाच्या राजकारणांत छत्रपतींचे महत्त्व पेशव्यांनी कमी कमी करीत आणून अखेरच्या राजांना बंदीवासाची वागणूक मिळू लागली. सातारच्या किल्यात मराठ्यांचे छत्रपती पेशव्यांच्या खड्या पहाऱ्यात राहू लागले. सातारा छत्रपतींकडे नवीन पेशव्यास फक्त पेशव्यांची वस्त्रे देण्याचेच काम शिल्लक राहिले. छत्रपती रामराजा इ. स. १७७७ मध्ये निवर्तण्याच्या अगोदर त्यांनी वावीचे त्रिबकजी भोसले यांचा ज्येष्ठ पुत्र विठोजी यांस दत्तक घेतले. छत्रपतींच्या निधनानंतर दुसरे शाहू महाराज हे नामाभिधान धारण करून ते गादीवर बसले. वडील त्रिबकजी चतुरसिंग नांवाच्या लहान मुलास बरोबर घेऊन सातारच्या किल्यास रहाण्यास आले. दत्तविधान प्रसंगी शाहू महाराजांचे (दुसरे) वय १५ वर्षांचे होते. ते शरीराने मजबूत, सुदृढ व सशक्त होते. सवाई माधवरावांच्या मृत्युनंतर पुण्यास वारंवार नवीन बनाव सुरू होऊन मुलुखात बेबंदशाही माजत चालली तेव्हा शाहू महाराजांच्या मनात मराठी राज्याच्या भवितव्यतेचे विचार येऊ लागले. पण त्यांचा लौकरच भ्रमनिरास झाला. पूर्वीच्या पेशव्यांपेक्षा नाना फडणिसाने छत्रपतींचा विशेष कोंडमारा केला.[1] त्यांचे खर्चाचे ऐवज परभारें येण्याचे कशास पाहिजे. जो ऐवज देणे पुण्याहून नक्त पाठवावा, कारखाने व कारखानदार यांचा खर्च पाच सहा लक्ष रुपयाचा ऐवज पोचत होता. त्यांस लाख रुपयांत खर्च आटोपतो म्हणून पागा हत्ती सर्व पुण्यास आणले. देशमुखी व खासगी यांचे ऐवज पुण्यातच घेऊ लागले. महाराजांची अमर्यादा करून, चौकी पहारा ठेऊन, राजमंडळाचे लोक कोणी जाऊ नये असे केले. चाकरीच्या बायका दोन चार व लेकावळे दोन चार खेरीज करून सर्वांच्या अडेश्री बंद केल्या. राजपत्र व कागदपत्र होणे यांचे काही एक कारण नाही याप्रमाणे बंदोबस्त केला. अशा रितीने सातारच्या गादीवर छत्रपतींच्या नशीबी कारागृहवास, तेजोभंग व अपमान हे प्रसंग येऊ लागले. तेंव्हा छत्रपतींकडील मंडळी पेशव्यांचे उणे पाहू लागली. पेशव्यांनी कोल्हापूर राजांविरुद्ध चढाई केली. तेव्हा सातारकर छत्रपतींनी

---

१ सरदेसाई, न्यू. हि. ऑ,. म. भा. ३, पृ. ३४३.

कोल्हापूरकरांचीच बाजू उचलून धरली[१]. चतुरसिंगास या अपमानस्पद जीवनाची मोठी चीड येऊन तो पेशव्यांविरूद्ध उठाव करण्यास उद्युक्त झाला. मराठ्यांचे गेलेले वैभव परत मिळावे म्हणून तो उद्योगास लागला. तो हुशार, धाडसी व कल्पक होता. मराठ्यांचे शिंदे, होळकर व नागपूरकर भोसले यांना एकत्र आणून राज्याची घडी बसवावी ह्या भावनेने तो कार्यप्रवण झाला. छत्रपती दुसरे शाहू यांना राणी आनंदीबाई माईसाहेब यांजपासून तीन पुत्र झाले. पहिला प्रतापसिंग बाबा (१८ जानेवारी १७८३), दुसरा रामचंद्र भाऊसाहेब (जन्म १७९५) व तिसरा शहाजी अप्पासाहेब (जन्म १८०५).

एल्फिन्स्टने, माईसाहेब ह्या बुद्धिमान हुशार व आदबगीर वागणुकीच्या होत्या असे त्यांच्या बाबतीत म्हटले आहे. त्या घोड्यावर बसण्यास पटाईत, दिसण्यास रुबाबदार होत्या. राजा शाहू दिनांक ४ मे १८०८ रोजी निवर्तले. त्यांचा मुलगा प्रतापसिह हा गादीवर बसला. पेशवा बाजीरावाने सातारकरांनी केलेल्या उठावाचा साताऱ्यावर फौजा पाठवून बंदोबस्त केला. सातारकरांचा नक्षा बाजीरावाने उतरविला आणि पुन्हा छत्रपती कैदेतील जीवन जगू लागले. रास्ते व पटवर्धन यांच्याशी लढतांना त्याना चकवून चतुरसिंग भोसले व भवानजी शिर्के बाहेर पडले. ते ऑगस्ट १७९६ मध्ये कोयना पार होऊन करवीरच्या फौजेस मिळाले. त्यांनी पुढे सर्जेराव घाटग्यांशी मैत्री केली. त्याने बाजीरावास ह्या हरहुन्नरी तरण्याबांड मुलाचा उपयोग करून घेण्यास सांगितले. बाजीरावाने चतुरसिंगाच्या हालचाली पाहून त्यास बंडखोरात जमा केले. बाजीराव इंग्रजी संरक्षणाखाली गेल्यावर चतुरसिंग भोसले याने आपल्या १,००० साथीदारांसह पुणे सोडले आणि तो दौलतरावशिंदे यांजकडे गेला. दौलतराव चतुरसिंगाचे डेऱ्यास जाऊन त्यास मोठ्या सन्मानाने भेटला (दिनांक १० ऑगस्ट १८०३). आदले दिवशी इंग्रजांनी शिंद्यावर युद्ध पुकारले होते. आसई, आडगाव वगैरे लढायांत प्रत्यक्ष भाग घेऊन इंग्रजांचा पाडाव करण्याची चतुरसिंगाने शिकस्त केली. पण कालचक्र फिरले होते. सर्वच दिङ्‌मूढ होऊन पराभव पावले. युद्धाचा भडका शांत झाल्यावर चतुरसिंग नागपुरास रघोजी भोसलेकडे गेला. रघोजीने त्यास त्याच्या साथीदारांसह आपल्या सेवेत ठेऊन घेऊन दर महा रु. १५,००० नेमणूक करून दिली. दौलतराव शिंदेने बोलावल्यावरून तो त्याच्याकडे दहा महिन्यानंतर गेला. त्यावेळी चंबळ नदीचे काठी दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर यांचा मुक्काम होता. शिंदे होळकरांशी पुढील उद्योगाची बोलणी केली. त्यांत काही निष्पन्न झाले नाही. चतुरसिंगच्या बोलण्याने शिंदे मात्र फजीत झाले. पुढे चतुरसिंग अजमेरास गेला. तिथून जनरल लेक दिल्लीस होता त्याकडे आपला वकील पाठविला. जनरल लेकची व चतुरसिंगाची भेट दिल्लीस झाली. इंग्रजांनी ह्या वेळेस चतुरसिंगास भली मोठी नेमणूक करून देऊन आपल्याच सेवेत सहज घेतले असते. पण अशा लोभास बळी न पडता ह्या मानी वीराने मराठी सत्तेचा ग्रास घेण्यास टपलेल्या इंग्रजांचा पाडाव करण्याची कामगिरी जो यशवंतराव

१ नक्षैव.

होळकर करीत आहे त्यास मदत करण्याचे ठरविले. जोधपूरचा राजा मानसिंग व उदयपूरचा राजा ह्यांनी त्यास सन्मानपूर्वक वागविले. पण ह्या राजपुतांच्या भेटीत त्यास हिंदुस्थान ग्रासणाऱ्या इंग्रजांस घालवून देण्या-संबधीचा विचारही शिवला नाही. बडोदे राजाचे पारतंत्र घालविण्यासाठी झटणारा दुसरा वीर कान्होजी गायकवाड यांची भेट चतुरसिंगाने माळव्यात घेतली व दोघे गुजरातेत आले. त्यांच्या वाटाघाटीतून त्यावेळच्या पेचावर त्यांना उपाय सापडला नाही. तद्नंतर तिथे त्यास वातमी लागली की, सातारा येथे बंधू शाहू छत्रपती यास कैलासवास झाला व आपली स्त्री व पुत्र बाळासाहेब यास बाजीराव पेशव्याने कैदेत ठेविले आहे. ह्या बातमीने त्यांचा धीर खचला. त्यानंतर चतुरसिंग यशवंतरावाच्या भेटीसाठी जानेवारी १८०९ मध्ये गेला असता त्यास वेड लागलेले पाहून त्यांची अत्यंत निराशा झाली. जुलै १८०९ मध्ये तो धार येथे गेला. तेथील बंडाळी मोडण्यात त्याने दोन वर्षे घालविली. त्यावेळी सातारचे बंदोबस्तास बाजीरावाने त्रिंबकजी डेंगळे यास नेमून त्यास चतुरसिंगाचा बंदोबस्त करण्यास सांगितले. त्रिंबकजीने चतुरसिंगाकडे माणसे पाठवून तुम्ही साताऱ्यास या, बाजीराव तुम्हास नेमणुक करून देणार आहे असा निरोप पाठविला. ह्या बोलण्यावर विश्वास ठेऊन चतुरसिंग साताऱ्यास येण्यास निघाला. धारेहून बडोद्यास आला. तिथे गंगाधर शास्त्रीस भेटून त्याचे राज्य सरक्षिण्यास कितीसे सहाय्य होईल याचा अंदाज घेतला. "इंग्रजा-शिवाय बडोद्यास पान हालत नाही, एवढ्या बलाढ्य इंग्रजी शक्तीशी लढून आता निभाव लागणे शक्य नाही" असे शास्त्रींनी सांगितल्यावर त्यांची निराशा झाली आणि त्रिंबकजी डेंगळेवर विश्वासून त्याच्या भेटीस गिरणा नदीतीरावरील मालेगाव येथे चतुरसिंग पोहोचला. डेंगळे व चतुरसिंग या दोघांच्या छावण्या नदीच्या दोन्ही तीरावर एकमेकांच्या समोर होत्या. त्रिंबकजीने शपथेवर सांगून पाठविले की आपण दगा करणार नाही, भोजनास यावे. त्याप्रमाणे त्रिंबकजीने तारीख १० फेब्रुवारी १८११ रोजी भोजन समारंभ आयोजित केला. भोजनास चतुरसिंग भोसले, रघुनाथराव गुजर, बापू फडणीस आदि ११ सहकाऱ्यांबरोबर आला. भोजनोत्तर सहा घटिका रात्रीस खलबताची बैठक केली. तेथे त्यांना एकाएकी घेरा घालून दगा केला आणि त्रिंबकजीने मालेगावच्या किल्यावर नेऊन कैदेत ठेवले. मे १८११ मध्ये बाजीरावाच्या सांगीवरून चतुरसिंगास बेड्या घालून रायगडावर रवाना केले. इतर मंडळींस निरनिराळ्या किल्यांवर बंदोबस्तात ठेविले. चतुरसिंग रायगड जवळच्या कांगोरी किल्यावर मोठ्या हालअपेष्टांत दिनांक १५ एप्रिल १८१८ रोजी मरण पावला[१]. अशा रितीने एका कर्तबगार पुरुषाची कर्तबगारी राष्ट्राच्या उपयोगांस न येता वाया गेली याचा खेद वाटतो.

**प्रतापसिंगाची सातारच्या गादीवर स्थापना :**

प्रतापसिंग महाराजांचे वडील दुसरे शहाजी निवर्तल्यावर प्रतापसिंग महाराजांस छत्रपती म्हणून राज्याभिषेक करण्यांत आला आणि महाराज

१ सरदेसाई, न्यू. हि. भा. ३ पृ. ५०५.

मातोश्री आईच्या मार्गदर्शनाखाली राज्यकारभार करू लागले. पेशव्यांचे आणि प्रतापसिंग महाराजांचे जमले नाही. गंगाधरशास्त्रीचा खून झाल्यावर पेशव्यांची घटका भरली असे जबाबदार मराठे व्यक्तींना वाटून त्यांनी इंग्रजांच्या मदतीने आपली सोय लावून घेण्याची सुरवात केली. प्रतापसिंग व माईसाहेब यांनी गुप्तपणे बोलणी लावून आपण इंग्रजांना अनुकूल असल्याचे कळविले. बाजीरावाने इंग्रजांशी इ. स. १८१७ मध्ये युद्ध सुरु केले. तेव्हा छत्रपतींस सातारा किल्ल्यावरुन त्याने वासोटयास हलविले. ह्या अगोदरच्या प्रकरणांत बाजीरावाने पुण्याहून पळ काढल्यावर सातारा राजाच्या सर्व कुटुंबियांस आपल्या बरोबर घेतले व पुन्हा पळापळीस सुरवात केली. अष्टयाच्या लढाईत बाजीरावाबरोबर प्रतापसिंह महाराज होते. त्यांना इंग्रजांनी तारीख १९ फेब्रुवारी १८१८ रोजीच्या लढाईनंतर आपल्या छावणीत घेतले. जनरल मन्रोच्या सल्ल्यावरुन एलिफन्स्टनने "बाजीराव बंड आहे, त्यास आम्ही दूर केले आहे, बाजीरावास कोणी मामलेदाराने मदत करू नये"[१] असा जाहिरनामा छत्रपतींच्या नांवे काढिला आणि सर्वसामान्य मराठयांची भक्ती छत्रपतींकडे आहे हे जाणून[२] इंग्रजांनी प्रतापसिंहाची स्थापना सातान्यास केली. सातारा गादीचे पुनरुथ्थान केले. दिनांक १५ सप्टेंबर १८१९ रोजी कंपनी सरकारने राजा प्रतापसिंगाशी तह करून त्यास १४ पेटयांचे राज्य दिले.[३] त्यांत नीरा व वारणा ह्या नद्यांमधील भीमा-कृष्णासंगमापावेतो मुलुख आला. राजा प्रतापसिंग यांनी राज्याचा मुलकी कारभार त्यांचे ब्रिटीश सल्लागार कॅप्टन ग्रँट डफ यांच्या सल्ल्याने करावयाचे असे ठरविले. अशा रितीनें छत्रपतींचे राजे केले. प्रतापसिंह राजाने परकीय सत्तेशी पत्रव्यवहार न करणे, नेमून दिलेल्या शिबंदीपेक्षा शिबंदी न वाढवणे आणि इंग्रजी सरकारशी एकनिष्ठ रहाणे अशा अटी त्यास घालून दिल्या. कॅप्टन ग्रँट डफ हा प्रतापसिंह महाराजांपेक्षा साडेतीन वर्षांनी मोठा होता. तीन वर्षे सातान्यास एजंट म्हणून राहिल्यावर वयाच्या ३४ व्या वर्षी सन १८२२ मध्ये तो कंपनी सरकारच्या सेवेतून निवृत्त झाला. त्या अगोदर त्याने प्रतापसिंग महाराजांना राज्य कारभाराची माहिती देऊन त्यांच्याकडे सर्व कारभार सोपविला. या ३ वर्षांच्या काळात त्याने आपला बहुतेक वेळ मराठयांच्या इतिहासाची साधने गोळा करण्यासाठी वेचला. गोळा केलेली साधने घेऊन तो इंग्लडला गेला आणि तेथे मराठयांचा इतिहास लिहून तो इ. स. १८२६ मध्ये त्याने प्रसिद्ध केला. तो वयाच्या ६९ व्या वर्षी दिनांक २३ सप्टेंबर १८५८ रोजी मरण पावला.

### जिकलेल्या मुलखाची व्यवस्था :

पेशव्यांची शरणागती आणि प्रतापसिंह महाराजांस चिमुकले राज्य देऊन त्यांची मांडलीक राजे म्हणून स्थापना या दोन गोष्टी इंग्रजांनी १८१८ च्या

१ Memorial to H. M. Queen from H. H. Sagunabai Saheb pp, 342-43, Extract 248.

२ P. R. C. Vol. 13, L 124

३ Aitchison, Vol. VIII pp. 391-93.

युद्धाने झालेल्या मराठ्यांच्या ताब्यात असलेले मजबूत किल्ले सिंहगड, पुरंदर, वासोटा हे एप्रिल १८१८ च्या आरंभीच जिंकले. छत्रपती शिवाजी महाराजांची राजधानी ही ब्रिटलझरच्या स्वाधीन करण्यात आला. (दिनांक ७ मे १८१८) त्याचवेळी इ. स. १६८९ च्या मोगलाने घातलेल्या वेढ्यांतून जे काही कागदपत्रे शिल्लक होते ते इंग्रजांनी केलेल्या तोफांच्या माऱ्यामुळे नष्ट झाले. अशीरगड किल्ला किल्लेदार यशवंतराव लाड याने काही काळ लढविला. पण तोही इंग्रजांनी लवकरच काबिज केला. हा किल्ला ताब्यांत आल्यावर दौलतराव शिंदे, अप्पासाहेब भोसले (नागपूरकर) आणि इतर मराठे सरदार यांमध्ये झालेला गुप्त स्वरुपाचा बराच मोठा पेटीभर पत्रव्यवहार माल्कमला मिळाला. त्याचा उपयोग माल्कमने मेमॉयर्स लिहण्याकरिता भरपूर केला. पेशव्याने एकनिष्ठ रहाण्यांपैकी विठ्ठल नरसिंह विंचूरकर ह्यांना ते शरण आल्यावर एल्फिन्स्टनने लहानशी जहागिर दिली. बाजीरावाने शरणागती पत्करल्यावर त्रिंबकजी डेंगळे याने इंग्रजांना खूप त्रास दिला. पण त्याचा पाठलाग करून त्यास इंग्रजांनी नाशिक प्रांतातील दिंडोरीजवळील अहीर गावी पकडले. त्यानंतर इंग्रजांनी त्याला चांदवडच्या किल्यात बेड्या घालून ठेवले. नंतर त्यांनी त्याची रवानगी बनारस जवळील चुनार किल्यांत केली. तेथेच तो कैदेत असतांना तारीख १० ऑक्टोबर १८२९ रोजी मरण पावला.

इंग्रजांच्या हातात पेशव्यांचा प्रदेश आल्यावर लगेच एफिन्स्टनने एकंदर प्रदेशाचे चार भाग करून त्यांजवर चार हुशार अंमलदारांची कमिशनर म्हणून नेमणूक केली[1]. एफिन्स्टनने त्यांना कामाची दिशा लावून दिली. मुलखाचा बंदोबस्त, वतनदारांचे हक्क, कायदे, रितीरिवाज, देवस्थाने वगैरे नानाविध गोष्टींसंबधी एक मोठी व्यापक प्रश्नावली तयार करून ती एल्फिन्स्टनने या चौघांकडे पाठविली. चौघांनीही मोठ्या कसोशीने तपास करून अत्यंत काळजीने व मेहनतीने ती तयार केली आणि ती सर्व माहिती इंडिया हाऊस रेकॉर्डस, व्हॉल्युम्स १ ते ४ मध्ये सन १८२३ मध्ये प्रसिद्ध केली. ही माहिती आजही मोठी उपयुक्त समजली जाते.

पेशव्यांकडून निघालेला चिमाजीअप्पा यास एल्फिन्स्टनने काशीस राहण्याची व्यवस्था लावून दिली. तसेच मराठा जहागिरदारांचे तीन वर्ग करून त्याने त्यांचीही व्यवस्था लावून दिली. जिंकलेल्या मुलखाची व्यवस्था करून एल्फिन्स्टन मुंबईस गेला व दिनांक १ नोव्हेंबर १८१९ रोजी मुंबईचा गव्हर्नर म्हणून त्याने सूत्रे हाती घेतली. त्याच्या जागी कमिशनर म्हणून पुण्यास चॅपलिन याची नेमणूक झाली.

### सातारा राज्याची परिसमाप्ती :

साताराचे १४ पेट्यांचे राज्य हे एल्फिन्स्टनने गव्हर्नर जनरलच्या मनाविरुद्ध जाऊन महाराष्ट्रांतील परिस्थिती लक्षांत घेऊन तात्पुरती सोय म्हणून निर्मिले

१ पूना रेसि. कॉ. व्हा. १३ ले. ७४, ७५, ८४.

होते. राजास आष्टीच्या लढाईत ताब्यांत घेतल्यावर एल्फिन्स्टनने त्यास त्यांचे हक्कांचा सहानूभूतीपूवक विचार केला जाईल असे सांगून त्याची पूर्तता म्हणून हे राज्य त्यास दिले होते. प्रतापसिंहास राज्यव्यवस्था शिकवणारा कॅप्टन ग्रँट डफ याने हे राज्य नजीकच्या काळांत इंग्रजी मुलखांत विलीन होणार असे गृहीत धरून त्यांत राज्यव्यवस्था इंग्रजी पद्धतीने सुरू केली. ग्रँट डफच्या नंतर तेथील पोलिटिकल एजंट म्हणून कॅप्टन ब्रिग्ज सातान्यास आला. त्यानेही प्रतापसिंहास मोठ्या आदराने वागविले. कॅप्टन ब्रिग्जनंतर रेसिडेंट म्हणून पुण्याचा पहिला कलेक्टर रॉबॅटसन् याची नेमणूक झाली. या रेसिडेंटच्या सांगण्यावरुन प्रतापसिंहाने महाबळेश्वरचा टापू हवा खाण्याचे ठिकाण म्हणून इंग्रजांचे स्वाधीन केला. त्याआधी त्यांच्या सांगण्यावरून रस्ते केले. सांगतील त्या सुधारणा घडवून आणल्या. राज्यांत उत्कृष्ट व्यवस्था ठेऊन रस्ते, पूल, पाण्याच्या सोयी वगैरे प्रजेच्या सुखासाठी केल्या. माल्कम गव्हर्नर झाल्यावर त्याच्या नावाने माल्कमपेठ सन १८२८ मध्ये वसवली. माल्कम व रॉबर्टसन व दुसरे अधिकारी यांनी प्रतापसिंहाच्या कारभाराची अत्यंत वाखाणणी करून त्यास इंग्लंडच्या सरकारकडे पारीतोषिक देण्याची शिफारस केली. त्यावरून इंग्लंड सरकारने एक मोठ्या प्रशंसेचा खलिता व मौल्यवान तलवार नजर म्हणून दिनांक २९-१२-१८३५ रोजी प्रतापसिंह राजास पाठविण्यात आली[1]. हे त्यावेळचा गव्हर्नर ग्रँट यांस न आवडून त्याने तलवार व खलिता मधल्यामधे दडपून ठेवला. यावेळेपासून राजावर कुभांड रचण्याची तयारी झाली. यात बाळाजीपंत नातूचा पुढाकार होता. त्याने प्रतापसिंहाकडे आपणांस साताऱ्याच्या राजाचे दिवाण नेमण्याची विनंती केली. प्रतापसिंहाने त्यास दिवाणी न देता ती महाजन यास दिली. त्याचा राग येऊन प्रतापसिंहाचे उट्टे काढण्याकरिता नातूने सातारा रेसिडेन्सिमध्ये आपली वर्णी लाऊन घेतली. आणि त्यावेळेपासून राजाविरुद्ध कुभांड रचून त्यास पदच्युत करण्यापर्यंत पाळी आणली. त्याच्यावर इंग्रजी राज्याविरुद्ध गुप्त कट रचणे,जोधपूर येथे असलेल्या अप्पासाहेब भोसले यांच्याशी फितुरीचा पत्रव्यवहार करणे, गोवा येथील पोर्तुगिजांशी फितुरीचा पत्रव्यवहार व भाऊ अप्पासाहेब यांचा छळ असे आरोप ठेवण्यांत आले आणि तपासणीचे नाटक करून प्रतापसिंहास इ. स. १८३९ मध्यें पदच्युत करून त्याचा भाऊ अप्पासाहेब याच्याशी नवीन तह करून त्यास गादीवर बसविले. (दिनांक १८ नोव्हेंबर १८३९) प्रतापसिंहास पदच्युत केल्यानंतर त्यास बनारस येथे नेऊन ठेवले. तो तारीख १४ ऑक्टोबर १८४७ रोजी काशी येथे मरण पावला. त्यास पुत्रसंतान नव्हते. अप्पासाहेब इ. स. १८४८ मध्ये निपुत्रिक निवर्तला. त्याचा दत्तक नामंजूर करून इंग्रज सरकारने तारीख १६ मे १८४९ रोजी सातारा राज्य खालसा केले आणि छत्रपतींच्या राज्याची इतिश्री झाली.

---

१ चोकसी, राजा प्रतापसिंह ऑफ सातारा, पे. ४७.

# ३२

## राज्ययंत्रणा, आर्थिक व सामाजिक जीवन

### १ मराठेशाहीतील राज्ययंत्रणा :

राज्याच्या व्यापाबरोबर त्याच्या कारभाराच्या सूत्रांची विविधता जशी व्यापक होत जाते तशीच ती त्या राज्याला उतरती कळा लागली की संकुचितही करावी लागते. परंतु ह्या सूत्रातील मूलभूत तत्त्वे मात्र कायमच ठेवावी लागतात. निरनिराळ्या दिशेने व द्वारे हालणारी ही सूत्रे जितकी एकसूत्रबद्धता धारण करतील तितका तो राज्यकारभार जोमदार व सकस राहू शकतो आणि अशी राज्यबंधारणा राष्ट्राच्या संघटनेला व उत्कर्षाला अधिकाधिक मार्ग मोकळा करून देत रहाते. परंतु ह्या सूत्रांची एकसूत्रबद्धता राखणे हेच कार्य फार अवघड असते. ह्या कार्यातील बिनचूक तत्परता किंवा शैथिल्य हे राज्यातील बऱ्यावाईट आंदोलनाला कारण होते.

शिवाजी महाराजांनी जरी सुरुवातीस राज्य उभारण्याच्या कालात काही निश्चित असे दंडक घालून दिले नसले तरी निजामशाहीच्या अखेरीस एतद्देशीय लोकांनी जी राज्यबंधारणा स्वीकारली होती तिचा अवलंब केला होता. राज्याची थोडीबहुत संघटणा होताच निरनिराळ्या अधिकाऱ्यांना आपापल्या कामाची वाटणी करून दिली. परंतु ह्या वाटणीत जशी एकसूत्री कारभाराची उभारणी व्हावयास पाहिजे होती तशी ती त्यावेळच्या परिस्थितीमुळे केली गेली नव्हती. त्यामुळे शिवाजी महाराजांना लवकरच सुसूत्र राज्यबंधारणेत ज्या काही पूर्व नियोजित घटना होत्या त्यात सुधारणा कराव्या लागल्या. ह्या सुधारणांचा मुख्य उद्देश राजा व प्रजा यांचे संबंध अप्रत्यक्ष राहण्यापेक्षा प्रत्यक्ष व निकटचे असावेत हा होता. देशमुख्या, जहागिरी वगैरेवर बरेच नियंत्रण घालावे लागले होते व त्यांच्या हक्काबाबतही काही फेरबदल करणे इष्ट होते. परंतु या सुरुवातीच्या घटनेला जे राज्यबंधारणेचे नंतर स्वरूप आले ते शिवाजी महाराजांच्या राज्यभिषेकापासून होय. या राज्याभिषेकसमयी जी राज्यबंधारणा मुक्रर करून दिली त्या बंधारणेपासूनच विचार करणे जरूर आहे. मात्र विस्तारभयास्तव ही चर्चा मुख्य बाबीपुरतीच मर्यादित ठेवली जाणार आहे. राज्याच्या उपघटकाबद्दल किंवा त्यांच्या कार्यालयाबद्दल तपशीलवार विचार स्वतंत्र लेखात करणे इष्ट होईल.

शिवपूर्वकाली इस्लामी राज्यसत्तेचे ठाणे काही शतके महाराष्ट्रात बसल्याने या परदेशीय सत्ताधाऱ्यांच्या सोयीसाठी स्थानिक राज्यबंधारणेचे मूल स्वरूप

बरेच पालटले गेले होते. या इस्लामी सुलतानांना स्थानिक राज्यबंधारणा संघटित करणे जवळ जवळ अशक्य होते. एक तर सुलतानांना आपल्या स्वकीयांकडेच फौजबंदीचे अधिकार ठेवणे इष्ट व सुरक्षिततेचे होते. पण त्याचबरोबर या परकीय सत्ताधाऱ्यांस स्थानिक भाषेचे व भौगोलिक परिस्थितीचे पूर्ण अज्ञान असल्याने या राज्ययंत्रणेचा स्थानिक लोकांशी फारच थोडा संबंध येत असे. त्यांना खरे मालक देशमुख व जहागिरदार असत आणि या देशमुख-जहागिरदारांनी स्थानिक लोकांकडून खंड वसूल करून खंडणी सरकारात रुजू केली म्हणजे त्यांचा कार्यभाग साधे आणि प्रजा व राज्यसत्ता ही त्या देशमुख-मोकदमांच्या हाती राही. साहजिकच अशा व्यक्तिगत देशकारभारात सर्वत्र एकसूत्रता राहणे अशक्य होते. सारांश, आर्य संस्कृतीप्रमाणे राजा आणि प्रजा यांचे जे निकटचे संबंध पूर्वापार चालत आले होते त्यात बरीच क्रांती झाली होती.

काही मराठी क्षत्रिय घराणी आपणांस 'राजे' असे म्हणवीत. परंतु हे विशेषण केवळ जातिधर्माचे किंवा उच्च क्षत्रिय कुळीचे द्योतक होते इतकेच. इस्लामी सत्तानी, दक्षिणेतील काही भाग सोडला तर, जवळ जवळ सर्वच हिंदुस्थान व्यापल्यामुळे 'राजा' या पदाला धर्माचार रूढीने अगर पारंपारिक अग्रहक्काने अधिकारी होणारा वंश सतराव्या शतकात बाकी राहिला नव्हता. परंतु आर्यावर्तात आणि सभोवतालील प्रदेशात सर्वच मानव समाज धर्माधिष्ठित आचारधर्माने किंवा चालीरीतीने नियंत्रित होता. अशा काली बाहुसामर्थ्यापेक्षा धार्मिक सूत्रांनाच राज्यबंधारणेत अग्रमान असणे साहजिक होते. इस्लामी सुलतानांनासुद्धा आपला खुत्बा पढण्याचा हक्क जोपासण्याची आवश्यकता होतीच. अशा परिस्थितीत कोणतीहि चिरकाल टिकणारी राज्यसंघटना करावयाची तर आर्यांच्या तत्कालीन रूढ मानव-धर्म-शास्त्राच्या मान्यतेची आवश्यकता होती. या मान्यतेविना राजवंशीय क्षत्रिय आपल्या समान हक्कासाठी सवड मिळेल तेव्हा तेव्हा राजत्वासाठी अंतर्गत कलहाची नांदी पिटीत राहिले असते आणि 'राजत्वाविना' चातुर्वर्णियांवर अगर अखिल समाजावर राजसत्ता गाजविण्याला सर्वच समाज, सामाजिक रूढीच्या दडपणाशिवाय खूष राहिले असते असे नाही. सारांश, शिवशाहीच्या पूर्वार्धात राजकीय व सामाजिक परिस्थिति स्फोटक असल्याने केवळ शक्तिसामर्थ्यावर स्वराज्याच्या बंधारणेबाबत फार वेळ टिकाव धरणे जड गेले असते. परंतु शिवाजी महाराजांना गागाभट्टांसारखा उत्क्रांतवादी साह्यक मिळाल्याने त्यांच्या सल्ल्यानुसार स्वराज्याची संघटना सामाजिक, धार्मिक व राजकीय दृष्ट्या षड्शास्त्रास अनुसरून स्वयंपूर्ण करण्याचा यशस्वी मार्ग स्वीकारता आला आणि हिंदवी स्वराज्याचा पाया धर्माधिष्ठित व लोकसंमत असा रचला गेला. या घटनेच्या[1] तपशिलात जाण्याची आवश्यकता नाही. मात्र त्यामागील मुख्य तत्त्वांचा थोडक्यात उल्लेख करितो.

---

१ श्री. गागाभट्ट कृत "श्री शिवराजाभिषेकप्रयोग:" संपा. श्री. वा. सी. बेंद्रे.

क्षत्रियाला इंद्राचा प्रतिनिधी म्हणून प्रजापति किंवा छत्रपतीचा हक्क प्राप्त होतो. परंतु तसे प्रतिनिधित्व प्राप्त करून घेण्यास प्रजेने विधिपूर्वक त्या क्षत्रियाला आपले नेतृत्व दिले पाहिजे. हा जो विधी तो राज्याभिषेकविधि किंवा ऐंद्राभिषेकविधि होय. या विधीने त्या पुरुषाला व त्याच्या वंशाला राजत्वाचे अधिकार प्राप्त होतात व अशा विधियुक्त प्रतिनिधित्व प्राप्त झालेल्या पुरुषाच्या पुत्रपौत्रांना 'मंचकारोहण' विधीने म्हणजे साध्या राज्याभिषेक विधीने ते प्रतिनिधित्व पुढे चालविता येते. परंतु त्यात खंड पडला तर पुन्हा 'राज्याभिषेक' विधि म्हणजे ऐंद्राभिषेकविधीची जरुरी भासते. या विधीनेच चातुर्वर्णाश्रम धर्माप्रमाणे त्या क्षत्रियाला चारही वर्णावर आपली सत्ता गाजविण्याचा म्हणजे शासनाधिकाराचा वगैरे हक्क पोहोचतो. या राज्याभिषेकाच्या वेळी राज्ञी, युवराज, मुख्य प्रधान व सेनापति यांनाहि 'पट्टबंधनविधि' केला जातो. त्या विधीच्या योगाने त्यांनाही स्वतंत्रपणे नियंत्रित शासनाधिकार प्राप्त होतो. इतर अधिकाऱ्यांकडे जो शासनाधिकाराचा हक्क जातो तो केवळ राजाचा प्रतिनिधि म्हणून.

शिवाजी महाराजांना ता. ६ जून १६७४ रोजी गागाभट्टांच्या मार्गदर्शनाखाली राज्याभिषेक किंवा ऐंद्राभिषेक झाला. नंतर महाराजांस दुसऱ्या दिवशी पहाटेस मुमुहूर्तें सिंहासनारुढ केले. राज्याभिषेकानंतर त्यांची माता जिजाई व पूर्वी पत्नी यांचे मृत्यु आगेमागे थोड्याच दिवसात झाल्याने या अशुभ प्रसंगांचा कार्यकारणभाव या वैदिक शास्त्रांच्या विधीतील दोष, म्हणजे ग्रामदेवता, कुलदेवता यांच्या सोपस्कारांतील कमतरता याकडे तांत्रिक लोकांनी लाविल्याने शिवाजी महाराजांनी आपल्या मातेच्या अशौचानंतर या तांत्रिक गटाच्या आग्रहास्तव सिंहासनाच्या वास्तूची त्या तांत्रिकांच्या तंत्राप्रमाणे पुनः सिंहासनारोहण करण्यापूर्वी शुद्धि करून घेतली. हा विधी म्हणजे राजाभिषेक किंवा राज्याभिषेकहि नव्हे, फक्त सिंहासनाची वास्तुशुद्धि होती. शिवाजीच्या 'राज्याभिषेका' बरोबर संभाजीला युवराजपद विधियुक्त मिळालेले होते. परंतु राजारामाला मंत्र्यांनी 'मंचकारोहण' करून घेतल्याने संभाजीची परंपरा तुटली. संभाजीलाच प्रजेने व इतर सर्व सरदारांनी उचलून धरल्याने त्याने राज्यावर येताच 'मंचकारोहणविधि' २० जुलै १६८० रोजी करून घेऊन जरी तो राज्यावर आला तरी, त्याने आपले गेलेले राज्यत्त्व पुन्हा संपादण्याकरिता शिवाजी महाराजांसारखाच गागाभट्टांच्याच प्रयोगानुसार आपला राज्याभिषेक म्हणजे ऐंद्राभिषेक विधी करून घेतला. संभाजीनंतर राजाराम महाराजांना 'मंचकारोहण' करविले. त्यानंतर तशाच कारणास्तव शाहू माहाराजांनी पुन्हा 'राज्याभिषेक' करवून घेऊन आपली शाखा पुन्हा राजपदधारी केली. परतु त्यानंतर पेशव्यांनी कोणालाच विधियुक्त राज्यपद दिले नाही. प्रतापसिंहाने पुन्हा 'राज्याभिषेकविधि' करून घेण्याचा प्रयत्न केला. मात्र यावेळी गागाभट्टांची पोथी उपलब्ध नसल्याने नवीन विधीची शास्त्रार्थाने रचना करवून विधी करून घेतला. या दोन्ही विधींच्या तपशिलात जरी थोडाबहुत फरक असला तरी भावार्थ एकच आहे.

शिवाजी महाराजांनी 'राज्याभिषेक' समयी राज्यव्यवस्थेसाठी जो कानूजावता[1] घालून दिला होता तो आज उपलब्ध आहे. तसाच साताराचे राजे शेवटचे प्रतापसिंह यांस इंग्रज सरकारने इ. स. १८१९ त राज्य देताना राज्यकारभारासाठी जी नियमावली घालून दिली तिचाहि खलिता मिळाला आहे. कानूजावता म्हणजे राज्यव्यवस्था सुसूत्र राखली जावी म्हणून निरनिराळ्या दर्जाच्या व खात्याच्या अधिकाऱ्यांवर त्यांच्या कामाचे नियंत्रण करून देणारा तक्ता. शिवाजी महाराजांच्या कानूजावत्यात विस्तृत राज्यबंधारणा आढळते, तर राजा प्रतापसिंहाच्या नियमावलीत लहानशा जहागिरीवजा राज्याच्या कारभाराच्या नियंत्रणाचे दर्शन होते.

हिंदवी स्वराज्याच्या धर्मशुद्ध स्थापनेबरोबर आर्यसंस्कृतीप्रमाणे अष्ट प्रधानांचे नावनिशीवार नियोजन क्रमप्राप्त झाले. पूर्वी ही घटना नामाभिधानापुरतीच वेगळी होती असे म्हणावयास हरकत नाही. हिंदु पद्धतीप्रमाणे युवराजाला राजाच्या गैरहजेरीतील अग्र प्रतिनिधित्वाचा मान असतो. इस्लामी तत्कालीन रूढ प्रचारात शहाजाद्यांना तसा वारसा क्रमप्राप्त होत नसे. इतकेच नव्हे तर त्यांना युवराजाचा विशिष्ट दर्जा नसल्याने त्यांना सर्वश्रेष्ठ सेनापतीत्वाचा सरंजाम देऊन त्यांस इतरांपेक्षा मोठे अधिकारपद प्राप्त होत असले तरी शहाजाद्यांपैकी लहानमोठ्याला राज्याचा वारसा जबरीने अगर वडिलांच्या संमतीने घेता येत असे.

अष्ट प्रधानांचे मात्र तसे नव्हते. राज्यकारभाराच्या नैसर्गिक विभागणीप्रमाणे इस्लामी अमदानीतही अशा प्रकारचे अधिकार होते. अष्टप्रधान व त्यांच्या कार्याचे विभाग शिवाजी महाराजांनी ज्या राज्याभिषेक प्रसंगाने कानूजावता घालून दिला होता त्यावरून आपणांस निश्चितपणे सांगता येतात. अष्ट प्रधानांची नामे व पूर्वी तोच अधिकार व कार्य करणाऱ्यांची नामे पाहिली तर ह्यात फारसा फरक झाला होता असे नाही. परंतु कारभाराची नवी व्यवस्था बरीच वेगळी झाल्याने राजाचे नियंत्रण मात्र अधिक प्रभावी झाले. प्रधानांची नूतन नावे व पूर्वीचे हुद्दे असे :—

(१) मुख्य प्रधान–पेशवे ; (२) अमात्य–मुजुमदार ; (३) सचिव–सुरनीस ; (४) मंत्री–वाकनीस ; (५) सुमंत–डबीर ; (६) न्यायाधीश (फक्त इस्लामी धर्माला मान्य असे स्वतंत्र अधिकारी मुसलमानांचे काजी सरमुल्ला होताच) ; (७) पंडितराव– (पद नव्हते) ; (८) सेनापति–नौबत.

सर्व प्रधानांना त्यांच्या तनख्यापोटी सुभे किंवा परगणे दिले जात. काही प्रधान आपले सुभे आपल्याकडे ठेवून आपल्या आप्तांकडून त्यांची व्यवस्था पहात, कोणी कारभारी ठेवून व्यवस्था करीत, तर काही मंत्र्यांना नक्त तनखा

---

[1] कानूजावता-राज्यकारभाराविषयीं माहिती सांगणाऱ्या कागदास कानूसावता असे म्हणतात. हा कानूजावता 'सनदा पत्रें' (इ. स. १९१३) पृ. १२२-१२४ व 'का. इ. सं. ऐतिहासिकलेख, पत्रें यादी' वगैरे (इ. स. १९३०) ले. २ ह्या दोन ग्रंथात मिळून दोनदा आला आहे.

देऊन कार्यभार साधला जात असे. कोणत्याही स्वारीचे नेतृत्व व जबाबदारी, जर सेनापति इतरत्र गुंतले असतील तर, कोणाना कोणा सुभ्याला अथवा प्रधानाकडे दिली जात असे. अशा कामात अधिक प्राप्ती म्हणजे लूट वगैरेतील उत्तेजनार्थ ठराविक भाग मिळणे ही होय. ज्या प्रधानांची युद्धकार्यासाठी योजना होत होती अशांना त्यांच्या खर्चासाठी सुभे दिले जात व ह्या सुभ्यांच्या उत्पन्नातून ते सैन्याचा खर्च भागवीत असत. परंतु अष्ट प्रधानांच्या हुद्याप्रमाणे राजकीय कारभार वाटला गेला होता त्याचा थोडक्यात तपशील असा:—

(१) मुख्य प्रधान याणी सर्व राजकार्य करावे. राजपत्रावरी शिक्का करावा. सेना घेऊन युद्ध प्रसंग स्वारी करावी. तालुका ताबिनात स्वाधीन होईल त्याचा रक्षून बंदोबस्त करून, आज्ञेने वर्तावे, व सर्व सरदार सेना त्याजबरोबर जावे. त्यांनी सर्वासमेत चालावे; (२) अमात्य यांणी सर्व राज्यांतील जमाखर्च चौकशी करून दफ्तरदार फडणीस त्यांचे स्वाधीन असावे. लिहिणे चौकशीने आकारावे. फडणिशी, चिटणिशी पत्रावर निशाण कराव. युद्धप्रसंग करावे. तालुका जतन करून आज्ञेत चालावे; (३) सचिव याणी राजपत्रे शोध करून अधिक उणे अक्षर मजकूर शुद्ध करावी. युद्धप्रसंग करून तालुका स्वाधीन होईल तो रक्षून आज्ञेत वर्तावे. राजपत्रावर चिन्ह समत करावे; (४) मंत्री याणी सर्व मंत्रविचार राजकारण यातील सावधतेने विचार करावे. आमंत्रण-निमंत्रण, वाकनिशी त्यांचे स्वाधीन. तालुका जतन करून युद्धादि प्रसंग करावे. राजपत्रावर संमत चिन्ह करावे. (५) सेनापती यांणी सर्व सैन्य रक्षण करुन युद्धप्रसंग स्वारी करावी. तालुका स्वाधीन होईल तो रक्षून हिशेब रुजू करून आज्ञेने वर्तावे व फौजेचे लोकांचे बोलणे बोलावे. सर्व फौजेचे सरदार यांणी त्याजबरोबर चालावे; (६) पंडितराव यांणी सर्व धर्माधिकार, धर्म, अधर्म पाहून विचिक्षा करावी. शिष्टांचे सत्कार करावे. आचार, व्यवहार, प्रायश्चित्त पत्रे होतील त्यांजवर संमत चिन्ह कराव. दानप्रसंग, शांति, अनुष्टान तात्काळी करवावे; (७) न्यायाधीश यांनी सर्व राज्यांतील न्याय, अन्याय मनास आणून बहुत धर्मकरून न्याय करावे. न्यायाची निवाडपत्रे याजवर संमत चिन्ह करावे; (८) सुमंत यांणी परराज्यातील विचार करावा. त्यांचे वकील येतील त्यांचे सत्कार करावे. युद्धादि प्रसंग करावे. राजपत्रांवर संमत चिन्ह कराव. या तपशीलावरून एक गोष्ट चटकन लक्षात आल्यावाचून राहणार नाही आणि ती ही की, राज्यकारभाराची व्यवस्था जवळ जवळ आजच्या मंत्री-अध्यक्षांच्या यत्रणेसारखी होती. राजा हाच राज्यकारभाराला प्रत्यक्ष जबाबदार होता व मंत्री हे मार्गदर्शन करीत असत. राज्यकारभार हा राजाचे चिटणिस-फडणिसांदींच्या हातून परंतु त्यांच्या कार्यावरच मंत्र्यांची देखरेख ठेवून, राजा करून घेत होता. सरकारी हुकूम याच यंत्रणेतून बाहेर पडत.

राज्याच्या राज्यकारभाराच्या जबाबदारीची वाटणी जरी प्रधानमंडळाकडे देण्यात आली असली तरी कारभारविषयक कामकाजाच्या अंमलबजावणीची सूत्रे ठराविक कारभाऱ्यांकडे म्हणजे चिटणीस, फडणीस आदि आपल्या खास अधिकाऱ्यांकडे ठेविली होती. ते राजालाच जबाबदार असत आणि राज्यातील सर्व लेखकवर्ग याच अधिकाऱ्यांच्या नियंत्रणाखाली सुभे, महाल आदि सरदार सेनापतीकडील राज्यकारभार पहात. त्यामुळे ज्याप्रमाणे देश-मुखादि सत्ताधिशांची सत्ता शिरजोर होऊ न देण्याची सुरुवातीपासून काळजी घेतली होती, त्याचप्रमाणे इस्लामी सलतनतीमध्ये स्वतंत्रपणे वागत असलेले वजीरादि अंमलदार सहज बंडास प्रवृत्त होत तशी आपत्ती येऊ नये म्हणून प्रत्यक्ष राज्यकारभाराच्या अंमलबजावणीची व्यवस्था स्वतंत्र ठेवून ती खास सरकारच्याच हाती ठेविली. पुढील चिटणिशी, फडणिशी आदि जाबत्यांवरून राजसत्ता सरकारात कशी केंद्रित केली होती हे दिसून येईल. यांतील एक-दोनच जाबत्यांचा येथे उल्लेख करतो.

चिटणिशी फडाकडून व्हावयाचा पत्रव्यवहार असा : "नूतन इनाम गाव कोणास दिल्हा त्यांची पत्रे व वतन पत्रे. मोकासे गांव, तैनातेस जमीन वगैरे दिल्हे यास पत्रे. साहित्यपत्रे. जाबसाली हुकमी कागद राजकारणी, सरंजामाचे, शेत सनदेचे, वृत्तीचे, इनामाचे व वरातेचे ताकीद रोखे, तहनामे, कानुजावते एकंदर जकातीसुद्धा, मुलखास, गावांस, जमिनीस कौल, इस्तावा देणे; खंडणी करून पैका ठरेल, करार, त्याचा कौल; नवा अंमलदार कमावीस वगैरेंच्या सनदा. घासदाणियाचे रोखे. रसद व इरसाल लग्नकार्य सामान आणावयाची पत्रे. बुडती रसद करार झाली असेल ती पाठविणे. शेताचे, बाकी तहकुब केल्याचे किंवा नापीक जाहले तरी तहकुब वसूल घेणे, कदीम इनाम, वतन, वर्षासन, स्वराज्य, परराज्यात चालत असेल त्याची ताकीद पत्रे व भोगवटयाची पत्रे. पुरातन वतनाचा इनसाफ होऊन वतनदारी करार झाल्यावर त्यांची पत्रे सर्व चिटणिशी. वतनदार यांची पत्रे. नूतन हर कोणास वतन, इनाम वतन दिल्हे, त्याची पत्रे, प्रायश्चित्त देणे तरी व गोताई करावयाची आज्ञा जोशी, उपाध्ये यांसी पत्रे व ब्राह्मणांस व शूद्रांस हरकोणास पत्र देणे. हर कोणास परस्परे कज्जा होऊन व्यवहार दिवाणात आला तरी निवाडयाप्रमाणे खऱ्यास हरकी, खोटयास गुन्हेगारी याची पत्रे. खंड, गुन्हेगारी व हरकी पैदास्त बदअमलीची पत्रे. वराती बावत पत्रे. कोठीची व रहदारीची दस्तके, तलब, रोखे. वतनी महालात व बंदर किल्ले वगैरे कानुजावते. दरसाल दारुगोळा व कापड हुजरून किल्ले कोट ठाणी व जेथे रवाना करणे व तेथून आणवणे वगैरेची पत्रें. आल्या कागदाचा लखोटा फोडून वाचून दाखविणे, करून रवाना करणे. जिनसास निरख करून कानुजावता करून देणे. दुरून गांवास व कोठीस व परगण्यास अंमलदार पाठविला तरी हुजूरच्याप्रमाणे करारपत्रे. हरएकाची मालीयत वगैरे जप्त करणे, ज्याची त्यास देवविणे. गड, कोट, किल्ला वगैरे देणे, हद्द देणे. एखाद्यास कैद करणे, सोडवणे. राजकारणी बातमीपत्रे. खास दस्तकी,

हातरोखा मोर्तबी लिहिणे ते सर्व. सरजाम, इनाम वतने वरातीबाबत वस्त्रे पाठविणे ; खंड, गुन्हेगारी, हरकी, मसाला, नजर वगैरे भरून चिटणिसानीच करावे. यादी लेहून ठेऊन दप्तरात पाठवावी. त्याप्रमाणे जमाखर्च करावा. हातरोख्यास चिन्ह अथवा दाखला चिटणिसाखेरीज कोणाचा नाही. तकवती व वसाहती कौल. घर, जागा, ठाव, ठिकाण, लाकुडफाटे, शेतभात, अमानत करणे अगर देवविणेबाबत पत्रे." या बत्तीस कलमी जाबत्यावरून स्पष्ट होते की, अंतर्बाह्य राज्यव्यवस्थेची सर्व अंमलबजावणी या चिटणिसी फडाकडून व्हावयाची असल्याने महालदार, सुभेदार, ठाणेदार आदीकडे प्रत्यक्ष राजसत्ता मुळीच नसून ते फक्त सत्तेची अंमलबजावणी करणारे हस्तक होत. साहाजिकच सर्व प्रजा, सरदार, अंमलदार या एकसूत्री खास राजाच्याच देखरेखीखाली चाललेल्या कारभारामुळे राजनिष्ठ राहू लागली तर नवल नाही.

या कारभाराची अंमलबजावणी करिताना जी जमाखर्चाची मोठी बाब तिच्याही बाबतीत फडणिसाच्या यंत्रणेतर्फे पूर्ण खबरदारी घेतली गेली होती. अमात्यांच्या देखरेखीखाली जमाखर्चाचे खाते असतानासुद्धा त्यांच्या जाबत्यात 'सर्व राज्यांतील जमाखर्च चौकशी करून दफ्तरदार फडणीस त्यांचे स्वाधीन असावे. लिहिणे चौकशीने आकारावे' ह्या वाक्याचा विचार केला तर फडणीस जमाखर्चादि बाबतीत राजाला किती जबाबदार होता याची कल्पना होते. तसे पाहिले तर सर्व तऱ्हेच्या खर्चाला परवानगी देणारा म्हणजे मुजुमदार, परंतु त्याने हुजूरच्या हुकुमाप्रमाणे फडणिसाकडे जे देण्याघेण्याचे व्यवहार येतील त्यांची चौकशी ठेवून अमलबजावणीत मार्गदर्शन करणे. फडणिसी फडात सबनीस, बक्षी, कारखानीस, पोतनीस, दप्तरदार, जिमेनीस, वगैरे उपखाती किंवा विभाग आहेतच. फडणिस हा चिटणिसासारखा खास राजाचा आयव्यय खात्याचा कारभारी. फडणिसाकडून जी राजपत्रे निघतील तितक्या पुरताच आयव्ययाचा अधिकार सरकारी अधिकाऱ्यांना गाजविता येत होता. अंमलबजावणी करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांना, अगदी सांप्रतच्या पद्धतीप्रमाणे अर्थ-खात्याची अनुमति आवश्यक असते, तशीच शिवशाहीत फडणिसाच्या लेखी मान्यतेची आवश्यकता असे. त्यामुळे सर्व कारखान्यांचे व अधिकाऱ्यांचे आयव्ययाचे तक्ते हिशेबतपासणीसाठी यावेच लागत. तत्कालीन परिस्थितीप्रमाणे चिटणिसी व फडणिसी सरकारी सत्तेची अंमलबजावणी करणाऱ्या दोन मुख्य शाखा होत्या. इतर सर्व कारखाने यांच्याच हुकुमानुरूप कार्यभाग उरकीत. मात्र फडणिशी कारभार चिटणिशीसारखा वंशपरंपरेने चालत राहिला नाही.

विस्तारभयास्तव इतर सरदार, सुभेदार, हवालदार, कारखानीस, सबनीस, पोतनीस आदि अंमलबजावणी करणाऱ्या कारभाऱ्यांच्या जाबत्यांच्या तपशिलात शिरत नाही. परंतु त्यांचेवर जरी राज्यबंधारणेनुसार कारभाराबाबत व सत्तेबाबत मर्यादा होत्या तरी त्यांचा हरकामातील सत्ताधिकार प्रजेच्या दृष्टीने फार मोठा होता. त्यांची प्रजेवर जरब राहील इतका मोठा होता. तरी देखील प्रजेचा सारा विश्वास व भरंवसा हा अंतिम निर्णयाच्या न्यायान्यायतेबाबत

खास राजा व त्याच्या मंत्र्यांच्या यंत्रणेवरच होता. त्यामुळे राजा आणि प्रजा यांचे संबंध निकटचे होऊ लागले होते. राज्ययंत्रणेवर आपुलकीचा भाव अधिकाधिक वाढत चालला होता यात शंका नाही. हीच आपुलकी राज्य किंवा राष्ट्र संघटनेला फार मोलाची ठरते.

सेनासमुदाय हा राज्याचा तिसरा मुख्य घटक होता. याही घटनेत बदल करून देशमुख-सरदार-सुभेदारांकडे असलेली ही सेना राजाने सर्वस्वी सरकारी हुकमतीत आणण्याकरिता सैनिकांचा मुशाहिरा वगैरे सरकारी खजिन्यातून देण्यात येऊ लागला आणि स्वतंत्र सेनापतीची नेमणूक होऊ लागली व हे सर्व सेनापति राजसेवक म्हणूनच वागू लागले. त्यामुळे मागे जो सुलतानांच्या राजकारणापेक्षा आपल्या सरदार-वजिरांच्या कामकाजाकडे पहाण्याचा जो रिवाज पडला होता तो बदलला. त्यामुळे हिंदवी स्वराज्याला अंतर्गत अधिक सुरक्षितता लाभू शकली. इतकेच नव्हे तर त्यांचे बाजूकडील सरदार मोगलास मिळाले तरी सैनिकांनी आपली राजनिष्ठा अचल राखली.

शिवाजी महाराजांची राज्ययंत्रणा म्हणजे तत्कालिन राजकीय व सामाजिक आचारधर्मात क्रांतीच होती. परंतु शिवाजीची अष्टप्रधान परंपरा सामान्यपणे शाहूच्या पूर्वकालापर्यंत कायम राखली गेली. कालमानाप्रमाणे राणी येसुबाईनी त्यात थोडी भर टाकली. संभाजी महाराज सारखे युद्धात गुंतल्याने त्यांनी राणी येसूबाईसाहेबांकडे जे अंतर्गत राज्यव्यवस्थेसाठी प्रतिनिधिपद आचारात आणले होते त्याची पदसिद्ध योजना-जाणत्या युवराजाच्या अभावी राणी येसूबाईसाहेबांनीच राजारामास पुनर्मंचकारोहण करिताना निराळी करून प्रल्हाद निराजीस ते पद दिले. त्यानंतर पूर्वीच्या अष्टप्रधानात प्रतिनिधीपदाची भर पडली. अष्टप्रधानाव्यतिरिक्त शिवाजीनी दानाध्यक्ष, छंदोगामात्य यासारखी उपमंत्रीपदे निर्माण केली होती. त्या पदाधिकाऱ्यानाहि पंडितरावांच्या वंशपरंपरेतील लायक पुरुषाच्या अभावी महत्त्व प्राप्त झाले.

राजाराम जिंजीकडे गेल्यानंतर अष्टप्रधानात साहाजिकच फाटाफूट झाली व प्रतिनिधि, मोरोपंत पेशव्यांसारखी राज्यकारभाराची धुरा चालविण्याइतके लायक व एकनिष्ठ नसल्याने कारभार 'राजमंडळा' तर्फे करण्याची प्रथा पडली. राजारामाच्या गैरहजेरीत अर्थात दोन राजमंडळे काम करीत होती. एक जिंजीस व दुसरे पन्हाळगडी. जे प्रधान जिंजीच्या 'राजमंडळा' वर हजर नसत त्यांचेऐवजी त्यांचे कारभारी त्यांचे प्रतिनिधित्व करीत व महाराष्ट्रातील 'राजमंडळा' वर जिंजी येथील प्रधानांच्या सुभ्यावरील अंमलदार 'सभासद' म्हणून हजर राहून काम विल्हे लावीत. राजाराम महाराज परत आल्यावरही हा राजमंडळाचा कारभार चालू राहिला. तो पुढे शाहूच्या कारकीर्दीतही चालू होता. परंतु पेशव्यानी आपले ठाणे पुण्यास नेल्याने व सारखे स्वारी-शिकारीवर राहावे लागल्याने पेशवे व त्याचप्रमाणे इतर प्रधानही अशाच कारणावरून आपापले कारभारी या 'राजमंडळा' च्या कामाकडे नियोजित करू लागले. स्वाभाविकच ह्या 'राजमंडळा'च्या कारभाराला फारसा मान

राहिला नाही व शाहूनंतर तर 'राजमंडळ'च नाहीसे झाले. ना राजमंडळ ना राजा अशी परिस्थिती निर्माण करण्यात आली.

शाहू राज्यावर आला त्यावेळेपासून मोगली सत्ता आपापसातील दुही व यादवीमुळे दुर्बळ होत चालली होती. मराठे सरदारांस यावेळी स्वपराक्रमाने मुलुख संपादन करण्याचा आत्मविश्वास गेल्या पंचवीस वर्षात मिळविलेल्या अनुभवाने आला होता. या सर्व सरदारांस उद्योग लावून न दिल्यास ते आपापसात भांडू लागतील व राज्याच्या ऱ्हासास कारण होतील ह्या जाणिवेने त्याने भोसले, पेशवे, दाभाडे, गायकवाड, शिंदे, होळकर वगैरे सरदारांकडे हिंदुस्थानात राज्यविस्ताराचे व सांभाळण्याचे काम सोपविले. त्यामुळे सेनापतिपदाचीहि बरीच वाताहत झाली. पेशवे हेच मुख्य सेनापती होऊन बसले. शेवटी निरनिराळ्या दक्षिणोत्तरेकडील क्षेत्रात पाठविलेले हे सरदारही स्वतंत्रपणे वागू लागले. शाहू राजानंतर अष्टप्रधानांचे सर्वच अधिकार व राज्याचे धुरिणत्व पेशव्यांनी आपलेकडेच घेतल्याने राज्ययंत्रणा मोडली व राज्य असंघटित झाल्यामुळे प्रजेचाहि पाठिंबा घालविल्याने शिवाजी महाराजांच्या स्वराज्यास उतरती कळा लागली. सरदारी करून जहागिरी संपादणार अधिकारी स्वतंत्र राजे होऊन बसले आणि स्वराज्याचा नाश करण्याच्या उद्देशाने राजकारण खेळणाऱ्या इंग्रजाने या सरदार नोकरांच्या राजत्वास मान्यता देऊन त्यांचा स्वराज्याशी जडलेला संबंध तोडून टाकला.

पेशवाईनंतर राजा प्रतापसिंहास राज्य मिळाले. परंतु हे फक्त जहागिरीवजा लहानसे असल्याने इंग्रजाने त्यास कारभाराची यंत्रणा लावून दिली. अर्थात ती राजसत्तेविना जहागिरी-राज्य सांभाळण्यापुरतीच संकुचित करावी लागली. हा 'कानुजाबता राजमंडळ सरकार हुजुर संस्थान सातारा'[१] म्हणजे एक 'ऑफिस मॅन्युअल'च असून त्यात अधिकारी, कारकून-नोकर यांची संख्या व कामाची वाटणी करून दिली असून या लोकांचे पगारादी तपशीलही ठरवून दिले आहेत. ही संस्थान-बंधारणा जरी मूळ मराठ्यांच्या जाबत्यानुरोधेच केली असली तरी त्यातून स्वतंत्र-राज्यबंधारणेत अवश्य असलेली यंत्रणा साहजिकच वगळली गेली आहे.

प्रधानमंडळ व सेनापतीच्या जागी फक्त एका 'कारभारी दिवाणा'ची योजना करून जो जाबता आंखून दिला आहे त्यातील दिवाणाच्या कामाची सात कलमे पुढे देतो. त्यावरून प्रतापसिंहाच्या राज्याचे क्षेत्र व व्याप किती संकुचित झाला होता ते दिसून येईल—

"(१) माहालातील मामलेदार वगैरे हरयेक लोकाकडील पत्रे येतात त्याची उत्तरे चिटणिसीकडून व दप्तरातून व न्यायाधिसीकडून लिहिवायाची त्यास जी पत्रे येतील ती पाहून मजकूर सरकारात समजाऊन त्याचा जाबसाल पुसोन घेऊन त्याची उत्तरे पत्रे ज्याकडून तयार व्हावयाची त्यांस सांगोन

१. Satara Raja Daftar, Rumal No. 3.

करावी. त्याणी सरकारचा मतलब जाऊ न देता तयार करून वाचून दाखवावी. त्यावेळेस समक्ष असावे. कमजास्ती मजकूर असेल तो सांगत जावा".

"(२) फडणीस व दप्तरदार व चिटणीस व खजिना व स्वार सिबंदी न्यायाधिसी व सरसुभेदार व मामलेदार वगैरे व सरकारचे कामगार लोक आहेत त्याचे कामावर हमेशा नजर ठेऊन कोण काम कसे करितात चांगले काम कोणाचे आहे कोण बंदोबस्ताने काम चांगले आणि थोडक्यात करतात ते हमेशा पाहून सरकारात समजाऊन, आज्ञा होईल त्या प्रमाणे बंदोबस्त करित जावा".

"(३) येकास पत्र अगोदर दिल्हे त्या कामावद्दल पुन्हा पत्र देणे तरी लिहिला मजकूर समजोन घेऊन चौकसी चांगली करून नंतर पत्र देणे जाल्यास द्यावयाचे. याप्रमाणे चौकसीप्रमाणे पाहून सरकारात समजवावे".

"(४) सरसुभेदार व मामलेदार याजकडे हूकूम व जाहीरनामे सादर होतील त्यात हुकुमाप्रमाणे कोण कसा चालतो हुकूम जातील त्यात कामे लिहिली ती कोणत्या पेठ्यातील किती जाहाली होणे किती राहिली त्याविसी कोणी मजकूर कसा लिहिला आहे त्याचे मनन करून त्यास उत्तर पाठवावे कसे ते उलगडून ल्याहावयाचे. त्याची जुजरसी ज्याचेकडे जी कामे आहेत त्याणी पाहून समजून देत यावे त्याप्रमाणे सरकारात समजाऊन आज्ञा होईल त्याप्रमाणे बंदोवस्त करित जावा."

"(५) माहालानिहाय येथील जमाबंदी जाल्यावर कोणत्या माहालापोटी वसूल किती आला वाकी यावयाची किती राहिली ती राहावयाची सबब काय ते फडणीस व दप्तरदार याणी समजावीत जावे. याणी समजोन घेऊन वसूल करण्याची तजवीज करित जावी."

"(६) फडणिसीकडील कीर्दीवर व पोत्याचे सिलबंदावर येकुणात रोजचे रोज करीत जावी व पोत्याकडे सिलकेचे थैलीवर व खजिन्यावर मोहर करावी."

"(७) सरकार कामगार आहेत त्यातून चांगले काम कोणी केले त्याजवर मामलेदार व सरसुभेदार याणी नजर ठेऊन हमेशा तपसीलवार लिहित जावे. त्याच्या यादी याजपासी असाव्या."

चिटणीसी दरख कायमच राहिला. कार्यक्षेत्र कमी झाले इतकेच. फडणिशीचाहि जावता कायमच राहिला. सेनेचा फारसा संबंध राहिला नव्हता. न्यायाधिशीबद्दलचा या जावत्यातील एक उल्लेख महत्त्वाचा आहे. तो असा : "या मुलखात दस्तुर वहुत चांगला आहे की पडोसीराई मिलोन आपसात समजोन कजिया तोडीत हे चांगले आहे. त्यास पंचाईत केल्याशिवाय दुसरा काही विलाज नाही असे होईल तेव्हा पंचाईत करावी. परंतु जोपरियंत पंचाइतिशिवाय कजिया तोडावयाचा इलाज आहे तोपावेतो करावे. दस्तुर कायम राखावयाकरिता सरकारचे मनात कसे आहे त्याचा तपशील खाली कलमात लिहिला आहे." न्यायदानाबावतचा फार मोठा तपशील दिला आहे. परंतु तो येथे देऊन विस्तार करण्याचे कारण नाही.

अशाच तऱ्हेची कारभाराची पद्धती इतर संस्थानात त्या त्या रेसिडेंटांनी घालून दिली. इंग्रजी पद्धत लाविली नाही. याचे मुख्य कारण म्हणजे अधिकाराच्या पुष्कळच जागा वंशपरंपरेने चालत आल्या होत्या त्या तशाच पुढे चालवणे त्या त्या संस्थानांना भाग होते.

शिवाजी महाराजानी जुनी जहागिरदारी राज्यघटना मोडून नवीन घालून दिलेल्या राज्ययंत्रणेने जी तत्कालीन सामाजिक क्रांती घडवून आणली त्या क्रांतीचा विचार केला तर शिवाजी महाराजांच्या हिंदवी स्वराज्य संस्थापनेत व्यक्तिगत स्वार्थापेक्षा सुराज्याचा आदर्श निर्माण करण्याचीच महत्त्वाकांक्षा अधिक प्रबल होती असे म्हणणे भाग पडते.

**राज्यव्यवस्था मुलकी व सैनीकी :**

**शिवकाल.**—शिवकालीन राज्यव्यवस्थेत मुलकी व सैनिकी असे दोन विभाग होते. शिवाजी महाराजांनी राज्याभिषेकसमयी राज्यव्यवस्थेसाठी कानुजाबते (राज्यकारभाराची माहिती सांगणारे नियम) तयार केले. कानुजाबते म्हणजे लहानमोठें कारभार सुसूत्र सांगणारे पत्रक. राज्यकारभारासाठी महाराजांनी अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या.

अष्टप्रधानांमध्ये राजकीय कारभार विभागला होता. त्याचा थोडक्यात तपशील असा—

(१) **मुख्य प्रधान**—यांनी सर्व प्रशासन व्यवस्था पहावी. राजपत्रावर शिक्के उठविणे, युद्धप्रसंगी सेनेचे नेतृत्व करणे व सर्व सरदारांना सेनेसह युद्ध भूमीवर नेणे ही त्यांची मुख्य कामे होती; (२) **अमात्य**—यांनी सर्व राज्यातील जमाखर्च दप्तरदार, फडणीस यांच्या मदतीने पहावा. फडणिशी, चिटणिशी पत्रांवर निशाण करावे. प्रसंगी युद्धात सहभागी व्हावे; (३) **सचिव**—यांनी राजपत्रे शोध करून अधिक उणे अक्षर मजकूर शुद्ध करावे. राजपत्रावर चिन्ह संमत करावे. आमंत्रण, निमंत्रण वाकनिशी त्यांचे स्वाधीन करावी. राजपत्रावर संमत चिन्हे करणे; फौजेचे लोकांचे भले करावे; सर्व फौजेचे सरदार यांनी त्याजबरोबर चालावे; (४) **सेनापती**—याने सर्व सैन्य रक्षण करून युद्धप्रसंगी स्वारी करावी; (५) **पंडितराव**—यांनी सर्व धर्माधिकार धर्म, अधर्म पाहून चिकित्सा करावी. शिष्टांचे सत्कार करावे, आचार व्यवहार, प्रायश्चित्तपत्रे होतील त्यांवर संमत चिन्हे करावी. याशिवाय दानप्रसंग, शांती, अनुष्ठान तत्काली करवावे. (६) **न्यायाधिश**—यांनी सर्व राज्यातील न्याय, अन्याय मनास आणून बहुत धर्म करून न्याय करावे. न्यायाची निवाडपत्रे करून याजवर संमत चिन्ह करावे; (७) **सुमंत**—यांनी परराज्यातील विचार करावा. त्याचे वकील येतील, त्याचे सत्कार करावे. युद्धा प्रसंग करावे. राजपत्रांवर संमत चिन्ह करावे. सर्व अष्टप्रधानांनी तालुका स्वाधीन होईल, तो रक्षून हिशेब रुजू करून आज्ञेने वर्तावे. राज्यकारभार हा राजाचे

चिटणीस फडणिसादींच्या हातून होई परंतु त्याच्या कार्यावर मंत्र्यांची देखरेख ठेवून राजा करवून घेत होता.

राज्यकारभाराच्या जबाबदारीचे विकेंद्रीकरण जरी प्रधानमंडळ नेमून केले होते तरी कारभारविषयक कामकाजाच्या अंमलबजावणीची सूत्रे ठराविक फडणीस व चिटणीस या दोन कारभाऱ्यांचे हाती होती.

कार्यक्षम राज्यव्यवस्थेसाठी महाराजांनी आपल्या स्वराज्य मुलुखाचे तीन भाग पाडले व ते तीन मंत्र्यांच्या देखरेखीखाली दिले. मोरोपंत पिंगळे पंतप्रधान यांजकडे उत्तर कोकण, कल्याण-भिवंडी ते कोलवण-साल्हेर, बारा मावळ, लोहगड आणि जुन्नर हा प्रदेश; अण्णाजी दत्तो सचिव याजकडे चेऊल ते कोप्पल-पर्यंतचा दक्षिण कोकणमधील प्रदेश आणि दत्ताजी त्रिमल वाकनीस मंत्री यांजकडे देशावरील प्रदेश सोपविला. वरील तिन्ही विभागावर ह्या तीन मंत्र्यांचे जरी सर्वसाधारण नियंत्रण असले तरी ह्या तिन्ही विभागांची राज्ययंत्रणा सरसुभेदाराच्या हुकमतीखाली चाले.

ह्या सरसुभेदारांना मदतनीस म्हणून मुजुमदार (हिशेब), चिटणीस (पत्र-लेखक), दप्तरदार, फडणीस, सबनीस, पोतनीस इत्यादी कारकून मंडळी केंद्रातून नेमणुक होऊन मिळे. सुभेदारानी आपआपल्या प्रांतातील रयतेची सर्व प्रकारची काळजी घेतली पाहिजे असा दंडक होता "रयतेला काडीचा जरी उपद्रव झाला तरी महाराज तो सहन करणार नाहीत" असे सुभेदारांना कळविण्यात आले होते. अशा रितीने रयतेच्या कल्याणाची दक्षता हा कल्याण-कारी राजा घेत होता. राज्यकारभाराच्या सोईसाठी राज्याचा मुलूख १४ प्रांतात विभागलेला होता :

(१) मावळ म्हणजे मावळ, सासवड, जुन्नर, खेड आज हे तालुके आहेत. यांत मोठाले अठरा डोंगरी किल्ले असून त्यांच्याकडे या प्रांताच्या सरंक्षणाची जबाबदारी होती.

(२) वाई, सातारा, कऱ्हाड हे प्रांत हल्लीच्या सातारा जिल्ह्याच्या पश्चिमेकडील भाग, त्यांत बारा सरंक्षक किल्ले होते.

(३) प्रांत पन्हाळा-कोल्हापूरचा पश्चिम भाग, बासष्ट किल्यांसह;

(४) प्रांत दक्षिण कोकण रत्नागिरी, अठ्ठावन पहाडी व समुद्रकिनाऱ्याच्या किल्यांसह.

(५) प्रांत ठाणे-उत्तर कोकण जिल्हा-बारा किल्यांसह (६-७) प्रांत त्रिंबक आणि बागलाण नाशिक जिल्ह्याचा पश्चिम भाग बासष्ट किल्यांसह हा प्रदेश लष्करी ठाण्यानी व्यापलेला होता.

(८) प्रांत वानागड-धारवाड जिल्ह्याचा दक्षिण भाग बावीस किल्यांसह (९, १०, ११) बेदनूर, कोल्हार, श्रीरंगपट्टण, अर्वाचीन म्हैसूर अठरा किल्यांसह (१२) प्रांत कर्नाटक-कृष्णेच्या दक्षिणेस असलेल्या मद्रास

इलाख्याचे जे जिल्हे इंग्रजाना देण्यात आले ते अठरा किल्यांसह, (१३) प्रांत वेलोर-आजचा अर्काट जिल्हा, पंचवीस किल्यांसह आणि (१४) प्रांत तंजावर-सहा किल्यांसह.

गडावरून खाली मैदानी प्रदेश महाल आणि प्रांत यात विभागलेला असे. दोन किंवा तीन महालांचा एक सुभा किंवा जिल्हा बने. खेडचाचे पाटील कुळकर्णी किंवा जिल्ह्याचे देशमुख यांच्या हातात जमाबंदीचा कारभार मोगलांनी ठेवलेला होता. शिवाजीने ही व्यवस्था सोडून सुभेदार किंवा सुभ्याचे किंवा महालाचे महालकरी यांच्या मार्फत जमाबंदीचे काम घेण्याची नवी व्यवस्था अमलात आणली. दोन किंवा तीन खेडचांच्या समूहाची व्यवस्था कमाविसदाराकडे असे.

शिवाजीने कमाविसदार, महालकरी, सुभेदार यांना पगार देऊन चाकरी घेण्याचे केले. सुभेदाराचा पगार वर्षास सुमारे चारशे होन म्हणजे दरमहा शंभर रुपये असे. हवालदारास पन्नास रुपये, हिशेबनिसास सुमारे रु. ३० दरमहा वेतन मिळे. जिल्हाधिकाऱ्यांचे काम मुलुखात शांतता राखणे व वसूल गोळा करणे हे होते.

जिल्ह्याच्या मुलकी कारभाराची व्यवस्था साहजीकच केंद्रीय अधिकारी पंत अमात्य म्हणजे फडणीस आणि पंतसचिव म्हणजे आजचे अकौंटंट जनरल व ऑडीटर या दोन अधिकाऱ्यांच्या नियंत्रणाखाली होती. जिल्ह्याचे हिशेब या दोन अधिकाऱ्यांकडे पाठवावे लागत. तेथे ते एकत्र करून त्यांत नियमबाह्य दोष आढळल्यास अपराध्याला शिक्षा दिली जात असे. ह्या अधिकाऱ्यांना जिल्हा कामगारांचे काम कसे चालते हे पाहण्यासाठी आपल्या हाताखालची माणसे पाठविण्याची मुखत्यारी होती. पेशव्याच्या खालोखाल पंत अमात्य व पंत सचिव हेच दोन मोठे मुलकी अधिकारी होते. जमाबंदीच्या कर्तव्याबरोबर त्यांच्याकडे लष्करी अधिकारही होते.

राज्यातील जमाखर्च दप्तरदार फडणीस यांचे स्वाधीन होता. सर्व तऱ्हेच्या खर्चाला परवानगी देणारा म्हणजे मुजूमदार. त्याने राजाच्या हुकुमाप्रमाणे फडणिसांकडे देण्याघेण्याचे व्यवहार येतील त्यांची चौकशी ठेवून अंमलबजावणीस मार्गदर्शन करणे, अंमलबजावणी करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांना अगदी हल्लीच्या पद्धतीप्रमाणे अर्थखात्याची अनुमती आवश्यक होती. तशीच शिवशाहीत फडणिसाच्या लेखी मान्यतेची आवश्यकता असे. तत्कालीन परिस्थितीप्रमाणे सरकारी सत्तेची अंमलबजावणी करणाऱ्या चिटणिशी व फडणिशी अशा दोन मुख्य शाखा होत्या. सेनासमुदाय हा राज्याचा तिसरा मुख्य घटक होता.

**राज्य व्यवस्था शिवकाल–सैनिकी :**

शिवकालीन राज्यव्यवस्थेच्या लष्करी विभागाची माहिती अशी :— लष्करात पायदळ, घोडदळ, खाशा स्वारीबरोबर असणारे लोक, स्वराज्यातील

किल्ल्यांचा बंदोबस्त, किल्ल्यातील डोंगरांचा व त्यांच्या पायथ्यांचा बंदोबस्त, तोफखाना आणि आरमार यांचा प्रामुख्याने समावेश होई. शिपायांस व नायकांस दरमहा एक, दोन किंवा तीन होन पगार असे. जुमलेदारास वर्षाची शंभर होन तैनात असे. हजारी सरदारांस पाचशे होन तैनात असे. पांच-हजारीस सालीना अडीच हजार होन तैनात असून शिवाय त्याला सरकारकडून पालखी, अबदागीर वगैरे नेमणूक असे.

घोडदळात बारगीर व शिलेदार असे दोन प्रकार असत. बारगिराचा घोडा आणि सामान सरकारी असे. घोडदळास पागा अशी संज्ञा असे. पागेतील सगळी घोडी सरकारी असत व सरकारमार्फत त्यांची देखभाल होई. शिलेदार स्वतःचे घोडे आणी. त्यांची निगा स्वतःच राखी. हत्यारे व सामान स्वतःचेच असे. याकरिता त्यास सरकारकडून वेतन मिळे.

पायदळात दहा माणसांचा एक दाहिजा केलेला असे, त्यावर एक नाईक मुख्य असे, अशा पाच नाईकावर एक हवालदार असे किंवा पंचवीस बारगीर किंवा शिलेदार यांजवर एक हवालदार असे. पाच हवालदारांवर एक जुमलेदार, पाच जुमलेदारांवर एक सुभेदार व दहा सुभेदारांवर एक पाच हजारी असे. हे सगळे सुभेदार व पाच हजारी सरनोबतच्या हुकुमात असत. घोडदळाचा सरनोबत अर्थात निराळा असे. पंचवीस घोड्यांस एक पखाली व एक नालबंद असे.

या लष्कराशिवाय महाराजांनी स्वतःच्या रक्षणासाठी खास विश्वासातील असे पाच हजार जिलिबीचे लोक सतत स्वारीबरोबर राहण्यासाठी ठेविले होते. त्यांचे तीस, चाळीस, साठ, शंभर असे जथ्थे करून त्यांजवर चांगले शूर मर्द व इमानी सरदार नेमत. ह्याशिवाय आणखी दोनशे उमदी घोडी खाशांसाठी म्हणून निराळी होती.. प्रत्येक सुभेदाराच्या व हजारी सरदारांच्या हाताखाली एक ब्राह्मण सबनीस व प्रभू कारखानीस असे हुद्देदार होते. ह्या हुद्देदारांच्या हाताखाली कमी जास्त कारकून असत.

**किल्ल्यांची व्यवस्था** : महाराजांच्या ताब्यात काही जुने व काही नव्याने बांधलेले सुमारे २४० किल्ले होते. हे किल्ले बहुश: अवघड डोंगरावर, राज्यास बळकटी आणण्यासाठी व राज्याच्या रक्षणासाठी होते.

प्रत्येक किल्यावर हवालदार, सबनीस, आणि कारखानीस असे तीन प्रमुख अधिकारी काम करीत असत. हवालदाराच्या हाताखाली एक वा अधिक तटसरनोबत असत. हवालदाराकडे किल्यांचा एकंदर कारभार असे. गडाच्या किल्या हवालदाराच्या ताब्यात असत. किल्यांवरील हवालदाराच्या नेमणुका प्रत्यक्ष शिवाजी महाराज करीत असत. प्रत्येक किल्यावरील शिबंदी हवालदाराच्या ताब्यात असे.

महाराजांपाशी तोफखाना होता. प्रत्येक किल्यावर तोफा ठवलेल्या असत. शिवाय लष्कराबरोबर चालविण्यासाठी सुमारे दोनशे तोफा गाड्यांवर घातलेल्या

असत. तोफखान्यावरील गोलंदाजाला सालिना ३० पौंड [१ पौंड=१०रुपये] म्हणजे ३०० रु. किंवा मासिक रु. २५ पगार असे.

**आरमार :** राज्याच्या सुरक्षिततेसाठी जसे लष्कर आवश्यक तसेच समुद्र किनारा व समुद्र व्यापार यांच्या संरक्षणासाठी शिवाजी महाराजांना आरमार आवश्यक वाटले. या गरजेतूनच मराठ्यांचे आरमार उदयास आले. शिवाजी महाराजांकडे इंग्रज लोकांच्या म्हणण्याप्रमाणे १६६५ मध्ये ३० पासून १५० टन आकाराची लहान मोठी ८५ गलबते व ३ मोठ्या डोलकाठ्यांच्या गुराबा अशी जहाजे होती. ती ६६ पर्यंत वाढली होती. या सर्व आरमारांवर ५००० पर्यन्त लोक होते. त्यांजवर मुख्याधिपती म्हणून सुभेदार असे. आरमारासंबंधी कामे कारखानीस व सबनीस यांच्या मार्फत होत. आरमाराचा सर्व खर्च महालोमहालीचे अधिकाऱ्यांकडून शासकीय कोषागार व कोठारे यांतून होई. समुद्रातील आरमाराच्या साहित्याकडे शिवाजी महाराजांचे विशेष लक्ष असे. जहाजावरील खलाशांना मासिक तीन होन, सुभेदारास ३,००० होन वार्षिक वेतन असे. इतर अधिकाऱ्यांना त्यांच्या श्रेणी प्रमाणेच दोन हजार, एक हजार व पाचशे होन असे वार्षिक वेतन होते

**जमीन महसूल व्यवस्था—शिवकाल :** (१) शिवकालात मुख्य उत्पन्न शेतीपासूनचे असे. म्हणून स्वराज्यात शेतकऱ्यास प्राधान्य होते. शेतकऱ्याची सर्व प्रकारची सोय करावी अशा आज्ञा सुभेदारांना असत. शिवकालात स्वराज्यातील जमिनीची मोजणी करून सारा आकारला जात असे, त्या काली सारा आकारणी करण्याचे तीन प्रयत्न झाले. प्रथम दादोजी कोंडदेव यानी पुणे, मुठे, मावळ, या भागात केला. दुसरा प्रयत्न मोरो त्रिमल पिंगळे पंतप्रधान यांनी केला. व तिसरा महत्त्वाचा पद्धतशीर प्रयत्न अण्णाजी दत्तो सुरनीस या अर्थमंत्र्याने केला. त्याने कोकण विभागाची सारा आकारणी केली. आणि सरकारी दस्त ठरविला. शिवाजी महाराजांच्या इतर मंत्र्यानीही राज्यातील इतर प्रांत विभागातील जमिनीची पहाणी करून सारा आकारणी केली.

जमिनी वा सारा निश्चित करण्यापूर्वी जमिनीची मोजणी होत असे. त्यास बिघावणी, चावराण अथवा चकबंदी असे म्हणतात. बिघावणी झाल्यावर लागवडीखाली असलेल्या गावच्या जमिनीची प्रतवारी ठरे. त्यांत कोणते पीक येते, एक पीक येते की दोन पिके येतात आणि प्रत्येक बिघ्यांत साधारणपणे किती पीक येते व किती उत्पन्न येते याची माहिती गोळा केली जाई. ह्या प्रकारास "पीक पहाणी" असे म्हणतात. प्रत्येक गावच्या अशा नोंदी करून परगण्याचे संपूर्ण अंदाजपत्रक अर्थमंत्र्यांकडे छाननीसाठी पाठवावे लागे. अर्थमंत्री चाचणी घेऊन, परीक्षा करून जे अंदाज करतील त्याची गावकऱ्यांनी पाठविलेल्या पत्रकाशी तुलना केली जाई. व अर्थमंत्र्यांच्या आदेशाप्रमाणे वसूल निर्णय केला जाई ; याला सारा आकारणी असे म्हणतात. बिघावणी, पीक पहाणी व सारा आकारणी हे महसूल पद्धतीतील तीन महत्वाचे टप्पे

होत. सारा आकारणीचे काम अण्णाजी दत्तोने देशमुख, देशपांडे हे परगण्याचे अधिकारी आणि गावकरी यांजकडे सूपूर्द केले होते. डॉ. बाळकृष्णांनी अण्णाजी दत्तोच्या सारा आकारणी पद्धतीला लोकांची धारा पद्धती असे म्हटले आहे. सारा आकारणीसाठी गावच्या लागवडीखाली असलेली जमीन तेवढीच विचारात घेतली जात असे. प्रत्येक विघ्यामागे सरकारी साऱ्याचे प्रमाण ठरविले जाई. विघ्यास पिकाचा आकार करून पाच तक्षिमा (भाग) पिकाचे करून तीन तक्षिमा रयतेस द्याव्या, दोन तक्षिमा दिवाणात द्याव्या याप्रमाणे रयतेपासून घ्यावे अशी पद्धत होती. मलिकंबरच्या काळातही २/५ ची पद्धत रूढ होती. त्याने नंतरच्या काळात नख्त रुपाने वसूल घेण्यास प्रारंभ केला. आणि उत्पन्नाच्या किंमतीच्या १/३ भाग हा सरकारी सारा ठरविला. नव्याने लागवडीखाली येणाऱ्या जमिनीवर "इस्तावा" पद्धतीने सुरवातीच्या काही वर्षात सारा आकारणी केली जात असे.

शिवाजी महाराजांच्या काळात नख्त आणि जिन्नसी अशा दोन्ही स्वरुपात वसूल घेतला जाई आणि हे दोन्ही मिळून साऱ्याचे प्रमाण बहुधा उत्पन्नाच्या २/५ इतके असावे. नख्त आकार हा सामान्यतः बागाईत जमिनीतील पिकांवर आकारला जात होता. पैसे घेऊन हे जिन्नस शेतकरी बाजारात विकत असल्याने नख्त रुपाने सारा देणे त्यांना कठीण जात नसावे. ऊस, सूंठ, हळद, भाजीपाले, फळफळावळ यावर नख्त दर आकारल्याचे दिसून येते. इ. स. १६६७ सालापासून शिवाजी राजानी आपल्या मुलखात बटाईचा अंमल सुरू केला. बटाई म्हणजे उत्पन्नाचा निम्मा भाग. पण बटाईचा तह ज्या भागात असेल तेथे शेतकऱ्यांवर इतर सरकारी कर लादले जात नसत.

**मराठामंडळ अंतर्भूत निरनिराळे मराठे सरदार, छत्रपती व पेशवे ह्यांचे एकमेकांशी असलेले संबंध :**

शिवाजी महाराजांनी मुख्यतः मोगल, कुतुबशाही व आदिलशाही यांची सत्ता झुगारून स्वराज्य स्थापिले. तेंव्हापासून शाहूकालाच्या सुरवातीपर्यंत मराठ्यांचे सार्वभौम राज्य एका छत्रपतीच्या अधिपत्याखाली राहिले. शाहू महाराजांच्या कारकिर्दीत बाळाजी विश्वनाथ यांनी मोठ्या हिंमतीने शाहू महाराजांची बाजू राखून मोगलांना मदत करून त्या मोबदल्यात बादशहाकडून अधिकृतरित्या स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा इ. स. १७१९ मध्ये मिळविल्या.

शिवपूर्वकाळांत घाटगे, निंबाळकर, डफळे, सावंतवाडीकर भोसले आदी मराठे देशमुख महाराष्ट्रात होते. ह्या देशमुखांनी सरकारने ठरविलेला दस्त वसूल करण्याचा व आपली मेहनत म्हणून त्या महसुलाचा हिस्सा स्वतःस राखून बाकी सरकारी तिजोरीत जमा करावयाचा हे एक काम व देशात शांतता व सुव्यवस्था राखणे हे दुसरे काम.

शिवाजी महाराजांची राज्ययंत्रणा म्हणजे तत्कालीन राजकीय व सामाजिक आचार धर्मात क्रांतीच होय. शिवाजी महाराजांची अष्टप्रधान परंपरा

सामान्यतः शाहू महाराजांच्या मृत्युपर्यंन्त कायम राखली गेली. कालमानाप्रमाणे राणी येसूबाईसाहेबाकडे जे अंतर्गत राज्यव्यवस्थेसाठी प्रतिनिधी उत्पन्न केले होते, त्यांची पर्दासिद्ध योजना जाणत्या युवराजाच्या अभावी राणी येसूबाईसाहेबानीच राजारामास पूर्णमंचकारोहण करतांना निराळी करून प्रल्हाद निराजीस हे पद दिले. त्यानंतर पूर्वीच्या अष्टप्रधानांत प्रतिनिधीपदाची भर पडली. राजाराम जिंजीकडे गेल्यावर कारभार राजमंडळातर्फे करण्याची प्रथा पडली. राजारामाच्या गैरहजेरीत दोन राजमंडळे काम करीत होती. एक जिंजीस व दुसरे पन्हाळगडी. जे प्रधान जिंजीच्या राजमंडळावर हजर नसत त्या ठिकाणी त्यांचे जागी त्यांचे कारभारी प्रतिनिधित्व करीत असत. महाराष्ट्रातील राजमंडळावर येथील प्रधानांच्या सुभ्यावरील अंमलदार "सभासद" म्हणून हजर राहून काम विल्हेस लावीत. राजाराम महाराज परत आल्यावरही हा "राजमंडळाचा" कारभार चालूच राहिला. तो पुढे शाहूच्या कारकीर्दीतही चालू होता.

पेशवे सनदा घेऊन सातार्‍यास आल्यावर वसुलीच्या बंदोबस्तासाठी काही नवीन कायदे शाहू महाराजांना करावे लागले. दक्षिणेतील सहा सुभ्यांची सरदेशमुखी सनदेने महाराजांस मिळाली. सरदेशमुखी ही छत्रपतींची मिळकत होती. जो ऐन वसूल होईल, त्यापैकी शेकडा १० टक्के प्रमाणे सरदेशमुखीचा वसूल राजाकडे व बाकीचा सरकार खजिन्याकडे जाई. ज्या मुलखातून चौथाई वसूल होत असे त्या मुलखावर मराठे सरदार चौथाई गोळा करण्यासाठी स्वारी करीत. जितका ऐवज मिळवता येईल तेवढा घेऊन बाकी ऐवज आपल्या सरकारकडे येणे राहील त्याच्या वसुलीसाठी दुसर्‍या वर्षी मुलुखगिरी करण्याचा प्रघात पडला. स्वार्‍या करून जो मुलुख स्वराज्यात आला त्याच्या वसुलाचा जो चौथ तिला राजाची बाबती (राजबाबती) असे नांव दऊन तो राजाचा हक्क ठरविला. ही रक्कम राजाच्या खर्चास द्यावयाचे असे ठरले. बाकी तीन हिस्से राहीले त्यास मोकासा नाव दिले. ह्या मोकाशांतून साहोत्रा (शेकडा ६ रुपये) व नाडगौडा (शेकडा ३ रुपये) या नावे दोन हक्क राजाने आपल्या मर्जीनुसार कोणाही सरदारास लावून द्यावे असा नियम केला. त्यामुळे राजबाबती (२५), साहोत्रा (६), नाडगौडा (३) एवढ्या हक्कांचा वसूल ३४ टक्के काढल्यावर बाकी राहीलेला (१००—३४) ६६ टक्के वसूल हा निव्वळ मोकासा म्हणून मराठी तिजोरीत जमा करावयाचा असे ठरले. हा ६६ टक्के वसुलाचा मुलूख निरनिराळ्या सरदारांस जहागिरीदाखल वाटून द्यावा असे ठरले. अशा मुलुखगिरीसाठी निरनिराळे प्रदेश निरनिराळ्या सरदारांस वाटून देण्यात आले. अशा रितीने मोगल प्रदेशांतून चौथाई वसूल करण्याच्या निमित्ताने मुलूखगिरी, स्वार्‍या सुरू झाल्या. ज्या ज्या सरदारांनी जो जो प्रदेश जिंकला त्यांना तो प्रदेश सरंजामास लावून दिला. असे सरंजामदार शिंदे, होळकर, पवार, गायकवाड, नागपूरकर भोसले हे आपापल्या प्रदेशाचे कालांतराने सत्ताधीश बनले. त्यांनी आपापल्या राज्यात स्वतःचे नाणे सुरू केले, इनामे दिली. अशा रितीने जवळजवळ

सबंध हिंदुस्थान मराठी सत्तेखाली आला. ह्या सर्व सरदारांचे मराठा मंडळ बनले. हे मंडळ शाहू महाराज जिवंत असेपर्यंत त्यांना जबाबदार राहिले. ज्या राजेरजवाड्यांनी आपल्या मुलुखात मराठ्यांस चौथाई वसूल करण्याचे हक्क दिले त्यांचे परचक्रापासून संरक्षण करण्याची हमी मराठ्यांनी स्वीकारली. याचा अर्थ जी श्रेष्ठ सत्ता कमकुवत सत्तेच्या जोखडाखालील प्रजाजनांकडून चौथाई वसूल करते ती सत्ता सर्वश्रेष्ठ व सार्वभौम होय. आपल्या पराक्रमाने मोठमोठ्या विस्ताराचे जिंकलेले प्रदेश त्या त्या सरदारांस जहागिर म्हणून देऊन टाकण्याचा प्रघात पेशव्यांनी पाडला.

सरदारांच्या स्वाधीन जो मुलूख जहागिर म्हणून करण्यांत आला होता त्यावर पेशवे अंशतः हुकूमत चालवित. त्यांचे हिशेब पेशवे तपासीत, त्यांच्या मुलुखातील काही महत्वाच्या अधिकाऱ्यांची नेमणूक पेशवे करीत. सरदारांचा वारसा हक्क पेशवे ठरवीत ; व सरदारांच्या भाऊबंदकीचा तंटा लागला वा इतर काही बखेडा माजला, तर त्यांच्या महालांची जप्तीही पेशवे करीत.

शाहू छत्रपतीनंतरचे साताऱ्याचे छत्रपती निर्माल्यवत् झाले होते. तरी बाह्यतः त्यांचा इतमाम गादीच्या धन्यासारखा होता. सातारच्या छोट्या राज्याच्या हद्दीत सर्वाधिकार व अखत्यारी महाराजांची होती. नवा पेशवा नेमणे झाल्यास त्यास अधिकाराची वस्त्रे सातारच्या महाराजांकडून मिळत. अशी वस्त्रे घेतल्याशिवाय पेशव्याच्या अधिकारास तात्विक दृष्ट्या कायदेशीरपणा येत नसे. वसईच्या तहानंतर दुसऱ्या बाजीरावास इंग्रजानी गादीवर बसविले, तथापी वस्त्रे सातारकर महाराजांकडून घ्यावी लागली. पेशवे पुण्यास राजे असले, तरी सातारच्या हद्दीत गेले म्हणजे ते नोकरच ठरत व आपले नोकराचे नाते समजून ते मर्यादेनेच वागत. फौजेसह पेशवे साताऱ्यास आले, तर सातारच्या हद्दीत त्यांची नौबत वाजण्याची बंद होऊन ते हत्तीवरून किंवा पालखीतून उतरून पायी चालत व रुमालाने हात बांधून ते महाराजांच्या दर्शनास जात व त्यांच्या पुढे साध्या बैठकीवर बसत. भेटीचे वेळी ते महाराजांस रीतीप्रमाणे नजर करीत. ते आपल्या हातात मोर्चेल घेऊन वारीत व कधीकधी महाराजांमागे खवासखान्यातही बसत.

युद्ध किंवा तह करणे, दौलतीचे अष्टप्रधानांनासुद्धा सर्व अधिकारी नेमणे त्यांना वस्त्रे व शिक्कामोर्तब देणे, सरदार लोकांस स्वारीवर व मुलुखगिरीवर पाठविणे किंवा परत बोलाविणे, इनाम, इतमाम, सरंजाम, नेमणुकी, धर्मादाय, देणगी, वंशपरंपरागत कामगिरी, बहाली, बडतर्फी तात्पर्य हरएक बाबतीत सनदा किंवा तसे महत्वाचे कागदपत्रे देणे, हे सर्व सातारकर छत्रपतींच्या अखत्यारीतील असून पेशवे जरी ह्या सर्व बाबतीत शिफारशी करीत व सल्ला मसलत देत, तरी महाराजांनी कोणतीही गोष्ट मान्य केल्याशिवाय ती अंमलात येत नसे. शिक्कामोर्तब होणे ते छत्रपतींच्या आज्ञेने व दखलगिरीने होत असे. खुद्द पेशव्यांकडून अगर पेशव्यांमार्फत कामकाज लिहून जाई ते त्यांजकडून महाराजांस समजाविले जाई व त्यांच्या आज्ञेनुरूप हुकूम सुटत. वरील

हरएक बाबतीत पेशवे हे सांगतील किंवा सल्ला देतील त्याप्रमाणेच महाराज प्रायः हुकूम देत.

शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेच्या वेळी राजा व अष्टप्रधान एवढीच राज्याची अंगे होती. राज्य एकसत्तात्मक असून अष्टप्रधान हे सल्ला देणारे व जबाबदारीनें काम करणारें सेवक होते. शाहू महाराजांच्या कारकीर्दीत सरंजामी सरदारांकडे आपआपल्या प्रांतातील दिवाणी, मुलकी व लष्करी व्यवस्था असे. ही व्यवस्था करून उरलेली पण आगाऊ कराराने ठरलेली रक्कम त्यांनी छत्रपतींना द्यावयाची असे.

राज्यविस्तार होण्यास सुरवात झाल्यामुळेच सरंजामी सरदारकीची सुरुवात झाली. शिंदे, होळकर, गायकवाड हे मराठ्यांच्या दौलतीचे नोकर होते. त्यांनी जहागिरीचे व सरंजामीचे हिशेब दरवर्षी पेशव्यांच्या फडात दाखल करण्याचा शिरस्ता होता. नव्या सरदारास सरदारकी देण्याचा प्रश्न उद्भवल्यास त्याजकडून नजराणा घेऊन सरदारकीची वस्त्रे सातारा महाराजांकडून पेशवे देववीत.

सरदारांच्या सैन्याची गणती करणे व सैन्याच्या खर्चाचा हिशेब ठेवणे हे काम पेशव्यांनी नेमलेला बक्षी करीत असे. बक्षीला आपले हिशेब फडणिसाकडे मध्यवर्ती फडात द्यावें लागत. सैन्य खर्चासाठी रक्कम उभी करणे, स्वाऱ्यांचे हिशेब मिळाल्यावर जी प्राप्ती होई त्यापैकी कारकुनास किती द्यावयाचे, फडणिसांनी किती घ्यावयाचे व सरकारांत किती द्यावयाचे हे ठरलेले असे. तहाच्या अटी बनवाव्या, पेशव्यानी यावर मखलाशी करावी व साताऱ्या छत्रपतींचे त्यावर शिक्का मोर्तब व्हावे, असा चौतंत्री कारभार असे व प्रत्येकाला चार तंत्रे सांभाळावी लागत व ती आदरपूर्वक सांभाळली जात.

**मराठा मंडळातील ऐक्य भावना.**—मराठी राज्यांत पदे व सरदारक्या आनुवंशिक पद्धतीने चालत असल्या तरी वंश नाकर्ता निघाल्यास त्याला नामधारी बनवून, कर्त्या माणसांच्या हाती सत्ता जाई. या पद्धतीने भोसले घराण्यातून सत्ता पेशव्यांकडे गेली आणि पुढे पेशवा दुर्बल निघाल्यावर तीच सत्ता नाना फडणीस व महादजी शिंदे यांच्याकडे गेली. अशा रीतीनें सत्तेचे संक्रमण रक्तपात न होता होऊ शकलें. त्याच प्रमाणे अष्टप्रधान पदे जाऊन बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून संघटना पद्धती (Confederacy) असल्यामुळे स्वराज्याचे साम्राज्य झाले व चार पेशवे कर्तृत्ववान निघाल्यामुळे सत्ता केंद्रीभूत होऊ लागली. शिंदे यानी दिल्ली बादशाहीची सूत्रे हाती घेतली व अहिल्याबाईनी माळव्यात सत्ता कायम केली. तेव्हा मराठी साम्राज्याच्या सत्तेची केंद्रे तीन ठिकाणी झाली. शिंदे, होळकर, हे पुणे दरबाराशी नावाने अंकित पण व्यवहारातः बरोबरीचे नाते सांगत होते. याचा अर्थ तेव्हाही घटना ब्रिटिश साम्राज्यात बरोबरीच्या नात्याने वागणाऱ्या वसाहतींच्या धर्तीची (Commonwealth) होती. या वेळच्या मराठमंडळात बरोबरीच्या नात्यात शिंदे, होळकर होते, पण त्यांच्यात ऐक्याची भावना कायम होती.

दुसऱ्या बाजीरावाच्या वेळी देखील तो नाकर्ता निघाल्यामुळे त्याला नामधारी बनवून एखाद्या कर्त्या माणसाने सत्ता हाती घेतली असती, पण वेलस्लीने मध्ये पडून पुणे दरबारचा इतर सरदारांशी संबंध तोडला व नाकर्त्याच्या हाती सत्ता रहावी, असे घडवून आणले.

**पेशवे व सरदार यांचे संबंध**.—शाहू महाराजांच्या पश्चात छत्रपतींची सत्ता पेशवे गाजवू लागले. शिंदे, होळकर, पवार, हे पेशव्यांचे सरदार. हे सरदार व पेशवे यांचे संबंध पेशवे सातारकरांसारखेच राहिले. कारण सातारकर छत्रपती दरवर्षी वरील सरदारांना त्यांच्या जहागिरी सांभाळण्याकरिता इ. स. १८०३ नंतरही सनदा देतांना आढळतात. शिंदे, होळकर, व गायकवाड यांच्या सरंजामी मुलुखात लहानमोठे जमीनदार, जहागिरदार, भाट, चारण, मुखिये होते. त्यांजकडून मराठे सत्ताधीशांस खंडणी घेतांना खंडणी मिळत असे. परंतु तिचा वसूल मुलुखगिरी फौज गेल्यावरच होत असे. त्यांजकडून खंडणी घेतांना खालील हक्क वापरलेले दिसतात :

(१) गादीचा वारस ठरविणे व नजराणा घेणे.

(२) एखाद्या संस्थानाची खंडणी बाकी थकल्यास, आर्थिक हलाखी दिसून आल्यास वा संस्थानात निर्णायकी माजल्यास, संस्थानिक राज्यकारभार हाकण्यास असमर्थ असल्यास त्या संस्थानाचा कारभार स्वतःच्या देखरेखीखाली घेणे व सुरळीत चालविणे.

(३) जमीनदारांमधील व त्यांचे अवलंबित असतील, त्यांजकडील आपसातील तंटे मिटविणे, गावच्या मक्तेदारांना आश्रय देणे आणि त्यांच्याकरिता समेट घडवून आणला असेल व अभय दिले असेल तर त्याच्याकडून नजराणा घेणे.

(४) संस्थानिकाच्या मुलखात बंड उद्‌भविल्यास त्याचा बीमोड करणे व त्या कामगिरीकरिता खंडणी घेणे.

(५) मराठा सरदारांचे सैन्य त्या प्रांतात असता, त्याचा अपमान झाल्यास आगळीक करणाऱ्याला शिक्षा करणे.

(६) एखाद्या संस्थानिकाने आपल्या प्रजाजनांची संपत्ती लुटल्यास त्याची चौकशी करून त्यास नुकसान भरपाई देणे.

(७) गुन्हेगार पकडले असता संस्थानिकाच्या दुबळेपणामुळे एखादा संस्थानिक त्या गुन्हेगारास शिक्षा करण्यास असमर्थ असेल तर त्याला शिक्षा करणे.

(८) परकीय चाचेगिरीचा बंदोबस्त करणे, दुधपिती पद्धत बंद करणे आणि दुष्काळात मदत करणे.

वरील हक्कांचा वापर मराठे सरदार आपले मांडलीक जमीनदार व सरंजामदारांच्या बाबतीत करीत. अशीच वागणूक पेशवे आपल्या सरदारांच्या बाबतीत देत.

**मुलकी कारभार--राजकीय विभाग व त्यावरील अधिकारी :**

शिवकालात ठाणे हा सर्वात लहान राजकीय विभाग होता. देशमुखांकडे अनेक ठाणी, कर्यात असत, त्यास (संमत) तर्फ म्हणत. अनेक तर्फ मिळून एक परगणा बने. हवालदार हा परगण्याचा अधिकारी. परगण्यातील वसुलाच्या बाबी, दिवाणी फौजदारी स्वरुपाचे दावे आणि राजकीय उलाढाली यांवर हवालदाराची देखरेख असे. परगण्याच्या व्यवस्थेकरिता हवालदाराच्या हाताखाली शिपायांची तुकडी असे. या तुकडीचे अंमलदार नाईकवाडी या नावाने ओळखले जात. गाववतनदार व परगणे वतनदार आपली कामे कशी करतात ते हवालदार पाही.

अनेक हवालदारांवर सुभेदार हा वरिष्ठ अंमलदार असे. याचा प्रदेश तो सुभा; सुभेदार म्हणजे देशाधिकारी. सुभेदाराला देशलेखक असून त्याच्याजवळ शिबंदीही असे. त्याला चिटणीस, दप्तरदार, पोतनीस, सभासद वगैरे निरनिराळ्या हिशेबी विभागांच्या कामाकरिता कारकून असत.

सुभेदाराच्या वरचा अधिकारी तो सरसुभेदार. त्याचा देशी प्रतिशब्द मुख्य देशाधिकारी. शिवकालात पाच सरसुभेदार होते.

पेशवाईत मुलकी कारभाराच्या सोईसाठी जे विभाग केले होते त्यातील गाव (मौजे) हा सगळ्यात धाकटा विभाग होता. त्याचे मुख्य मुलकी अधिकारी पाटील व कुलकर्णी. मौज्याचा वरचा विभाग तर्फ. त्यावरील अधिकारी तरफदार. परगण्यावरील अधिकारी जो मामलेदार त्याच्या ताब्यात तरफदार असे. कमाविसदार हा स्वतंत्र अधिकारी महसूल गोळा करणारा म्हणून वावरत असलेला दिसतो. नवीन प्रदेश जिंकून तो मराठी राज्यास जोडल्यावर त्याचा बंदोबस्त करण्यात ज्या अधिकाऱ्यास नेमीत असत त्यास मामलेदार म्हणत. लहान कमाविसदार मामलेदाराच्या अंकित असत. काही परगणे किंवा तालुके मिळून होणाऱ्या विभागास प्रांत म्हणत. प्रांतावरील मुलकी अधिकाऱ्यास सुभेदार किंवा सरसुभेदार म्हणत. पाटील, कुलकर्णी हे वतनी अधिकारी गावाचा वसूल गोळा करीत. त्यांचे मदतीस चौगुला, पोतदार व महार असे वतनी नोकर असत.

पाटील, कुलकर्णी गावात जमविलेला पैसा देशमुख व देशपांडे यांच्याकडे पाठवीत. शेत सारा वसूल होण्याचे बाबतीत अधिकार चालवायचा देशमुखाने व देशमुखाच्या अधिकाराने वसूल झाल्यावर त्याचा हिशेब ठेवावयाचा देशपांड्यांनी; त्याचे नोकर म्हणून हिशेबनीस व जबाब लिहिणार फडणीस अशी देशमुखाच्या कचेरीतील कामाची व्यवस्था होती. पाटील, कुलकर्ण्यांचा वरचा मुलकी अधिकारी मामलेदार. तो पगारी असे. त्यांस सालीना पाच हजारापर्यंत तनखा मिळे. त्याच्या हाताखाली शिबंदी असे. मामलेदार कचेरीत दिवाण नावाचा एक दुय्यम अधिकारी असे. तो आपला शेरा मामलेदाराच्या शेजारी करी. हिशेब तपासणिसाचे काम मुजुमदार करीत असे.

फडणीस सनदापत्रे नोंदवी. या सर्वांना वतनाखेरीज तनखा मिळे. तो सामान्यतः सालीना असे. तो असा :—दिवाणाला रु. ५९०, मुजुमदाराला रु. ४९०, फडणीस रु. ६१०, दप्तरदार रु. २००, चिटणीस रु. १००. वसुलाच्या बाबतीत मामलेदारास मदत करण्यासाठी ह्या अधिकाऱ्यांची नेमणूक तालुक्याच्या लहान लहान विभागात केलेली असे. हे अधिकारी आपल्या विभागातील गावी जाऊन पाटील कुलकर्ण्यांच्या मदतीने वसुलाची अंदाजपत्रके आगाऊ तयार करीत. वर्षअखेर वसुली झाल्यावर मामलेदार वसुली हिशेबाचे कागद पेशवे सरकारकडे सुभेदारामार्फत पाठवी. त्याच्या कागदावर देशमुखाचा शेरा असे.

कमाविसदार, मामलेदार व सरसुभेदार यांच्या नेमणुका, बदल्या व बडतर्फी पुणे दरबाराकडून होत असत. कमाविसदार व मामलेदार यांचा सरकारातून चांगला मानमरातब ठेवण्यांत येई. त्यांच्या तैनातीस चोपदार, दिवटया अबदागिऱ्या असत. त्यांचे वेतन सामान्यतः चोपदार द. म. रु. ३, दिवटया दरमहा रु. ४, व अबदागिऱ्या दरमहा रु. ५ असे. कमाविसदारास रहावयाची घरे जरुर त्या ठिकाणी सरकारातून मिळत. अशा रीतीने मराठ्यांच्या मुलकी खात्यात एका टोकाला पाटील कुलकर्णी व दुसऱ्या टोकाला पुणे दरबार होता.

**पोलीस.**—आज जसा खेड्यात पोलीस नाही तद्वतच मराठेकालीन खेड्यात पोलीस नसे, त्या काळी प्रत्येक खेडे आपापल्या संरक्षणासाठी तजवीज करी. लोकांच्या संरक्षणाची जिम्मेदारी मुख्यतः गावच्या पाटलावर असे. संरक्षणाच्या कामी त्याचा मुख्य सहाय्यक गावचा महार. खेड्यात रात्री गस्त घालणे, गावात आलेल्या गेलेल्या परक्या लोकांची पाटलाला वर्दी देणे, संशयित लोकांवर नजर ठेवणे ही महाराची मुख्यतः कामे असत. गावच्या पाटलाला गावच्या प्रत्येक व्यक्तीची माहिती असे. साहजिकच गावात चोरी किंवा तत्सम गुन्हा घडल्यास पाटलाला तो महाराच्या मदतीने हुडकून काढणे सोपे जात असे. पेशवाईत लहान मोठ्या शहरांतील बंदोबस्तासाठी कोतवाल नेमीत असत. इतर ठिकाणच्या बंदोबस्तासाठी मामलेदार, कमाविसदार, यांच्या हाताखाली शिबंदी असे. बंदोबस्ताच्या दृष्टीने किल्यांचा मोठा उपयोग होत असे. किल्यांवरील शिबंदी भोवतालच्या टापूचे संरक्षण करी.

गुन्ह्याबद्दल कैदेची शिक्षा होई. गुन्हेगाराची परिस्थिती लक्षात घेऊन लोहगड, माहुली, पुरंदर, सिंहगड, अहमदनगर इत्यादी किल्यात त्यास अडकविण्यात येई. कोतवालाची नेमणूक पेशव्याकडून होई. मात्र त्यास मुख्य काम कारभाऱ्याच्या हाताखाली करावे लागे. कोतवाली अंमल शहराच्या रयतेपुरता असे. कोतवालाचा पगार दिवट्यासुद्धा सालीना रु. ६०० होता. त्याच्या हाताखाली मुजुमदार, फडणीस व दप्तरदार असे तीन अधिकारी असत. शहर बंदोबस्तासाठी कोतवालांच्या हाताखाली १०० ते १२५ पोलीस शिपाई असत. रावबाजींच्या कारकीर्दीत कोतवाली मक्त्याने देण्यास सुरवात झाली.

तुरुंग.—पेशवाईत तुरुंग हे स्वतंत्र खाते नव्हते. बहुतेक प्रत्येक किल्यावर शिबंदी असे. त्या शिबंदीसच कैद्याची देखभाल करण्याचे काम सांगण्यात येई. बंदीगृहात (१) राजबंदी व त्याचे साथी, (२) दरोडेखोर व गंभीर स्वरुपाचे गुन्हे अगर मनुष्यवध करणारे गुन्हेगार, (३) फितूर, (४) अनैतिक गुन्हा करणारे असे चार प्रकारचे कैदी असत.

तुरुंगांची व्यवस्था नमुनेदार होती. कैद्यांस कपडे दरसाल सरकारातून मिळत. प्रकृतिमान व समाजातील दर्जा पाहून त्यांना अन्नोदक मिळे. प्रतिष्ठित राजकीय कैद्यांस बंदिस्त करून ठेवल्यास पायात बेडी अहोरात्र व कोठडीस कुलुप असे. सेवेस दोन माणसे व एक आचारी व बाहेरच्या कामासाठी एक मराठा मनुष्य नेमण्यात येई. आजारी कैद्यास मध्यम प्रतीचा शिधा देण्यात येई. कैद्यास नेसण्यासाठी व पांघरण्यासाठी दोन धोतरजोडचा देण्यात येत. कटांत सापडलेल्या कैद्यांस सर्वास एकत्र न ठेवता त्यांच्या पायात बेडी घालून त्यापैकी एकेकास निरनिराळचा किल्यांवर अटकेत ठेवीत. त्यांच्या पोटास रोज ज्वारीचे पीठ–शेर, डाळ पावशेर, मीठ पसाभर नेमून दिले जाई. भोजनसमयी दररोज पायातील बडी काढून जवळ चौकस लोक खबरदार ठेवून भोजन झाल्यावर पुन्हा बेडी घालून चौकी पहाऱ्याची बहुत खबरदारी करीत जाणे, असे सरकारातून आदेश असत. राजद्रोह्याच्या बायकांना अटकेत ठेवित. अटकेत असतांना त्यांच्या कन्या उपवर होऊन लग्न ठरल्यास सरकारात जामीन देऊन त्यांची सुटका होई. अटकेत असलेल्या कैद्याचा अगदी जवळचा नातलग वारल्यास, त्याची क्रिया करण्यासाठी ब्राह्मण अस्थी घेऊन कैद्याकडे आल्यावर कैद्याच्या पायातील बेडी काढून चौकी चांगली बंदोबस्ताने ठेऊन क्रियेस ब्राह्मण मिळवून २० रु. पर्यंत क्रिया करण्यास देऊन क्रिया करविणे, क्रिया जाहलियावर पूर्वीप्रमाणे बेडी घालून ठेवणे असे शासकीय आदेश होते. कैद्यास एका ठिकाणाहून दुसरीकडे नेतांना तर घोडेही सरकारातून पुरवित. कैद्यांना गुन्ह्याच्या स्वरुपाप्रमाणे साधी कैद अगर सश्रम कारावास अनुभवावा लागे. कैद्याच्या शिक्षेस मुदत नसे. विशेष प्रसंगी कैद्याची शिक्षा रद्द होई. गुरेढोरे कैद होत असत. कैद्यांस माणुसकीने वागविण्याची प्रवृत्ती पेशवे सरकारकडे होती. फितुरी बंदीवानास चौकशी होईपर्यंत गडावर ठेवून गुन्हेगार ठरला तर तोफेच्या तोंडी देत असत. पेशवेकाळात फाशीची शिक्षा फारशी प्रचारात नव्हती. तुरुंगात गुन्हेगारांची बेअब्रू न व्हावी अशी व्यवस्था करीत. कैदी मोकळा ठेवल्यास त्याने कड्यावरून उडी मारून जाऊ नये व ब्राह्मण असल्यास त्याने आततायीपणाही करू नये अशी व्यवस्था करीत. कधी कैद्यांना त्यांच्या घरी ठेऊन त्यांजवर चौकीपहारे बसवीत. हीच नजरकैद होय. एकदरीत अपराध्याशी वागण्याची सरकारची रीत सौम्यपणाची होती. राजकीय गुन्ह्यांखेरीज इतर गुन्ह्यांकरिता शिक्षा दिल्या जात त्या फार कडक असत. देहांत शिक्षा फार क्वचितच देत. राजकीय गुन्हेगारास हत्तीच्या पायाखाली किंवा मेखसू डोक्यांत घालून ठार करीत. गुन्हेगार पळून गेल्यास सक्तीचा उपाय म्हणून त्याच्या जवळच्या नातलगास त्याचा पत्ता लागेपर्यंत कैदेत ठेवीत.

**न्यायव्यवस्था.**—मराठ्यांची न्यायव्यवस्था ही हिंदू परंपरेवर आधारलेली होती. शिवाजी महाराजांनी राज्याभिषेक समयी राज्यव्यवस्थेसाठी जो कानूजाबता घालून दिला त्यांत न्यायाधिशाचे काम पंडितराव ह्या प्रधानाकडे सोपविले. त्याने सर्व राज्यातील न्याय, अन्याय मनास जाणून बहुत धर्म करून न्याय करावे. न्यायाची निवाडापत्रें यांजवर संमत चिन्हे करावी असे नमूद केले. महाराज स्वतः न्याय देत असत. त्याबद्दलचे पुरावे व महजर प्रसिद्ध आहेत.

सातारचे छत्रपती जेंव्हा मराठ्यांचा राज्यकारभार पहात त्यावेळी न्यायखात्याचे प्रमुखत्व छत्रपतींच्या अष्ट प्रधानांपैकी पंडितराव यांजकडे होते, परंतु पेशवाईत त्या कामाकरिता न्यायाधीश होता. पेशवाईतील रामशास्त्री प्रभुणे हे न्यायाधीश प्रसिद्धच आहेत. त्यांच्या मरणानंतर अय्याशास्त्री यांजकडे न्यायाधिशाचे काम सोपविण्यात आले. हे न्यायाधीश धर्मशास्त्राच्या आधारे न्याय करीत आणि मिताक्षर, व्यवहारमयुख यासारख्या ग्रंथास अनुसरून खटले चालवीत. तसेच पंचांच्या सहाय्याने न्यायाधीश न्याय देत.

रामशास्त्री यांचे कारकीर्दीत त्यांच्या हाताखाली अमीन व दप्तरदार हे अधिकारी होते. फिर्यादीची अर्जी व प्रतिवादीची जबानी त्याची त्यानी लिहून आणावी, ती अमीन यांनी पाहून दप्तरदार यांचे हवाली करावी. दप्तरदारांनी ती अर्जी पाहून प्रतिवादी यास विचारावयाचे सवाल निवडून काढावे. त्याचे जाब लिहून घ्यावे. व साधनांचे (पुराव्याचे) कागदपत्र वादी प्रतिवादी यांचे असतील ते अमीन याने पाहून त्यांच्या नकला दप्तरी ठेवाव्या. त्या पुराव्याची चौकशी दप्तरदार व अमीन यांनी करावी.

वतन व देणेघेणे यांच्या दाव्यात वादी व प्रतिवादी यांचे म्हणणे लेखी घेत. साक्षीदारांच्या लेखी साक्षी असत. तोंडी नसत. प्रतिवादी आणण्याकरिता शिपायाबरोबर चिठी जात असे. चिठी गेली पण प्रतिवादी आला नाही, असे सहसा घडत नसे. प्रतिवादी हजर न राहिल्यास वादीच्या बाजूने लागलीच एकतर्फी निकाल देण्याची पद्धत नसे. प्रतिवादी हजर होऊन वादास सुरुवात झाल्यानंतर तो ऐकण्यास न्यायाधिशाने आरंभापासून येऊन बसण्याची गरज नव्हती. न्यायाधिशाच्या हाताखाली ज्या नोकराकडे जे काम असे ते तो सुरु करी. त्याने लेखी जाबजबाब द्यावे, प्रश्न विचारावे, त्यांची उत्तरे वादी प्रतिवादीकडून लिहून घ्यावी. इ. कामे सुरु असता न्यायाधिशांनी येऊन त्यांजवर नजर ठेवावी. शेवटी न्यायाधीश सर्व पुराव्याचा विचार करून निकाल लिहित. या कामी ते पंचांचा सल्ला अवश्य घेत.

पेशवाईत न्यायदानाचे सुलभ व सोईचे साधन म्हणजे, पंचायत होय. गावात देवघेवीसंबंधी कोणी पाटलाकडे फिर्याद नेल्यास तो प्रथम वादी प्रतिवादींची समजूत स्नेही या नात्याने करून पाही. त्यात ते यशस्वी न झाल्यास मग तो पंचायत भरवून तिच्या मार्फत तंट्याचा निकाल लावी. पंच नेमण्याचे काम जरी पाटलाकडे असे, तरी अमुक पंच आम्हास नको असे वादी किंवा प्रतिवादी

यांनी म्हटल्यास तो पंच नेमला जात नसे. पाटलाकडे किंवा गावच्या पंचांकडे फिर्याद न न्यावी असा वादीचा हेतू असल्यास तो मामलेदाराकडे जाई. मामलेदारही प्रथम आपसात तंटा मिटविण्याचा प्रयत्न करी. प्रयत्न सफल न झाल्यास तोही पंचायत भरवून निकाल करवी. तरीही वादीचे किंवा प्रतिवादीचे समाधान न झाले तर त्याने सुभेदाराकडे व त्यापुढे रामशास्त्री किंवा खुद्द पेशवे किंवा त्यांचे अधिकारी यांजकडे फिर्याद जाई. न्यायाधिशाच्या निकालानंतर वाद सहसा वर जात नसे. तो कोठेही गेला तरी निकाल पंचा-मार्फतच व्हावयाचा. पाटील किंवा मामलेदार यांनी नेमलेल्या पंचानी अन्याय केला आहे किंवा काही लाचलुचपतीचा प्रकार झाला आहे अशी पक्की खात्री झाल्याशिवाय वरिष्ठ अधिकारी असल्या फिर्यादी मनास आणीत नसत.

पंच जसा निकाल करतील त्याप्रमाणे वादी प्रतिवादीस वागावयास लावण्याचे काम सरकारी अधिकाऱ्यांकडे असे. धर्मशास्त्रासंबंधी काही भानगड उपस्थित झाल्यास शास्त्री, पंडीत यांची मदत घेण्यात येई. जातीसंबधीचे तंटे त्या त्या जातीच्या मुख्याकडे म्हणजे मेहतर याजकडे निकालासाठी जात व त्या त्या जातीच्या सभे (गोत सभा) मार्फत निकाल होत. त्या त्या ठिकाणचा रिवाज हाच काय तो सरकारी अधिकाऱ्यांस आधार. देहांत शिक्षा देणे झाल्यास मात्र कारभारी व नंतर पेशव्यांची परवानगी लागे. पण मांग, रामोशी वगैरे जातींच्या गुन्हेगारासंबधी या परवानगीची जरुर नसे. मामलेदार त्या लोकांस नुसत्या संशयावरून धरून पाहिजे ती क्रूर शिक्षा देत असत. गुन्ह्याच्या चौकशीसाठी कॅव्हां कॅव्हां पंच नेमले जात, परंतु हा प्रकार सार्वत्रिक नव्हता. सरकारच्या विरुद्ध ज्याने फंदफितुरी केली असेल त्यास मात्र देहांत शिक्षा देण्यात येई. ज्यांनी खून केला आहे, अशा पैकी पुष्कळ असामी सरकारास दंड देऊन व ज्याचा खून केलेला असेल त्याचे कुटुबातील माणसांस नुकसानीदाखल द्रव्य देऊन मोकळे होत.

दोन जातीमधील किंवा एका जातीतील दोन पक्षकारांचा तंटा देशमुख, देशपांडे, खोत यांनी निकालात काढल्यावर तो निकाल पेशवे आज्ञापत्राने कायम करीत. पंचायतीच्या निकालास मंजुरी देताना सरकार पक्षकाराकडून नजर म्हणून वरीच मोठी रक्कम घेत असे. कित्येक कज्जे खुद्द पेशव्यांपर्यंत जात, तरीदेखील पेशवे त्याबावतीत न्यायाधिशांचीच मदत घेत. पंचाना फौजदारी व दिवाणी अशा दोन्ही प्रकारचे खटले चालविण्याचा अधिकार असे. फौजदारी खटल्यात उभय पक्षकारांपैकी कोणाच्याही वतीने एखाद्या साक्षीदाराने खोटी साक्ष दिल्यास दंड करीत. गुन्हेगार सापडत नसल्यास किंवा फरारी असल्यास त्याची मुले माणसे धरून ठेवीत, म्हणजे गुन्हेगार इसम आपण होऊन आपल्या माणसांच्या हालअपेष्टा चुकविण्याकरिता सरकारच्या स्वाधीन होई.

त्याकाळी न्यायखात्याचा खर्च भागविण्यासाठी पक्षकारांकडून शेरणी किंवा हरकी, गुन्हेगारी या बाबी वसूल केल्या जात. दिवाणी दाव्यातील उत्पन्नाची वाटणी सरकारतर्फे होताना सरकारी उत्पन्नाचा चौथा हिस्सा सरकार जमा

करीत. पंचायतीच्या निकालावर व नाराज पत्रकावर अपील करता येई. पण अपिलाचा निकाल विरुद्ध लागल्यास त्याला गुन्हेगारी म्हणून दंड द्यावा लागे.

शिक्षेच्या प्रकारांत स्थावर व जंगम मालाची जप्ती हा एक महत्त्वाचा भाग होता. जे शत्रूस फितुर होतील त्यांची घरे जप्त करीत व मुले-माणसे कैदेत ठवीत. पेशवाईत दिव्य करण्याची प्रथा होती पण अगदी क्वचीत.

**सैन्यव्यवस्था :**

**पेशवेकाल**.—पेशवे काली मराठी लष्करात हुजुरात व पथके असे दोन विभाग होते. हुजुरात म्हणजे पेशव्यांची फौज. पेशव्यांच्या मध्यवर्ती सत्तेकरीता मोठी फौज असणे स्वाभाविक होते. ह्या फौजेत दहा हजारापर्यंत घोडेस्वार असत, त्याची पथके ५२ असून प्रत्येक पथकावर वेगवेगळ सरदार असत. ह्या सर्व फौजेस पागा म्हणत. पागेकडे फडणीस, पोतनीस इत्यादि दरकदार व पथकास बक्षी असत. बक्षीस तैनात सालीना रु. ३,००० व पालखी तैनात रु. १,००० पर्यंत असे. सरकारी तिजोरीतून वेतन देण्याच्या पद्धतीने पेशव्यांची फौज उभारली होती.

दुसरा प्रकार सरजामी फौजेचा. राजाराम महाराजांनंतर अनेक सरदारांनी सैन्य उभारुन मोगलांशी मुकावला केला, त्यात घरची घोडी घेऊन चाकरी करणाऱ्यांची संख्या जास्त होती. अशाना शिलेदार म्हणत. व त्यांच्या समुदायास पथक म्हणत. अशा शिलेदारांच्या समुदायाचे सरदार ते पथके किंवा पथकी.

ही पथके दोन प्रकारची होती. सरंजामी व इतलाखी किंवा नगदी. मराठी लष्करात शिंदे, होळकर, पवार, गायकवाड, पटवर्धन यांना फौजा उभारण्यास सरंजाम व जाहागिरी लावून दिल्या. अशा सरदारांजवळील फौज ती सरंजामी फौज. ह्या सरदारांच्या फौजात त्यांच्या छोटया जहागिरदारांची पथके, सरंजामी पागा व इतलाखी फौज हे सर्व प्रकार आढळून येत. पटवर्धनास ४,५०० घोडेस्वारांची सरजांमी दिली होती. पण ही संख्या नेहमीच पथकात आढळे असा मात्र नेम नव्हता. पथकाच्या खर्चास सरकारांतून नक्त पैसा मिळत असे. त्यास नगदी किंवा इतलाखी फौज म्हणत. नगदी फौजेंच्या सरदाराची आपल्या पथकावर पूर्ण सत्ता असे. त्यांच्या मार्फतच पथकातील लोकास वेतन मिळे. दर माणशी ठरावीक मासिक वेतन व सरदारांना सालीना तैनात अशी योजना असे. देखरेख रहावी म्हणून सरकारांतून प्रत्येक पथकाला दिवाण, फडणीस असे अधिकारी नेमलेले असत, पण सरकारातून पैसा नियमीतपणे मिळण्याची मारामार असल्यामुळे इतलाखी फौजेचे सरदारसुद्धा सरकारी तपासणी चुकविण्याकरिता अनेक युक्त्या लढवित. लाचलुचपत सर्व अधिकाऱ्यांत सरसहा चालू असल्याने १०० पथकात जेमतेम निम्मे लोक असावयाचे. शिपायाच्या हातात पगाराची रक्कम पुरती कधीच पडत नसे.

पेशवेकालीन मराठी फौजेत पायदळापेक्षा घोडदळाचा भरणा अधिक असे. पहिल्यापासून मराठ्यांची लढण्याची पद्धत अशी असे की, त्यांना पायदळापेक्षा घोडेस्वारांचा उपयोग अधिक होई. मुसलमानांशी लढताना ही पद्धत त्याना उपयोगी पडली. पण इंग्रजांशी युद्धप्रसंग येऊ लागल्यावर पायदळाची आवश्यकता त्यांना भासू लागली. तसेच तोफखान्याकडे लक्ष द्यावे लागले. खास पागा व शिलेदार असे घोडदळाचे दोन भाग असत. त्यांच्या तनख्याची व्यवस्था शिवकाली होती तीच शेवटपर्यंत चालू राहिली. एका पथकात पन्नास स्वार असत. तर दुसऱ्यात पाचशे असत. प्रत्येक पथक्या आपल्या मगदुराप्रमाणे आपले पथक तयार करीत असे.

बारगीर शिलेदाराशिवाय मराठी सैन्यात एकांड्याचा आणखी एक वर्ग होता. एकांडा म्हणजे एकटा. हे एकांडे मोठ्या खानदानी घराण्यातील असून, त्यांना मोठाली वतनें व वसावयास आपल्या पागेतील निवडक घोडी दऊन जिवास जीव देणारे स्नेही म्हणून या एकांड्यास मातबर सरदार आपल्याजवळ चाकारीस ठेवीत.

**सैन्याची कूच.**—आदल्या दिवशी चिठ्या पाठवून सरदारांना कूच करण्याचा हुकुम कळवीत. रात्री फौजेत दवंडी पिटवून सर्वांना ती जाहिर करीत. दुसऱ्या दिवशी पहाटे मोठी नौबत वाजे व सर्वांना सूचना मिळे.

दुसऱ्या बाजीराव काळी हुजरातीच्या पागेचा खर्च मामलेदाराच्या उत्पन्नातून एक ठराविक रक्कम नेमून देऊन चालत असे ; ती रक्कम सरकारी नुकसान न होता व रयतेवर जुलूम न करता वसूल करीत. दर घोड्यास दरमहा साधारण ४० रुपये नेमणूक असे. तिच्यात दाणा, वैरण, रतीव, ओषधं लागलागवड, मोतद्दार वगैरे सर्वांचा खर्च येई. म्हणजे वर्षाला ४८० रुपये लागत. शिवाय प्रत्येक वर्षी दसऱ्याच्या सुमारास दर घोड्यामागे सामान नवीन करीत असत. त्याला एकूण १५० रुपये पडत. मिळून प्रत्येक घोड्यामागे एकंदर ६३० रु. खर्च येई. ही रक्कम मामलेदारांनी खाजगी खात्याकडे भरावी अशी रीत होती. याप्रमाणे हुजुरातीचा खर्च खास सरकारी तिजोरीतून न देता परभारे महालाच्या वसूलातून भागविला जात असे.

### सैन्यातील निरनिराळे अधिकारी :

सैन्यातील अधिकारी व्यवस्था शिवरायानी बांधून दिलेल्या पद्धतीवरच शेवटपर्यन्त चालली. पायदळातील सर्वात लहान अधिकारी नाईक व त्यावरचे हवालदार, जुमलेदार, हजारी, सरनौबत असे अधिकारी असत. पायदळातील सरनौबतच्या हाताखाली दहा हजार सैन्य असे. तर घोडदळातील सरनौबतच्या हाताखाली पाच हजारापर्यंत घोडेस्वार असत. शिवाजीच्या वेळी थोड्या तोफाही असत. पेशवाईत त्यांचा एक मोठा विभागच झाला.

### मराठी राज्याची घटना :

**शिवकालीन घटना.**—राज्याभिषेकाच्या वेळी शिवाजी महाराजांनी राज्यव्यवस्थेसाठी राज्यकारभाराविषयी माहिती सांगणारा "कानुजावता" तयार

केला. हा कानुजाबता म्हणजेच शिवकालीन मराठी राज्याची घटना होय. या कानुजाबत्यामुळे कारभाराची नवीन पद्धत पूर्वीच्या इस्लामी अमदानी-पासून भिन्न झाल्यामुळे राजाचे नियंत्रण मात्र अधिक प्रभावी झाले. कानु-जाबत्याबरोबर शिवकालीन राज्यव्यवहार शुद्ध मराठीत सांगण्यासाठी राज-व्यवहारकोश तयार करविला.

ह्या कानुजाबत्यात सांगितल्याप्रमाणे राज्यभिषेकानंतर शिवाजी महाराजांनी राज्याच्या कारभाराकरिता अष्टप्रधान नेमले. अष्टप्रधान म्हणजे आठ खात्यांचे प्रमुख. राजाखालोखाल पेशवा म्हणजे मुख्य प्रधान. मुलकी व लष्करी कारभाराच्या शिरोभागी हाच असे. अष्टप्रधानांतील पंडितराव न्यायाधिश वगळून बाकी सर्वांना लष्करी स्वाऱ्यांचो कामे करावी लागत.

राजाच्या राज्यकारभारविषयक कामकाजाच्या अंमलबजावणीची सूत्रे ठराविक कारभाऱ्यांकडे म्हणजे चिटणीस, फडणीस आदी आपल्या खास अधि-काऱ्यांकडे ठेवली होती. ते राजालाच जबाबदार असत. आणि राज्यातील सर्व लेखक वर्ग याच अधिकाऱ्यांच्या नियंत्रणाखाली सुभे, मामले, परगणे, तर्फ, ठाणे आदी प्रदेशांचा राजकारभार पहात. एवंच चिटणिशी, फडणिशी आदि जाबत्यावरून राजसत्ता सरकारात कशी केंद्रीत केली होती हे दिसून येते.

अष्टप्रधानांची वेगवेगळी कर्तव्ये ही कानुजाबत्यात प्रसिद्ध आहेत. यावरून ध्यानात येते की, सर्व प्रधान आपण थेट राजाचे व फक्त राजाला जबाबदार असे मानीत. लष्करी व दिवाणी अधिकारांत लष्करी अधिकाऱ्याने दिवाणी अधिकाऱ्याच्या आज्ञेत असावे, हेच तत्व शिवकाली होते.

तत्कालीन प्रघातास अनुसरून शिवाजीची राज्यसत्ताक पद्धती होती व सर्व सूत्रे राजाच्या हाती होती.

शिवकालीन राज्यघटनेत राजसत्ता, वतनदार व गोत ही राज्यघटनेतील तीन मुख्य अंगे होत. राजसत्तेला जरूर लागणारी वतनदारांची मदत, वतनदाराना स्वतःची सेवा सांभाळण्यासाठी लागणारी गोताची मदत, राजाचे रयतेवरील स्वामित्व व वतनदारांवरील नियंत्रण व राजसत्ता लोकप्रिय करण्या-साठी राजाला रयतेची घ्यावी लागणारी काळजी, यामुळे या तीन संस्थांचा अन्योन्य संबंध कसा होता, हे पहावयाचे आहे.

**शिवकालीन गोत; शिवकालीन राजसत्तेच्या चारसत्ता अशाः—**
(१) राजसत्ता ; (२) देशकसत्ता ; (३) ज्ञातिसत्ता किंवा धर्मसत्ता ; (४) व्यापार सत्ता

राजसत्तेच्या खालोखाल देशकसत्ता म्हणजे देशमुख, कुलकर्णी, देशकुळकर्णी, पाटील, बलुतेदार इत्यादी गाव व प्रांत यांत वतनदाराची लहानमोठी अधिकार असलेली मंडळी. यातच प्रमुख गावकरी रयतेचा अंतर्भाव होतो.

देशक संस्थेला वतन म्हणत. गोत म्हणजे ग्रामसंस्था. ह्या ग्राम संस्थेला शिवकाली वतन म्हणत. ह्या ग्राम संस्थेला फार महत्व होते. गावातील

वतनाची भांडण-तंटे ग्रामसंस्थेमार्फत निकालात काढण्याचा प्रघात होता. तत्कालीन ग्रामसंस्थेकडे फार मोठा अधिकार होता.

त्यावेळी महाराष्ट्रात जी कडेकपारी खेडी नांदत होती, त्यापैकी प्रत्येक गाव चिमुकले असले तरी बऱ्हंशी स्वयंपूर्ण होते. गावात शेतीखेरीज कारागिरी करणाऱ्यास बलुते अशी संज्ञा असे. त्यांस पोटाकरीता जमिनीच्या उत्पन्नानुसार धान्यादि मिळे व जमीन इनाम मिळे.

'गोत' बलुत्यांचेच असे व खेडेगावाच्या तंट्यांचे व पाटील, कुळकर्णी, देशमुख, देशपांडे आदि करून वतनदारांच्या वतनासंबंधीचे न्यायनिवाडे या गोतासमोर चालत व प्रत्यक्ष राजा जरी स्वतः नायक किंवा न्यायाधीश असला, तरी गोताच्या बहुमतावर निकाल होई. अशा निकाल पत्रावर म्हणजे महजरनाम्यावर बलुत्यांच्या निशाण्या असत. बारा बलुत्यांप्रमाणे बारा अलुते होते. हे गावातील कारागिर असत.

गावातील मुख्य वतनदार पाटील, कुळकर्णी यांना धामधुमीच्या काळी गावाची राखणूक करावी लागे. अशा तऱ्हेने गाव बसविणाऱ्यांना, राजसत्ता काही वतनी हक्क बहाल करी. गावाची वसाहत झाली की, सरकार जी काही खंडणी गावावर बसवीत ती देण्याला पाटील जामीन राही. गाव भयाने पळाला अगर इतर कारणाने खंडणी थकली, तर पाटलास कैदेत बसावे लागे. अशा तऱ्हेने पाटलावर गावची जबाबदारी म्हणून त्याला महाराने फुकट राबावे व कुंभाराने फुकट मडकी द्यावी इत्यादी, काही मानपान व वतनी हक्क असत. गावात वंशपरंपरेने ठराविक जमीन करणारे ती मिराशी कुळे, नव्याने गावात येऊन राहणारे त्यास उपरी म्हणत. मिराशीलाच "वृत्ती" व मिरासदाराला "वृत्तीवंत" म्हणत. गावचा मुख्य वतनदार पाटील. हा बहुतेक मराठा असे. शिवकाली महाराजांना सुद्धा पाटिलकीची वतने होती.

वृत्ती संपादण्यासाठी कुळांना सरकारात काही नजराणा द्यावा लागे. पाटलाच्या खालोखाल कुळकर्णी हा गावचा वतनदार असे. वतने संपादन करण्यासाठी जबर नजराणाही द्यावा लागे. नजराण्याशिवाय वेतन नसल्यामुळे शिवकालापूर्वी सधन व्यक्ती वतनदार होत. त्यामुळे तत्कालीन महाराष्ट्रात वतनदारांच्या रुपाने एक भांडवलदार वर्ग निर्माण झाला होता. गावातील पाटील, कुळकर्णी व परगण्याचे देशमुख, देशपांडे हे जणू राजसत्तेचे प्रतिनिधीच होते. गावाचीवसाहत करणे हे ज्याप्रमाणे पाटलाचे काम, त्याप्रमाणे अनेक गावे मिळून होणाऱ्या परगण्याचे वसाहतीबद्दल देशमुख जबाबदार असे. परगण्याचा वसूल पोचला नाही, तर वतन जप्त होऊन देशमुखास कैद भोगावी लागे.

देशमुखाच्या हाती लष्करी व फौजदारी अधिकार असून शत्रूपासून, ग्रामाचे व देशाचे संरक्षण करण्याची जबाबदारी त्याच्यावर असे. त्याचप्रमाणे लढाईच्या प्रसंगी राजाला सैन्यबळाची मदत करण्याचे काम देशमुखाचे असे. प्रत्येक राज्यकर्त्यास देशमुखाना खुष ठेवावे लागे. कारण गावात वसाहत

करणे, शेती व उद्योगधंदे सुरू होऊन सरकारास उत्पन्न मिळाले पाहिजे, एवढ्या हेतूसाठी परगण्याचे राजे बनलेल्या देशमुखांना खुष ठेवणे भाग असे. शिवकालीन समाजात सैनिक व बिनसैनिक असा भेद नव्हता. प्रत्येक गावकरी लष्करी शिपाई बनण्यास व जरूर लागेल तेव्हा हातचा नांगर सोडून भाला-बर्ची व तलवार घेऊन रणांगणावर धाव घेण्यास तयार असे.

**वतनदार व गोत यांचे संबंध.**—गोत म्हणजे ग्रामसंस्था. हिचे वतनदारांशी नाते कसे होते ते पाहू. शिवकालीन ग्रामसंस्था कुटुंबतत्वावर आधारीत होती. वतनदार कुळकर्णी हा गावचा मिरासदार असे. कुलकर्ण्याचा निर्वंश झाल्यास त्याच्या जागी दुसरा कुळकर्णी वंशपरंपरेने नेमण्याचा हक्क ग्रामस्थाना असे. ग्रामस्थानी अशी वतने बहाल केली, तरी त्यावर परगण्याच्या देशमुखांचे शिक्के व देशपाड्यांचे दस्तक असावे लागे. एकदा वतन दिल्यानंतर त्याला कोणी हरकत केली तर सारा गाव वतनदाराची पाठ राखीत असे. कुळकर्ण्याप्रमाणे पाटील सुद्धा मिरासदार होता. पाटील मेला अगर त्याचा खून झाला, तर त्याच्या बायकोच्या व अज्ञान मुलांच्या हातून ग्रामस्थ कारभार चालविण्यास मदत करीत.

शिवकालीन समाजात वतनासक्ति जबरदस्त होती व वतनासंबंधीची भांडणे पिढीजात चालू राहत. परंतु वतनाच्या भांडणात राजसत्ता अखेरचा निकाल ग्राम सभांवर सोपवी. राजाकडून फिर्यादीस मुळातच हुकूम असे की, हे मिराशीचे काम आहे तरी उभयता वादी गोतामध्ये जाऊन कागद रुजू करून निवाडा करून घेणे. गोतदेशकसभेत त्या मंडळींनी खऱ्या साक्षी द्याव्या अशी त्यांना शपथ घालण्यात येई. शिवाजी महाराजांनी एका खोटी साक्ष देणाऱ्याची जीभ कापण्याचा हुकूम दिला होता.

शिवाजीच्या कानुजाबत्यात प्रधानांना वेगवेगळ्या प्रदेशाचा बंदोबस्त करावा, अशा आज्ञा आहेत. याच धोरणाची वाढ राजारामाच्या कारकीर्दीत होऊन ताब्यातील मुलुखाचे सरंक्षण करण्याची जबाबदारी राजारामाने प्रधानांत वाटून दिल्यामुळे राजारामाच्या कारकीर्दीपासून प्रधान हे स्वतंत्र सरदार बनू लागले. ही पद्धत शाहूच्या कारकीर्दीत परिणतावस्थेत पोचून प्रत्येक प्रधान सरंजामी सरदार बनून वेगवेगळ्या टापूत पृथकत्वाने नांदू लागला. त्यामुळे प्रधान सत्ताधारी बनले. बाळाजी विश्वनाथ पेशवे याच्या हे ध्यानी आल्यावर त्याने शाहू महाराजांतर्फे प्रत्येक सरदारापुढे पर्याय ठेवला. प्रत्येक सरदाराने आपल्या क्षेत्रात पूर्ण स्वतंत्र राहून त्याने मराठी राज्याचे घटक होण्यास मान्यता द्यावी, म्हणजे मराठा राज्यास सांघिक राज्याचे स्वरूप प्राप्त होईल. आणि ही योजना मान्य केल्यास प्रबळ असे मराठी साम्राज्य निर्माण होईल. नाहीतर जुटीच्या अभावी एकएकटा सरदार निर्बल ठरेल. हा राजकारणाचा सिद्धांत बाळाजी विश्वनाथाने सर्व सरदारांपुढे मांडला आणि सरदारांनीही तो मान्य केला. या योजनेप्रमाणे दाभाड्यांना गुजरात, आंग्र्यांना कोकण, फत्तेसिंगास कर्नाटक, भोसल्यास वऱ्हाड, अशी क्षेत्रे वाटून दिली. प्रतिनिधी व सचिव

यांना प्रधान मंडळात स्थान दिले. अशा रितीने शाहूकालीन नवीन पद्धती तयार झाली.

शाहूमहाराजांचे हुकूम पेशवा मानीत असे. तसेच शाहूमहाराजांनी पेशव्यासुद्धा सर्व सरदारांस आपल्या हुकमतीखाली ठेवले होते. वृद्धापकाळ जवळ आल्यावर शाहू छत्रपतींनी आपणांस मूल बाळ नाही हे लक्षात घेऊन आपल्या पश्चात स्वराज्याची धुरा वाहाणारा पेशव्याशिवाय कोणी समर्थ नाही असे पाहून दोन याद्या पेशव्यांस स्वहस्तानें लिहून दिल्या. त्यांत पेशव्यांस केलेल्या आज्ञा स्पष्ट आहेत. "फौज आणून बंदोवस्त करावा, कोल्हापूरकर संभाजीस सांगितल्याप्रमाणे आणू नये. पेशव्यांचे वंशात प्रधानपद चालेल, आमचे वंशांचे आज्ञेत राहून सेवा करणं."

या दोन याद्यांमुळे मराठेशाहीच्या मूळ चालकत्वाची शाहूने पेशव्यांस सनद करून दिली. शाहू निवर्तल्यावर पेशव्याने रामराजास सातान्यास आणून दत्तकविधान करून गादीवर बसविले. (इ. स. १७५०) रामराजा आपल्या वयाच्या पंचवीस वर्षेपर्यंत अज्ञातवासात वाढला. त्यास राजकारणाचा गंध नव्हता. त्या प्रकारचे शिक्षणही त्यास कोणी दिले नव्हते. आपल्याला राज्यकारभार करणे शक्य नाही हे लक्षात घेऊन सांगोले मुक्कामी "सर्व राज्य-कारभार पेशव्यांनी छत्रपतींच्या वतीने चालवावा" अशी यादी रामराजाने पेशव्यांस लिहून दिली. पूर्वीच्या दोन व ही अशा तीन याद्या मिळाल्यावर पेशवे मराठी साम्राज्याचे सत्ताधीश बनले. अशा रीतीने छत्रपतींकडून पेशव्यांकडे मराठी राज्याची सर्व सत्ता सांगोल्याच्या तहापासून आली. हे सर्व सरदारास पटवून देण्याचा उपक्रम पुढे २–४ महिन्यात पार पडला. सर्व सरदारांस पेशव्याने आपल्या हुकमतीत आणले.

आश रीतीने शाहूनंतर सातारकर छत्रपतींचे महत्व कमी करण्याचे काम पेशवा बाळाजी बाजीराव याने केले. छत्रपतीचे पद आनुवंशिक पद्धतीने चालले. शाहूनंतरचे छत्रपती नाकर्ते निघाले. ते नामधारी बनून कर्तबगार पेशव्याने सर्व सत्ता आपल्या हाती घेतली, ती माधवराव पेशव्यांच्या अखेरीपर्यंत पेशव्यांच्या कर्तबगारीमुळे त्याचेकडे राहिली. शाहू महाराजांच्या मृत्यूनंतरचे छत्रपती नाकर्ते निघाल्यामुळे ज्या पद्धतीने भोसले घराण्यातून सत्ता पेशव्यांकडे गेली, त्याच पद्धतीने सवाई माधवराव नाकर्ता निघाल्याने ती सत्ता पेशव्यांचे नोकर नाना फडणीस यांच्या हाती गेली. सत्तेचे संक्रमण अशा रितीने रक्तपात न होता होऊ शकले ही गोष्ट महत्वाची होती. याचप्रमाणे अष्टप्रधान पद्धती जाऊन बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून संघराज्य पद्धती आली.

**मराठी सरदारांचे दिल्लीच्या बादशाहीशी व निजाम वगैरेंशी घटनात्मक संबंध.**—इंग्रजांशी मराठ्यांचे युद्ध सुरू झाले होते. त्यात महादजीच्या विद्यमानं सालबाई मुक्कामी तह झाला. त्यात महादजीची स्वतंत्रता उभयतांनी कबूल केली. महादजी पेशव्यांशी कधीही स्वतंत्रपणे वागला नव्हता. हा तह झाल्यानंतर त्यास इंग्रजांनी वडगावी कबूल केल्याप्रमाणे भडोच तालुका

दिला. सालबाईच्या तहानंतर इंग्रज वकील महादजीकडे राहू लागला. इंग्रज व पेशवे यांचा पत्रव्यवहार महादजीच्या विद्यमाने होऊ लागला. याच वेळी गोहदच्या राजाने महादजीस ग्वाल्हेरचा किल्ला दिला. महादजीने ग्वाल्हेरपासून आग्र्यापर्यन्तचा सर्व प्रदेश आपल्या ताब्यात घेतला आणि बादशहाने बोलविल्यावरून त्याच्या भेटीस गेला. आग्र्यास बादशहाची आणि महादजीची भेट झाली. भेटीत बादशहाने महादजीस वजीरी दिली. ती त्याने आपल्या नावाने न पत्करता सवाई माधवराव पेशव्यांच्या नावे सनदा करवून घेतल्या आणि वकील-उल्-मुतलक असा किताब पेशव्यास देववून आपण पेशव्याचा चाकर म्हणून वजीरीचे काम चालवू लागला. दिल्ली व आग्रा प्रांत बादशहाने महादजीच्या स्वाधीन केले आणि त्याने आपल्या खाजगी खर्चास दरमहा रु. ६५,००० देत जावे, असा ठराव करवून घेतला. गोवध कोणी करू नये असा हुकुम सर्व प्रांतातून बादशहाकडून त्याने प्रसिद्ध करविला. दिल्लीच्या बादशहाचा कारभार महादजी करू लागला. पेशव्यांचे व इंग्रजांचे हरप्रकारे बोलणे महादजीतर्फे चालत होते, ते नानाने बंद करून इंग्रजांचा एक स्वतंत्र वकील पुण्याचे दरबारात ठेवला. तसेच नानाने पेशव्यांच्यावतीने, टिपू, निजाम वगैरे सत्ताधीशांशी मराठा मंडळाने संबध ठेवावेत. स्वतंत्ररित्या संबंध ठेवल्यास ते बंड समजण्यात येईल असे ठरविले. त्याचप्रमाणे नागपूरकर भोसले यांचा पाडाव त्याने निजामाशी संबंध ठेवल्यामुळे पेशव्यांनी केला.

## आर्थिक स्थिती

**निरनिराळ्या कालखंडातील प्रत्यक्ष राज्याचे अर्थकारण व समाजातील निरनिराळ्या वर्गाची आर्थिक स्थिती.**–शिवाजी महाराजांचे राज्यारोहणप्रसंगी दक्षिणेतील सहा सुभ्यात शिवाजी महाराजांचा खालील मुलुख होता.—

अकलूज, बेळगाव, दाभोळ, गाजीपूर, तोरगळ, बंकापूर, मिरज, रायबाग, पन्हाळा, कल्याण, रामगिरी, येलगिरी, अक्कलकोट व टाकलीखेड, ह्या मुलखांच्या उत्पन्नाची एकूण जमा रु. ३२,६६,६३५ रुपये होती.

शिवछत्रपतींच्या नंतर संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत मराठा राज्याचा अदमास तोच राहिला. राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत औरंगजेबाच्या स्वारीमुळे सबंध स्वराज्य धोक्यात होते. जिकडेतिकडे विस्कळितपणा आलेला होता.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगल बादशहाने शाहू महाराजांची सुटका करून त्यास स्वराज्य मुलूख व दक्षिणच्या सहा सुभ्यांची चौथाई व सरदेशमुखी दिली. यासंबंधीच्या करारजाबत्याप्रमाणे सहा सुभ्यांचा महसूल असा—

दक्षिण सुभे ६ :—

(१) औरंगाबाद १,२३,७६,०४२; (२) वराड–१,१५,२३,५०९;
(३) बिदर–७४,९१,८८०; (४) विजापूर–७,८५,०८,५६०
(५) हैद्राबाद–६,४८,६७,४८३; (६) खानदेश–५७,८९,८२०=
एकूण जमा १८,०५,१७,२९४.

सरदेशमुखी दरशेकडा रु. १०, एकूण १,८०,५१,७३०.
पेशकष सरकार, हजारी ६,५१० एकूण ११,७५,१६,७६०.
पैकी शाहूचे वकीलाने कबूल केली ती–१,१७,१९,३९१.
पैकी रोख सनद झाल्यावर–रु. २९,२९,८४८.
किस्तबंदीने–रु. ८७,८९,५४३.

मराठी अंमलाच्या उत्पन्नाच्या बाबी अनेक होत्या. या अंमलामध्ये सामान्यपणे चौथाई, सरदेशमुखी, मोकासा, बावती, साहोत्रा यांचा समावेश होतो. या शिवाय सायेर व कमाविस ही उत्पन्ने येतात. या सर्वच्या सर्व बाबीचे उत्पन्न काही मुलुखातून मिळे, तर काही मुलखातून खंडणी या प्रकारचे निराळेच उत्पन्न मराठ्यांना मिळे.

शाहूकाली मराठी राज्याचे साम्राज्य झाले. शाहूच्या निधनप्रसंगी शाहू-महाराजांनी पेशव्यांकडे राज्यकारभार सोपविला. तेव्हापासून पेशवे मराठी राज्याचे सर्व सत्ताधीश बनले. त्यांच्याकडे हुजूरात आली. सरंजामी मुलूख सरंजामदारांकडे राहिला. तेव्हापासून हिशेबात सरंजामाचा मुलूख व कमाविशीचा मुलूख असे भाग पाडलेले आढळतात. मराठ्यांचा राज्यविस्तार खालील प्रांतात होता—
(१) हिंदुस्थान; (२) गुजरात; (३) खानदेश; (४) गंगथडी; (५) कोकण; (६) वरघाट; (७) हुजरात; (८) कर्नाटक; (९) बंगाल. वरील प्रांतात सरंजामी महाल व कमाविसीचे अशा दोन खंडात विभागलेले होते. त्यातील सरंजामी महालाचे वार्षिक उत्पन्न (इ. स. १७७२-७३ चे) २ कोटी ३ लक्ष रुपये होते. तसेच त्यातील कमाविशीच्या प्रांताचे वार्षिक उत्पन्न (इ. स. १७७२-७३) रु. १ कोटी ८३ लाख होते. म्हणजे एकण उत्पन्न (२ कोटी ३ लाख+१ कोटी ८३ लाख रुपये) ३ कोटी ८६ लक्ष रुपये. यावरून मराठी राज्याचे उत्पन्न सुमारे ४ कोटीपर्यंत असावे असा अंदाज बांधता येतो.

मराठी साम्राज्यात गुजरातेत गायकवाड, पूर्व भारतात नागपुरकर भोसले, हिंदुस्थानात शिंदे, होळकर व पवार आणि दक्षिणेत पटवर्धन, रास्ते ,विंचूरकर आदि सरदार सरंजामदार म्हणून होते. इ. स. १७७६-७७ मध्ये होळकर, शिंदे ह्यांकडे महाल दिले. त्यांचा आकार अनुक्रमे २० लक्ष व ४८ लक्ष मिळून दोन्ही सरदारांकडे एकूण जहागीर ६८ लक्षांची होती.

गुजरात, काठेवाडात पेशव्यांचा निम्मा भाग होता. त्याचा वसूल एकूण रुपये २४,६८,००० पेशव्यांस मिळत असे. महादजी शिंदे इ. स. १७९४ त निवर्तले. त्यावेळी शिंद्यांच्या ताब्यात दोन कोटी ९६ लक्ष आकाराचा मुलूख होता.

दक्षिणेतील पटवर्धन, रास्ते, निपाणीकर, कितूरकर देसाई या सरंजामदारांकडे ३३ लाखांचा सरंजाम होता.

दुसरा बाजीराव इंग्रजांच्या आश्रयास जाऊन त्याने वसई मुक्कामी दिनांक ३१ डिसेंबर १८०२ रोजी तह केला. त्या तहाने त्याने २६ लक्षांचा मुलूख इंग्रजांस दिला. तसेच सर्व मराठे सरदारांस इंग्रजांनी पेशव्यांपासून फोडले. त्यामुळे इ. स. १८१३ नंतर पेशव्यांकडे २ कोटी १५ लाखांचा मुलूख राहिला. इंग्रजांची ताबेदारी पत्करण्यापूर्वी बाजीराव पेशव्यांच्या ताब्यात १ कोटी ५६ लक्ष ५० हजार रुपये उत्पन्नाची जहागिरी व कमाविशी मुलूख होता.

**सबंध मराठी राज्याच्या आयव्ययाचे स्वरुप.**—मराठी राज्याच्या आयव्ययाचे स्वरुप पहातांना जमेच्या व खर्चाच्या बाबीचा तपशील लक्षात घेतला तर तिजोरीत कोणत्या बाबीवरून पैसा जमा होत असे याची कल्पना येते. सरकारी उत्पन्नाच्या बाबी : (१) जमीन महसूल; (२) खंडणी; (३) जकात; (४) धारदाणा कर, बाबतपरी मदतपरी; (५) दंड व गुन्हेगारी, कोतवाली गुन्हेगारी, रखवाली; (६) फी-हरकी, शेरणी, चिठी मसाले; (७) सरंजामी स्वरुपाचे भेटनजर, इजाफा.

माधवराव पेशव्यांचे कारकीर्दीत जमीन महसूलाचे वार्षिक उत्पन्न रु. १ कोटी ९० लक्षांचे होते.

कर्नाटकातील पाळेगाराकडील खंडणीचे उत्पन्न सरासरी वार्षिक रु. २० लक्ष मिळत असे.

**जकात.**—मालाची ने-आण होते तिच्यावर बसविलेल्या करास जकात म्हणतात. अशा जकातीचे मक्ते देत. कल्याण, भिवंडीच्या जकातीचे मक्ते दर पाच वर्षांनी दिलेले आढळतात. एकट्या प्रांत कल्याण, भिवंडी येथील जकातीचे वार्षिक उत्पन्न सुमारे ३ लक्ष रुपये असे. यावरून जकातीच्या उत्पन्नाची कल्पना येईल.

**कर.**—शेतकऱ्यांकडून शेतसारा वसूल होई. त्यावर सारापट्टी बिघ्यावर बसवित व सवाई पट्टी ऐन शेतसाऱ्यावर बसवित. कोकणात मिठागार, नारळी, पोफळी, मच्छिमार इत्यादीवरील कर ह्या सरकारी उत्पन्नाच्या विशेष बाबी होत्या. याशिवाय कायम उत्पन्नाची बाब म्हणजे अबकारी कर तसेच कोणत्याही मालाची खरेदी-विक्री झाली की त्यावर कर होताच. अधिकारी करांचा वसूल करून पाठवित. कमाविसदार, मामलेदार, सुभेदार हे मुलकी अंमलदार गावाचा अगर तालुक्याचा अगर सुभ्याचा वसूल करीत.

नेहमीच्या कराखेरीज प्रासंगिक करार बसवित, त्यास सामान्यतः पट्टया म्हणत. पेशवे काळात सुमारे २५ पट्टया चालू होत्या. त्यापैकी काही अशा—दारुपट्टी, नजरपट्टी, कर्जपट्टी, बैलपट्टी, दिवाणीपट्टी, नहरपट्टी, कोलारपट्टी, भिकारपट्टी वगैरे.

**दंड व गुन्हेगारी.**—काही गुन्ह्याबद्दल दंडाची शिक्षा असे. दंडाची रक्कम सरकारात जमा होई. सरकार दरबारी जे परदरबारचे वकील येत, ते

पेशव्यांस भेट देत. तह, करारनामे होतानाही भेटीची रक्कम आकारत त्यास अंतस्थ असे म्हणत. ही अंतस्थ रक्कम हिशेबात नमूद असे.

**खर्चाच्या बाबी**.—जमेच्या मुख्य बाबी जशा सात तेवढ्याच खर्चाच्या बाबी होत्या, त्या अशा–(१) सरकारी खात्यावरील खर्च, (२) दरबार खर्च, (३) नोकरवर्ग किंवा सेवेकरी, (४) संरक्षण, (५) खाजगी, (६) सार्वजनिक, धार्मिक व ब्राह्मणाकरिता, (७) पैशाचे व्यवहाराबाबतचा खर्च.

(१) सरकारी खात्यावरील खर्च —सरकारकडे जे अठरा कारखाने होते ते असे :—

तोफखाना, हत्ती-पीलखाना, नाटकशाळा, शिबिका, ऊंटखाना, नगारखाना, फरासखाना, दारुखाना, इमारती, रथखाना, वैद्यखाना, जवाहिरखाना, जिराईतखाना, जामदारखाना, पागा, पोथीशाळा, गोशाळा इत्यादी.

(२) दरबार खर्च : कारकून, मंत्री आणि वकील.

(३) संरक्षण : शिलेदार, पागा, सुभेलष्कर, प्यादे, जहाजे.

(४) खाजगी खर्च—(१) वर्षप्रतिपदा ; (२) गणपती उत्सव ; (३) दसरा ; (४) दिवाळी ; (५) संक्रांत ; (६) शिमगा ; (७) नवस,

(५) सार्वजनिक, धार्मिक व ब्राह्मणाकरिता : श्रावणमास, अनुष्ठान. वर्षासने, धर्मादाय, देवस्थाने व भोजनदक्षिणा.

(६) पैशाचे व्यवहाराबाबतचा खर्च : व्याज, हुंडणावळ, बट्टा.

वरील खर्चाच्या बाबीपैकी संरक्षणावर माधवराव पेशव्यांच्या काळात सुमारे १ कोटी रुपये खर्च होत होते. दरबार खर्च ६ लाख, नोकरावर खर्च ६ लाख, सरकारी खाते १३ लाख, पैशाचे व्यवहार ७ लाख, सार्वजनिक, ब्राह्मणावर वगैरे १४ लाख व खाजगी ५ हजार यावरून एकूण खर्चापैकी सुमारे ७० टक्के खर्च सरक्षणावर होई व बाकीचा सर्व ३० टक्के होत असे. काही खर्च प्रतिवार्षिक तर काही एकसाली म्हणजे नैमित्तिक असत. ते खर्च कारणपरत्वे होत. प्रतिवार्षिक नसत.

## समाजातील निरनिराळ्या वर्गांची आर्थिक स्थिती :

मराठी राज्यात त्या काळी शेती व लष्करी पेशा असे दोन मुख्य उद्योग होते. शेतसारा व शेतीवरील कर हे सरकारचे मुख्य उत्पन्न होते. गावाचा सारा ठरविण्याचे काम जरी सरकार करी तरी जमिनीची मालकी रयतेकडे असे.

शेतीखेरीज इतर उद्योगधंदे म्हणजे कापड विणणे, कागद तयार करणे शेतीसाठी व लष्करात लागणारे सामान व इतर हत्यारे बनविणे, पोथ्या, पुस्तके लिहिणे इ. होते. कलाकुसरीच्या अनेक वस्तू व कापड तयार करण्याचे कारखाने लहान प्रमाणात मराठेकाली होते. पेशव्यांना दरवर्षी फौजेस देण्यासाठी, नजर करण्यासाठी व स्वतःच्या उपयोगासाठी बरेच कापड लागे.

परंतु ते सर्व उत्पादकाकडून खरेदी करीत. इ. स. १७७२-७३ साली पेशव्यांच्या जामदारखान्यात रु. ३,००,४५२.२० किंमतीचे कापड विकत घेतले गेले. एरंडोल, जुन्नर, औरंगाबाद वगैरे ठिकाणी कागद तयार होई. कागदाला किंमतही बरी येई. तसेच कापडही निरनिराळ्या तऱ्हेचे निघत होते. हा धंदा हातमागावर चाले.

त्या काळच्या लोकसंख्येचे श्रीमंत, मध्यम व कनिष्ठ असे तीन विभाग पाडल्यास श्रीमंत वर्गात जहागिरदार मोडत. त्यांची स्थिती अर्थातच उत्तम होती. जहागिरदार व वतनदार हे सरकारची चाकरी करीत असल्यास त्यांना सरंजाम व शिवाय इनाम जमिनी असत. त्यामुळे त्यांची आर्थिक स्थिती उत्तम होती. मध्यम म्हणजे व्यापारी व कारकून वगैरे. व्यापारी वर्गास नविन बाजारपेठ वसविण्यासाठी सरकार सवलती देई. वाणी-गुजर यांना वजनाची मापे सरकारातून तपासून घ्यावी लागत. सरकारी शिक्क्याचीच मापे वापरावी असा दंडक असे. जुन्या व्यापाऱ्यांची कोंडी फोडण्यासाठी नवीन धंदा सुरू करणाऱ्यास विशेष सवलती मिळत. गावोगावी जत्रेच्या निमित्ताने बाजार भरत. त्यावेळी दुकानांचा क्रमही ठरलेला असे. प्रसंगी सरकारी अधिकारी पदार्थांचे वाटपही योग्य रितीने होते किंवा नाही याकडे लक्ष पुरवित.

कारकुनी पेशाखेरीज मध्यम वर्गातील लोक सैन्यात भरती होत. सैन्यातील नोकरीला त्यावेळी मान असे व वेतन चांगले मिळे. त्यावेळी स्वाराला दरमहा रु. २५.०० वेतन मिळे. त्यावेळी धान्याची स्वस्ताई लक्षात घेता वरील वेतनामध्ये मध्यम वर्गातील लोकांना सुखाने जगता येई.

पेशवे सरकारला जमाखर्चाची तोंडमिळवणी करणे कठीण जाई. त्याकाळी सोने, चांदी व तांबे या धातूंची नाणी सरसकट प्रचारात होती. टाकसाळी बऱ्याच होत्या. परवान्याशिवाय टाकसाळी चालविता येत नसत.

**व्याज, हुंडणावळ व बट्टा :** वरात व हुंडा पाठवण्याची चाल सरसकट दिसते. वराती व लोकांच्या हुंड्या ह्यांचा व्यवहार जातीने सुरू होता. कोणत्या चलनात रक्कम द्यावयाची ते चलन हुंडीत निर्दिष्ट करीत आणि व्यापाऱ्यांकडून भरलेले चलन व त्याने द्यावयाचे चलन ही भिन्न असल्यास बाजारभावाप्रमाणे बट्टा आकारीत.

पेशवे दानधर्म, अनुष्ठाने ब्राह्मणभोजने इत्यादित पैसा खर्च करीत. हुजुरास ब्राह्मणभोजनासाठी रु. ५,००० वार्षिक खर्च येई. गोप्रदान, व्रतवैकल्ये यांवरही खर्च होई.

शेतकरी कामगार वर्गाची स्थिती देखील खूप चांगली होती. ह्याशिवाय गुलामांचाही एक वर्ग होता. अनैतिक गुन्हे केलेल्या किंवा बेवारशी स्त्रिया, मुले, पुरुष इत्यादिंना गुलाम समजत, पैकी स्त्रीला कुणबीण म्हणत. ती चांगल्या आचरणाने गुलामीमुक्त होई. गुलाम बाजारात विकत मिळत.

शिवशाहीत व पेशवाईत २ ते २५ रुपयापर्यंत बाजारात कुणबीण विकत मिळे त्यावेळी सर्व हिंदुस्थानभर गुलामांची चाल असे व त्यामुळे पेशव्यांच्या वेळी गुलामांचा व्यापार उघड चालत असे.

**समाज जीवन :** मराठी अंमलाखालील महाराष्ट्रीय समाजाचे जीवन.—महाराष्ट्रीय समाज वर्णाश्रम धर्म पाळणारा होता. मराठी राज्य स्थापन झाल्यावर सर्व समाज वर्णाश्रमाच्या शिस्तीत आणण्याचा प्रयत्न राज्यकर्त्यांकडून झाला. क्षत्रियांचा व्यवसाय राज्य संपादन करण्याचा व परचक्रापासून ते संभाळण्याचा. हा क्षात्रधर्म सर्व जातीत होता असे असूनही शास्त्रीपंडितांचा असा एक स्वतंत्र वर्ग होता. त्या काळी ज्ञातीधर्माचे पालन सर्व वर्णाचे लोक करीत. त्यावेळच्या समाजाचा देवभोळेपणावर अमर्याद पगडा होता. त्यांचा परंपरागत गोष्टीवर पूर्ण विश्वास होता. मुसलमानांच्या पीराला अनेक वर्षांच्या संस्कारामुळे स्वतःच्या हिंदु देवताइतकेच पूज्य मानून त्याच भावनेने ते भक्ती करीत. त्यावेळच्या वरच्या समाजामध्ये उपोषण किंवा प्रायोपवेशन करण्याची पद्धत होती. देवावर तसेच भुताखेतावर लोकांचा विश्वास होता. आजारी माणसावर उपचार करण्यास जेवढी वैद्यांची मदत घेत तेवढेच मंत्रतंत्राचे इलाज पंचाक्षरी बोलावून करीत. चेटूक करणाऱ्यास सरकारातून शिक्षा होई. जारण मारणविद्या शत्रूचा प्राण हरण करण्यासाठी उपयोगात आणीत. देवदेवस्की करणे, आजाराने माणसे पछाडली असता शांतीचा इलाज करण, गृहशांतीसाठी व संकटे टाळण्यासाठी व्रते, दाने, अनुष्ठाने व तुला करण्याची चाल होती. पायगुणावर लोकांचा विश्वास होता. मुहूर्ताची गरज पावलोपावली लागे. ग्रहण हे एक मोठे अरिष्ट वाटे.

ग्रहणात लोक शक्तीप्रमाणे दाने, स्नान जप करीत, त्या दिवशी इतर व्यवहार बंद असत. त्यावेळी जात शुद्ध राखण्याची नैतिक बंधने सर्व जाती पाळीत. काही स्त्रिया आता आपला संसार झाला, नवऱ्याच्या मागे जगून सुख काय या भावनेने आपखुशीने सती जात. समाज वहिष्काराचे हत्यार शिक्षा देण्यासाठी वारंवार उपसत. प्रत्येक जातीत त्या चालू असलेला व्यवसाय किंवा आचार पाळावयास सांगून ज्ञातीधर्माचे परिपालन करण्यास लावणे हे आपले परम कर्तव्य, असे पेशवे समजत.

कोणत्या जातीने कोणता धंदा करावा यासंबंधाने सूक्ष्म व स्थूल नियम असत, जातीधर्माचे पालन सर्वधर्माकडून व्हावे हा जणू त्यावेळच्या शासनाचा दंडकच होता.

**गुन्हेगारी व तपास.**—सार्वजनिक वस्तू खाजगी कामाकरिता सरकार परवानगीशिवाय वापरावयाची नाही, असा दंडक असे व पकड समन्स पाठवले असता त्याला पाठविले त्याचा खर्च निमंत्रितास द्यावा लागे. चोरांचा माग पावलांच्या ठशानी मोठ्या बारकाईने शोधण्याची पद्धत होती. चोरी झाल्यास तिचा माग काढणे हे काम बहुधा बेरड, रामोशी, मांग, महार यावर येई व ते तो धिटाईने ठिकठिकाणी जाऊन पार पाडीत. पेशवे

काळी गावातील व पंचक्रोशीतील लोक तेथील लोक जीवनात जागतेपणी भाग घेत.

**कुटुंब संस्था.**—त्या काळी समाईक कुटुंब संस्था होती. एका कुटुंबात पुरुष, स्त्रिया व मुले मिळून पंचवीस तीस माणसे असत व त्याचा प्रत्येक व्यक्तीस अभिमानही वाटे. मुले बापाच्या धाकात, धाकटे भाऊ वडील भावाच्या धाकात व स्त्रिया पुरुषांच्या धाकात अशी पद्धती होती. रोटी बेटी व्यवहाराचे बंधन पाळून ठरलेल्या व्यवहारात सर्व हिंदू जाती एक, त्यांचे देव समाईक, क्षेत्रे समाईक, सण समाईक व कित्येक धार्मिक संस्कार समाईक. त्यामुळे हिंदुतील जाती-जातीत काही बाबतीत तुटकपणा असला, तरी त्याहूनही अधिक बाबतीत ऐक्य असल्यामुळे त्यांच्यात परस्पराविषयी सख्य व प्रेम नांदे. पोटापाण्याचे व्यवसाय त्या त्या जातीत धर्माने व रुढीने वाटून दिले होते.

ह्या काळी खेडेगावात कायदा व सुव्यवस्था ठेवण्याचे कामी ग्रामपंचायती आणि गोतपंचायतीचा मोठा भाग असे. महाराष्ट्रातील अनेक लहान लहान जातीत गोतपंचायती अस्तित्वात होत्या. भटक्या जातींनी आपल्या जातीतील भांडणे, तंटेबखेडे सोडविण्यासाठी जात पंचायती पेशवे सरकारच्या अनुमतीने सुरू केल्या.

ह्या जात पचायतीत त्या त्या जातीतील लग्ने, भांडणे, इस्टेटीचे न्यायनिवाडे होत. हे तंटेबखेडे सोडविण्यासाठी त्यांना परंपरागत अधिकार होते.

**स्त्री जीवन.**—मध्ययुगात सर्व समाजावर धर्माची व रुढीची पकड होती. या पकडीतच पेशवाईत स्त्री जीवन जोपासले गेले. मुलींच्या शिक्षणाकडे त्या वेळी फारसे लक्ष दिले जात नसे. त्यांना घरकामेच शिकवली जात. सामान्य कुटुंबातल्या स्त्रियांना पुराण श्रवणासाठी जाणे जमत नसे. त्यांचा सारा वेळ गृहकृत्यातच जाई. पण उच्च घराण्यातील स्त्रिया पुस्तक संग्रह करीत. मुसलमान सरदारांच्या स्त्रियांनाही कुराणाची ओळख असे. रजपूत व मराठे सरदार घराण्यातील स्त्रिया प्रसंगी भाले फेकीत व तलवार चालविण्यात निपुण असत. त्या काळी घोड्यावर बसणे, हत्यारे चालविणे या गोष्टी स्त्रियांना जरुरीसाठी कराव्या लागत; त्यामुळे त्यांचे शिक्षण त्यांना ओघानेच मिळे. परंपरेने माहीत असलेल्या गोष्टी, ओव्या, लोकगीते व लोककथा यांचेच संस्कार ग्रामीण स्त्रीच्या मनावर होत असत, हेच तिचे शिक्षण. कथा-कीर्तन, निरुपण, प्रवचनही त्या ऐकत.

पेशवेकाळात महाराष्ट्रात जाती विवाह ही एक धार्मिक गोष्ट आहे असे सर्व मानीत. शिवकालात व पेशवेकालात बालविवाह होत. बहुधा एका पुरुषाची अनेक लग्ने होत. स्त्रिया सतराव्या-अठराव्या वर्षी माता होत त्यामुळेच बायका अल्पवयात मरत, त्यामुळे अंगवस्त्र ठेवणे फारसे दूषणास्पद समजले जात नसे. वैवाहिक व कौटुंबिक जीवन त्यावेळी दुष्ट चालीरीतींनी खच्चून भरलेले असताही सुखी होते. सती जाण्याची चालही प्रचारात होती.

शेतकऱ्यांच्या बायका पुरुषांच्या बरोबरीने पण अल्प श्रमाची शेतीची कामे करीत. मध्यम वर्गातील स्त्रियांना अर्थार्जनासाठी बाहेर पडता येत नसे. एवंच स्त्रियांच्या अर्थार्जनाचे क्षेत्र संकुचित होते. मात्र देवांगना, वारांगना, गणिका वगैरे जातीच्या स्त्रिया वेश्याव्यवसाय करून पैसे मिळवीत. तमाशातही बायका जात. वाघ्या-मुरळी सर्व महाराष्ट्रात आढळत. कुणबिणी व दासदासी बाळगण्याची चाल महाराष्ट्रात होती. दत्तक घेण्याची चाल होती; एकंदरीत सतराव्या आणि अठराव्या शतकात स्त्रियांचे व्यवसायाचे, किंबहुना वावरण्याचे क्षेत्र मर्यादित होते. तथापि या मर्यादित संसारात देखील शिव्या देण्यापासून खून करण्यापर्यंतचे अनेक तऱ्हेचे गुन्हे घडत होते. त्या काळात स्त्रीस राजकीय, सामाजिक, आर्थिक आणि नैतिक अधिकार फारसे नव्हते. तरीही स्त्रीजीवन केवळ दुःखमय होते असे म्हणवत नाही. वृद्ध स्त्रियांना घरात मानाने वागवीत.

**अस्पृश्यता**—पेशवाईत महार, मांग, चांभार, भंगी, ढोर इत्यादींना अस्पृश्य मानले जाई. त्यातल्या त्यात पाटील पटवारी यांस सरकारी कामकाजात मुख्यतः महार कामगारांची मदत होत असे. महाराष्ट्रांत अनेक गावात महार कामगार असत.

शेतमजुरीची कामे करणे, लग्नात वाजंत्री वाजविणे, यात्रेच्या हंगामात तमाशे करणे इत्यादी कामे महार कुटुंबे करीत. त्याशिवाय महाराची मुख्य कामे म्हणजे सरकारी वसूल, कागदपत्र इ. गावकामगार सांगतील त्या त्या ठिकाणी पोचविणे, सरकारी पीक पहाणे, सारा वसुली, गावकऱ्यांना सरकारी कामासाठी सरकारी अधिकाऱ्याकडे आणणे, गावात दवंडी देणे, चौकी पहारा करणे इ. कामासाठी सरकारातून क्वचित पगारही मिळे. काही गावात महारांना दोन वेळची भाकरी मागण्याचा हक्क होता. महारांची कामे पाहिली तर असे दिसून येते की महारावरच गावाला अवलंबून रहावे लागे.

शिवशाहीत व पेशवाईत महार, मांग, चांभार या अती शूद्रांना दूर ठेवले गेले. शास्त्रवचनाप्रमाणे त्यांचा शरीरस्पर्श, जलस्पर्श व देवालय-प्रवेश निषिद्ध मानीत.

**स्पर्शास्पर्श.**—अस्पृश्यांना मंदिर वा गृहप्रवेश निषिद्ध होता. अस्पृश्यांचे दर्शन झाले किंवा त्यांची सावली अंगावर पडली तरी विटाळ मानीत. एवंच अस्पृश्यांना सर्वत्र हिडीसफिडीसपणे वागवीत असत. या सामाजिक तिरस्काराचे दुःख अस्पृश्यांना अनिवार होई. सामाजिक जीवनातील अस्पृश्यता ही अस्पृश्यांना शतकानुशतके जाच करीत होती. पेशवाईत आपली लग्ने ब्राह्मणांनी लावावी असा महारांचा फार आग्रह होता. पण त्यावेळच्या शासनानेही त्याविरुद्ध निकाल दिला. सामाजिक व धार्मिक अन्याय महारांवर त्या काळी स्वराज्यात होत होते. सामाजिक कमीपणा तर महारांच्या पाचवीलाच पुजलेला होता. समाजातील अज्ञान हे त्यांच्या आपत्तीचे माहेरघर होते.

**गुलामगिरी.**—गुलामांची पद्धत त्यावेळी सर्व जगात चालू होती. पेशवाईत मात्र सरदार, श्रीमंत व सुखवस्तु लोक आपल्या पदरी कुणबिणी किंवा बटकी बाळगीत. कुणबिणींना गुलाम समजण्यात येत असे. तरी त्यांना चांगली वागणूक मिळे. कुणबिणीप्रमाणेच नायकिणींचा व्यवसाय करणाऱ्या अनेक स्त्रिया पेशवाईत होत्या. नायकिणीचा पिढीजात धंदा नाचणे व गाणे ही होय. पेशव्यांच्या व इतर सरदारांच्या दरबारात नायकिणींचे नृत्यगायन होत असे. केवळ महाराष्ट्रातीलच नव्हे तर भारतातील अनेक भागातून त्या काळी नायकिणी पुण्यास येत.

**मराठेकालीन संस्कृती.**—मराठी सत्तेच्या उदयापूर्वी चारशे वर्षे मुसलमानांची सत्ता सर्व देशभर कमी अधिक प्रमाणात चालू होती. त्यामुळे हिंदूंची देवस्थाने, क्षेत्रे भ्रष्ट झाली होती. औरंगजेबाचे कारकिर्दीत लोकांचा धर्मासंबधीचा जाच वाढला. तेव्हापासून लोक मोगलशाहीचे त्रासातून मुक्त होण्याचा विचार करू लागले. या विचारांना साथ देणारा शिवाजी राजा त्यांना मिळाला. एकट्या शिवाजी महाराजांनी मात्र युक्तीप्रयुक्तीनें व प्रसंगी त्यास टक्कर देऊन स्वराज्य उभारले व हिंदू संस्कृती पुन्हा वाढीस लावली. पेशवे काळात मराठ्यांनी दक्षिण उत्तर व पश्चिम हिंदुस्थान व्यापला. तेथील हिंदू सरदारांस अभय दिले.

मराठे सरदार उत्तर हिंदुस्थानात, कर्नाटकात जेथे जेथे कायम झाले तेथे तेथे त्यांनी आपल्या बरोबर काही महाराष्ट्रीय ब्राह्मण कामगार, त्यांचे उपाध्ये, शास्त्री, पुराणिक, जोशी, वैद्य, वैदिक, याज्ञिक, कथेकरी, हरिदास वगैरे मंडळी घेऊन गेले. त्यांनी आपल्या विद्येचा व कलेचा प्रसार केला. नवीन जिंकलेल्या प्रांतात महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या शुद्ध संस्कृतीचा प्रसार होत गेला आणि तद्देशीय ब्राह्मण विद्वान व सदाचारसंपन्न होऊ लागले. अशा रीतीनें मुसलमानी अमदानीत नष्ट भ्रष्ट झालेल्या हिंदूंच्या पूर्व संस्कृतीची दुरुस्ती व पुनरुज्जीवन मराठी राज्याचे उदयकालापासून होत आले.

मराठेशाहीत जमाखर्च लिहिण्याची चांगली शिस्त हिंदुस्थानातील पुष्कळ संस्थानिकांनी उचलली. त्याकरिता दक्षिणी कारकून आपल्या पदरी ठेवले.

मराठी अंमल जेथे जेथे कायम होई, तेथील मुसलमानी अमदानीपासून अपूजित राहिलेल्या देवस्थानांचा जीर्णोद्धार होऊन पूजाअर्चा, धूपदीप, नैवेद्य, उत्सव यांचा बंदोबस्त होऊ लागला. देवळातून पाठ, अनुष्ठाने, सप्ताह, पारायणे, जपजाप्य इत्यादी गोष्टी सुरु झाल्या. मुसलमानी अमदानीत नष्ट झालेल्या आचारांचा पुन्हा प्रसार सुरु झाला. देवळांचा जीर्णोद्धार संबंध हिंदुस्थानात मराठेशाहीमुळे होत गेला. क्षेत्रांच्या ठिकाणी मोगलानी विच्छिन्न केलेली देवळे, घाट, कुंडे, तीर्थे इत्यादी मराठ्यांनी पुन्हा कायम केली आणि धर्मशाळा बांधून अन्नछत्रे घातली.

काशी, प्रयाग, मथुरा, उज्जयिनी इत्यादी क्षेत्री चांगले विद्वान स्नानसंध्याशील तपस्वी ब्राह्मण बसवून त्यांस दायिते करून दिली. पठण-पाठणास उत्तेजन

दिले. ग्रंथलेखन चालविले, त्यामुळे दुर्मिळ ग्रंथ मिळू लागले. ते शिकून विद्वान पंडित तयार झाले. त्यांनी क्षेत्राचे ठिकाणी संस्कृत विद्येची पीठे पुन्हा स्थापली. त्यामुळे मुसलमानी अमदानीत सनातन धर्मास व आचारास आलेली ग्लानी दूर होऊ लागली. काश्मीर व नेपाळ या देशापासून नर्मदा-पावेतो सर्वत्र दक्षिणी पंडितास विशेष मान मिळत गेला. कथापुराणे, नाटके या शिवाय सर्कस, कुस्त्या इत्यादी दुसरे मनोरंजन प्रधान शिक्षणाचे महाराष्ट्रीय प्रकार उत्तर हिंदुस्थानी रयतेने उचलले. स्वराज्य स्थापनेनतर अहिंदूची हिंदुच्या देवालयावरील वक्रदृष्टी थांबली. स्वराज्यात देवालयांना संरक्षण मिळू लागले. विविध देवदेवस्थाने जागजागी होती त्यास दिवाबत्ती, नैवेद्य स्थान महात्म्य पाहून चालविले.

**वास्तुशिल्प.**—मराठ्यांना कधी स्वास्थ्य लाभले नाही. त्यांनी अत्यंत विकट परिस्थितीत नवे किल्ले बांधले आणि जुन्या किल्यांची डागडुजी केली. सिंधुदुर्ग, विजयदुर्ग यासारखे किल्ले शिवाजीने बांधले. ह्या किल्यांची तटबंदी, त्यातील मंदिरे, समाध्या, धर्मशाळा आजही आपल्याला शिवकालाची आठवण करून देतात. मन थक्क करून सोडतात. मराठ्यांची सत्ता स्थापन झाल्या-पासून नवी मंदिरे बांधणे, जुन्यांचा जीर्णोद्धार करणे, त्यांना वर्षासन देणे, धर्मादाय नेमणुका चालविणे, महालानिहाय धर्मकृत्यांकरिता नेमणुका करणे हा व्याप मराठे सरदारांनी आपल्या अंकित प्रदेशात चालविला. धर्मकृत्ये राज्यास श्रेयस्कर ही समजूत त्यांनी पाळली. तसेच हिंदुस्थानात विशेषत: उत्तर हिंदुस्थानात ज्या ज्या स्थळी शिवालयाची अनास्था झाल्याचे त्यांच्या नजरेस आले, त्या त्या ठिकाणच्या राज्यकर्त्यांकडून त्या देवस्थानाचा त्यांनी सक्तीने जीर्णोद्धार करविला.

मुसलमानी कारकीर्दीत देवस्थानांची जी पाडापाड होऊन विध्वंस झाला होता व जी तीर्थे लुप्तप्राय होऊन गेली होती, ती मराठे सरदारांनी शोधून काढण्याचे हुकूम काढिले. व त्यांचा जीर्णोद्धार करविला. काही नवीन बांधिली, यात्रेकरुंकरिता धर्मशाळा बांधल्या. अशा रितीने अनेक देवालयांचा जीर्णोद्धार करून आपण देवाब्राह्मणांचे कैवारी असा लौकिक मिळविला. द्वारका व ओखामंडळ ही पवित्र क्षेत्रे गायकवाडांनी आपल्या ताब्यात आणली.

**दायिते.**—दायिते देण्यात मराठी राज्यकर्त्यांचा हात कोणी धरू शकणार नाही. शिंदे, होळकर, गायकवाड, पटवर्धन आदि मराठे सत्ताधीशांनी खूपच दानधर्म केला. या सरदारांच्यापाशी असलेली दायित्वाची शेकडो दप्तरे याची साक्ष देतात. धर्मकर्मास कोणत्याही प्रकारचा अडथळा येऊ नये हा कटाक्ष मराठी जेत्यांनी पाळलेला दिसतो. मराठी राज्य हे श्रींचे. तिथे श्रींची कार्ये निर्विघ्न पार पाडली जावी, हे पहाण्याचे सर्वश्रेष्ठ काम राज्यकर्त्यांचे, ते मराठे राज्यकर्त्यांनी पार पाडलेले दिसते.

वर्षासनांच्या खैरातीबद्दल लिहावे तेवढे थोडेच. नाक्यावरील जकातीवर वर्षासन, धर्मादाय वर्षासन, कुटुंबवत्सल ब्राह्मण म्हणून वर्षासन, सदावर्ताबद्दल

वर्षासन अशा प्रकारच्या वर्षासनांबरोबर बैरागी, गोसावी, मुसलमान, फकीर यांसही वर्षासने दिलेली आढळतात.

दानधर्म ही अहिल्याबाईची सर्वात मोठी कर्तबगारी. भारतभर पसरलेल्या हिंदू तीर्थक्षेत्री यात्रिकांस अहिल्यादेवीची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. हरिद्वार, वाराणसी, सोमनाथ, मथुरा, वृंदावन ते थेट रामेश्वर, कन्याकुमारी या तीर्थक्षेत्री अहिल्याबाईंनी दानधर्मार्थ उभारलेले होळकरवाडे, अन्नछत्रे, सदावर्ते इत्यादी आहेतच. गयेच्या विष्णुपदी, काशीच्या विश्वेश्वरास, काठेवाडातील सोमनाथ मंदिरास, आंध्र प्रदेशातील श्रीशैल मल्लिकार्जुनास आणि रामेश्वर मंदिरास भेट देणाऱ्या यात्रेकरूंस अहिल्यादेवीच्या नामस्मरणाबरोबर साध्वी अहिल्याबाईचे पुण्यस्मरण, तिथे त्या त्या ठिकाणी घाट बांधणीमुळे, प्राकारांची दुरुस्ती केल्यामुळे, धर्मशाळा बांधल्यामुळे, अन्नछत्रे चालविल्यामुळे व देवस्थानांची दुरुस्ती केल्यामुळे होते. अहिल्याबाईंनी देशातील चार धामे, देशभर पसरलेली बारा ज्योतीर्लिंगे व सात अमरनगरी या प्रत्येक ठिकाणी मंदिरे बांधली, घाट, धर्मशाळा बांधल्या अनेक ठिकाणी दानधर्म केले. बांधलेले कित्येक घाट व मंदिरे फारच सुंदर, भव्य व प्रेक्षणीय असून भारतीय वास्तुकलेची ती उत्तम उदाहरणे आहेत. अनेक मंदिरात स्थापन केलेल्या मूर्तीही अत्यंत कलापूर्ण आहेत. अशा रितीने मराठी अमदानीत अहिल्याबाईंनी दानधर्म आणि अगणित बांधकामे यावर कोटयावधी रुपये खर्च केले.

नाना फडणिसासह अनेकांनी काशीत आपले वाडे बांधले. पेशवाईत कर्मनाशी, नीरा इत्यादींवर पूल झाले. पेशव्यांनी शनिवारवाडा बांधल्यावर त्याच धर्तीचे व क्वचित त्याहून मोठे मोठे वाडे मराठे सरदारांनी आपापल्या राजधान्यांत बांधले. वाडयांपेक्षाही देवालयांकडे पेशव्यांचा व त्यांच्या सरदारांचा पैसा अधिक खर्च झाला.

**शिक्षण.**—पेशवाईत व्यवहारशिक्षणावर जास्त भर असे. कारण व्यवहार शिक्षणाची गरज समाजातील अधिक लोकांना होती. सदर शिक्षण ब्राह्मण, प्रभु, वाणी, उदमी व मराठे या सर्व जातींतील मुले कमी अधिक प्रमाणात घेत. व्यवहारशिक्षणात अक्षर घटविणे व हिशेब तयार करणे यावर भर असे. त्याकरिता व इतर ज्ञानाकरिता कित्ते, संसारचौपडी, गणित, मराठ्यांच्या व मुसलमानांच्या बखरी, रामरक्षादी स्तोत्रे, जमाखर्चाची पद्धती, पत्रे लिहण्याचे मायने, लिखिते, मराठी कविता इत्यादिकांचा अभ्यासात समावेश असे. पुरुषाप्रमाणे थोर कुलांतील स्त्रियाही लिहीण्या-वाचण्यास शिकत. हे शिक्षण बहुजनसमाजासही मिळायला हवे, याची काळजी त्यावेळच्या सरंजामीवर्गाने घेतलेली दिसत नाही.

स्वराज्य निर्मितीत शिवाजी महाराज निमग्न होते. त्यामुळे विद्या आणि कला यांच्या निर्मितीकडे ते लक्ष देऊ शकले नाहीत. तरी महाराजांनी अज्ञानदास, भूषण इत्यादी शाहिरांचा परामर्ष घेतला आणि तुकाराम महाराज, समर्थ रामदास, रंगनाथ इत्यादिकांविषयी आदर व्यक्त केला. जयराम,

परमानंद, रघुनाथपंत हणमंते इत्यादि संस्कृततज्ञांना त्यांनी आश्रय दिला होता. शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापिल्यानंतर शूर मर्दांचे पोवाडे गाणारे शाहीर उदयाला आले; राजस्तुती करणारे संस्कृत पंडित पुढे सरसावले. महाराष्ट्राबाहेरील हिंदी प्रदेशात मराठ्यांच्या बिरुदावली गाणारे कवी निपजले आणि महाराष्ट्रांत प्रपंच आणि परमार्थ यांची सांगड घालणारे संत निर्माण झाले. या काळात राज्य विस्ताराबरोबर व दळणवळणाबरोबर ऐतिहासिक गद्याचा नव्याने उदय झाला. त्यामुळे बखरी सजल्या आणि उग्रो अधिक इतिहास तयार झाला.

पेशवाईत स्वराज्याचे साम्राज्य झाले. जीवन सुस्थिर व सुखवस्तु झाले. गृहस्थी नागरजीवन उपभागीत होते आणि शिपाई वर्षातून आठ महिने मुलखगिरी करत होते. या दोघांनाही तत्त्वज्ञानाबरोबरच मनोरंजन हवे होते. या गरजेतूनच डफ-तुणतुण्याच्या नादावर नाचणारी तमाशा ही संस्था उदयास आली. मध्वमुनीश्वर आणि अमृतराय यांनी कथाकिर्तनासाठी निरनिराळ्या रागदारीत पदे रचिली. पेशवाईच्या अखेरीला रामजोशी, अनंतफंदी, प्रभाकर, दातार, होनाजी बाळा, सगनभाऊ, परशुराम इत्यादी भिन्न जातीतील गुणीजन शाहीर उदयाला आले. शाहीरांच्या लावणीला विलासाचे व वैभवाचे तेज चढले. शाहीराची लावणी चित्ताला वेध लावणारी ठरली; तसेच वीरश्रीचे व शृंगारिक पोवाडे मराठी सैनिकांना व बहुजन मराठी प्रजेला विलासाप्रत नेऊ लागले होते. महिपती, श्रीधरस्वामी, मोरोपंत कवी पेशवेकाळात होऊन गेले.

समाजाच्या शाश्वत कल्याणासाठी शिवकाळात तुकाराम, रामदास व त्यांची शिष्य परंपरा झटली. पेशवाईत चाकणचे कवेश्वर, पांडवनाडीचे रामाजीपंत कोल्हटकर, कायगांव टोक्याचे नारायण दिक्षित पाटणकर, धावडशीचे ब्रम्हेंद्र-स्वामी, चिंचणेरचे ज्योतिपंत महाभागवत, बोरवनचे तुकाविप्र इत्यादी पेशवे-कालीन सत्पुरुषांनी वैराग्याचे धडे त्यावेळच्या समाजाला आपल्या कवनाद्वारे दिले. पण माधवरावांनंतर पेशव्यांच्या सत्तेस उतरती कळा लागली हे ठाऊक असूनही यापैकी एकाही सत्पुरुषाने स्वधर्म, स्वराज्यनिष्ठा जनमानसात रुजविण्याचे प्रयत्न केलेले दिसत नाहीत. या सत्पुरुषांनी लढाऊ महाराष्ट्रास त्याच्या गतवैभवाची, पराक्रमाची आठवण करून देऊन त्यांना स्वराज्यासाठी लढण्याला आपले स्वराज्य प्राणपणाने टिकविण्यासाठी उद्युक्त केले नाही.

**कलाकौशल्य.**—ह्या अंगात शिवाजी व पेशवे काळातील मराठे मागेच राहीले. यादव व तत्पूर्वीच्या राजांनी लेणी व मंदिरे यांच्या रुपाने वास्तुशास्त्र व मूर्तिकला यांची उपासना केली. ही गोष्ट मराठेशाहीत घडली नाही. रेखीव मंदिरे व त्यातील घडीव मूर्ती हा जो शिल्पकलेचा एक महत्त्वाचा प्रकार त्यात मराठ्यांनी फार लक्ष घातले नाही.

शिवाजी महाराजांनी किल्ले उभारले आणि काही किल्ल्यांची डागडुजी केली, यावरून महाराजांनी स्थापत्यकलेकडे लक्ष पुरविल्याचे दिसून येते. रायगड, राजगड, सिंधुदुर्ग आदी किल्यांतील शिवकालीन वास्तू त्यावेळच्या

स्थापत्य विकासाची कल्पना देतात. उत्तुंग आणि भव्य वास्तु बांधण्यासाठी मराठ्यांना शांतता लाभली नाही. पैसा व मनुष्यबळही मराठ्यांकडे नव्हते. देवळे, घाट, वाडे मात्र त्यांनी मोठ्या प्रमाणावर बांधले. पण त्यात लाकूडकाम केल्याने काही जळून गेले. मराठ्यांना स्वास्थ आणि द्रव्यबल नव्हते. म्हणून पेशवाईतील शिल्पे सुमार आढळतात. त्या काळी गोकाकच्या मृणमय चित्रांची व सावंतवाडीकडील फळांची चित्रकला, गंजीफा इत्यादींची ख्याती होती. गोकाक कलेचा स्वतंत्र संग्रहच शनिवारवाड्यातील एका दिवाणखान्यात करून त्यास गोकाक दिवाणखाना असे नाव देण्यात आल्याचे समजते. चित्रकलेकडे लक्ष पुरवून पेशव्यांनी तिला उत्तेजन दिले. पेशव्यांस चित्रांचा फार शौक होता. त्यांचा चित्रसंग्रह इतर सरदारांपेक्षा फार मोठा होता. जयपूर, जोधपूरकडील चित्रे पाहून त्यांना आपल्याकडेसुद्धा अशाच प्रकारची चित्रे असावी, असे वाटू लागले. नाना फडणीस कारभारी झाल्यावर त्याने पेशव्यांच्या दरबारी चितारी बाळगले व हिंदुस्थानातील ठिकठिकाणच्या राजेराजवाड्यांतून चित्रे आणण्याचा प्रयत्न सुरू केला. या कामी त्यांस शिंद्यांचे पुष्कळ सहाय्य झाले. चित्रकलेचा धंदा करून त्यावर पोट भरणारे लोक महाराष्ट्रात त्यावेळी काही होते. विशेषत: भिंतीवर चित्रे काढणाऱ्यांची संख्या बरीच मोठी असावी. कारण श्रीमंतांचे दिवाणखाने तसबिरींनी व ते शक्य नसल्यास नुसत्या भिंतीवरील चित्रांनी हटकून भूषविलेले असावयाचे.

**नृत्य.**—मराठेशाहीत लावणीनृत्यास जोर आलेला दिसतो. ते लोकप्रिय होते. कोळीनृत्य, धनगराचे गजानृत्य, गुगुलनृत्य, वाघ्या-मुरळीचे नृत्य, वासुदेव नृत्य व लेझीम या सारखे मर्दानी नृत्य यांची जोपासना महाराष्ट्रातील आमजनतेने केली. संगीताची उपासनाही महाराष्ट्राने त्या काळापासून सुरु केली. कुस्ती, लेझीम, विटीदांडू, बेंडल, हुतुतु, चेंडूफळी इत्यादी कितीतरी खेळ पंधराव्या-सोळाव्या शतकांत महाराष्ट्रांत रूढ झाले. मराठेशाहीतसुद्धा या खेळांना प्रोत्साहन मिळाले. यातच झिम्मा, रांगोळीचा अंतर्भाव होतो. मराठी अमलांत मुख्यत: पौराणिक नाटकेही होत. तमाशा किंवा लोकनाट्य हा तमाशाचा प्रकार फार पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. पेशव्यांनी त्यास उत्तेजन दिले.

**मराठेशाहीतील सण.**—शिवकालात व पेशवेकालात दसऱ्याच्या मुहूर्ताला मोहिमेसाठी मराठी सैन्य बाहेर पडे. विजयादशमी हा राष्ट्रीय सण समजून तो घरोघरी साजरा होत असे. अशा समारंभात पेशव्यांना किंवा वरिष्ठांना कनिष्ठांकडून जो नजराणा मिळे त्यास नजर म्हणत. वरिष्ठांकडून कनिष्ठांना जो पोशाख मिळे त्यास खिलत म्हणत. नवरात्रीचा समारंभ शाहू महाराजांनी बांधलेल्या रंगमहालाच्या देवघरात होत असे. प्रतिपदेच्या दिवशी घटस्थापना झाल्या दिवसापासून ते थेट दसऱ्यापर्यंत नऊ दिवसात सायंकाळी पुराण-प्रवचन, कलावंतीण, नायकिण यांच्या नाचाचा कार्यक्रम, बहुरुप्याचा खेळ आणि मध्यरात्रीनंतर पहाटेपर्यंत मंत्रजागर होई. ह्या नऊ दिवसांत दररोज ब्राह्मणभोजन



पेशवेकालीन गणपती मिरवणूक

होई व इतरांना सरकारी कोठीतून धान्य आणि शिधा देण्यात येई. अशाच प्रकारे शमीपूजन, शिंदे, होळकर, गायकवाड आपापल्या राजधान्यांत साजरा करत.

**होलिकोत्सव.**—होळी हा सण पेशवे कालात कनिष्ठ-वरिष्ठ जातीची माणसे एकत्र येऊन साजरा करीत. होळी पेटविणे, एकमेकांच्या अंगावर गुलाल, रंग, धूळ उडविणे, चिखल फेकणे हे खेळीमेळीने चाले. यात पेशवे स्वारी स्वत: भाग घेत असे.

मराठ्यांच्या संपर्कात आल्यामुळे मुसलमान राज्यकर्तेसुद्धा होळीसारखा सण मोठ्या उत्सवाने साजरा करीत आणि आपल्या हिंदू प्रजेच्या आनंदात सहभागी होत.

**आतषबाजी.**—आतषबाजी म्हणजे अग्नीक्रीडा. दिवाळीच्या मंगलप्रसंगी, लग्नसमारंभात आणि दुसऱ्या अनेक समारंभाच्या वेळी शोभेचे दारुकाम होई.

**गणेशोत्सव.**—स्वराज्यात छत्रपती भोसल्यांनी ठिकठिकाणी गणपती स्थापन केल्याचे उल्लेख आहेत. शंभू महादेव व भवानी अंबा ही छत्रपतींची कुलदैवते असली तरी गणपतीच्या देवालयास राज्याच्या व स्वामीच्या कल्याणाप्रीत्यर्थ इनाम जमीनी दिल्याचे दाखले आहेत. पेशव्यांचे दैवत गणपती म्हणून पेशवाईत गणेशोत्सव जोरात सुरु होते. गणेशोत्सव सरदार दरकदार यांचे घरीही होत व पेशवे काही सरदारांच्या घरी श्रीदर्शनास जात असत. सरदारांकडे १० ते १४ दिवस गणेशोत्सव होत असे.

कृष्णजन्माष्टमीचा उत्सवही पेशवे आणि त्यांचे सरदार आपले दरबारी व प्रजाजन मोठ्या थाटात साजरा करीत. एवंच मराठी सरदारांचा बराचसा काळ मुलुखगिरीमोहिमांत जाई, तरी मराठेशाहीत सर्व थरांत दसरा, दिवाळी, होळी, गणेशोत्सव, कृष्णजन्मासारखे समारंभ असीम उत्साहाने साजरे होत.

पेशवाईत भिक्षुक, शास्त्री, पंडित हरिदास, पुराणिक यांची चलती होती. अन्नसंतर्पण, दाने, व्रतवैकल्ये, प्रायश्चित्त वगैरे प्रकार सारखे चालू होते. त्रिलोकानंद स्वामी सावकारी करीत, तर धावडशीचे ब्रह्मेंद्रस्वामी शिष्यांकडून द्रव्य घेत. स्वामींप्रमाणे अग्निहोत्र्यांचाही परामर्श पेशवे घेत. यज्ञही होत व त्यावेळी ब्राह्मणांस दक्षिणा भरपूर वाटली जाई.

तुलादान करणे हे ऐपतदार गृहस्थ आपले कर्तव्य मानीत. तुलादान करणे म्हणजे आपल्या वजनाइतके द्रव्य दान करणे. सरकारी तुलादाने होत. तुलादानातून देवालये बांधली जात, हे त्यातल्या त्यात समाधानाचे समजले पाहिजे. तुलादानाने स्वर्गप्राप्ती होऊन पुन: जन्म घेतल्यावर राजपद प्राप्त होते, अशी समजूत होती. प्रायश्चित्त घेणे, आपत्ती आली म्हणून गृहशांती करणे, ब्राह्मणाकडून नमस्कार घालविणे, गोप्रदान, ब्राह्मणभोजने, व्रतवैकल्ये विधिपूर्वक करणे हे सर्व त्या काळी लोकांच्या धर्मसमजूतीप्रमाणे

चालू होते. मौनव्रत, तेलव्रत, रांगोळीचे उद्यापन, प्रतिपदाव्रत, रथसप्तमीव्रत, गोकुळअष्टमीव्रत, भोपळेव्रत, अशा व्रतांचे उद्यापन ब्राह्मणांकरवी होत असे. केशवपनाचा विधी होत असे. भ्रताराचा ठिकाणा लागला नाही तर तो मेला असे समजून पालाशविधी करीत. प्रतिकृती तयार करून त्याचा विधीपूर्वक दाह करणे, त्याला पालाशविधी म्हणतात.

**श्रावणमास दक्षिणा.**—ब्राह्मणांस श्रावणमासांत दक्षिणा देण्याचा प्रघात श्री शिवछत्रपतीच्या काळापासूनच होता. प्रतिवर्षी श्रावणमासाच्या निमित्ताने सरकारातून विद्वान ब्राह्मणांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे दक्षिणा देण्यात येई. ब्राह्मणत्वाबद्दल आदर एवढेच कारण नसून विद्वानांच्या संख्येत वाढ व्हावी हा मुख्य हेतू होता. संभाजी महाराजांच्या वधानंतर तळेगावचे खंडेराव दाभाडे सेनापती यांनी हे धर्मकृत्य हाती घेतले. त्यानंतर बाजीराव पेशव्यांनी ब्राह्मणास दक्षिणा दिली. ते काम पेशवाईच्या अखेरपर्यंत चालले. त्यावर प्रतिवर्षी पाच ते ७ लक्ष रु. खर्च होई. हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यातून दरवर्षी पुण्यात ७० ते ८० हजार ब्राह्मण दक्षिणा घेण्यासाठी जमत. १८१८ त पेशव्यांचे राज्य ब्रिटीशांनी घेतल्यावर दक्षिणेप्रीत्यर्थ होणारा खर्च ब्रिटीश सरकारने बंद केला आणि त्याच्या ऐवजी डेक्कन कॉलेज काढले.

**औषधोपचार.**—या काळात वैद्याचे औषध घेण्यापूर्वी प्रथम दैवी उपचार करून बघत. कारण औषधापेक्षा दैवी गोष्टीवर लोकांचा विश्वास जास्त होता. असे असले तरी औषधोपचाराचा अभ्यास व प्रत्यक्ष औषधोपचार यांच्यासाठी पेशवे सरकार चांगल्या वैद्यांना जमीनी इनाम देत. औषधोपचारांसाठी जसा आयुर्वेदी पद्धतीचा वापर होई, तसेच युनानी पद्धतीची औषधे व युरोपीय पद्धतीचे डॉक्टर यांचाही उपयोग करीत. इंग्रज डॉक्टर शस्त्रक्रीयेत प्रवीण होते. निखळलेले हाड बसविण्यासाठी व लढाईत गोळी लागून निकामी झालेला हात किंवा पाय कापण्यासाठी हाडवैद्य, शस्त्रवैद्यांची मदत लागे. हाडवैद्याचा मासिक रोजमुरा रुपये ३५ होता, तर शस्त्रवैद्यांना दरमहा रुपये १५ पासून २२ पर्यंत मिळे. शस्त्रवैद्य बहुधा मुसलमान असत. वैद्यांना राजाश्रय होता. वैद्यकशास्त्र न शिकलेल्या माणसाला वैद्यकी करण्यास व औषधोपचार करण्यास बंदी केली होती. प्राण्यांवर उपचार करणारेही वैद्य होते.

## मूल्यमापन :

**महाराष्ट्रात मराठी सत्ता का स्थापन झाली.**—इ. स. १३१८ पासून महाराष्ट्रावर मुसलमानी अंमल चालू झाला. मुसलमान राज्यकर्त्यांची दरबारी भाषा फार्सी होती. हे मुसलमानी राज्य सुमारे ३५० वर्षे चालले. या काळात ब्राह्मण, क्षैत्रिय, वैश्य भरडले गेले. शुद्रांपैकी खाटिक, तांबोळी, रंगारी, चांडाळ इत्यादितील काही मुसलमान झाले. काजी न्यायाधीश बनला व खाटिक वलुतेदार झाले. देवळांच्या मशिदी बनल्या तर समाध्यांचे

दर्गे झाले आणि राऊळांचे महाल बनले. हे चालू असतानाच पश्चिम किनाऱ्यावर डच, पोर्तुगिज, इंग्रज, फ्रेंच यांनी व्यापाराच्या निमित्ताने किनाऱ्यालगतचा मुलूख ताब्यात घेऊन मुख्यतः पोर्तुगिजांनी बहुसंख्य असलेल्या हिंदू प्रजेचे धर्मांतर सुरु केले. धर्मांतराबरोबरच हिंदू संस्कृतीचा व त्यांच्या ग्रंथांचा सर्व उपलब्ध मार्गांनी विध्वंस करू लागले. खेडवळांना जबरदस्तीने बाटवू लागले. न बाटणारास भयानक रितीने छळू लागले. मुसलमानांनी नगरांना व खेडेगावांना अरबी व फार्सी नावे देऊन हिंदू संस्कृती नष्ट करण्याचा उपक्रम सुरु केला. ह्या धार्मिक छळामुळे महाराष्ट्र क्षोभला होता. तो क्षोभ निवारण्याचे कामी समाजाच्या सर्व थरातून आलेले संत-संताचे तत्त्वज्ञान आणि शिकवण उपयोगी पडली. त्यांनी सामाजिक आणि धार्मिक उणिवाने सारी जनता हलवून सोडली. आपला धर्म, आपली संस्कृती जिवंत ठेवली. त्याच काळात दक्षिणेतील मुसलमानशाह्या बुडविण्यासाठी उत्तरेतील मोगलसत्ताधीश आक्रमण करू लागले ते निवारण्यासाठी ह्या मुसलमानशाह्यांनी मराठे सरदारांस हाताशी धरले. त्यांनी गनीमी युद्धपद्धतीने लढून मोगल आक्रमण थोपवून धरले. ह्या मराठे सरदारांपैकी शहाजीराजे हे एक होते. त्यांनी व त्यांचे पुत्र शिवाजीराजे यांनी परधर्मीयांपासून हिंदूधर्म संस्कृती, वाङ्मय इत्यादी रक्षण करण्यासाठी आपल्या पराक्रमाने थंड गोळयाप्रमाणे अचेतन बनलेल्या महाराष्ट्रांत चैतन्य ओतले. त्यामुळे पेशवेकालात स्वराज्याचा विस्तार झाला. राजपूत, बुंदेले, पठाण, रोहिले आदि मराठी सत्ता मानू लागले. त्यांना चौथाई वसूल देऊ लागले. मराठ्यांचा दबदबा सर्वत्र वाढला. मोगलबादशहाने आपली बादशाही टिकविण्यासाठी मराठ्यांशी इ. स. १७५२ मध्ये एक कराररनामा केला त्यामुळेच पानिपतचे युद्ध ओढवले. पण पुढे दिल्लीची बादशाही संभाळण्याची जबाबदारी त्यांच्या पराक्रमामुळे मराठ्यांकडे आली. मराठ्यांनी आपल्या कर्तबगारीमुळे हिंदुस्थानातील इतर प्रांतियांचे व राज्यकर्त्यांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले. मराठ्यांच्या वास्तवगुणांची पारख तत्कालीन हिंदुस्थानातील राजेरजवाड्यांस झाली होती.

**न्यायव्यवस्था.**—मोगलांच्या राज्यात न्यायालये फार कमी होती. मराठ्यांच्या राज्यात नियमबद्ध न्यायालयांची मुहूर्तमेढ माधवराव पेशव्यांच्या अमदानीत रोवली गेली हे खरे. तिचा स्वीकार मराठी राज्यात आपापल्या जहागिरीत मराठे सरदारांनी सामान्यतः इ. स. १७८० पासून केला. प्रजेला न्याय मिळावा म्हणून त्यांनी राज्यात अनेक ठिकाणी न्यायालये स्थापन करून त्यावर योग्य न्यायमूर्तिंच्या नेमणुका केल्या. गावोगावी पंचायती स्थापन करून त्यांना न्यायदानाचे विस्तृत अधिकार बहाल केले. मराठी राज्यात न्यायदान अत्यंत साधे, सरळ सोपे व स्वस्त होते. दानधर्मासाठी सरदारांनी अन्नछत्रे व सदावर्ते उघडली होती. त्यातून साधुसंताना, असहाय्य लोकांना आणि रंजल्या-गांजल्यांना मोफत जेवण, कपडे, कांबळी व धन देण्यात येई. मराठामंडळातील शिंदे, होळकर, पवार, गायकवाड, नागपूरकर भोसले व दक्षिणेतील पटवर्धन सरदारांनी आपापल्या जहागिरीत दानधर्माला फार महत्त्व दिले.

ह्या कामात अहिल्याबाई होळकर ह्या अग्रेसर होत्या. त्यांनी नद्यांच्या उगमस्थानी अनेक तीर्थक्षेत्रात आणि देशभर अनेक ठिकाणी अन्नछत्रे व सदावर्ते उघडली होती. त्या अफाट दानधर्म करीत. किंबहुना ब्राह्मणांना दानधर्म आणि पूजा करण्यासाठी अहिल्याबाईसह सर्व मराठे सरदार द्रव्य देत असत.

अहिल्याबाईंनी केलेली बांधकामेही प्रत्येक तीर्थक्षेत्रात आहेत. मुसलमान राज्यकर्त्यांनी देशातील अनेक मंदिरे, मूर्ती, तीर्थस्थाने व घाट वगैरे नष्ट करून टाकली होती. हिंदू संस्कृतीची ही प्रसादचिन्हे अनेक स्थानातून लोप पावली होती अशा काळात मराठे मंडळातील सरदारांनी पुढे होऊन मंदिरे व तीर्थक्षेत्रे यांच्या जीर्णोद्धाराचे एक महान कार्य केले.

पेशवे काल राज्यविस्ताराचा. त्या काळात शिपाईगडी सबंध वर्षभर मुलूखगिरीवर रहात असत. त्यांना मनोरंजन हवे होते. म्हणून तंबोरा आणि टाळ ह्यांच्या तालसुरावर रात्ररात्रभर कथा, कीर्तने करणाऱ्या हरदासी संस्था अस्तित्वात आल्या होत्या. शिपाईगड्यांचे मनोरंजन करण्यासाठी डफ-तुणतुण्याच्या नादावर व तालावर नृत्यगाणे करणारी तमाशा ही संस्था जन्माला आली. ह्या संस्थेने समाजाच्या सर्व थरांवर आपली पकड घट्ट बसविली, त्यामुळे लोक विलासी बनले. पेशवाईत महाराष्ट्राचा संबंध उत्तरेशी आला आणि तेथील संगीताचे सूर महाराष्ट्रात निनादू लागले. विलासी जीवनामुळे सर्व मराठेशाही किंकर्तव्यमूढ बनली. व मराठेशाहीचा ऱ्हास होण्यास हे एक कारण झाले.

**पेशवाईतील उणीवा.**—पेशवाईत नानासाहेब पेशव्याने व तद्नंतर माधवराव पेशव्यांनी सुरळीत कारभार करण्याचा प्रयत्न केला. पण भरभराटीसाठी व्यापार करण्याची कल्पना नानासाहेब पेशव्यास शिवली नाही. किंबहुना इंग्रज व्यापाऱ्याकडून धूर्तबुद्धीच्या नानासाहेब पेशव्याने हे शिकण्यास हवे होते. पण त्याकड त्याने पूर्ण दुर्लक्ष केले. समुद्रकिनारा ताब्यात असल्याशिवाय परदेशी व्यापार व परशत्रूचा बंदोबस्त होत नाही हे शिवाजीचे सूत्र पेशव्यापर्यंत पोहचले असते तर नानासाहेब पेशव्याने इंग्रजांची मदत घेऊन बलाढ्य आरमाराधिपती आंग्रे यांस बुडविले नसते. हे आरमार बुडाल्यापासून महाराष्ट्राचा पश्चिम किनारा इंग्रजांच्या ताब्यात गेला. समुद्रावर त्यांनी आपले वर्चस्व प्रस्थापित केले. लष्कर व व्यापार ह्यांच्या हालचालीसाठी राज्यात व राज्याबाहेर पक्के रस्ते हवेत, गावोगाव पाण्याची व्यवस्था पाहिजे पण त्यासाठी पेशव्यांनी स्वतंत्रखाते उघडून खास तरतुद केल्याचे दिसत नाही.

मुंबईत इंग्रजांचे कोणते उद्योग चालले होते याची दाद मुंबईजवळ पुण्यास असलेल्या पेशव्यांना नव्हती. व्यापारी मुंबईस राहून धनसंपन्न का होतात, याकडे त्यांचे लक्ष गेले नाही. युरोपात विज्ञानाचा प्रभाव पडून शास्त्रज्ञ निरनिराळे शोध लावीत होते. त्या शोधांचा उपयोग निरनिराळी यंत्रे शोधून काढून माणसाचे जीवन गतिमान, सुखी व समृद्ध करण्याकडे जगात होत होता.

या बदलाची कल्पना पेशवे दरबारातील मुत्सद्दी व शहाणे म्हणविणाऱ्यासही नव्हती. युरोपच्या सामान्य ज्ञानाच्या तुलनेत पेशवाईतील राज्यकर्त्यास इतिहास व भूगोलाचे ज्ञान अत्यल्प होते. लोकशिक्षण, विद्यापीठे, पदार्थ-संग्रहालये, विद्वानसभा, संशोधनसभा, पृथ्वीपर्यटने यांचा भारतात पत्ता नव्हता, नव्हे त्यावेळी समुद्रपर्यटन निषिद्ध मानले जात होते. अव्वल इंग्रजीतही समुद्रपर्यटन घडल्यास प्रायश्चित्त घ्यावे लागे. यावरून त्यावेळी आमची बुद्धी तोकडी होती असे म्हणावे लागते.

मराठ्यांचा पोर्तुगिज, डच, फ्रेंच, इंग्रज यांच्याशी सतराव्या शतकात घनिष्ट संबंध आला पण त्यांनी त्यांच्यापासून मुद्रणकला माहिती करून घेतली नाही. ती इंग्रजी अंमल सुरु झाल्यावर आली. आंग्रे, कदम, धुळप यांचा नौकानयनाशी संबंध होता. आंग्रे व धुळप मराठ्यांचे आरमारी सरदार होते. त्यांनी कधी लोहचुंबकाची तराफ बांधण्याच्या गोष्टींची माहिती मिळविली नाही, तशी ती कोणी कधी करून घेतल्याचा पुरावा नाही.

त्यावेळी जनता राजकारणापासून अलिप्त होती. राजकारण हा राजे-लोकांचा खेळ आहे आपण मुके, बिचारे आहोत असेच ते मानीत होते. पेशवाईच्या उत्तर काली जिकडे-तिकडे दंगेधोपे, जाळपोळ, छळ इत्यादिनी सर्वसामान्यांचे जीवीत असुरक्षीत झाले. उलट इंग्रज आले, दरारा बसला. जीवनाला सुरक्षितता आली. म्हणून त्यावेळची प्रजा मनातल्या मनात आनंदली. मराठ्यांचे व इंग्रजांचे युद्ध चालू असता कलकत्याला एक जाहीर सभा झाली. त्या सभेत मराठ्यांचा पराभव व्हावा व इंग्रजांचा जय व्हावा म्हणून सार्वजनिक प्रार्थना करण्यात आली. त्याचे कारण लुटारु मराठ्यांची दहशत बंगालने इतकी घेतली होती की, आम्हाला मुसलमान तर नकोच पण मराठेही विजयी व्हावयास नकोत. इंग्रज परवडले, असे कलकत्त्याकडील स्वदेशीयांना वाटले. शिवाजी महाराज, राणा प्रताप व थोरला माधवराव ह्या विभूती सोडल्या तर आपल्या इतिहासात हिंदूमध्ये पूज्यव्यक्ती नाहीत.

**परप्रांतीयांस दुखवले.**—मराठ्यांनी स्वराज्यांचे साम्राज्य करतांना सर्व हिंदूना आपणाकडे आकर्षण्यासारखे धोरण ठेवलेले दिसत नाही. आपल्या-विषयी इतर प्रांतीयात प्रेम उत्पन्न करण्यासारखे वर्तन ठेवलेले नव्हते. धनाढ्य व्यापारी मराठ्यांस अनुकूल असल्याचे दिसत नाही. म्हणजे राज्यात संपत्तीची पैदास दिसत नाही. प्रत्येक स्वारीचा व्यवहार आतबट्ट्याचा असण्याचा संभव फार. मराठ्यांच्या राज्याचे अवशेष म्हणून मुसलमानी राज्यकर्त्या-प्रमाणे टोलेजंग इमारती दिसत नाहीत. ह्याचे कारण मराठ्याजवळ पैसा नव्हता. राज्याची सांपत्तिकस्थीती शिवछत्रपतीनी लूट करून खजिना भरून बरी केली तो खजिना संभाजीच्या कालात रिकामा झाला. राजाराम छत्रपतीला निर्वासित होऊन जिंजीस जावे लागले आणि तेथून कर्ज काढून व काही मराठी प्रदेशाची विक्री करून निर्वाह करावा लागला. महाराष्ट्रात मराठे तळहाती शीर घेऊन औरंगजेबाशी सतत सत्तावीस वर्षे

लढले. त्यावेळी धावपळीचे, आघात-प्रत्याघाताचे जीवन होते. जगलेल्यांच्या खजिन्यात खडखडाट असावयाचा. औरंगजेब मेल्यावर पेशवे व मराठे सरदार उत्तरेत व दक्षिणेत अनिरुद्ध संचार करू लागले. खंडण्या घेऊ लागले. तरी मराठेशाहीचा सरकारी खजिना कर्जबाजारीच राहिला. थोरल्या बाजीरावाचे सरदार कोट कोट खजिना बाळगून होते. पण कर्जापायी त्याचे कपाळ मात्र छिनत चालले होते. बाळाजी बाजीरावाची तक्रार अशी, की उत्तरेकडून व दक्षिणेकडून सुवर्णनद्या वाहू लागल्या त्या पुण्यास न येता वाटेतच आटत. बाळाजी बाजीरावाच्या वेळेस इ. स. १७५८ च्या सुमारास दौलतीला सव्वा ते दीड कोट रुपये कर्ज असून ते फेडण्यासाठी सरदारांना वाटून दिले होते. व त्यांनी तो भार उचलण्याचे मान्य केले होते. त्यानंतर पानिपत युद्धप्रसंग उद्‌भवला, तो मोगल पातशाहीचे संरक्षण करण्याच्या करारामुळे. या करारामुळे मराठ्यांचा भारतात शत्रूप्रदेश उरला नाही, म्हणून त्यांना तत्वतः कोठेही लुटालूट करता येईना. करारानुसार ठरलेल्या रकमाही वेळच्या वेळी जमा न झाल्यामुळे वर्षानुवर्षे रकमांच्या ताक्या ओढवलेल्या तत्कालीन जमाखर्चात दिसतात. थोरल्या माधवरावाला तोफा ओतविण्यासाठी घरातील रोजच्या उपयोगाची सोन्या-रुप्याची भांडी मोडावी लागली. मृत्युपत्रात दौलतीचे कर्जवारावे असे नमूद करावे लागले. एवंच थोरल्या बाजीरावापासून थोरले माधवराव पेशवे कर्जात असलेले दिसतात. माधवराव पेशव्यांनंतर नारायणरावाचा खून होऊन राघोबादादाच्या पेशवा होण्याच्या महत्वाकांक्षेमुळे पहिले इंग्रज-मराठा युद्ध सुरू झाले. त्यामुळे हुजराती सैनिकांना वेळच्या वेळी नालबंदी व शिबंदी कर्ज काढून द्यावी लागली. ती न मिळाल्यास ते नोकरीवरून न विचारता निघून जात. अशा रीतीने मध्यवर्ती सत्तेकडे पैशाचा खडखडाट होता. नाना फडणीसाच्या काळात इतर सरदारांनी खंडणी घेऊन व लूट करून पैसा मिळवला. पण त्याचा वापर स्वतःच्या इस्टेटीत भर घालण्यात केला. त्यामुळे त्यांच्याकडून चिरस्मरणीय अशा कलाकृती किंवा वास्तु झाल्या नाहीत; परंतु मुसलमानी सत्तेचे जाचातून मराठ्यांनी रयतेस सोडविले हे मात्र निश्चित खरे.

**पराभवाची कारणे.**—हिंदुस्थानात इ. स. १७०० नंतर मोगल सत्ता दुबळी बनली. त्यानंतर त्याची जागा मराठी सत्तेने घेतली. मराठे मर्दुमकीत व पराक्रमात जगातील कोणत्याही योध्यापेक्षा कमी नव्हते. पण इंग्रजांपुढे त्यांना हार खावी लागली व मराठे मंडळातील घटकांस इंग्रजांचे मांडलिकत्व पत्करावे लागले याला अनेक कारणे आहेत ती अशी :—

(१) एवढे खरे की मराठ्यांची सत्ता सर्व हिंदुस्थानात नांदत होती. पण तिची राजकीय यंत्रणा नीट नव्हती. एकत्र कारभार नव्हता. पेशवे हे मराठी राज्याचे प्रमुख होते. त्यांनी थोरल्या माधवरावाच्या अंतापर्यंत सर्व घटकांना (शिंदे, होळकर, गायकवाड) आपल्या आज्ञेत ठेवले. नारायणरावाच्या खुनानंतर बालवयामुळे, पेशव्यांचा कारभार नाना फडणीस यांच्या हाती आला. नाना फडणीसाने पेशवाईचा कारभार स्वतःची सत्ता निरंकुश

करण्यासाठी केला. शिंद्याविरूद्ध होळकर, भोसल्याविरूद्ध शिंदे, कोल्हापूरकरांविरूद्ध पटवर्धन व पेशवे लढतांना दिसतात. याचा परिणाम असा झाला की स्वराष्ट्र व स्वातंत्र्य ह्या गोष्टी सर्व सरदार विसरून गेले. त्यांच्यामध्ये शिस्त राहीली नाही. व एकोपा तर बिलकूल नव्हता. इ. स. १८०० नंतर राष्ट्रीय आपत्तीच्यावेळी आपसातील वैरभाव विसरून त्यांना त्यावेळी कोणीही एकत्र आणले नाही. आपणा सर्वांचा मुख्य शत्रू जो इंग्रज त्याच्याशी एकीच्या जोरावर मुकाबला करण्याचे त्यांना साधले नाही. त्याचा परिणाम असा झाला की, इंग्रजानी प्रत्येक मराठा सरदारास एकएकटे गाठून त्यांचा पराभव केला व आपले मांडलिकत्व त्यांना स्वीकारण्यास भाग पाडले.

(२) मराठ्यांनी राज्याच्या अर्थव्यवस्थेकडे व व्यापाराकडे द्यावे तितके लक्ष दिलेले नाही. त्यामुळे लढवय्ये पेशवे, शिंदे, होळकर आदी मराठे सरदार नेहमी सावकारांच्या कर्जात होते. कर्ज फेडण्यासाठी शत्रूच्या मुलुखाची ते लुटालूट करू लागले. त्यामुळे तेथील प्रजा मराठ्यांना शत्रू मानू लागली. पण प्रजेने शरणागती पत्करल्यानंतर मराठ्यांना लूट करण्याची जागा राहीली नाही. त्यामुळे ते आणखी कर्जबाजारी होऊ लागले. पैशाच्या अभावी कारभारात ढिलेपणा आला. त्यामुळे चोर, लुटारु यांजपासून प्रजेचे संरक्षण करणे कठीण होऊन बसले. मराठ्यांनी इजारापद्धती चालू ठेवल्यामुळे शेतकऱ्यावर जुलूम होऊन ते इजारदारांना कंटाळले.

(३) मराठ्यांनी आपली गनिमी काव्याने लढण्याची पद्धती सोडून दिली.. स्वतःची नवीन कवाईती फौज तयार केली नाही.

(४) मराठ्यांना ज्या भूभागावर लढे द्यावयाचे त्याचे नकाशे तयार केले नाहीत. भूगोलाच्या अभ्यासाकडे त्यांनी आवश्यक तेवढे लक्ष दिले नाही. त्याचा परिणाम असा झाला की मराठी सैन्य कूच करीत असता नदी ओलांडावी लागणार की डोंगर तुडवावा लागणार याची त्यांना अचूक माहिती नसे. या उलट इंग्रजांना याची जाण होती. लढाईसाठी सैन्य ज्या गावातून जावयाचे त्या भागाचे नकाशे त्यांच्याकडे होते.

(५) इंग्रजाकडे लढाई लढण्याकरिता चांगली सुविद्या होती. युद्धकलेत निपुण व राजकारणात तरबेज लोक त्यांच्याकडे होते. मराठे राजकारणात इंग्रजाइतके निपुण नव्हते.

(६) पराभवाची सर्वात मुख्य कारणे अशी की, मराठ्यांनी विज्ञानाच्या विकासाकडे पाठ फिरविली. तसेच कडक शिस्त आणि लष्करी व्यवस्थेचे शिक्षण याजकडेही त्यांनी पाठ फिरवली. जे मुत्सद्दी मराठ्यांच्या राज्याची धुरा वाहत होते त्यांनी युरोपियन लोक येऊन कोणत्या रीतीने येथे राज्य स्थापण्याचा प्रयत्न करीत आहेत याची दखल घेतली नाही. चिमाजी अप्पा व बाजीराव यांनी वसई जिंकल्यावर आपल्याला आरमारीतळ व आरमारी जहाजे बांधण्यास महत्वाचे स्थान मिळाले याचा बोध त्यांना झाला नाही. किंवा तशा प्रकारची तजवीज करण्यासाठी योग्य पाऊले उचलली नाहीत.

पोर्तुगिजाकडे गोदी होत्या, तसेच बंदुका व तोफा तयार करण्याचे कारखाने होते. बंदुका तयार करणारे, तोफा ओतविणारे तज्ञ, निष्णात कारागीरही त्यांच्याकडे होते. मराठयांना ह्याच तज्ञांच्या सहाय्याने बंदुका तयार करण्याचा व गोदीमध्ये जहाजे बांधण्याचा कारखाना काढता आला असता. परंतु अशी बुद्धी त्यांना झाली नाही. पेशवे व त्यांचे हितकर्ते नाना फडणीसासारखे सेवक होते. पण विज्ञान विकासाबाबत ते कमालीचे उदासीन राहीले. ह्या बाबतीत त्यांनी स्वतःला अज्ञानात ठेविले. त्यामुळे विज्ञानाचा फायदा, लष्करी रचना, तोफखाना आणि कवायती फलटणी यांच्या शास्त्रोक्त विकास त्यांना करून घेता आला नाही.

मराठयांनी दूरदर्शीपणा दाखवून आपले लढाईचे तंत्र बदलून त्याजागी आधुनिक तंत्राचा स्वीकार केला असता तर आणि लढाई देतांना इंग्रजा-सारखी सैन्यरचना केली असती तर त्यांना इंग्रजांचा प्रतिकार करता आला असता.

(७) मराठयांच्या कोणत्याही कृत्यात सूसूत्रता व सुसंगत धोरण नव्हते. बहुनायकी होती. उत्तरेत मराठयातर्फे बादशाही ताब्यात घेऊन महादजी शिंदे कारभार करु लागले. ह्या सेनापतीच्या हाताखाली तुकोजी होळकर आणि समशेरबहाद्दर यांनी काम करावे पण असे न होता, हे दोन्ही सेनापती नाना फडणीसाच्या सांगण्यावरून शिंद्यांना त्रासदायक होतील अशा हालचाली करु लागले. महादजीचे न एकता त्याने सांगितलेल्या आज्ञा नाना फडणीसाकडे पाठवून त्यांच्या अंतीम आज्ञेची वाट पाहू लागले. अशा रीतीने राष्ट्रकार्य बाजूस राहून बहुनायकी निर्माण झाली.

(८) स्वातंत्र्य रक्षणाच्या एका ध्येयासाठी आपण एकत्र आले पाहिजे ते त्यांना उमगले नाही. त्यामुळे आपणा सर्वांचा शत्रू जो इंग्रज त्याविरूद्ध सर्व सरदार एक झाले नाहीत आणि इंग्रजांनी प्रत्येक मराठे सरदाराशी स्वतंत्र लढाई करून त्यांना शरण आणले.

दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीचे वर्णन तर करावयासच नको. त्याच्या कारकीर्दीत पुण्यातीलच नव्हे तर पेशव्यांच्या संबंध राज्यातील दंगेधोपे, लूट व स्त्री अपहरण यांचे प्रमाण खूपच वाढले. लोकांना जीवन असह्य होऊ लागल्या-मुळे लोक सामर्थ्यशाली इंग्रजांच्या आश्रयास जाऊ लागले.

बाजीरावानें आपल्या भोवती सर्जेराव घाटगेसारखी अगदी कोत्या मनाची व शून्य कर्तबगारीची माणसे जमा केली. तर इंग्रजांकडे लॉर्ड वेलस्ली व त्याचा भाऊ, एल्फिन्स्टन, सर जॉन माल्कम, डंकन, थॉमस मन्रो यासारखी बुद्धीने व कर्तृत्वाने निष्णात माणसे असल्यामुळे त्यांनी विजय मिळविणे साह-जिकच होते.

(९) इंग्रजांच्या यशाचे कारण त्यांची शोधक आणि चौकस बुद्धी आणि उच्च दर्जाची मुत्सद्देगिरी हे होय. पहिल्या इंग्रज-मराठे युद्धाच्या पूर्वी

ब्रिटीशांकडे मराठ्यांच्या सैन्याची जहागिरदारांची, त्यांच्या आपसातील संबंधाची, त्यांच्या कौटुंबिक भांडणाची अशी सर्व माहिती होती. कोणत्या मराठे सरदारास आपल्याकडे ओढून घेता येईल तसेच कोणते सरदार पेशव्याशी किती एकनिष्ठ आहेत याची माहिती इंग्रजांना होती.

युद्ध सुरू झाल्यावर इंग्रज लोक कोणत्याहि दिव्यातून जावयास तयार होते. वॉरन हेस्टिंग्ज, अन्डरसन, अप्टन, मॅलेट यासारख्या प्रत्येक राजकारणात भाग घेत असलेल्या इंग्रजाशिवाय आणखी कितीतरी इंग्रजांचे हस्तक मराठ्यांचे किल्ले, त्यातील सर्वांची माहिती घेत होते. सतत सात वर्षे मॉस्टीन पुण्याविषयीची माहिती मुंबईस व कलकत्यास पाठवत होता. अर्थात युद्धास प्रवृत्त करणारा मुख्य हस्तक हाच होता. या उलट मराठ्यांना इंग्रजांची काहीच माहिती नव्हती. इंग्रजाबद्दल त्यांना अज्ञान होते. मराठेकाली कोणी हिंदी, इंग्रजी भाषा बोलण्यात वाकबगार होऊन तो इंग्रजांशी इंग्रजीत पत्रव्यवहार करत होता असे ऐकिवात नाही. या उलट कित्येक इंग्रज लोक देशी भाषेत प्राविण्य मिळवून लीलया बोलत. मराठ्यांचा मुत्सद्दी नाना फडणीस यास बाहेरील जगाचे अज्ञान होते.

(१०) **शास्त्रोक्त पध्दतीचा अभाव.**—शिंद्यांचे कवायती, पायदळ व युद्धतंत्र हे परकीय लोकावर भिस्त ठेऊन उभारले होते. नवीन युद्धतंत्र आपल्या लोकांनी आत्मसात करण्याचा प्रयत्न केलाच नाही. त्यामुळे निर्णयात्मक लढायात शिंद्यांच्या कवाईती फौजेवरील इंग्रज व फ्रेंच अंमलदार आयत्यावेळी शिंद्यास सोडून तोफखान्यासह इंग्रजांना मिळाले. मराठ्यांना दारुण पराभव पत्करावा लागला. याला कारण मराठ्यांनी ज्ञानाची उपासना केली नाही हे होय.

(११) नाना फडणीसाने सवाई माधवराव पेशव्यांना व्यवहाराचे चांगले शिक्षण दिले नाही. मराठेशाहीच्या शेवटच्या काळात राजकारणात कर्त्या पण भिन्न मताच्या माणसांस संभाळून घेऊन त्यांचा उपयोग राष्ट्रकार्यासाठी करण्याची कोणासही बुद्धी न होऊन त्यांना उमाबाई होळकर, परसोजी भोसले, तुळसाबाई, विठोजी होळकर इत्यादिंचे खून झालेले पहावे लागले. दु. बाजीराव पेशवा ब्राह्मणभोजनासाठी लागला आणि दौलतराव शिंदे कबुतरे उडवित बसला. या दोघांची नीतीमत्ता अत्यंत निंद्य होती. राजे लोकांच्या या अनाचारामुळे प्रजाजनांची नीतीबंधने शिथील झाली असल्यास आश्चर्य नाही. दुसरा बाजीराव व दौलतराव शिंदे अशा नालायकांच्या हाती राष्ट्राची धुरा आली तेंव्हा दोघांनी राष्ट्रद्रोह करून स्वराज्य गमावले. मराठ्यांच्या कर्तृत्वाचे मुख्य मूल्यमापन सुप्रसिद्ध इतिहासकार सर जदुनाथ सरकार यांनी केले आहे ते असे :—

"मराठ्यांना हिंदुस्थानामध्ये अद्वितीय ऐतिहासिक महत्व प्राप्त झाले आहे. त्यांच्या अगदी अलिकडल्या पूर्वजांनी सुद्धा शेकडो लढाया मारून आपले देह धारातीर्थी ठेवले आहेत. व्यवस्थित रितीने मोठमोठ्या फौजांच्या हालचाली केल्या आहेत. विलक्षण राजकारणे लढविली आहेत.

साम्राज्यातील राजकीय प्रश्न उलगडून दाखविले आहेत. सारांश, त्यांनी आपल्या कृतीने अगदी अलिकडचा इतिहास बनविला आहे. बुध्दिची तीक्ष्णता, दिर्घोद्योग, साधी राहणी, उच्च विचारसरणी, कोणताही विचार आचरणात आणण्याची धमक, चारित्र्य इत्यादि सर्व गुणांचा मिलाफ मराठ्यांच्या ठिकाणी झालेला असल्यामुळे आज तरी हिंदुस्थानात त्यांच्या-पेक्षा वरचढ कोणी असेल अशी कल्पनासुद्धा करण्याचे कारण नाही. वरील सद्गुणसमुच्चयात जर मराठ्यांमध्ये संघटनचातुर्य, सहकारिता, आधुनिक यांत्रिक कलेचे ज्ञान आणि आहे त्याहून अधिक दूरदृष्टी, इतक्या गुणांची भर पडेल तर पृथ्वीच्या पाठीवर त्यांची बरोबरी कोणीही करु शकणार नाही."

## परिशिष्ट १

# मराठेशाहीतील मद्यपानविषयक धोरण आणि शासनव्यवस्था

मराठी राज्यात जे दारू करून विकत असत, त्यांना कलाल म्हणत. खाटीक किंवा तत्सम लोक दारूच्या भट्ट्या लावीत, दारू बनवीत व कलाल तिची विक्री करी. हे दारूविक्रीचे काम सरकारी परवान्यानेच होत असे.

शिवकालात द्राक्षाची किंवा मोहाची दारू पीत असत. पण दारूची दुकाने तुरळक होती व त्याजवर कोतवालाची व इतर सरकारी अधिकाऱ्यांची करडी नजर असे. गावात अगर चार गावाकरिता एक असे गावाबाहेर कलालाचे दुकान असे. कोणी व्यक्ती दारू पिऊन धुंद झालेली रस्त्यात किंवा वाड्यात दृष्टीस पडल्यास त्यास सरकार मोठे शासन करीत असे.

शिवकालात बहुतेक अष्टप्रधान विद्वान ब्राह्मण असत. त्यांनी मराठी राज्यात दारू पिण्यापासून लोकांना परावृत्त करण्यासाठी, पिणाऱ्यास जबर दंडाची व फटक्याची कडक शिक्षा करण्यासाठी राजाकडून हुकूम काढविले होते. सैनिकांवर शराबी पिण्याची बंदी होती[1].

थोरले माधवराव पेशवे यांनी न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांच्या सांगण्यावरून दारूविषयी तपशीलवार नियम करून ठेविले होते. पेशव्यांचे सरदार व जहागीरदार यांनी आपल्या अंकित प्रदेशांतील शहरात दारू विकू नये, अशी अट सरंजाम देताना घालण्यात येई. शिंदे, होळकर, पवार, गायकवाड या मराठे सरदार-जहागीरदारांनीसुद्धा ही अट आपापल्या अखत्यारीत कसोशीने घातलेली दिसते. पेशवेकाली दारूचे प्राबल्य होऊ न देण्याचे एकूण धोरण होते.

दारूच्या फुलाची भट्टी लावून फूल सरकारी कारखान्याचे कामास नेण्यास व दारूची भट्टी जेजुरीस चालविण्यास छाट वा खाटकास सरकारकडून इ. स. १७७८ त परवाना दिलेला आढळतो.* सरकारात या दारूभट्टीची रक्कम जमा झालेली दिसते[2].

दारू पिण्याचा गुन्हा करणारे सापडल्यावर सरकारने दारूच्या भट्ट्या मना करण्यासाठी व कलालांना म्हणजे दारूविक्री करणाऱ्या दुकानदारास दारूविक्री

---

१. आज्ञापत्र—वि. ज्ञा. वि. माला १९२३, पृ. २९; * भा. इ. सं. मं. जाने. जुलै १९५०, ले. ११,

२. चापेकर, पेशवाईच्या सावलींत, पृ. ४१.

बंद करण्याचे हुकूम काढले[१]. ह्या हुकुमाची अंमलबजावणीही त्वरित करण्यात आली. त्यावेळेपासून सरकारच्या भीतीमुळे मराठी राज्यात दारू पिणे व त्यापासून उत्पन्न मिळविणे या बाबी बंद झाल्या. लोकहितवादी लिहितात, की त्यावेळी समाजात दारू उत्पन्न करणाऱ्यास नीच मानीत आणि कोणी आपली झाडे त्यास दारू करण्यास दिली तर त्यास बहिष्कृत करीत आणि कोकणात अशी चाल होती की, दारू करणारा हातात दारू घेऊन जर अंगावरून गेला, तर दर्शन दोषास्तव स्नान करीत. दारू प्यालेला ब्राह्मण आढळला, तर त्यास निंद्य मानून जातीत घेत नसत. त्याचा सर्वांकडून धिक्कार होत असे.[२]

पण पैसा मिळविण्याच्या लालसेने चोरून दारूचा साठा करून विकणे चालत असे. असे साठ व चोरटी दुकान हुडकून काढण्यासाठी नाना फडणिसाने फिरस्ते प्यादे ठेविले होते. अशा एका पथकास इ. स. १७७६ त नारायण पेठेतील म्हातारी द्रविडी ब्राह्मण हिच्या घरी दारूने भरलेले वीस-पंचवीस शिसे व त्याजबरोबर खाण्यासाठी शिजविलेले मांस सापडले. ते जप्त करून तिला शासन करण्यात आले.[३]

मौजे पेठ पारगाव, तालुका खेड सरकार जुन्नर येथील बाळाजी धोंडदेव कुळकर्णी हा ब्राह्मण कलावंतिणीसमागमे गमन, मांसभक्षण व सुरापान करण्यात अट्टल निघाला, त्यास पंक्तीबाह्य केले व पुण्यातील ब्रह्मवृंदांनी एकत्र येऊन पृथ्वीप्रदक्षिणा व तीर्थस्नाने असे प्रायश्चित्त सांगितले.[४]

मद्यपानाविरुद्ध पेशवे सरकारचा कटाक्ष होता.

मद्यपानाविषयी खालील नमुनेदार तक्रार विशेष उल्लेखनीय आहे. सई दशमुखीण चिकोडीकर हिने मद्यपान करून बाळाजी हरी जोगळेकर यासी बदकर्म केले. उभयतांस अटक करण्यात आली.

पेशव्यांच्या कारकीर्दीत ब्राह्मणांनी दारू पिऊ नये, असा शासनाचा दंडक होता. दारू पिणाऱ्या ब्राह्मणास कैद करून किल्ल्यावर पाठवीत असत. नाशिक येथील ब्राह्मणवृंद मद्यपान करतात ; त्यात त्यांचा धर्माधिकारीही सामील आहे ; हे वृत्त सवाई माधवराव पेशव्यांच्या कानी येताच, त्यांनी सर्वोत्तम शंकर नावाच्या खास अधिकाऱ्यास नाशिकला याची चौकशी करण्यास पाठविले आणि आज्ञा दिली की, धर्माधिकारी यात सापडले त्यांचे धर्माधिकारीपण (वतन) जप्त करावे व सरसुभ्याचे हिशेबी जमा करावे. तसेच गुन्हेगार ब्राह्मणास अटक करून त्यांना पक्या बंदोबस्ताने घोडप, पटा व मुल्हेर या किल्ल्यांवर अटकेत ठेवण्यास पाठविणे.[५]

१. पे. द. ४३, ले. ३६.
२. लोकहितवादी, शतपत्र (सं. सहस्रबुद्धे), पृ. १३५-१३६.
३. पे. द. ४३, ले. १४४.
४. पे. द. भा. ४०, ले. २९
५. सवाई माधवराव रोजनिशी, भा. ३ (८), पृ. १२०

पेशवाईत अधिकारी-पाटील-कुलकर्णी यांनीसुद्धा दारू पिऊ नये, असा दंडक होता. कसबे खेडचे पाटील विठोजी सुलतानजी सतकर हे दारू प्यालेले सापडले असता त्याजपासून दहा हजार रुपये गुन्हेगारी घ्यावी, असा हुकूम पेशवे सरकारातून झाला. त्यावर बाळोजी पलांडे यांनी रदबदली करून अन्याय माफ करण्यास विनंती केली. तेव्हा माफ करून पुन्हा प्यालेला सापडल्यास त्याजकडून दहा हजार रुपये घेतले जातील, असा इशारा देऊन सोडून देण्यात आले. असे असता तो १७८७ च्या ऑगस्ट मासात दारू प्यालेल्या स्थितीत कोतवालास सापडला. तेव्हा त्यास दहा हजार रुपये दंड ठोठावण्यात आला पण त्याजवळ पैसे नसल्यामुळे व त्यास कोणी साक्षी रहाण्यास तयार होईना म्हणून त्याची निम्मी पाटीलकी वतनसंबंधे इनाम व हकदक, मानपान व इनाम जमीन एक चाहूर याची जप्ती केली[१]. राघो नारायण ब्राह्मण दारू पिऊन मावंद जेवणाच्या पंक्तीत बसल्याचे सापडल्यावर त्यास सर्व ब्राह्मण समुदायाने प्रायश्चित्त घेण्यास सांगितले.[२]

पेशव्यांचे राज्य इ. स. १८१८ त खालसा झाले, तरी पेशवाईतील मद्यपानविषयक गुन्हे नोंदण्याची व शिक्षा करण्याची चाल पुढे ४/५ वर्षे चालूच राहिली. इ. स. १८२१-२२ त मद्यपानविषयक गुन्हा नोंदला गेला तो असा: परीट जातीची सासू दारू प्याली व सुनांस मारू लागली. एक सून तळयात जीव देण्यास गेली, ते महालच्या शिपायाने पाहिले. सासऱ्याने सासूस (बायकोस) आवरावे ते केले नाही. तेव्हा महालातून परीट सासऱ्यास आठ आणे दंड करण्यात आला.[३]

यावरून असे दिसते की, तत्कालीन सरकार रयतेच्या भल्यासाठी दारूबंदीसारखे कायदे करून ते मोडणाऱ्यास कठोर शिक्षा करीत असे.

---

१. सवाई माधवराव रोजनिशी, भाग ३ (८), पृ. ११९.
२. पे. द. ४३, ले. १५९.
३. आवळसकर, 'नागाव', पृ. ९१.

## परिशिष्ट २

# युरोपियनास घडलेले १८ व्या शतकातील समाजदर्शन

१८ व्या शतकात मराठी सत्ता हिंदुस्थानात भरभराटीत होती. मराठी राज्याचे दप्तर पुण्यास पेशवे दप्तर म्हणून प्रसिद्ध आहे. त्यातील कागदपत्रातून १८ व्या शतकातील सामाजिक चालिरिती संबंधीची माहिती रा. ब. वाड यानी सिलेक्शन फ्रॉम सातारा राजाज व पेशवाज डायरीज ह्या शीर्षकाखाली ११ भागात प्रसिद्ध केली. रा. ब. सरदेसाईनी प्रसिद्ध केलेल्या पेशवे दप्तराच्या काही खंडात तुरळक सामाजिक माहिती सापडते. भारत इ. स. मंडळाच्या त्रैमासिकातून ही सामाजिक इतिहासाची साधने विखुरलेली आहेत. ह्या तत्कालीन एतद्देशीय साधनांचा उपयोग करून आपला १८ व्या शतकातील सामाजिक इतिहास सजविता येतो.

भारतीय खेड्यात हिंडून अभ्यास करणारे काही परकीय प्रवाशांनी लिहून ठेवलेली प्रवास वर्णने हीच त्या कालातील हिंदी खेड्यातील समाजस्थिती सांगणारी उपलब्ध साधने होत. राजकीय व स्वार्थी हेतूने प्रेरित होऊन इ. स. १६८९ सालापासून ईस्ट इंडिया कंपनीने भारतीय खेड्यांच्या अभ्यासास सुरुवात केली. नुसत्या व्यापारात आपले वर्चस्व स्थापिण्यापेक्षा भारतीय लोक व भारतीय भूभाग यावर वर्चस्व प्रस्थापिणे त्यांना महत्वाचे वाटत होते. ईस्ट इंडिया कंपनीचे इंग्लंडमधील वरिष्ठ अधिकारी त्यांच्या भारतातील अधिकाऱ्यांना कळवत असत की व्यापार वाढविणे हे जितके महत्वाचे तितके किंबहुना त्याहून जास्त महत्वाचे जमीन सारा वाढविणे हे होय. ईस्ट इंडिया कंपनीला आपले राजकीय वर्चस्व भारतावर प्रस्थापिण्यासाठी भारतीय खेड्यांचा अभ्यास इष्ट वाटला.

परकीयांचे लोकजीवनाबद्दल कुतुहल सतराव्या शतकातील भारतीय समाजाच्या अभ्यासाला प्रेरणा देणारा स्वार्थी व राजकीय हेतु फार काळ टिकला नाही. अठराव्या शतकाच्या मध्यापासून परकीय शक्तीत भारतीय खेड्यांच्या अभ्यासासाठी वेगळा दृष्टीकोन दिसून येतो. या भारतीय उपखंडातील जीवनाबद्दल एक प्रकारचे कुतुहल निर्माण झाले व भारतीय समाजपद्धती व जीवनपद्धती जाणून घेण्यासाठी पावले पडू लागली.

युरोपियन लोक, मिशनरी प्रवासी, लढवय्ये व लेखक म्हणून ह्या भरतखंडातील निरनिराळ्या भागात वावरले. विशेषत: १८ व्या शतकात त्यांना हिंदी समाज कसा दिसला ह्याचे वर्णन त्यांनी आपल्या डायरीत लिहून ठेवले

आहे. त्यापैकी काही प्रवासवर्णने प्रसिद्ध झाली आहेत. ह्या प्रवाशांना ग्रामीण भागात जाता आले नसेल. खरा समाज शेतकीवर रहातो. अलुते बलुतेदार हे गाव वतनदार त्याजशी बोलता आले नसेल. तरीही त्यांनी जे जे पाहिले ते लिहून ठेविले ते आज वाचले म्हणजे त्यावेळच्या समाजाचे चित्र आपल्या डोळ्यासमोर उभे रहाते.

परकीय लेखकात महाराष्ट्राच्या सामाजिक चाली, रीती रिवाज येथील सण, नाच, तमाशे गाणी यासंबंधीची इंग्रज लेखकानी क्वचीत लिहीलेली माहीती पुने रेसिडेन्सी रेकॉर्डस १४ व्हा मध्ये तुरळकपणे सापडते. मार्टीन एम् याने वेलस्लीचा पत्र व्यवहार ५ खंडात प्रसिद्ध केला. त्यातही माहीती आहे. ब्राऊटनही शिंद्याच्या फौजेबरोबर होता त्याने मराठ्यांच्या कॅपमधून लिहिलेली १८०९ सालची पत्रे सामाजिक चालिरितीविषयी बारकाव्याने बोलतात. इंग्रज लोकांना खालच्या हिंदी समाजात मिसळून त्याजकडून त्यांच्या रीतीरिवाजांची माहिती काढणे कटीण होते असा सूर अलेक्झांडर डोव्ह ह्या लेखकाने काढला आहे. ह्याने हिंदुस्तानचा इतिहास दोन भागात लिहिला असून तो १७७० मध्ये लंडन येथे प्रसिद्ध केला.

या उलट ख्रिस्ती मिशनऱ्यानी दिलेल्या हकिगती खऱ्या वाटतात. कारण त्यांना समाजाच्या कोणत्याही थरात जाण्याची आवड होती, तसेच समाजाच्या आवडी निवडी जाणून घेण्याची जिज्ञासा होती. हिंदी समाजाचे बुरसटलेले चित्र रंगवून त्यापेक्षा ख्रिस्तीसमाज कितीतरी पटीने चांगला अशा प्रकारचा प्रचार त्यांना करावयाचा होता. हेच त्यांच्या विजिगिषू वृत्तीचे कारण होते. तसेच त्यावेळचे रेसिडेंटचे रिपोर्ट, मेमोआयर्स, डायरीज, पार्लमेंटने प्रसिद्ध केलेले रिपोर्ट, परकीय प्रवाशांनी लिहून ठेवलेली प्रवासवृत्ते अशा प्रकारची अवाढव्य साधन सामुग्री १८ व्या शतकातील हिंदवासीयांच्या तत्कालीन साधनात सामाजिक इतिहासाची साधने होत. १९ व्या शतकाच्या पहिल्या दशकात बुचानन (हेमिल्टन) याने कंपनीने मिळविलेल्या मुलुखासंबंधीची गोळा केलेली माहिती अति विश्वासार्ह वाटते. कारण ही माहिती त्याने लोकांना प्रत्यक्ष भेटून बारीक निरीक्षण करून खऱ्याखोट्याचा पडताळा घेऊन जमा केलेली आहे. फ्रेंच मिशनरी दुबाईझ ह्याने दक्षिण हिंदुस्थानात २० वर्षे राहून हिंदू जीवनाविषयी माहिती घेऊन आपले पुस्तक सजविले आहे. ते ह्या विषयावरील साधन ग्रंथ म्हणून फारच उपयुक्त आहे. युरोपियन प्रवासी बर्नियर, बेव्हन, बर्नेल, कॅम्पेल, ग्रोझ, हॅमिलटन्, मनूची, ट्रेव्हरनिअर, हेस्टींग्ज, मालकम् एल्फीन्स्टन आदींनी ज्या हकीगती व वृत्तांत लिहून ठेवलेले आहेत ती सुद्धा १८ व्या शतकातील सामाजिक इतिहासाची साधनें आहेत. त्यावेळी कलकत्त्याहून प्रसिद्ध होत असलेले ॲसिएटीक ॲन्युअल रजिस्टरचे अंक सामाजिक माहिती देतात. त्यात इन्स्टिटयुशन ऑफ द मराठा पिपल नावाची मराठ्यांच्या चालिरीती, सण यांची माहिती देणारी लेखमाला विल्यम हेन्री टोन नावाच्या लष्करी अधिकाऱ्याने लिहिलेली होती. त्यावेळच्या मराठ्यांच्या धार्मिक सहिष्णुतेची यात खरीं माहिती आढळते.

अठराव्या शतकातील समाजस्थिती लक्षात घेण्यासाठी त्यावेळचा राजकीय पट डोळ्यासमोर आणावयास हवा. पंचवीस वर्षे महाराष्ट्राशी झगडून मोंगल बादशहा औरंगजेब १७०७ मध्ये अहमदनगरास चिरनिद्रीत झाला. राज्य केंद्रापासून २५ वर्षे दूर राहिल्यामुळे ठिकठिकाणचे मोगल सुभेदार बलिष्ठ झाले व औरंगजेब बादशहाचे पश्चात ते स्वतंत्र होण्याचा विचार करू लागले. औरंगजेबाचा दुबळा वारस महमदशहा याच्या कारकीर्दीत अयोध्या, बंगाल, हैदराबाद व कर्नाटक हे प्रांत स्वतंत्र झाले. १७३९ मध्ये नादिरशहाने दिल्लीवर स्वारी केल्यानंतर दिल्ली सत्तेचे कंबरडे मोडले, ती सत्ता साफ खिळखिळी झाली. ह्याच सुमारास तो चपल शूर सेनानी बाजीराव पेशवा थोरल्या शिवाजी महाराजांचे हिंदवी स्वराज्याचे स्वप्न साकार करण्यासाठी हजारो मर्द मराठे घोडेस्वार बरोबर घेऊन आसेतूहिमाचल घोडदौड करीत होता. इ. स. १७५० मध्ये मराठ्यांचे साम्राज्य गंगा किनाऱ्यापासून म्हैसूरच्या दरवाजापर्यंत विस्तारलेले होते.

१७६१ च्या पानिपत पराभवानंतर मात्र इंग्रजांचा प्रवेश हिंदी राजकारणात झाल्यामुळे निरनिराळ्या मराठे सरदारांत कलहाग्नी शिरला. शिंदे, होळकर गायकवाड हे मराठे सरदार राजे बनले. त्यांची आपसातील चुरस इंग्रजांना आपले स्थान बळकट करण्यास उपयोगी पडली.

१८ व्या शतकाच्या दुसऱ्या अर्ध्यात हिंदुस्थानात दोन समाज पद्धतीचा संघर्ष होत होता. ह्या दोन्ही समाज पद्धतीत राजकारण न्याय आणि अर्थकारण ह्यात साम्य बिलकूल नव्हते. युरोपियन लोक ह्या देशाचा व्यापार आपल्या ताब्यात ठेवण्यासाठी धडपडत होते. त्यांच्यात जात्याच राजकारण खेळण्यास लायक मुत्सद्देगिरीचे गुण एतद्देशीयापेक्षा प्रकर्षाने वास करीत होते. त्यामुळे त्यांनी मीरकासीम बरोबरचे भांडण, म्हैसूर संस्थानाबरोबरचा तंटा उकरून काढून इकडच्या राजांशी लढाया सुरू केल्या. त्यात विजय मिळविले. शेजारच्या श्रीमंत पण दुर्बळ राजामध्ये आपसात कलागती लावून दिल्या. ह्यांचे तंटे सोडविण्यासाठी बरीच मोठी रक्कम काढली व शेवटी टिपूचे राज्य गिळंकृत केले. पुढे पश्चिमेकडे पेशवे, उत्तर हिंदुस्थानात शिंदे, होळकर, भोसले वगैरे मराठे सरदार यांच्या बरोबरही कांहीना काही कारणाने इंग्रजांना लढण्याचा प्रसंग आला. मराठे सरदारांस एकएकटे गाठून इंग्रजांनी त्यांना मोडून काढले. अशारीतीने अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्रज व्यापारी कंपनीने हिंदुस्तानात इंग्रजी सत्तेचा पाया घातला त्यावर पुढील पन्नासवर्षात एकामागून एक इकडे आलेल्या अनेक साहसी, दृढ निश्चयी व स्वदेशाभिमानी इंग्रजांनी एकेक मजला चढवून इ. स. १८१८ च्या सुमारास हिंदुस्तानात बरेच मोठे साम्राज्य संपादन केले. इंग्रजांच्या व्यापारी वखारीचे रूपांतर मिलिटरी कँटोनमेंटमध्ये झाले.

१८ व्या शतकात हिंदी समाजावर बादशाही सत्ता नाममात्र होती. स्वतंत्र सुभेदार व मांडलिक राजे यांनी आपल्या राज्यात सरंजाम देऊन लष्करी लढवय्ये

सरदार उभे केले होते. सरदार म्हणजे जहागिरदार व पाळेगार बहुजन समाजावर सत्ता गाजवीत असत.

हा जमीनदार व पालेगार वर्ग राजमान्यतेमुळे संपन्न झाला होता. आपल्या जमीनीची मशागत कुळाकडे सोपविली व येणाऱ्या उत्पन्नाचा सिंहाचा वाटा त्यांनी आपल्याकडे ठेविला. तसेच जमीनसारा गोळा करण्याची जवाबदारी मालगुजारावर टाकली. आपल्या जहागिरी गावातील तंटे बखेडे सोडवून न्याय देण्याचे काम हे जहागिरदार करू लागले. तसेच गुन्हेगारांना धर्मरुढीप्रमाणे योग्य ते शासन करून सामाजिक नियंत्रणाची महत्वपूर्ण भूमिका ते बजावू लागले.

पेशव्यांनी मोंगलांचा शिरस्ता पाळला. जाहगिरदाराला प्रोत्साहन दिले. त्यामुळे ब्रिटीशांची सत्ता भारतात १८ व्या शतकाच्या शेवटी मूळ धरू लागली. तत्पूर्वी जमीनदार वर्ग भारतात स्थापन झाला होता. ज्या कोणाजवळ थोडीफार जमीन असेल तो जमीनदार म्हणून मान्यता देण्यात आली व जमीनदाराला सरकारची मान्यता मिळाली. उत्तर हिंदुस्थानातल्याप्रमाणे द. हिंदुस्थानातही जमीनदारी पद्धती प्रस्थापित झाली व वळुदार मालगुजार व खोत वर्ग अस्तित्वात आले.

सर जॉर्ज फॉरेस्टने दक्षिणेतील ब्रिटिशपूर्व काळातील स्थितीविषयी लिहिले आहे की, दक्षिणेतील स्थानिक राजे हे मूळचे जहागिरदार किंवा जमिनदार होते. इंग्लंडच्या उमरावांशी त्यांचे साम्य होते. युरोपातल्या प्रमाणे दक्षिणेतील जहागिरदारी वंशपरंपरेने चालत येऊन ती वडिलार्जित इस्टेट होऊन बसली. ज्या ज्या जहागिरदाराकडे जमिनी होत्या त्या त्यांचेकडेच राहू द्याव्या अशा मताचा एक वर्ग होता. सातारा राजाच्या राज्यातील जहागिरदारांच्या जमीनी व आपसातील त्यांची प्रजेची भांडणे ही सातारा राजाने मिटवावी असा त्यांचा कयास होता.

जहागिरदारांच्या बाबतीत एल्फिन्स्टनचे उदार धोरण होते. पेशव्यांनी जे सरदार जहागिरी देऊन निर्माण केले त्यांच्या वंशजाकडे कर्तुत्व नसतानाही जहागिरी चालू राहिल्या. त्यानी त्या आपल्या खाजगी मिळकती मानल्या आणि ते वहिवाटू लागले. इंग्रज सत्ता आल्यावर एल्फिन्स्टनने हे ठाऊक असूनही सातारा राजाने व पेशव्यानी ज्यांना जहागिरी व जमिनी पराक्रमाच्या मोबदल्यात दिल्या त्या त्यांच्या वंशजाकडे चालू रहाण्यास हरकत घेतली नाही. मात्र ह्याचा निकाल एल्फीन्स्टन नंतर ब्रिटीश सरकारने इनाम कमिशन बसवून त्यातील बरीचशी इनामे खालसा करून लावला.

ह्या काळातील परदेशस्थांचे लिखाण वाचले म्हणजे असे दिसून येते की एका लहानशा सरंजामी वर्गाच्या जोखडाखाली सबंध हिंदीसमाज खेकडयाने आपल्या पायाखाली अनेक मासे पकडून ठेवावे अशा रीतीने पकडला गेला होता. जहांगिर बादशहाच्या कारकीर्दीत हिंदुस्थानातील पेलसर्ट नावाचा डच प्रवासी म्हणतो की हिंदी सरंजामदार व संस्थानिक यांचे राजवाडे व वसाहतीगृहे ही संपत्तीने चकाकत होती. ही संपत्ती गरीबांच्या घामाद्वारे जमा केलेली

होती. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात बर्निअरच्या असे पहाण्यात आले की गरीब जनतेस कायद्याचे संरक्षण नाही. जे गरीब लोक आपल्या धन्याचे हुकूम मानण्यात अनमान करीत त्यांना कडक शासन होत असे. इतकेच नव्हे तर त्यांचे पोट भरण्यासाठी दिलेले कामही याजकडून काढून घेतले जात असे. शिवाय त्यांना दिलेले कर्ज फिटेपर्यंत त्यांच्या मुलांना गुलाम म्हणून ओलीस ठेवण्यात येत असे. बर्निअरच्या म्हणण्याप्रमाणे श्रीमंतांच्या समोर सर्व सुखे हात जोडून उभी होती आणि पैशाच्या जोरावर ते सर्व सुखे उपभोगत असत. ते राजाचा दिमाख दाखवित. गळ्यात चांगल्या मोत्यांची कंठी परिधान केल्याशिवाय घरातून बाहेर पडत नसत. केव्हा हत्तीवर बसून तर केव्हा अश्वारुढ होऊन व इतर वेळी सतत पालखीत बसून पदरी बाळगलेल्या घोडेस्वाराच्या व नोकर चाकऱ्यांच्या लव्याजम्यासह हे श्रीमंत निघत. पालखीच्या बरोबर, मागेपुढे व दोन्ही बाजूस चालणारे चाकर पालखीस रस्ता देण्यासाठी लयीत ओरडत. बरोबरच चौऱ्या व मोरचेल फिरवून श्रीमंतांच्या आजूबाजूस फिरकणाऱ्या माशांचा व डासांचा संहार करत. तसेच श्रीमंतांची तहान शमविण्यासाठी पाण्याच्या सुरई बरोबर घेत. शिवाय श्रीमंताना लहर येऊन एकादा व्यवहार आठवल्यास तो लिहून ठेवण्यासाठी हिशेब वह्या, कोरे कागद, दौत, लेखणी हेही साहित्य बरोबर वाहून नेले जात असे. परकी प्रवाशांना अठराव्या शतकात असे आढळले की मध्यवर्ती सत्तेच्या कमकुवतपणामुळे अनेक ठिकाणचे जमीनदार राजे बनले व प्रजेवर मन मानेल तसा जुलूम करू लागले. फार थोडे राजे ह्याला अपवाद होते. ह्या काळात मनगटात जोर असणारा सत्ताकाबीज करीत असे. त्यामुळे वारंवार सत्ताधीश बदलत असत व त्यांच्या लहरी प्रशासनाचे बरेवाईट परिणाम प्रजेस भोगावे लागत. यात प्रजेची लूटमारच जास्त होत असे.

रॉबर्ट ओर्मेहा मद्रास कौन्सिलचा सभासद होता. त्याने हिस्टॉरिकल फ्रॅगमेंटस ऑफ मोगल एम्पायर हा ग्रंथ लिहून ठेवला आहे. ह्या सुपारीच्या खांडा सारख्या ऐतिहासिक आठवणीत त्यावेळच्या राजे रजवाड्यांच्या, ऐदिउमरावांच्या आणि सामान्य प्रजाजनांच्या चालीरीतीचा खजाना सांपडतो. जमीनदार न्यायाधिशाला पैसे चारून आपल्याला हवा असलेला न्याय विकत घेत असे. अनियंत्रित राज्यकारभार हाकणारे सरंजामदार, पाळेगार व सुभेदार आपल्या लहरी कारभाराने प्रजाजनाचे शोषण करीत असत. एकाद्या व्यापाऱ्याकडून आपणास हवा असलेला पैसा उकळावयाचा असल्यास त्याजवर कोणाच्यातरी खुनाचा फुका आरोप ठेवून त्यास कैद करून गोठ्यात किंवा अडगळीच्या खोलीत कोंडून ठेवावे व त्याच्या सुटकेची किंमत म्हणून त्याच्याकडून ५० हजार ते एक लाख रुपये घेतल्यावर त्यास माफी देऊन सोडून द्यावे. अशा घटना त्याकाळी घडत असत. एल्फिन्स्टनच्या म्हणण्याप्रमाणे पेशवाईत गुन्ह्याच्या स्वरूपावरून शिक्षा न देता तो गुन्हा कोणत्या जातीच्या माणसाने केला हे लक्षात घेऊन शिक्षा दिली जाई. ब्राह्मणास शिक्षेत सवलती जास्त होत्या. तसेच त्यांना कैदेत सुद्धा चांगली वागणूक दिली जाई. ब्रह्महत्येचे

पाप सरकारवर येऊ नये म्हणून खूनी ब्राह्मणास कडेलोटाची शिक्षा वा मृत्यू दंडाची सजा दिली जात नसे. मालकमने हे भेदाभेद पाहिल्यावर लिहून ठेवले आहे की एतद्देशीय लोकांना न्यायाची समान वागणूक न मिळाल्यामुळे त्यामध्ये एकी राहिली नाही. त्यामुळेच आमचे राज्य इथे स्थापन होणे सोपे गेले. हिंदुस्थानातील लोक राजकीयदृष्टचा गोठलेला बर्फाचा एक समुद्रच. हिंदुस्थानातील एतद्देशीय राज्यकारभारात चैतन्य नसल्याने लोक आपणहून आनंदाने भाग घेतल्याचे दिसत नाही असे अलेक्झांडर डोव्ह लिहितो. जातीजातीतील उच्चनीचता समाजात रुढ झाली होती. श्रेष्ठ कनिष्ठ जातीत संघर्ष होत असून तसेच उच्च जाती कनिष्ठ जातीवर व गरीबावर अत्याचार करीत. त्यांना राजकर्त्याकडून न्यायाने संरक्षण मिळत नसे म्हणून ते नवीन येणाऱ्या कोणाही परक्या सत्ताधिशाचे प्रजाजन होणे तेवढयाच निष्ठेने स्विकारीत असत.

हिंदी समाजात जातीचे वर्चस्व व्यक्तिवर जन्मापासून असल्याचे ह्या परदेशी विचारवंताना दिसले. जातीचे सदस्यत्व व्यक्तिला जन्माने लाभते. साहजिकच शिक्षण, त्याच्यावर व्हावयाचे महत्वाचे संस्कार, त्याचा व्यवसाय, विवाह व त्याचे सामाजिक संबंध, जातीवरून ठरविले जात. यामध्ये व्यक्तिला कोणतेच स्वातंत्र्य नव्हते. प्रत्येक जातीचा परंपरागत व्यवसाय होता. जातीजातीतील सदस्यांनी तोच व्यवसाय केला पाहिजे असा दंडक होता व तिच्या सामाजिक सुरक्षतेची जबाबदारी जातीच उचलत असत. व्यवसायिक जातीनी आपले व्यवसायिक कौशल्य पिढचान्पिढचा सुरक्षित ठेवले. धार्मिक क्षेत्रातसुद्धा लोकमतानुसार जाती आपल्या नियमात बदल घडवून आणित असत. जातीपासूनचे फायदे ह्यांची नोंद हे प्रवासी लेखक करतात. हिंदुसमाजातील सर्व वर्गांना एकत्र आणणारा दुवा म्हणजे जाती. भारतीय समाजात ऐक्य निर्माण करण्याचे काम जातीने केले, अनेक वंशिक, व्यवसायीक, धार्मिक व सामाजिक गट आपल्या अस्तित्वाला बाधा न आणताही समाजपोषक असे कार्य सुसंघटीतरीत्या करीत होते.

जातीचे दुसरे महत्वाचे सामाजिक जीवनातील कार्य म्हणजे राजकीय स्थैर्य व संस्कृतिरक्षण होय. ह्याच काळात हिंदुधर्मीयांविरुद्ध पादरी लोकांच्या चळवळी सुरू झाल्या. त्यांना यशस्वीरीत्या तोंड देण्याची कामगिरी हिंदुधर्माने ह्या जातीबंधनामुळे केली.

समाजजीवनातील श्रमविभागाच्या व्यवस्थेमुळे परंपरागत व्यवसायाचे शिक्षण प्रत्येक जातीत नवीन पिढीला कुटुंबातच मिळे. सामाजिक जीवनसुद्धा जातीने घडविले होते. आर्थिक उत्पादनपद्धती, घरबांधणीचा नमुना, उच्च-श्रेष्ठत्वाच्या कल्पना, जीवनतत्वज्ञान याबाबतसुद्धा जातीचे नियम असत, असे हे परकीय लोक आपल्या लिखाणात कबूली देतात.

परंपरागत ग्रामीण आर्थिक जीवन पूर्णपणे जातीच्या प्रभावाखाली होते. व्यक्तीला स्वत:चे पेशाशिवाय व्यवसाय निवडीचे स्वातंत्र्य नव्हते. जातीप्रमाणे

व्यवसाय हे सूत्र सर्वमान्य असल्याने उत्पादनाला आवश्यक असणारी श्रम विभागणी स्वाभाविकपणे होत होती. हे व्यवसाय परंपरागतरीत्या एका पिढीकडून दुसऱ्यापिढीकडे जात असत यामुळेच खेड्याला त्याकाळी मिळालेल्या आर्थिक स्थैर्याचे श्रेय या जातीच्या श्रमविभागाला दिले पाहिजे. खेड्यातील बलुतेदारी पद्धतीचे गुणगान यामुळेच मालकम्, एल्फिन्स्टन, फोर्बस, पॉटींजर ह्या इंग्रज शासकानी केलेले आढळते.

ह्याच काळात उच्च जातीनी कनिष्ठ जातीवर अत्याचार केले. त्यांना मिळालेल्या विशेषाधिकाराचा दुरुपयोग केला. त्यामुळे श्रेष्ठ कनिष्ठ जातीत संघर्ष निर्माण झाल्याची उदाहरणे हे परके प्रवासी देतात.

फ्रेंच मिशनरी दुबॉयच्या मते जाती संस्थाच्या बंधनामुळे हिंदुसमाज ह्या कालातील विघटनेपासून वाचला.

भारतीय ग्रामीण समाजातील आर्थिक जीवन हे जातीच्या पायावर उभे होते. बलुतेदार पद्धतीत आर्थिक आणि सामाजिक संरक्षणाची कल्पना अभिप्रेत होती. बलुतेदाराला त्याच्या आयुष्यातील महत्वाच्या वेळी व संकट प्रसंगी त्याचे यजमान कुटुंब सर्वतोपरी सहाय्य करीत असे.

धर्म सहिष्णुतेचा, हिंदवासीयांच्या संपूर्ण जीवनावर फार मोठा प्रभाव आहे. त्याचे भावनात्मक, बौद्धिक व दैनंदिन जीवन त्यावेळी धर्माशीच निगडीत होते. प्रार्थना, शुभशकुन, मंत्रतंत्र, जादूटोणा यावर त्यावेळचा अशिक्षित समाज अधीक विश्वासून असे. प्रत्येक गावात आजही देवदेवतांची देवळे, मठ,आश्रमही पहावयास मिळतात त्याबरोबरच पुण्यासारख्या पेशव्यांच्या राजधानी शहरात मुसलमानाच्या मशिदी व ख्रिस्ती समाजाचे चर्च आहे. दोन्ही धर्माचे नागरीक सश्रद्धेने कोणत्याही प्रकारची मनात भीती न बाळगता आपापल्या प्रार्थना मंदिरात जाऊन प्रार्थना करीत असत. असे पेशव्याकडील इन्फंट्री रेजिमेंटमध्ये नोकरी करणाऱ्या टोन नावाच्या अधिकाऱ्याने लिहिले आहे. हिंदू मनाच्या थोर औदार्याची ही साक्षच होय असे तो लिहीतो. ह्या काळातील समाजधर्म श्रद्धेवरच जगत होता पण धर्मांध नव्हता असे फ्रेंच मिशनरी सांगतो. ह्या प्रवाशांनी येथील समाजातील लोकांचे पंथ, संप्रदाय, यांचेही सूक्ष्म निरीक्षण केलेले आढळते. पण त्यांच्या आचरणात कधीही माथेफिरूपणा अजून आला नाही. आपल्या म्हणण्याप्रमाणे शेजाऱ्याने धर्माचे पालन करावे अशी सक्ती राजेरजवाड्यापासून ते सामान्य नागरिकापर्यंत कोणीही केली नसल्याची ग्वाही ते आपल्या लिखाणातून देतात. सर्व समाजावर नियंत्रण ठेवण्याचे काम ही धर्म मंदिरे करीत असत. त्यावेळचा बहुजन समाज अशिक्षीत होता. संस्कृत, पर्शियन हे त्या त्या धर्माचा पुजारी वर्ग शिकत असे. पेशव्यांनी संस्कृतपंडीतास दक्षिणा देण्याची प्रथा सुरू केली त्यामुळे संस्कृत शिक्षणाचा प्रचार ब्राह्मण वर्गात होत असे. पण बाकीच्या मध्यम वर्गात लिहिता वाचता येणे, पत्रे लिहिणे, हिशोब ठेवणे इत्यादी पंतोजीकडून शिकविले जात असे असे, ॲडम म्हणतो.

**मनोरंजन.**—शेती हा त्या वेळच्या समाजाचा मुख्य व्यवसाय. दिवस भराच्या श्रमानंतर शेतकऱ्यास विरंगुळा वाटेल अशी खास मनोरंजनाची साधने त्यावेळी ह्या प्रवाशांच्या नजरेस आली. त्यातील मुख्य तमाशा, गोंधळ, बहुरूपी, सापाचा व नजरबंदीचा खेळ करणारे गारुडी, अस्वल घेऊन नाचणारे दरवेशी, ताकदीचे खेळ करून दाखविणारे गोपाळ लोक हे लोकांचे मनोरंजन करत.

ब्राह्मण, वैश्य, मराठे, धनगर व ख्रिश्चन या लोकांच्या चालीरीती,अन्न भक्षण, रीतीरिवाज, लग्न कार्यालयातील रिवाज, खाण्यापिण्याच्या सवयी व निर्बंध याचे चक्षुर्वैवसत्य वर्णन केलेले आढळते. कनिष्ठ जातीचे रितीरिवाज यातील धार्मिक समजुती यांचेही टिपण त्यांनी केलेले आढळते. प्रत्येक जातीच्या व्यवसायाबद्दलही त्यांनी लिहिले आहे.

त्यावेळच्या समाजात प्रचलित असलेल्या आचाराना व्यवहाराचे वेष्टन दिले होते. सामाजिक जीवनात संयम, शिस्त आणि विवेक दिसून येई. सामाजिक नीती व मूल्ये जपण्याचे त्या वेळच्या समाजाच्या प्रथेचे कौतुक परकीय लेखक खूप करतात. त्यावेळच्या समाजाचा जीवनविषयक दृष्टीकोन, त्यांच्या, नीती अनितीच्या कल्पना, भाषा, धर्म, श्रद्धा परंपरा, रुढी, रीतीरिवाज आणि मूल्य यासंबंधीची माहिती ह्या परकीयांच्या लिखाणातून भरपूर मिळते. त्यांचे लिखाण ही सामाजिक इतिहासाची अव्वल दर्जाची साधनेच होय.



परिशिष्ट ३

भोसले :


बाबाजी राजे भोसले (ज. इ. स. १५३३)
मालोजी राजे
=दीपाबाई निंबाळकर
(ज. इ. स. १५५२, मृ. इ. १६२०)
विठोजी राजे
शहाजी राजे
=जिजाबाई जाधव
शरीफजी राजे मृ. भातवडी (इ. स. १६२४)
=तुकाबाई मोहिते
एकोजी (व्यंकोजी) मृ. १६८५ आरंभ
संभाजी
मृ. १६५४
=मकाऊ
शिवाजी छत्रपती
=पहिली सईबाई,
दुसरी सोयराबाई
उमाजी द. घे.
(जिवी वंश)
संभाजी
=येसूबाई
१६५७-१६८९
राजाराम
=पहिली ताराबाई
दुसरी राजसबाई
शाहू छत्रपती सातारा (ज. १७-५-१६८२
व मृ. १५ डिसें. १७४९)
=प. सकवारबाई
=दु. सगुणाबाई
शिवाजी
(मृ. २४ मार्च
१७२६)
संभाजी
(कोल्हापूरकर)
रामराजा द.
(मृ. ९ डिसें. १७७७)
रामराजा
धाकटे शाहू द.
=आनंदीबाई मा. सा. शिर्के
१५ प्रतापसिंह बुवासा
(ज. १८ जानेवारी १७९३
मृ ४ ऑक्टोबर १८४७)
रामचंद्र भाऊसा.
(मृ. २१ जाने. १८२१)
शहाजी आपासा.
(ज. इ. १८०५
मृ. १ एप्रिल १८४८, राज्य खालसा)

## भट, पेशवे सातारकर छत्रपतीचे, कोकणस्थ ब्राम्हण गोत्र गार्ग्य



## भोसले (नागपूरकर)




**सत्ताधीश आणि सत्ताकाळ—**

(१) परसोजी (प्रथम) इ. स. १७०८ ते १७१०.
(२) कान्होजी इ. स. १७१० ते इ. स. १७३० (बंडाळी कैद. कैदेत मृत्यु १७३७).
(३) रघूजी (प्रथम) इ. स. १७२७ ते इ. स. १७५६.
(४) जानोजी इ. स. १७५६ ते इ. स. १७७२.
(५) रघूजी (द्वितीय) इ. स. १७७२ ते इ. स. १८१६.
(६) परसोजी (द्वितीय) इ. स. १८१७.
(७) मुधोजी आप्पासाहेब इंग्रजाकडून पदच्युत.

*बारभाईच्या काळात हे काही काळ सत्ताधारी होते.

## गायकवाड (बडोद्याचे)

(१) दमाजी (मृत्यु १७२१)

(२) पिलाजी दत्तक (इ. स. १७२१ ते इ. स. १७३२ एप्रिल ४)

(३) दमाजीबाबा इ. स. १७३२ ते इ. स. १७६८ ऑगष्ट १८

(४)
- गोविंदराव (इ. स. १७६८ ते १८००)
- फत्तेसिंह
- मानाजी

(५) (गोविंदरावाचे पुत्र)
- आनंदराव इ. स. १८०० ते १८१९
- फत्तेसिंह इ. स. १८०६ ते १८१८ ह्या काळात कारभार
- सयाजीराव इ. स. १८१९ ते इ. स. १८४७.

## शिंदे (ग्वाल्हेरचे), मूळ ठिकाण कण्हेरखेड--जि. सातारा




**सत्ताधारी आणि सत्ताकाळ—**

राणोजी इ. स. १७२५ ते इ. स. १७४५.
जयाप्पा इ. स. १७४५ ते इ. स. १७५५.
जनकोजी इ. स. १७५५ ते इ. स. १७६१.
महादजी इ. स. १७६१ ते इ. स. १७९४.
दौलतराव इ. स. १७९४ ते इ. स. १८२७.

*केदारजी आणि मानाजी हे दूरच्या नात्यातले. ह्यांना काही काळ राघोबाने सत्ता दिली होती.

---

## होळकर (इंदुरचे)




**सत्ताधारी आणि सत्ताकाळ—**

मल्हारराव इ. स. १७३२ ते १७६६.
तुकोजी इ. स. १७६५ ते १७९७.
यशवंतराव इ. स. १७९७ ते १८११.

## कारकिर्द

**छत्रपती**

**सत्ताधीश आणि सत्ताकाळ—**

(१) छत्रपती शिवाजी : मराठी राज्याचा संस्थापक इ. स. १६७४ ते १६८०.
(२) छत्रपती संभाजी इ. स. १६८० ते इ. स. १६८९.
(३) छत्रपती राजाराम इ. स. १६८९ ते इ. स. १७००.
(४) छत्रपती दुसरा शिवाजी इ. स. १७०० ते इ. स. १७०७. (मातोश्री ताराबाईचा कारभार)

**सातारा गादी—**

(५) शाहू इ. स. १७०८ ते इ. स. १७४९.
(६) रामराजा इ. स. १७४९ ते इ. स. १७७७.
(७) धाकटे शाहू इ. स. १७७७ ते इ. स. १७९३.
(८) प्रतापसिंह इ. स. १७९३ ते इ. स. १८३९.
(९) शहाजी (आप्पासाहेब) इ. स. १८३९ ते इ. स. १८४८.

**कोल्हापूर गादी—**

४-अ. संभाजी इ. स. १७१४ ते इ. स. १७३०.
५-अ. शिवाजी इ. स. १७६० ते इ. स. १८१२.
६-अ. संभाजी इ. स. १८१२ ते इ. स. १८२२.
७-अ. शहाजी (बुवासाहेब) इ. स. १८२२ ते इ. स. १८३८.

(संस्थान भारतात विलीन १९४८)

**पेशवे—**

(१) बाळाजी विश्वनाथ इ. स. १७१३ ते १७२०.
(२) पहिला बाजीराव इ. स. १७२० ते इ. स. १७४०.
(३) नानासाहेब इ. स. १७४० ते १७६१.
(४) माधवराव इ. स. १७६१ ते इ. स. १७७२.
(५) नारायणराव इ. स. १७७२ ते इ. स. १७७३.
(६) सवाई माधवराव इ. स. १७७४ ते इ. स. १७९५.
(७) दुसरा बाजीराव इ. स. १७९५ ते इ. स. १८१८.

---

शामुना—ए–१३७—मरासासमंमुं –४–८८—१,१२५—पीआर ८ *

# संदर्भ ग्रंथसूची

## मराठी

### हस्तलिखित


**पेशवा दप्तर, पुणे :**

रोजकिर्द रुमाल, जकात ताळेबंद फेरिस्त २६, रु. नं. ७३, ७४.

संशोधनासाठी निवडलेले कागद, रु. नं. १, ३, ६, ९, १४, १७, २१, २५, २६.

प्रांत अजमास दक्षिण कोकण रुमाल ६४९ ते ६५५, डेक्कन कमिशनर्स फाईल्स नं. १४९ ते १५४.

**कोल्हापूर रेकॉर्ड ऑफीस :**

निवडी दप्तर रु. ७४, पु नं. ३, रु. ४८, पु. नं. १, का. सं. ७३७१-७३८१, ७४२२-३२, ७४३३-३५, रुमाल ८०, पुडके १, रु. २९, पुडके १.

पारसनिशी दप्तर, रु. २ ते ५, १४, ३१ व ३३.

**बडोदे राज्य दप्तर ऑफीस :**

फेरिस्त नं. ४, दप्तर नं. ३९५, ३९७, ४०१, ४०२, ४१२, द. नं. २७९, पु. १-२०, द. नं. २७०-२८४, मुलुखगिरी ताळेबंद.

बडोदे रेसिडेन्सी रेकॉर्डस (इंग्रजी).

मुंबई दप्तरखाना (इंग्रजी)

सिक्रेट ॲन्ड पोलिटिकल डिपार्टमेंट डायरीज अनुक्रमांक : १४, १६, १८, १९ ए, २१-२३, ६६ए, ७७, ९५, ११७, १२३, १२५, १२६, १२९, १३० ए, १३५, १३९, १४०, १४१, १४३, १४४, १४८, १५८, १६२, १७९, २०५, २०६, २०९, २११, २५७, २७८.

(१) बाणकोट फॅक्टरी डायरीज इ. स. १७५६ ते १८१४.

(२) बेलापूर डायरी नं. १ (२८५).

(३) फोर्ट व्हिक्टोरिया-बाणकोट रेसिडेन्सी डायरी क्र. १६८.

(४) कल्याण रेसिडेन्सी डायरी, व्हॉ. १.

(५) कारंजा रेसिडेन्सी डायरी, व्हॉ. २३.

पब्लिक डिपार्टमेंट डायरी, व्हॉल्यूम ५, ६, ६ए, ८-१०, १२ए, १३ ए, १३४ सी, १७ इ, १८ ए, २०, २४, ३१, ३२, ३३, ३७, ३९, ५०, ९०.


### अव्वल प्रकाशित


| | |
|---|---|
| आज्ञापत्र .. .. .. | सं. खरे, ग. ह. व भिडे, एस. आर. पुणे, १९६० |
| आंग्रेकालीन अष्टागार .. .. | शां. वि. आवळसकर, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे. |
| आंग्रेकालीन पत्रव्यवहार .. .. | शां. वि. आवळसकर, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे. |

इतिहास संग्रह .. .. .. भाग १ ते ७, पारसनीस संपादित (इ. स. १९०१ ते १९१६) पेशवे दप्तरांतील माहिती, ऐतिहासिक गोष्टी, चरित्रे, टिपणे, लेख वगैरे.

ईस्ट इंडिया कंपनीचा पेशवे दरबारशी फारसी पत्रव्यवहार, पुणे, १९२३.

ऐतिहासिक लेख संग्रह भाग १ ते १४, संपा. वा. वा. खरे.

ऐतिहासिक पत्रव्यवहार .. .. सं. गो. स. सरदेसाई, कृ. पां. कुलकर्णी, या. मा. काळे, पुणे, १९३३.

ऐतिहासिक संकीर्ण साहित्य .. खंड १ ते १६, प्रकाशक–भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.

ऐतिहासिक संकीर्ण निबंध .. .. खंड १ ते १९, प्रकाशक–भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.

ऐतिहासिक फारशी साहित्य .. .. खंड १ ते १७, प्रकाशक–भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.

करवीरछत्रपती घराण्याच्या इतिहासाची साधने. भाग १ ते ८, संपा. मा. वि. गुजर.

काव्येतिहास संग्रहात प्रसिद्ध झालेले ऐतिहासिक पत्रे, यादी वगैरे लेख, आवृत्ती २ री संपा. सरदेसाई, गो. स. वाकसकर, वि. स., काळे या. मा., पुणे, १९३७.

कोकणच्या इतिहासाची साधने .. संपा. वि. गो. खोबरेकर व शिंदे, मुंबई, १९७१.

कोल्हापूर–पोर्तुगीज संबंध .. .. संपा. डॉ. प्र. पां. शिरोडकर, गोवा.

चंद्रचूड दप्तर .. .. भाग १ ला, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे

छत्रपतीशी दिल्लीपतींचा पत्रव्यवहार .. संपा. गो. का. चांदोरकर, दिल्ली बादशहाकडून छत्रपतींकडे आलेल्या फारशी फर्मानांचे सातारा दप्तरांतील जुने मराठी तर्जुमे तसेच दिल्लीकर मोंगल व शाहू छत्रपती यांतील पत्रव्यवहार.

तह व करार मदार .. .. संपा. पु. वि. मावजी व द. ब. पारसनीस, मुंबई, १९१४.

दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, यादी वगैरे. संपा. पु. वि. मावजी व द. ब. पारसनीस, मुंबई, १९०८.

नागपूर अफेअर्स .. .. भाग १, २, संपा. वि. शं. शेजवलकर, डेक्कन कॉलेज, पुणे.

पुरंदरे दप्तर .. .. भाग १ ते ३, संपा. कृ. वा. पुरंदरे.

पेशवे दप्तरांतून निवडलेले सातारकर महाराज व पेशवे रोजनिशी यांतील निवडक उतारे भाग १ ते ११, संपा. रा. ब. ग. चिं. वाड.

पेशवे दप्तरातून निवडलेले कागद भाग १ ते ४५. संपा. रियासतकार गो. स. सरदेसाई.

पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्र-व्यवहार. संपा. रा. वि. ओतुरकर.

फौज सरंजामासंबंधी माहिती .. संपा. मावजी व पारसनीस.

बडोदे राज्य दप्तरातील वेचे भाग १ ते ७, संपा. चि. वि. जोशी.

भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे, अहवाल शके १८३२, पुणे, १९११.

भारत इतिहास संशोधक मंडळ पुणे, वार्षिक इतिवृत्त, शके १८३६, १८३७.

भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे .. अहवाल द्वितीय शके १८३६, तृतीय, शके १८३७, पंचम, शके १८३९, शष्ठ, शके १८४० व सप्तम संमेलन वृत्त, शके १८२१.

मराठ्यांच्या इतिहासाची साधने .. भारत इतिहास संशोधक मंडळ ग्रंथमाला, खंड १, ३, ६, ८, १०, १२, १३, १४, २१, २४, २६, २७, संपा. वि. का. राजवाडे.

महाराष्ट्रेतिहासाची साधने भाग १ ते ३, संपा. वा. सी. बेंद्रे.

मराठ्यांच्या इतिहासाची साधने, (पोर्तुगीज दप्तर) अनु. स. शं. देसाई.

वैद्य दप्तरातून निवडलेले कागद भाग १ ते ७, संपा. शं. ल. वैद्य.

शास्त्री दप्तरातील वेचे (१७९९-१८३९) बडोदे सरकार, बडोदे, १९४८.

शिंदेशाही इतिहासाची साधने भाग १ ते ३, संपा. आनंदराव फाळके.

सेनापती दाभाड दप्तर .. भाग १ ला, संपा. शं. ना. जोशी, रा. वि. ओतुरकर.

हिंगणे दप्तर .. .. भाग १ व २, संपा. ग. ह. खरे, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे.

होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, पत्र-व्यवहार. खंड १ व २, संपा. अ. ना. भागवत, १९२४.

## बखर

आंग्रे यांची हकिकत "इतिहास संग्रह" संपा. ना. सं. डबीर, जुलै १९०९.

चेऊलची बखर .. .. .. संपा. वि. गो. विजापूरकर, कोल्हापूर, १९०१.

दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, यादी वगैरे. संपा. पु. वि. मावजी, पुणे, १९०८.

दाभाडे सेनापती यांची हकिकत, काव्येतिहास संग्रह. संपा. का. ना. साने, पुणे, शके १८०९.

पेशवाईची अखेर, इतिहास आणि ऐतिहासिक, भाग ३. सत्कार्योत्तेजक सभा, धुळे, शके १८४०.

श्रीमंत महाराज भोसले यांची बखर, मराठी दप्तर, रुमाल १. संपा. वि. ल. भावे, ठाणे, शके १८४४.

## फारशी


मासीर-उल्-उमरा .. .. शहानवाजखान मोगल

तारीखे राहत अफजा .. .. सय्यद महंमद अली अल् हुसेनी गुलाम अली आजाद.

खजानाये आमिरा .. .. बिलग्रामी (यांत अहमदशहा अबदालीची हकीगत आली आहे.)

तारीखे जफरा (इ. स. १७७१) .. गिरिधारीलाल अहकर

तुजके अरासफिया .. .. तजल्ली शहा

हदीकतुल आलम (इ. स. १८०७) .. सय्यद महमद उर्फ मीर अबूतुराब

नजीबखान

निगारिस्ताने आसफी .. .. इल्तिफात हुसेनखान

यादगारे मखनलाल .. .. मखनलाल

मीराते अहमदी .. .. .. गुजरातवरील मुसलमानी सत्तेचा इतिहास

तझरिका .. .. .. इलियट डाऊसन, व्हॉ. ८ मध्ये इंग्रजी भाषांतर.

खुलसत अल-कलम .. .. नवाब अली इब्राहिमखान

मासिर-इ-तालिबीफी

बीलाडी-अफानजी .. .. मिर्झा अबू तलीबखान.

मुन्तखाब-उल-लुबाब . .. खाफीखान ह्या पुस्तकाचे इंग्रजी भाषांतर इलियट अँन्ड डाऊसन, हिस्टरी ऑफ इन्डिया, व्हॉ. ७ मध्ये प्रसिद्ध झाले आहे.

मुझाफरनामा .. .. .. करम अली.

नुक्सा-ई-दिलकुशा .. .. भीमसेन सक्सेना—जदुनाथ सरकार यांनी केलेले इंग्रजी भाषांतर महाराष्ट्र शासनाने प्रसिद्ध केले (१९७२).

शहानामाये अहमदिया .. .. निजामुद्दीन इश्रत अहमदशहा अबदालीच्या जीवनावरील महाकाव्य. याचा विषय १७७२ पर्यंत आहे. हस्तलिखित प्रत हैद्राबादच्या सरकारी ग्रंथालयात.

तारीखे फैजबक्ष .. .. शिवप्रसाद.

रोहिलखंडाच्या रोहिल्यांचा इतिहास, हस्तलिखित रामपूरच्या सरकारी ग्रंथालयात.

काशिराजाची बखर .. .. मूळ फारशी भाषेत, इंग्रजी भाषांतराचा मराठी अनुवाद इ. स. १८७७ मध्ये लोकहितवादींनी प्रसिद्ध केला.

